# Dr. BABASAHEB AMBEDKAR WRITINGS AND SPEECHES
## Vol. 18
## PART 1

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे
## खंड १८
## भाग १

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे
## भाग १
## १९२० ते १९३६





डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती,
उच्च आणि तंत्रशिक्षण विभाग,
महाराष्ट्र शासन
२००२

Dr. BABASAHEB AMBEDKAR
WRITINGS AND SPEECHES

**Published Volumes**

**Vol. 1**
Castes in India and 11 other essays
*Pages 520, Rs.40*

**Vol. 2**
Dr. Ambedkar
in the Bombay Legislature, with the
Simon Commission and at the
Round Table Conferences - 1927 to 1939
*Pages 826, Rs. 80*

**Vol. 3**
Philosophy of Hinduism.
India and the Pre-requisites of Communism.
Revolution and Counter-Revolution.
Buddha or Karl Marx.
*Pages 508, Rs. 40*

**Vol. 4**
Riddles in Hinduism.
*Pages 368, Rs. 35*

**Vol. 5**
Essays on Untouchables and
Un-touchability.
*Pages 496, Rs. 40*

**Vol. 6**
The Evolution of Provincial Finance
in British-India.
The problem of the Rupee.
*Pages 712, Rs. 55*

**Vol. 7**
Who were the Shudras ?
The Untouchables.
*Pages 390, Rs. 40*

**Vol. 8**
Pakistan or the Partition of India.
*Pages 510, Rs. 40*

**Vol. 9**
What Congress and Gandhi have
done to the Untouchables.
Mr. Gandhi and the Emancipation
of the Untouchables.
*Pages 500, Rs. 50*

**Vol. 10**
Dr. Ambedkar
as Member of the Governor
General's Executive Council 1942-46.
*Pages 1080, Rs. 95*

**Vol. 11**
The Buddha and His Dhamma.
*Pages 620, Rs. 70*

हे कार्य जसे स्वहिताचे आहे तसेच हे कार्य राष्ट्रहिताचेही आहे. चातुर्वर्णांतर्गत अस्पृश्यता नाहिशी झाल्याशिवाय हिंदू समाजाचा तरणोपाय नाही. परस्परांच्या जीवनकलहात तरणोपाय म्हणून कोणत्याही समाजास जी साधनसामग्री अवश्यमेव लागते त्या साधनसामग्रीत समाजाची नीतिमत्ता हे एक मोठेच साधन आहे. एवढी गोष्ट कोणासही कबूल करावी लागेल की, ज्या समाजाची नीतिमत्ता अशा प्रकारची आहे की, ज्या गोष्टीमुळे समाज एकवट होत नाही त्या गोष्टी स्त्युत्य धरल्या जातात व ज्यामुळे तो एकवट होऊ शकतो अशा गोष्टी निषिद्ध मानिल्या जातात, त्या समाजास जीवनकलहात हार खाली लागणार आहे. उलटपक्षी ज्या समाजाची नीतिमत्ता अशा प्रकारची आहे की, ज्या कारणामुळे समाज एकवट होतो ती कारणे स्त्युत्य धरली जातात व ज्या कारणामुळे समाज दुभंग होतो ती कारणे निंद्य मानली जातात त्या समाजास जीवनकलहात यशप्राप्ती झाल्याशिवाय राहाणार नाही. तोच न्याय हिंदू समाजव्यवस्थेस लागू करणे प्राप्त आहे. चातुर्वर्ण्यव्यवस्था ही लोकविग्रहकारी व्यवस्था आहे व एकवर्णी व्यवस्था लोकसंग्रहकारी व्यवस्था आहे हे उघड्या डोळ्यांनी दिसत असता जेणे विग्रह होतो अशा व्यवस्थेचा उदो उदो करणाऱ्या हिंदू समाजाला वारंवार हार खावी लागली तर त्यात नवल काय ? ही होत असलेली अनवस्था जर टाळावयाची असेल तर चातुर्वर्ण्याची चौकट मोडून तिचा एक वर्ण केलाच पाहिजे.–– (पृ. क्र. १२०)

–– डॉ. बाबासाहेब आंबेडकर

# Dr. BABASAHEB AMBEDKAR WRITINGS AND SPEECHES

Vol. 18

PART 1

1920 TO 1936

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे

खंड १८

भाग १

१९२० ते १९३६



वस्तुतः 'स्वराज्य' हा शब्द उच्चारताच आम्हाला आमच्यावर झालेल्या गतकाळातील अत्याचार, दमन आणि अन्याय यांची आठवण होते आणि भावी स्वराज्यातही त्याची पुनरावृत्ती होईल अशी आम्हाला साधार भीती वाटते. तरीही स्वराज्य मिळावे असेच आमचे मत आहे.

-- डॉ. बाबासाहेब आंबेडकर




# Dr. BABASAHEB AMBEDKAR WRITINGS AND SPEECHES

Vol. 18

PART 1

## डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे

खंड १८

भाग १

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे

भाग १

१९२० ते १९३६

संपादक

वसंत मून हरी नरके

प्रा. अशोक गोडघाटे प्रा. डॉ. म. ल. कासारे एन. जी कांबळे

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती, महाराष्ट्र शासन,
शासकीय कुटीर क्र: १८, मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०२१.

Dr. Babasaheb Ambedkar Writings and Speeches Vol. 18, Part 1 (Dr. Babasaheb Ambedkar Yanchi Bhashane) Marathi book, Edited by Vasant Moon, Hari Narke, Ashok Godghate, M. L. Kasare, N. G. Kamble, for Dr. Babasaheb Ambedkar, Source Material Publication Committee, Govt. of Maharashtra, Barrack No. 18. Opp. Mantralaya, Mumbai 400 021. INDIA.

First Edition -15th October 2002.

प्रथमावृत्ती : १५ ऑक्टोबर २००२
(धम्मचक्र प्रवर्तन दिन.)

प्रती : ३०,०००



प्रकाशक :
डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती,
महाराष्ट्र शासन,
शासकीय कुटीर क्र. १८,
मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०२१.



मूल्य : रुपये १००.००

मुद्रक :
व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर.

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती

| | | |
|---|---|---|
| (१) | मा. ना. दिलीप वळसे-पाटील<br>मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण | अध्यक्ष |
| (२) | मा. ना. अनिस अहमद<br>राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण | सदस्य |
| (३) | श्री. रा. सु. गवई (खासदार) | सदस्य |
| (४) | श्री. रामदास आठवले (खासदार) | सदस्य |
| (५) | श्री. प्रकाश आंबेडकर (खासदार) | सदस्य |
| (६) | प्रा. जोगेंद्र कवाडे (आमदार) | सदस्य |
| (७) | प्रा. एन. डी. पाटील | सदस्य |
| (८) | श्री. लक्ष्मण माने | सदस्य |
| (९) | श्री. शां. शं रेगे | सदस्य |
| (१०) | डॉ. यशवंत मनोहर | सदस्य |
| (११) | डॉ. गंगाधर पानतावणे | सदस्य |
| (१२) | डॉ. जनार्दन वाघमारे | सदस्य |
| (१३) | प्रा. केशव मेश्राम | सदस्य |
| (१४) | श्री. टी. एम कांबळे | सदस्य |
| (१५) | प्रा. अशोक गोडघाटे | सदस्य |
| (१६) | श्री. एन. जी. कांबळे | सदस्य |
| (१७) | प्रा. डॉ. एम. एल. कासारे | सदस्य |
| (१८) | श्री. हरी नरके, सदस्य सचिव<br>महात्मा फुले चरित्र साधने प्रकाशन समिती | सदस्य |
| (१९) | श्री. प्रकाश मोरे, संचालक<br>शासकीय मुद्रणालये, लेखन सामग्री व प्रकाशने | सदस्य |
| (२०) | श्रीमती चंद्रा अय्यंगार<br>प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण | सदस्य |
| (२१) | डॉ. एस एन. पठाण, संचालक<br>उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे | निमंत्रक |
| (२२) | श्री. हरी नरके | सदस्य सचिव |

## डॉ बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती
## अध्यक्ष व सदस्यांची नावे व पत्ते

(१) मा. ना. दिलीप वळसे पाटील,
मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण तथा
अध्यक्ष, डॉ. बाबासाहेब आंबेडकर
चरित्र साधने प्रकाशन समिती,
मंत्रालय, ५ वा मजला,
मुंबई-४०० ०३२.

(२) मा. ना. अनिस अहमद
राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण तथा
सदस्य-डॉ. बाबासाहेब आंबेडकर
चरित्र साधने प्रकाशन समिती
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

(३) मा. खासदार रा. सु. गवई
९०२, पुर्णा, वरळी सागर,
को. ऑ. हौ. सोसायटी, सर
पोचखानवालारोड, वरळी,
मुंबई-४०० ०२५.

(४) श्री. रामदास आठवले
रिपब्लिकन पार्टी ऑफ इंडिया,
कार्यालय, आझाद मैदान, मुंबई.

(५) श्री. प्रकाश आंबेडकर
राजगृह, हिंदु कॉलनी, रोड नं. ६,
दादर, मुंबई-४०० ०१४.

(६) प्रा. जोगेंद्र कवाडे
२३४-ए, लक्ष्मी नगर, नागपूर.

(७) प्रा. एन. डी. पाटील
डेक्कन सोसायटी, ए बिल्डिंग,
फ्लॅट नं. ५०२, युनियन पार्क,
खार दांडा, मुंबई-५२.

(८) श्री. लक्ष्मण माने
१०-व, मुक्काम पोस्ट करंजे,
जिल्हा सातारा.

(९) श्री. शां. शं. रेगे
१९, भाई जीवनजी लेन,
स. का. पाटील उद्यानाच्या मागे,
ठाकूरद्वार, मुंबई-२

(१०) डॉ. यशवंत मनोहर
लुंबिनी, ४५, लोकसेवानगर,
नागपूर-४४० ०२२.

(११) डॉ. गंगाधर पानतावणे
''श्रावरती'', मिलिंद महाविद्यालया-
समोर, छावणी,
औरंगाबाद-४३१ ००२

(१२) डॉ. जनार्दन वाघमार
आविष्कार बिल्डिंग,
ए. पी.ऑफिसच्या बाजूला, लातूर.

(१३) प्रा. केशव मेश्राम
ए/२/३०, अर्जुनराव को. औ. हो.
सोसायटी लिमीटेड, गीतांजली-
नगर, माहीम (पू.)मुंबई-४०० ०१७

(१४) श्री. टी. एम. कांबळे
२९/८२७, बौद्ध नगर, लातूर.

(१५) प्रा. अशोक गोडघाटे
१, सातपुते ले-आऊट, नरकेसरी
सोसायटी,सोमलवाडा, नागपूर-२५.

(१६) एन. जी. कांबळे, आय. पी. एस. (निवृत्त)
५२९-ए, हनुमान नगर,
नागपूर-४४० ००९.

(१७) प्रा. डॉ. मधुकर कासारे
''राजगीर'' वैशाली नगर,
सेवाग्राम रोड, वर्धा.

(१८) प्रकाश मोरे
संचालक, शासन मुद्रण, लेखन
सामग्री व प्रकाशन संचालनालय
चर्नी रोड स्टेशन जवळ,
नेताजी सुभाष रोड, मुंबई-४०० ००४.

(१९) श्रीमती चंद्रा अय्यंगार
प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण
विभाग,मंत्रालय, मुंबइ-४०० ०३२.

(२०) डॉ. शहाबुद्दीन नसरुद्दीन पठाण
संचालक, उच्च शिक्षण मध्यवर्ती
इमारत, पुणे-४११ ००१.

(२१) हरी नरके
सदस्य-सचिव डॉ. बाबासाहेब
आंबेडकर च सा. प्र. समिती
बी-१२ तेजलकुंज, संगम प्रेस
समोर, कर्वे रोड, कोथरूड,
पुणे-४११० २९.

मुख्य मंत्री


सत्यमेव जयते

महाराष्ट्र

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २० ऑगस्ट २००२.

## प्र स्ता व ना

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची सर्व भाषणे महाराष्ट्र शासनाच्या उच्च व तंत्रशिक्षण विभागातर्फे १८ व्या खंडाच्या रूपाने प्रसिद्ध होत आहेत, याचा मला अतिशय आनंद वाटतो. हा ग्रंथ संशोधकांना अतिशय उपयुक्त ठरणार आहे. १८ व्या खंडातील डॉ. आंबेडकरांची सर्व भाषणे मराठीमध्ये आहेत. त्यामुळे महाराष्ट्रातील लोकांनी ही भाषणे अवश्य वाचावीत. या भाषणांवरून डॉ. आंबेडकरांच्या महान व्यक्तिमत्वाची कल्पना येईल.

डॉ. आंबेडकरांनी देशातील आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक, धार्मिक, राजकीय इत्यादी विविध विषयांवर वेळोवेळी भाषणे दिली. कोणताही विषय असो, डॉ. आंबेडकरांनी त्या विषयाच्या संदर्भात मूलभूत पण वस्तूनिष्ठ विचार मांडलेले आढळून येतात. दलित, कामगार, शेतकरी, महिला या साऱ्यांसंदर्भात त्यांनी मूलगामी विचार मांडले. ते केवळ विचार मांडूनच थांबले नाहीत तर ते प्रश्न सोडविण्याच्या दृष्टिने त्यांनी उपाय देखील सांगितले. तरूण पिढीने ही भाषणे वाचावीत, असा माझा आग्रह आहे. २१ व्या शतकात आपल्या देशाला विकासाच्या दिशेने घेऊन जायचे असेल, तर डॉ. आंबेडकरांच्या विचारांशिवाय पर्याय नाही.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे विसाव्या शतकातील महान समाजक्रांतीकारक नेते आणि विचारवंत होते. डॉ. आंबेडकरांनी भारतीय समाजाला विचारांची एक नवी दिशा दिली. वर्षानुवर्षे रूढी, परंपरांच्या निद्रेत असलेल्या भारतीय समाजाला जागे करण्याचे कार्य त्यांनी केले. त्यांनी देशातील दलित, पिडीत, शोषित बहुजन समाजाला जागृत करून त्यांना मानवी अधिकार मिळवून दिले.त्यांचे हे क्रांतीकारी कार्य रूढीग्रस्त समाजाला पचणारे नव्हते. त्यामुळे त्यांना खूप विरोध सहन करावा लागला. तरी देखील त्यांनी विरोधाची तमा न बाळगता आपले आंदोलन पुढे नेण्याचा आटोकाट प्रयत्न केला.

डॉ. आंबेडकरांनी राष्ट्रवादाची संकल्पना मांडून देशातील जनतेला खऱ्या राष्ट्रवादाची ओळख करून दिली. राष्ट्रापेक्षा नेते किंवा लोक महान नाहीत, असे त्यांचे स्पष्ट मत होते. मुंबई विधी मंडळात बोलताना डॉ. आंबेडकर ४ एप्रिल १९३८ रोजी म्हणाले होते की, '' आपण प्रथम भारतीय, शेवटीही भारतीय, भारतीय पलीकडे काही नको हीच भूमिका घ्यावी. हीच वृत्ती खऱ्या भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याला पोषक आहे. ''.

डॉ. आंबेडकरांचे सारेच विचार हे प्रेरणादायी आहेत. डॉ. आंबेडकरांच्या या विचारांचा गांभीर्याने अभ्यास केल्याशिवाय देशाला प्रगतीच्या दिशेने वाटचाल करता येणार नाही.

महाराष्ट्र शासनाच्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समितीने ही भाषणे संकलित करून ती वाचकांना उपलब्ध करून दिली, त्याबद्दल समितीचे हार्दिक अभिनंदन. कालवश वसंत मून यांचे या क्षेत्रातील योगदान आज प्रकर्षाने आठवते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या या भाषणांचे संकलन करण्यासाठी त्यानी फार मोठी मेहनत घेतली होती. अतिथी संपादक प्रा. अशोक गोडघाटे, प्रा. एम. एल. कासारे, श्री. एन. जी. कांबळे यांनी उर्वरित भाषणे मिळविण्यासाठी व त्यांचे सुयोग्य संपादन करण्यासाठी घेतलेले परिश्रम मोलाचे आहेत. समितीचे नवनियुक्त सदस्य सचिव आणि तरूण पिढीतले संशोधक श्री. हरी नरके यांनी या खंडाच्या प्रकाशनाला विशेष गती दिली. खात्याचे मंत्री आणि समितीचे अध्यक्ष श्री. दिलीप वळसे-पाटील, यांनी समितीच्या दरमहा बैठका घेऊन मधल्या काळात प्रलंबित असलेल्या प्रकाशनाच्या कामांना अग्रक्रम दिल्यामुळे हा खंड इतक्या लवकर वाचकांना उपलब्ध होत आहे. समितीचे सर्व सदस्य आणि ज्यांच्या प्रयत्नांमुळे हा उत्तम ग्रंथ वाचकांना उपलब्ध झाला त्या सर्वांना धन्यवाद.

**(विलासराव देशमुख)**
मुख्यमंत्री.

# मनोगत

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या समग्र भाषणांचा खंड वाचकांच्या हातात देताना मला अतिशय आनंद होत आहे. डॉ आंबेडकरांची संपूर्ण भाषणे संकलीत करण्याचे कठीण कार्य डॉ. आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समितीने केले, त्याबद्दल समितीचे सदस्य सचिव व सर्व सदस्य अभिनंदनास पात्र आहेत.

डॉ. आंबेडकरांचे विचार सर्वसामान्य जनतेपर्यंत पोहोचविण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र शासनाने त्यांचे संपूर्ण लेखन आणि भाषणे प्रकाशित करण्याचे कार्य हाती घेतले.

डॉ. आंबेडकरांचे विचार हे वस्तुनिष्ठ आहेत. वस्तुनिष्ठ विचार हे कधीही कालबाह्य ठरत नाहीत.

डॉ. आंबेडकरांनी भारतीय समाजात खऱ्या अर्थाने प्रबोधनाचा विचार मांडला. त्यांच्या विचारामुळे देशातील दलित समाजात परिवर्तन घडून आले. ज्या लोकांनी डॉ. आंबेडकरांचे क्रांतीकारी तत्त्वज्ञान स्वीकारले ते लोक प्रगतीच्या दिशेने वाटचाल करीत असल्याचे आढळून येते.

डॉ. आंबेडकरांच्या तत्त्वज्ञानाचा शालेय आणि महाविद्यालयीन अभ्यासक्रमांत समावेश करणे आवश्यक आहे. नागपूर विद्यापीठ आणि डॉ. आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथे डॉ. आंबेडकरांच्या विचारांच्या संदर्भात स्वतंत्र पदव्यूत्तर विभाग आहेत. विद्यार्थ्यांना विज्ञानावर आधारित असलेले शिक्षण देणे ही काळाची गरज आहे. तरच देशाची नवी पिढी ही अंधश्रद्धा आणि कालबाह्य रूढींवर विश्वास ठेवणार नाही आणि ती बुद्धीवादी बनेल.

डॉ. आंबेडकर हे अर्थशास्त्रज्ञ, राज्यशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ, कायदेतज्ज्ञ, मानववंशशास्त्रज्ञ आणि शिक्षणतज्ज्ञ होते. त्यांची भाषणे वाचताना त्यांच्यातील वैचारिक परिपक्वता पदोपदी आढळून येते. त्यांच्या विचारात विज्ञानवाद आणि मानवतावाद या दोहोंचा संगम दिसून येतो. डॉ. आंबेडकर हे या देशातील एक असामान्य विचारवंत आणि तत्त्ववेत्ते होते. त्यांच्या या समग्र भाषणांतून देशातील युवा पिढीला निश्चित प्रेरणा मिळेल.

श्री. वसंत मून यांची प्रकृती बरी नसतानाही त्यांनी समितीच्या ग्रंथ प्रकाशनाच्या कामात दिलेल्या योगदानाची आज आठवण होते.त्यांचे १ एप्रिल २००२ रोजी दुःखद निधन झाले. कालवश श्री. मून यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची ही मौलिक साहित्य सृष्टी जनतेला उपलब्ध व्हावी म्हणून समर्पित वृत्तीने कार्य केले होते.

समितीचे नवनियुक्त सदस्य सचिव श्री. हरी नरके यांनी एप्रिलपासून युद्धपातळीवर या कामाला प्रारंभ करून गेली अनेक वर्षे काही अपरिहार्य कारणांमुळे प्रकाशित न होऊ शकलेले मराठी भाषांतराचे खंड येत्या काही महिन्यांत वाचकांना उपलब्ध करून देण्याचे नियोजन केले आहे. तसेच मराठीतील खंड अठरावाही वाचकांना त्वरित उपलब्ध करुन देणे शक्य झाले. आम्ही समितीच्या मे पासून दरमहा बैठका घेऊन कामाला गती दिली आहे. समितीचे सर्व सदस्य, विशेषतः खासदार रा. सु. गवई, आमदार जोगेंद्र कवाडे, माजी आमदार टी. एम. कांबळे, प्रा. गंगाधर पानतावणे, प्रा. यशवंत मनोहर, प्रा. केशव मेश्राम, प्रा. अशोक गोडघाटे, प्रा. म. ल. कासारे, श्री. एन. जी. कांबळे आदींनी या ग्रंथाच्या प्रकाशनासाठी दिलेले सहकार्य मोलाचे आहे.

प्रा. गंगाधर पानतावणे यांनी ग्रंथसूची बनवून दिली. अतिथी संपादक म्हणून प्रा. गोडघाटे, प्रा. कासारे व श्री. कांबळे या त्रयींनी अपार मेहनत घेऊन ह्या ग्रंथाचे साक्षेपी संपादन केले. ग्रंथाचे संपादक श्री. वसंत मून व श्री. हरी नरके आणि अतिथी संपादक प्रा. अशोक गोडघाटे, प्रा. म. ल. कासारे, श्री. एन. जी. कांबळे यांचे अभिनंदन !

(दिलीप वळसे-पाटील)

मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण

महाराष्ट्र राज्य.

# खंड अठराच्या निमित्ताने

प्रिय वाचक,

सप्रेम जयभीम !

डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणांचा अठरावा खंड वाचकांच्या हातात देताना आमच्या भावना संमिश्र आहेत. डॉ. बाबासाहेबांसारख्या विसाव्या शतकातील एका सर्वश्रेष्ठ भारतीय वक्त्याची सर्व भाषणे प्रथमच वाचकांच्या हाती पडत असल्याचा अत्यानंद आणि डॉ. बाबासाहेबांच्या समग्र साहित्याच्या प्रकाशनासाठी संपूर्ण आयुष्य झोकून देऊन समर्पित वृत्तीने काम करणारे प्रख्यात संशोधक, संपादक आयु. वसंत मून यांचे १ एप्रिल २००२ रोजी झालेले निर्वाण याचे दुःख अशा आमच्या संमिश्र भावना आहेत.

कालवश वसंत मून यांनी केलेले या साहित्य मालिकेतील खंड १ ते १६ चे साक्षेपी संपादन देशविदेशांत विद्‌वतमान्य आणि लोकप्रिय झालेले आहे. शेवटच्या आजारातही आयु. मून यांची या साहित्याच्या प्रकाशनासाठी सदैव धडपड चालू असायची. महात्मा फुले चरित्र साधने प्रकाशन समितीचे काम करताना आम्हाला आयु. वसंत मून यांचे सदैव मार्गदर्शन मिळत असे. आम्ही सदैव एकत्रच काम करीत असू. त्यांच्या आजारपणात डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समितीच्या कामात खंड पडू नये म्हणून मून सरांनी समितीचा कार्यभार आमच्याकडे सोपवला, आम्हाला तो आमचा फार मोठा गौरव वाटला.

तत्कालीन राज्यपाल डॉ. पी. सी. अलेक्झांडर यांच्या हस्ते ६ सप्टेंबर २००१ रोजी यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठानमध्ये १७ वा खंड आयु. मून यांच्या उपस्थितीत प्रकाशित झाला. परंतु त्यात काही त्रूटी राहून गेल्याने त्याची विक्री थांबवून निर्दोष खंड तयार करण्यासाठी हरी नरके, प्रा. अशोक गोडघाटे, एन. जी. कांबळे व प्रा. म. ल. कासारे यांचे संपादक मंडळ नेमण्यात आले. दरम्यान मराठीतील खंड १८ आणि १९ चे उर्वरित कामांसाठी मा. खासदार रा. सु. गवई यांनी प्रा. अशोक गोडघाटे, प्रा. म. ल. कासारे व एन. जी कांबळे यांची अतिथी संपादक म्हणून साथ मिळवून दिली. गवईसाहेबांचे मार्गदर्शन आणि आस्थेवाईक पाठपुरावा आणि अतिथी संपादक त्रयींची बेजोड मेहनत यांच्यामुळेच आज हा १८ वा खंड वाचकांच्या हाती आम्ही दर्जेदार आणि सुबक निर्मितीमूल्यांसह देऊ शकलो.

डॉ. आंबेडकरांनी आपल्या जीवनात विविध प्रसंगी जी भाषणे दिलेली आहेत ती भाषणे या खंडात प्रकाशित केली आहेत. आमच्या संशोधनातून आम्हाला मिळालेली डॉ. आंबेडकरांची ३५१ भाषणे या खंड १८ मध्ये दिलेली आहेत. आमच्या माहितीनुसार त्यांच्या सर्वच भाषणांचा समावेश या खंडात करण्यात आलेला आहे. याव्यतिरिक्त डॉ. आंबेडकरांनी आणखीही भाषणे केलेली असण्याची शक्यता आहे. परंतु ती भाषणे आम्हाला उपलब्ध झालेली नाहीत, तसेच त्या संदर्भात लिखित पुरावाही कुठे मिळाला नाही. या खंडातील सर्व भाषणांची मिळून पृष्ठ संख्या १८०० इतकी आहे. एवढ्या पृष्ठांचा एकत्रित खंड करणे हे वाचकांना हाताळण्याच्या दृष्टीने सोयीस्कर होणार नाही, त्यामुळे या १८ व्या खंडाचे तीन भाग केले आहेत.

पहिल्या भागात १९२० ते १९३६ या कालखंडातील भाषणे आहेत. दुसऱ्या भागात १९३७ ते १९४५ या कालखंडातील भाषणे तर तिसऱ्या भागात १९४६ ते १९५६ या कालखंडातील भाषणे आहेत.

खऱ्या अर्थाने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी प्रखर सामाजिक प्रबोधनाची सुरुवात १९२० पासून केली. दक्षिण महाराष्ट्रातील बहिष्कृत वर्गाची परिषद कोल्हापूर संस्थानातील माणगाव येथे २१ व २२ मार्च १९२० मध्ये आयोजित करण्यात आली होती. या परिषदेत कोल्हापूर संस्थानचे राजे शाहू छत्रपती महाराज उपस्थित होते. या परिषदेचे अध्यक्ष म्हणून डॉ. आंबेडकरांची निवड करण्यात आली होती. या परिषदेत २१ मार्च १९२० ला डॉ. आंबेडकरांनी भाषण दिले. सार्वजनिक जीवनातील डॉ. आंबेडकरांचे हे भाषण त्यांचे पहिले भाषण होय. या भाषणाने १८ व्या खंडाच्या पहिल्या भागाची सुरुवात झाली. पहिल्या भागात २१ मार्च १९२० ते ८ नोव्हेंबर १९३६ या कालखंडात डॉ. आंबेडकरांनी दिलेल्या भाषणांचा समावेश करण्यात आला आहे. महाडच्या सत्याग्रहाच्या निमित्ताने डॉ. आंबेडकरांनी २५ डिसेंबर १९२७ ला दिलेले ऐतिहासिक भाषण, नागपूर येथील ८ व ९ ऑगस्ट १९३० ला अ. भा. दलित वर्गाच्या परिषदेतील भाषण, गोलमेज परिषदेतील २० नोव्हेंबर १९३० चे भाषण, १३ ऑक्टोबर १९३५ ची धर्मांतराची घोषणा आणि ३१ मे १९३६ चे मुंबई येथील धर्मांतरासंबंधी मुक्ती कोण पथे ? अशी ही सर्व महत्त्वाची भाषणे पहिल्या भागात आहेत.

दुसऱ्या भागात १६ जानेवारी १९३७ ते २७ डिसेंबर १९४५ या कालखंडातील भाषणांचा समावेश आहे. स्वतंत्र मजूर पक्षाच्या निमित्ताने तसेच निवडणुकीत स्वतंत्र मजूर पक्षाच्या उमेदवारांच्या प्रचारासंबंधी बाबासाहेबांनी केलेली भाषणे, रेल्वे अस्पृश्य कामगार परिषद, नागपूर येथील अ. भा. दलितवर्ग परिषद इत्यादी प्रसंगी डॉ. आंबेडकरांनी दिलेली महत्त्वाची भाषणे या दुसऱ्या भागात आहेत.

तिसऱ्या भागात १४ जानेवारी १९४६ ते २५ नोव्हेंबर १९५६ या कालखंडातील डॉ. आंबेडकरांच्या भाषणांचा समावेश आहे. या भागात डॉ. आंबेडकरांनी १४ ऑक्टोबर १९५६ ला नागपूर येथे बुद्ध धम्माची दीक्षा घेतली, त्याप्रसंगी त्यांनी दिलेले ऐतिहासिक भाषण आहे. नेपाळ देशातील काठमांडू येथील जागतिक बौद्ध परिषदेत २० नोव्हेंबर १९५६ ला '' बुद्ध की कार्ल मार्क्स ''या विषयावरील डॉ. आंबेकरांचे ऐतिहासिक भाषण झाले. हेच डॉ. आंबेडकरांचे शेवटचे भाषण मानले जायचे. परंतु हे भाषण शेवटचे भाषण नाही. काठमांडूवरून भारतात परत येताना ते वाराणशी आणि सारनाथ येथे गेले. त्या ठिकाणी त्यांची काशी विद्यापीठ आणि सारनाथ येथे एकूण चार भाषणे झाली.

काशी विद्यापीठाच्या विद्यार्थी परिषदेचे २५ नोव्हेंबर १९५६ ला डॉ. आबेडकरांच्या हस्ते उद्घाटन झाले. या प्रसंगी त्यांनी नाग व आर्य यांच्यातील संघर्ष, बौद्ध धम्म, ब्राम्हण व क्षत्रिय यांचा संघर्ष या संदर्भात आपल्या अभ्यासपूर्ण भाषणातून विचार मांडले. आर्यांचे भारतात आगमन होण्यापूर्वी नाग लोकांची भारतात वस्ती होती, आणि हे नाग लोक आर्यांपेक्षा अधिक सुसंस्कृत असल्याचे या भाषणात डॉ. आंबेडकरांनी प्रतिपादन केले.

डॉ. आंबेडकरांचे आपल्या आयुष्यातील शेवटचे भाषण सारनाथ येथील धम्मेक स्तूपाजवळ २५ नोव्हेंबर १९५६ ला झाले. तथागत बुद्धांनी ज्या ठिकाणी पंचवग्गीय भिक्खूंना आपला पहिला उपदेश करून धम्मचक्र प्रवर्तन केले, त्याजागी सम्राट अशोकाने एक स्तूप उभारला, त्या स्तूपास धम्मेक स्तूप म्हणतात.या स्तूपाच्या सावलीत डॉ. आंबेडकरांचा स्वागत समारंभ महाबोधी सोसायटीच्या वतीने आयोजित करण्यात आला होता. या ठिकाणी डॉ. आबेडकरांचे अखेरचे आणि ऐतिहासिक भाषण झाले. या भाषणात डॉ. आंबेडकरांनी स्पष्टपणे सांगितले की, '' माणसा माणसातील संबंध प्रेम, करुणा या तत्त्वानुसार जोडणारा बौद्ध धर्म हा एकमेव आहे.'' धम्मेक स्तूपाजवळ डॉ. आंबेडकरांनी केलेले हे भाषण त्यांच्या जीवनातील शेवटचे भाषण ठरले. या शेवटच्या भाषणाविषयी अनेक लोकांना माहिती नाही.

यापूर्वी डॉ. आंबेडकरांची काही महत्त्वाची भाषणे मराठी, इंग्रजी आणि इतर भाषांमध्ये प्रसिद्ध झाली आहेत. परंतु त्यांची सर्व भाषणे आतापर्यंत वाचक आणि अभ्यासकांना एकत्र उपलब्ध नव्हती. डॉ. आंबेडकर लेखन आणि भाषणांच्या या १८ व्या खंडामुळे त्यांची मराठी भाषणे एकत्रितरित्या प्रथमच प्रकाशित होत आहेत. या खंडामुळे डॉ. आंबेडकरांवर संशोधन करणाऱ्या संशोधकांची विशेष सोय झाली आहे. या भाषणांच्या आधारे डॉ. आंबेडकरांच्या विचारांचे अधिक सखोल आणि वस्तूनिष्ठ अध्ययन करणे शक्य झाले आहे.

डॉ. आंबेडकरांची भाषणे ही फक्त राजकीय भाषणे आहेत असे नाही तर त्यांची सर्वच भाषणे विद्वत्ताप्रचूर आणि विचारप्रवर्तक आहेत. त्यामुळे या भाषणांना विशेष मोल आणि महत्त्व आहे. डॉ. आंबेडकरांची भाषणे एकत्रितरित्या नव्या पिढीला उपलब्ध करून देण्याचा जो उपक्रम शासन राबवित आहे, ते महाराष्ट्र शासनाचे फार मोठे कार्य आहे.

डॉ. आंबेडकरांचे खंड १८ चे मराठी साहित्य गोळा करण्यासाठी महाराष्ट्रात सर्वश्रेष्ठ गणले जाणारे, मराठीच्या वेगवेगळ्या प्रकारच्या पुस्तकांचे आगरच असलेले, अतिदुर्मिळ तसेच नवीन पुस्तके हमखास मिळण्याचे ठिकाण असलेल्या ' मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालया 'चा महत्त्वाचा वाटा आहे. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात दिनांक २९ जानेवारी १९८२ ते दिनांक २५ ऑक्टोबर १९८९ पर्यंत या कार्यालयातील कर्मचारी सौ. सु. मा. नेवरेकर यांना डॉ. आंबेडकरांचे मराठी साहित्याचे संशोधन करून ते टंकलिखित करण्यासाठी, या ग्रंथसंग्रहालयाचे संस्थाधीपाल कै. अच्युत तारी यांनी ग्रंथसंग्रहालयाच्या संदर्भ विभागात बसण्यासाठी सोयीस्कर अशी जागा उपलब्ध करून दिली. या ग्रंथसंग्रहालयातून (१) विविध-वृत्त, (२) चित्रमय जगत्, (३) सत्यदीपिका, (४) ज्ञानप्रकाश, (५) निर्भीड, (६) नवाकाळ, (७) केसरी, (८) तरुण भारत, (९) चित्रा, (१०) जनता इत्यादी वृत्तपत्रांतील साहित्य आम्ही गोळा केले. ग्रंथसंग्रहालयातील कर्मचारीवर्ग आवश्यक असणारे ग्रंथ, वर्तमानपत्रांच्या फाईल्स इत्यादी वेळच्या वेळी तत्परतेने काढून देत असत आणि हे सारे विनामूल्य करत असत. त्यांच्या या अमूल्य सेवेबद्दल सर्व कर्मचाऱ्यांना मनःपूर्वक धन्यवाद. विशेष गोष्ट म्हणजे हे काम चालू असतानाच महाराष्ट्र शासनाने सर्वोत्कृष्ट ग्रंथालयांना डॉ. आंबेडकर पुरस्कार देण्याची घोषणा केली. हा पुरस्कार मिळविण्याचा पहिला मान या मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाने मिळविला आहे.

खंड १८ साठी आवश्यक असलेले जनता पत्राचे बरेचसे अंक नागपूरच्या डॉ. आंबेडकर रिसर्च इन्स्टिट्यूटमध्ये मिळाले. तर काही अंक मुंबई विद्यापीठातून मिळवून त्यांचे झेरॉक्स करून घेतले. जनता पत्राचे अंक तसे फारच मोठे होते परंतु तेथील कर्मचारीवर्गाने त्यांचे झेरॉक्स देऊन आम्हाला मोलाचे सहाय्य केले त्याबद्दल त्यांचे आभारी आहोत.

खंड १८ चे काम चालू असताना समितीच्या सदस्यांना वेळोवेळी दाखवून त्यांची संमती घेतली जात होती. काही भाषणे प्रा. अशोक गोडघाटे, श्री. एन. जी. कांबळे व डॉ. प्रा. कासारे यांना संशोधनाने मिळाली. त्याचा त्यांनी या खंडात समावेश केला. अशाप्रकारे सहाय्य केल्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

या खंड १८ च्या प्रकाशनासाठी सतत प्रयत्नशील असणारे मंत्री ना. दिलीप वळसे-पाटील आणि मा. खासदार श्री. रा. सु. गवई यांचे आम्ही मन:पूर्वक आभार मानतो. या समितीच्या अध्यक्षपदाची धुरा खात्याचे मंत्री म्हणून नामदार दिलीप वळसे-पाटील यांच्याकडे जाताच त्यांनी सर्वप्रथम समितीच्या कामाचे ऐतिहासिक महत्त्व ओळखून समितीला तात्काळ मुदतवाढ तर दिलीच पण समितीच्या कामांना अग्रक्रम देण्याचा आदेश विभागाला दिला. ना. वळसे-पाटील यांनी आपल्या व्यस्ततेमधून वारंवार वेळ काढून आम्हाला मार्गदर्शन केले. समितीच्या दरमहा बैठका घेऊन प्रलंबित कार्याची त्वरित पूर्तता करण्यावर त्यांनी भर दिला. आज त्यांच्यामुळेच समितीच्या उर्वरित सर्व खंडांच्या कामांना विलक्षण वेग दिला गेला असून २१ खंडांचा हा नियोजित प्रकल्प अल्पावधीत पूर्ण होईल असा आम्हाला विश्वास वाटतो. संदर्भ साहित्याचे आजवर दोन खंड प्रकाशित झाले असून त्यातील '' मूकनायक व बहिष्कृत भारत '' या खंडाची दुसरी आवृत्तीही संपण्याच्या मार्गावर आहे. आणखी दोन खंड होतील इतके संदर्भ साहित्य समितीकडे उपलब्ध आहे. अशा प्रकारे एकूण २५ खंडाचा हा महाप्रकल्प युद्धपातळीवर पूर्ण करण्याचा समितीचा निर्धार आहे.

महाराष्ट्राची शान वाढवणारा हा ग्रंथप्रकल्प ज्यांच्या पुढाकाराने हाती घेतला गेला ते ,राज्याचे तत्कालीन मुख्यमंत्री मा. शरद पवार आजही या प्रकल्पाकडे बारकाईने लक्ष ठेवून असतात. आम्ही त्यांचे ऋणी आहोत.

या ग्रंथाला प्रा. डॉ. गंगाधर पानतावणे यांनी आपली हातातील सर्व कामे बाजूला ठेवून अतिशय विस्तृत अशी सूची बनवून दिल्याने ग्रंथाचे मोल वाढले. त्यांचे विशेष आभार.

या प्रकल्पातील खंड १ ते १५ आणि खंड सतराचे मराठी भाषांतरही आम्ही वाचकांना अतिसत्त्वर उपलब्ध करून देण्याचे नियोजन केले आहे. समितीच्या सदस्य-सचिव पदाची धुरा आमच्यावर सोपवून समितीने आमच्यावर दाखवलेल्या विश्वासाला पात्र ठरण्याचा आमचा प्रयत्न राहील. आमदार प्रा. जोगेंद्र कवाडे, माजी आमदार प्रा. टी. एम. कांबळे यांचे मार्गदर्शन आणि ज्येष्ठ विचारवंत प्रा. गंगाधर पानतावणे, कवीश्रेष्ठ प्रा. यशवंत मनोहर, प्रख्यात समीक्षक प्रा. केशव मेश्राम आणि या खंडाची अतिथी संपादक त्रयी तसेच समितीचे सर्व मान्यवर सदस्य यांच्या मार्गदर्शनामुळे समिती आपले नियोजित लक्ष्य निश्चित गाठू शकेल असा आम्हाला विश्वास वाटतो.

या खंडाची हाताळण्यास योग्य अशा तीन भागांत, सुस्पष्ट अक्षरांत व सर्वतोपरी आकर्षक पद्धतीने छपाई केल्याबद्दल तसेच वेळोवेळी आम्हाला मोलाचे सहकार्य दिल्याबद्दल शासकीय मुद्रण संचालनालयातील उप संचालक, श्री. उत्तम सोनावणे आणि शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर येथील प्रभारी व्यवस्थापक श्री. रुपेंद्र मोरे, आणि त्यांचे सर्व सहकारी यांचे मनःपूर्वक आभार.

या समितीचे कार्य ज्या विभागातून चालते त्या उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय येथील प्रधान सचिव श्रीमती चंद्रा अय्यंगार, उप सचिव श्री. मु. ध. अंबादे व कार्यासन अधिकारी श्रीमती सं. अ. घोरपडे यांच्या कर्तव्यतत्परतेमुळे, त्यांनी वेळोवळी समितीला आवश्यक असणाऱ्या शासकीय गोष्टींची पूर्तता केल्याने व त्यांना खंड प्रकाशनाच्या असलेल्या ओढीमुळे शासकीय अडथळे दूर होऊन आम्हाला मोलाचे सहाय्य झाले याबद्दल आम्ही त्यांचे आभार मानतो. उच्च शिक्षण विभागाचे संचालक डॉ. एस. एन. पठाण आणि सहसंचालक डॉ. अ. दा. सावंत यांच्या मौलिक सहकार्यामुळेच आमचे काम सुरळीतपणे चालू असते.

आमच्या कार्यालयातील कर्मचारी सौ. सुमित्रा मारुती नेवरेकर, सौ. शलाका शैलेंद्र तांबे, श्री. कमलाकर नीलवर्ण, श्री. मारुती पाडावे व श्री. विजय अनंत वैद्य यांनी टंकलेखन, पत्रव्यवहार इत्यादी बाबींत परिश्रम घेऊन या खंडाच्या निर्मितीत सहाय्य केले.

मा. मुख्यमंत्री ना. विलासराव देशमुख यांनी या ग्रंथाला दर्जेदार प्रस्तावना लिहून दिली. मुख्यमंत्री सचिवालयातील उप सचिव आणि माहिती व जनसंपर्क विभागाचे महासंचालक श्री. भूषण गगराणी हे साहित्यप्रेमी आहेत. डॉ. बाबासाहेबांच्या विचारांवरील प्रेमापोटी ते समितीला सर्व प्रकारचे सहकार्य नेहमीच देत असतात. त्यांच्या विभागातील संचालक श्री. प्रल्हाद जाधव, उप संचालक श्री. भि. म. कौसल यांचेही सहकार्य आम्हाला मिळत असते .

उप मुख्यमंत्री ना. छगन भुजबळ, अर्थ मंत्री ना. जयंत पाटील, राज्यमंत्री श्री. अनिस अहमद, खासदार रामदास आठवले आणि खासदार प्रकाश आंबेडकर आदी मान्यवरांचेही आम्हाला सदैव सहकार्य असते. वित्त विभागातील सह सचिव श्री. सुरेश गायकवाड यांच्या सहकार्यामुळे समितीच्या कामांना गती येते. यासर्वांचे आम्ही कृतज्ञ आहोत.

या खंडासाठी आम्हाला अनेकांचे सहाय्य झाले, त्या सर्वांचे आभार.

कालवश वसंत मून यांनी नियोजन आणि संकलन केल्यानुसार ही ग्रंथमालिका पूर्ण करण्यासाठी वाचकांच्या सहभागाची आम्हाला नितांत आवश्यकता आहे. या

मालिकेतील अनेक खंडांच्या आवृत्त्या आज संपलेल्या आहेत. आम्ही त्यांच्या सुधारित आवृत्त्या प्रकाशित करण्याच्या कामाला सुरुवात केलेली आहे. भारतरत्न आणि बोधीसत्त्व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या ग्रंथाच्या प्रती हातोहात संपत असतात. देश विदेशांतून या ग्रंथांना मोठी मागणी असते. यातून शासनाला मोठ्या प्रमाणावर विदेशी चलनही प्राप्त होते.

आज देशात केंद्रिय पातळीवर संविधान समिक्षा आणि शिक्षणाचे ब्राह्मणीकरण यातून घड्याळाचे काटे उलटे फिरविण्याचा प्रयत्न चालू आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे विचारधन म्हणजे परिवर्तनवादी चळवळींचे ऊर्जाकेंद्र होय. प्रतिगामी, जातीयवादी आणि धर्मांध शक्ती आक्रमकपणे उचल खात असताना, देशात प्रतिक्रांतीसदृश्य वातावरण असताना, बाबासाहेबांची ही भाषणे युवापिढीला नवी चेतना देतील आणि क्रांतीसन्मुख बनवतील असा विश्वास वाटतो. आपल्या प्रतिसादाच्या प्रतिक्षेत.

कृपया कळावे, कळवावे.

आपला स्नेहांकित,

(हरी नरके)
सदस्य - सचिव
डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने
प्रकाशन समिती, मुंबई.

# संपादकीय

महाराष्ट्र शासनाने स्थापित केलेल्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समितीच्या माध्यमातून आतापर्यंत प्रकाशित झालेल्या, डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे या खंड मालिकेतील हा अठरावा खंड वाचकांच्या हाती देताना होत असलेला आनंद अवर्णनीय आहे, नव्हे जीवनाच्या कृतार्थतेचं ते समाधान आहे.

प्रस्तुत खंडात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या आयुष्यात दिलेल्या भाषणांचा अंतर्भाव आहे. त्यांनी या देशात केलेल्या महान क्रांतीत त्यांच्या भाषणांचे योगदान अभूतपूर्व आहे. या माध्यमातून लाखो लोकांशी त्यांचा प्रत्यक्ष संबंध आला, 'गुलामाला त्याच्या गुलामगिरीची जाणीव करून द्या, त्यानंतर तो त्याविरुद्ध बंड करून उठेल.' या त्यांनी उद्धृत केलेल्या सुप्रसिद्ध वचनाप्रमाणे, भारतातील गुलामगिरीत पिचत पडलेल्या दलितांना, जे कर्मविपाकाच्या सिद्धांताला मान्यता देत, स्वतःच्या नशिबाला दोष देत ती गुलामगिरी निमूटपणे भोगत होते, तिची जाणीव डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या भाषणांच्या माध्यमातून त्यांना करून दिली, त्याविरूद्ध संघर्ष करण्यासाठी त्यांना या माध्यमातून उद्युक्त केले. आपल्या भाषणांच्या महत्त्वपूर्ण योगदानाचे वर्णन करताना १४ जानेवारी १९५५ रोजी मुंबईतील एका भाषणात डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणतात, ''बऱ्याच दिवसांपासून मी एक निर्णय घेतला होता की, कोणत्याही सार्वजनिक कार्यात नुसत्या व्याख्यानासाठी कधीच हजर राहावयाचे नाही. कारण नुसत्या व्याख्यानबाजीचा मला कंटाळा आहे, व्याख्यानात माझा सारा जन्म गेला आहे, उभी हयात गेली आहे. तथापि माझ्या व्याख्यानांचा समाजावर काहीच परिणाम झाला नाही, असे नाही. आज माझ्यापुढे अस्पृश्य समाजात जी जागृती झालेली दिसून येत आहे, ती माझ्या व्याख्यानांचेच फळ आहे, असे मी अभिमानाने सांगू शकतो.'' (प्रस्तुत खंड, भाग-३, पृष्ठ-४२५)

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या सुरवातीच्या सार्वजनिक जीवनाच्या काळाचे वर्णन करताना म्हणतात, ''ज्यावेळेस मी चळवळ सुरू केली त्यावेळेस मी, अध्यक्ष आणि टेबल एवढेच होतो ! त्याच्यावरून मी हताश झालो नाही.'' (प्रस्तुत खंड भाग-३, पृष्ठ-३४७) ज्याचे सार्वजनिक जीवन अशा पद्धतीने सुरु झाले, त्या माणसाने स्वतःच्या कर्तृत्वाने काळाला नवी दिशा दिली, त्याच्या सभेला लाखोच्या संख्येने माणसे यायला लागली, तीही उत्स्फुर्तपणे, दूरदुरून, पायपीट करीत. ज्यांनी त्यांची भाषणे ऐकलीत तो प्रसंग त्यांच्या जीवनातील एक अमोल ठेवा ठरला, जो त्यांनी स्वतःच्या आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत जपला.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अमोघ वक्तृत्वाने या देशात सर्वंकष क्रांती घडवून आणली. भारतीय समाजाचे असे एकही अंग नाही की ज्याला त्यांनी स्पर्श केला नाही. या सर्वंकष क्रांतीसाठी त्यांनी जी आयुधे वापरली त्यामध्ये त्यांची ओजस्वी वाणी या अत्यंत प्रभावशाली आयुधाचा त्यांनी पुरेपूर उपयोग केला. त्यामुळेच भारतीय समाजाला क्रांतीसन्मुख होणे भाग पडले ही वास्तवता कोणालाही नाकारता येणार नाही. सर्वात महत्त्वाचे म्हणजे देशातील तळागाळातील लोकांच्या मनात ज्वलंत स्वाभिमानाची भावना निर्माण करून जीवनाकडे पाहाण्याचा त्यांचा दृष्टिकोन त्यांनी संपूर्णतया बदलवला. जुन्या परंपरागत विचारांचा, चालिरितींचा लाखो लोकांनी एका क्षणात त्याग केला, माणूस स्वतःच्या जीवनाचा शिल्पकार आहे, माझे जीवन मी कोणावर सोपवणार नाही, ते मी स्वतः घडवणार आहे ही भावना दलितांच्या मनात निर्माण झाली तो केवळ डॉ बाबासाहेब आंबेडकरांच्या भाषणांचा परिणाम होय. एका माणसानी आपल्या भाषणांच्या द्वारे असंख्य लोकांच्या जीवनात आमूलाग्र परिवर्तन घडवून आणले. ही किमया केवळ डॉ. बाबासाहेब आंबेडकरच करू शकले. जगाच्या आजवरच्या इतिहासात अशी घटना ' न भूतो न भविष्यति' म्हणावी लागेल.

त्यांच्या भाषणांनी देशातील तळागाळातील शोषितांचे जीवन उजळून निघाले. त्यांच्या जीवनाला मान्यता मिळाली. त्याला प्रतिष्ठा प्राप्त झाली.

एके ठिकाणी लॉर्ड माऊंटबॅटनने बाबासाहेब आंबेडकरांचे वर्णन एक धाडसी योद्धा ( Brave Fighter ) असे केले आहे, ते यथार्थ आहे. बाबासाहेब आंबेडकरांनी या देशात एक घनघोर असा संग्राम केला त्यातूनच आधुनिक भारताची मुहूर्तमेढ रोवल्या गेली.

इटलीतील मॅझीनीच्या, विचार अमर असतात या विधानावर स्वतःची प्रतिक्रिया व्यक्त करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणतात, विचार सुद्धा मर्त्य आहेत. ज्याप्रमाणे रोपट्यांना पाण्याची आवश्यकता असते अन्यथा त्याच्या विना ते करपून जातात. त्याचप्रमाणे विचारांना सुद्धा प्रचार व प्रसाराची नितांत आवश्यकता आहे. अन्यथा प्रचार व प्रसाराअभावी ते नष्ट होतील. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे वैशिष्ट्य असे की ते केवळ मूलभूत विचार देऊनच थांबले नाहीत, त्या विचारांच्या रोपट्यांना त्यांनी स्वतःच्या भाषणांच्या माध्यमातून असंख्य लोकांपुढे ठेवून, त्यांच्या मनात ते विचार रुजवून, ते चिरकाल टिकतील अशी तजविज करून ठेवली आहे. आज असंख्य लोक त्यांच्या विचारांना स्वतःचा जीवनमार्ग समजून आपले जीवन घडवित आहेत. राष्ट्र उभारणीसाठीही

त्यांच्याच विचारांचे अनन्यसाधारण महत्त्व आहे याची जाणीव अनेक विचारवंतांना झाली आहे, होत आहे. दिवसेंदिवस त्या विचारांची गरज भासत असल्याचे प्रकर्षाने निदर्शनास येत आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या भाषणातील विषयांचा आवाका प्रचंड होता. अस्पृश्यांना मानवी जीवन प्राप्त करून देणे ; दलित, शोषित व वंचितांना आपल्या भविष्यातील लढे उभारण्यासाठी प्रेरणा देणे ; देशातील सामाजिक, राजकीय प्रवाहात त्यांना सामील करून त्यांचे अधिकार मिळवून देणे ; बहुजन समाजाला धार्मिक गुलामीतून मुक्त करणे ; राष्ट्र निर्मितीसाठी आवश्यक असलेल्या मार्गांचा स्वीकार करण्याचे आवाहन करणे व देशाच्या विकासाच्या नवीन दिशा शोधणे इत्यादी एक ना अनेक विषय त्यांनी आपल्या भाषणातून हाताळले याची प्रचिती या खंडातील भाषणांमधून पदोपदी येते. मानवी जीवनाशी संबंधित, मानवी जीवनाला आकार देणाऱ्या धार्मिक, सामाजिक, आर्थिक, राजकीय, शैक्षणिक विषयांवर आपल्या जीवनात विविध प्रसंगी त्यांनी भाषणे दिलीत. सर्व धर्मांचा साकल्याने अभ्यास करून संपूर्ण मानव जातीला कोणता धर्म कल्याणकारक ठरू शकेल हे केवळ सांगून थांबणारा नव्हे, तर त्या दिशेनी पाऊल टाकणारा एक कृतिशील धर्मज्ञ, अमानवी विचारांवर तुटून पडणारा आणि त्या विचारांच्या जागी स्वातंत्र्य, समता, बंधुता आणि न्याय या मानवी मूल्यांची प्रत्यक्षात प्रस्थापना करणारा महान समाज क्रांतिकारक, भारताच्या आर्थिक विकासासाठी कोणत्या आर्थिक धोरणाचा स्वीकार करणे योग्य होईल हे सांगणारा नाणावलेला अर्थतज्ज्ञ, राजकीय जीवनात 'एक व्यक्ती, एक मत, एक मूल्य' आणि राजकीय लोकशाहीचे सामाजिक लोकशाहीत रुपांतर झाले पाहिजे हे स्वतः प्रमुख शिल्पकार असलेल्या संविधानाच्या माध्यमातून आग्रहाने प्रतिपादन करणारा राजकीय विचारवंत, प्रसंगी स्वतःच्या समाजहिताचा बळी देऊन देशहिताला प्राधान्य देणारा थोर राष्ट्रभक्त, भारताला आवश्यक शैक्षणिक धोरणाचा मूलतः विचार करून वंचितांना शिक्षणाची संधी उपलब्ध करून देणारा थोर शिक्षणतज्ज्ञ अशा विविध जीवनस्पर्शी पैलूंनी साकारलेले डॉ. आंबेडकरांचे विलोभनीय व्यक्तिमत्त्व प्रस्तुत खंडाच्या माध्यमातून वाचकांसमोर उभे राहणार आहे. समाज परिवर्तनाच्या संघर्षात सहभागी असणाऱ्या आणि होऊ इच्छिणाऱ्या कार्यकर्त्यांसाठीच केवळ नव्हे तर भारताच्या उज्ज्वल भवितव्यासाठी धडपडणाऱ्या, तशी आस्था मनात जोपासणाऱ्या सर्व भारतीयांसाठी या खंडात अंतर्भूत भाषणातील विचार दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शक ठरतील असा ठाम विश्वास आहे.

या कार्यालयानी या खंडाचे काम पाहण्याची जबाबदारी प्रा. अशोक गोडघाटे, प्रा. डॉ. एम. एल. कासारे आणि एन. जी. कांबळे या संपादक मंडळावर सोपविल्यावर त्यांनी विविध वृत्तपत्रे, नियतकालिके आणि ग्रंथातून १७१ नवीन भाषणे शोधून या खंडात समाविष्ट केली आहेत. खंडातील एकूण भाषणांची संख्या आता ३५१ आहे. यातील काही भाषणे विविध परिषदेत, अधिवेशनात झालेली आहेत. त्या परिषदेच्या, अधिवेशनाच्या दरम्यान डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी काही प्रसंगी आपले थोडवयात विचार व्यक्त केले आहेत. त्यांना स्वतंत्र भाषणाचे स्वरुप न देता मुख्य भाषणाच्या पार्श्वभूमीमध्ये त्यांचा अंतर्भाव केला आहे.

प्रस्तुत खंडात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या सर्वच प्रकाशित भाषणांचा समावेश नाही याची संपादकांना जाणीव आहे. ती मिळविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. त्यातील काही मिळू शकली नाही याचा खेद आहे. जर कुणाजवळ या व्यतिरिक्त भाषणे असल्यास त्यांनी ती या कार्यालयास उपलब्ध करून द्यावी जेणेकरून या खंडाच्या पुनर्मुद्रणाच्या वेळी त्यांचा समावेश करता येईल.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर मुंबईच्या वास्तव्यात आणि इतर ठिकाणीही आपले सहकारी आणि कार्यकर्ते यांच्याशी चर्चा करीत असत तसेच त्यांना मार्गदर्शनही करीत असत. अशा काही प्रसंगांचा वृत्तांत वृत्तपत्रांमधून त्याकाळी प्रकाशित झाला. जरी सीमित लोकांपुढे हे विचार व्यक्त केल्या गेले तरी ते वर्तमानपत्रात प्रकाशित झाल्याने त्याला सार्वजनिक स्वरुप प्राप्त झाले आहे. अशा चर्चेचाही या खंडात अंतर्भाव केला आहे. अर्थातच ही संख्या फार कमी आहे.

काही भाषणे वृत्तांताच्या स्वरुपात प्रकाशित झाली होती. त्यांना भाषणाचे स्वरुप दिले आहे. काही अपवादात्मक प्रसंगी तसे करता आले नाही.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या संविधान सभेतील महत्त्वपूर्ण भाषणांपैकी तीन भाषणांचा अंतर्भाव या खंडात केला आहे. त्यापैकी संविधानाचा मसुदा संविधान सभेला सादर करताना दिनांक ४ नोव्हेंबर १९४८ ला केलेल्या आणि २५ नोव्हेंबर १९४९ रोजी संविधान सभेत केलेल्या शेवटच्या भाषणांचा मराठी अनुवाद जनता पत्रात प्रकाशित झाला. तसेच १७ डिसेंबर १९४६ ला संविधान सभेत त्यांनी केलेल्या पहिल्या भाषणाचा वृतांत सारांश रूपाने जनतेत आला आहे. हे वृत्तांत याचबरोबर इतर उपलब्ध अनुवादांचेही संपादकांनी अवलोकन केले पण ते अपूर्ण असल्याचे जाणवले. त्यामुळे त्या भाषणांचा तसेच अशाच प्रकारच्या कारणांसाठी गोलमेज परिषदेतील त्यांच्या तीन भाषणांचा मराठी अनुवाद स्वतःच करावा असा निर्णय संपादकांनी घेतला. तो अनुवाद या खंडात अंतर्भूत केला आहे. इतर उपलब्ध अनुवादांच्या तुलनेत तो अधिक योग्य आहे अशी धारणा आहे.

मूळ प्रकाशित भाषणांना गावाचे, परिषदेचे, दौऱ्याचे वगैरे शीर्षके देण्यात आली होती, जसे 'डॉ. आंबेडकरांचे निपाणी येथील भाषण', 'नगरचे बातमीपत्र', 'अखिल भारतीय दलित वर्ग परिषद', 'हिंदी समाज सुधारणा', 'इमारत फंडाची सभा'. अशा प्रकारची सर्व शीर्षके बदलवून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या त्या त्या भाषणाला अनुरूप शीर्षके देण्यात आली आहेत.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या भाषणांना ऐतिहासिक महत्त्व आहे. त्यांच्या भाषणांनी इतिहास घडविला हे सत्य कुणालाही नाकारता येणार नाही. ज्या परिस्थितीत ही भाषणे झालीत तिला एक सामाजिक, शैक्षणिक, आर्थिक, राजकीय, धार्मिक, सांस्कृतिक संदर्भ आहे, मूल्य आहे. ज्याप्रसंगी त्यांनी भाषणे दिली ते सारे प्रसंग चळवळीचा, आंदोलनाचा अभिन्न भाग बनले आहेत. तो प्रसंग वस्तुनिष्ठपणे वाचकांच्या नजरेपुढे उभा राहाण्यासाठी भाषणांना पार्श्वभूमी देण्याचा धोरणात्मक निर्णय संपादक मंडळाने घेतला. ही पार्श्वभूमी देताना तिला सलग स्वरुप प्राप्त होण्यासाठी कधी कधी एखाद दुसरे वाक्य लिहिण्यापलिकडे संपादक मंडळाने आपल्या पदरचा एकही शब्द उपयोगात आणला नाही. प्रकाशित झालेल्या साहित्याचाच यासाठी उपयोग केला आहे आणि त्याचा स्त्रोतही दिला आहे. ज्या भाषणांची पार्श्वभूमी प्राप्त होऊ शकली नाही तिथे ती देता आली नाही. परंतु अशी भाषणे अपवादात्मक आहेत. भाषण प्रकाशित झालेल्या वृत्तपत्रात काही भाषणांना पार्श्वभूमी मुळीच नव्हती तर काहींना ती त्रोटक स्वरुपात होती. ती इतरत्र शोधून तिचा संबंधित भाषणात अंतर्भाव केला आहे. काही भाषणात पार्श्वभूमीच्या अंतर्गत मानपत्र, पत्र, पत्रके आदी इंग्रजीत आहेत. त्यात तत्कालीन इंग्रजी लिहिण्याच्या प्रथेत कोणताही बदल न करता ती जशीच्या तशीच अंतर्भूत केली आहेत.

प्रस्तुत खंडाच्या संपादनाची जबाबदारी संपादक मंडळावर सोपविल्याच्या आधीपासून आज आमच्यात नसलेले डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समितीचे विशेष कार्य अधिकारी वसंत मून यांचे मोलाचे सहकार्य लाभले. त्यांच्या दुःखद निधनाने या खंडाच्या निर्मितीप्रक्रियेत प्रचंड पोकळी निर्माण झाली. संपादक मंडळाला ती सातत्याने जाणवत होती. या खंडाच्या निर्मितीतील त्यांचे योगदान मोलाचे आहे.

प्रस्तुत खंड पूर्णत्त्वास येण्यासाठी अनेकांचे सहकार्य लाभले. त्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समितीचे जेष्ठ सदस्य माननीय खासदार रा. सु. गवई यांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. त्यांच्या प्रयत्नांमुळे हा खंड मार्गी लागला.

हा खंड सर्व दृष्टीने परिपूर्ण होण्यात प्रा. डॉ. गंगाधर पानतावणे आणि प्रा. केशव मेश्राम यांचा मोलाचा वाटा आहे.

या खंडाच्या निर्मितीप्रक्रियेत सर्वश्री प्रा. डॉ. श्रीनिवास खांदेवाले, प्रा. डॉ. विजय कविमंडन, प्रा. डॉ. भा. ल. भोळे, प्रा. गौतम खु. कांबळे, प्रा. दत्तानंद इंगोले, प्रा. डी. एस. मून, प्रा. आर. के. तुपे, संजय एन. कांबळे आणि बी. एन. बागडे यांचे सहकार्य लाभले.

वसंत मून यांच्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर रिसर्च इन्स्टिटयूट, 'नालंदा' ४४७, हनुमाननगर, नागपूर येथून अधिकांश भाषणे उपलब्ध झाली. भालचंद्र लोखंडे, महेन्द्र गांजरे, रमेश कोसारे आणि प्रल्हाद मेंढे यांचेकडून काही प्रमाणात साहित्य उपलब्ध झाले. प्रदीप गायकवाड आणि विनोद आटे, फोटोग्राफर, यांचेकडून छायाचित्र प्राप्त झाले. त्यांचे आभारी आहोत.

डॉ. कृष्णा एम. कांबळे आणि डॉ. सिद्धार्थ जे. कांबळे यांनी वेळोवेळी केलेल्या मौलिक सूचना आणि त्यांचे सहकार्य विसरता येणार नाही.

शासकीय मुद्रणालय नागपूरचे व्यवस्थापक श्री. रु. दि. मोरे यांनी या खंडाच्या सुबक आणि सुंदर मुद्रणासाठी तसेच वेळापत्रकाप्रमाणे छपाई होण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. तसेच या मुद्रणालयातील संबंधित कर्मचाऱ्यांनी आस्थापूर्वक केलेल्या सहकार्यामुळेच हा खंड नियोजित वेळेत प्रकाशित होऊ शकला.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समिती संपादक मंडळाच्या पाठीशी असल्याची जाणीव निश्चितच उत्साह वाढविणारी होती.

(प्रा. अशोक गोडघाटे) (प्रा. डॉ. म. ल. कासारे) (एन. जी. कांबळे)

# अनुक्रमणिका
## खंड १८–भाग १

## अनुक्रमणिका–चालू

## अनुक्रमणिका–चालू

## अनुक्रमणिका–चालू

## अनुक्रमणिका—चालू

# १

# जन्मसिद्ध श्रेष्ठतेमुळे व पवित्रतेमुळे गुणहीन ब्राह्मणांचे देखील कल्याण झाले आहे

'' दक्षिण महाराष्ट्रातील बहिष्कृत वर्गाच्या परिषदेची पहिली बैठक मुक्काम माणगाव, संस्थान कागल येथे ता. २१/२२ मार्च सन १९२० रोजी भरली होती. पहिला दिवस पाडव्याचा होता तरी पण सभेस जवळजवळ पाच हजारावर समुदाय जमला होता. याहीपेक्षा जास्त समुदाय जमला असता परंतु आजुबाजूच्या कित्येक खेड्यापाड्यातील बहिष्कृत लोकांची कुळकर्णी, तलाठी वगैरे लोकांनी अशी समजूत करून दिली की, ही सभा बाटग्या लोकांची असून अध्यक्ष देखील बाटलेलेच आहेत. यास्तव अशा सभेस जाणे अप्रशस्त आहे. असे सांगून बऱ्याच लोकांची मने या सभेबद्दल कलुषित केली होती. सभेस कोल्हापूर दरबारातील वरिष्ठ दर्जाची व बहिष्कृतांची हितेच्छू मंडळी हजर होती. काही थोडे ब्राह्मण गृहस्थही हजर होते; परंतु डिप्रेस्ड क्लास मिशन व इतर बहिष्कृतांच्या हितासाठी झटणाऱ्या कोणत्याही संस्थेचे एक पिसू देखील आले नव्हते हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे.

**दिवस पहिला.**

परिषदेच्या कामास ता. २१ रोजी पाच वाजता सुरूवात झाली. प्रथमतः स्वागतकमिटीचे अध्यक्ष श्री. दादासाहेब राजेसाहेब इनामदार यांचे भाषण झाले. त्यात त्यांनी प्रतिनिधींनी अशा लहानशा खेडेगावात, सण, वार, घरगुती अडचणी इत्यादी काही न पाहता सभेस येण्याची तसदी घेतली याबद्दल त्यांचे आभार मानिले. आजच्या परिस्थितीचे वर्णन करून ही परिषद का बोलावण्यात आली, याचे दिग्दर्शन केले. हल्लीच्या स्वराज्याच्या काळात इतर लोक आपले बरे करतील असे समजून त्यांच्यावर अवलंबून राहण्यापेक्षा आपल्या स्वजनोद्धाराचे महत्कार्य आपण स्वतःच केले पाहिजे असे सांगून त्यांनी आपले भाषण संपविले. नंतर रितीप्रमाणे सूचना व अनुमोदन मिळाल्यावर परिषदेचे नियोजित अध्यक्ष श्री. भीमराव आंबेडकर हे टाळ्यांच्या कडकडाटात स्थानापन्न झाले.

आपल्या भाषणात ते म्हणाले,

ही परिषद अनेक दृष्टींनी अपूर्व आहे. मुंबई इलाख्यातील परिषदेचा हा तसा पहिलाच प्रसंग आहे व आपल्या लोकात आपल्या उन्नतीबद्दल दिसून येत असलेली कळकळही देखील तितकीच अपूर्व त्याचप्रमाणे बहिष्कृत वर्गात दिसून येत असलेली विचारक्रांतिही तशीच अपूर्व आहे. आजवर आपल्या लोकास वाटत होते की, आपली वाईट स्थिती होण्याचे कारण आपले दुर्भाग्य होय आणि दुर्भाग्याला आळा घालणे आपल्या हाती नसल्याकारणाने, आहे ती बिकट स्थिती आपण निमूटपणे सोसली पाहिजे. हल्लीच्या पिढीला मात्र आपली परिस्थिती ईश्वरी लीलेचा परिपाक आहे असे वाटत नसून ती इतरांच्या दुष्कृत्यांचा परिणाम आहे असे वाटू लागले आहे. ज्या हिंदू धर्माचे आपण घटक आहोत त्या हिंदू धर्माच्या व्यवहारात मनुष्यमात्राचे संघटन दोन आदितत्त्वांना धरून झालेले दृष्टीस पडते. एक जन्मसिद्ध योग्यायोग्यता व दुसरी जन्मसिद्ध पवित्रापवित्रता. या दोन तत्त्वानुरूप हिंदू लोकांची विभागणी केली तर त्याचे तीन वर्ग होतात. १. जन्माने सर्वात श्रेष्ठ व पवित्र ज्याला आपण ब्राह्मण वर्ग असे म्हणतो तो. २. ज्यांची जन्मसिद्ध श्रेष्ठता व पवित्रता ब्राह्मणापेक्षा कमी दर्जाची आहे असा जो वर्ग तो ब्राह्मणेतर वर्ग. ३. जे जन्मसिद्ध कनिष्ठ व अपवित्र अशांचा जो वर्ग तो आपला बहिष्कृत वर्ग होय. अशारितीने वर्गीकरण करून धर्माने ठरवून दिलेल्या श्रेष्ठतेच्या व पवित्रतेच्या विषम प्रमाणांचा या तीन वर्गांवर परिणाम झाला आहे. जन्मसिद्ध श्रेष्ठतेमुळे व पवित्रतेमुळे गुणहीन ब्राह्मणांचे देखील कल्याण झाले आहे. ब्राह्मणेतरास जन्मसिद्ध अयोग्यतेचा मारा आहे. त्यांच्यात विद्या नाही म्हणून ते आज मागे राहिले आहेत, तरी पण विद्या व द्रव्य मिळविण्याचे मार्ग त्यांना मोकळे आहेत. ही दोन्ही जरी त्यांचेजवळ आज नसतील तरी त्यांना ती उद्या मिळणार आहेत. आपल्या बहिष्कृत वर्गाची स्थिती मात्र जन्मसिद्ध अयोग्यतेमुळे व अपवित्रतेमुळे फारच शोचनीय झाली आहे. अनेक दिवस अयोग्य व अपवित्र मानून घेतल्यामुळे नैतिकदृष्ट्या आपल्यातील आत्मबल व स्वाभिमान ही जी उन्नतीची आद्य कारणे ती अगदी लोपून गेली आहेत. सामाजिकदृष्ट्या हिंदुधर्मीयांप्रमाणे त्यांना हक्क नाहीत. त्यांना शाळेत जाता येत नाही. सार्वजनिक विहिरीवर पाणी भरता येत नाही व रस्त्यावर चालता येत नाही, वाहनाचा उपयोग करून घेता येत नाही इत्यादी प्रकारच्या कनिष्ठ हक्कांना देखील ते दुरावले आहेत. जन्मसिद्ध अयोग्यतेमुळे व अपवित्रतेमुळे आर्थिकदृष्ट्या त्यांचे तितकेच नुकसान झाले आहे. व्यापार, नोकरी व शेती हे जे धनसंचयाचे तीन मार्ग आहेत, ते त्यांना खुले नाहीत. विटाळामुळे गिऱ्हाईक मिळत नसल्याकारणाने त्यांना

व्यापार करण्याची सोय उरली नाही. शिवाशिवीमुळे त्यांना नोकरी मिळत नाही व कधी कधी गुणाने योग्य असूनही खालचे जातीचे असल्यामुळे इतर लोक त्यांच्या हाताखाली नोकरी करण्यास कचरतात म्हणून त्यांना नोकरी मिळणे जड जाते, याच भावनेमुळे मिलिटरीतून त्यांचा उठाव झाला आहे. शेतीच्याबाबत त्यांची तशीच दशा आहे. अशा हाडकी हडवळ्यापेक्षा भूईचा तुकडा विशेष कोणाला आहे ? अशाप्रकारे नाडलेल्या समाजाची उन्नती होणार नाही. नैसर्गिक गुण व सानुकूल परिस्थिती ही दोन उन्नतीची आद्य कारणे आहेत. बहिष्कृत वर्गात नैसर्गिक गुणांची वाण नाही, हे सर्वास मान्य आहे. परंतु त्यांचा विकास होत नाही याचे मूळ कारण त्यांना परिस्थिती सानुकूल नाही, हे होय. परिस्थिती सानुकूल करून घेण्यास अनेक उपाय सुचविले जातात; परंतु याकरिता आपण राजकीय सामर्थ्य संपादिले पाहिजे व जातवार प्रतिनिधीत्त्व मिळाल्याशिवाय आपल्या हाती राजकीय सामर्थ्य येणार नाही. 'सत्यमेव जयते' हे तत्त्व पोकळ आहे. सत्याचा जय होण्यास आपण आपली चळवळ कायम ठेविली पाहिजे, असे सांगून त्यांनी आपले प्रास्ताविक भाषण संपविले. नंतर विषयनियामक कमिटी नेमण्यात येऊन पहिल्या दिवसापुरते परिषदेचे काम संपले.

## दिवस दुसरा.

परिषदेच्या कामास तीन वाजता सुरुवात झाली. त्याप्रसंगी कोल्हापूरचे छत्रपती शाहू महाराजांनी हजर राहून सर्व बहिष्कृत वर्गास ऋणी करून सोडिले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

आज माझे प्रिय मित्र आंबेडकर यांनी या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारले आहे. त्यांच्या भाषणाचा लाभ मला मिळावा म्हणून मी शिकारीतून बुध्या येथे आलो आहे. मि. आंबेडकर सर्व मागासलेल्या जातींचा परामर्ष घेतात याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करितो.

महार, मांग, चांभार, ढोर हे खरोखर वैश्य जातीचे असून व विशेषतः महार लोक पूर्वी महारकी सूत काढून व्यापार करीत असता त्यांना अस्पृश्य कोणी ठरविले असेल कोण जाणे. असा वैश्याचा धंदा सोडून दस्यु म्हणजे नोकर आणि नोकर म्हणजे अतिशूद्र. तेव्हा आंबेडकरांनी असा हा धंदा का पत्करला आहे मला कळत नाही. तथापि, मी येथे जमलेल्या सर्व लोकास हीच विनंती करितो की, आतापर्यंत आम्ही निकृष्ट अवस्थेस पोहचण्याचे कारण आम्ही आमचा योग्य पुढारी योजून काढीत नाही. गोड बोलून नावलौकिक मिळविण्याच्या हेतूने

आमच्यापैकी काही आपलपोटी मंडळी अयोग्य पुढारी नेमून देऊन अज्ञानी लोकांना फसवितात. पशूपक्षी देखील आपल्याच जातीचा पुढारी करितात, पक्ष्यात कधी चतुष्पादाचा पुढारी झाला नाही. चतुष्पादी कधीही पक्ष्यांचा पुढारी नसतो. गाय, बैल, मेंढरे यात मात्र धनगर त्यांचा पुढारी असतो त्यामुळे शेवटी त्यांना कसाबखान्यात जावे लागते !

आज त्यांना पंडित ही पदवी देण्यास तरी काय हरकत आहे ? विद्वानात ते एक भूषणच आहेत. आर्यसमाज, बुद्धसमाज व खिस्ती यांनी त्यांना आपल्यात आनंदाने घेतले असते. परंतु ते तुमचा उद्धार करण्याकरिता तिकडे गेले नाहीत. याबद्दल तुम्ही त्यांचे आभार मानिले पाहिजेत व मीही मानतो.'' [१]

''माझ्या राज्यातील बहिष्कृत प्रजाजनांनो, तुम्ही तुमचा खरा पुढारी शोधून काढला ह्याबद्दल मी तुमचे अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतो. माझी खात्री आहे की, डॉ. आंबेडकर हे तुमचा उद्धार केल्याशिवाय राहणार नाहीत, इतकेच नव्हे तर अशी एकवेळ येईल की, ते सर्व हिंदुस्थानचे पुढारी होतील, अशी माझी मनोदेवता मला सांगते ''.[२]

''नंतर खालील ठराव सभेत सर्वानुमते पास झाले.

(१) महायुद्धात ब्रिटिश सरकारला व दोस्त राष्ट्रांना जय मिळाल्याबद्दल ही परिषद आनंद व्यक्त करीत आहे.

(२) श्रीमन्महाराज शाहू छत्रपती सरकार इलाखा करवीर यांनी आपल्या राज्यात बहिष्कृतांना समानतेचे हक्क देऊन त्यांचा उद्धार करण्याचे सत्कृत्य आरंभिले आहे याबद्दल त्यांचा वाढदिवस प्रत्येक बहिष्कृत व्यक्तीने सणाप्रमाणे साजरा करावा असे या परिषदेचे मत आहे.

(३) जे राजे, महाराजे व संस्थानिक बहिष्कृतांच्या उन्नतीसाठी प्रयत्न करीत आहेत त्यांचे ही परिषद मनःपूर्वक आभार मानिते.

(४) दरेक व्यक्तीच्या उन्नतीला सानुकूल सामाजिक परिस्थितीची अत्यंत जरूरी आहे. जन्मसिद्ध अयोग्यता व जन्मसिद्ध अपवित्रता यामुळे हिंदुस्थानातील सामाजिक परिस्थिती बहिष्कृत वर्गाच्या उन्नतीस प्रतिकूल आहे. इतकेच नव्हे तर त्यामुळे हा वर्ग सर्वसाधारण अशा मानवी हक्कासदेखील दुरावला आहे. बहिष्कृत लोक हे हिंदी साम्राज्याचे घटक आहेत व इतर हिंदी लोकांप्रमाणे त्यांना खालील मानवी हक्क आहेत;

(अ) सार्वजनिक रस्ते, विहिरी, तलाव, शाळा, धर्मशाळा तसेच लायसेन्सखाली असलेल्या करमणुकीच्या जागा, भोजनगृहे, वाहने इत्यादि सार्वजनिक सोयींचा उपभोग घेण्याचा त्यांना हक्क आहे.

---

[१] मूकनायक : १० एप्रिल १९२०.

[२] डॉ. बाबासाहेब आंबेडकर : धनंजय कीर, पृष्ठ ४६.

(ब) गुणसिद्ध योग्यतेने त्यांना व्यापार करण्याचा व नोकरी मिळविण्याचा हक्क आहे.

वरील हक्क उपभोगिताना जेव्हा म्हणून अडचण पडेल त्यावेळी ती दूर करण्यास सरकारने कायद्याने मदत करावी असे या परिषदेचे मत आहे.

(५) प्राथमिक शिक्षण मुलामुलींचा भेद न करिता जितक्या लवकर होईल तितक्या लवकर सक्तीचे व मोफत करण्यात यावे.

(६) बहिष्कृत वर्गात शिक्षणाचा प्रसार होणे अत्यंत जरूरीचे आहे, त्याशिवाय त्यांची उन्नती होणार नाही.

म्हणून त्यांच्यात शिक्षणाचा प्रसार करण्यास शाळा मास्तर, डेप्युटी असिस्टंट, डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर त्यांचे हितेच्छू असले पाहिजेत. ज्याअर्थी, इतर वर्गातील माणसे बहिष्कृत वर्गाच्या शिक्षणाकडे दुर्लक्ष किंबहुना अनुदारपणाही दाखवितात त्याअर्थी, वरील प्रकारचे अधिकाऱ्यात बहिष्कृत वर्गातील माणसे असावीत असे या परिषदेचे मत आहे. तसेच बहिष्कृत वर्गाचे मास्तर ट्रेंड होण्यास त्यांना विशेष सवलत देऊन त्यांचा प्रवेश होण्याची सोय सरकारने करावी अशी या परिषदेची आग्रहाची विनंती आहे. बहिष्कृत वर्गात शिक्षणाचा प्रसार करण्यास दरेक जिल्ह्याला बहिष्कृत वर्गापैकी निदान एक डेप्युटी किंवा असिस्टंट डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर असावा व त्या दर्जाला ट्रेनिंग कॉलेजची थर्ड इयर परीक्षा पास झालेला किंवा मॅट्रीक पर्यंत शिकलेला इसम लायक समजला जावा, असे या परिषदेचे मत आहे.

(७) खालसातील ज्याप्रमाणे मुसलमानांना व म्हैसूर संस्थानातील ब्राह्मणेतर व बहिष्कृत वर्गाच्या विद्यार्थ्यांना मध्यम व वरिष्ठ शिक्षणार्थ मुबलक शिष्यवृत्त्या दिल्या जात आहेत त्याचप्रमाणे बहिष्कृत वर्गातील विद्यार्थ्यांना ब्रिटिश हद्दीत तशाच शिष्यवृत्त्या मिळाव्या अशी या परिषदेची आग्रहाची विनंती आहे.

(८) सर्वत्र स्पृश्य व अस्पृश्यांच्या शाळा एकत्र असाव्या असे या परिषदेचे मत आहे.

(९) हल्ली दिसून येत असलेली महारकी वतनदारांची स्थिती अगदी हलाखीची आहे असे कष्टाने म्हणावे लागते. या हलाखीची कारणे दोन असावी असे या परिषदेस वाटते.

(१) महार वतनदारांना पड वगैरे अगदी गलिच्छ कामे करावी लागत असल्यामुळे त्यांच्या वतनदारीवर कमीपणाची छटा उमटली आहे.

(२) वतनी जमीन वतनदारात पिढ्यानुपिढ्या विभागून जात असल्यामुळे जमिनीचे इतके बारीक तुकडे झालेले आहेत की, दरेक महार वतनदारास

पुरेशी पैदास होत नसल्यामुळे त्याची अगदी कंगाल स्थिती झाली आहे. यामुळे वतन पद्धतीत फेरफार करणे अगदी जरूर झाले आहे असे या परिषदेचे ठाम मत आहे. महारकी वतन सर्व महार लोकात विभागून सर्वांनी दरिद्री व कंगाल राहण्यापेक्षा ते वतन थोडक्याच लोकात विभागून त्यांची स्थिती मानास्पद व सुखावह करणे बरे, म्हणून महारकी वतनाची जमीन थोड्याच महारांना मोठ्या प्रमाणावर वाटून देऊन ज्या महारांना अशा प्रमाणावर जमीन विभागल्यामुळे वतनी जमिनीस मुकावे लागेल त्यांना शक्य तेथे पड जमीन रयताव्याच्या नियमाने देऊन त्यांची सोय लावण्यात यावी. हल्ली असलेली वतनी जमीन ज्या महार कुळास देण्यात येईल, त्याच्याकडून आपल्या मुलामुलीस साक्षर करून आपल्या दर्जाप्रमाणे राहण्याची अट लिहून घेण्यात यावी.

(१०) मेलेल्या जनावराचे मांस कोणत्याही जातीच्या माणसाने खाणे हा गुन्हा आहे, असे कायद्याने मानले जावे असा या सभेचा अभिप्राय आहे.

(११) तलाठ्याच्या जागांवर बहिष्कृत वर्गाच्या नेमणुका होत जाव्यात, अशी या परिषदेची मागणी आहे.

(१२) बहिष्कृत वर्गाच्या उन्नती करिता झटत असणाऱ्या बहिष्कृतेतर संस्थांचे अगर व्यक्तींचे कळकळीबद्दल ही परिषद जरी आभारी आहे तरीपण बहिष्कृत वर्गाचा राजकीय किंवा सामाजिक हितसंचय करण्यास त्यांच्याकडून जे उपाय सुचविले जातात ते उपाय या बहिष्कृत वर्गास सर्वस्वी मान्य होतात असे सरकारने समजू नये असे या परिषदेचे आग्रहाचे सांगणे आहे.

(१३) भावी कायदे कौन्सिलात बहिष्कृतांचे प्रतिनिधी त्यांच्या लोकसंख्येच्या व गरजेच्या प्रमाणात त्यांच्या स्वतंत्र मतदार संघातून निवडून घेण्यात यावेत अशी या परिषदेची हक्काची मागणी आहे.

(१४) ही परिषद भरवून आणण्याचे कामी ज्यांनी परिश्रम केले त्यांचे व विशेषतः आप्पा दादगौडा पाटील यांचे ही परिषद फारफार आभार मानिते.

(१५) वरील सर्व ठराव त्या त्या अधिकाऱ्यांकडे व इतर संबंध असणाऱ्या गृहस्थांकडे पाठविण्याचा अधिकार ही परिषद तिच्या अध्यक्षास देत आहे ".[१]



[१] मूकनायक : १० एप्रिल १९२०.

# २

# उन्नतीच्या आड येणाऱ्यांचा निषेध

दिनांक २७ मार्च १९२० च्या ' मूकनायक ' मध्ये नागपूर येथे येत्या एप्रिल किंवा मे महिन्यात हिंदुस्थानातील महार, मांग, चांभार, पारिया, पंचम वगैरे जातींनी आपल्यावरील बहिष्कार चालविण्याकरिता आणि शिक्षणविषयक सामाजिक व राजकीय बाबतीत आपली प्रगती करण्याकरिता एक परिषद भरविण्याचे ठरविले आहे असे जाहीर करण्यात आले. या परिषदेचे अध्यक्षस्थान श्रीमन्महाराज शाहू छत्रपती सरकार करवीर (कोल्हापूरचे राजेसाहेब) ह्यांनी स्वीकारल्याचे कबूल केले होते.

जाहीर झाल्याप्रमाणे भारतीय बहिष्कृत परिषदेचे अधिवेशन नागपूर येथे ३०, ३१ मे व १ जून १९२० रोजी भरविण्यात आले. अस्पृश्य समाजाच्या राजकीय हक्कांच्या मागण्यासंबंधीच्या पार्श्वभूमीवर होत असलेली भारतीय स्तरावरील ही पहिलीच बहिष्कृत समाजाची परिषद असल्यामुळे ऐतिहासिक महत्त्वाची होती. या परिषदेचे नियोजित अध्यक्ष होते कोल्हापूरचे छत्रपती शाहू महाराज, परिषदेचे स्वागताध्यक्ष होते गोंदियाचे बाबू कालीचरण नंदागवळी आणि सेक्रेटरी होते गणेश आकाजी गवई व किसन फागूजी बनसोडे. या परिषदेला मद्रास, मुंबई, खडकपूर, मध्यप्रांत व वऱ्हाड येथून ५०० प्रतिनिधी उपस्थित होते. डॉ. आंबेडकर, सी. ना. शिवतरकर, शि. जा. कांबळे, कदम, गो. गो. काळे, ऐदाळे, भोसले वगैरे प्रतिनिधी मुंबईवरून आले होते. तसेच कोल्हापूर-वरून ब्राह्मणेतर चळवळीचे प्रमुख कार्यकर्ते सर्वश्री रणदिवे, बाबुराव हैबतराव यादव, कोठारी, श्रीपतराव शिंदे, कांबळे, डिप्रेस्ड क्लास मिशनचे सुपरिन्टेन्डेन्ट श्री. बर्वे ही मंडळी आलेली होती. तसेच नागपूरच्या सुशिक्षित सुधारकांपैकी सर्वश्री पंडित सर गंगाधरराव चिटणीस, शंकरराव चिटणीस व हिंदू मिशनरी सोसायटीचे येथील अधिकारी डॉ. परांजपे आदि उपस्थित होते.

परिषदेचा मंडप स्टेशनपासून चार फर्लांगावर जुन्या आर्सेनल ग्राऊंडवर (कस्तुरचंद पार्क) बराच विस्तीर्ण असा घालून चांगला श्रृंगारला होता. विजेच्या बत्त्यांचा झगझगाट होता. व्यासपीठावर एका सिंहासनाची मांडणी केली होती. अस्पृश्य महिलासुद्धा त्या ठिकाणी उपस्थित होत्या.

---

विदर्भातील दलित चळवळीचा इतिहास : एच. एल. कोसारे, पृ. ४४-४९.

## १९२० ची नागपूर परिषद बोलावण्याचे प्रयोजन

१९१७ मध्ये भारतमंत्री माँटेग्यू हिंदुस्थानात आले असता अस्पृश्य समाजाच्यावतीने त्यांच्या राजकीय मागण्यांबाबत सर नारायणराव चंदावरकर व विठ्ठल रामजी शिंदे यांच्या नेतृत्त्वाखाली एका शिष्टमंडळाने त्यांची भेट घेतली होती. डिप्रेस्ड क्लास मिशनचे अध्यक्ष नारायणराव चंदावरकर व वि. रा. शिंदे यांचे अस्पृश्य समाजावर वर्चस्व असल्यामुळे बहुतेक समाज कार्यकर्ते त्यांच्याच सल्लामसलतीने कार्य करीत असत. श्री. गणेश आकाजी गवई व किसन फागू बनसोडे यांनीही डिप्रेस्ड इंडिया असोसिएशनचे मार्फत भारतमंत्र्यास अस्पृश्यांच्या मागण्यासंबंधी एक मेमोरँडम सादर केला होता.

त्यानंतर साऊथबरो कमिटी हिंदुस्थानात आली. हिंदी पुढाऱ्यांनी स्वराज्याची (होमरूल) मागणी पुढे केली. डिप्रेस्ड क्लास मिशनचे श्री. वि. रा. शिंदे यांनी अस्पृश्यांच्या राजकीय मागण्यांबाबत असा सर्वत्र प्रचार सुरू केला की, ' अस्पृश्यांना स्वतंत्र प्रतिनिधीत्त्व न देता त्यांचे हितसंरक्षण उच्चवर्णीय हिंदू प्रतिनिधींच्या हाती सोपवावे,' चंदावरकर व शिंदे यांच्या ह्या मताविरूद्ध डॉ. आंबेडकरांनी ' हे हिंदू लोक स्वतःच्या घरातील घाण साफ करून टाकायला अजून तयार नाहीत तर त्यांनी स्वराज्य का मागावे ' असे मतप्रदर्शन २६ जानेवारी १९१९ च्या टाईम्सच्या अंकात ' A Mahar on Home Rule ' या लेखात केले होते. त्यामुळे अस्पृश्यांची कैफियत अस्पृश्य प्रतिनिधीमार्फत साऊथबरो कमिटीसमोर मांडण्याची निकड निर्माण झाली.

डॉ. आंबेडकरांनी प्रयत्नपूर्वक साऊथबरो कमिटीसमोर अस्पृश्यांच्या राजकीय मायण्यांची कैफीयत सादर करण्याची संधी मिळवून घेतली. कमिटीसमोर शिंदे व डॉ. आंबेडकर यांनी अस्पृश्यांची मागणी भिन्न दृष्टिकोनातून मांडली.

शिंद्यांनी साऊथबरो कमिटीसमोर जी साक्ष दिली तिचा जर कमिटीने स्वीकार केला तर अस्पृश्य समाज आपल्या राजकीय हक्कांना मुकेल. कारण मतदानासाठी जी लायकी अस्पृश्यांसाठी शिंद्यांनी सुचविली होती ती अस्पृश्यातील मूठभर लोकांमध्येही सापडणार नाही आणि ती सापडलीच तर हे मूठभर लोक शिंद्यांच्या कच्छपी राहून शिंद्यांना किंवा त्यांच्या हस्तकांना निवडून देतील व अस्पृश्यांच्या खऱ्या प्रतिनिधींना निवडून येण्याचा संभव राहणार नाही. त्यामुळे सामाजिक, धार्मिक व आर्थिक बाबतीत अस्पृश्यांना स्पृश्यांची जशी गुलामगिरी पत्करावी लागेल तशीच राजकीय बाबतीतही अस्पृश्यांना स्पृश्यांची गुलामगिरी पत्करावी लागेल. दुसऱ्या शब्दात वरिष्ठ हिंदू लोक अस्पृश्यांवर राष्ट्रीय

गुलामगिरी लादू पहात आहेत. ही परिस्थिती ओळखून डॉ. आंबेडकरानी डिप्रेस्ड क्लास मिशनच्यामार्फत शिंद्यांनी दिलेली कैफियत अस्पृश्यांच्या हिताना बाधक आहे असे जाहीर करण्याचे ठरविले. अस्पृश्यांच्या राजकीय आकांक्षा काय आहेत याचा जाहीर खुलासा एखाद्या वजनदार गृहस्थाच्या नेतृत्त्वाखाली व्हावा म्हणून अस्पृश्यांची एक परिषद छत्रपती शाहू महाराज यांच्या अध्यक्षतेखाली घेण्याचे ठरविण्यात आले. त्याप्रमाणे १९२० ची भारतीय बहिष्कृत परिषद नागपूरला घेण्यात आली.

## डिप्रेस्ड क्लास मिशन विरोधी ठराव

परिषदेत डिप्रेस्ड क्लास मिशन संस्थेच्या व तिच्या चालकांच्या निषेधाचा ठराव येणार आहे अशी कुणकुण अण्णासाहेब शिंदे यांना आगाऊच लागली होती. म्हणून त्यांनी श्री. ग. आ. गवई याजकडे मुद्दाम मनुष्य पाठवून कळविले होते की, मी तुमच्या वऱ्हाड प्रांतातील ५० मुले माझ्या बोर्डींगमध्ये घेतो. पण तुम्ही डॉ. आंबेडकर व शिवतरकर जो आमच्या संस्थेच्या निषेधाचा ठराव आणणार आहेत तो हाणून पाडा. त्याबरहुकूम श्री. गवई व बेळगावचे श्री. पापण्णा यांनी आपल्या बाजूने कडेकोट तयारी केली होती. आम्ही नागपूरास जाताना डी. सी. मिशनच्या चालकांनी अस्पृश्यांच्या हिताविरूद्ध जे स्टेटमेन्ट सरकारकडे पाठविले होते त्याचा उतारा टाईम्स पत्राच्या अंकात आला होता. त्याची एक कॉपी तो अंक दोन वर्षापूर्वीचा असल्याकारणाने दोन रुपये खर्चून आम्ही विकत घेतला होता. परिषदेचे पहिल्या दिवसाचे काम संपल्यावर रात्री विषयनियामक कमिटीची बैठक बसली. त्यात काही ठराव पास झाल्यावर डॉ. आंबेडकर अध्यक्षांच्या परवानगीने म्हणाले,

'' आपण येथे जमलेले सर्व प्रतिनिधी बहिष्कृत वर्गाची उन्नती कशी होईल या दृष्टीने विचार करण्याच्या हेतूने जमलो आहोत. म्हणून आपल्या लोकांच्या उन्नतीच्या आड येणारी व्यक्ती मग ती बहिष्कृत वर्गातील असो किंवा उच्चवर्णीय हिंदूतील असो, तसेच एखादी संस्था असो पण ती आपल्या हिताच्याविरूद्ध एखादे कृत्य करीत असेल किंवा तसे कृत्य तिने मागे केले असेल तर त्या गोष्टीचा आपण निषेध करावा किंवा नाही ? '' तेव्हा सगळे प्रतिनिधी एक आवाजाने म्हणाले की, अलबत, आमच्या प्रगतीच्या आड येणारी कोणतीही व्यक्ती असो किंवा संस्था असो तिचा आपण तीव्र निषेध केलाच पाहिजे '' ही गोष्ट तुम्हा सर्वांना मान्य आहे काय ? '' असे डॉ. आंबेडकरांनी तीन-तीनदा बजावून विचारले. त्यांनी नंतर शिवतरकर यांचेजवळून टाईम्स पत्राचा अंक घेवून त्यात डिप्रेस्ड क्लास मिशन

संस्थेने सरकारला लिहून पाठविलेले स्टेटमेन्ट वाचून दाखविले. त्याचा परिणाम इतका झाला की, श्री. गवई व त्यांचे मदतगार लोक जागच्या जागीच थिजले ! नंतर पुढील ठराव परिषदेत सर्वानुमते पास करण्यात आला. तो ठराव असा :–

**ठराव ३ रा** :– बहिष्कृत वर्गाचे सुधारलेल्या कौन्सिलात जे प्रतिनिधी घ्यावयाचे ते सरकारी नेमणुकीने किंवा त्यांच्यातील जातवार संघातर्फे न घेता बहिष्कृतेतरातर्फे कौन्सिलात निवडून गेलेल्या प्रतिनिधीमार्फत नेमण्यात यावे अशी जी सूचना खास बहिष्कृत वर्गाच्या उन्नतीप्रित्यर्थ स्थापन झालेल्या डिप्रेस्ड क्लास मिशनने केली होती त्यामुळे सर्व अस्पृश्य वर्गाचे मन अस्वस्थ झाले आहे, कारण बहिष्कृतेतर वर्गाच्या प्रतिनिधींना बहिष्कृत वर्गाचे प्रतिनिधी नियोजित करण्याचा जर अधिकार दिला तर ज्या चातुर्वर्ण्यव्यवस्थेमुळे बहिष्कृत वर्गाचे नष्टचर्य ओढवले आहे, ती चातुर्वर्ण्य व्यवस्था कायम करण्यास आमच्यातील जे लोक कबूल होतील अशाच लोकांना प्रतिनिधी नेमण्यात येईल, त्याअर्थी या परिषदेचे असे ठाम मत आहे की, डिप्रेस्ड क्लास मिशनने ( भारतीय निराश्रित साहाय्यकारी मंडळीने ) आपल्या आश्रितांचा असा उघडपणे द्रोह केल्यामुळे ती बहिष्कृत वर्गाच्या विश्वासास अपात्र झाली आहे.

या ठरावावर पी. एन. भटकर, द्रविड, कदम वकील यांची भाषणे झाल्यावर गवई त्यास पुष्टी देताना म्हणाले की, " तुम्हाला (जहाल मवाळांना ) जर नॉमिनेशन नको आहे तर आम्हालाच काय म्हणून ते असावे ? सरकारने आमचे प्रतिनिधी नेमावे असे जरी मिशनने मागितले असते तरी बरे झाले असते. परंतु जहाल मवाळांनी आमचे प्रतिनिधी नेमावेत अशी मागणी करणे म्हणजे आमचा द्रोह करणे नव्हे काय ? मिशनने जी आमच्या प्रतिनिधींची मागणी आम्हाला न विचारता केलेली आहे ती अगदी घातक आहे. त्यामुळे डिप्रेस्ड क्लास मिशनवरील आमचा विश्वास अजिबात उडालेला आहे." [१]

नागपूरचे म्हणजेच या प्रांतातील जनतेचे सुदैवच म्हणावे लागेल की, १९२० ची भारतीय बहिष्कृत परिषद बोलावण्याचा पहिला सन्मान येथील अस्पृश्य कार्यकर्त्यांना मिळाला. ही परिषद का बोलवावी लागली याची वर दर्शविलेली पार्श्वभूमी लक्षात घेतली तर या परिषदेला अस्पृश्यांच्या राजकीय जीवनात ' आगे कदम ' करण्याच्या दृष्टीने अपूर्व स्थान प्राप्त झाले होते यात शंका नाही.



[१] जनता खास अंक १९३३ व जनता अंक १३-४-१९४० : सी. ना. शिवतरकर यांचा लेख–डॉ. आंबेडकरांच्या सहवासातील काही संस्मरणीय प्रसंग.

# ३

# सात कोटी अस्पृश्य हिमालय जमीनदोस्त करतील

तारीख ९ मार्च १९२४ ला मुंबईच्या दामोदर हॉलमध्ये संध्याकाळी ४ वाजता समाज-सेवकांची बैठक झाली. संस्थेला ' बहिष्कृत हितकारिणी सभा ' हे नाव द्यावे असे डॉ. आंबेडकरांनी सुचविले व ते मंजूर करण्यात आले. ' Educate, Agitate and Organise ' ( शिकवा, चेतवा, संघटित करा ) लोकांना सुशिक्षित करा, त्यांच्यात आपल्या हीन अवस्थेबद्दल चीड उत्पन्न करा आणि त्यांची संघटना निर्माण करा, असे सभेचे ब्रीदवाक्य त्यांनी ठरविले. त्यानंतर ही संस्था दिनांक २० जुलै १९२४ ला स्थापन झाली असे जाहीर केले. बहिष्कृत हितकारणी सभेचे सभासद वाढविण्याचे कार्य जोरात सुरू झाले. त्यासाठी शनिवार-रविवार या दोन दिवसात अनेक ठिकाणी सभा ठरविण्यात येत. सभासदांची संख्या वाढू लागली. . सभेचा सर्व कारभार शिवतरकरांच्या हातात होता. ते सभेचे कार्य उत्तम करीत असत. प्रथमतः श्री. नारायणराव स. काजरोळकर, सखारामबुवा ना. काजरोळकर, बाळकृष्ण देवरुखकर, शिरसेकर, चांदोरकर, वनमाळी, बाळू बाबाजी पालवणकर, बोरघरकर इत्यादी सर्व चांभार समाजातील ठळक लोक साहेबांच्या ऑफिसात येऊन बसत. मुंबईतील अस्पृश्यातील जातिभेद नष्ट करावा, मुलामुलींसाठी दोन वसतिगृहे चालू करावीत, लग्नसमारंभ व सभा यांच्यासाठी एक टोलेजंग हॉल बांधावा, छापखाना विकत घेऊन वर्तमानपत्र चालवावे इत्यादी कार्याचे आराखडे साहेब त्यांच्यापुढे ठेवून त्यासंबंधी चर्चा करीत. हे सर्व लोक साहेबांचे कट्टर चहाते असत. त्यांचा घुस्सा होता शिवतरकरांवर, याची काही खाजगी कारणे होती. शिवाय शिवतरकर इतरांशी आढ्यतेने वागत असत. याबद्दल महार समाजातील समाजसेवकांचीही नेहमी धुसफूस चाले. याबद्दल एकदा ऑफिसात चर्चा झाली. तेव्हा साहेब शिवतरकरांच्या विरोधकांना म्हणाले,

शिवतरकर हे नेहमी माझ्या सहवासात राहतात; पडेल ते संस्थेचे काम करतात. तुम्ही त्यांना विरोध का करता ? मी आपल्या समाजाची सर्वांगीण प्रगती व्हावी म्हणून कसोशीने व प्रामाणिकपणाने काम करणार आहे, त्यासाठी मी एवढा विद्याभ्यास केलेला आहे. मी मिळविलेल्या ज्ञानशक्तीचा उपयोग केवळ माझे कुटूंब व जात याच्यासाठी करणार नाही. मी सर्व अस्पृश्य समाजाच्या चळवळीसाठी तिचा उपयोग करणार आहे. त्यासाठी मी अनेक

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र : चां भ. खैरमोडे, खंड-२ पृ. ११८-११९

योजना आखलेल्या आहेत. त्या सफल झाल्या तर अस्पृश्य समाज व स्पृश्य समाज यांचा फायदा होईल. अस्पृश्यांचे प्रश्न फार बिकट आहेत. ते सर्व मी सोडवू शकणार नाही, याची मला जाणीव आहे. परंतु ते सर्व प्रश्न जगाच्या चव्हाट्यावर मांडून मी त्याकडे सर्व जगाचे लक्ष वेधू शकेन, एवढा मला आत्मविश्वास आहे. अस्पृश्यांची समस्या म्हणजे प्रचंड हिमालय आहे. या हिमालयाशी टकरा मारून मी माझे डोके फोडून घेणार आहे. हिमालय कोसळला नाही तरी माझे रक्तबंबाळ डोके पाहून सात कोटी अस्पृश्य लोक तो हिमालय जमीनदोस्त करण्यास एका पायावर तयार होतील व त्यासाठी प्राणार्पण करतील, हे तुम्ही पक्के ध्यानात ठेवा. आपापसात जर अशी तेढ पिकवीत राहिलात तर मग मलाच काय, पण प्रत्यक्ष परमेश्वरालाही याबाबतीत काहीही करता येणार नाही.

साहेबांच्या या भाषणाचा परिणाम लोकांवर झाला. ते लोक तेव्हापासून शिवतरकरांशी सहकार्याने वागू लागले.



## ४

# समाजजीवनात निरपेक्ष कर्तव्य बुद्धीने झटले पाहिजे

बार्शी , जि. सोलापूर येथे भरलेल्या मुंबई प्रांतिक बहिष्कृत परिषदेत मे १९२४ मध्ये बॅरिस्टर आंबेडकर यांचे भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

धन्य आहे की अस्पृश्यतेने आम्हास गुलाम म्हणून लेखले नाही. नाही तर किराण्या वस्तुप्रमाणे अथवा गुराढोराप्रमाणे आमचा बाजार झाला असता. अशा प्रकारच्या गुलामगिरीत आम्ही सापडलो नाही याबद्दल कोणी समाधान मानून घेऊ नये. कारण अशा प्रकारची आमची गुलामगिरी असती तर त्यातून आमची सुटका लवकर झाली असती. प्राचीन काळातील रोम, ग्रीस इत्यादी राष्ट्रात दास्यत्वाचा म्हणजे गुलामगिरीचा शिरस्ता असे. अनेक कारणांमुळे त्या देशातील लोकांना गुलाम बनण्याची पाळी येत असे व एकदा मनुष्य गुलामांच्या यादीत दाखल झाला म्हणजे जड वस्तुप्रमाणे त्याची स्थिती होऊन तो सर्व प्रजाजनांच्या हक्कास वंचीत होत असे. हिंदुस्थानातील अस्पृश्य लोक रोमन लोकांच्या गुलामाप्रमाणे जड वस्तुच्या स्थितीला पोचले नाहीत ह्या दृष्टीने पाहता हिंदुस्थानातील अस्पृश्यता रोमन व ग्रीक लोकातील गुलामगिरीपेक्षा बरी असे कोणी म्हणतील व एका दृष्टीने ते खरेही आहे. पण दुसऱ्या दृष्टीने पाहता अस्पृश्यता ही गुलामगिरीपेक्षा अत्यंत वाईट अशी स्थिती आहे. गुलाम लोक गुलामगिरीतून मुक्त होऊन स्वतंत्र प्रजाजनांच्या स्थितीला जाऊन पोचल्याची साक्ष सारा रोमचा इतिहास देत आहे. पण हिंदुस्थान देशाच्या इतिहासात अस्पृश्यांचा स्पृश्य झाल्याचा एकही दाखला देता येत नाही. रोमन लोकातील गुलामगिरी ही कालिक स्थिती असे व त्यातून सुटका होण्यास अनेक मार्ग मोकळे असत. त्याच्या उलट अस्पृश्यता ही त्रिकालाबाधित अशी स्थिती आहे व त्यापासून सुटका होण्यास कोणताच मार्ग नाही. जन्मतः जो अस्पृश्य तो मरेपर्यंत अस्पृश्य असा करडा नियम असल्यामुळे शतकेच्याशतके लोटली तरीपण अस्पृश्य समाज अस्पृश्यच राहिला आहे. याशिवाय इतर बाबीतही

---

ज्ञानप्रकाश : २४ मे १९२४ व ७ जून १९२४.

हिंदुस्थानातील अस्पृश्यता रोमन लोकातील गुलामगिरीपेक्षा वाईट असेच म्हणावे लागते. रोममधील गुलामांच्या उन्नतीच्या आड जितकी त्यांची गुलामगिरी येत असे त्याच्या अनेक पटीने आमच्या आड आमची अस्पृश्यता येत आहे असे म्हणण्यास मुळीच हरकत नाही. हे घाणेरडे धंदे करतात, गुरे फाडतात, मोऱ्या-नाले उपसतात, गलिच्छ वस्त्रे वापरतात, अभक्ष भक्ष्य खातात, नानाप्रकारच्या बीभत्स प्रकारच्या देवतांची पूजा करतात, अशाप्रकारचे एक नव्हे, दोन नव्हे, नऊ लक्ष आरोप आपल्यावरती करण्यात येतात. आरोप करणे अगदी सोपे आहे; पण त्या आरोपाला जबाबदार कोण आहे; याचा आरोप करणारे तितका विचार करीत नाहीत.

खरे म्हटले असता जे आरोप करतात त्यांच्यावरच त्याची जबाबदारी पडते. मनुष्यसमाजातील पिढ्या एकामागून एक मरून जातात परंतु पुढची पिढी आपले सर्व संप्रदाय, चालीरिती, धर्मभावना इत्यादी सर्व संस्कृती, आपल्या मागच्या पिढीपासून शिकून घेते. तेणेकरून समाजातील घटक जरी लुप्तप्राय झाले तरी समाज हा अव्याहत चालू राहतोच. आजच्या हिंदू समाजात अशा प्रकारचे संघटन मुळीच होत नाही. आमच्यातील हे भूदेव, त्यांचा आमचा संबंध तर कधीच जवळून येत नाही, मग त्यांच्या चालीरिती आमच्यात याव्या कशा? उपनिषदातील तत्त्वे जर आमच्या कानी घालण्यास ते तयार नाहीत तर आमची मरीआईची पूजा कशी जाणार ? वेद आम्ही ऐकू नये अशी जर त्यांची आज्ञा आहे तर आमच्या लावण्या सुटणार कशा? आम्हाला मुंज करून जानवे घालण्याचा त्यांनी निश्चय केला तर आम्ही शुचिर्भूत राहाणार नाही काय? सारांश, आमच्यात वाईटाचा संचार झाला आहे, असा जर आमच्यावर आरोप लावण्यात येत आहे, तर आमचे उत्तर हे आहे की, चांगल्याची शिकवणूक आम्हाला कोणी दिली ? ब्राह्मणाच्या मुलात ब्राह्मणाच्या चालीरिती किंवा आमच्यातील खिस्ती झालेल्यात खिस्ती लोकांच्या चालीरिती यांचा प्रादुर्भाव कसा होतो व ब्राह्मणाच्या चालीरितीचा प्रादुर्भाव आम्हा अस्पृश्यात का होत नाही याचा बारकाईने विचार केला असता सहज कळून येण्यासारखे आहे की, अशा प्रकारचा प्रादुर्भाव होण्यास उभय पक्षात जिव्हाळ्याचा, निकट व अन्योन्य संबंध असावा लागतो. अस्पृश्यतेमुळे हिंदू समाजातील वरिष्ठात तशा प्रकारचा संबंध येणे शक्य नाही. यामुळेच ज्या त्या समाजाच्या बऱ्या-वाईट चालीरिती ज्या त्या समाजास चिकटून राहिल्या आहेत. रोमन लोकातील गुलामगिरीत अशा प्रकारच्या अस्पृश्यतेच्या छटा नसल्यामुळे वरिष्ठांच्या गुणगुणण्याचा पाठ त्यांच्या नित्य नजरेसमोर असे इतकेच नव्हे तर तो ते गिरवीत असत.

अस्पृश्यतेच्या पायी अशी वागणूक झाली असल्यामुळे हा कलंक धुवून जाईल याकडे आपल्यातील सर्व लोकांचे लक्ष लागून गेले आहे. यासाठी अनेक प्रकारचे उपाय सुचविलेले दिसतात. काही लोकांचे असे म्हणणे आहे की, अस्पृश्य लोकांनी देशांतर करावे. असे ऐकिवात आहे की, ज्या दिवशी निराश्रित सहाय्यकारी मंडळाची स्थापना झाली, त्या दिवशी एका वरिष्ठ वर्गातील गृहस्थाने अशी सूचना केली की, हे अस्पृश्य लोक ही आपली पीडा, दुसऱ्या कोण्या देशाला घेऊन का जात नाहीत ? अशाप्रकारचे तिरस्कारयुक्त उपदेश करणारे गृहस्थ वरच्या वर्गात आज फारसे नाहीत ही समाधानाची गोष्ट आहे. परंतु केवळ आपल्या लोकांच्या हिताच्यादृष्टीने जर आपण पाहिले तर या देशांतराच्या सूचनेत पुष्कळ हित साठविलेले आहे, असे म्हणण्यात हरकत नाही. चतकोर भाकरीच्या तुकड्यासाठी गावातील साऱ्या लहान-थोरांच्या लाथा खाण्यापेक्षा फिजी, इस्ट आफ्रिका, न्युगिनी वगैरे देशात जाऊन नशीब काढणे केव्हाही हितावह होणार आहे. हिंदुस्थानातील लोकास परदेशात गेले असता तेथील प्रजाजनाप्रमाणे समसमान हक्क प्राप्त होत नाहीत, ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे. तरी पण माझी खात्री आहे की, हिंदी म्हणून परदेशात जो त्रास होईल तो हिंदू म्हणून आपल्या स्वदेशात आपल्याला जो त्रास होतो त्याच्यापेक्षा केव्हाही जास्त होणार नाही. इतकेच नव्हे तर आपल्या देशात हिंदू धर्माच्या बंधनामुळे द्रव्यार्जनाचे मार्ग बंद आहेत ते सर्वस्वी खुले होऊन आपल्यातील लोकांची आर्थिक स्थिती सुधारेल यात मुळीच शंका नाही.

परंतु सर्वच लोकांना देशांतर करणे शक्य होणार नाही, झाले तर फार थोड्यांनाच ते शक्य होणार आहे. तेव्हा या देशात राहूनच अस्पृश्यतेचे निर्मूलन करण्याचे मार्ग शोधून काढले पाहिजेत. तशा प्रकारचा दुसरा मार्ग म्हणजे धर्मांतर. कोणत्याही धर्माकडे आपण जसे तात्त्विक तसे व्यावहारिकदृष्ट्याही पाहिले पाहिजे. तात्त्विकदृष्ट्या हिंदू धर्म कोणत्याही धर्मास हार जाणार नाही, असे माझे मत आहे. नव्हे कोणत्याही धर्माहून तो श्रेष्ठच गणला जाईल. या हिंदुधर्मात '' सर्वाभूती एक आत्मा '' असे मूलतत्त्व आहे. या उदात्त तत्त्वाप्रमाणे जर समाजघटना झाली असती तर ज्याप्रमाणे दिवा घरच्यावर तेवढा उजेड करावा व परक्यावर अंधार पाडावा असे करीत नाही किंवा ज्याप्रमाणे वृक्ष जो त्याचा उच्छेद करतो अथवा जो त्यास पाणी घालतो, या उभयतास सारखीच सावली देतो किंवा पाणी ज्याप्रमाणे गाईची तृषा हरून वाघाला विष होऊन मारून टाकीत नाही तशी हिंदुंची समबुद्धी असती तर ! परंतु हिंदू समाजाचे व्यावहारिक स्वरूप किती किळसवाणे झाले आहे ? आचाराला व विचाराला कोठे मेळ आहे काय ? जे लोक सर्वाभूती एक आत्मा आहे असे कंठशोष करून सांगतात त्याच लोकांनी मनुष्यासारख्या मनुष्याला अपवित्र व

अस्पर्श लेखावे हे नवल नव्हे काय ? पण याहूनही चीड येण्यासारखी जी दुसरी गोष्ट आहे ती ही की, जे लोक हिंदू धर्मावर श्रद्धा ठेवत नाहीत त्यांना मात्र आमचे वरिष्ठ हिंदू समदृष्टीने लेखतात. खिश्चन लोक अपवित्रही नाहीत व अस्पृश्यही नाहीत. वरिष्ठ हिंदूंना त्यांच्या स्पर्शाने विटाळ होत नाही व त्यांच्या हाताखाली राबण्यात कमीपणा वाटत नाही. तसेच, एका दृष्टीने मुसलमान लोक हिंदूतील कोणत्याही अती नीच वर्गापेक्षा विशेष अस्पृश्य व अपवित्र आहेत असे म्हणणे भाग आहे. कारण कोणताही हिंदू गोवध करून त्या मांसावर उपजीविका करीत नाही. मुसलमानास व खिश्चन लोकास तसे करण्यास मात्र प्रत्यवाय नसून महार, मांग, धेड वगैरे हिंदुपेक्षा त्यांना पवित्र व स्पर्श मानण्यात येते. त्यांचा व वरिष्ठ हिंदूंचा हर एक प्रकारचा बाह्य व्यवहार घडतो व त्यांची मुले एका शाळेत व एका वर्गात शिकतात. ते एका रस्त्याने जातात-येतात. एका विहिरीवर पाणी भरतात व इतर बाबतीत समान वृत्तीने वागतात. परंतु ज्या आम्हास वैदिक धर्म शिरसावंद्य, आमचा विचार-आचार हिंदू, त्यांचा ते तिरस्कार करतात. इतकेच नव्हे तर ते आम्हाला जनावरांपेक्षाही कमी लेखतात.

ज्या धर्माची तत्त्वे इतकी उच्च पण त्याचा व्यवहार इतका नीच त्या धर्मात राहून आमची उन्नती होईल की नाही असा प्रश्न साहजिकच उद्‌भवतो. परंतु आपल्या लोकांनी धर्मांतर करावे की नाही या प्रश्नाचे उत्तर देणे कठीण आहे. धर्म हा मनुष्यास आवश्यक आहे की नाही या वादग्रस्त प्रश्नात जाण्याची माझी इच्छा नाही. एवढे मात्र खरे की, काही लोकांना आणि विशेषतः हिंदू लोकांना जर प्राणाहून काही प्रिय असेल तर तो धर्मच आहे; पण ज्या धर्मात माणसाला माणुसकी नाही, तो धर्म काय कामाचा ? जो धर्म त्याच्या अनुयायांना ऐहिक व पारलौकिक सुखाची द्वारे मोकळी करण्याऐवजी ती बंद करूनच त्यांना अधोगतीत खितपत पडावयास लावतो त्या धर्माला चिकटून राहण्यात काय अर्थ आहे ? उलट धर्मांतर केल्याबरोबर जर तेच लोक आपली माणसात मोजदाद करून आपल्याला समानतेने वागवितात तर धर्मांतर का करू नये हे मला कळत नाही. आज वैकोम येथील सत्त्याग्रहाचीच गोष्ट घ्या. ज्या रस्त्यावरून अस्पृश्य वर्गास जाण्याची मनाई आहे, त्या रस्त्यावरून खिश्चन, मुसलमान व इतर अ-हिंदू जातीस जाण्यास मोकळीक आहे. या पक्षपाताचे कारण विचारले असता धडधडीत असे सांगण्यात येते की, अस्पृश्य हे हिंदू आहेत म्हणूनच त्यास या रस्त्यावरून जाण्याची मनाई आहे. असा जर हिंदुंचा नियम आहे तर, आपण आज धर्म त्याग व धर्मांतर करून आपली सुटका का करून घेऊ नये ? माझी खात्री आहे की, जर आपण आज धर्म त्याग केला आणि केलाच आहे तर त्या ऐवजी माझ्या मते महंमदी धर्म स्वीकारणे बरे. जे हिंदू लोक आपला तिरस्कार करतात, तेच आपल्याला मान देतील. आपण आज आहो तसे बहिष्कृत

असण्याऐवजी एका मोठ्या समाजाचे अंग होऊन काळ न लागता आपली आपण उन्नती करून घेऊ.

देशांतर व धर्मांतर याशिवाय नामांतर हा एक अस्पृश्यता निवारणार्थ नवीन उपाय सांगण्यात येत आहे. अलिकडे अस्पृश्यांनी आदिहिंदू म्हणवून घ्यावे असे सुचविण्यात येत आहे. या बाबतीत मतभेद व्हावयाचे कारण आपणास कोणते नाम अधिक शोभते हे आहे. हा बऱ्याच अंशी हौसेचा प्रश्न आहे. तेव्हा हा प्रश्न वादविवादाने सोडविला जाईल असे काही सर्वस्वी म्हणता येणार नाही. असे जरी आहे तरी या नावाच्या प्रश्नात काही नाही, असे म्हणून चालावयाचे नाही. इतकेच नव्हे तर नावात सारे सार आहे, असे म्हटल्याने मुळीच अतिशयोक्ती होत नाही, असे माझे मत आहे. याला अनेक कारणे आहेत.

अस्पृश्यात जातीभेद यासंबंधी जे वादविवाद होतात, त्यात जातीभेद व अस्पृश्यताही शाखात्मक आहे, असे गृहीत धरले जाते व तद्नुसार रोटी-बेटी व्यवहारादी उपाय शाखात्मक आहेत म्हणून लोक पाळतात. या म्हणण्यात जर काही तथ्यांश असेल तर कायद्याने हिंदूतील जातीस रोटी-बेटी व्यवहारांची मोकळीक दिली तर ती त्यांनी अंमलात आणण्यास आपली तयारी दाखविली पाहिजे, पण वस्तुतः पाहता लोक तशा प्रकारची तयारी दाखवत नाहीत हे निर्विवाद आहे. परस्परात बेटी व्यवहार करण्याचा कायदा पास होऊन आज ३ वर्षे झाली. पण त्या कायद्याचा फायदा घेतल्याचे फारसे ऐकिवात येत नाही. याचे खरे कारण माझ्या मते असे आहे की जातीभेद व अस्पृश्यता ही शाखात्मक नसून भावनात्मक आहेत. म्हणून ती जर आपणास घालवावयाची असतील तर आपण शाखावर प्रहार न करता नावाचे निर्मूलन करण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. ही भावना आपणास कशी नष्ट करता येईल याचा मी अनेकवार विचार केला आहे. विचारांती माझे असे ठाम मत झाले आहे की, अस्पृश्यता व जातीभेद ही काय ती नावात साठविलेली आहेत. वरिष्ठ लोक आपला तिरस्कार करतात. ते केवळ आपल्या नावामुळेच. महार म्हटला की, ऐकणाऱ्याच्या मनात अमुक एक प्रकारची तिरस्कारमय भावना उभी राहते, मराठा म्हटला की निराळी भावना उत्पन्न होते व तोच ब्राह्मण म्हटला की आदरात्मक भावनेने ऐकणारा प्रेरित होतो. ही गोष्ट कोणासच खोटी आहे म्हणून म्हणता येणार नाही. याची उदाहरणे धेड लोकांना देता येतील. गुजरातेतील धेड लोकांना अस्पृश्यता किती प्रखर रितीने भासते हे काही सांगावयास नको. तरी पण मुंबईत ते आले म्हणजे दक्षिणी मराठ्याच्या शेजारी राहतात. इतकेच नव्हे तर त्यांचा त्यांचा रोटी व्यवहार झालेला मी पाहिला आहे.

उलटपक्षी महाराष्ट्रातील कोणताही अस्पृश्य गुजरातेत जर गेला तर दक्षिणी म्हणून ब्राह्मणाच्या खाणावळीत त्याला राहता येते, ही गोष्ट सर्वश्रुत आहे. हल्ली दोन-तीन वर्षांत सगळी मद्रास मुंबईस पोट भरण्यास उतरली आहे आणि त्यात मद्रासेतील बरेच अस्पृश्य लोकही आहेत; पण हे मद्रासेतील अस्पृश्य मुंबईच्या हिंदुंच्या विश्रांतीगृहात खुशाल खातात पितात. त्यांचा कोणत्याच प्रकारे निषेध नाही. एका भागातील अस्पृश्य दुसऱ्या भागात गेला तर तो स्पृश्य होतो; पण या विलक्षण प्रकाराचे कारण शोधून काढले असता असे दिसून येईल की अस्पृश्यतेच्या खुणा व मुद्रा सर्व भागात एकच नाहीत. एका भागाच्या खुणा दुसऱ्या भागाला अवगत नाहीत. एका प्रांतातील अस्पृश्य दुसऱ्या प्रांतात खुणेच्या अभावी स्पृश्य लेखला जातो. माणूस म्हणून माणूस किंवा जात म्हणून जात अस्पृश्य नाही. अमुक एक नाव धारण करणारे लोक अस्पृश्य गणले जातात. ते नाव ज्यांना नसेल ते स्पृश्य गणले जातील हा समाजाचा ठोकताळा बांधला गेला आहे. नाही तर अस्पृश्य माणसांच्या रचनेत, त्वचेत, रूप-रंगात, स्पृश्य माणसापेक्षा काही निराळे आहे असे नाही, की लगेच पाहिल्याबरोबर ज्या प्रकारे सिद्दी लोकांस युरेपियनांपासून किंवा दोघांसही चिनी जपानींपासून अलग करता येते त्याप्रमाणे अस्पृश्यांना स्पृश्यांपासून निराळे करता येईल. नावाशिवाय अस्पृश्य ओळखण्याची दुसरी खुण मुद्रा काही नाही. म्हणून माझ्या मते नामांतर करणे इष्ट आहे.

येथवर जे नामांतर करा म्हणतात, त्यांचे व माझे एक मत आहे. परंतु मुंबई इलाख्यातील अस्पृश्य वर्गाने आदि-हिंदू म्हणवून घ्यावे यात काय हशील आहे ते मला समजत नाही. याने अस्पृश्य वर्गात समावेश होणाऱ्या सर्व जातीचे एकीकरण व्हावे असा जर उद्देश असेल तर '' बहिष्कृत '' हे नाव काय वाईट आहे ? यासारखे दुसरे अर्थपूर्ण व टोपण नाव देता येईल की नाही याची मला शंका वाटते. आदि या नावाने अस्पृश्यता जाईल असा जर या नव्या धोरणाचा हेतू असेल तर तो केवळ भ्रम आहे. महार लोक केव्हा केव्हा लाजेमुळे कोणी कोणी विचारले असता मी चोखा म्हणून सांगतात. तसेच चांभार मी रोहिदास असे म्हणतो; पण एका नावाने ते जितके अस्पृश्य तितकेच दुसऱ्या नावाने ते अस्पृश्य आहेत. मद्रासेत अस्पृश्य वर्ग आदि द्रविड म्हणवून घेतात. परंतु तेणेकरून त्यांची अस्पृश्यता गेल्याची साक्ष कोणी देत नाही. अस्पृश्यता व जातीभेद ही नावात साठविलेली आहेत. हे सर्वस्वी खरे आहे आणि ती नावे लुप्त केल्याखेरीज भागायचे नाही, आम्ही आपली जातीवाचक नावे सोडून फक्त चालणार नाही तर आमच्याबरोबर सर्व जातीनी आपली जातीवाचक नावे सोडून सर्वांनी सर्वसाधारण असे एक नाव धारण केले पाहिजे. माझ्या मते सर्वांनीच फक्त हिंदू असे म्हणावे व जातीवाचक पोटनावे काढून टाकावीत. कोणी स्वतःस

ब्राह्मण, मराठा, महार, चांभार, मांग इत्यादी न म्हणता फक्त हिंदू असे म्हणावे तेणेकरून समाजात समता उत्पन्न होऊन एकी होईल. हिंदू म्हटल्याने कोणास कोणाचा तिरस्कार वाटणार नाही. कोणी कोणास हीन लेखणार नाही व कोणी कोणास श्रेष्ठ मानणार नाही. शिवाय व्यक्ती-व्यक्तीची परस्परातील सहानुभूती जातिवाचक न राहून आज समाजात अन्याय, बेकी, बेदिली नष्ट होऊन बिमोड होईल. आज मराठा असला तरच इतर मराठा त्याला आपली सहानुभूती दर्शवितो. तसेच ब्राह्मण ब्राह्मणाशिवाय सहानुभूती दाखविण्यास तयार होत नाहीत. परंतु जेथे सर्वच हिंदू तेथे सहानुभूतीच्या आड काहीच नाही. मुसलमान समाजात आज जी एकी आहे तिचे तरी कारण काय, हेच. त्यांच्यात मुसलमान म्हटला की झाले. तो आपला झाला. तसे हिंदुमध्ये व्हावयास त्यांना सर्वसाधारण असे नाव पाहिजे व ते हिंदू असावे असे माझे मत आहे.

ही स्थित्यंतरे घडून येतील तो सुदीन; पण ही घडवून आणण्यास काय करावे, हा मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे.

काही बाबतीत राजदंड लाविल्याखेरीज सामाजिक अन्यायाचे निर्मूलन होणे दुरापास्त आहे. म्हणून सामाजिक व धार्मिक बाबतीत जेथे तेथे कायदा करून सुधारणा करावी की न करावी यासंबंधी बरीच भवती न भवती होऊन, शेवटी इंग्रज सरकारने असा ठराव केला आहे की जाती व रूढी यावर कायद्याचा पगडा बसविण्यास आपण कबूल नाही. या दृष्टीने पाहता हिंदुस्थानात स्वराज्य मिळविण्याचा योग आला आहे, ही मोठीच आनंदाची गोष्ट आहे; असे मी समजतो. कारण ब्रिटिशांचा राजदंड आम्हास '' असून अडथळा व नसून खोळंबा '' असा आहे. आमच्या लोकास स्वराज्याचे मोठे भय वाटते व आम्हास स्वराज्य ज्याचे रूपांतर पेशवाईतच होईल असे भासते पण तसे म्हणणे कोणत्या विचाराचे दर्शक आहे ? कारण पेशवाई स्वराज्य व हल्लीचे स्वराज्य यात बराच फरक आहे. पेशवाईमध्ये एकदा स्थापलेले राजे वंशपरंपरा राज्य करीत असत. प्रजेच्या संमतीने राज्य करीत नसत. भावी स्वराज्यात राज्यसरकार प्रजेच्या संमतीने चालणारे असून त्यात कायमचे राजे असे कोणीच असू शकणार नाहीत. अशा प्रकारच्या स्वराज्यात जर प्रजेच्या हिताची हेळसांड झाली तर तिचे संवर्धन दुसऱ्या प्रकारच्या कोणत्याच राजकारणात होणार नाही असा सर्व जगाचा अनुभव असल्यामुळे प्रजासंमत स्वराज्य ही सर्वोत्तम अशी राज्यव्यवस्था आहे हे निर्विवाद आहे. अशा प्रकारच्या स्वराज्याला आपण बुजून का जावे याचा मला मोठा विस्मय वाटतो. उलट त्याच्या प्राप्तीप्रित्यर्थ आपण प्रयत्न करणे फार जरूर आहे. मला स्वराज्य म्हणजे काय अभिप्रेत आहे याचा अर्थ आपण लक्षात घेतला पाहिजे.

आज हिंदुस्थानात स्वराज्य संबंधाने जे वादविवाद होत आहेत त्यात मुख्यत्त्वेकरून ब्रिटिश लोकाच्या हाती असलेली सत्ता क्रमाने काढावी की, एकदम काढून घ्यावी याच प्रश्नावर रागळा भर दिला जातो. काढून घेतलेली सत्ता कोणाच्या संमतीने वापरण्यात यावी याचा कोणीच विचार करीत नाही. समजा प्रत्यक्ष आलेली सत्ता जर एकाच वर्गाच्या संमतीने अंमलात आणली गेली तर, आज ब्रिटिश आमदानीत जी स्थिती आहे तिच्यापेक्षाही दसपटीने वाईट होणार नाही कशावरून ?

यास्तव सत्तेच्या प्रश्नाइतका किंबहुना तिच्याहीपेक्षा जास्त महत्त्वाचा असा हा संमतीचा प्रश्न आहे आणि ज्याअर्थी आमच्यातील स्वराज्यवाद्यांनी तो मुद्दा गौण म्हणून त्याकडे दुर्लक्ष केले आहे, त्याअर्थी त्यांना जनअपवादाची किती पर्वा आहे हे उघड आहे. आपण मात्र या प्रश्नाचा पिच्छा पुरविला पाहिजे. कारण स्वराज्य जर येणार, तर त्यात आम्हास इतरांसमान अधिकार पाहिजे आणि तसा अधिकार प्राप्त होण्यास आपण मतदानाचा जो राजकीय हक्क तो प्राप्त करून घेतला पाहिजे. हल्ली मतदानाचा हक्क इतका संकुचित करण्यात आला आहे की, साऱ्या हिंदुस्थानात शेकडा दोन लोक यासच तो प्राप्त झाला आहे असे मी समजतो. याने आपला दोपदरी फायदा होणार आहे. एक तर आज कायदे कौन्सिलातर्फे जी आपली हेळसांड होते ती होणे शक्य नाही. जे लोक आपण मत दिल्यामुळे निवडून येतील त्या लोकांना आपल्या हिताविषयी बेपर्वा राहून चालावयाचे नाही. कारण आपल्या हाती त्यांची लगाम राहणार आहे. मतदानाच्या हक्कापासून आपला एवढाच फायदा होणार आहे असे नाही. त्यापासून दुसरा एक महत्त्वाचा फायदा आहे व तो हा की, या मतदानाच्या हक्कापासून वर्णाश्रम धर्मावर मोठाच घाला येणार आहे. राजकीय बाबतीत समान आश्रम झाल्यावर सामाजिक बाबतीत वर्णाश्रम धर्म राहणे शक्य नाही. आज राजकीय बाबतीत एका ब्राह्मण उमेदवारास जर भंग्याजवळ मतांची भीक मागण्याची पाळी आली तर वर्णाश्रम धर्म राहिला कोठे ? असा हा रंकाचा राव होण्याचा राजमार्ग आपण आधी अवलंबिला पाहिजे. इंग्लंडातील मजुरांची तरी काही वर्षापूर्वी आपल्या प्रमाणेच हीनदीन स्थिती होती. १८६० पर्यंत लिबरल लोक आपला उद्धार करतील अशा आशेने ते स्वस्थ बसले होते. " परी जो दुसऱ्यावरी विसंबला, त्याचा कार्यभाग बुडाला व जो प्राणपणानी कष्टत गेला, तोचि भला ॥ " याची जाणीव पटून त्यांनी आपला उद्धार आपणच करण्याचे ठरविले या त्यांच्या कार्यात त्यांनी मतदानाच्या हक्कास प्रधान पद दिले होते व तो हक्क प्राप्त करून घेण्यास त्यांनी आपली सर्व शक्ती खर्च केली. अखेर त्यांचा जय होऊन आज ते राज्यारूढ झाले आहेत व आपल्या मनाप्रमाणे सामाजिक, राजकीय व आर्थिक सुधारणा घडवून आणित आहेत. याचे मूळ कारण

म्हणजे त्यांना मतदानाचा हक्क विस्तृत प्रमाणात प्राप्त झाला आहे, हेच होय. आपण जर तशा तऱ्हेने यत्न केला तर आपणासही आपली उन्नती करून घेता येईल.

पण जे ध्येय आपण आपल्यापुढे ठेवतो त्या ध्येयाला आधारभूत असणारी तत्त्वे आपल्या प्रतिपक्षापुढे मांडून कार्यभाग होत नाही हे आपण विसरता कामा नये. कोणताही एखादा प्रसंग गुदरला म्हणजे ज्या लोकांवर तो प्रसंग गुदरतो, ते लोक प्रथमतः तत्त्वावर वादविवाद करीत सुटतात. जो तो आम्ही माणसे नाहीत काय, कुत्री, मांजरं, आमच्यापेक्षा श्रेष्ठ का आहेत, अशा प्रकारच्या तत्त्वाचा वादविवाद घालतात, यात खरोखरीच काही वावगे नाही पण कित्येक लोकांना असे वाटते की तत्त्वांची माळ गोविली की, आपला कार्यभाग झाला व आपण जिंकलो. पण हा भ्रम आहे. निव्वळ तत्त्वाची उभारणी करून चालत नाही. कारण तत्त्वाची उभारणी झाल्याबरोबर त्याचा परिणाम जगाच्या राहाटीवर आपोआप होत नाही. तो परिणाम घडवून आणावा लागतो. म्हणून परिणामाच्या दृष्टीने तत्त्वे मांडण्यापेक्षा ती अंमलात आणण्यास योग्य अशी संघटना तयार करणे त्याहीपेक्षा अगत्याचे आहे. जोपर्यंत संघटना तयार झाली नाही तोपर्यंत ज्या तत्त्वासाठी आपण झगडत आहोत, ती तत्त्वे आपल्या प्रतिपक्षाला कबूल जरी असली तरी ती पुराणातली वांगी पुराणातच ठेवण्यात येतील व आपले म्हणणे अरण्यरुदनाप्रमाणे शुष्क ठरेल. ज्याप्रमाणे नशीबाचा गाडा हाकण्यास यत्न-सारथी असावा त्याप्रमाणे तत्त्वांचा इष्ट परिणाम घडवून आणण्यास संघटनाही असावी लागते.

यावरून पाहता मला वाटते, आपल्यात संघशक्ती उत्पन्न करण्यास आपणास एक सर्व अस्पृश्य जातीस व्यापक अशी संस्था असणे फार जरूर आहे. अशी संस्था उत्पन्न झाली पाहिजे. या संस्थेमार्फत आपली दोन कार्ये होतील. एक आपल्याला सार्वजनिक कामाला लागणारा पैसा गोळा करण्यास सुलभ होईल. ' दरिद्र्याचे मनोरथ उपजल्या बरोबरच लयास जातात ' अशी एक म्हण आहे व आमचा समाज गरीब असल्यामुळे आमच्या हातून हा कार्यभाग कसा होईल असा बहुतेकांना संदेह वाटतो. पण माझ्या मते ही म्हण फार तर व्यक्तिमात्रालाच लागू पडते. समाजाला लागू नाही. ' थेंबे थेंबे तळे साचे ' अशी दुसरीही म्हण आपल्या ऐकिवात आलीच असेल. आपला समाज जरी गरीब आहे तरी तो संख्येने जबर आहे. आपल्यातील चोवीस लक्ष लोकांपैकी किमान दोन लाख माणसांनीच जर दरवर्षी आठ आणेच दिले तर दरवर्षी एक लाख रुपयाचा फंड तयार होईल आणि अशा प्रकारे दरवर्षी एक लाख रुपये जर जमा होत गेले तर आपली उन्नती होण्यास मुळीच अवधी लागणार नाही, मात्र याला एक मध्यवर्ती संस्था असणे जरूर आहे. अशा जबाबदार संस्थेकडून कायम

फंड गोळा करण्याचे काम होईल इतकेच नव्हे तर आपले धोरण निश्चित करून ते लोकनिदर्शनास आणण्यास सोपे जाईल. आज आमची स्थिती अशी आहे की, ज्याला ज्याला म्हणून र ट फ करता येते त्याला आपण पुढारी आहो असे वाटून आपले नाव पुढे यावे असे वाटते. इतकेच नव्हे तर कोणी संस्थेमार्फत काम करावयास तयार नसतात. कारण संस्थेत राहिल्याने त्यांचे नाव पुढे येत नाही. अशामुळे आमच्यात बाराभाईची नगरी होऊन गेली आहे व जो तो आपले नाव पुढे येण्यास काही तरी प्रुफ नाचवीत असतो. दुसरे असे आहे की, आम्ही जरी या देशात वास्तव्य करीत आहो, आम्हावर नाना तऱ्हेचे अन्याय लादण्यात येत आहेत, आम्ही काही अल्पसंख्यांक नाही, तरी सरकार आमची काही दाद लावीत नाही किंवा आमचे काही म्हणणे ऐकून घेण्यास तयार नाही. उलट त्यांना वाटले तर ते आमची कीव करतील किंवा पाव तुकडा टाकतील. मागू म्हटले तर आमचा हक्क चालावयाचा नाही एवढी आमची दुर्भिक्षता. त्याच मुसलमान लोकांचे कोण लाड ! याचे कारण त्यांची संघशक्ती आणि त्यांच्या संस्था ! आपली जर अशी एखादी संस्था असती तर आपल्यातील खोट्या पुढाऱ्यांस आळा घालून त्यांची एकदिशा करती, इतकेच नव्हे तर इतरांकडून जी आपली बेदाद होते व बेफिकीरी दाखविण्यात येते ती तशी येती ना !

या संस्थेने फंड गोळा करून आपल्या अस्पृश्य वर्गाची आतील सुधारणा करण्यास सुरुवात करावी. नुसती अस्पृश्यतेविरुद्ध तक्रार करून उपयोग नाही. आपण विसरतो की, आज हिंदू समाजात जो जातीभेद आहे, त्याचबरोबर त्यामध्ये गुणभेद आहेतच आणि जातिभेद जरी गेला तरी गुणभेद हा राहणार आहेच. आज सर्व अस्पृश्य वर्गातील लोकास जरी ब्राह्मण म्हणून संबोधिले तरी, त्यातील कोणी मनुष्य ना. परांजपे यांच्या जोडीला जाऊन बसण्यास लायक होणार नाही. कारण जातीभेद जरी गेला तरी गुणभेद राहिला आहे. मला तर केव्हा केव्हा असे वाटते की, जातीजातीत जो गुणभेद वाढला आहे, तो जर वाढला नसता तर हा जातीभेद इतक्या दिवस टिकलाही नसता. कारण साऱ्या जातीतील लोक सारख्या प्रमाणात जर गुणवान असते तर त्यांनी एका जातीचे वर्चस्व केव्हाच कबूल केले नसते. गुणभेद जर नसता तर जातीभेद केव्हाच जमीनदोस्त झाला असता. म्हणून मला नेहमी सांगावेसे वाटते की, इतर लोक आपणापेक्षा जसे जातीने श्रेष्ठ आहेत तसे ते व्यावहारिक गुणानेही श्रेष्ठ आहेत. म्हणून आपण आपल्या लोकांच्या अंगी व्यावहारिक गुणांची अभिवृद्धी करण्यास प्रयत्न केला पाहिजे आणि आमच्यातील लोकांना जातीभेदामुळे जाळपोळ होत नाही व आपल्यावरील अन्याय दूर करण्यास ते धिंगा घालीत नाहीत याबद्दल आपल्यातील काही लोकास सखेदाश्चर्य वाटते; पण यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीच नाही. अमुक एक गोष्ट करता येत नाही वगैरे आवेशयुक्त बोल ऐकून

त्वेष येत नाही, याचे कारण त्यांना या अन्यायाची जाणीव होत नाही. मनुष्य एखाद्या हुद्यावर चढण्यास लायक असताना जर त्याला जातीभेदामुळे तो हुद्दा प्राप्त होत नाही तर, तशा माणसाला जातीभेद कसा नडतो; हे त्याला कळू लागेल व त्याला आपल्या चळवळीचे मार्ग कळून तो तिचा पुरस्कर्ता होईल. पण ज्याला त्या जागेवर जाण्याची लायकी नसेल, तर त्याला जातीभेदाचे उग्र स्वरूप कसे कळणार ? जातीभेद असला काय आणि नसला काय, तो आहे तेथेच राहणार म्हणून आपल्या लोकांची लायकी वाढण्याची आपण काळजी घेतली पाहिजे. गुणात समता आली म्हणजे जातीभेदात साठविलेली अस्पृश्यता फार दिवस टिकणे शक्य नाही.

आपला समाज अशा रितीने सज्ज झाला पाहिजे. जशा प्रकारची सामाजिक किंवा राजकीय स्थिती आपल्याला हवी असेल, तशा प्रकारची स्थिती आपल्याला प्राप्त करून घेण्यात फार वेळ लागणार नाही. हे मत कदाचित आपल्याला पोरकट असे वाटेल पण मला वाटते त्याला बराच आधार आहे.

हल्लीचा काळ या देशाच्या दृष्टीने मोठा आणीबाणीचा आहे. स्वराज्याचा पाया जेव्हा १९१७ साली घालण्यास सुरुवात झाली तेव्हापासून या देशात तीन कंपू झाले आहेत. (१) युरोपियन लोकांचा, (२) मुसलमान लोकांचा, (३) हिंदू लोकांचा. १९१७ सालापूर्वी मुसलमानांशी हिंदूंचा राजकीय बाबतीत ३६ चा आकडा असे. आता तो ६३ चा होऊन दोघांमध्ये भयंकर प्रकारचे सख्य होऊन, दोघांनी एकवट होऊन स्वराज्याचा पहिला हप्ता इंग्रजांपासून घेतला आहे. पण वाटणीच्या वेळी सख्ख्या भावांमध्ये देखील तेढ निर्माण झाली आहे. स्वराज्य जर मागितले तर त्यातील मोठा वाटा कोणास जाणार, हा एक लढ्याचा प्रश्न होऊन पडला आहे. या प्रश्नाचे उत्तर हेच की, ज्यांची लोकसंख्या जास्त त्यास स्वराज्याचा भागही जास्त मिळणार. मुसलमानांना आपली लोकसंख्या जास्त असावी असे वाटणे साहजिक आहे. त्याचप्रमाणे हिंदुंना ती कमी न व्हावी असे वाटणे साहजिक आहे. उभयपक्षाचा आपल्यावर कटाक्ष आहे. आपल्याशिवाय मुसलमानांना जय नाही. आपल्याशिवाय हिंदुंना गती नाही. आज आम्ही हिंदुचे हिंदू राहिलो, तरच आर्यधर्माची संस्कृती या देशात निपजणार आहे. उलट आज जर आम्ही हिंदुचे मुसलमान झालो तर या देशात यवनी संस्कृतीचे प्राबल्य होणार आहे हे आज हिंदू आणि मुसलमान या दोघांच्याही ध्यानी आले आहे. तसे जर नसते तर वैकोम येथे ब्राह्मण वर्ग अस्पृश्य वर्गासाठी सत्याग्रह करण्यास तयार झाला नसता अथवा मुसलमान लोक कोटी रुपये खर्च करून आपल्याला त्यांच्या धर्माची दीक्षा देण्यास उत्सुक झाले नसते. आज आपण जरी सर्वात खालचे आहोत तरी या हिंदू-मुसलमानाच्या संस्कृतीच्या संग्रामात आपली कुमक आपल्या संख्येच्या मानाने फार महत्त्वाची आहे व आपण

आपल्यात संघशक्ती उत्पन्न केली तर आपण जे मागू ते आपल्याला मिळेल. माझी खात्री आहे की, या संग्रामात जे हिंदु लोक आज विसाव्या शतकात अस्पृश्यता काढा असे म्हटले असता मूळ खात पडलेला पुराणास विचारतो असे म्हणतात, तेच लोक ती पुराणे जाळून आपल्याला एकवट करून घेतील. वेळच तशी आली आहे. त्याला नाईलाज आहे.

आपला समाज आज सर्वतोपरी मागासलेला आहे. द्रव्याने मागासलेला आहे, मनोधैर्याने मागासलेला आहे. ज्या समाजातील लोकास राजकीय सामाजिक व धार्मिक असमता व अन्याय यापासून पराकाष्ठेचा त्रास होत आहे, ज्यातील साऱ्या लोकास गूढ अज्ञानाने व्यापिले आहे, ज्यास विपत्तीपासून होणाऱ्या यातना सोसाव्या लागत आहेत व त्याच्या परिहारार्थ काय करावे समजत नाही, त्या लोकांची सर्वत्र चाललेल्या जीवनकार्यात अखेर गती काय होईल हे सांगता येणे फार कठीण आहे. यासाठी आपल्यापैकी ज्यांना ही स्थिती स्पष्टपणे कळत असेल व ज्याच्या मनात कर्तव्यबुद्धी व परोपकारबुद्धी पूर्णपणे जागृत झाली असेल, त्यांनी आपल्या समाजाचा जीवनार्थ कलहात टिकाव लागण्यासाठी रात्रंदिवस निरपेक्ष बुद्धीने झटले पाहिजे. अशा प्रकारचे विचार समजले असून ते जर स्वस्थ राहतील, तर त्यांच्या माथ्यावर आपल्या दडपून गेलेल्या बांधवास विपन्नावस्था आणिल्याची आणि त्यांचा नाश केल्याची भयंकर जबाबदारी येणार आहे. म्हणून सुशिक्षित बांधव हो ! जर तुम्हास इतरांकडून व पुढील संततीकडून बरे म्हणवून घ्यावयाचे असेल व तुमची आज जी स्थिती आहे ती दूर करून तुमच्या मुलांची व नातवंडांची स्थिती अधिक वाईट होऊ नये अशी तुम्हास वास्तविक इच्छा असेल तर ज्या दुर्गतांनी व दुराचारांनी आपल्या लोकांच्या बुद्धीचा, कीर्तीचा व परिस्थितीचा घात चालविला आहे, त्यांचे यथाशक्ती निर्मूलन करणे हे आपले कर्तव्य आहे व ते आपण केले पाहिजे ह सांगून मी आपली सर्वांची रजा घेतो.



५

# घनघोर संग्राम केला तरच माणुसकी परत मिळेल

बहिष्कृत हितकारिणी सभेतर्फे जिल्ह्यातून लोकजागृतीसाठी सभा भरविण्याचा कार्यक्रम डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी मुक्रर केला. बेळगाव जिल्ह्यातील निपाणी गावी ' मुंबई इलाखा प्रांतिक बहिष्कृत परिषद; अधिवेशन तिसरे ' ही सभा बाबासाहेबांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १०-११ एप्रिल १९२५ रोजी भरविली. परिषदेला संबोधित करताना दिनांक ११ एप्रिल १९२५ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

या देशात आजकाल ज्या घडामोडी चालल्या आहेत त्यात आपल्याला अत्यंत जिव्हाळ्याची बाब म्हटली म्हणजे वैकम येथील सत्याग्रह ही होय ! म्हणूनच वैकम येथील सत्याग्रहावरून जे विचार मला सुचले आहेत ते मी आपणापुढे मांडीत आहे.

वैकम येथे कसला वाद चालू आहे हे बहुतेकास विदित आहेच. ज्या रस्त्यावरून सर्व लोकांना व जनावरांना जाता येते त्या रस्त्यावरून आपणासही जाता यावे, असा आग्रह वैकम येथील अस्पृश्यांनी धरला आहे. या सत्याग्रहात ज्या काही रदबदल्या घडल्या त्या सर्वांचे आपल्याला फारसे प्रयोजन नाही. ध्यानात ठेवण्यासारखी गोष्ट ही की हा सत्याग्रह वर्षाधिक कालपावेतो चालून अखेर निष्फळ झाला. या सत्याग्रहासंबंधाने काही राजकीय पुढाऱ्यांचा दृष्टिकोन बदलला आहे, ही गोष्ट खरी आहे. कारण आधी राजकीय मग सामाजिक, ही मीमांसा अगदी नादानपणाची आहे, हे आता सिद्ध झाले आहे. कारण आज इतके दिवस नुसते राजकारण शिजत घातल्यानंतर जर राजकीय ध्येयाच्या आड कोणती बाब येत असेल तर ती सामाजिकच होय. सामाजिक प्रश्न इतका महत्त्वाचा आहे की, त्याला कितीही भिजत पडू दे म्हटले तरी तो प्रश्न दत्त म्हणून पुढे उभा राहतोच. ज्या राजकारणी धुरंधर पुरुषांनी सामाजिक प्रश्न बाजूस ठेवून नुसते राजकारण हाती घेतले व इतरास घेण्यास लाविले त्यांनी काहीच साधले नाही. इतकेच नव्हे तर सामाजिक प्रश्न बाजूस टाकल्यामुळे त्यांच्या राजकीय ध्येयाची साध्यता त्यांची त्यांनीच बिकट करून टाकली. यास आजची परिस्थिती साक्ष देत आहे. तो सामाजिक प्रश्न त्यांनी वेळीच हाती घेतला असता तर आज सर्वत्र दिसून येत असलेली तेढ व

---

डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र - चां. भ. खैरमोडे, खंड २, पृष्ठ १२१-१२६.

दुही दृष्टीस पडती ना! ही तेढ व दुही नाहीशी करण्यास या देशात घडत असलेले सामाजिक अन्याय दूर करणे हे अव्वल महत्त्वाचे कार्य आहे व ते दरेक हिंदी जनाने आपले पवित्र कर्तव्य म्हणून बजावले पाहिजे, असे सांगणारा मुत्सद्दी या देशात महात्मा गांधींपूर्वी कोणीच झाला नाही. त्यांच्या मते सामाजिक व राजकीय या बाबी दोन नाहीत त्या एकच आहेत आणि म्हणूनच हिन्दू-मुसलमानांचे ऐक्य व अस्पृश्यता निवारण या दोहोशिवाय स्वराज्य मिळणार नाही, असे ते नेहमी सांगत फिरतात. बारीक नजरेने पाहिले असता ज्याप्रमाणे कस्तुरबा गांधी व लक्ष्मी यांच्यामध्ये सापत्नभाव आहे, त्याप्रमाणे महात्मा गांधी व अस्पृश्यता यांच्यामध्येही थोडासा सापत्नभाव आहे असे म्हणावे लागते. कारण ते जितका खादीप्रसार व हिन्दू-मुसलमानांचे ऐक्य यावर भर देतात, तितका अस्पृश्यता निवारणावर देत नाहीत. तसा जर त्यांनी दिला असता तर ज्याप्रमाणे काँग्रेसच्या बाबतीत सुतावाचून मत नाही, असा त्यांनी हट्ट धरला त्याप्रमाणे अस्पृश्यता निवारणावाचून काँग्रेसमध्ये शिरकाव नाही, असाही आग्रह त्यांना धरता आला असता. असो ! जेथे कोणीच जवळ करीत नाही तेथे महात्मा गांधींनी दर्शविलेली सहानुभूती काही कमी नाही. या त्यांच्या सहानुभूतीप्रमाणे वैकम येथील सत्याग्रहाची काहीतरी वासलात लावावी म्हणून ते स्वतः वैकम येथे गेले होते व त्यांनी तेथील ब्रह्मवृंदांपुढे तडजोडीच्या तीन सूचना मांडल्या. त्यांनी सांगितले की (१) एकतर जनतेचे लोकमत घ्या, (२) दुसरे ज्या शास्त्रात अस्पृश्यता सांगितली आहे ती खरी की खोटी हे पंडितांमार्फत ठरवून घ्या, अगर (३) त्रावणकोरचे दिवाण यास सरपंच नेमून निवडक पंडितांच्या पंचामार्फत ही बाब लवादात काढा. पण सखेदाश्चर्याची गोष्ट ही की हे तिन्ही अनुमतीचे मार्ग तेथील ब्रह्मवृंदांना मान्य झाले नाहीत. त्यांनी अस्पृश्यांना मज्जाव करण्याचा आपला निश्चय ढळू दिला नाही; इतकेच नव्हे तर अस्पृश्यांस हा अन्याय आहे असे म्हणणाऱ्या महात्माजीपुढे कोणतेही शास्त्र ठेवून दिले.

ही हिंदूंची शास्त्रे मी काही वाचून पाहिलेली नाहीत व त्यांच्या पोटात काय काय कोडी साठविलेली आहेत त्याची मला माहिती नाही. माझी खात्री आहे की त्या शास्त्रात अस्पृश्यता सांगितलेली आहे. परंतु व्यवहारात अस्पृश्यता पाळणे हा धर्म आहे, असे आमचे धर्ममार्तंड निधड्या छातीने सांगतील असे मला वाटले नव्हते. याचा उघड अर्थ असा की आम्ही एकतर सगळी शास्त्रे जाळून राख केली पाहिजे अगर शास्त्रे चाळीत बसून अस्पृश्यतेसंबंधी जे निर्णय असतील ते खोटे ठरवित बसले पाहिजे व ते निर्णय जर आम्हाला फोल ठरविता आले नाहीत तर आम्हाला अस्पृश्यता ही आदीअंतापावेतो भोगावी लागणार आहे. असाच जर आमच्या धर्ममार्तंडाचा दुराग्रह असेल तर या शास्त्रांची विल्हेवाट अगदी

निराळ्या रीतीने लावणे भाग आहे. इंग्लंडमध्ये बर्कले नावाचा एक फार मोठा तत्त्ववेत्ता होऊन गेला. तो नाना तऱ्हेची तात्त्विक कोडी रचून लोकांना अडवीत असे व लोक त्याच्या कोड्यापुढे अगदी कुंठित होत असत. अशापरी गांजलेल्या एका गृहस्थाने डॉ. जान्सन यांची मदत घ्यावी म्हणून त्याकडे गेला व बर्कलेचे एक कोडे सांगून ते उकलण्यास आर्जव करू लागला. काही वेळानंतर जवळच धोंडा पडला होता त्यावर तो कागद ठेवून ठोकर मारून डॉ. जान्सन म्हणाला, हे पहा अशा रीतीने मी त्याचे कोडे सहज उकलतो. हाच न्याय या हलकट शास्त्रांना लागू करणे रास्त आहे. खरोखरी ही शास्त्रे सर्व जनतेचा अपमान करणारी आहेत. ही सरकारने केव्हाच जप्त करायला पाहिजे होती. निदान त्यांचा जप करणारांनी सामाजिक प्रश्नांची तडजोड होत असता ती मधे आणू नयेत, नाहीतर भयंकर प्रसंग ओढवण्याची भीती आहे. सर्वांनी बरोबरीचे नाते राखून, एकमेकास प्रसंगोपात्त मदत करून, जेणेकरून समाजात सौख्य नांदेल अशा रीतीने आपले वर्तन ठेवणे हाच समाज रचनेचा आद्य हेतू आहे. ज्यावेळी समाजातील काही लोक प्रबल होऊन इतरांवर जुलूम करू लागल्यामुळे समाजसंघटनेचा हा हेतू सिद्धीस जात नाही असे दृष्टोत्पत्तीस येईल, त्यावेळी तेथेच चाचपडत न बसता, आपले सर्व इतर उद्योग बाजूस सारून मोठ्या नेटाने श्रम करून प्रबळ झालेल्या त्या मदांधांची शेंडी धरून त्यास खाली वाकविणे हेच समाजातील प्रत्येक व्यक्तिमात्राचे कर्तव्यकर्म होय. सर्व लोकांची स्थिती सर्वतोपरी तंतोतंत सारखी ठेवण्याविषयी सर्वांनी झटावे ही आमची मागणी नाही. ज्याप्रमाणे लहान नवरा व मोठी बायको यांचा जोडा जमला असता मुलीस यौवनावस्था प्राप्त होऊन मुलाची फजिती न व्हावी म्हणून मुलीचे मीठ तोडा असे सुचवितात त्याप्रमाणे आम्ही दरिद्री आहोत म्हणून इतरांचे द्रव्य लुबाडून त्यांना आमच्या बरोबर दरिद्री करा असे आम्ही सुचवित नाही. आम्ही आपले मानव जातीस प्राप्त असलेले समान हक्क मागत आहोत. परंतु ते मिळण्यासदेखील आम्हाला शास्त्रांची आडकाठी आहे. जेथे जेथे म्हणून हे हक्क हिरावून घेण्यात आले होते तेथे तेथे मोठी रणे माजली होती. फ्रांसमधील वरिष्ठ लोकांनी छळ केल्यामुळे कनिष्ठ लोकांनी त्यांची कत्तल उडविली; अमेरिकेतील निग्रो लोकांना गुलामगिरीतून मुक्त करण्यासाठी सहा वर्षे अमेरिकन लोकांनी आपसात यादवी केली. या यादवीत अनेक लोक मेले ही गोष्ट खरी, पण जे मेले ते व्यर्थ गेले नाहीत; तर त्यांनी जे उरले त्यांचे जीवन सुखावह केले. असा एखादा घनघोर संग्राम केला तरच आपली हरण करण्यात आलेली माणुसकी आपणास परत मिळेल किंवा एखाद्या सौम्य उपायाने लाभेल. हा प्रश्न तूर्त बाजूला ठेवला तरी एक गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे व ती ही की इतका

आहोत? इतकी अवहेलना, इतकी जबरदस्ती जशी आम्हावर होत आहे तशी आम्ही कुत्र्यासारखे स्वस्थ आहोत व गायीप्रमाणे गरीब झालो आहोत. आम्हाला त्याचे काही दुःख नाही, चीड नाही, जाणीव नाही. नवल आहे ते हेच. लहान सहान मुंगीवर जरी पाय दिला तरी ती डसते. पण आम्ही किड्याएवढे मोठे प्राणी असता आम्हाला कोणी लाथा मारल्या असता देखील आम्ही उलटून पडत नाही. याची कारणे शोधून पाहू गेलो असता मुख्यतः दोन दिसतात. एक आपल्यात ज्ञान व शहाणपण नाही. ही ज्यांच्याजवळ होती त्यांनी त्यांच्या बळावर आपल्या लोकांवर जुलूम केला व अमुकच नियमाबरहुकूम वागावे असे आपल्या सल्ल्यावाचूनच ठरवून आम्हावर तसे वागण्याविषयी अन्यायाने सक्ती केली. हे सर्व आपल्या कर्तव्यकर्माची हयगय केल्याची फळे आपण भोगीत आहोत आणि आपणच आपल्या पायावर धोंडा मारून घेतला आहे. आपले माणुसकी रूपी धन दुसऱ्यांनी हरण केले, त्यांना योग्य वेळीच शिक्षा केली असती तर आज आपल्या लोकात दृष्टीस पडत असलेली अत्यंत शोचनीय व नीच अवस्था आपणास कधीही प्राप्त झाली नसती; व या सुवर्णभूमीत अन्नान्नगत होऊन लाजिरवाण्या तोंडाने दुसऱ्याची याचना करण्याचाही प्रसंग आपणावर कधी आला नसता. परंतु अन्यायाचा प्रतिकार करण्यास सज्ज होण्याऐवजी आम्ही जुन्या चालीरीतीस कवटाळून अगदी खंगत चाललो आहोत. आमच्यात काही प्राण उरला नाही, आम्ही निस्तेज झालो आहोत. असे होण्याचे कारण हेच की मुलांच्या संबंधाने आईबापांची कर्तव्यकर्मे काय आहेत, याकडे आपल्या लोकानी पाहिजे तितके लक्ष पुरविले नाही. नसत्या जबाबदाऱ्या आपल्या डोक्यावर घेतल्यामुळे व त्या हव्या तशा हातून न वठल्यामुळे आपल्यातील आईबाप मुलांच्या नाशास कारणीभूत होतात. आपल्यात बापाने मुलाचे लग्न केलेच पाहिजे ही नसत्या जबाबदारीपैकी एक जबाबदारी आहे. लग्न करून संसाराची जमवाजमव होते न होते तो इकडे मुलांची परंपरा सुरू झालीच. चारपाच वर्षात एक दोन पोरे जयदत्त म्हणून पुढे उभी ! ती वाढली न वाढली तो त्यांची नवीन भावंडे त्यांच्या पाठीवर पाय देऊन आली ! पहिल्यांची लग्ने होत आहेत नाहीत तो मागल्यांची येऊन ठेपली. मग पोरांच्या पोरांची काळजी ! हा प्रकार वरिष्ठ लोकातही आहे, पण याचे अनिष्ट परिणाम जितके आमच्या लोकास भोवतात तितके ते त्याना भोवत नाहीत. याचे कारण असे की जरी ते लोक लग्न करण्याचे काम आपल्या शिरावर घेतात तरी त्याबरोबर जेणेकरून मुलगा स्वावलंबी व त्याच्यावर लादलेला प्रपंच आणि त्याच्यावर येणारी प्रजोत्पादनाची व पालनाची जोखीम घेण्यास सामर्थ्यवान होईल, अशाप्रकारचे शिक्षण त्यास देण्याची काळजी घेतात. आमच्यातील लोक मुलांचे लग्न करून देण्यापलीकडे काही करीत नाहीत. एकतर कर्ज काढून लग्न करावयाचे. मुलगा अडाणी

असल्यामुळे व त्यास स्वतंत्रपणे कमाई करण्याची धमक नसल्यामुळे आधीच तो कर्जाखाली चेंगरून जातो व त्याचा प्रपंच त्याला भागत नाही. इतक्यात त्याला मुले झाली म्हणजे तो आणखी एक भार त्याच्यावर पडतो. त्यांना शिक्षण देऊन आपल्यापेक्षा चांगल्या स्थितीत आणण्यास जवळ ऐपत नसते. इकडे त्याचा प्रपंच वाढत चालल्याने आपल्या उत्पन्नात भर पडावी म्हणून आपल्या मुलांना त्यांच्या अज्ञानी व अडाणी स्थितीत कोठेतरी तो उद्योगास लावतो व त्याच्या कमाईवर आपला संसार चालवितो. लग्नाच्या फेऱ्यात सापडल्यामुळे बाप बुडत असतो. पण तो काही शहाणपणा शिकत नाही. उलट तो आपल्या मुलांस त्याच गर्तेत लोटून देऊन साफ बुडवितो !

ज्याप्रमाणे आपल्यातले आईबाप मुलांचे नुकसान करतात त्याचप्रमाणे ते मुलींचेही मातेरे करतात. मुलांचे लहानपणी लग्न केल्यामुळे जे समाजाचे नुकसान होते त्यापेक्षाही जास्त मुलींना मुरळी सोडल्याने होते. हिंदू देवांना लहान मुली वाहण्याचा जो चमत्कारिक प्रघात या देशात पुरातन काळापासून चालत आहे, त्याचा फैलाव काही भागातील आमच्या लोकात विशेष जोराचा आहे. पूर्वी कदाचित ही चाल सद्‌भावना प्रेरित असेल. पण हल्लीच्या काळी देवाची दासी म्हणजे विश्वाची योषिता, हेच खरे आहे. हिने आपला देह विकून आपल्या नातेवाईकांची पोटे भरावी ! हा मुरळी सोडण्याचा प्रकार जेथे चालू आहे तेथे त्याच्या पाळया-मुळया इतक्या खोल गेल्या आहेत की या चालीला बळी पडलेले लोक कायद्याला सुद्धा जुमानीत नाहीत. हे लोक केवळ आपल्या मुलींचेच हितशत्रू नाहीत तर ते समाजाचेही शत्रू आहेत. कारण यांच्या करणीचा प्रत्यक्ष आघात समाजाची आद्यव्यवस्था म्हणजे कौटुंबिक व्यवस्था हिच्यावर होतो. एक पत्नी व एक पती हीच कौटुंबिक पद्धत रास्त आहे. कुटुंब म्हणजे आपल्या प्रजेचे संरक्षण व संगोपन करण्यास समाजाने स्थापन केलेली एक संस्था आहे. ही संस्था चालविणारी दांपत्ये जितकी जास्त शुद्ध, सात्त्विक व अभिमानी असतील तितकीच त्यापासून निपजणारी संतती शुद्ध, सात्त्विक व अभिमानी असू शकेल. एका बाईने पुष्कळ नवरे करावेत किंवा एका पुरुषाने पुष्कळ बायका कराव्यात, ही कौटुंबिक पद्धत फार अप्रशस्त आहे.

आपण जे आज मानसिक दौर्बल्यामुळे इतरांचे गुलाम बनलो आहोत, याचे कारण हेच की ज्यांचे हाती आपले भवितव्य ईश्वराने दिले आहे त्यांना त्यांच्या आद्यकर्तव्याची ओळख नाही. ती ओळख जर त्यांना असती तर आपली स्थिती हीन दीन झाली नसती. आपणाला लोक गुलामाप्रमाणे वागवितात, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. पण आपले कर्तव्यशून्य आईबाप मागचा पुढचा विचार न करता बेसुमार मुले जन्मास आणून हा गुलामांचा बाजार मांडून ठेवतात. ही किती अनर्थाची गोष्ट आहे !

सज्जनहो ! आपण म्हणतो आपली स्थिती फार वाईट आहे, लोक आपणाला फार अन्यायाने वागवितात. या सर्व गोष्टी खऱ्या; पण या अन्यायाचा परिहार व्हावा कसा ? तुम्हाला कबूल करावे लागेल की एकदा लादलेल्या वर्चस्वाचा पेच सुटण्यास योग्य उपाय म्हटला म्हणजे ज्यांना त्या पेचाने रग लागली असेल त्यांनी शहाणपण शिकावे आणि सामर्थ्य संपादावे व दिवसाउजेडी प्रतिपक्षाशी सामना करून, त्यांच्या वरचढ होऊन त्यांच्या हातून निसटून जावे अशा प्रकारचे शहाणपण व सामर्थ्य आम्हास कसे व केव्हा प्राप्त होणार ? ज्या कारणामुळे आपल्यात शहाणपण व सामर्थ्य नाहीं ती सर्वच काही वरिष्ठांच्या दडपणामुळे उत्पन्न झालेली नाहीत आणि यदाकदाचित तसेही असले तरी त्यातील काहीचा परिहार आपल्या हाती नाही असे नाही. आपल्या लोकांना जितक्या हलक्या प्रतीचे अन्न खावे लागते तितके दुसऱ्या कोणास खावे लागत नसेल ! पण याबद्दल आपल्या लोकांनी केव्हातरी तक्रार केली आहे काय ? उलट गावातून तुकडे मागून आणण्यात आपल्यातील किती एक लोक केवढा मोठा अभिमान बाळगतात. इतर लोक चांगला पोषाख घालून फिरतात. आपल्या लोकास एक पंचा, एक घोंगडे आणि जाडे भरडे पाच पन्नास हात मुंडासे यापेक्षा जास्त काही प्राप्त होत नाही; पण या दारिद्र्याबद्दल आपल्या लोकांनी केव्हा तरी आपली नाराजी व्यक्त केली आहे ? उलट मेलेल्या मुडद्यावरचे कफनाचे कपडे आणण्यास आमची नेहमीच तयारी असते. सरकार दरबार, कोर्ट कचेऱ्यात आम्हास आत घेत नाहीत; पण आमच्या लोकांनी आपले हक्क गेल्याबद्दल कधी जळफळ केली आहे ? उलट वरच्यापैकी कोणी एखाद्याने आमच्यातील माणुसकीला मान देऊन वर बसा म्हणून सांगितले, तरी ' सरकार मला जोड्यात वागवा ' असा आम्ही आग्रह धरतोच ! या मानसिक दौर्बल्यास आमचे आम्हीच कारणीभूत नाहीत काय ? आपल्यातील आईबापांनी आपल्या खऱ्या कर्तव्याला जागून, कर्ज काढून मुलांची लग्ने करून अगर मुलींना मुरळ्या करून त्यांच्या कमाईवर संसार चालविणे इत्यादी अक्षम्य गोष्टी सोडून देऊन जर त्यांना ज्ञानसंपन्न केले तर आपली अशी स्थिती राहील काय ? ह्या गोष्टी करणे आपल्या हाती नाही काय ? त्या जर आपण अंमलात आणू लागलो तर आपणाला कोणी आडवा येईल काय ?

सज्जनहो ! सदोदित जुने ते सोने म्हणून चालणार नाही. वडिलांनी जे केले तेच त्याच्या मुलांनी करावे, हा शिरस्ता काही रास्त नाही. वस्तुस्थिती बदलल्याबरोबर आचार विचार पालटणे आवश्यक असते. तसे जर आपण केले नाही तर आपल्या परिस्थितीशी टक्कर देण्यास आपण केव्हाही समर्थ होणार नाही. नुसती काळावर भिस्त ठेवून चालणे हितावह होणार नाही. कालगती बरोबर आपल्या हातून होईल तेवढे कार्य करणे अवश्य आहे.

तसे जर आपण केले नाही तर काळ बदलेल पण आपल्या स्थितीत मात्र बदल होणार नाही. विधायक कार्य केल्याशिवाय इतका वेळ गेला आहे की जास्त वेळ जाऊ देणे हे आपल्या बऱ्याचे होणार नाही. या प्रांतातील आपल्या लोकात शिक्षणाचा फारसा प्रसार झालेला नाही. त्याचप्रमाणे तंबाखूचा या प्रांतातील बहुतेक सर्व व्यापार आपल्यातील लोकांच्या हाती आहे व तो इतका आहे की दरेकाने मोठ्या पाटीस आठ आणे दिले तर दरसाल पाच सहा हजार रुपये मिळू शकतील. हा योग जर साधून आला तर या प्रांतात पंधरा, वीस मुलांचे बोर्डिंग उत्तमप्रकारे चालू शकेल असे मी ऐकतो. ही सूचना आपल्यातील स्थानिक पुढाऱ्यांनी ध्यानात घ्यावी अशी माझी त्यांना आग्रहाची विनंती आहे. जर त्यांनी विनंतीस मान दिला तर तुम्ही परिषद भरविल्याचे व मी आल्याचे सार्थक झालेसे होईल.



६

# मी माझ्या आंधळ्या जनतेची काठी आहे

सातारा जिल्हा महार परिषदेचे अधिवेशन रहिमतपूर, ता. कोरेगाव, जि. सातारा येथे १९२६ च्या मे महिन्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. डॉ. आंबेडकर मुंबईहून रहिमतपूरला आले व महारवाड्यातील तक्क्यात मुक्काम ठोकून राहिले. शिवतरकर, वनमाळी, गायकवाड, खोलवडीकर, खंडकर, जावळे इत्यादी मुंबईची मंडळी, कृष्णराव कदम, मा. सा. गायकवाड, जनार्दन रणपिसे, धर्माजी सावंत वगैरे पुण्याचे लोक आणि फलटणचे माधवराव अहिवले वगैरे सातारा जिल्ह्यातील लोक अधिवेशनासाठी आले होते. अधिवेशनाला दुपारी ३ वाजता सुरवात झाली, त्यावेळी सातारा जिल्ह्यातील प्रमुख व्यक्ती धनजीभाई कूपर, एज्युकेशनल ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर, सीताराम रामजी तावडे, मामलेदार दुदुस्कर, रामचंद्र ग. सोमण, वकील वगैरे अधिवेशनास हजर राहिले होते. बहिष्कृत वर्गातील योग्य इसमास जे. पी. करावे असा एक ठराव होता. या ठरावाला सोमणांनी विरोध केला. देशात स्वातंत्र्य मिळविण्याची चळवळ चालली आहे आणि बहिष्कृतवर्ग सरकारने पदव्या व किताब आम्हाला द्यावेत अशी विनंती करून देशाच्या गुलामगिरीला पाठिंबा देत आहे, हे ठीक नव्हे, असा त्यांच्या विरोधी भाषणाचा सारांश होता. सोमणांचे भाषण संपताच साहेब ताडकन उठले, त्यांचा चेहरा रागाने लालबुंद झाला होता. ते आपल्या अध्यक्षीय भाषणात म्हणाले,

हिंदू समाजातील पांढरपेशे लोक आणि विशेषतः ब्राह्मण लोक यांनी आपल्या देशबांधवांना धर्माच्या नावाने आपल्या पायाखाली चेपून ठेवले व हेच लोक हिंदू, मुसलमान आणि इंग्रज राज्यकर्त्यांचे पाय चाटून ऐषारामी जीवन जगत आले. याच लोकांनी स्वार्थांधपणे आपल्या धर्मबांधवांना व देशबांधवांना परक्याच्या व स्वतःच्या गुलामगिरीत डांबून ठेवले व ही गुलामगिरी त्यांनीच पाचशे वर्षे टिकवून ठेवली आणि आता हेच लोक राजकीय गुलामगिरीविरुद्ध बकवा करीत आहेत. हेच लोक कॉंग्रेसच्या झेंड्याखाली जमा होऊन राजकीय स्वातंत्र्य मिळविण्यासाठी देहदंड सोसण्यास तयार आहेत. हेच लोक अस्पृश्यांना सामाजिक व धार्मिक समता देण्यास तयार नाहीत. या लोकांनी संपूर्ण देशाचा व जनतेचा सर्वतोपरीने सत्यानाश केला आहे. या माझ्या विधानाची कोणाला ऐतिहासिक माहिती हवी असेल तर ती मी देण्यास तयार आहे. माझे हे म्हणणे खोटे आहे असे येथे कोणाला सांगावयाचे असेल तर त्याने ते सांगावे. ते मी खोडून काढण्यास तयार आहे. अस्पृश्यांच्या हातात सत्ता द

डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड २, पृ. १४९-५०-५१.

संपत्ती जसजशी अधिक येत जाईल तसतशी त्यांची प्रगती होत जाईल. जे. पी. होणे किंवा आमदार होणे ही प्रगती घडवून आणण्याची साधने होत व ती आम्ही हाती घेतलीच पाहिजेत. ती तुम्ही घेऊ नका असे सोमणांसारखे जे लोक म्हणतात ते आमच्या लोकांचा बुद्धिभेद करून त्यांना आहे त्याच गुलामी परिस्थितीत ठेवण्याचा डाव खेळत आहेत. सोमणांच्या जातभाईंनी गेल्या पाच हजार वर्षात ब्राह्मणेतरांचा व अस्पृश्यांचा अनेक युक्त्या योजून छळ केला. तुम्हाला धार्मिक हक्क नाहीत, ब्राह्मणांपेक्षा तुम्ही नीच आहात असे त्यांच्या जातभाईंनी पुराणादी धर्मशास्त्रात लिहून त्याची अंमलबजावणी राज्यकर्त्यांकडून करविली. आता ते म्हणतात, '' देशाभिमान हा फक्त ब्राह्मणांचाच सद्‌गुण आहे. म्हणून ब्राह्मण लोक देशासाठी तुरुंगवास, देहदंड व सुळावरची शिक्षा सोसत आलेले आहेत.'' ब्राह्मणेतर व अस्पृश्य शिक्षा सहन करण्यास पुढे येऊ लागले तर हेच ब्राह्मण लोक म्हणतील : ' तुम्हाला राजकारण समजत नाही.' सरकारी नोकऱ्यातील बहुतेक सर्व मोक्याची ठिकाणे ब्राह्मणांच्या हातात आहेत. ती ठिकाणे ब्राह्मणेतर व अस्पृश्य हस्तगत करण्याची तयारी करू लागले की हे ब्राह्मण म्हणतील की या जागा भूषविण्यास तुम्ही लायक (एफिशिएंट) नाही. सांगण्याचा हेतू असा की धर्म, राजकारण, इत्यादी गोष्टीतही आम्हीच काय ते श्रेष्ठ व बाकीचे सर्व कनिष्ठ असे समजून आतापर्यंत ब्राह्मण वागत आलेले आहेत. त्यामुळे त्यांच्यात मानसिक माजोरीपणा आणि बौद्धिक व्यभिचारीपणा आलेला आहे. ब्राह्मणेतर समाज व अस्पृश्य समाज हे आतापर्यंत ब्राह्मणांच्या या मानसिक माजोरीपणाला व बौद्धिक व्यभिचाराला भिऊन त्यांचे गुलाम म्हणून गुपचुपपणे वागत आलेले आहेत. परंतु या दोन्ही समाजांना आपली चूक कळून आलेली आहे आणि हे दोन्ही समाज एकत्र होऊन जर आत्मप्रगतीची चळवळ चालवतील तर ते या पांढरपेशा समाजाच्या गुलामगिरीतून लवकरच मुक्त होतील. परंतु हे घडणे फारच दुरापास्त आहे. कारण मराठे वगैरे लोक सत्यशोधक विचारांच्या कितीही वल्गना मारीत असले तरी ते अद्याप मनाने व बुद्धीने ब्राह्मणी विचारसरणीचे बंदे गुलाम आहेत. आमचा अस्पृश्य समाज मराठे वगैरे लोकांच्या तोंडाकडे पाहत बसलेला आहे. या समाजाला माझे नेहमी हेच सांगणे आहे की तुम्ही कोणाचीही गुलामगिरी मानू नका. मी मनाने व बुद्धीने ब्राह्मणांच्या गुलामगिरीतून मुक्त झालो आहे. मी त्या जातीचे बारसे जेवून बसलेलो आहे. ही जात सर्वत्र आपले वर्चस्व राहावे म्हणून जनतेची नेहमी दिशाभूल करीत असते. तिच्या बौद्धिक लबाड्या चव्हाट्यावर मांडून अस्पृश्यांना या लोकांपासून दूर ठेवणे हे मी माझे कर्तव्य समजतो. कारण, मी माझ्या आंधळ्या जनतेच्या हातातील काठी आहे. या काठीच्या आधारे माझी जनता प्रगतीची वाट चालू लागली तर ती सोमणांसारख्या भोंदू व भेदक लोकांनी तयार केलेल्या खड्ड्यात पडणार नाही.

● ● ●

# जागृतीचा विस्तव कधीही विझू देऊ नका

" कुलाबा जिल्हा बहिष्कृत परिषदेची बैठक मुक्काम महाड येथील सि. प्रा. ना. मंडळाच्या नाटकगृहात मार्च १९२७ ला शनिवार ता. १९ व रविवार ता. २० रोजी भरली होती. परिषदेत एकंदरीत ३,००० वर अस्पृश्य लोकांचा जमाव जमला होता. परिषदेस पुष्कळ प्रतिष्ठित मंडळी होती. त्यात मेसर्स गं. नि. सहस्त्रबुद्धे, अनंत विनायक चित्रे, सिताराम नामदेव शिवतरकर, बाळाराम आंबेडकर, पांडुरंग नथुराम राजभोज, शांताराम अनाजी उपशाम, मोरे, रामचंद्र शिंदे, धोंडीराम नारायण गायकवाड, शिवराम गोपाळ जाधव वगैरे बहिष्कृत वर्गापैकी मंडळी हजर होती. परिषदेच्या कामास ता. १९ रोजी संध्याकाळी ५ वाजून गेल्यावर सुरवात झाली. आरंभी परिषदेचे स्वागताध्यक्ष संभाजी तुकाराम गायकवाड यांनी आलेल्या मंडळीचे स्वागत करून परिषद भरविण्याचा हेतू थोडक्यात सांगितला. नंतर नियमाप्रमाणे सूचना व अनुमोदन मिळाल्यावर परिषदेचे नियोजित अध्यक्ष डॉ. भीमराव रामजी आंबेडकर, एम.ए., पीएच.डी., डी.एससी.,बारॲट-लॉ. हे स्थानापन्न झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

सद्‌गृहस्थ हो!

आज आपण जो माझा गौरव केला त्याबद्दल मी आपला अत्यंत ऋणी आहे. या परिषदेचे अध्यक्षस्थान मी स्वीकारावे अशी जेव्हा मागणी मजकडे करण्यात आली त्यावेळी माझ्या नेहमीच्या स्वभावास अनुसरून मी ती टाळण्याच्या विचारात होतो. परंतु ती मला टाळता येणार नाही व टाळल्यास जनक्षोभ होईल असे जाणून मी ना-नु न करिता स्वसंतोषाने ती जबाबदारी स्वीकारली व तद्‌नुसार मी आज आपणापुढे उभा आहे.

सद्‌गृहस्थ हो! आज येथे येण्यास मला एकपरी अती आनंद होतो. ज्याला त्याला आपापल्या मूळ स्थानाबद्दल अभिमान जरी नसला तरी प्रेम हे असतेच. माझे वडील पेन्शन घेतल्यानंतर कायमचे वास्तव्य करावे या हेतूने दापोलीस येऊन राहिले. माझा पहिला श्रीगणेशाचा धडा मी दापोलीच्या शाळेत शिकलो. परंतु परिस्थितीमुळे मी पाच सहा वर्षाचा असताना घाटाचा पायथा सोडल्या नंतर घाटमाथ्यावर माझे आजपर्यंतचे जीवित गेले. आज २५ वर्षांनी मी घाटाच्या खाली उतरत आहे. जो प्रदेश सृष्टीने आपल्या सौंदर्याने श्रृंगारला

आहे त्या प्रदेशात पाऊल टाकल्याने कोणालाही आनंदच वाटणार आहे. ज्याला तो प्रदेश आपली मायभूमी म्हणून जिव्हाळ्याचा आहे असे वाटते त्याचा आनंद द्विगुणित झाला तर त्यात काही नवल नाही. परंतु आजच्या प्रसंगी मला जितका आनंद होतो तितकाच खेदही होतो असे म्हटल्याशिवाय माझ्याने राहवत नाही. एकदा स्थिती अशी होती की हा प्रदेश अस्पृश्य जातीच्या दृष्टीने पाहता फारच पुढे गेलेला होता असे म्हणण्यास काहीच हरकत नाही. एकेकाळी अस्पृश्य जातीतील अधिकारी मंडळीने हा प्रदेश अगदी गजबजून गेला होता. त्याचप्रमाणे पांढरपेशे लोक खेरीज करून बाकीच्या वर्गाच्या तुलनेने पाहता अस्पृश्य वर्गच शिक्षणात पुढारलेला होता.

ही उन्नती ज्या कारणामुळे झाली त्यात लष्करीपेशा हे एक महत्त्वाचे कारण होते. ब्रिटिश सरकारचा अंमल चालू होण्यापूर्वी अस्पृश्य लोकास नशीब काढण्यास किती वाव होता, याबद्दल आज काही नक्की सांगता येत नाही. परंतु त्याकाळी स्पृश्यास्पृश्यतेच्या भावना इतक्या तीव्र होत्या की अस्पृश्यांना चालताना स्पृश्यावर सावली पडेल म्हणून वळसा घेऊन जावे लागत असे, थुंकीने रस्ता विटाळेल म्हणून गळयात गाडगे अडकवून हिंडावे लागत असे व ओळख पटावी म्हणून हाताला काळा दोरा बांधावा लागत असे. त्याकाळी वाव असला तरी अगदीच थोडा असला पाहिजे. इंग्रज लोकांनी जेव्हा या देशात आपले पाऊल ठेवले तेव्हा कोठे या प्रांतातील अस्पृश्य लोकाना डोके वर काढण्यास संधी मिळाली. त्या संधीचा फायदा घेऊन त्यांनी आपल्या अंगी किती शौर्य आहे, किती तेज आहे व त्यांची बुद्धीमत्ता किती वरच्या दर्जाची आहे हे सिद्ध करून दिले. याचा पुरावा जर पाहिजे असेल तर जुनी आर्मिलिस्टाची बाडे चाळून पाहिली म्हणजे बस्स होईल. या प्रांतातील अस्पृश्य वर्गात किती सुभेदार झाले, किती जमादार झाले, किती हवालदार झाले, नार्मल स्कूल सारख्या शाळातून पास होऊन किती हेडमास्तरांच्या हुद्यावर चढले, एजुटंट क्लार्क व क्वार्टर मास्तर क्लार्क सारख्या जबाबदारीच्या जागा कितीकांनी चालवून दाखविल्या याचा तपशील जर देऊ गेलो तर हे भाषण मर्यादेचे बाहेर वाढेल. इतके सांगितले म्हणजे पुरे आहे की, एकेकाळी जो अस्पृश्य वर्ग सेवक म्हणून नांदत होता तोच वर्ग पलटणीतील नोकरीमुळे अधिकार संपन्न होऊन दुसऱ्या वर्गावर सत्ता गाजविता झाला होता. या पलटणीतील नोकरीमुळे हिंदुसमाजाच्या रचनेत एक क्रांती झाली होती असे म्हणण्यास काहीच हरकत नाही. ज्या महार, चांभार लोकांना गावात मराठे वगैरे लोक शिवून घेत नसत व ज्यांनी जोहार किंवा रामराम केला नाही तर मराठे लोक आपला अपमान झाला असे समजत तेच मराठा शिपाई महार व चांभार सुभेदारास लवून सलामी देत असत व '' क्यु, बे '' म्हणून जर त्यांनी म्हटले तर डोळे वर करून बघण्याची त्यांची ताकद होत नसे. एवढा अधिकार

अस्पृश्य जातीतील लोकास या देशातील कोणत्याही प्रांतात यापूर्वी केव्हाही प्राप्त झाला नव्हता असे म्हणता येईल. या प्रांतातील अस्पृश्य लोकांनी आपला दर्जा वाढविला होता इतकेच नव्हे तर त्यांची शिक्षणातही विलक्षण प्रगती झाली होती. त्यांच्यातील ९० टक्के लोक साक्षर होते, इतकेच नव्हे तर ५० टक्के लोक तरी वरच्या दर्जाचे सुशिक्षित होते. त्यातल्यात्यात विशेष ध्यानात ठेवण्यासारखी गोष्ट ही की हा शिक्षणाचा प्रसार पुरुष मंडळीत होता इतकेच नव्हे तर स्त्रियांतही होता. काही स्त्रिया तर शिक्षणात इतक्या प्रवीण होत्या की भर पुरुषाच्या सभेत पुराणाचा अन्वयार्थ करून सांगत असत. या शिक्षणातील प्रगतीला त्यांचा लष्करीपेशा बऱ्याच अंशी कारणीभूत झाला.

इंग्रजी राज्यास सुरवात होऊन १५० वर्षे होऊन गेली असता देखील प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत करण्यात येत नाही, याबद्दल खेद वाटून ते आता तरी सुरु करा असे जे लोक म्हणतात त्यांना एक गोष्ट ठाऊक नाही असे दिसते. ईस्ट इंडिया कंपनीला शिक्षणप्रेमी लोक नेहमी दोष देतात की, कंपनीने राज्य चालविताना आपल्या फायद्याकडे काय ते लक्ष दिले, लोकांच्या शिक्षणाकडे काहीच लक्ष दिले नाही. ही गोष्ट सर्वस्वी खरी नाही. निदान कंपनीच्या मिलटरी खात्यापुरती तरी ही गोष्ट साफ खोटी आहे. ज्यांनी ज्यांनी म्हणून मिलिटरीत पिढ्यान पिढ्या नोकरी केली आहे ते ग्वाही देऊ शकतील की कंपनीच्या अमदानीत प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचे होते. प्राथमिक शिक्षण मुलांस व त्याचप्रमाणे मुलींसही सारख्याच रितीने लागू केले जात असे. मुलास प्राथमिक शिक्षणाशिवाय खालच्या दर्जाचे दुय्यम शिक्षणही सक्तीने लागू केले जात असे. सक्तीचा प्रकार काही साधा व सोपा नव्हता. मूल शाळेत न गेले तर पालकास दंड देऊन सुटता येत नसे. विशेष ध्यानात घेण्यासारखी गोष्ट ही सक्ती बालक वर्गापुरती नसे. नवीन भरती झालेले वयातील रिक्रूट यांनाही रात्रीच्या शाळेत जाण्यास सक्ती करण्यात येत असे. कंपनीचे राज्य संपुष्टात आल्यानंतर बादशाही अंमल सुरू झाला व सत्तावन सालचे बंड मोडल्यानंतर जेव्हा इंग्रज सरकारने हिंदुस्थानातील सैन्यासंबंधी चौकशी करण्याकरिता एक कमिशन नेमिले होते, त्यात काही साक्षीदारांनी सैन्यात शिक्षणाचा प्रसार झाला तर अनर्थ ओढवेल असे प्रलाप काढले. त्यास भिऊन मिलटरी खात्यात जारी असलेल्या शिक्षणाकडे प्रथमतः दुर्लक्ष करण्यात आले व शेवटी शेवटी त्याचा अगदी बिमोड करण्यात आला. ते कसेही असो, जोपर्यंत ते शिक्षण जारी होते तोपर्यंत अस्पृश्य वर्गाचा अतोनात फायदा झाला होता. या शिक्षणाचा उपयोग त्यांनी अशा उत्तम तऱ्हेने केला की त्यांच्याबद्दल स्वाभिमान वाटल्यावाचून राहणार नाही. या ज्ञानप्रसारामुळे अस्पृश्यात जो ग्रंथसंग्रह

झाला तो त्यांच्या संख्येच्या मानाने अफाट होता असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. श्रीधर स्वामीच्या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती तर गाड्याने सापडतील. परंतु मुकुंदराज, ज्ञानेश्वर व मुक्तेश्वर, इत्यादि महाराष्ट्रातील जुनाट व महान कवींच्या ग्रंथांच्या हस्तलिखीत प्रती मी अनेक अस्पृश्यांच्या संग्रही पाहिल्या आहेत. इतकेच नव्हे तर अस्पृश्यांच्या घरी काही दुर्मिळ अशा ग्रंथाच्या प्रती सापडतील अशी माझी खात्री आहे. ज्ञानेश्वर महाराजांनी पंचीकरण नावाचा एक ग्रंथ लिहिला होता. ही गोष्ट फारशी ऐकिवात नाही पण हा ग्रंथ मी एका माझ्या आता दिवंगत झालेल्या मित्राच्या घरी पाहिलेला आहे. काही वर्षापूर्वी श्री. पांगारकर यांनी राघवचित्तघन या कवीने लिहिलेला ''ज्ञानसुधा'' नावाचा ग्रंथ कोणाजवळ असल्यास कळवावे अशी केसरीत जाहिरात दिली होती. या ग्रंथाची हस्तलिखित प्रत त्यांना सापडली नसल्यास त्यांना ती माझ्या एका अस्पृश्य मित्राच्या संग्रही पाहावयास सापडेल. ज्या अस्पृश्य जातीच्या लोकास ज्या काळी विद्येची सर्व दारे बंद होती त्यावेळी त्यांना असा ग्रंथसंग्रह करण्यास किती सायास पडले असतील व किती द्रव्याचा व्यय करावा लागला असेल, याचा विचार ज्याचा त्यांनीच करावा. ही ज्ञानाची लालसा त्यावेळच्या समाजास भूषणावह आहे, याबद्दल दुमत होणे शक्य नाही. दुसऱ्या तऱ्हेने पाहता, त्या काळच्या लोकांनी आपल्या ज्ञानाचा उपयोग योग्यप्रकारे केला असे दिसून येईल. सार्वजनिक व्यवसायात पडणाऱ्या लोकांचे वर्गीकरण केले तर असे आढळून येईल की काही ''नामके वास्ते'' तर काही ''कामके वास्ते'' म्हणून सार्वजनिक कार्यात पडतात. आणि जे पडतात त्यात ' नामके वास्ते ' अशांचाच भरणा जास्त असतो. हल्ली अस्पृश्यांची जी चालक मंडळी आहे त्यातही नामके वास्ते लोकांचा काही कमी भरणा नाही. पुण्यातले लोक म्हणतात की, अस्पृश्यातील जागृतीचे मूळ उत्पादक आम्ही आहोत. मुंबईतही हा मान सर्वस्वी आमचा आहे असे म्हणणारे काही लोकप्रिय लोक आहेत. डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी, भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळीच्या काही चालकांचे असे म्हणणे आहे की, अस्पृश्यातील जागृती ही आमच्यापासून सुरु झाली आहे. जे लोक अशा तऱ्हेने ओढून मान मागतात त्यांना अस्पृश्योन्नतीच्या चळवळीचा खरा इतिहास अवगत नाही असेच म्हटले पाहिजे. मुंबई इलाख्यातील अस्पृश्य समाजात सार्वजनिक काम करण्याकरिता ज्या संस्था कालांतराने स्थापन झाल्या त्यात ' अनार्य दोष परिहारक मंडळी ' ही पहिली संस्था आहे असे संशोधनाअंती दिसून येईल. १८९३ साली जेव्हा अस्पृश्य लोकांना लष्करात भरती होण्याची बंदी झाली त्यावेळी याच संस्थेने प. वा. महादेव गोविंद रानडे यांच्या सहाय्याने सरकारकडे एक मोठा अर्ज केला होता. यावरुन या संस्थेची सल्लामसलत मोठमोठ्या लोकांशी होत असे हे उघड आहे. १८९७ साली कॉंग्रेसला उद्देशून

याच संस्थेने एक प्रश्नमालिका तयार केली होती; तीत सामाजिक सुधारणा केल्याशिवाय तुम्हाला राजकीय सुधारणा मागण्याचा काय अधिकार आहे, असा पक्ष मांडला होता. यावरून संस्थेत किती जोम होता हे दिसून येते. १८९८ साली सर हरबर्ट रिसले साहेबांनी जेव्हा हिंदी लोकांच्या रितीरिवाजाची संकलित माहिती गोळा करण्याचे काम सुरू केले होते त्यावेळी सदर साहेबांनी आपल्या प्रश्नांची यादी या संस्थेकडेही पाठविली होती यावरून संस्थेस सरकारकडून विचारपूस करण्याइतक्या महत्त्वाची ही संस्था होती हे स्पष्ट होते. हे सर्व मी पुराव्यानिशी सांगू शकतो; कारण या संस्थेचे सर्व कागदपत्र हल्ली माझ्या ताब्यात आहेत. परंतु ही सभा रत्नागिरी जिल्ह्यात दापोली येथे स्थापन झाली, त्यावरून उघड आहे की अस्पृश्योन्नतीची चळवळ प्रथम सुरु केल्याचा मान जर कोणास द्यावयाचा झाला तर तो या संस्थेस आणि या प्रांतास देणे प्राप्त आहे. या संस्थेच्या चालकांनी संस्थेच्या मार्फत फक्त अडचणी दूर करण्याचे काम केले असे नाही. लेखनाद्वारे जागृती करण्याचे कामही त्यांनी पुष्कळच केले. सत्यशोधक समाजाचे अध्वर्यू जोतीबा फुले यांचे खरे साथीदार व उत्साही शिष्यांपैकी बरेचसे या संस्थेच्या चालकांपैकी होते. एकाच्या नावाचा उल्लेख केल्याशिवाय माझ्याने राहवत नाही ते गृहस्थ म्हणजे कै. गोपाळबुवा वलंगकर हे होत. त्यांनी आपल्या लेखनाद्वारे जी जागृती केली ती अनुपम आहे. ज्यांना ती पाहावयाची असेल त्यांनी 'दीनबंधु' च्या जुन्या फाईली वाचून पाहाव्यात म्हणजे कळेल.

अशी ज्या लोकांची ऐकेकाळी उन्नत स्थिती होती त्या लोकांची आजची स्थिती किती अवनत झाली आहे? तारतम्य दृष्टीने जर पाहू गेलो तर या प्रदेशातील अस्पृश्य वर्गाची स्थिती इतकी खालावली आहे की, त्यांच्याइतके दरिद्री, अशिक्षित व मूढ लोक इतर प्रदेशातील अस्पृश्य वर्गात नाहीत असे म्हणण्यास काहीच प्रत्यवाय नाही. या प्रांतातील अस्पृश्य वर्गाच्या स्थितीत असा खेदकारक व शोचनीय फेरफार कसा झाला; हा एक गूढ प्रश्न आहे. याचे नेहमी देण्यात येणारे उत्तर असे आहे की, ब्रिटिश सरकारने अस्पृश्यांची लष्करात भरती करण्याचे बंद केल्यापासून हा अनर्थ ओढवला आहे, या म्हणण्यात पुष्कळसा खरेपणा आहे याबद्दल मला मुळीच शंका नाही. राजकीयदृष्ट्या, नैतिकदृष्ट्या अथवा आर्थिकदृष्ट्या कोणत्याही प्रजाजनास सरकारी नोकरीत बंदी करणे अन्यायाचे आहे. अस्पृश्य समाजातील लोकास लष्कर भरतीतून बंद करणे हे पक्षपातीपणाचे लक्षण तर आहेच पण हे विश्वासघाताचे त्याचप्रमाणे मित्रद्रोहाचेही लक्षण आहे असे म्हणावे लागते. अस्पृश्यांच्या सहाय्याशिवाय ब्रिटिश सरकारचा या देशात केव्हाच प्रवेश झाला नसता, मराठेशाहीचे उच्चाटन इंग्रजांना कसे करता आले याची इतिहास संशोधकांकडून अनेक कारणे देण्यात येतात. कोणी मराठेशाहीत माजलेला जातीभेद हे एक कारण देतात; कोणी मराठेशाहीत

आपापसात वाढत असलेली तेढ व दुही हे कारण देतात. पण यापैकी एकही कारण खरे नाही असे माझ्या अल्पमतीस वाटते. मराठ्यांमध्ये जातीभेदामुळे किंवा दुहीमुळे दौर्बल्य वाढले होते तर इंग्रज लोक काय सामर्थ्यवान होते? खरे म्हटले असता ज्या काळी इंग्रजांनी हा देश काबीज करून घेतला त्यावेळी इंग्लंड देशाला नेपोलियनने ' दे माय धरणी ठाय ' करून सोडले होते. इतके की हिंदुस्थानात राज्य करीत असलेल्या त्यांच्या ईस्ट इंडिया कंपनीस त्यांना द्रव्यबलाची वा सैन्यबलाची मदत करणे अशक्य होते. उलटपक्षी नेपोलियनच्या तडाख्यातून सुटका करण्यासाठी ईस्ट इंडिया कंपनीपासून द्रव्यबलाची व सैन्यबलाची मागणी केली. हिंदुस्थानात इंग्रजांची अशी दुर्बल स्थिती असताना त्यांनी हा देश कसा काबीज केला याचा उलगडा मराठ्यात तेढ होती किंवा दुही होती या म्हणण्याने होत नाही. मला असे वाटते की याला समाधानकारक असे एकच उत्तर देता येईल, ते हेच की या देशात येऊन एतद्देशीय लोकांचे सैन्य जर इंग्रजांना उभारता आले नसते तर हा देश त्यांना केव्हाच पादाक्रांत करता आला नसता. यावर आमच्या दयाळू व न्यायप्रेमी इंग्रज सरकारास मी अशी सूचना करतो की त्यांनी आपणा स्वतःला असा प्रश्न विचारावा की या एतद्देशीय सैन्यात कोणाचा भरणा होता? व ते जर आपले जुने दप्तर तपासून पाहतील तर त्यांना दिसून येईल की या त्यांच्या सैन्यात अस्पृश्यांशिवाय दुसरे कोणीही नव्हते. तेव्हा हे उघड आहे की, अस्पृश्यांचे बळ जर इंग्रजांच्या पाठीमागे नसते तर हा देश त्यांना केव्हाच काबीज करता आला नसता. ज्या लोकांनी सैन्यात भरती होऊन देश हस्तगत करून दिला त्याच लोकांची सैन्यातून हकालपट्टी व्हावी ही न्यायाची तऱ्हा मोठी मासलेवाईक आहे असे म्हणणे भाग आहे. इंग्रज लोक कसे कार्यसाधू लोक आहेत याचे दुसरेही एक उदाहरण नुकतेच घडलेले आपणा सर्वांस विदित असेलच. १९१७ साली सुरू झालेल्या महायुद्धाच्या प्रसंगी आमच्या सरकारला पुन्हा अस्पृश्यवर्गाची आठवण झाली. आमच्या अस्पृश्यवर्गाची पलटणीत शिरण्याची उत्सुकता नेहमीच अनावर असते. एका पलटणीपुरती मागणी होती पण दोन पलटणी होतील इतकी माणसे आपखुषीने तयार झाली. सरकारने एक पलटण उभी केली. एकदा झालेली बंदी उठवून पुन्हा लष्कर भरती सुरू झाली याबद्दल सर्वांनाच आनंद वाटला. या प्रांतातील अस्पृश्यांच्या भाग्योदयास पुन्हा प्रारंभ झाला अशी आशा वाटू लागली. परंतु लढाई संपल्यानंतर काटकसरीच्या नावाखाली पलटण कमी करण्यात आली! या सरकारच्या ताल बेताल वर्तनास काय म्हणावे हे समजत नाही ! सद्‌गृहस्थ हो! माझे असे मत आहे की, आम्ही सरकारला नेहमी अनुकूल असतो, म्हणूनच सरकार आमची नेहमी उपेक्षा करते. सरकार देईल ते घ्यावयाचे, सांगेल ते ऐकावयाचे, ठेवील तसे राहावयाचे अशी जी आमची दास्यत्त्वाची वृत्ती होऊन गेली आहे, तीच

सरकारकडून होत असलेल्या उपेक्षेचे मुख्य कारण आहे. आमच्यावर होत असलेला अन्याय आम्ही मुकाट्याने सहन करतो. उजव्या गालावर कोणी थप्पड मारल्यास आम्ही आपला डावा गाल पुढे करतो, पण मारणाऱ्याचा प्रतिकार करण्यास आमचा हात वर जात नाही. आकाश जरी कोसळले तरी आम्ही एखाद्या हवालदिलाप्रमाणे नशीब म्हणून स्वस्थ बसतो. ह्या आत्मघातकी वृत्तीचा आम्ही जितक्या लवकर त्याग करू तितके आपल्या फायद्याचे आहे. म्हणून मी आपणास असे सांगतो की, लष्कर भरतीची बंदी दूर करण्याचा आम्ही शक्य तेवढा प्रयत्न केलाच पाहिजे.

परंतु मी आपणापुढे जो प्रश्न मांडणार आहे तो असा की लष्कर भरती झाली तर सर्व कार्यभाग आटोपला काय? आपणातील बऱ्याच लोकांचा असा समज आहे की लष्कराची भरती एकदा मोकळी झाली म्हणजे सर्व काही झाले, बाकी काही करावयास नको. मला असे वाटते की ही चूक आहे. एक तर असे की सर्वच लोकांचा पलटणीत शिरकाव होणे शक्य नाही. जेव्हा पलटणीत राहण्यास कोणत्याच वर्गातले लोक तयार नव्हते तेव्हा आपल्या लोकांना मुबलक वाव होता, पण आता तशी स्थिती नाही. इतरांबरोबर आपणास जे मिळावयाचे तेवढेच मिळेल. जास्तीची आशा करणे निरर्थक आहे. यास्तव पलटणीशिवाय आपल्या उन्नतीसाठी कोणती इतर व्यवस्था करता येईल याबद्दल आपण विचार करावयास पाहिजे. अस्पृश्य समाजात धंदेवाईक जातीत समाविष्ट असलेले लोक फार थोडे आहेत. चांभार लोकच काय ते धंदेवाईक आहेत. पण त्यांनीही हा धंदा आता जवळजवळ सोडल्यासारखा आहे. म्हणून बिन-धंदेवाईकांचाच भरणा जास्त आहे. अमुक एक धंदा म्हणून अमुक एका जातीची खोती असा जेथे प्रघात आहे तेथे अमुक एक धंदा तुम्हास करता येण्यासारखा आहे तो करा असे सांगणे म्हणजे वायफळ उपदेश आहे. त्यांना जर धंद्यात पडावयाचे असेल तर तो धंदा अशा प्रकारचा असला पाहिजे की जो कोणत्याही जातीतल्या माणसास करण्यास मोकळीक आहे. अशा प्रकारचे धंदे मला तरी दोनच दिसतात. एक पांढरपेशा व दुसरा शेती.

पांढरपेशा अस्पृश्य वर्गाच्या लोकांनी स्वीकारावा हा उपदेश कितीएक वरच्या वर्गातील लोकांना रुचत नाही हे मला माहीत आहे. त्यांना असे वाटते की अस्पृश्य वर्गाच्या लोकांनी सुतारी, लोहारी, विणकरी वगैरे व्यवसाय करावे. पण काही झाले तरी पांढरपेशा स्वीकारू नये. हा त्यांचा उपदेश आपल्या हिताचा नाही हे मी आपणास निक्षून सांगतो. अस्पृश्य वर्गाची सुधारणा होण्यास दोन गोष्टीची अत्यंत आवश्यकता आहे असे माझे मत आहे. एक त्यांच्या मनावर जो जुन्या, खुळचट व अनिष्ट विचारांचा जंग बसला आहे तो साफ घासून निघाला पाहिजे. आचार, विचार आणि उच्चार यांची शुद्धी जोपर्यंत झाली नाही तोपर्यंत

अस्पृश्य समाजात जागृतीचे अथवा प्रगतीचे बी कधीही रूजणार नाही. हल्लीच्या स्थितीत त्यांच्या खडकाळ मनावर कसलेही नवे रोप उगवणार नाही. त्यांची मने अशा रीतीने सुसंस्कृत होण्यास त्यानी पांढरपेशाचा अवलंब केलाही पाहिजे. अस्पृश्यांनी पांढरपेशाचा अवलंब करावा असे मी का म्हणतो यास दुसरेही एक कारण आहे. सरकार ही एक मोठी जबरदस्त महत्त्वाची संस्था आहे. सरकार ज्याप्रमाणे मनात आणील त्याप्रमाणे सर्व काही घडून येईल. पण आपण हे विसरता कामा नये की, सरकार कोणत्या गोष्टी घडवून आणील हे सरकारी नोकरांवर सर्वस्वी अवलंबून राहील. कारण सरकारचे मन म्हणजे सरकारच्या नोकरांचे मन. यावरुन एक गोष्ट सिद्ध आहे ती ही की, जर सरकारकडून आपल्याला आपल्या हिताचे असे काही करवून घ्यावयाचे असेल तर सरकारी नोकरीत आपला प्रवेश आपण करून घेतला पाहिजे. नाही तर आपली जशी आज हेळसांड होत आहे तशी ती नेहमीच होणार आहे. ती न व्हावी हा जर आपला हेतू असेल तर अस्पृश्य वर्गाच्या लोकांनी सरकारी नोकरीत आपला जास्त प्रमाणात शिरकाव होईल अशी व्यवस्था करावयास पाहिजे. त्याशिवाय त्यांना उर्जित अवस्था केव्हाच यावयाची नाही आणि सरकारी नोकरीत शिरकाव होण्यास पांढरपेशा पत्करल्या खेरीज चालावयाचे नाही. ह्या गोष्टीचे महत्त्व मुसलमान व मराठे या जातीनी ओळखीले आहे आणि या बाबतीत त्यांची मोठी धडपड चालली आहे. आपणही वेळीच जागे होऊन आपला शिरकाव करून घेतला पाहिजे. ब्राह्मण लोक या चळवळीची निंदा करतात आणि सरकारी नोकरीत काही नाही म्हणून सांगत फिरतात. परंतु या त्यांच्या म्हणण्यात सत्यही नाही व प्रामाणिकपणाही नाही. सत्य नाही याचे कारण असे की सरकारी नोकरीचा अधिकार या प्रांतातील ब्राह्मणांच्या हाती जर नसता तर इतर प्रांतातील ब्राह्मणाप्रमाणे ते पाणके किंवा स्वयंपाकी झाले असते. येथील ब्राह्मणाचे श्रेष्ठत्व नुसत्या पुराणाच्या आधारावर असते तर इतर ठिकाणाप्रमाणे कधीच ढासळले असते पण त्याला सरकारी नोकरीच्या अधिकाराचा पाठिंबा असल्यामुळे ते टिकले आहे. जसा असत्य तसा हा युक्तीवाद दिशाभूल करणारा आहे. कारण ब्राह्मणांनी सरकारी नोकऱ्यांचा काही अभिलाष सोडला नाही. उलट त्यांची चिकाटी आहे ती आहेच. तेव्हा त्यांच्या असत्य व अप्रामाणिक युक्तीवादाला आपण फसून जाता कामा नये.

सद्गृहस्थ हो ! या प्रसंगी मला एका खेदकारक गोष्टीची आठवण करून देणे भाग पडत आहे. मी मागे सांगितले आहेच की हा प्रदेश सुभेदार, जमादार यांनी गजबजलेला होता व या लोकांनी अनेक उपयुक्त गोष्टी केल्या. पण एक गोष्ट केली नाही व ती जर केली असती तर ती आपल्या सर्वांच्या कामी आली असती. ती गोष्ट हीं की, त्यांनी आपापल्या मुलास शिक्षण दिले नाही. सद्गृहस्थ हो ! हे लोक काही गरीब नव्हते. त्यांच्या कालाच्या मानाने त्यांना फारच मोठे पेन्शन मिळत असे, त्यांनी मनात जर आणले असते तर

आपापल्या मुलांना बी.ए., एम.ए. पर्यंतचे शिक्षण त्यांना देता आले असते. याचा परिणाम काय झाला असता याची कल्पना सहज करता येण्यासारखी आहे, ही शिकलेली मुले आज मामलेदार, कलेक्टर, मॅजिस्ट्रेट वगैरे हुद्यावर जर चढली असती तर आज सर्व अस्पृश्य समाजावर त्यांचा वज्रपंजर असता. त्यांच्या छत्रछायेखाली आपली वाढ झाली असती परंतु तसे न झाल्याकारणाने आज आपण उन्हात तापत पडलो आहोत, अगदी करपून जात आहोत. माझी अशी दृढ भावना झाली आहे की, आपण अशा प्रकारची आपल्यावर सावली करून घेतल्या़खेरीज आपली मुळीच वाढ होणार नाही. ही सावली पांढरपेशा पत्करून सरकारी नोकरीत आपला शिरकाव करून घेतल्याखेरीज होणार नाही. म्हणून आपणा सर्वांस मी अशी सूचना करत आहे की आपण आधी उच्चप्रतीच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष पुरविले पाहिजे. एक मुलगा बी. ए. झाल्याने आपल्या अस्पृश्य समाजास तो जसा आधार होईल तसा एक हजार मुले चौथी शिकून पास झाली तरी होणार नाही. प्राथमिक शिक्षणाकडे दुर्लक्ष करावे असे मी म्हणत नाही. मी जे म्हणतो ते हे की हल्लीची आपली परिस्थिती अशी चमत्कारीक आहे की वरच्या प्रतीचे शिक्षण घेत असलेल्या मुलाला जितक्या लवकर शिखरास नेवून पोहचवू तितके बरे. याकरिता या प्रांतात आपल्या लोकांकरिता एखादे बोर्डींग असणे अत्यंत आवश्यक आहे. ठाणे आणि कुलाबा जिल्हा यातील विद्यार्थ्यास सोईस्कर व्हावे म्हणून मी पनवेल मुक्कामी बोर्डींग काढण्याचे योजिले आहे. त्यास तुम्ही सर्वजण द्रव्यद्वारा शक्यनुसार मदत कराल अशी आशा आहे.

दुसरा धंदा मी जो आपणास सुचविला आहे तो शेती आहे. हा धंदा सुचविण्यात माझा हेतू असा आहे की, आपल्या अस्पृश्य वर्गानी आर्थिकदृष्ट्या स्वतंत्ररितीने जीवित घालविण्याची व्यवस्था करावी. आज अस्पृश्य वर्गात समाविष्ट होणाऱ्या जातींपैकी महार जात म्हणजे एक भिकार लोकांचा तांडा आहे असे म्हणावयास काही हरकत नाही. दररोज हक्काने दारोदार शिळे तुकडे टोपल्याच्या टोपल्या गोळा करून चरितार्थ चालविण्याची या जातीला सवय पडून गेली आहे. ह्या प्रघातामुळे या जातीला मुळी गावात इज्जत नाही, मान, मरातब नाही. या रिवाजामुळे या जातीचा स्वाभिमान नष्ट झाला आहे. काहीही म्हणा ! जोड्यात वागवा ! पण मला तुकडा वाढा. अशी या जातीची वृत्ती बनून गेली आहे. या रिवाजामुळे या जातीला स्वतंत्रतेने आपल्या उन्नतीचा मार्ग आक्रमणे शक्य नाही. कारण आज जर देवळात शिरू म्हटले, सार्वजनिक पाणवठ्यावर पाणी भरू म्हटले, मेलेले जनावर ओढणार नाही म्हटले तर उद्या गावातील लोकांच्या भाकऱ्या बंद झाल्या की यांच्या नाड्या मेल्याच. अशा-रितीने शिळया आणि उष्ट्या तुकड्यांसाठी आपली माणुसकी विकणे ही गोष्ट मोठ्या लाजेची आणि शरमेची आहे. हा तुकडा मागावयाचा सोडून गावातील इतर लोकांप्रमाणे जर शेती केली तर होणार नाही काय ? शेती विकत घेणे हे अस्पृश्य लोकांना कदाचित कठीण जाईल. पण जंगल खात्याच्या कितीतरी

पडीत जमीनी आहेत त्या जर एखाद्या अस्पृश्य वर्गाच्या माणसाने मागणी केली तर त्याला मिळण्यासारख्या आहेत.

पण या गोष्टी घडून कशा याव्यात ? मला असे वाटते की जोपर्यंत आम्हाला शिळे तुकडे खावयाला मिळत आहेत तोपर्यंत आहे ही स्थिती बहुतेक कायमच राहील. जुना मार्ग जोपर्यंत चालू आहे तोपर्यंत नव्या मार्गाने जाण्यास कोणीच निघणार नाही. जुन्या मार्गाचा अवलंब करून आज माणुसकीला आपण दुरावलो आहोत. तो मार्ग किती दिवस तुम्ही चालू ठेवाल याचा तुम्ही विचार करा सद्‌गृहस्थ हो! .दरेक सुधारणेच्या बाबतीत ''वडिलांची रीत'' हा या प्रांतातील लोकांचा महामंत्र असतो व सर्व प्रकारच्या नव्या योजनेच्या वेळी मग ती बरी असो किंवा वाईट असो त्याचा जप चालावयाचाच. याचा अर्थ वडिलांनी काही बाबतीत असमंजसपणाने एखादा प्रघात सुरू केला तर त्याच्या वंशजांनी मग तो प्रघात त्यांना कितीही विघातक असो तो चालूच ठेवावयाचा. सर्वच ठिकाणी जुने ते सोने या म्हणीस जर आपण धरून बसलो तर नवीन सुधारणा कधीच होणार नाही. शिवाय दरेक आईबापाची अशी इच्छा नसावी काय की आमच्या मुलालेकरांची स्थिती आमची आहे तिच्यापेक्षा काकणभर अधिक असावी. अशी ज्यांची इच्छा नसेल त्या आईबापाच्या जोडप्यात व पशुच्या जोडप्यात काय अंतर आहे मला समजत नाही. सद्‌गृहस्थ हो! तुम्ही आपल्यासाठी जरी नाही तरी आपल्या संततीसाठी मी जे सांगतो याकडे लक्ष द्या. आज आपणास भाकरी मिळते तेवढी बस्स आहे, ह्या मोठ्या भानगडी आम्हास नकोत, अर्धी सोडून सगळीच्या मागे कोणी जावे असा आपण पोक्तपणाने प्रश्न कराल. पण मी आपणास इशारा देतो की मी सांगतो त्या दिशेने तुम्ही प्रयत्न केला नाही तर आज जी चतकोर भाकरी मिळत आहे ती उद्या मिळणार देखील नाही.

हे विचार मी फक्त आपल्या पुढे मांडले असे नाही, जेथे जेथे मला बोलण्याचा प्रसंग आला तेथे तेथे मी हेच विचार मांडले आहेत. आपल्याला विशेषतः सांगावयाची गोष्ट ही की, आपण सर्वांनी जागृतीचे काम विशेष जोराने करावयास पाहिजे. पलटणीतल्या पिढीचा नष्टांश झाल्यापासून या प्रांतातील लोकांना मृत कळा आल्यासारखी झाली आहे. कसल्याच प्रकारची हालचाल नाही. घाटावर अनेक परिषदा होऊन गेल्या, तेव्हा आता कोठे ही सभा होत आहे. जागृतीचा विस्तव तुम्ही कधीही विझू देता कामा नये. या जागृतीच्या कामासाठी तुम्हाला काही स्थानिक पुढाऱ्यांची जरूरी आहे. मार्गदर्शकाशिवाय मार्ग चालणे अशक्य वाटते. आपल्यातील जे काही पेन्शनर लोक आहेत त्यांनी या गोष्टीत लक्ष घालणे हे त्यांचे कर्तव्य आहे. ते या स्वजनोद्धाराच्या महत्त्कार्यात पुढाकार घेतील अशी आशा ठेवून मी आपले भाषण पुरे करतो.

## दुसऱ्या दिवशी परिषदेच्या कामास पुन्हा सकाळी ९ वाजून गेल्यावर सुरवात झाली व खालील ठराव पास झाले

### गट १ ला

**ठराव १ ला.**–बहिष्कृत वर्गानी चालविलेल्या आत्मोद्धाराच्या चळवळींमुळे वरिष्ठ वर्ग व बहिष्कृत वर्ग यांच्यामध्ये परस्परात तेढ उत्पन्न होऊ नये अशी वरिष्ठ वर्गातील हिदुंची इच्छा असल्यास ही परिषद त्यांना पुढील सूचना करीत आहे.–

(अ) बहिष्कृत वर्गातील लोक सार्वजनिक स्थळे व पाणवठे यांचा उपयोग करुन आपले नागरिकत्वाचे हक्क बजावण्याचा प्रयत्न करीत असताना वरिष्ठ वर्गातील लोक त्यांच्याशी सर्व प्रकारचे व्यवहार बंद करुन त्यांच्याविरुद्ध हरताळ जाहीर करतात. तसे न करिता अशावेळी वरिष्ठ वर्गातील लोकांनी बहिष्कृत लोकांना सक्रिय सहाय्य करावे.

(ब) वरिष्ठ वर्गातील लोकांनी बहिष्कृतास घरगुती नोकर म्हणून नोकरीस ठेवावे.

(क) जातीभेद मोडण्याचा उपाय म्हणून मिश्रविवाह पद्धतीचा प्रधात सुरु करावा.

(ड) बहिष्कृत वर्गातील गरीब विद्यार्थ्यांचे आपले घरी वार लावून किंवा त्यांच्या भोजनाची तरतूद करुन त्यांना मदत करावी.

(इ) मेलेली जनावरे ओढून टाकण्याचे बाबतीत बहिष्कृत लोकांवर अवलंबून न राहता आपली आपणच व्यवस्था करावी.

### गट २ रा

**ठराव १ ला.**–मागील कायदेकौन्सिलामध्ये श्री. सी. के. बोले यांनी सार्वजनिक विहिरी व तलावासंबंधानेही ठराव आणला आहे. त्याची सरकारने अंमलबजावणी करुन त्या ठिकाणी पाट्या लावण्याची व्यवस्था करावी आणि जरूर तर क्रि. प्रो. कोड सेक्शन १४४ अंमलात आणून स्थानिक पुढाऱ्यांचे जामीन घेऊन अस्पृश्यांना सदरील हक्क उपभोगण्यास मदत करावी.

**ठराव २ रा.**–ही सभा सरकारास अशी विनंती करीत आहे की, खेडेगावी कित्येक ठिकाणी अस्पृश्यांची पाणी पिण्याची अत्यंत गैरसोय होते ती दूर करण्याची व्यवस्था करावी.

**ठराव ३ रा.**–बहिष्कृत लोकांच्या आर्थिक उन्नतीस्तव फॉरेस्ट जमीनी लागवडीस द्याव्या.

**ठराव ४ था.**––अत्यंत मागासलेल्या बहिष्कृत वर्गांचा आर्थिक दर्जा वाढविण्याकरिता व त्यांचे दुःख निवारण करण्याकरिता सरकारने खालील गोष्टींकडे लक्ष द्यावे.–

(अ) अस्पृश्य वर्गातील अन्क्वॉलिफाईड इसमास जेथे शक्य असेल तेथे सरकारी नोकऱ्या द्याव्या.

(ब) अस्पृश्य लोकांची लष्करात भरती करावी.

(क) आरमारी खात्यात अस्पृश्य उमेदवार घ्यावेत.

(ड) सेकंड इअर ट्रेन्ड मास्तरास शाळा खात्यात सुपरवायझरच्या जागा देण्यात याव्यात.

(इ) अस्पृश्यांतील साक्षर लोकास मुलकी पोलिसदलाच्या जागा देण्यात याव्यात.

(क) अस्पृश्य लोकांची शक्य तितकी जास्त पोलीस खात्यात भरती करावी.

**ठराव ५ वा.**––सरकारी कामानिमित्त रयतेकडून बलुते देण्याची पद्धत बंद करून त्याच्याऐवजी गावकरी लोकांवर सी. पी. वगैरे प्रांतात ज्याप्रमाणे सेस बसविण्यात आला आहे, त्याप्रमाणे येथेही सेस बसवून त्यातून कामगारास मासिक पगार देण्याची पद्धत अंमलात आणावी.

**ठराव ६ वा.**––बहिष्कृत वर्गाची मृत मांस खाण्याची चाल सरकारने कायद्याने बंद करावी. कारण तीमुळे आरोग्यास धोका पोचून बहिष्कृतांचा दर्जा अत्यंत हीनपणाचा ठरतो.

**ठराव ७ वा.**––शिक्षण व दारूबंदी या बाबतीत सक्ती करण्यात यावी.

**ठराव ८ वा.**––श्रीयुत एम. के. जाधव यास डेप्युटी कलेक्टरची जागा न दिल्याबद्दल या सभेस अत्यंत दिलगिरी वाटते.

**ठराव ९ वा.**––१११ व्या पलटणीमध्ये पूर्वी उभारलेल्या फंडात महाड तालुक्यातील नोकरीत असलेल्या गृहस्थांची रक्कम आहे. त्यातून या तालुक्यातील अस्पृश्य वर्गाच्या मुलांसाठी एक बोर्डींग काढण्यात यावे.

**ठराव १० वा.**––शिक्षणाच्या बाबतीत अधोगतीस गेलेल्या बहिष्कृत समाजाच्या उन्नतीप्रित्यर्थ खालील गोष्टी अंमलात आणाव्या.–

(अ) शिक्षणाची प्रगती कशी होईल याची चौकशी करण्याकरिता एक कमिटी नेमण्यात यावी.

(ब) जिल्हानिहाय बोर्डींगे उघडावी.

(क) खाजगी संस्थांनी चालविलेल्या बोर्डींगास मुलापाठी प्रत्येकी दरमहा रु. १० ग्रँट द्यावी.

(ड) ३० मुले असलेल्या गावी शाळा उघडावी.

(इ) शिष्यवृत्त्या द्याव्या.

### गट ३ रा

**ठराव १ ला.**––ही परिषद बहिष्कृत वर्गातील पंचांना पाटलास ( वरठ्यास ) विनंती करते की मुलांच्या लग्नप्रसंगी ठिकठिकाणच्या पंचांनी खालील गोष्टी अंमलात आणाव्या.–

(अ) २० वर्षाच्या आतील मुलांची व १५ वर्षाच्या आतील मुलींची लग्न करण्याची चाल बंद करण्यात यावी.

(ब) ज्या ठिकाणी शाळा असेल तेथील लोकांनी मुलामुलीस शिक्षण दिलेच पाहिजे अशी पंचांनी ताकीद द्यावी. मोडल्यास दोषास पात्र व्हावे लागेल असा नियम करावा.

(क) पुनर्विवाह करण्यापूर्वी उभयता वधुवरांची योग्य चौकशी केल्याशिवाय पुनर्विवाह लावू नये.

(ड) पुनर्विवाहामध्ये सात रुपये इलोग द्यावा. आणि लुगडेचोळी, पाटल्याचा जोड, नथ व पंचाचे जेवण याशिवाय पंचांचा कर नसावा.

**ठराव २.**––– (अ) अस्पृश्य लोकांनी महारकी वगैरे सारखे हलके धंदे करण्याचे सोडून शेती वगैरे सारखे स्वतंत्र धंदे करण्याची पद्धत जोराने अंमलात आणावी.

(ब) शेतीस जरूर असलेल्या सहकारी पतपेढ्या काढण्यात याव्यात.

(क) दुष्काळ, अतिवृष्टीस तोंड देण्यासाठी व त्याचप्रमाणे सावकाराचे मगर-मिठीतून सुटण्यासाठी '' सहकारी गल्ले '' स्थापन करावेत अशी या सभेची बहिष्कृत वर्गास आग्रहाची विनंती आहे.

### गट ४ था

**ठराव १ ला.** –– स्वामी श्रद्धानंदजींच्या अमानुष खुनाबद्दल या सभेस अत्यंत दुःख होत आहे, व त्यांनी आखून दिल्याप्रमाणे हिंदू जातीने अस्पृश्यतेचे समूळ उच्चाटन करावे.

नंतर अध्यक्षाने समारोप केल्यावर रा. शिवराम गोपाळ जाधव यांनी आलेल्या मंडळींचे व अध्यक्षांचे आभार मानले. त्यास दुजोरा देण्यास रा. अनंत विनायक चित्रे हे उभे राहिले. त्यांनी आभाराच्या ठरावास अनुमोदन दिल्यानंतर परिषदेस उद्देशून असे सुचविले की, आज जी एवढी मोठी महत्त्वाची परिषद भरली आहे, तिने काही तरी महत्त्वाचे कार्य केल्याखेरीज आपले अधिवेशन संपवू नये असे मला वाटते. या महाड शहरात अस्पृश्य लोकांची पाणी पिण्याची अत्यंत गैरसोय आहे. ही गैरसोय दूर व्हावी म्हणून येथील म्युनिसीपालिटीने येथील तळी सर्व जातीच्या लोकास खुली आहेत असे ठरावाने कधीच जाहीर करून टाकिले आहे. परंतु त्या तळ्यावर पाणी भरण्याचा प्रघात अस्पृश्य लोकांकडून अजूनही सुरु करण्यात आला नाही. तो प्रघात जर आज या परिषदेने पाडून दिला तर या परिषदेने एक मोठी महत्त्वाची कामगिरी बजाविली असे म्हणता येईल. तरी आपण सर्वांनी अध्यक्षांसह महाड येथील चवदार तळ्यात प्रवेश करुन पाणी घेऊ. त्यानंतर परिषदेतील सर्व लोक अध्यक्षांच्या मागोमाग सभा मंडपातून बाहेर पडून त्या सर्वांची एक मोठी मिरवणूक काढण्यात आली. ही मिरवणूक महाड शहरातील पेठेतून अत्यंत शांतपणाने तळ्यावर गेली.''[१]

''आंबेडकर आता चवदार तळ्याच्या काठावर उभे होते. जगातील पंडितांमधील एक विख्यात पंडितवर्य, उदात्त ध्येयाने प्रेरित झालेले एक थोर हिंदू पुढारी, दलितांचे स्वातंत्र्यसूर्य डॉ. आंबेडकर हे कृतिक्षेत्रात उतरले. स्वातंत्र्याचे हक्क भीक मागून मिळत नसतात. ते स्वसामर्थ्याने संपादावयाचे असतात. देणगी म्हणून ते लाभत नसतात, हे त्रिकालाबाधित महानुभावाचे प्रत्यक्ष पाठ डॉ. बाबासाहेब आंबेडकर दलितांना देत होते. आत्मोद्धार हा दुसऱ्याच्या कृपेने होत नसतो तो ज्याचा त्याने करावयाचा असतो. डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्वतः कृतिवीर बनून अनुयायांना श्रीगणेशाचा पाठ देत होते. त्यांना सुसंघटित नि प्रतिकारक्षम बनवीत होते. कृतिशूरपणा हा इतिहास घडविणाऱ्या थोर पुरूषांचा देहस्वभाव असतो.

ध्येयाविषयी अढळ श्रद्धा बाळगून डॉ. बाबासाहेब आंबेडकर दलितात निष्ठा निर्माण करीत होते. ज्या ध्येयाचा ते उद्‌घोष करीत राहिले होते, ते ध्येय आता झगड्याच्या अग्निदिव्यातून तावून-सुलाखून निघत होते. डॉ. आंबेडकर आता स्वतः तळ्याच्या काठावर उभे राहिले. ज्या पानवठ्यावर पशु-पक्षी आपली तहान भागवीत, त्यातले पाणी पिऊन आपली तहान भागविण्यास ज्याला आपल्या पुण्यभूमीत नि मायभूमीत मज्जाव होता, ज्याला सार्वजनिक स्थळे नि देवळे ह्यांची द्वारे बंद होती, असा तो महापुरुष हिंदुधर्म मार्तंडांचा नि हिंदुधर्ममतांचा ढोंगीपणा भारताच्या वेशीवर टांगीत होता. सर्वाभूती परमेश्वर आहे असा धर्मप्रणित उद्‌घोष उच्चरवाने करणाऱ्या नि कुत्र्या-मांजरांना जवळ करीत असताही स्वधर्मियांना पशुहून नीच मानणाऱ्या त्या घोर पातक्यांचे अघोर पातक तो क्रांतिपुरुष जगाला उघड करुन दाखवीत होता.

---

[१] बहिष्कृत भारत : ३ एप्रिल १९२७.

आंबेडकर चवदार तळयाच्या पायऱ्या उतरुन खाली गेले. ते खाली वाकले आणि त्यांनी तळयातील एक ओंजळभर पाणी प्राशन केले. त्या प्रचंड जनसमुदायाने आपल्या नेत्याचे अनुकरण केले ! त्यांनी आपला नागरिक, त्याचप्रमाणे मानवी हक्क बजावला. लागलीच परिषदेच्या ठिकाणी मोर्चा शांतपणे परतला नि विसर्जन पावला. नेत्याने योग्य वेळी कृतिपूर्ण पाऊल टाकले पाहिजे. जे काम शेकडो ठरावांनी होत नाही ते अशा एका कृतीने सफल होते. कार्लाईलने म्हटलेच आहे की, ' कृती हे मानवाचे खरे उद्दिष्ट होय.'

अशा प्रकारे प्रचंड कार्य करुन परिषद समाप्त झाली. जो तो घरी परतण्याच्या तयारीला लागला. भारताच्या तीन सहस्त्र वर्षांच्या इतिहासातील परममंगल असा तो भाग्याचा दिवस, माणुसकीचा अन् समानतेचा संदेश भारतास देणारा तो सोन्याचा दिन २० मार्च १९२७ हा होय ! डॉ. आंबेडकरांच्या जीवनातील परम भाग्याचा तो दिवस. त्या दिवसापासून डॉ. आंबेडकरांच्या कीर्तीच्या लाटा एकामागून एक सर्व देशभर पसरत गेल्या. ''[1]

## '' महाड येथील वरिष्ठ वर्गाच्या लोकांचा अत्याचार

परिषद संपल्यानंतर अध्यक्ष व इतर मुंबईची पाहुणे मंडळी जेथे उतरली होती तेथे म्हणजे सरकारी बंगल्यावर गेली व बाकीचे लोक आपापल्या गावी जाण्याकरिता निघण्यापूर्वी भोजनगृहाकडे गेले. सुमारे दोन वाजण्याच्या सुमारास विरेश्वराच्या देवळातील गुरव अस्पृश्यलोक विरेश्वराच्या देवळात शिरणार आहेत. तरी तुम्ही धावून देवळाचे संरक्षण करण्यास चला, अशी खोटी दवंडी गावात देत सुटला. अस्पृश्य वर्गांनी तळे बाटविले याचा वचपा काढण्यासाठी सिद्ध असलेल्या वरिष्ठ वर्गाच्या लोकास हे आयतेच निमित्त मिळाले. दवंडी ऐकल्याबरोबर ४/५ शे लोक विरेश्वराच्या देवळात काठ्या सोटे घेऊन जमा झाले व देवळात अस्पृश्यलोक शिरणार आहेत असा गोंगाट करु लागले. हे पाहून शहर फौजदार डाक बंगल्यावर आले व डॉ. आंबेडकरांना विचारु लागले की, '' आपले लोक देवळात शिरणार आहेत यास्तव शहरातील लोकांनी देवळाजवळ गर्दी केली आहे तर मी त्यांना काय सांगू ?'' यावर डॉ. आंबेडकरांनी त्यास सांगितले की, '' आम्हाला देवळात शिरण्याची इच्छा नाही व जरूरीही नाही तरी तुम्ही लोकांची या बाबतीत खातरजमा करुन त्यास शांत करावे.'' फौजदार निघून गेल्यानंतर आपल्या लोकांना ताकीद देण्यासाठी आपल्यातील काही लोकास भोजनगृहाकडे पाठवले त्याप्रमाणे परिषदेस आलेले अस्पृश्यलोक आपापले जेवण आटोपून आपापल्या गावी जाण्यास सिद्ध झाले. बरेच अस्पृश्यलोक आपापल्या गावी गेल्यानंतर देवळाजवळ जमलेल्या गांवगुंडांनी पेठेतून घरोघरी जात असलेल्या अस्पृश्य लोकांवर हल्ला केला व

---

[1] डॉ. बाबासाहेब आंबेडकर : धनंजय कीर, पृष्ठ ७५-७६.

ब-याच लोकास जखमा झाल्या. इतका अतिप्रसंग होईतोपर्यंत महाडचे मामलेदार यांनी गर्दी कमी करण्याचा काहीच उपाय अंमलात आणिल्याचे दिसले नाही. शेवटी ४-१५ च्या दरम्यान मामलेदार साहेब पोलीस सबइन्स्पेक्टरसह डाक बंगल्यावर आले व डॉ. आंबेडकरांना म्हणू लागले की, आपण शांतता राखण्यास आमच्या बरोबर चला. तुमच्या लोकास तुम्ही समजवा व आमच्या लोकास मी समजावतो. खरे म्हटले असता त्यावेळी अस्पृश्य लोकास समजावण्याचे काही कारणच नव्हते. कारण जमलेल्या अस्पृश्य लोकांच्या अफाट जनसमूहानी शांतता कधीच मोडली नव्हती. शिवाय बरेचसे अस्पृश्य लोक शहराबाहेर निघूनही गेले होते. तरी पण मामलेदार साहेबांच्या सांगण्याप्रमाणे डॉ. आंबेडकर व त्यांच्याबरोबर बंगल्यावर उतरलेली इतर मंडळी शहराकडे जाण्यास निघाली. वाटेत विरेश्वराच्या देवळाजवळ वरिष्ठ वर्गाच्या जमलेल्या लोकांनी त्यास अडविले व त्यांच्यातर्फे डिंगणकर व तुळजारामशेटचा भाऊ चुनिलाल हे देवळाच्या बाबतीत खुलासा करा वगैरे प्रश्न विचारू लागले. त्यास डॉ. आंबेडकरांनी फौजदारास जे उत्तर दिले तशाच प्रकारचे उत्तर दिले. परंतु लोक शांत होतील अशी वर्तणूक ठेवण्याऐवजी लोकांची मने प्रक्षुब्ध होतील अशारीतीचा वाद करण्यास त्यांनी सुरुवात केली. म्युनिसीपालिटीचा ठराव तो काही लोकांचा ठराव नाही, तुम्ही तळयावर गेलात ते आम्हाला अगोदर सूचना देऊन का गेला नाहीत वगैरे वगैरे प्रश्नाचा मारा करू लागले. तोंडास तोंड देण्यात अर्थ नाही हे जाणून डॉ. आंबेडकरांनी व त्यांच्याबरोबरच्या मंडळीनी पुढे जाण्यास सुरुवात केली. वाटेत अस्पृश्य लोक देवळात शिरले रे शिरले अशी ओरड करीत काही लोक धावपळ करू लागले. मॅजिस्ट्रेटसाहेब यांनी हे प्रत्यक्ष पाहिले असताना त्यांना कैद करण्याचा काहीच प्रयत्न केला नाही. उलट हंशावरी ती गोष्ट घालवून दिली! शेवटी ज्या अस्पृश्य लोकांची समजूत घालण्याकरिता डॉ. आंबेडकरांना नेण्यात आले होते त्यापैकी एकही अस्पृश्य तेथे नव्हता हे पाहून डॉ. आंबेडकर व त्यांच्याबरोबरची मंडळी बंगल्यावर परत आली. तो तेथे अदमासे १०० अस्पृश्य लोक जमून बसले होते. त्यात काही जखमी झालेले लोक होते. हा प्रकार दृष्टीस पडेतोपर्यंत दंगलीचा शेवट रक्तपातात झाला याची कोणास कल्पनाही नव्हती! ही कल्पना झाल्यानंतर अस्पृश्यातील पुढारी लोकास, एका गोष्टीचा मोठा अचंबा वाटला. तो हा की, दंग्याच्या दिवशी मॅजिस्ट्रेट शहरात हजर असताना दंग्यास वेळीच आळा का घालता आला नाही. परंतु तो विचार करण्याचा प्रसंग नव्हता. सर्व गोष्टी बाजूस ठेवून आधी ज़खमी झालेल्या लोकास हॉस्पिटलमध्ये नेण्याची व्यवस्था केली व तेथून त्यांना घेऊन पोलीस चौकीवर त्यांच्या फिर्यादी गुजरण्यात आल्या. पुरावा गोळा करण्याचे काम अत्यंत बिकट असे होते. वरिष्ठ वर्गाचे लोक एक कटाने वागत असल्यामुळे खरे सांगण्यास कोणी पुढे येईना. अस्पृश्य वर्गातील लोक भीतीने गांगरुन गेल्यामुळे नावे सांगण्यास धजेनात. अशा परिस्थितीत मुंबईहून गेलेल्या पुढारी लोकांनी दोन दिवस राहून शक्य तेवढा पुरावा गोळा करण्याची

व्यवस्था केली. स्थानिक पोलिसांचा उत्साह आरोपी लोकास कायद्याने ठरविलेले प्रायश्चित भोगावयास लावण्याच्या कामी अगदी कमी दिसला. हे पाहून नामदार गव्हर्नर साहेब व जिल्ह्याचे कलेक्टर यांच्याकडे झालेल्या हकिकतीचा संदेश तारेने पाठविण्यात आला व पोलिसांस या बाबतीत योग्य ताकीद देण्यात यावी असे सुचविण्यात आले होते. या मारामारीच्या आगीचा वणवा महाड शहराच्या बाहेरही पसरला होता असे दिसून आले. शहरातील मारामारी थंडावल्यानंतर वरिष्ठ वर्गातील काही दुष्ट लोकांनी आजुबाजूच्या काही खेड्यातील मराठे लोकास निरोप पाठविला की तुमच्या गावावरुन महार लोक जेव्हा परततील तेव्हा त्यास ठोक द्या. त्याचप्रमाणे या दुष्ट लोकांनी लांबलांबच्या खेडेगावापर्यंत ''महाडचे तळे अस्पृश्यांनी बाटविले. तुमच्या विहिरी तरी सांभाळा.'' अशाप्रकारचे चिथविणारे लेखी संदेश पाठविले. याचा परिणाम असा झाला की, ही आग सर्वत्र पसरली व दरेक गावात अस्पृश्य लोक इतर समाजाच्या दृष्टीने अल्पसंख्यांक असल्याने सर्वच ठिकाणी त्यांना मार खावा लागला. काही ठिकाणी तर त्यांना जबर दुखापतीही झाल्या.

या लोकांचा बचाव व्हावा म्हणून ज्या गावामधून अशा प्रकारचे अत्याचार झाले व ज्या ज्या लोकांनी केले अशांची एक यादी तयार करून कुलाबा जिल्ह्याचे पोलीस सुपरिन्टेन्डेंट याच्याकडे पाठविण्यात आली. इतके झाल्यानंतर मंगळवारी सकाळी मुंबईतील लोक अधिक रजा नसल्याकारणाने परत आले. डॉ. आंबेडकर व चित्रे हे मागे राहिले. त्यांनी डिस्ट्रिक्ट सुपरिन्टेन्डेंटची पुन्हा गाठ घेऊन झालेली सर्व हकिकत कळविली व पोलीसांनी अस्पृश्य लोकांचा तरणोपाय होण्यास काय काय केले पाहिजे हे समजावून सांगितले. मंगळवारी संध्याकाळी महाड शहरातील ब्राह्मणेतर पुढारी यांची एक खाजगी बैठक बोलाविण्यात आली. झालेल्या महाड येथील दंग्यात ब्राह्मणेतरांनी विशेष पुढाकार घेतल्याचे दिसून आल्यावरून, त्यांच्या पुढाऱ्यांकरवी अशा दुष्ट कृत्यास आळा घालण्याची काही तरी उपाययोजना व्हावी या हेतूने ही खाजगी बैठक बोलावण्यात आली होती. परंतु खेदाची गोष्ट आहे की, एक दोन माणसे खेरीज करून अशा प्रकारच्या वर्तनास आळे घालण्याचे कामी सर्वांनीच अंग झटकले. एवढा खटाटोप करून चित्रे व आंबेडकर बुधवारी मुंबईस परत आले. ही परिषद कोणत्याही दृष्टीने पाहता महत्त्वाची झाली यात संशय नाही. तिचे परिणाम बरे की वाईट हे कालांतरानेच ठरेल. परंतु ती परिणामकारक झाली असे म्हणावयास हरकत नाही.

परिषद यशस्वी करण्याचे कामी तसेच मारामारी होऊन जखमी झालेल्या लोकांस मदत करण्याचे कामी महाड येथील चांद्रसेनीय कायस्थ जातीतील तरुण पिढीने जी अंगमेहनत केली त्याबद्दल कुलाबा जिल्ह्यातील अस्पृश्य वर्ग त्यांचा सदैव ऋणी राहील.'' [१]



बहिष्कृत भारत : ३ एप्रिल १९२७.

## ८

# राज्याचा अभिमान नसेल तर राज्य टिकत नाही

बदलापूर, जिल्हा ठाणे येथील त्रिशत सांवत्सरिक श्री शिवाजी उत्सव ता. ३ मे १९२७ रोजी संध्याकाळी सहा वाजता डॉ. बी. आर. आंबेडकर, बार-ॲट-लॉ यांच्या अध्यक्षतेखाली अत्यंत यशस्वी रीतीने पार पडला.

सदर उत्सवाच्या व्यवस्थापक कमिटीत अध्यक्ष कोणाला करावे या संबंधाने पुष्कळ वाटाघाट चालली होती. शेवटी सर्व गावकऱ्यांच्या सम्मतीने असे ठरविण्यात आले की, या उत्सवाला अध्यक्ष मुंबईचे बहिष्कृत वर्गाचे पुढारी डॉ. आंबेडकर यांसच आणावे. या त्यांच्या ठरावाप्रमाणे उत्सव कमिटीचे मुख्य व्यवस्थापक पालये शास्त्री यांनी मुंबईस जाऊन ब्राह्मण-ब्राह्मणेतर पत्राचे संपादक रा. नाईक यांच्यामार्फत डॉ. आंबेडकरांची भेट घेतली व त्यांना शिवाजी उत्सवाचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती केली. पालये शास्त्र्यासारख्या भिक्षुकी करणाऱ्या ब्राह्मणाने विनंती केल्यावरून डॉ. आंबेडकरांनीही त्यांची विनंती मोठ्या आनंदाने मान्य केली व ते उत्सवाच्या दिवशी ४ वाजता मुंबईहून रा. नाईक, रा. सीताराम नामदेव शिवतरकर, रा. गणपत महादू जाधव या मंडळीसह बदलापूर येथे आले. त्यांचा मुक्काम पालये शास्त्री यांच्या घरी होता. चहापाणी झाल्यावर डॉ. आंबेडकर हे बरोबर सहा वाजता उत्सवाच्या ठिकाणी आले.

उत्सवाला सुरुवात होण्यापूर्वी इशस्तवनपर पद्य म्हणण्यात आले. त्यानंतर रा. पालये शास्त्री यांचे प्रास्ताविक भाषण झाले. नंतर नानासाहेब चाफेकर यांनी आजच्या उत्सवाचे अध्यक्षस्थान डॉ. आंबेडकर यांनी स्वीकारावे अशी गावकऱ्यांच्यावतीने सूचना मांडली. तीस मेसर्स काळे, सुळे, पाटील व मोकाशी यांनी अनुमोदन दिल्यावर डॉ. आंबेडकर हे स्थानापन्न झाले. त्यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणात शिवाजींच्या अंगच्या निरनिराळ्या गुणांवर अत्यंत परिणामकारक असे एक तासभर भाषण केले व शेवटी सांगितले की, ज्या शिवाजीने आपल्या लोकोत्तर गुणाने राज्य मिळविले ते त्यांचे राज्य चिरकाल का टिकले नाही ? याचे कारण हेच की, त्या राज्याचा अभिमान सर्वांना सारखाच नव्हता. एक राजा गेला व त्याठिकाणी दुसरा राजा आला तरी लोकांच्या नित्याच्या व्यवहारात काहीच फरक होत नसे. नेपोलियनच्या इंग्लंडवरील स्वारीचे वेळी

---

बहिष्कृत भारत : २० मे १९२७.

इंग्लंडातील मजूर लोकांनी आपल्या देशातील लोकांना जे उत्तर दिले तेच उत्तर या ठिकाणी लागू पडते. याप्रमाणे भाषण झाल्यावर रा. नाईक यांचेही विचारपरिपूर्ण असे भाषण झाले. नंतर रा. भा. रा. ओक यांनी आपल्या विनोदी भाषणाने सर्वांचे आभार मानल्यावर उत्सवाच्या कार्यक्रमातील पहिला भाग समाप्त झाला. नंतर अध्यक्ष श्री. पालये शास्त्री यांच्याकडे भोजनास गेले. त्यांनी कसलाही किंतू मनात न बाळगता आपल्या घरात डॉ. आंबेडकर व त्यांच्या बरोबरीच्या अस्पृश्य मंडळीसह सहभोजन केले.

नंतर रात्री ९ ते ११-३० पर्यंत कीर्तन झाले. या कीर्तनात कसल्याच प्रकारचा जातीभेद न मानता लोक कीर्तनश्रवणास बसले होते. काही महार मंडळी तर कीर्तनी बुवांच्या समोरच बसली होती. कीर्तन आटोपल्यावर रात्री शिवाजी महाराजांची पालखी डॉ. आंबेडकर यांच्या पुढारीपणाखाली अदमासे १५ हजार लोकांसह नगर प्रदक्षिणा करून आल्यावर हा उत्सव समाप्त झाला.



# ९

# आपला उद्धार करायला आपणच कंबर कसली पाहिजे

मुंबई-चिराबझार येथे ता. ४ जून १९२७ रोजी रात्रौ साडे आठ वाजता बहिष्कृत वर्गाची जंगी जाहीर सभा, बहिष्कृत भारताचे संपादक डॉ. बी. आर. आंबेडकर, बार-ॲट-लॉ यांचे अध्यक्षतेखाली पार पडली. ब. हि. सभेचे जनरल सेक्रेटरी श्रीयुत एस. एन. शिवतरकर यांनी महाड परिषदेनंतर स्पृश्य लोकांनी चालविलेल्या गुंडगिरीची इत्थंभुत माहिती सांगितली. ती ऐकून लोकांच्या मनावर खेदजनक परिणाम झाला. नंतर श्री. गंगावणे, तांबे, गिमोनकर, वीरकर, भेसनकर, वीरकर, भातकुडे यांची स्फूर्तिदायक भाषणे झाली. शेवटी, अध्यक्षांनी विचारपरिप्लुत भाषण केले. सध्या अस्पृश्य वर्गाची किती शोचनीय अवस्था आहे, हे त्यांनी लोकांना स्पष्ट शब्दात पटवून दिले. " आपला उद्धार कराया आपणच कंबर कसली पाहिजे. हे काम एका दोघांचे नाही. यात अनेक लोकांनी आपल्या छातीचा कोट करून आपली माणुसकी स्पृश्य लोकांपुढे सिद्ध करून घेतली पाहिजे. या कामात अनेकांचे बळी पडतील. आपल्या पूर्वजांनी रणांगणात आपल्या मनगटातील जोर समशेरीच्या तडाख्यांनी सिद्ध केलेला आहे; आता आपण आपल्या बुद्धिवैभवाने आजच्या सामाजिक दंगलीत आपली श्रेष्ट जागा पटकाविली पाहिजे !" हे उद्‌गार ऐकून दोन-तीन तरूण ताडकन उठले व अस्तन्या सारून उद्‌गारले, " बाबासाहेब ! आपल्या झेंड्याखाली आम्ही लढावयास तयार आहोत! " महाड-अत्याचार-निवारक फंडास स्थानिक लोकांनी २० रूपये व भातकुडे, वीरकर यांनी आपल्या स्कॉलरशिपमधून प्रत्येकी ५ रुपये प्रमाणे अध्यक्षांना अर्पण केले. याशिवाय इतरही किरकोळ रकमा मिळाल्या. नंतर हारतुरे अध्यक्षांना टाळयांच्या प्रचंड कडकडाटात अर्पण करण्यात आले. 'बाबासाहेब आंबेडकर की जय' या गर्जनेत सभा विसर्जन पावली.



---

बहिष्कृत भारत : ५ जुलै १९२७.

# १०

# आम्हाला निधड्या छातीची व स्वाभिमानी माणसे पाहिजेत

रविवार ता. ५ जुलै* १९२७ रोजी मुंबई शहरातील सर्व बहिष्कृत वर्गाची जाहीरसभा महाड येथे अत्याचाराचा निषेध व त्यासंबंधी पुढे काय करावयाचे हे ठरविण्याकरिता सर कावसजी जहांगीर हॉल येथे भरली होती. सभेचे अध्यक्षस्थान डॉ. भीमराव आंबेडकर एम्. ए., पीएच. डी., डी. एससी., बार अॅट लॉ., एम. एल. सी. ह्यांनी सुशोभित केले होते. सभेला बहिष्कृत वर्गातील निरनिराळया जातीतील प्रमुख लोक हजर असून, ब्राह्मण-ब्राह्मणेतर पत्राचे संपादक देवराव नाईक, सो. स. लीगचे एक आस्थेवाईक वर्कर गं. नी. सहस्त्रबुद्धे व मद्रासकडील गीतानंद ब्रह्मचारी अशी मंडळी हजर होती. सभेत खाली लिहिल्याप्रमाणे ठराव पास झाले.

**ठराव १.**–अस्पृश्य वर्गांच्या तक्रारी व त्यांच्यावर होत असलेला अन्याय यांचे सरकारकडून योग्यप्रकारे निवारण व्हावे, तसेच सरकारने अस्पृश्योन्नतीप्रित्यर्थ वेळोवेळी केलेले ठराव व पुढे होणारे ठराव यांची कसून अम्मलबजावणी व्हावी याकरिता सरकारने मद्रास इलाख्याप्रमाणे मुंबई इलाख्यातही एक स्वतंत्र अधिकारी नेमावा अशी या सभेची मागणी आहे.

**ठराव २.**–बहिष्कृत हितकारिणी सभेने महाड येथे सत्याग्रह करण्याची योजना केली आहे. तिला या सभेचा पूर्ण पाठिंबा आहे. या सत्याग्रहात भाग घ्यावा अशी ही सभा बहिष्कृत वर्गातील सर्व जातींच्या लोकांना विनंती करीत आहे.

वरील ठरावांवर मेसर्स वनमाळी, मोहिते, मारवाडी मास्तर, खोलवडीकर, गोविंदजी माधवदास, गंगावणे, गायकवाड, जाधव वगैरे गृहस्थांची भाषणे झाल्यावर अध्यक्षांनी श्रीयुत नाईक व गीतानंद ब्रह्मचारी यांना भाषणे करण्याची विनंती केली. त्या दोघांनीही आपल्या भाषणात सांगितले की, तुम्ही आपले मानवी हक्क प्राप्त करून घेण्याकरिता शक्य तितके प्रयत्न केले पाहिजेत. वरिष्ठ वर्गांचे लोक हे तोंडपाटिलकी करणारे आहेत. त्यांना जर तुमच्याबद्दल खरी कळकळ वाटती तर ह्या सभेचे आमंत्रण सर्व वर्तमानपत्रातून जाहीर झाले असता वरिष्ठ वर्गापैकी कोणीच सभेला येऊ नये ही मोठी खेदकारक गोष्ट आहे. अशा सभातून हिंदू महासभेच्या चालकांनी अवश्य भाग घ्यावयास पाहिजे. परंतु ते जर तुमच्यात भाग घेत नाहीत तरी तुम्ही स्वस्थ बसू नका. तुम्हाला जर कोणी अस्पृश्य म्हणाला तर त्यालाही तुम्ही ज्याप्रमाणे बदकाला पाण्यात बुडवून वरखाली

---

बहिष्कृत भारत : १५ जुलै १९२७.

*तारीख ३ जुलै १९२७ असावी– संपादक.

करतात त्याप्रमाणे तुम्हीही जो कोणी अस्पृश्य म्हणेल त्यास त्याच्या दंडाला धरून पाण्यात वरखाली करून बुचकळा. ते येथपर्यंत करा की, तो मनुष्य पुन्हा तुम्हाला अस्पृश्य म्हणणार नाही. नंतर सभेचे अध्यक्ष डॉ. आंबेडकर यांचे भाषण झाले. आपल्या भाषणात ते म्हणाले,

आपण आता दोन्ही ठराव टाळयांच्या गजरात पास केले आहेत. परंतु त्यापैकी दुसऱ्या ठरावासंबंधाने आपणाला पुरेशी माहिती झालेली दिसत नाही. दुसरा ठराव सत्याग्रह करण्यासंबंधाचा आहे. सत्याग्रह म्हणजे लढाई. पण ही लढाई तलवार, बंदुक, तोफा, बांबगोळे या साधनांनी करावयाची नाही. तर ही लढाई शस्त्रविरहित करावयाची आहे. ज्याप्रमाणे पतुल्लाखली, वैकोम वगैरे ठिकाणी लोकांनी सत्याग्रह केला, त्याचप्रमाणे आपणालाही महाडला सत्याग्रह करावयाचा आहे. हा सत्याग्रह करताना कदाचित सरकार शांतता भंग होऊ नये म्हणून आपणाला कोणत्यातरी कलमाखाली पकडून तुरुंगात घालील. तर तुरुंगात जाण्याकरिता तुमची तयारी पाहिजे. ज्यांना आपल्या बायकामुलांची काळजी वाहावयाची असेल अशा लोकांनी ह्या सत्याग्रहात मुळीच भाग घेऊ नये हे मी आपणास निक्षून सांगतो. आम्हाला सत्याग्रहात जी माणसे पाहिजेत ती निधड्या छातीची व स्वाभिमानी अशी पाहिजेत. अस्पृश्यता हा आपल्या देशावरील कलंक आहे, तो मी घालवीनच घालवीन असा ज्यांचा पक्का निर्धार झाला असेल अशाच लोकांनी आपली नावे सत्याग्रहात नोंदवावी व अशा निर्धाराची माणसे बहिष्कृत समाजातून निघतील अशी आपणास आशा आहे. अशा अर्थाचे भाषण केल्यावर श्री. सीताराम नामदेव शिवतरकर यांनी सर्वांचे आभार मानले. आभार मानताना ते म्हणाले की, आज ह्या सभेला बहिष्कृत वर्गातील सर्व जातीचे लोक, तसेच गीतानंद ब्रह्मचारी, रा. नाईक व सहस्त्रबुद्धे हे आल्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहो. महाड प्रकरणाबद्दलची ही शेवटची सभा आहे. यापुढे महाड प्रकरणाबद्दल सभा भरविली जाणार नाही. परंतु आजच्या सभेत पास झालेल्या ठरावाप्रमाणे सत्याग्रहाची तयारी करावयाची आहे. हा सत्याग्रह पावसाळा संपल्यावर आम्ही करणार आहो. तरी अध्यक्षांनी सांगितल्याप्रमाणे ज्यांना आपले नाव सत्याग्रहात नोंदवावयाचे असेल त्यांनी दामोदर हॉल, परळ, येथे बहिष्कृत हितकारिणी सभेच्या ऑफीसमध्ये नोंदवावे.

● ● ●

# ११

# महार जातीवरील आप्पलपोटेपणाचा आरोप निराधार

बुधवार ता. २० जुलै १९२७ रोजी सायंकाळी साडे सात वाजता पुणे येथील मांगवाड्यात पुण्याच्या '' दीनबंधू '' पत्राचे संपादक डॉ. नवले यांच्या अध्यक्षतेखाली अस्पृश्य लोकांची जाहीर सभा भरली होती. त्यावेळी अस्पृश्य आणि स्पृश्य वर्गांतील सुमारे ३०० मंडळी हजर होती. मुंबई कायदेमंडळातील सरकार नियुक्त सभासद डॉ. आंबेडकर, बार-ॲट लॉ व डॉ. साळुंखे, सुभेदार घाडगे, मि. राजभोज, मि. के. एम. जाधव, बी. ए., मि. पाताडे, मि. गायकवाड, मि. साळवेकर, मि. इंगळे, मि. लांडगे, मि. सावळेकर, मि. के. के. सकट, मि. घाडगे, मि. वायदंडे, वऱ्हाडातील आनंदस्वामी व मि. पंढरीनाथ पाटील, श्री. धुंडीराज पंत ठेंगडी, आर्यसेवक रा. ओघळे, रा. शंकरराव पोतनीस, रा. देशपांडे वगैरे मंडळी सभेत प्रामुख्याने दिसत होती. सभा असताना पावसाच्या लहान लहान सरी मधून मधून येत होत्या. परंतु डॉ. आंबेडकरांसारख्या अनुभवी पुढाऱ्याचे भाषण ऐकण्यास मंडळी उत्सुक असल्याकारणाने पावसास न जुमानता सभेचे काम चालूच होते.

रा. के. एम. जाधव यांच्या सूचनेनुरूप डॉ. नवले यांनी अध्यक्षस्थान स्वीकारले. नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे आपल्या भाषणात म्हणाले,

मी आज मन मोकळे करून बोलणार आहे. माझ्या भाषणाचा कोणीही विपर्यास करू नये. मि. सकट आणि मि. वायदंडे यांनी सध्या माझ्यावर विनाकारण टीका सुरू केली आहे. पुढाऱ्यांवर नेहमी टीका व्हायचीच हे मी जाणून आहे. मी महार जातीचा आहे. हे आपणास माहीतच आहे. महार-जात स्वार्थी आहे हे टीकाकारांचे म्हणणे आहे. परंतु अस्पृश्य वर्गाच्या महारेतर जातीतील पुढाऱ्यांनी महारांकरीता निःस्वार्थीबुद्धीने काम केले आहे काय? असा माझा त्यांना उलट स्पष्ट सवाल आहे.

वास्तविक पाहता, महारेतर जातीच शैक्षणिक आणि सांपत्तिकदृष्ट्या श्रेष्ठ आहेत. मुंबईत तर चांभार व ढोर जातीतील काही गृहस्थ इन्कमटॅक्स देण्याइतके सधन आहेत. असे असताना त्यांनी महार लोकांच्या उन्नतीप्रित्यर्थ काही प्रयत्न केल्याचे माझ्या ऐकिवात नाही. उलटपक्षी आम्ही अनेक उपयुक्त संस्था काढून नुसत्या महार जातीच्याच नव्हे तर अस्पृश्यातील सर्व जातींच्या उन्नतीकरिता काया-वाचा-मने झटत आहोत. बहिष्कृत हितकारिणी सभा स्थापन करून अस्पृश्योन्नतीचे काम आम्ही हाती घेतले आहे. सोलापूरात आम्ही

---

बहिष्कृत भारत : २९ जुलै १९२७.

अस्पृश्यांकरिता वसतिगृह काढले आहे. त्यास चांभारांनी मदत दिलेली नाही. तरी पण महार-मांग, चांभार वगैरे सर्व जातीतील मुले त्या गृहात आम्ही घेतली आहेत. '' आणखी मांग विद्यार्थी त्या गृहात आपण जरूर पाठवा '' अशी मी, मि. सकट यांना समक्ष विनंती केली आहे. त्याचप्रमाणे नाशिक व जळगाव येथे वसतिगृहे काढून महार व महारेतर जातींच्या उन्नतीकरिता आम्ही सदोदीत झटत आहोत. असे असताना महार जातीविरूद्ध गिल्ला करण्यात काय हशील आहे, हे आम्हास समजत नाही.

सरकारकडून मिळणाऱ्या सवलती अस्पृश्य जातीत योग्य प्रमाणात वाटल्या न जाता फक्त महार जात आप्पलपोटेपणा करून सर्व सवलती बळकावून बसते असे टीकाकारांचे म्हणणे आहे. मुंबईत मि. निकाळजे नावाच्या महार जातीतील गृहस्थास मुंबई कॉर्पोरेशनमध्ये नॉमिनेट केले होते; पण अखिल अस्पृश्य वर्गाची त्यांच्या हातून उन्नती व्हावी तशी होत नाही. ही गोष्ट माझ्या लक्षात आली तेव्हा त्यांची जागा चांभार जातीतील सुप्रसिद्ध क्रिकेटपटू मि. बाळू यांना मीच सरकारकडून देवविली. सातारा शहरात महार लोकांची पुष्कळ वस्ती असूनसुद्धा येथील म्युनिसीपालिटीत सरकार नियुक्त सभासद चांभार जातीतीलच आहे. ह्या सर्व गोष्टी ध्यानात घेतल्या असता महार जातीवरील आप्पलपोटेपणाचा आरोप किती फोल आहे, हे दिसून येण्यासारखे आहे.

काही अज्ञानी महार लोक व्यापक दृष्टीचे नसतील. पण येवढ्याच कारणावरून अखिल महार जातीस दूषण लावणे चांगले नाही. महार जातीतील पुढारी काय करतात हे अवलोकन करा आणि नंतर दूषणे देण्यास पुढे या असे माझे इतर जातीतील लोकांना आग्रहाचे सांगणे आहे. मी स्वतः मांग जातीशी रोटी-बेटी व्यवहार करावयास तयार आहे. अशी स्थिती असताना महार-मांगांना तेढ का असावी हे समजत नाही. मी स्वतः माझ्या घरी मांगाचा एक मुलगा पोटच्या पोराप्रमाणे पाळला होता. अजून कोणी मला जर एखाद्या मांगाचा मुलगा आणून देईल तर मी त्याचे पालनपोषण करीन. आम्ही नुसते बोलके पुढारी नसून प्रत्येक गोष्ट कृतीत करून दाखवितो. कॉंग्रेसच्या अधिवेशनात जेवणाच्या वेळी जातीनिहाय निरनिराळे तट असतात. परंतु माझ्या नेतृत्वाखाली भरलेल्या बहिष्कृत परिषदेच्या वेळी सर्व जातीचे भोजन एकाच ठिकाणी झाले ह्यावरून जाती जातीत ऐक्यभाव उत्पन्न करण्याचे आम्ही किती प्रयत्न करीत आहोत यासंबंधीची चांगलीच कल्पना येईल.

इतकेही असून जर महारेतर जातींना महारांपासून निराळे राहण्याची इच्छा असेल तर त्यांनी खुशाल तसे करावे. त्यांनी स्वतंत्र राहून अस्पृश्योद्धाराचे काम केले तरी आमची ना नाही, पण त्यांनी विशिष्ट लोकांच्या छत्राखाली मात्र राहू नये अशी माझी विनंती आहे. काही ब्राह्मण अस्पृश्योद्धाराकरिता झटतात. ही गोष्ट जरी खरी असली तरी पुष्कळसे ब्राह्मण-ब्राह्मणेतर पक्षापेक्षा आपला पक्ष बलवान करण्याकरिताच अस्पृश्यांना जवळ करतात असे मला वाटते. आमच्या उद्धाराकरिताच केवळ निःस्वार्थ बुद्धीने जो ब्राह्मण अथवा मराठा प्रयत्न करील तसा आम्हास हवा आहे. आम्हास दुसऱ्यांच्या हातातील कोलीत होण्याची इच्छा नाही.

स्वार्थी बुद्धीने प्रेरित झालेल्या लोकांकडून अस्पृश्यता निवारण कार्य झाले तरी एक वेळ चिंता नाही, कारण अस्पृश्य राहून मिळणाऱ्या सवलतींच्या सहाय्याने आमची उन्नती करून घेणेच आम्हास सुलभ होईल असे मला वाटते. अस्पृश्यतानिवारण करण्याचा रा. माटे यांचा खरोखरी उद्देश नाही असे मला वाटते. अस्पृश्यांना जवळ करून ब्राह्मणेतरांना शह देण्याची त्यांची खटपट आहे. अशी माझी समजूत आहे. रा. माटे यांनी माझी समजूत चुकीची आहे, असे सप्रमाण सिद्ध केल्यास मी त्यांशी अवश्य सहकार्य करीन.

मुसलमानापासून बचाव व्हावा म्हणून अस्पृश्यतानिवारण करण्याचा डाव सध्या हिंदू सभा खेळत आहे असे मला वाटते. अशा स्थितीत महारेतर बंधूंना माझी एवढीच विनंती आहे की, त्यांनी कोणाच्याही कच्छपी लागू नये. मि. सकट यांनी '' दे दान सुटे गिराण '' असे ओरडून भीक मागितली तरी मला वाईट वाटणार नाही. पण ते जर रा. माटे यांच्या नादी लागतील तर मला अत्यंत खेद होईल. निराळे रहा; पण दुसऱ्यांचे बगलबच्चे होऊ नका एवढेच माझे त्यांना सांगणे आहे.

महार जातीचे पुढारीच कौन्सिलमधील जागा बळकावून बसतात असा आमच्यावर आक्षेप आहे. अस्पृश्यांच्या हक्कांचे संरक्षण करण्याकरिता कौन्सिलात लायक माणसेच जाणे इष्ट नाही काय ? महारेतरात माझ्यासारखा माणूस जन्माला आलेला नाही हे त्यांचे दुर्दैव होय. परंतु मला कौन्सिलच्या जागेची अभिलाषा नाही. महारेतरात जर जास्त लायक माणूस असेल तर त्याने खुशाल माझी जागा घ्यावी. मी आताच्या आता येथूनच राजीनामा पाठविण्यास तयार आहे. मी कौन्सिलमध्ये जेव्हा जेव्हा फक्त महार जातीच्या हिताकरताच झटतो आहे असा तुम्हास संशय येईल तेव्हा तुम्ही मला पत्राद्वारा आपल्या शंका ज़रूर कळवा म्हणजे मी सर्वांच्या शंकांचे ताबडतोब निरसन करीन.

सुशिक्षित व्हा म्हणजे अस्पृश्यता आपोआप जाईल असे स्पृश्य वर्गातील लोक आपणास सांगतात; पण नुसते सुशिक्षित होण्याने अस्पृश्यता निवारण होईल असे मानणे सर्वथैव चुकीचे आहे. मी एक उदाहरण देतो म्हणजे कळेल. मी अस्पृश्य आहे हे जोपर्यंत मुंबईच्या माझ्या चेंबर नजिक असणाऱ्या भटाला, खानावळवाल्याला माहीत नव्हते तोपर्यंत तो मला त्याच्या कपबशीतून चहा आणि भजी पुरवीत असे; पण परवा मी अस्पृश्य आहे, हे जेव्हा त्याला एका गुजराती वृत्तपत्रात प्रसिद्ध झालेल्या फोटोवरून कळले तेव्हापासून तो मला काचेच्या पेल्यातून चहा देऊ लागला. त्याला असे करण्यास अर्थात एका स्पृश्य वर्गातील कारकुनाने चिथावले होते. अशी स्थिती जेथे आहे तेथे सुशिक्षित झाल्यावर अस्पृश्यता आपोआप निघून जाईल असे म्हणणे कसे चुकीचे आहे हे दिसून येईल.

जर आम्ही आता चढाईचे धोरण स्वीकारले नाही तर आमचा निभाव लागणे शक्य नाही. आम्ही तुडविले जात आहोत याचे कारण आपणास आपल्या अपमानाचा राग येत नाही हेच होय. अन्यायाचा प्रतिकार आमच्या पूर्वजांनी केला नाही. ही त्यांची मोठी चूक होय. आता अपमान सहन करण्याचे दिवस संपले हे आपण आपणात संघटना करून लोकांच्या नजरेत आणले पाहिजे.

यापुढे ज्या ज्या अस्पृश्यांच्या परिषदा भरविण्यात येतील त्यांचे पर्यवसान देवळातून प्रवेश करणे, सार्वजनिक तळयात पाणी पिणे वगैरे गोष्टीमध्येच झाले पाहिजे असे माझे मत आहे. अस्पृश्यांची सभा आम्ही यंदा आळंदीस भरवणार आहोत. त्यावेळी काही झाले तरी तेथील देवालयात आम्ही प्रवेश करणारच. असे केले तरच आमचा कार्यभाग तडीस जाईल.

डॉ. आंबेडकर यांचे वरील आशयाचे भाषण झाल्यावर डॉ. साळुंखे यांनी थोडे भाषण करून गुजरातेतील अस्पृश्यांची महाराष्ट्रातील अस्पृश्यांच्या चळवळीस पूर्ण सहानुभूती आहे अशी ग्वाही दिली. नंतर वऱ्हाडातील रा. पंढरीनाथ पाटील यांचे भाषण चालू असताना मांगवाड्यात कोणी एक आजारी इसम मयत झाल्याकारणाने त्याच्या निधनानिमित्त सभेचे काम बंद ठेवण्यात आले.



## १२

# आपण धडा घालून दिला पाहिजे की, आपण कोणाहीपेक्षा कमी नाही

शनिवार, ता. १७ सप्टेंबर १९२७ रोजी रात्रौ ९ वाजता एल्फिन्स्टन रोड वरील डेव्हिड मिलच्या चाळीच्या कंपाऊंडात महाड येथे ता. २५ डिसेंबर पासून सुरू होणाऱ्या सत्याग्रहाबद्दलची पहिली जाहीरसभा डॉ. भीमराव आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. सभेस अस्पृश्य वर्गाच्या लोकांची अलोट गर्दी लोटली होती. सभेत मेसर्स गणपत जाधव, धोंडीराम गायकवाड, साळुंके बुवा, शिवतरकर यांची सत्याग्रह का करावा याबद्दल भाषणे झाली. नंतर अध्यक्ष डॉ. आंबेडकरसाहेब यांनी अगदी सोप्या भाषेत लोकांना सांगितले की,

सद्‌गृहस्थहो,

आपण सत्याग्रह का करावा या संबंधाने आपणास आता माझ्यापूर्वीच्या वक्त्यांनी सांगितले आहेच. अस्पृश्यता हा आपल्यावरील कलंक नव्हे पण आपल्या आईबहिणीवरील कलंक आहे कारण जे लोक आपणा स्वतःला स्पृश्य समजतात त्यांना असे वाटते की, माझी आई ही अस्पृश्य मनुष्याला जन्म देणाऱ्याच्या आईपेक्षा श्रेष्ठ आहे. परंतु खरे पाहू गेले असता असे आहे की, दरेक स्त्री नऊ महिन्यांनीच प्रसवत असते. तेव्हा कोणतीही स्त्री दुसऱ्या स्त्रीपेक्षा श्रेष्ठ नाही. म्हणून जो दुसऱ्याला आपणापेक्षा कमी समजतो त्याला आपण योग्य धडा घालून दिला पाहिजे की, मी कोणापेक्षाही कमी नाही. मनुष्य म्हटला की त्याचा धर्माच्या दृष्टीने हक्क सारखाच आहे. म्हणून आपणाला सत्याग्रह करून आपले हक्क प्रस्थापित केले पाहिजेत. या सत्याग्रहात ज्यांना भाग घ्यावयाचा असेल त्यांनी अवश्य घ्यावा, परंतु ज्यांना आपल्या कामधंद्याच्या अडचणीमुळे भाग घेता येणार नाही, त्यांनी फूल ना फूलाची पाकळी तरी द्रव्य रूपाने मदत करावी, अशी माझी आपणास विनंती आहे. नंतर अध्यक्षांचे व आलेल्या मंडळीचे आभार मानल्यावर सभा बरखास्त झाली.



---

बहिष्कृत भारत : ३० सप्टेंबर १९२७.

# १३

# बहिष्कृत विद्यार्थ्यांच्या कर्तव्यावरच बहिष्कृतांचे भवितव्य

बहिष्कृत विद्यार्थ्यांचे चतुर्थ वार्षिक सामाजिक सम्मेलन पुणे येथे बहिष्कृतांचे सुप्रसिद्ध पुढारी डॉ. भीमराव आंबेडकर, बार-ॲट-लॉ यांच्या अध्यक्षतेखाली रविवार, ता. २ ऑक्टोबर १९२७ रोजी उत्साहाने पार पडले. समारंभासाठी डी. सी. मिशनचा अहिल्याश्रम हॉल सुशोभित केला होता. सम्मेलनाचा कार्यक्रम शनिवार व रविवार असे दोन दिवस ठेवण्यात आला होता. शनिवारी विद्यार्थ्यांच्या संभाषणाचे व खेळांचे सामने झाले. या सामन्यात महार, मांग व चांभार या वर्गातील विद्यार्थ्यांनी भाग घेतला होता, हे नमूद करण्यास आनंद वाटतो. संभाषणात व खेळात बक्षीसे मिळविलेल्या विद्यार्थ्यांचा बक्षीस समारंभ रविवारी सायंकाळी ५ वाजता होणार होता. त्यासाठी नियोजित अध्यक्ष व बहिष्कृतांचे पुढारी. डॉ. भीमराव आंबेडकर, बार-ॲट-लॉ हे डॉ. सोळंकी, कदम वगैरे मंडळीसमवेत ५ वाजता येऊन दाखल झाले. अध्यक्षांच्या स्वागतासाठी गव्हर्नमेन्ट डी. सी. हॉस्टेल व डी. सी. मिशन या संस्थांच्या बालवीरांची पथके दारापाशी सज्ज होऊन राहिली होती. दरवाजापाशी अध्यक्ष येताच सुभेदार घाटगे यांच्या आधिपत्याखालील बालवीरांच्या पथकानी त्यांना खडी ताजीम दिली. यावेळी डॉ. आंबेडकर यांच्या जयजयकाराचा प्रचंड ध्वनी निघाला आणि या जयजयकारातच पाहुणे मंडळी आश्रमात येऊन दाखल झाली. नंतर उपहार आटोपल्यावर अध्यक्ष, विद्यार्थी व काही निमंत्रित पाहुणे यांचा ग्रुप फोटो घेण्यात आल्यावर ६ वाजता बक्षीस समारंभ सुरू झाला.

पाहुणे मंडळीत डॉ. सोळंकी, प्रि. तावडे, रा. श्रीधरपंत टिळक, रा. संगमनेरकर, कदम, ऐदाळे, बाराथ, भंडारे, राजभोज, लांडगे, वायदंडे, डी. सी. मिशनचे रा. पाताडे, सुभेदार घाटगे बंधु, गायकवाड, तसेच सेवासदनातील प्रौढ विद्यार्थिनी, ट्रेनिंग कॉलेजचे प्रौढ विद्यार्थी वगैरे मंडळी प्रामुख्याने दिसत होती. नंतर जॉ. सेक्रेटरी रा. रणपिसे यांनी निरनिराळया सामन्यातील बाबींचे मार्मिक विवेचन केले आणि अध्यक्षांनी स्वहस्ताने यशस्वी उमेदवारास बक्षीसे वाटली. नंतर अध्यक्षांनी आपले भाषण केले. त्यात त्यांनी बहिष्कृत वर्गाच्या सध्याच्या भयानक

---

बहिष्कृत भारत : ४ नोव्हेंबर १९२७.

व चिंताजनक परिस्थितीचे वर्णन करून अशा विषम, हिरमोड करणाऱ्या परिस्थितीत बहिष्कृत विद्यार्थ्यांनी आपले कर्तव्य यथायोग्य पार पाडण्यावर बहिष्कृतांचे भवितव्य अवलंबून आहे असे सांगितले. त्याचप्रमाणे बहिष्कृतातील सुशिक्षित स्त्रियांनीही आपले शील व कर्तव्य सांभाळून समाजाच्या प्रगतीस हातभार लावण्याचा उपदेश केला. सुशिक्षित असूनही केवळ अस्पृश्य मानले गेल्यामुळे बहिष्कृतातील लायक माणसांची कशी कुचंबणा होते हे त्यांनी प्रत्यक्ष उदाहरणे देऊन जेव्हा पटविले त्यावेळी सभागृहात भीषण गांभीर्य पसरले. डॉक्टरसाहेब मनापासून बोलत होते. त्यावेळी त्यांच्या जीवाची तळमळ व मनाची खळबळ त्यांच्या प्रत्येक शब्दात प्रतिबिंबित होत होती. एकंदरीत अध्यक्षांचे भाषण अस्खलित, जोरदार व चित्ताकर्षक झाले. नंतर आभारप्रदर्शन झाल्यावर अध्यक्षास पुष्पहार घालण्यात आला व अशारीतीने हा संस्मरणीय प्रसंग पार पडला.



# १४

# अस्पृश्यता व सत्याग्रहाची सिद्धी

अमरावती येथील इंद्रभुवन थिएटरात वऱ्हाड प्रान्तिक अस्पृश्य परिषदेचे, दुसरे अधिवेशन दिनांक १३ व १४ नोव्हेंबर १९२७ ला आयोजित करण्यात आले होते.

दिनांक १३ नोव्हेंबर १९२७ रोजी सभेचे नियोजित अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे बडनेरा मुक्कामी श्री. गवई, एम. एल. सी. यांनी स्वागत केल्यावर अध्यक्ष व इतर मंडळी बरोबर दुपारी १-३० वाजता अमरावती मुक्कामी पोहचली. स्टेशनवर स्वागतार्थ स्पृश्यास्पृश्यांचा बराच मोठा समुदाय जमला होता. सभेच्या कामास बरोबर साडे तीन वाजता सुरुवात झाली. प्रथमतः अस्पृश्य वर्गापैकी काही मुलांनी गोड व मंजूळ आवाजात स्वागतपर पदे म्हणून दाखविली व डॉ. पंजाबराव देशमुख ह्यांनी, लवकरच होणार असलेल्या श्रीअंबादेवी मंदीराच्या सत्याग्रहाच्या दृष्टीने आजच्या सभेचे महत्त्व प्रतिनिधींना समजावून सांगितले व नंतर डॉ. आंबेडकर ह्यांची ओळख करून देऊन त्यांना त्यांनी अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती केली. त्यास मोर्शीचे सुप्रसिद्ध ब्राह्मणेतर पुढारी नानासाहेब अमृतकर ह्यांनी दूजोरा दिला व सत्याग्रह कमेटीचे चिटणीस श्री. नाईक व अध्यक्ष श्री. गवई, एम्. एल्. सी. ह्यांनी अनुमोदन दिल्यावर डॉ. आंबेडकर हे टाळ्यांच्या प्रचंड गजरात स्थानापन्न झाले. त्यांनी सुरवातीला आजच्या सभेचे अध्यक्षस्थान आपल्याला दिल्याबद्दल स्वागतमंडळाचे व प्रतिनिधींचे आभार मानून, आपले भाषण केले.

ते आपल्या अध्यक्षीय भाषणात म्हणाले,

**न जानपदिकं दुखमेकः शोचितुमर्हति ।**
**अशोचन्प्रति कुर्वीत यदि पश्येदुपक्रमम् ।।**

'' जे दुःख सार्वजनिक आहे त्याचा शोक करीत बसणे योग्य नाही. त्यासाठी रडत न बसता त्याच्या प्रतिकारार्थ आपणाला इलाज सुचेल तर तो ज्ञानी पुरुषाने करावा.''

**अपहाय निजं कर्म कृष्ण कृष्णेति वादिनः।**
**ते हरेद्वेषिणः पापाः धर्मार्थं जन्म यद्धरेः ।।**

'' आपले कर्म सोडून केवळ 'हरि हरि' म्हणत बसणारे लोक हरीचे द्वेष्टे व पापी होत कारण, हरीचा जन्म तरी धर्मरक्षणार्थच आहे.''

---

बहिष्कृत भारत : २५ नोव्हेंबर १९२७.

अस्पृश्य व स्पृश्य हे एकाच धर्माचे लोक आहेत, ही गोष्ट उभयपक्षी मान्य आहे. स्पृश्य लोक अस्पृश्यांना, तुम्ही हिंदू नाहीत असे केव्हाच म्हणत नाहीत. उलट १९१० सालच्या खानेसुमारीच्या वेळी जेव्हा काही मुसलमान लोकांच्या कारवाईमुळे अस्पृश्यांची गणना हिंदूत करू नये, अशी एक टूम निघाली तेव्हा स्पृश्यांपैकी सुधारकांनीच नव्हे तर सनातनीयांनीसुद्धा अस्पृश्य हे हिंदू आहेत असे एकाच अट्टाहासाने सांगितले. त्याचप्रमाणे अस्पृश्यांनीही आपणास अहिंदूत न गणता हिंदुतच गणावे अशी कबुली दिली. आपण एकधर्मीय आहोत, ही भावना उभयपक्षात पुरातन कालापासून चालत आलेली आहे, हे जरी खरे आहे तरी अस्पृश्यांच्या दृष्टिकोनात आज मोठाच फरक पडलेला दृष्टीस पडतो. आपण जर हिंदुधर्मीय आहोत तर इतर हिंदुधर्मीयांना जे हक्क आहेत ते हक्क आपणास का असू नयेत ? ज्या पाणवठ्यावर ते पाणी भरतात त्यावर आपणास का भरता येऊ नये ? ज्या देवळात जाऊन ते पूजा करितात त्या देवळात आपणास का जाता येऊ नये ? अशा प्रकारचे समानतेचे प्रश्न ते पुढे करीत आहेत व त्या प्रश्नांनुरूप जे हक्क त्यांना प्राप्त झाले पाहिजेत ते प्राप्त करून घेण्याचा आग्रह धरण्यास ते प्रवृत्त झाले आहेत. कोणीही मनुष्य जुने सोडून नव्याच्या मागे लागला तर जे आपण करतो ते योग्य आहे किंवा अयोग्य आहे, याविषयींचा संशय त्याच्या मनात उत्पन्न झाल्याशिवाय राहत नाही. जुने हे परंपरेने पुनीत झालेले असते व म्हणून सर्वांना त्याच्या सत्यतेबद्दल खात्री वाटते. नव्याला परंपरा नसते आणि म्हणून ते दिसावयास कितीही गोंडस असले तरी त्याचे अनुकरण करण्यास लोक कचरतात. समान हक्काचा आग्रह धरणाऱ्या अस्पृश्यांचीही या नवीन धोरणाच्या बाबतीत अशाच प्रकारची मनःस्थिती असणे अगदी साहजिक आहे. यापूर्वी आपण कधी देवळात गेलो नाही ! कधी पाणवठ्यावर गेलो नाही ! तसे करण्याचा आपण आग्रह धरावा असे लोक म्हणतात, परंतु आपला हा आग्रह सत्याग्रह होईल काय अशी जर शंका अस्पृश्यांच्या मनात उद्भवली तर ती मनुष्य स्वभावास धरूनच होईल. कारण कोणत्याही कार्यात यश प्राप्ती होईल किंवा नाही, हे जितके साधनसामग्रीच्या प्रमाणावर अवलंबून आहे तितकेच ते कार्याच्या नैतिक स्वरूपावरही अवलंबून आहे. कार्याच्या मुळाशी जर सत्य असेल तर त्यात यशप्राप्ती होण्यास चिंता करण्याचे विशेष कारण उरत नाही. कारण अखेर सत्याचा नेहमीच जय होतो. तेच कार्याच्या मुळाशी असत्य असेल तर त्यातील यशप्राप्ती कठीण जाते. यास्तव आपल्या कार्याचे नैतिक स्वरूप काय आहे याची दरेक अस्पृश्याने पूर्ण ओळख करून घेतली पाहिजे. ती ओळख व्हावी म्हणून देवळात जाण्याचा अस्पृश्यांचा आग्रह सत्याग्रह आहे किंवा दुराग्रह आहे याचा विचार करणे आवश्यक आहे.

सत्याग्रहाच्या बाबतीतील पहिली गोष्ट म्हटली म्हणजे सत्य कोणते व असत्य कोणते हे ठरविणे ही होय. कारण सत्य म्हणजे काय हेच जर निश्चितपणे ठरविता आले नाही, तर सत्याग्रहाची इमारत केव्हाही डळमळीतच राहणार. आपला आग्रह सत्याग्रह आहे की नाही या विषयी जर सत्याग्रही माणसाची खात्री नसेल तर त्याच्या हातून सत्याग्रह पार कसा पडणार ? कारण सत्याग्रहातील यशप्राप्ती नेहमीच सत्याग्रही माणसाच्या आत्मबलावर अवलंबून असणार व हे आत्मबल त्याच्या ठायी प्रगट होण्यास आपण जे करीत आहोत ते सत्य आहे अशी भावना ठाम झाली पाहिजे. ती भावना जर संशयात्मक असली तर त्याच्या ठायी सत्याग्रहास अवश्य असलेले आत्मबल मुळीच प्रगट होणार नाही. म्हणून सत्य म्हणजे काय याची खूण सत्याग्रही माणसास पटणे अवश्य आहे. आमच्या मते थोडक्यात सांगावयाचे म्हणजे ज्या कार्यापासून लोकसंग्रह होत आहे ते सत्कार्य आहे व त्यासाठी केलेला आग्रह त्यास सत्याग्रह म्हणावे. आता लोकसंग्रहाच्या बाबतीत मतभेद होणे शक्य आहे. एकाला जे लोकसंग्रहाचे कार्य वाटते, तेच दुसऱ्याला लोकविग्रहाचे कार्य आहे असे वाटेल. तरीपण एक गोष्ट मान्य करावी लागेल की कर्त्याची बुद्धि जर शुद्ध नसेल म्हणजे स्वार्थमूलक हेतूने जर तो कार्य करण्यास प्रवृत्त होत असेल तरच लोकविग्रहाच्या कामाकडे त्याचा कल होईल. तेच कर्त्याच्या मनात जर समभाव जागृत असेल तर त्याच्या हातून लोकविग्रहाचे काम मुळी होणारच नाही. कारण स्वार्थाचा ओढा नसल्यामुळे त्याची वासना लोकसंग्रहाकडेच असणार म्हणून या दोन तत्त्वाचा आधार घेऊन जेथे समभाव आहे तेथे लोकसंग्रह आहे व जेथे लोकसंग्रह आहे तेथे सत्कार्य आहे आणि अशा कार्याविषयीचा जो आग्रह तो सत्याग्रह होय, अशी आम्ही सत्याग्रहाची व्याख्या करतो.

ही विचारसरणी आमची नव्हे. आम्ही ती गीतेवरून घेतली आहे. सत्याग्रहाच्या बाबतीत आम्ही गीतेचा आधार घेतो याचे काही जणांना आश्चर्य वाटेल. कारण सत्याग्रह हा काही गीतेचा विषय नाही अशी साधारणपणे लोकांची समजूत आहे. पण आमच्या मते ती समजूत अगदी चुकीची आहे. सत्याग्रह हाच गीतेचा मुख्य प्रतिपाद्य विषय आहे व गीता का उपदेशण्यात आली हे नीटपणे ध्यानात घेतले असता आमच्या म्हणण्याची सत्यता सहज पटण्यासारखी आहे. गीतेत अर्जुनाने कोणता प्रश्न केला व त्यास श्रीकृष्णाने काय उत्तर दिले त्याकडे जर कोणी लक्ष पुरविले तर असे दिसून येईल की, अर्जुन रथाखाली बसल्यानंतर, ''बसू नकोस, तुझे राज्याधिकार ज्यांनी घेतले त्यांच्याशी युद्ध करण्याचा आग्रह धर'', असे जेव्हा श्रीकृष्ण परमात्मा त्यास म्हणाला तेव्हा,

'' सांग, तुझा आग्रह सत्याग्रह कसा? '' असा अर्जुनाने प्रश्न केला व त्या एकच एक प्रश्नास गीता हे भगवंताने दिलेले उत्तर आहे. अर्थात या गीता ग्रंथात सत्याग्रहाशिवाय दुसरा मुख्य प्रतिपाद्य विषय असणे शक्य नाही. अस्पृश्य लोक स्पृश्यांच्या समान हक्क मागण्याचा जो आग्रह धरतात तो आग्रह सत्याग्रह आहे किंवा नाही, हे ठरविण्याकरिता जो आम्ही गीतेचा आधार दिला आहे, तो गीता ही सत्याग्रहावर एक मीमांसा आहे, म्हणून तर दिला आहेच. परंतु या कामी गीतेचा आधार देण्याचे दुसरेही एक कारण आहे. ते हे की, हा धर्मग्रंथ उभय पक्षांना–स्पृश्यांना तसाच अस्पृश्यांना-मान्य आहे. अन्य कोणत्याही ग्रंथाचा आधार जर आम्ही दिला असता तर निमित्तास टेकलेले स्पृश्य लोक यांनी तुमचा आधार आम्हास मान्य नाही असे म्हणावयास मागे पुढे पाहिले नसते. अस्पृश्यांनी आरंभिलेला सत्याग्रह जर गीतेच्या कसोटीस उतरला तर त्यास विरोध करण्यास स्पृश्य लोकांस मुळी तोंडच उरणार नाही. कारण तसे करणे म्हणजे पर्यायाने गीता अमान्य केल्यासारखेच होणार आहे.

आता हा अस्पृश्यांचा सत्याग्रह गीतेच्या कसोटीस उतरतो की काय हे पाहू. प्रथमतः आपण आरंभिलेले कार्य हे लोकसंग्रहाचे कार्य आहे काय ? अस्पृश्यता जाऊन आपण स्पृश्य व्हावे एवढ्या पुरतीच या चळवळीची व्याप्ती आहे असे काही लोक मानितात. परंतु तसे मानणे चुकीचे आहे. अस्पृश्यतेमुळे अस्पृश्यांचेच नुकसान झाले आहे असे नसून त्यांच्या बरोबर स्पृश्यांचे तसेच देशाचेही अपरिमित नुकसान झालेले आहे. अस्पृश्यतेच्या कलंकाने अस्पृश्यच कलंकीत झालेले आहेत असे नव्हे तर स्पृश्यही कलंकीत झाले आहेत. ज्यास कमी मानण्यात येते, त्यात त्यांचा अवमान होतोच पण जे कमी मानितात त्यांचीही नीति खालावलेली होते. अस्पृश्य लोक अस्पृश्यतेच्या गर्तेतून निघून त्यांचे आत्मस्वातंत्र्य त्यास प्राप्त झाले तर ते केवळ आपली उन्नती करतीलच, इतकेच नव्हे तर ते आपल्या पराक्रमाने, बुद्धीने, उद्योगाने देशाच्या भरभराटीस कारणीभूत होतील. अशा दृष्टीने पाहिले तर अस्पृश्यतानिवारणाची चळवळ ही केवळ पतितोद्धाराची चळवळ नसून खऱ्या लोकसंग्रहाची चळवळ आहे. अस्पृश्यांना स्वार्थाकडे नजर ठेवून फक्त आपलाच उद्धार करून घ्यावयाचा झाल्यास सत्याग्रहासारखे खडतर असिधाराव्रत पत्करण्याचे काहीच कारण नाही. कारण, ज्या माणुसकीसाठी व ज्या समतेच्या वागवणुकीसाठी ते आज धडपड करीत आहेत ती माणुसकी प्राप्त होण्यासाठी त्यांनी जर धर्मांतर केले तर त्यांची कार्यसिद्धी सहज होण्यासारखी आहे आणि अस्पृश्यता निवारणाच्या कामी ज्या शक्तिचा त्यांना व्यय करावा लागत आहे, तीच शक्ती त्यांना आपल्या शैक्षणिक व आर्थिक उपयोगाला लावता

येईल. हिंदू धर्मीय लोकांच्या आचारात एक मोठी गंमत आहे. ती ही की, जोपर्यंत एखादा माणूस हिंदू समाजाचा घटक असतो तोपर्यंतच हिंदू धर्माने घालून दिलेल्या श्रेयानिःश्रेयाचे, पापपुण्याचे व स्पर्शास्पर्शाचे यमनियम त्याला लागू पडतात. परंतु त्याच माणसाने जर हिंदू धर्माचा लागाबांधा तोडला व निराळ्या धर्माचा, समाजाचा घटक झाला तर त्याला हिंदू धर्माने घालून दिलेले श्रेयानिःश्रेयाचे, पापपुण्याचे व स्पर्शास्पर्शाचे यमनियम लागू पडत नाहीत. त्याला मानव धर्माने घालून दिलेल्या श्रेयानिःश्रेयाच्या, पापपुण्याच्या व स्पर्शास्पर्शाच्या यमनियमाप्रमाणे वागविण्यात येते. अस्पृश्यांचा जसा स्पृश्य लोक विटाळ मानतात तसा कुत्र्यामांजरांचा अगर मुसलमानांचा का मानीत नाहीत या प्रश्नाचे उत्तर यातच आहे. अस्पृश्यांना हिंदू धर्माशी लागाबांधा असल्यामुळे त्यांना हिंदू धर्माच्या यमनियमाप्रमाणे वागविले जाते. कुत्र्यामांजरांचा तसाच मुसलमानांचा हिंदू धर्माशी लागाबांधा नसल्याकारणाने त्यांना मानव धर्माच्या यमनियमाप्रमाणे वागविण्यात येते. ही खुबी अस्पृश्यांना माहीत नाही असे नाही. त्यांना पूर्णपणे माहीत आहे की, एखादा अस्पृश्य हिंदू धर्मात राहिला असता त्यास स्पृश्य हिंदुंकडून कमी लेखण्यात येते. परंतु तोच ख्रिस्ती किंवा मुसलमान झाला तर त्यास तेच हिंदू लोक असे आपल्यासमान वागवितात. तथापि, अस्पृश्यतानिवारणाचा हा साधा सोपा उपाय न करता परधर्मात जाऊन हिंदुधर्मास क्षय लागू देण्याऐवजी त्यातच राहून आपल्यात असेल तितकी शक्ति खर्च करून आपली माणुसकी मिळवावी, असा जो त्यांनी निश्चय केला आहे, त्यावरुन त्यांनी आरंभिलेले कार्य स्वतः च्या उद्धारापुरते नसून हिंदू धर्माच्या उद्धाराकरिता आहे, हेच खरे आहे. तसेच जे अस्पृश्य लोक ही चळवळ करीत आहेत त्यांच्या ठायी समभाव नाही, असेही कोणास म्हणता यावयाचे नाही. कारण अस्पृश्यांची मागणी विशेष हक्कासाठी नसून ती समान हक्कासाठी आहे. हिंदुमात्राचे जे हक्क आहेत ते फक्त आम्हालाच असावेत इतरांना असू नयेत, अशी काही अस्पृश्यांची मागणी नाही. स्पृश्यांना जे हक्क आहेत, तसेच हक्क आपल्यालाही असावेत अशी त्यांची समतेची मागणी आहे. यास्तव गीतेत सांगितलेल्या कसोटीला लावून पाहिली असता अस्पृश्यांचा आग्रह हा सत्याग्रह आहे असेच म्हणावे लागेल.

अस्पृश्यांचे कार्य हे राष्ट्रकार्य आहे असे कबूल करूनही अस्पृश्यास देवळात प्रवेश करण्याचा मुळी अधिकारच नाही असे म्हणणारे काही समाजकंटक आढळतात. त्यापैकी, काही जणांचा युक्तिवाद दिसावयाला इतका मोहक दिसतो की, तो वाचून आपली बाजू लंगडी आहे की काय असा भ्रम उत्पन्न होतो. या विरोधी लोकांचे असे म्हणणे आहे की, स्पृश्यांच्या देवळात गेल्यानेच उपासना घडते म्हणून जर अस्पृश्य लोक देवळात जाण्याचा प्रयत्न

करीत असतील तर ते खरे नाही. कारण नमाज पढणे हे एकच जसे मुसलमानी धर्मपालनाचे लक्षण आहे, तसे स्पृश्यांच्या देवळातील देवांचे दर्शन घेणे एवढेच काय ते हिंदुधर्मपालनाचे लक्षण आहे असे नव्हे. साकाराचे प्रत्यक्ष पूजन, निराकाराचे ध्यान आणि परमेश्वराचा नुसता नामोच्चार असे उपासनेचे विविध मार्ग हिंदू धर्मात सांगितलेले आहेत. या उपासनेपैकी, कोणतीही उपासना अस्पृश्यांनी करू नये असे आम्ही काही म्हणत नाही; व त्यापैकी कोणतीही एक केली तरी हिंदुत्वाला ती पुरेशी आहे. उपासनेचे, उपास्याचे नानाविध प्रकार जोपर्यंत हिंदू समाजात रूढ आहेत तोपर्यंत स्पृश्यांच्या देवळात गेल्यानेच उपासना घडते ह्या अस्पृश्यांच्या म्हणण्यात काही अर्थ नाही असे त्यांना वाटते. या आक्षेपकास आमचे उत्तर असे आहे की हिंदू समाजात उपासनेचे नानाविध प्रकार आहेत आणि त्यापैकी कोणत्याही एका प्रकारची उपासना केली तरी हिंदुधर्मपरिपालन घडते असे जरी मान्य केले तरी ज्या कोणास साकाराचे प्रत्यक्ष पूजन करावेसे वाटत असेल त्याला तशा प्रकारची मोकळीक का असू नये ? हा उपासनेचा मार्ग एकास खुला तर तो दुसऱ्यास बंद का असावा ? आणि ज्या अस्पृश्यांना तो बंद आहे त्यांनी तो खुला करून घेण्याचा आग्रह धरिला तर तो वाजवी होणार नाही काय ? उपासनेचे नानाविध प्रकार जेथे असतील तेथे दर एक व्यक्तीला स्वतः साठी उपासनेचा योग्य प्रकार कोणता हे ठरविण्याचा हक्क असलाच पाहिजे. अस्पृश्य लोक जे भांडत आहेत ते या हक्कासाठी भांडत आहेत. त्यांची बाजू लंगडी आहे असे म्हणणे शुद्ध लपंडाव आहे.

या विरोधी लोकांचा दुसरा असा कोटीक्रम आहे की, स्पृश्य लोक आपल्या देवळात येऊन अस्पृश्यांना देवदर्शन घेऊ देत नसले तरी देव ज्याचा त्यास स्थापण्यास स्वातंत्र्य आहेच. ज्या अस्पृश्यास साकाराचे प्रत्यक्ष पूजन हा उपासनेचा मार्ग पसंत असेल त्यांनी निराळा देव स्थापन करावा. स्पृश्य हिंदू समाजाने हे स्वातंत्र्य त्यांना दिले आहे. केवळ उपासनेसाठी अस्पृश्यांना स्पृश्यांच्या देवावर हक्क सांगण्याचे काही कारण नाही. हा कोटीक्रम जे पढतमूर्ख लढवितात त्यांना आमचा असा सवाल आहे की, रेल्वे अधिकाऱ्यांनी जर गोऱ्या लोकांसाठी निराळे व काळ्या लोकांसाठी निराळे आगगाडीचे डबे राखून ठेवले तर ती व्यवस्था तुम्हाला का मान्य नाही व त्याविरूद्ध तुम्ही तक्रार का करता ? रेल्वे अधिकाऱ्यांनी जरी गोऱ्या लोकांकरिता निराळा डब्बा राखून ठेवला असला तरी इतर डब्यातून प्रवास करण्याची तुम्हास मोकळीक आहे. तुम्हाला प्रवासच करावयाचा आहे आणि त्यासाठी निराळ्या डब्यात बसून जाण्याचे स्वातंत्र्य तुम्हास दिले असता गोऱ्या लोकांसाठी राखून ठेवलेल्या

डब्यावर तुम्ही हक्क काय म्हणून सांगावा ? याला उत्तर एकच व ते हे की, हा प्रश्न नुसता प्रवासापुरता नसून समानतेचाही आहे. वरील कोटीक्रमास अस्पृश्यांचे उत्तरही त्याच अर्थाचे आहे. अस्पृश्य लोक देवळात शिरण्याचा जो आग्रह करीत आहेत ते केवळ साकाराचे प्रत्यक्ष पूजन करता यावे म्हणून नव्हे. अस्पृश्य लोकांना देवळात प्रवेश करून जी गोष्ट सिद्ध करून द्यावयाची आहे ती ही की, त्यांच्या प्रवेशाने देवालय भ्रष्ट होत नाही किंवा देवळातील मूर्तीला स्पर्श केला असता तिचे पावित्र्य कमी होत नाही. ते सिद्ध करण्यांस निराळ्या देवतेची स्थापना करून कार्यभाग होत नाही. तर ज्या देवाच्या ठायी पावित्र्य कल्पून स्पृश्य लोक ज्याची उपासना करितात त्याच देवाची उपासना करण्याचा आग्रह अस्पृश्यांनी धरणे प्राप्त आहे. त्याशिवाय अस्पृश्यांचा हेतू तडीस जात नाही. फक्त पाप्यांच्या स्पर्शानेच देवाचे पावित्र्य ढळू शकते, आमच्या स्पर्शाने ते ढळणार नाही, कारण आम्ही पापी नाहीत, असे अस्पृश्यांचे म्हणणे आहे. यावरुन देवाच्या उपासकात कोणी पवित्र कोणी अपवित्र असा भेद नाही हे त्यांच्या चळवळीचे तत्त्व आहे हे उघड होत आहे आणि म्हणूनच ते स्पृश्यांनी प्रस्थापित केलेल्या मूर्तीची उपासना करण्याचा आग्रह करीत आहेत. हा त्यांचा आग्रह सत्याग्रह नाही असे कोण म्हणेल?

अस्पृश्यांच्या सत्याग्रहाविरुद्ध वर नमूद केलेले आक्षेप काढूनच हे स्वस्थ बसले नाहीत. त्यांनी काही व्यावहारिक आक्षेपही रचिले आहेत. या मुद्यावर त्यांचे म्हणणे असे आहे की, स्पृश्यांनी आपली मंदीरे अस्पृश्यांना खुली करून दिली पाहिजेत हे संघटनवाल्यांचे म्हणणे निराळे आणि अस्पृश्यांनी स्पृश्यांना तुम्ही आपली मंदीरे आम्हास खुली करून द्या नाही तर सत्याग्रह करून त्यावर हक्क सांगतो हे म्हणणे निराळे. कारण स्पृश्यास्पृश्यभेद हा अनंतकाळापासून चुकीने पडला असो अगर योग्य न्यायाने पडलेला असो, पण तो पडल्यावरच जर आम्ही स्पृश्यांनी देवस्थाने उभारली आणि चालविली तर त्यावर अस्पृश्यांनी हक्क काय म्हणून सांगावा व तसा ते सांगू लागले तर ते न्याय्य होईल काय? अस्पृश्यांच्या सत्याग्रहाचा प्रश्न निव्वळ स्पृश्यास्पृश्य या विचाराचाच नाही तर न्यायान्यायाचाही आहे. या विचारसरणीवर या विरोधी लोकांची इतकी भिस्त आहे की, त्यांच्या मते अमरावती येथील अंबादेवीच्या पंचांनी अस्पृश्यांचा अर्ज केराच्या टोपलीत फेकला असला तरी वहिवाट व कायदा हा निरंतरचा त्यांच्या बाजूला होता, कारण सर्वतोपरी समाजातील इतर सर्व बाबतीतील अस्पृश्यता गेली तरी एक जरी पंच वहिवाट नाही, असे म्हणणारा असला तरी कायद्याच्या जोरावर व न्यायाच्या हक्काने तो अस्पृश्यास मनाई करू शकेल. हा आक्षेप देखील अगदी नादानपणाचा आहे. स्पृश्यांनी देवळे बांधिली आणि चालविली ही गोष्ट

अस्पृश्यांसही कबूल करणे प्राप्त आहे. तेवढ्यावरून स्पृश्यांना तुम्ही आपली मंदीरे आम्हास खुली करून द्या असे म्हणण्याचा हक्क अस्पृश्यांस पोचत नाही हे कोणीही कबूल करणार नाही. कारण ही देवळे जरी स्पृश्यांनी बांधिली असली तरी ती हिंदू धर्माची असून हिंदुधर्मियांकरिता बांधलेली आहेत. हा दाय एकाने कोणी केला असला तरी तो सर्व हिंदूंच्या उपयोगाकरीता केलेला आहे. अर्थात जो हिंदू आहे त्या दरेकाला या देवळात जाऊन उपासना करण्याचा अधिकार प्राप्त होतोच. तसेच हिंदुत्त्व ही जितकी स्पृश्यांची मत्ता आहे तितकीच अस्पृश्यांचीही आहे. या हिंदुत्त्वाची प्राणप्रतिष्ठा जितकी वसिष्ठासारख्या ब्राह्मणांनी, कृष्णासारख्या क्षत्रियांनी, हर्षासारख्या वैश्यांनी व तुकारामासारख्या शूद्रांनी केली तितकीच वाल्मिकी, चोखामेळा व रोहिदास इत्यादी अस्पृश्यांनीही केलेली आहे. या हिंदुत्वाचे रक्षण करण्यासही हजारो अस्पृश्यांनी आपली माणुसकी खर्ची घातलेली आहे. व्याधगीतेतील अस्पृश्यद्रष्ट्यापासून तो खर्ड्याच्या लढाईतील सिदनाक महारापर्यंत ज्या अस्पृश्यांनी हिंदुत्त्वाच्या संरक्षणार्थ आपले शीर हातावर घेतले त्यांची संख्या लहानसहान होणार नाही. ज्या हिंदुत्त्वाची रास स्पृश्य व अस्पृश्य या उभयतांनी मुठमुठ टाकून वाढविली आणि तीवर घाला आला असता जिवाची पर्वा न करिता तिचे रक्षण केले, त्या हिंदुत्त्वाच्या नावाखाली उभारलेली मंदिरे जितकी स्पृश्यांची तितकीच अस्पृश्यांचीही आहेत. त्यावर जितका स्पृश्यांचा तितकाच अस्पृश्यांचा वारसा आहे. एक अधिकारी व दुसरा उपरी असे कधीच म्हणता यावयाचे नाही. अस्पृश्य लोक उपरी नाहीत ते हिंदू आहेत. हिंदू धर्म त्यांचा आहे व ते हिंदू धर्माचे आहेत. एवढ्यावरूनच हिंदुंच्या मंदिरावर अस्पृश्यांचा वारसा आहे ही गोष्ट सर्वास कबूल करणे प्राप्त आहे आणि वारसा मान्य केला, मग जुन्या वहिवाटीचा प्रश्नच शिल्लक राहात नाही. कारण कायद्याच्या दृष्टीने पाहता सार्वजनिक बाबतीतील व्यक्तिमात्रांचा हक्क कोणास काही सनद देऊन निर्मित करावयाचा नसतो, तो दरेकाच्या अंगी कायमचा वसत असतो. त्याची वहिवाट नसली किंवा त्याच्या वहिवाटीत जरी खंड पडला असला तरी तेवढ्यावरून तो हिरावला जात नाही. एखादा मनुष्य पूर्वी एकाद्या रस्त्यावरून गेला नाही म्हणून त्यास पुढे त्या रस्त्यावरून जाता येणार नाही हे म्हणणे जितके मूर्खपणाचे होणार आहे तितकेच तो एखाद्या सार्वजनिक पाणवठ्यावर अथवा देवालयात पूर्वी कधी गेला नाही म्हणून त्यास आता जाता येणार नाही हे म्हणणे मूर्खपणाचे होणार आहे. तेव्हा हे न्यायाचे पारडे आपल्याकडे फिरत नाही व आपला जो आग्रह आहे तो सत्याग्रह आहे, याबद्दल कोणाही अस्पृश्याने आपल्या मनात कोणत्याही प्रकारची शंका

बाळगण्याचे काही कारण नाही. इतकेच नव्हे तर हिंदू धर्माला उर्जीत अवस्थेस आणून त्यास साऱ्या मानवाचा धर्म व्हावा म्हणून त्यास मानव धर्माचे रूप देण्यासाठी अवतरलेले आपण देवदूत आहोत असेही त्यांनी मानण्यास काही हरकत नाही.

येथवर अस्पृश्यांचा समान हक्क मिळविण्याचा जो आग्रह आहे, तो सत्याग्रह आहे किंवा नाही, याची चर्चा केली आहे. आता हा सत्याग्रह अस्पृश्य लोकांनी पार कसा पाडावयाचा याचा विचार करू. प्रथमतः सत्याग्रहाची रीत कशी असावी हे निश्चित झाले पाहिजे. महात्मा गांधी हे आधुनिक काळातील सत्याग्रहाच्या चळवळीचे पुरस्कर्ते आहेत. आणि सत्याग्रहाची रीत म्हणजे म. गांधींनी घालून दिलेली रीत याशिवाय दुसरी रीत असू शकणार नाही, असा समज सर्वत्र पसरलेला दिसतो. म. गांधींच्या सत्याग्रहाची जी रीत आहे तीत त्यांनी हिंसेला वाव ठेवलेला नाही, इतकेच नव्हे तर, जेथे हिंसा आहे तेथे सत्याग्रह नाही असे त्यांचे मत आहे. हे म. गांधींचे म्हणणे तर्कशुद्ध आहे ह्याबद्दल एकमत होणे शक्य नाही असे आम्हास वाटते. अमूक एका माणसाचा आग्रह सत्याग्रह आहे किंवा दुराग्रह आहे हे त्या आग्रहाच्या सिद्धिसाठी योजिलेल्या साधनांवर अवलंबून नसते. ते सर्वस्वी ज्या त्या कार्याच्या नैतिक स्वरूपावर अवलंबून असते. ते कार्य जर सत्कार्य असेल तर त्या बाबतीत धरलेल्या आग्रहास सत्याग्रह म्हटलेच पाहिजे. आणि तेच जर असत्य असेल तर त्या बाबतीत त्याने धरलेल्या आग्रहास दुराग्रह म्हणावे लागेल. हिंसा, अहिंसा ही केवळ आग्रहाच्या सिद्धिची साधने आहेत. जसे कर्माच्या किंवा कर्त्याच्या अनुरोधाने क्रियापदाचे रूप बदलते तसे काही साधनाच्या अनुरोधाने आग्रहाचे नैतिक स्वरूप बदलत नाही. कारण एखाद्या दुराग्रहीने आपला आग्रह पार पाडण्यास अहिंसेचा मार्ग पत्करला म्हणून त्याच्या दुराग्रहाला सत्याग्रह म्हणता यावयाचे नाही किंवा एखाद्या सत्याग्रहीने सत्याग्रहाच्या सिद्धिसाठी हिंसा केली एवढ्यावरून त्याच्या सत्याग्रहाला दुराग्रह म्हणता येणार नाही. तसे जर झाले तर गीतेत श्रीकृष्ण परमात्म्याने अर्जुनास सत्याग्रहाच्या सिद्धिसाठी जो हिंसेचा मार्ग पत्करण्यास भाग पाडले त्यास काय म्हणावे? तो पापात्मा होता काय? तसे म्हणण्यास कोणी हिंदू तयार होईल असे वाटत नाही; व इतर कोणी तसे म्हणण्यास तयार झाला तरी त्याचे म्हणणे सर्वांनाच पटेल, असे म्हणता यावयाचे नाही. कारण अहिंसा परमो धर्म : असे जरी सांगण्यात येते तरी सर्वच ठिकाणी अहिंसा धर्म पाळणे शक्य नाही. डोळ्यांनी न दिसले तरी तर्काने ज्याचे अस्तित्व समजते असे सूक्ष्म जंतू या जगात इतके भरले आहेत की,

आपण आपल्या डोळयांच्या पापण्या हालविल्या तर तेवढ्यानेच या जिवांचे हातपाय तुटून पडतील. हवेत, पाण्यात, फळांच्या वगैरे सर्व ठिकाणी जे शेकडो अत्यल्परूपजीव धरलेले आहेत त्यांची हत्या कशी बंद होणार? डॉ. जगदीशचंद्र बोस यांनी जे शास्त्रीय शोध लावले आहेत त्यावरून असे सिद्ध होते की वनस्पतीला देखील जीव आहे. मग या वनस्पतीचा संहार करणारे ब्राह्मण तसेच नाकाला फडकी बांधून हिंडणारे जैन तीर्थंकर यांनी अहिंसेचा टेंबा मिरविण्यात काय हशील आहे? तसेच सर्वच ठिकाणी अहिंसेने कार्यभाग होईल असे म्हणणे संयुक्तिक होणार नाही. समजा की, आपला जीव घेण्यास किंवा आपल्या पत्नीवर अगर आपल्या कन्येवर बलात्कार करण्यास अथवा आपल्या घरास आग लावण्यास, अगर आपली सर्व दौलत व स्थिरस्थावर हरण करण्यास एखादा दुष्ट मनुष्य हातात शस्त्र घेऊन सज्ज झाला व जवळ दुसरा कोणीही त्राता नाही, तर आपण काय करावे? असल्या दुष्ट मनुष्याची आपण अहिंसा परमो धर्मः म्हणून डोळे मिटून उपेक्षा करावी किंवा तो सामोपचाराने ऐकत नसल्यास त्यास यथाशक्ती शासन करावे? या दोहोंपैकी शेवटचाच मार्ग कोणीही झाला तरी तो पत्करल्याशिवाय राहणार नाही व त्याचे करणे अशास्त्र आहे, असे कोणीही म्हणणार नाही, कारण अशा वेळी हत्येचे पाप हत्त्या करणारास लागत नसून जो दुष्ट मरतो तो आपल्या अधर्मानेच मारिला जातो असे शास्त्रकर्ते म्हणतात. प्राचीन शासनकर्त्यांनीच नव्हे तर अर्वाचिन फौजदारी कायद्यानेही आत्मसंरक्षणासाठी हिंसा करण्याचा हक्क काही मर्यादा ठेवून कबूल केला आहे. हिंसा करणे हे जरी अयोग्य असले तथापि आत्मसंरक्षणाचे कार्य त्याशिवाय साधत नसल्यास हिंसा करणे रास्त आहे असे समजतात. भृणहत्त्या म्हणजे कोवळ्या पोराची हत्या अति गर्ह्य मानिली आहे. परंतु तेच पोर आडवे आले म्हणजे त्यास कापून काढावयास कोणी हरकत घेत नाही. हाच तर्कवाद सत्याग्रहाच्या सिद्धिस लागू करणे प्राप्त आहे व सत्याग्रही माणसास हिंसा करावी लागली तर त्यास ती क्षम्य आहे असे कारणपरत्वे म्हणावे लागेल. गांधींचा अहिंसात्मक सत्याग्रहाचा मार्ग अशा दृष्टीने पाहिले तर अव्यवहारिक ठरतोच. पण तो अहिंसात्मक आहे असे म्हणणे हा देखील निव्वळ भ्रम आहे. हिंसा म्हणजे हत्त्या करणे असा जर हिंसेचा संकुचित अर्थ केला तरच हिंसा आणि अहिंसा यांच्यात काही भेद करता येईल. परंतु हिंसा म्हणजे नुसता जीव घेणेच नव्हे तर दुसऱ्या प्राण्याचे मन किंवा शरीर यास इजा करणे याचाही त्यात समावेश होतो. अर्थात्, अहिंसा म्हणजे कोणाही सचेतन प्राण्यास न दुखविणे होय. असा जर हिंसा या शब्दाचा व्यापक अर्थ घेतला तर म. गांधींची अहिंसा ही एक प्रकारची हिंसाच आहे,

असे म्हणावे लागते. कारण त्यांच्या सत्याग्रहाची जी रीत आहे त्यामुळे इतर प्राण्यांच्या शरीरावर जरी आघात होत नसला तरी त्यांचे मन दुखविले जाते याबद्दल काही शंका नाही. गांधींच्या सत्याग्रही माणसाने मनुष्यवध जरी केला नाही तरी तो आपल्या आग्रहामुळे प्रतिपक्षाच्या मनाची शांतता भंग करतोच. असे असता आपल्या सत्याग्रहात हिंसा मुळीच होत नाही, असे जे म. गांधींचे म्हणणे आहे ते अपुरे आहे, असे म्हणणे प्राप्त होते. खरे म्हटले असता शक्य असेल तोवर अहिंसा व जरूर पडेल तर हिंसा, असे धोरण सत्याग्रही माणसांनी ठेवणे हे सिद्धिच्या दृष्टीने रास्त आहे, इतकेच नव्हे तर नीतीच्या दृष्टीनेही ते प्रशस्त आहे. गांधींनी अहिंसेवर जो इतका भर दिला आहे तो केवळ गांधी हे अहिंसावादी आहेत म्हणून नव्हे. भर देण्याचे त्यांचे कारण अगदी निराळे आहे. म. गांधी आपल्या सत्याग्रहाच्या मीमांसेत सत्य म्हणजे काय ? व ते कसे ठरविता येईल ? याबद्दल आपणास काही निश्चयात्मक अशी एकादी कसोटी उभी करता येत नाही असे म्हणतात. ज्याला आपण सत्याग्रह म्हणू त्यालाच लोक दुराग्रह म्हणू शकतील असे त्यांना वाटते. व हे त्यांचे मत त्यांनी हंटर कमिटीसमोर जी कैफियत लिहून दिली आहे तिच्यात स्पष्टपणे नमूद केले आहे. जेथे सत्याबद्दल प्रामाणिकपणे मतभेद असू शकेल, तेथे हिंसा करणे रास्त होणार नाही असे त्यांचे मत आहे आणि एवढ्याच कारणामुळे त्यांनी आपल्या सत्याग्रहाच्या साधनातून हिंसेला फाटा दिला आहे. यावरून उघड होत आहे की, जर कार्याच्या सत्यतेबद्दल द्विधा मत नाही अशी जर कोणी त्यांची खात्री करून दिली तर त्याप्रित्यर्थ आरंभिलेल्या सत्याग्रहाच्या सिद्धिसाठी हिंसा करावी लागली तर गांधी त्यास मोडा घालणार नाहीत. हे जे विवेचन केले आहे ते एवढ्याच करिता की, हिंसा ही सत्याग्रहाच्या नैतिक स्वरूपास बाधक नाही. यापेक्षा या मुद्याची जास्त चर्चा करण्याचे प्रयोजन नाही. कारण सत्याग्रह पार पाडण्यास, हिंसा करण्यास तात्त्विक दृष्ट्या हरकत नसली तरी आजच्या परिस्थितीत तसे करण्याची कोणास सवड नाही. या देशातील सारी प्रजा निःशस्त्र असल्यामुळे सत्याग्रहाच्या सिद्धिसाठी अहिंसेचा एकच मार्ग काय तो खुला आहे. आणि सत्याग्रहास सिद्ध झालेल्या अस्पृश्यांनी याच एका उपायावर सारी भिस्त ठेवून चालणे प्राप्त आहे. शिवाय तो उपाय अस्पृश्यांचा प्रश्न सोडविण्यास अपुरा आहे असे मानण्यास अजून तरी काही अनुभवाची साक्ष घेता येण्यासारखी नाही कारण अस्पृश्यता निवारणार्थ सत्याग्रहाची मोहीम नुकतीच सुरू होत आहे. तेव्हा जो सत्याग्रह करावयाचा तो अहिंसात्मक रीतीचा असणार, याशिवाय त्यात दुसरे काहीच नाही असे सर्वांनीच पक्केपणी ध्यानात ठेविले पाहिजे.

आता हा सत्याग्रह कोणा विरूद्ध करावयाचा ? याची चर्चा करणे प्राप्त आहे. अस्पृश्यांची जी समान हक्कांची मागणी आहे ती स्पृश्य लोकांकडे आहे. कारण जर त्यांचे न्याय हक्क देण्यास कोणी विरोध करीत असतील तर ते स्पृश्य लोकच होत. अर्थात, जो सत्याग्रह करावयाचा तो स्पृश्य लोकांविरूद्धच करावयाचा असे अस्पृश्य लोकांना वाटणे शक्य आहे. परंतु तो समज सर्वस्वी खरा नाही. समजा, उद्या अस्पृश्य लोक एखाद्या सार्वजनिक तळ्यावर अथवा एखाद्या सार्वजनिक देवालयात आपले हक्क बजाविण्याचा आग्रह धरून गेले व स्पृश्य लोक त्यांना प्रतिकार करण्याचा हेतू धरून आडवे झाले, तर पुढे काय होणार हा प्रश्न विचारात घेतल्याशिवाय सत्याग्रह कोणाविरूद्ध करावयाचा आहे याचा पूर्णपणे समज होणे शक्य नाही. अस्पृश्य लोक सत्याग्रहास प्रवृत्त झाले आणि अपेक्षिल्याप्रमाणे जर स्पृश्य लोक आडवे आले आणि त्यांच्या अपकृत्यामुळे शांततेचा भंग होण्याचा जर रंग दिसून आला तर शांतता राखण्यासाठी सरकारला या लढ्यात पडावे लागेल. कारण शांतता राखणे हे सरकारचे मुख्य कर्तव्य आहे. आणि सरकार जर या लढ्यात पडले तर ते कोणते धोरण स्वीकारील हे जाणून घेतल्याशिवाय सत्याग्रह कोणाविरूद्ध करावयाचा, हे ठरविता येणे शक्य नाही. सरकारने जर अस्पृश्य लोकांची बाजू घेतली आणि न्याय्य हक्कांची अंमलबजावणी करणाऱ्या लोकास सरकारच्या दीर्घ बाहूची मदत देणे हे न्याय आहे व त्या न्यायाप्रमाणे जर सरकार वागले तर हा प्रश्न चुटकीसरसा सुटून जाणार आहे. परंतु तसे न होता सरकारने जर उलट खाल्ली व सत्याग्रही अस्पृश्यांनाच जर ते म्हणू लागले की, तुम्ही नव्या नव्या क्लुप्त्या काढून भलभलत्याच गोष्टी करू लागलात आणि तेणेकरून शांततेचा भंग होत आहे, सबब आम्ही तुम्हास मनाई करतो. असा हुकूम सरकारने काढला तर पुढे काय होणार ? अर्थात् असे जर झाले तर अस्पृश्यांस जो सत्याग्रह करावा लागणार आहे तो दिसावयास जरी स्पृश्यांविरूद्ध असला तरी अखेर तो सरकारविरूद्ध होणार आहे हे उघड आहे. तेव्हा या सत्याग्रहाची जबाबदारी काय आहे हे अस्पृश्यांनी ओळखून असावे हे बरे. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे या सत्याग्रहात आपला देवळात किंवा तळ्यावर जाण्याचा आग्रह शेवटास नेण्यास अस्पृश्य लोकांना सरकारी हुकूम मोडल्याशिवाय गत्यंतर नाही व सरकारी हुकूम मोडल्याबद्दल सरकार सत्याग्रह करणाऱ्या अस्पृश्य लोकांस तुरूंगात टाकल्याखेरीज राहणार नाही. एकूण सत्याग्रह करणाऱ्या अस्पृश्य लोकांनी या कामी आपणास वेळ पडल्यास तुरूंगवासही पत्करावा लागणार आहे, अशी पूर्ण जाणीव ठेवूनच सत्याग्रहास आपली कंबर बांधावी. खरे म्हटले असता

अस्पृश्यता ही इतकी अपमानकारक गोष्ट आहे की, तिच्या निवारणार्थ काहींचे प्राण खर्ची पडले तरी हरकत नाही. आपल्या स्पर्शाने अपवित्र झालेली वस्तू गोमूत्र शिंपडून शुद्ध होते असे स्पृश्य लोक मानितात. स्वधर्माच्या मनुष्याच्या स्पर्शाने जे विटाळते ते पशूचे मूत्र शिंपडल्याने शुद्ध होते. या अत्यंत तिरस्करणीय विचारात ती मानवी स्पर्शाच्या भ्रष्टतेची कल्पना अधिक धिःकारणीय आहे किंवा ती पशूच्या मूत्राने शुद्ध करण्याची भावना अधिक धिःकारणीय आहे हे जरी सांगणे कठिण असले तरी एक गोष्ट उघड आहे की, पशूंच्या मलमूत्रात जेवढे पावित्र्य आहे तेवढे देखील पावित्र्य स्पृश्यांच्या दृष्टीने अस्पृश्यांतील माणसात नाही. ही स्थिती जगण्यासारखी आहे असे कोणाही स्वाभिमानी माणसास वाटणार नाही. जगणे हाच काही जगातील पुरूषार्थ नव्हे. जगण्याच्या नानापरी आहेत. काकबळी खाऊन कावळेही पुष्कळ वर्षे जगतात परंतु त्यांच्या जीवितात पुरूषार्थ आहे असे कोणीही म्हणणार नाही. आज नाही उद्या, निदान शंभर वर्षांनी तरी मुत्यू हा कोणासच चुकत नाही; तर मग त्याबद्दल डर किंवा रड कशाला ? हे शरीर बोलून चालून नाशिवंत. आत्म्याच्या कल्याणार्थ जे काही या जगात करावयाचे असते त्यास नाशिवंत मनुष्य देह हेच काय ते एक साधन असल्यामुळे '' आत्मनाम सततं रक्षेत दारैरपि धनैरपि ! '' बायकामुले किंवा संपत्ती यापेक्षा आपल्या स्वतःचे पहिल्याप्रथम रक्षण करावे असे शास्त्रात सांगितले आहे खरे. तथापि, हा दुर्लभ पण नाशिवंत मानव देह खर्ची घालून यापेक्षाही अधिक शाश्वत अशी एकादी वस्तू प्राप्त करून घेण्यासाठी उदाहरणार्थ देशासाठी, सत्यासाठी, ब्रीदासाठी, व्रतासाठी, यशासाठी, अब्रुसाठी अथवा भूतमात्रासाठी अनेक महापुरुषांनी अनेक प्रसंगी कर्तव्याच्या अग्नित आपल्या प्राणांची आहुती दिलेली आहे. आम्हाला तरी असे वाटते की, महाभारतात वीरपत्नी विदुला हिने आपल्या पुत्रास जसे सांगितले की, अंथरूणावर पडून कुजत किंवा शंभर वर्षे निरर्थक जीवित घालविण्यापेक्षा घटकाभर पराक्रमाची ज्योत दाखवून मेलास तरी बरे, असेच दरेक अस्पृश्य मातेने आपल्या पुत्रास सांगण्याची वेळ येऊन ठेपली आहे. परंतु इतके मोठे असिधाराव्रत पाळण्यास अस्पृश्यास कोणीच लावित नाही. फक्त तुरुंगात जाण्यास तयार व्हा या पलिकडे त्यांच्यापासून दुसऱ्या कोणत्याही स्वार्थत्यागाची मागणी नाही. आणि तितकेही जर होत नसेल तर अस्पृश्य लोक पुरुष नसून हिजडे आहेत असेच म्हणावे लागेल. कारण महाभारतात एके ठिकाणी असे सांगितले आहे की,–

**एतावानेव पुरुषो यदमर्षी यदक्षमी ।**
**क्षमावान्निरमर्षश्च नैव स्त्री न पुनः पुमान् ॥**

"ज्या पुरुषाला अन्यायाचा राग येतो व जो अपमान सहन करीत नाही तोच पुरुष म्हणावयाचा. ज्या पुरुषाला राग किंवा चीड येत नाही तो आणि नपुंसक सारखेच" परंतु आम्हाला आशा आहे की, अस्पृश्यता निवारण्याकरिता प्राण खर्ची घालण्याचा निश्चय जरी थोड्याच अस्पृश्यांचा झाला असला तरी अस्पृश्यता निवारणार्थ बंदीवास पत्करण्याचा निश्चय पुष्कळशा अस्पृश्यांचा झालाच आहे. आणि हे जर खरे असेल तर या कार्यात त्यांना यशप्राप्ती झाल्याशिवाय राहणार नाही. कारण सरकार अन्यायाने अस्पृश्यातील सत्याग्रहींना जरी तुरुंगात घालू लागले तरी ते किती दिवस घालील आणि किती जणांना घालील व स्पृश्य लोक तरी सरकारचा आधार किती दिवस घेतील! शेवटी शिकस्त झाली म्हणजे सरकारलाही या गोष्टींचा विचार करावा लागेल. कारण सरकार जरी झाले तरी त्याला जनलज्जा ही आहेच. आणि ती काही काळपर्यंत सरकारास वाटली नाही तरी ती वाटावयास लावणे हे देखील अस्पृश्यांच्याच हाती आहे. शांतताभंग होतो म्हणून सरकार आमचे न्याय्य हक्क बजावण्याच्या आड जर येईल तर आम्हास सुधारलेल्या राष्ट्राचे न्याय कोर्ट जो राष्ट्रसंघ त्याच्याकडे फिर्याद लावून सरकारास त्याच्या अन्यायीपणाबद्दल लाजविता येईल. तसेच ज्या स्पृश्य लोकांच्या हेक्यासाठी, हक्कासाठी नव्हे, अस्पृश्यांना सरकार दंडन करणार त्या स्पृश्य लोकांनाही याचा विचार करावा लागणार आहे. स्पृश्य लोकांना अस्पृश्यांविषयी प्रेमाचा पान्हा नसला तरी त्यांना आपल्या संरक्षणाची चिंता आहे. आणि त्या चिंतेमुळे ते पोळत नसले तर त्यांना पोळावयास लावणे हे आमच्या हातात आहे व ते सत्याग्रहाच्या मार्गाने आम्हास सहन करता येण्यासारखे आहे. अस्पृश्यांचे सत्व पाहूच असा जर स्पृश्य लोकांनी निर्धारच केला तर, फार तर सत्याग्रह अयशस्वी होईल. पण असे झाल्याने तोटा होणार तो कोणाचा? स्पृश्यांचा! सत्याग्रह करूनदेखील आपणास हिंदू धर्मात थारा देत नाहीत याची जाणीव पटल्यावर अस्पृश्य लोक जे आज ढकलून दिले तरी हिंदू धर्मातून जात नाहीत तेच हिंदू धर्म हा दगडांचा धर्म आहे, त्याच्यापुढे कपाळ फोडून घेतले तरी काही होणार नाही अशी खात्री होऊन, स्पृश्यांनो ! घ्या तुमचा धर्म ! असे म्हणून आपोआप परधर्मात जाण्यास तयार होतील. इतक्या थराला ही गोष्ट स्पृश्य लोक जाऊ देतील असे संभवत नाही. मात्र आमचा सत्याग्रह आम्ही इतक्या मोठ्या प्रमाणावर केला पाहिजे की, सरकारचे तुरुंग तुडुंब भरुन सत्याग्रही कैद्यास जागा नाहीशी झाली पाहिजे आणि स्पृश्य लोकांना हा पोरखेळ आहे असे न वाटता त्यांना धसका बसला पाहिजे.

सत्याग्रहाच्या सिद्धीचा विचार करिताना सत्याग्रह कोणाविरुद्ध करावयाचा हे जाणणे जितके जरूर आहे तितकेच तो सत्याग्रह कोणी करावयाचा याचाही विचार करणे अवश्य आहे. सत्याग्रह हा आपले मानवी हक्क प्राप्त करून घेण्याचा उपाय तर आहेच. तो उपाय फलदायक होण्यास जेवढ्या म्हणून अस्पृश्य वर्गातील स्त्री पुरुषास त्यात भाग घेता येईल त्या सर्वांनी त्यात भाग घेणे सिद्धिच्या दृष्टीने आवश्यक आहे. परंतु आमच्या मते सत्याग्रह हा फक्त व्यावहारिक उपाय आहे इतकेच नसून तो एक प्रकारची आत्मशुद्धी करून घेण्यास आरंभिलेला यज्ञ आहे. त्या यज्ञात दरेक अस्पृश्याने उडी टाकून आपणास शुद्ध करून घ्यावे. स्पृश्य लोक अस्पृश्य लोकास अपवित्र व अशुद्ध मानतात ही गोष्ट जितकी खरी आहे तितकीच अस्पृश्य लोक आपणा स्वतःस अशुद्ध व अपवित्र मानून वागतात ही गोष्ट खरी आहे. आतापर्यंत स्पृश्य लोकांचे वर्चस्व प्रस्थापित झाल्यामुळे ते सांगतील ते करण्याची आणि वागवतील तसे वागण्याची अस्पृश्य लोकांना सवय लागून गेलेली आहे. स्पृश्य लोक श्रेष्ठ आहेत, आपण कनिष्ठ आहोत, ते आपले नायक आहेत आपण त्यांचे किंकर आहोत या भावनेचे पूट जे अस्पृश्य लोकांच्या मनावर बसून गेलेले आहे, त्यामुळेच अस्पृश्यता टिकून राहिलेली आहे. पूट जाळून टाकल्याशिवाय आत्मसन्मानाची भावना अस्पृश्य लोकात जागृत होणार नाही व ती जागृत झाल्याशिवाय अस्पृश्यतानिवारण होणार नाही. या आत्मशुद्धीच्या दृष्टीने दरेक अस्पश्याने या सत्याग्रहात भाग घेणे जरूर असले तरी संसाराच्या उपाधीत सापडलेल्या अस्पृश्य लोकांना ही आत्मशुद्धी करून घेण्यास प्रत्यक्षपणे सत्याग्रहात भाग घेता येईल किंवा नाही, याबद्दल शंका वाटणे अगदी साहजिक आहे व झालेच तर फारच थोड्या लोकांना यात भाग घेता येईल व पुरेशा लोकांनी सत्याग्रहात भाग घेतला नाही तर त्यापासून विशेष फायदा होईल असे आम्हास वाटत नाही. कारण, सत्याग्रह हा दुराग्रही माणसांस सत्याचा अवलंब करण्यास भाग पाडण्याचा एक मार्ग आहे व अशा दुराग्रही माणसास त्राहि त्राहि वाटेल इतक्या मोठ्या प्रमाणावर सत्याग्रह झाला नाही तर तो आपला दुराग्रह सोडणार नाही. म्हणून आमची अशी सूचना आहे की, त्याचबरोबर संसाराच्या उपाधीतून मुक्त झालेल्या किंवा उपाधीत न सापडलेल्या ५००० अस्पृश्य तरूणांचे एक सत्याग्रह दल तयार करावे व त्या दलामार्फत जेथे जेथे सत्याग्रह करण्याचा प्रसंग येईल तेथे तेथे सत्याग्रह करण्यात यावा. ही योजना जर अंमलात आणली तर सत्याग्रहाच्या तयारीत काही न्यून उरणार नाही व एवढ्या मोठ्या ५००० सत्याग्रही दलाचा मारा करिता आला तर सत्याग्रहाच्या सिद्धीबद्दल कोणालाच शंका राहणार नाही. परंतु अशाप्रकारचे दल तयार होण्यास द्रव्याचे साह्य झाले पाहिजे.

तसेच काही काळही गेला पाहिजे. हे घडेतोपर्यंत अस्पृश्य लोकांनी ज्या थोड्या थोडक्या प्रमाणावर त्यांना सत्याग्रह करता येईल त्या प्रमाणावर त्यांनी सत्याग्रह करण्यास सुरवात करावी हे बरे.

अस्पृश्यांनी सत्याग्रह करण्याच्या आड काही स्पृश्य लोक येत आहेत, हे आम्ही जाणून आहोत. या स्पृश्य लोकांपैकी काहींचा असा मुद्दा आहे की, अस्पृश्यांच्या समान हक्कांचा प्रश्न हा अस्पृश्यांनी सत्याग्रह करून सुटणार नाही. तो प्रश्न स्पृश्यांनी स्पृश्यातच चळवळ करून सोडविला पाहिजे आणि ज्या दिवशी देवस्थानावर, '' अस्पृश्यांनी देवदर्शनास यावे,'' अशी फळी स्पृश्य लोक स्वखुषीने लावतील त्या दिवशी अस्पृश्यांनी खुशाल आत जावे. तोपर्यंत त्यांनी काही गडबड अगर धांदल करू नये ! पण स्पृश्य लोक हा प्रश्न आपखुषीने सोडवितील काय ? आम्हाला त्यांची बिलकूल आशा नाही. कारण या लोकांचे असे म्हणणे आहे की, हा बहुमताचा, दयेचा, मायेचा, नीतीचा अगर समानहक्काचा प्रश्नच नाही. हा फक्त धर्मतत्त्वाचा प्रश्न आहे. अस्पृश्य हे स्वधर्मरूपी विराट पुरुषाचा कोणताच भाग बनू शकत नाही. कारण ब्राह्मण मुख, क्षत्रिय बाहू, वैश्य मांड्या व शूद्र पाय बनल्यामुळे अस्पृश्यांना या विराट पुरुषाच्या आत स्थानच उरत नाही. अस्पृश्य लोक हे या हिंदू विराट पुरुषाच्या पायातली एक वहाण आहे. पादत्राण हा शरीराचा भाग कधीच होणे शक्य नाही तसेच अस्पृश्य हे कधीही हिंदुंशी एकजीव होऊ शकत नाही. तसे व्हावे म्हणणे मुर्खपणाचे व अविचाराचे आहे. अस्पृश्य वर्ग हा मुसलमान वर्गासारखा असाच कक्षेबाहेरचा वर्ग आहे. स्वधर्मरूपी विराट पुरुषाचा पायापलीकडचा व देहाशी प्रत्यक्ष संबंध नसलेला तो एक वेगळा भाग आहे. असे ज्या लोकांचे विचार आहेत त्या लोकांच्या दानतीवर व शीलावर अस्पृश्य लोकांनी विश्वास ठेवून स्वस्थ बसावे हा उपदेश कपटी जरी नसला तरी मुर्खपणाचा आहे, हे खास.

दुसरे काही स्पृश्य लोक असे म्हणतात की, अस्पृश्य लोकांनी जर सत्याग्रह आरंभिला तर त्यांच्या हातून तो पार पडणे शक्य नाही. कारण सत्याग्रहाचे शस्त्र जर त्यांनी स्पृश्य समाजावर उगारले तर ज्या काही थोड्याबहुत स्पृश्य लोकांची अस्पृश्यता निवारणाच्या कार्याला जी काही थोडीबहुत सहानुभूती आहे ती ते गमावून बसतील. कारण, हा आघात साऱ्या स्पृश्य समाजावर होणार असल्यामुळे सुधारक तसेच सनातनी स्पृश्य या आघाताचा प्रतिकार करण्यासाठी एकजीव झाल्याखेरीज राहणार नाहीत. पण या लोकांना आम्ही असे विचारितो की, स्पृश्य जनतेपैकी काही भाग आमच्यासोबत आहे हे आम्हास सांगावयास तुमची जरूरी नाही. आम्हाला ते कळतच आहे. तुम्हाला खरोखरीच जर

आमच्याबद्दल सहानुभूती असेल तर काही स्पृश्य लोक आमच्यासोबत आहेत अशी सबब सांगून सत्याग्रहापासून आम्हास परावृत्त करु नका. तुम्ही जर खरोखरीच आमच्या तर्फेचे आहात, आमच्यावर होत असलेल्या अन्यायाबद्दल तुम्हाला राग किंवा चीड आली असेल तर तुम्ही आमच्या सत्याग्रहात सामील व्हा, यातच तुमच्या सहानुभूतीची खरी पारख आहे. नाही तर तुमची मैत्री असली काय आणि द्वेष असला काय आम्हाला सारखेच.

**अमर्षशून्येन जनस्य जन्तुना न जातहार्देन न विद्विषांदरः !!**

अमेरिकेत जेव्हा गुलामगिरीचे उच्चाटन करण्यासाठी मोहीम सुरवात करण्यात आली तेव्हा अमेरीकेतील गोऱ्या लोकात दोन पक्ष होते. दक्षिणेतील गोरे लोक या मोहिमेच्या विरूद्ध होते व उत्तरेकडील गोरे लोक या मोहिमेच्या तर्फे होते. तथापि उत्तरेकडील प्रांतांतील गोऱ्या लोकांनी दक्षिणेतील काही गोरे लोक तुमच्याविरूद्ध आहेत सबब तुम्ही गुलामगिरीविरूद्ध चळवळ करू नका असा काही ब्राह्मणी उपदेश त्या गुलामगिरीत खितपत पडलेल्या काळया शिद्दी लोकांना केला नाही. उलट काळया शिद्दी लोकांशी संगनमत करून व त्यांच्याशी सहकार्य करून त्यांच्या स्वातंत्र्याला त्यांनी विरोध करणाऱ्या आपल्या जातभाईंना त्यांनी स्वर्गाची वाट दाखविली व कोणत्याही प्रकारचा अंगचोरपणा दाखविला नाही. त्याचप्रमाणे स्पृश्य वर्गातील जे लोक तुमची मागणी रास्त आहे अशी सहानुभूतीची कबूली दाखवितात त्यांना शिद्दी लोकांच्या गोऱ्या सहानुभूतीवाल्यांनी जे करून दाखविले तसेच वर्तन तुम्ही करून दाखवाल तरच आम्ही तुमच्यावर विश्वास ठेवू असे अगदी रोखठोकपणे बजाविले पाहिजे. नाही तर हे लोक सहानुभूतीची साखर पेरून जो अन्याय एकही दिवस सहन करणे पाप आहे तोच अन्याय तसाच पुढे आपणास स्वसंतोषाने सहन करावयाची भूरळ पाडतील.

तिसऱ्या प्रतीचे स्पृश्य लोक म्हणतात की, स्पृश्य व अस्पृश्य हे एकाच समाजाचे घटक आहेत. सत्याग्रह करावयाचा तो स्वकियांशी करावयाचा नसतो. तो परकियांशी करावयाचा असतो. तसे जरी नसले तरी हिंदू समाजावर बाहेरून हल्ले होत असताना अस्पृश्यांनी त्यांचे निवारणास मदत करण्याऐवजी आपापसात यादवी माजवावी हे रास्त नाही. उपदेश मोठा गोड आहे ! पण तो अस्पृश्यांनी काय म्हणून ऐकावा ? ज्या धर्मात त्यांना मुळी स्थानच नाही, ज्यात त्यांना पायातली वहाण म्हणून वागविले जाते त्या धर्माच्या रक्षणासाठी त्यांनी काय म्हणून मरावे ? ही जबाबदारी स्पृश्य लोकांची आहे. कारण हिंदू धर्माचे हक्क

ही त्यांची मिरास आहे. खानेकू हम और लढनेकू तुम असा हा उपदेश वेडसरपणाचा आहे व तो ऐकण्याइतके अस्पृश्य लोक मुर्ख नाहीत. आजवर हिंदू धर्माचे रक्षण केले हीच मोठी चूक झाली असे त्यांना वाटू लागले आहे. अशी वृत्ती धारण करणाऱ्या अस्पृश्य लोकास वरील प्रकारचा उपदेश करण्याचा अधिकार स्पृश्य लोकास आहे असे आम्हास वाटत नाही. विरोधी पक्षाच्या नडीचा फायदा घेऊन आपली सवड साधून घेणे हे व्यवहार संमत आहे. तेच धोरण अस्पृश्य लोकांनी आपले सामाजिक हक्क मिळविण्याकरिता स्पृश्य लोकांशी ठेवले आहे. हे नीतीच्या दृष्टीने वाजवी नसेल. पण राजकीय हक्क मिळविण्याकरिता '' साम्राजाच्या गरजा येती कामाच्या काजा '' अशी घोषणा करून भर लढाईच्या प्रसंगात सरकारला अडवावयास मागे पुढे न पाहाणाऱ्या स्पृश्य लोकास नावे ठेवण्याचा अधिकार कसा पोहोचतो हेच आम्हास कळत नाही. आता आपापसात यादवी करू नये असे जे म्हणतात त्यांना आम्ही असे सुचवितो की, तुमची गीता काय सांगते ते पहा. गीतेत भगवंताने अर्जुनास जो उपदेश केला आहे त्यापेक्षा आम्ही निराळे असे काय सांगितले आहे. कौरव-पांडवांची सैन्ये लढाईस सज्ज होऊन कुरूक्षेत्रावर उभी असताना लढाईस तोंड लागण्यापूर्वी अर्जुनानी मध्यभागी आपला रथ नेऊन दोन्ही सैन्याकडे दृष्टी फेकिली व पाहिले तो आपलेच स्नेही, आप्त, गुरु त्यास कौरवांच्या सैन्यात दिसले. तेव्हा हा लढाईचा प्रसंग कोणत्या स्वरुपाचा आहे हे त्याच्या डोळ्यांपुढे आले व तो युद्ध करण्याचे नाकारून व आपल्या हातचे धनुष्य बाण ठेवून खाली बसला. कौरव व पांडव हे आप्त आहेत ही गोष्ट श्रीकृष्णाला ठाऊक नव्हती असे नाही. कौरव जरी पांडवांचे हक्क देण्यास तयार नव्हते तरी भीष्म, द्रोण, विदूर, वगैरे शिष्ठ लोक त्यास अनुकूल होते व काही कालाने त्यांच्या मतांचा परिणाम कौरवावर झाला असता ही गोष्ट श्रीकृष्णाला अवगत होती. आपापसात यादवी करू नये हे तत्व जर सत्य असते तर अर्जुनाचे वर्तन पाहून '' खरोखर तू म्हणतोस तेच खरे. तुला झालेली उपरति पाहून मला आनंद वाटतो असे कृष्ण परमात्मा का म्हणाला नाही ? '' '' उलट, अरे ही अवदसा तुला कोठून आठवली. हा हिजडेपणा तुला शोभत नाही, हे दुबळेपण सोडून युद्धाला उभा रहा '' असे त्याने अर्जुनास सांगितले. इतकेच नव्हे, तर या युद्धात असंख्य लोकांची प्राणहानी होणार आहे हे धडधडीत दिसत असताना त्याला या गोष्टीची कवडीची देखील दिक्कत वाटली नाही आणि हे सारे कशाकरिता तर कौरवांनी हिरावून घेतलेले पांडवाचे राज्य परत मिळविण्याकरिता ! ज्या वस्तुसाठी अर्जुन सत्याग्रह करीत होता त्या वस्तूला, ज्या वस्तूसाठी अस्पृश्य लोक सत्याग्रह करणार आहेत त्या

वस्तूच्या मानाने फुटक्या कवडीचीही किंमत नाही. पांडव राज्यासाठी भांडत होते, अस्पृश्य लोक माणुसकीसाठी भांडत आहेत. माणुसकी गेल्याने माणसाचे सर्वच काही जाते. परंतु राज्य गेल्याने माणुसकी तरी शिल्लक राहते. राज्यावाचून पांडव काही मेले नसते. पण माणुसकीवाचून अस्पृश्य लोक जिवंतपणी मेले आहेत. राज्यासारख्या क्षुल्लक ध्येयासाठी जर पितृहत्त्या, गुरुहत्त्या, बंधुहत्त्या किंवा कूलक्षय या सारखी घोर कर्मे करावयास अर्जुनास श्रीकृष्ण सांगतो तर माणुसकी कमविण्यासारख्या अत्युत्तम ध्येयासाठी साधा हट्योग देखील अस्पृश्यांनी करू नये असे स्पृश्यांनी सांगणे हा निव्वळ बाष्कळपणा होय.

खरे म्हटले असताना या स्पृश्य लोकांचे ऐकण्याचे आम्हास काही प्रयोजन नाही; कारण ते आमचे कितीही जरी हितचिंतक असले तरी ते आम्हास या बाबतीत उपदेश करण्यास अपात्र आहेत. कारण हा प्रश्न अधिकाराचा, जातीचा, स्वार्थाचा व मनोधर्माचा आहे. विद्येचा, ज्ञानाचा अगर बुद्धिचा नव्हे. यास्तव त्यांचा हा आपमतलबी उपदेश आपण न ऐकता त्यास स्पष्टपणे आपण बजाविले पाहिजे की, तुम्ही आम्हास उपदेश करण्याच्या भानगडीत पडू नका.

कसलाही लढा पडला तर प्रथम त्यात शिष्टाई होत असते व शिष्टाईचा उपयोग नच झाला तर मग युद्ध करण्याची पाळी येते. अस्पृश्यता निवारणाच्या कार्यात पुष्कळ काळपर्यंत शिष्टाई झाली आहे असे आम्हास वाटते. जेव्हापासून ही अस्पृश्यता हिंदुधर्मात शिरली तेव्हापासून तिच्याविरुद्ध अनेक महात्म्यांनी प्रयत्न केले. परंतु या बाबतीत स्पृश्य लोकांचा दुराग्रह इतका भयंकर आहे की अपरिहार्य प्रसंग सोडून दिले तर त्यांनी याबाबतीत सूईच्या अग्रावरही जितकी माती राहते तितकी सुद्धा माती पांडवांना न देणाऱ्या पाषाणहृदयी व अधर्मप्रेमी दुर्योधनापेक्षा विशेष औदार्य दाखविले आहे असे कोणालाही वाटणार नाही; आणि यापुढे त्यांच्या वृत्तीत आत्मप्रेरणेने अस्पृश्यांस अनुकूल असा काही तरी फरक होईल असेही दिसत नाही. वास्तविक पाहिले असता ह्या अन्यायाला आम्ही मान दिली म्हणूनच तो आज इतके दिवस चालू राहिला आहे. तो झुगारून देण्याचा जर आम्ही मनापासून निश्चय केला तर तो कोणीही आमच्यावर लादू शकणार नाही. ज्या ब्राह्मणी धर्माने आपल्याला हीन करून टाकीले, त्याच ब्राह्मणी धर्माने कायस्थासारख्या जातीवरही हीनत्वाचा शिक्का मारण्याचा अनेक वेळा प्रयत्न केला. परंतु त्यातील लोकांनी वेळेवर प्रयत्न केल्यामुळे त्यांचा दर्जा त्यांना कायम ठेविता आला. कालाचे चक्र उलट फिरत असताही आमच्या पूर्वजांनी गाढ झोप घेतली. इतरांप्रमाणे आमच्या लोकांनीही डोळे उघडे ठेऊन होत

असलेल्या अन्यायाचा प्रतिकार वेळीच केला असता तर आज अस्पृश्य हा केवळ इतिहासातला शब्द म्हणून राहिला असता. तसे करण्याचा निश्चय मागील पिढीने केला नाही ही अत्यंत लांछनाची गोष्ट आहे. परंतु मागील पिढीत ज्ञानाचा प्रसार नसल्या कारणाने त्यांच्या बेफिकीरी वर्तनास क्षम्य म्हणता येईल परंतु या पिढीची गोष्ट निराळी आहे. अस्पृश्यांना कदापि न प्राप्त झालेले ज्ञान या पिढीला लाभलेले आहे. आणि म्हणून मागील पिढीचे हातून जी गोष्ट घडली नाही, ती गोष्ट घडवून आणणे हे ह्या पिढीचे कर्तव्यकर्म आहे. त्यास जर या पिढीतील लोक जागणार नाहीत तर ते कुलवंत नसून, कुलांगार आहेत असेच म्हणावे लागेल.

अध्यक्षांचे भाषण झाल्यावर विषय नियामक कमेटीची निवडणूक करण्यात येऊन सभेचे काम दुसऱ्या दिवशी ८ वाजेपर्यंत तहकूब करण्यात आले.

परिषदेत खालील सद्‌गृहस्थ प्रामुख्याने दिसत होते. खुद्द अमरावती येथील डॉ. पंजाबराव देशमुख, बॅरिस्टर तिडके, श्री. चौबळ वकील, श्री. गवई एम. एल. सी., श्री. के. बी. देशमुख, डॉ. भोजराजा, डॉ. पटवर्धन, श्री. उत्तमराव कदम इत्यादि गृहस्थ असून परिषदेकरिता बाहेरून मुद्दाम आलेले श्री. नानासाहेब अमृतकर, मोर्शी, श्री. दे. वि. नाईक, सं. ब्राह्मण ब्राह्मणेतर, श्री. दत्तात्रय विठ्ठल प्रधान, दादर, श्री. रा. दा. कवळी, श्री. द. रा. रारावीकर हे हजर होते.

त्याच दिवशी रात्री विषय नियामक कमेटीची बैठक होऊन दुसऱ्या दिवशी परिषदेपुढे येणाऱ्या ठरावाची चर्चा झाली.

ता. १४ नोव्हेंबर १९२७ सकाळीच ७ वाजता अमरावती येथील अस्पृश्य विद्यार्थी वर्गाकडून डॉ. आंबेडकर ह्यांना मानपत्र व पानसुपारीचा समारंभ करण्यात येऊन डॉ. आंबेडकर व इतर पाहुणे मंडळीसह सर्व विद्यार्थीवर्गाचा एक फोटो घेण्यात आला. मुलांच्या मानपत्रास उत्तर देताना डॉ. साहेबांनी मुलांनी आपले शील कसे बनवावे ह्याचा अगदी थोडक्यात उपदेश करून, ह्या मुलांनी आपल्या कुळाला लागलेला ''अस्पृश्यते'' चा डाग धुवून काढण्यास कशी मदत करावी हे विषद करून सांगितले. नंतर सर्व मंडळी परिषदेस बरोबर ८ वाजता हजर झाल्यावर परिषदेस सुरवात झाली. सुरूवातीलाच मुंबईहून श्री. बाळाराम आंबेडकर ह्यांच्या निधनाची बातमी तारेने येऊन धडकली.

ही दुःखकारक बातमी ऐकून सर्वांनाच फार वाईट वाटले तरी पण अशा परिस्थितीतही डॉ. आंबेडकरांनी परिषदेचे काम मोठ्या धैर्याने व नेटाने पुढे चालवून आपले खरे लोकनायकत्व प्रगट केले. सभेचे काम १ वाजेपर्यंत चालून त्यात खालील ठराव पसार करण्यात आले.

### ठराव १ ला.

आपल्या सभेचे सन्माननीय अध्यक्ष डॉ. आंबेडकर ह्यांचे वडील बंधू श्री. बाळारामजी हे एकाएकी वारल्याची दुःखकारक वार्ता आताच आलेली ऐकून ह्या सभेस अत्यंत दुःख होत आहे व कै. बाळारामजी आंबेडकर ह्यांच्या शोचनीय निधनामुळे ही सभा १० मिनिटे आपले काम बंद ठेवित आहे.

### ठराव २ रा.

(अ) येथील वयोवृद्ध व सन्माननीय पुढारी ना. गणेश श्रीकृष्ण खापर्डे, कौन्सिल ऑफ स्टेटचे सभासद व श्री. अंबादेवी देवस्थान कमेटीचे अध्यक्ष यांचे जे पत्र सत्याग्रह कमेटीचे अध्यक्ष श्री. गवई, एम. एल. सी. यांनी सभेपुढे मांडले आहे, ह्याचा विचार करून ही सभा सत्याग्रह कमेटीस अशी सूचना करते की, ना. खापर्डे यांनी तडजोड करण्याची जी इच्छा दर्शविली आहे व तिच्या सफलतेसाठी वेळ द्यावा अशी जी पत्रात मागणी केली आहे, त्या पत्राचा विचार करून आणि ना. खापर्डे याबाबतीत शक्य ती खटपट करणार आहेत असा विश्वास ठेवून या कामी त्यांना मुदत देण्यासाठी १५ तारखेस होणाऱ्या सत्याग्रहाची तारीख पुढे ढकलण्यास हरकत नाही.

(ब) तथापि सत्याग्रहाची ता. १५ नोव्हेंबरपासून तीन महिन्याच्या पुढे कोणत्याही सबबीवर हा सत्याग्रह लांबणीवर टाकण्यात येऊ नये.

(क) या सभेचे सत्याग्रह कमेटीस असे सांगणे आहे की, त्यांनी अस्पृश्यांचा देवळात अंतिम सीमेपर्यंत जाण्याचा पूर्णपणे जो हक्क आहे, त्याला बाध येईल अशी कोणतीही अट या तडजोडीच्या बाबतीत मान्य करू नये.

(ड) ह्या सभेचे सत्याग्रह कमेटीस असे सांगणे आहे की, पुढे करावा लागणारा सत्याग्रह शक्यतोपर्यंत सामुदायिक पद्धतीने करण्यात यावा.

वरील सर्व ठरावांवर बऱ्याच वक्त्यांची अनुकूल, प्रतिकूल भाषणे होऊन वरील सर्व ठराव प्रचंड बहुमताने पसार करण्यात आल्यावर शेवटी श्री. गवई, नाईक व अमृतकर ह्यांनी योग्य शब्दात अध्यक्षांचे व पाहुणे मंडळीचे आभार मानल्यावर सभेचे कार्य डॉ. आंबेडकर व शाहू छत्रपती ह्यांच्या जयजयकारात संपले.

दुपारी महाराष्ट्र केसरीचे संपादक श्री. चव्हाण व श्री. के. बी. देशमुख ह्यांच्या-येथे डॉ. आंबेडकर व पाहुणे मंडळीस " टी पार्टी " देण्यात आली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर अमरावतीच्या परिषदेत असताना त्यांना त्यांचे ज्येष्ठ बंधू बाळाराम यांचे रविवार दिनांक १२ नोव्हेंबर १९२७ रोजी दुपारी १२ वाजता एकाएकी हृदयक्रिया बंद पडून निधन झाल्याचे कळले. त्यामुळे ते अंत्ययात्रेस हजर राहू शकले नाहीत. त्यांच्या गैरहजेरीत जे अस्पृश्य बंधू प्रेत यात्रेस हजर होते त्यांच्याप्रती ऋणनिर्देश करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर 'बहिष्कृत भारत' दिनांक २५ नोव्हेंबर १९२७ च्या अंकात म्हणतात,

"माझ्या वडील बंधूच्या मरण समयी मी मुंबईत नव्हतो. अंबादेवीच्या सत्याग्रहासाठी जी अमरावती येथे ता. १३ नोव्हेंबर रोजी माझ्या अध्यक्षतेखाली परिषद भरण्याचे ठरले होते त्या परिषदेला मी गेलो होतो. माझ्या गैरहजेरीत ज्या तीन चार हजार अस्पृश्य बंधुंनी प्रेतयात्रेस हजर राहून असल्या दुःखप्रसंगी आपली सहानुभूती दर्शविली त्या सर्वांचा मी अत्यंत ऋणी आहे." —भीमराव आंबेडकर.



# १५

# अस्पृश्योन्नतीचा आर्थिक पाया

पूर्वी प्रसिद्ध केल्याप्रमाणे शनिवार ता. २६ आणि रविवार ता. २७ नोव्हेंबर १९२७ रोजी सोलापूर जिल्हा वतनदार महार परिषदेचे २ रे अधिवेशन सोलापूर मुक्कामी डॉ. भीमराव आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. परिषदेला सोलापूर जिल्ह्यातील दरेक खेड्यातील प्रतिनिधी आले होते. ता. २६ रोजी शनिवारी पाच वाजल्यापासूनच लोकांची अलोट गर्दी जमण्यास सुरुवात झाली. सर्वांचे डोळे डॉ. आंबेडकर साहेबांच्या येण्याचे वाटेकडे लागून राहिले होते. बरोबर सात वाजता डॉ. आंबेडकर साहेब आपल्या परिवारातील मंडळीसह सभामंडपात आले. त्यांच्या येण्याबरोबर सर्व मंडळीने उभे राहून प्रचंड टाळयांच्या कडकडाटात त्यांचे स्वागत केले. नंतर मुलांनी ईशस्तुतिपर गायन म्हटल्यावर परिषदेचे स्वागताध्यक्ष जिवाप्पा ऐदाळे यांनी परिषदेच्या कामास सुरवात केली व त्यांचे स्वागतपर भाषण झाले.

नंतर अध्यक्ष डॉ. आंबेडकर साहेब यांचे सुविचार परिप्लुत असे भाषण झाले. डॉ. आंबेडकर यांचे भाषण चालू असता सर्व लोक अगदी चित्रासारखे तटस्थ होऊन शांत चित्ताने ऐकत होते. त्यांचे भाषण अगदी साधे पण मार्मिक आणि परिणामकारक झाले. ते म्हणाले,

सद्‌गृहस्थ हो!

गेल्या मार्च महिन्याच्या १८ तारखेस महाड येथे जी अस्पृश्य वर्गाची एक परिषद भरली होती त्या परिषदेने आपले सार्वजनिक हक्क बजाविण्याच्या हेतूने महाड येथील चवदार तळयावर जाऊन पाणी घेण्याचा जो उपक्रम केला त्यामुळे ती परिषद अस्पृश्योन्नतीच्या इतिहासात चिरस्मरणीय झाली आहे, याबद्दल काहीच शंका नाही. कारण स्थानिक स्पृश्य लोकांनी प्रतिकार करून चवदार तळ्यासारख्या सार्वजनिक पाणवठ्याच्या ठिकाणी अस्पृश्यांना पाणी भरू देणार नाही, असा दुराग्रह धरला त्या वेळीच महाड म्हणजे आपण पानिपत समजतो व ते पुन्हा काबीज केल्याशिवाय आपण स्वस्थ बसणार नाही, असे त्या परिषदेच्या चालकांनी तत्क्षणी जाहीर केले. इतकेच नव्हे, तर प्रसंग पडल्यास या कार्याच्या सिद्धीसाठी सत्याग्रह करून बोलला बोल साच करण्याची त्यांनी प्रतिज्ञा केली.

---

बहिष्कृत भारत : २३ डिसेंबर १९२७.

ही वार्ता प्रसिद्ध झाल्याबरोबर अस्पृश्य लोकास स्पृश्य लोकांकडून उपदेश करण्यास सुरुवात झाली. महाडचे प्रकरण घडते न घडते तोच ज्यांना काहीच कळत नसले, तरी हिंदुस्थानातील 'हवा पाणी कळते' असा दंभ धरणाऱ्या चित्राव शास्त्र्यांनी मोठ्या गंभीर शब्दात सांगितले की, ''स्पृश्य आणि अस्पृश्य यांच्या लोकसंख्येतील फरक या चळवळी करताना केव्हाही ध्यानात घेतला पाहिजे. आपल्या मराठी भागात तरी तीन भाग स्पृश्य आणि चवथा अस्पृश्यांचा अशी स्थिती आहे. स्पृश्यांमध्ये कितीही भेद व विरोध असले तरी अस्पृश्यतेबद्दल सर्वांचे एकच मत आहे. याचा अनुभव महाड वगैरे स्थळी नित्यशः येतच आहे आणि अस्पृश्यांची उपजीविका सर्वस्वी अशा वृत्तीच्या स्पृश्यांच्या हातात आहे. ज्या दिवशी अस्पृश्यांची उपजीविका स्वतंत्र होईल व ते स्वतःच्या मानवी हक्कांकरिता स्वतःचे जीवितही वेचण्यास तयार होतील तो दिवस अस्पृश्यांच्या काय पण हिंदू व हिंदुस्थान यांच्या दृष्टीनेही काही वेगळाच असेल यात शंका नाही.'' एका हाताने हिंदू संघटनेच्या कार्याकरिता व दुसऱ्या हाताने स्वजातीच्या श्रेष्ठत्त्वासाठी रण माजवणाऱ्या मुंबईतील एका साप्ताहिक पत्रकर्त्यानेही अशाच प्रकारचा भेसूर सूर काढला आहे. हे संपादक महाशय म्हणतात, '' सत्याग्रह हा शब्द कानाला फार गोड लागतो ही गोष्ट खरी आहे पण सत्याग्रह हे दुधारी शस्त्र आहे हेही तितकेच खरे आहे. सत्याग्रहाच्या जोरावर डॉ. आंबेडकर हे उद्या आपल्या अनुयायांसह महाडच्या तलावाचे पाणी पितील, पण या त्यांच्या क्रियेची प्रतिक्रिया जेव्हा गावोगाव सुरू होऊ लागेल तेव्हा गरीब बिचाऱ्या अस्पृश्यांची वैलातून काढून चुलीत टाकल्याप्रमाणे जी स्थिती होईल तिला जबाबदार कोण! अस्पृश्यांचा एक दोन ठिकाणचा सत्याग्रह सिद्धिस गेल्याने उभ्या हिंदुस्थानातली अस्पृश्यता नष्ट होईल अशी डॉक्टर साहेबांची समजूत आहे काय? आमचे तर असे ठाम मत आहे की, डॉक्टर साहेबांच्या या सत्याग्रहाचे पर्यवसान भयंकर सामाजिक कलहात व कदाचित रक्तपातातही होणार!''

जसे या प्रांतातील लोक महाड येथे सत्याग्रह करणाऱ्या अस्पृश्य लोकास ही धोक्याची सूचना देत आहेत तसेच वऱ्हाड प्रांतातील लोक अमरावती येथील अंबा देवीच्या देवळात जाण्यासाठी सत्याग्रह करण्यास सिद्ध झालेल्या अस्पृश्य लोकांसही देत आहेत, असे पुणे येथे प्रसिद्ध होणाऱ्या 'स्वराज्य' पत्रावरून समजते.

अमरावती येथील श्री हनुमान व्यायाम मंदिराच्या पटांगणात स्पृश्यांची एक जाहीर सभा गेल्या आक्टोबर महिन्यात भरली होती. तीत अस्पृश्य वर्गातील लोकास असे बजाविण्यात आले की, तुम्ही दरिद्री व परोपजीवी असल्याकारणाने स्पृश्य हिंदुंची मने दुखवून व धमक्या देऊन तुम्ही हा प्रश्न नेटास लावल्यास तुम्हाला मिळत असलेला आश्रय बंद करून स्पृश्य लोक उपासमारीने तुम्हास वठणीवर आणतील!

संपत्ती ही राष्ट्राच्या भरभराटीस मोठी कारणीभूत अशी वस्तू आहे. या दृष्टीने तिचा संग्रह करणे अत्यंत आवश्यक आहे. परंतु संपत्तीचा उपयोग गरीब प्रजेस जखडून ठेवण्याकडे किंवा तिची वाढ खुंटविण्याकडे आणि आपली प्रौढी व वर्चस्व माजविण्याकडे जेव्हा संपत्तीवान लोक करतात तेव्हा त्यांच्या संपत्तीला शास्त्रकारांनी आसुरी संपत्ती असे म्हटले आहे व तिचा धिक्कार केला आहे. ही धर्मशास्त्राची शिकवण जे आम्हास उपदेश करीत आहेत त्यांनाही मान्य आहे. तसे जर नसते तर मुंबईसारख्या शहरात जेव्हा मालक आणि मजूर यांच्यातील भांडणे विकोपास जातात तेव्हा हे शिष्ट लोक, मालक तुमच्यावर बहिष्कार टाकतील, सांभाळा! तुमच्या उपजीविकेची साधने त्यांच्या हाती आहेत असा उपदेश संप करण्यास सिद्ध झालेल्या मजूर लोकास करते. पण हे लोक मजूर लोकास हा झगडा करण्यास नुसते उत्तेजन देतात इतकेच नव्हे तर मालक लोकास तुम्ही संपत्तीच्या जोरावर न्यायासाठी झगडणाऱ्या गोरगरीबांना दडपण्याचे आसूरी कृत्य करू नका, असा उपदेश करतात. याबद्दल आम्हास काही वाईट वाटत नाही उलट, आम्ही त्यांचे अभिनंदनच करतो. पण त्यांना आम्हास एक प्रश्न विचारावासा वाटतो व तो हा की, आर्थिक स्वातंत्र्यासाठी झगडा करणाऱ्या लोकांविरुद्ध संपत्तीचा दुरुपयोग करणे हा जर अधर्म आहे तर सामाजिक समता प्राप्त करून घेण्यासाठी झगडा करणाऱ्या अस्पृश्य लोकांविरुद्ध संपत्तीचा दुरुपयोग करणे हा धर्म आहे काय? व तो जर अधर्म आहे, तर मग ज्या तुम्ही लोकांनी सत्याग्रहाच्या बाबतीत उपदेश करण्याचा योग ओढून घेतला आहे त्यांनी आमच्या प्रतिपक्षास आमच्यावर संपत्तीच्या जोरावर बहिष्कार टाकणे व आमची गति खुंटविणे हे पाप आहे, असे का सांगितले नाही? तसे जर त्यांनी केले असते तर त्यांच्या मनाच्या निर्मळतेची कसोटी आम्हास पटली असती. तसे न केल्यामुळे त्यांचा उपदेश केवळ अस्पृश्यांना सावध करण्याकरिता केला आहे यावर आमचा विश्वास बसत नाही. त्यात चिथावणीचे जहर भरले आहे, असे आम्ही मानतो. कारण जसे उघडपणे निषेध करण्याची शरम वाटली म्हणजे काही लोक कधी कधी उपदेशाच्या मिषाने निषेध करण्याची आपली मनीषा तृप्त करून घेतात तशापैकी तर हा प्रकार आहेच, पण हा उपक्रम, साधा उपदेश अगर

साधा निषेध याच्या पलिकडला असून ज्या स्पृश्य लोकांविरूद्ध हा सत्याग्रह करण्यात येत आहे त्या लोकाना त्यांच्या हाती '' फाजील उत्साही '' अस्पृश्यांना शासन करून वठणीवर आणण्यास कोणते शस्त्र आहे याची आठवण करून देण्यासाठी हा इषारा आहे, असे आम्हास वाटते. कारण ज्या लोकांची या गोष्टीला खरी सहानुभूती आहे व अस्पृश्यांची उपजीविका स्पृश्यांच्या हातात असून, स्पृश्य लोक आपला आश्रय बंद करून अस्पृश्यांना सत्याग्रहापासून परावृत्त करतील असे त्यांना पूर्णपणे माहीत आहे त्यांनी जसा अस्पृश्यांना स्पृश्यांच्या हाती कोणते शस्त्र आहे याची जाणीव ठेवा! असा इशारा दिला तसाच स्पृश्यांनाही सत्याग्रहासारखे सत्कार्य हाणून पाडण्यासाठी हाती असलेल्या शस्त्राचा दुरुपयोग कराल तर खबरदार! असाही इशारा दिला असता. पण ते यांना सुचले नाही. खरे म्हटले असता सत्याग्रहास प्रतियोग म्हणून बहिष्कार टाकला जाईल हे अस्पृश्य लोकाना सांगत सुटण्याचे काहीच प्रयोजन नाही. ज्या अस्पृश्यांनी सत्याग्रहाची चळचळ सुरू केली आहे, त्यांना या भविष्याची प्रथमपासूनच पूर्ण कल्पना होती. पण या बहिष्काराला भ्यावे कोणी? ज्याला ध्येय नाही तोच भिईल. ज्याच्या डोळयापुढे धगधगीत ध्येय आहे तो कदापि भिणार नाही. कारण, ध्येयवादी लोकांस पूर्णपणे माहीत असते की, कोणतेही ध्येय कितीही हलके असले तरी ते साध्य करण्यास तपाची आवश्यकता असतेच. हे ध्येय जितके उच्च असेल तितकी ते मिळविण्याकरिता करावी लागणारी तपश्चर्याही खडतर प्रकारची पाहिजे. तपश्चर्येवाचून कोणीही आपले ध्येय गाठल्याचा इतिहासात पुरावा नाही. केवळ सुख आणि स्वास्थ्य हे माणसाचे जीवित कर्तव्य आहे असे नाही. तसे जर असते तर मनुष्यत्त्वाला साजेशी तेजस्वी कार्ये या जगात घडून आली नसती. पशूंना साध्या स्वास्थ्यामध्ये समाधान वाटणे शक्य आहे. पण मनुष्य आणि पशू यामध्ये आहार, निद्रा, भय वगैरे शारीरिक धर्म जरी सामान्य असले तरी बुद्धी ही खास देणगी परमेश्वराने फक्त मनुष्यालाच दिली आहे. ती जेव्हा जागृत नसेल तेव्हा मनुष्य हा पशुच असतो व साध्या स्वास्थ्यामध्ये तो सुख मानू शकतो. परंतु तीच बुद्धी जागृत होऊन जिवंतपणाची जाणीव झालेल्या मनुष्याला ही स्मशानशांतता पटणे शक्य नाही. त्याला साधे स्वास्थ्य हवे किंवा आपले बुद्धीने ठरविलेले ध्येय हवे याचा निर्णय करावा लागतो. अस्पृश्य वर्ग आज जागृत झाला आहे व त्यास साधे स्वास्थ्य हवे किंवा समता हवी, या दोहोंपैकी कोणत्यातरीपक्षी निश्चय करण्याची वेळ येणार होती, ती आज आली आहे व त्याप्रमाणे समता प्राप्त करून घेण्याचा त्याने निश्चय केला आहे आणि आमची खात्री आहे की जागृत झालेली अस्पृश्य जनता आपली गती कुंठित

करणाऱ्या सर्व अडचणी दूर करण्यास अवश्य तो स्वार्थ त्याग करील, इतकेच नव्हे तर प्राणावरही तिलांजली देण्यास तयार होईल! इतक्या थराला गेलेल्या प्रजेस बहिष्काराची तमा काय असणार? व ज्यांनी जाणूनबुजून ही तपश्चर्या पत्करली आहे त्यांना इशारा देण्याचे काय कारण ? बरे या विघ्नसंतोषी लोकांनी वाजविलेल्या सत्याग्रह विरुद्ध बहिष्कार या भयसूचक घंटेचा नाद ऐकून भेदरून जाण्याचे काहीच कारण नाही. कारण बहिष्कारासारखे आत्मघातकी शस्त्र कोणीही हाती धरू शकत नाही व धरलेच तर ते फार दिवस पाजळू शकत नाही. ज्याप्रमाणे आम्ही अस्पृश्य आहोत हे आम्ही कबूल करणार नाही असे अस्पृश्य लोक म्हणतात त्याचप्रमाणे तुम्ही स्वराज्याला लायक आहात असे आम्ही कबूल करणार नाही, असे इंग्रज लोकही स्पृश्य लोकाना म्हणतात. जसे आज अस्पृश्य लोकांना ताळ्यावर आणण्यासाठी बहिष्कार पुकारण्याची इशारत दिली जात आहे, त्याचप्रमाणे इंग्रज सरकारलाही ठिकाणावर आणण्यासाठी स्वदेशीची उर्फ बहिष्काराची मोहीम सुरू करण्यात आली होती व ती किती तरी वर्षे चालू होती. परंतु सर्वांना ठाऊक आहे की, त्यापासून इंग्रज सरकारच्या केसालाही धक्का लागला नाही. याचे कारण अगदी उघड आहे. जेथे परस्परातील आर्थिक संबंध दाता व याचक अशा परीचा असतो तेथे ही बहिष्काराची मात्रा लागू पडण्याचा संभव असतो. कारण, दात्याने जर याचकावर बहिष्कार घातला तर त्याने दात्याचे काहीच नुकसान होत नाही. परंतु जेथे परस्परातील संबंध दानाच्या स्वरुपाचा नसून विनिमयाच्या स्वरूपाचा असतो तेथे बहिष्काराची मात्रा चालत नाही. अशा अवस्थेत बहिष्कार घालणे म्हणजे विनिमयाने होणारा स्वार्थ बुडविणे असाच त्याचा परिणाम होतो. दरेकाची स्वार्थावर नजर असल्याकारणाने परस्परांवर बहिष्कार घालून विनिमयाने होणारा स्वार्थ बुडविण्यास कोणीच तयार नसतो. तसे जर नसते तर गिरणीच्या मालकांना पोटभरू मजूरांवर कायमचा बहिष्कार टाकता आला असता व इंग्रज व्यापाऱ्यांविरूद्ध स्वदेशीच्या काळात पुकारलेला बहिष्कार सिद्धीस गेला असता. हे घडत नाही याचे कारण असे की बहिष्काराने जर फक्त शत्रूलाच घाव बसता तर त्याच्यासारखे इतरास वठणीवर आणण्याचे दुसरे महान शस्त्र नव्हते. परंतु त्या शस्त्राची अशी विचित्र गती आहे की त्याच्या माऱ्याने शत्रूच्या बरोबर स्वतःलाही घाव होतो. जे लोक बहिष्काराची धमकी देतात त्यांना हे बहिष्काराचे शस्त्र एकेरी आहे किंवा दुहेरी आहे, याचा समज झाला नसावा किंवा अस्पृश्य समाज परोपजीवी असून स्पृश्य

समाज त्यांचे पोषण करतो अशी त्यांनी खोटी समजूत तरी करून घेतली असावी. हिंदू समाजाची रचना इतर समाजाप्रमाणे विनिमयावरच झालेली आहे. अशा परिस्थितीत कोणी कोणावर उपकार करतो असे मानण्याचे मुळी कारणच नाही. धन्याने नोकरास चाकरीस ठेविले तर तू मजवर काही उपकार करीत नाहीस असे धनी त्यास मोठ्या दिमाखाने म्हणतो. परंतु मी उपकार करीत नाही हे तर खरेच, परंतु तू देखिल मजवर काही उपकार करीत नाहीस असे नोकरालाही धन्याला ठासून सांगता येण्यासारखे आहे. जे काम स्वतःला करता येते ते काम इतरांकडून कोणीही सहसा करून घेत नाही. आपल्याकडून न होणारे काम करून घेण्यासाठीच परक्याची जरूरी लागते. धन्याने संबंध सोडला तर नोकरलोक हवालदील होतील. पण नोकराने संबंध तोडला तर जवळ पैका असूनही धन्याची कुचंबना होईल. एकूण, एकाला दुसऱ्याची जरुरी भासते, म्हणून हा परस्परांचा संबंध जुळून येतो आणि स्वार्थाच्या पायावर उभारलेला हा संबंध सहजासहजी कोणाच्याने तोडवत नाही. कारण, त्यात उभयपक्षाची हानी होते. तोच न्याय स्पृश्य व अस्पृश्य यांच्या संबंधास लागू आहे. अस्पृश्य लोक जे स्पृश्यांची नोकरी करितात ते आपण स्पृश्यांना उपकृत करतो, असे म्हणत नाहीत. तसेच स्पृश्यांनीही त्यांना आपण पोसतो अशी घमेंड मारू नये. उभयतांचा संबंध निव्वळ स्वार्थाचा आहे. एकमेकांचे एकमेकावाचून अडते, म्हणून दोघेही पडतात. अशा व्यवस्थेने सांधलेल्या लोकांना परस्परांवर बहिष्कार टाकणे शक्य नाही व टाकलाच तर तो फार दिवस टाकणे अशक्य आहे.

स्पृश्य व अस्पृश्य यांच्यातील आर्थिक संबंध जरी परस्परातील स्वार्थाच्या भावनेवर अधिष्ठित झालेला असला तरी या दोनही वर्गाच्या धारणपोषणशक्तीत थोडा बहुत फरक आहे हे कबूल करणे प्राप्त आहे व त्यामुळे एक दुसऱ्याला जितका मारक होऊ शकतो तितका पहिला दुसऱ्याला मारक होऊ शकत नाही. ज्यांची धारणपोषणशक्ती कमी प्रतीची आहे, त्यांनी ज्यांची धारणपोषणशक्ती श्रेष्ठ प्रतीची आहे, त्यांच्याशी झगडण्याचा जर प्रसंग आला तर तो प्रसंग त्यांना शेवटास नेणे जड जाते. कारण, ''समर्थांसी द्वंद बांधुनी मग कोठे तगावे'' अशी भ्रांत ज्यांची धारणपोषणशक्ती कमी प्रकारची असते त्यांना पडते व तशी भ्रांत पडल्यामुळे ज्यांची धारणपोषणशक्ती श्रेष्ठ असते त्यांना विरोध करून एखादे शाश्वतहित प्राप्त व्हावयाचे असते ते देखील त्यांना सोडून द्यावे लागते. याचे उत्कृष्ट उदाहरण महाभारतात पहावयास सापडते. कौरवपांडवांची सैन्ये कुरुक्षेत्रावर लढाईस सज्ज झाली असता युद्धास प्रारंभ करण्यापूर्वी भीष्म, द्रोण व शला अशा

महापुरुषांचे पाद वंदन करून त्यांचा आशीर्वाद घ्यावा, असे युधिष्ठिरास वाटले व रणांगणावर आपले कवच काढून ठेवून नम्रपणाने तो त्याजकडे जाता झाला. शिष्टसांप्रदायाचे योग्य अनुकरण करणाऱ्या युधिष्ठिराला आशीर्वाद देणे त्यांना क्रमप्राप्त होतेच. परंतु आशीर्वाद देताना आपल्या स्थितीची आठवण झाली आणि आमची बाजू सत्य आहे व कौरवांची बाजू असत्य आहे हे तुम्ही मान्य करीत असूनही सत्याच्या बाजूने का लढत नाही असा प्रश्न युधिष्ठिर कदाचित आपणाला विचारील याची जाणीव होऊन ते आपल्या मनात ओशाळले व तो विचारण्यापूर्वीच त्यांनी युधिष्ठिरास सांगितले की,

**अर्थस्य पुरुषो दासो दासस्त्वर्थो न कस्यचित्।**
**इति सत्य महाराज बद्धोऽस्म्यर्थेन कौरवैः।।**

" मनुष्य अर्थाचा गुलाम आहे; अर्थ कोणाचा गुलाम नाही. असा खरा प्रकार असल्यामुळे, हे महाराज युधिष्ठिरा! कौरवांनी आम्हाला अर्थाने बांधून टाकिले आहे." असे म्हणण्याचा प्रसंग अस्पृश्य लोकावर का येणार नाही याचे दिग्दर्शन वरती केलेच आहे. तथापि, आलाच तर त्यांची धारणपोषणशक्ती कशी तग धरील व ते स्वावलंबी कसे होतील याचा विचार करणे इष्ट आहे, व म्हणून त्या विषयावर आमचे विचार प्रगट करण्याचे आम्ही आज योजिले आहे.

प्रथमतः अस्पृश्य वर्गात ज्या अनेक जातींचा समावेश झाला आहे त्या जातींपैकी कोणकोणत्या जातीस या बहिष्काराचा विशेष जाच होणार आहे हे ध्यानात घेतले पाहिजे. चांभार व ढोर या दोन धंदेवाईक जाती आहेत. अर्थात त्यांच्यावर बहिष्काराची मात्रा लागू होणे शक्य नाही. उलट त्यांनीच जर स्पृश्य लोकांवर बहिष्कार टाकला, नवीन जोडे बांधावयाचे किंवा जुने जोडे सांधावयाचे बंद केले तर त्यांचे चालण्यासारखे आहे. त्याचप्रमाणे मांग लोकही धंदेवाईक लोक आहेत. त्यांनी दोऱ्या, दोरखंडे, अगर केरसुण्या करावयाचे बंद केले, तर त्यांच्यानेही स्पृश्य लोक अडले जाणार आहेत. कारण बैलाला कासरा आणि मोटेला नाडा ही शेतकऱ्यांच्या आयुधांपैकी महत्त्वाची आयुधे आहेत व ती मांग लोकांच्या हाती असल्यामुळे स्पृश्य लोकांना त्यांच्यावर बहिष्कार टाकणे हितावह होणार नाही, उलट त्यांनीच जर बहिष्कार टाकला तर स्पृश्य लोकांना त्यांच्यापुढे नमावे लागेल. भंगी लोक तर स्पृश्य लोकांना एका क्षणात नमवू शकतील. त्यांचा धंदा जरी नीच मानण्यात आला असला तरी त्या धंद्याची उपयुक्तता इतकी

जबरदस्त आहे की, त्यांनी मनात आणले तर रोगाचे सत्र साऱ्या शहरात पसरुन ते सारी वस्ती नामशेष करण्यास कारणीभूत होऊ शकतील. आता महारांची काय गत आहे हे पाहू. महारांना त्यांचा म्हणून जातीचा धंदा असा काही नाही. अगदी शेवटच्या पायरीचे का होईनात पण ते राजपुरुषच आहेत. कारण सरकारी नोकरीवरतीच त्यांची उपजीविका आहे. सरकारी नोकराला कोणाचे घेणे नाही कोणाचे देणे नाही. त्यालाही बहिष्काराचे भय नाही, असे महारांनाही म्हणता येण्यासारखे आहे. पण ते केव्हा ? सरकारी नोकरी भली आणि आपण भले असे महारांना म्हणता येईल तेव्हा. परंतु त्यांच्या दुर्दैवाने त्यांना आज तसे म्हणता येत नाही असे आम्हास वाटते. याचे मुख्य कारण म्हटले म्हणजे महारांचे वतन हे होय. या वतनामुळे महार लोक स्पृश्याधीन झाले आहेत. त्यांना स्पृश्याधीन होण्याचे कारण असे की, ज्यांच्या हाताखाली महारांना नोकरी करावयाची असते ते अधिकारी सारे स्पृश्य लोकच असतात. हे लोक महारांपासून सरकारी नोकरी घेण्यापुरताच आपल्या अधिकाराचा उपयोग करतात असे नाही ते आपल्या अधिकाराचा उपयोग महार लोक पायरीने वागतात की नाही याची खबरदारी ठेवून त्यांनी पायरी सोडली तर त्यांना शासन करण्याकडेही त्या अधिकाराचा उपयोग करतात. सरकारी नोकरी वेळचे वेळी न केल्यामुळे महारांना शासन झाल्याचे एक उदाहरण देता आले तर त्याच्या जोडीला पाटलाची लाकडे फोडली नाहीत म्हणून, मामलेदाराच्या घोड्याला गवत घातले नाही म्हणून, कुळकर्ण्याची जमीन नांगरली नाही म्हणून, गावात रयतेला जोहार घातला नाही म्हणून, गावात भाकरी मागण्याचे सोडून दिले म्हणून, मेलेल्या जनावरांचे मांस खाण्याचे बंद केले म्हणून, अंगात चांगला पोषाख घातला म्हणून महारांना दंड झाल्याची हजारो उदाहरणे देता येतील. या गोष्टीचा आणि सरकारी नोकरीचा काही संबंध नाही. एकादा मुसलमान पाटील किंवा पारशी कुळकर्णी असता तर वतन म्हणजे महारांना सुखाची सावली झाली असती. त्यांनी जर दंड केला असता तर सरकारी नोकरीत कुचराई केल्यामुळेच केला असता. महाराने चांगला पोषाख केल्यामुळे, भाकरी मागण्याचे सोडून दिल्यामुळे किंवा मृतमांस खाण्याचे बंद केल्यामुळे केला नसता. कारण, महारांनी गलिच्छपणा टाकून सुव्यवस्थितपणे राहण्याचा उपक्रम केल्यामुळे त्यांची काही मानहानी झाली किंवा महार मातला असे त्यास वाटले नसते. परंतु तेच पाटील कुळकर्ण्याचे जोडपे स्पृश्य हिंदुधर्मीयांचे असल्यामुळे त्याला महाराने पायरी सोडली तर संताप येतो आणि संतापाच्या भरात हे जोडपे गुजगोष्टी करावयास लागून वतनामुळे प्राप्त झालेल्या अधिकाराचा दुरुपयोग करून महार सरकारी काम करीत नाहीत, असा खोटाच रिपोर्ट मामलेदाराकडे रवाना करते.

मामलेदार त्यास दुजोरा देऊन प्रांताकडे पाठवितो आणि प्रांत हुकूम करतो की महारांना 'सस्पेंड' करा. अशापरी केवळ वरचे अधिकारी स्पृश्य जातीचे असून खोट्या धर्माभिमानाला बळी पडले असल्यामुळे वतनाची गदा महारांवर बसते व यामुळे महारांना स्पृश्याधीन होऊन राहिल्याशिवाय गत्यंतर उरत नाही. वतनामुळे महार लोकांस जसे स्पृश्याधीन होणे भाग पडते तसेच त्यांना वतनामुळे स्पृश्यावलंबी व्हावे लागते. महार हे वतनदार कामगार या नात्याने सरकारचे नोकर आहेत परंतु या नोकरीबद्दल मिळावयाचा पगार त्यांना सरकारकडून मिळत नाही. त्यांचा पगार म्हणजे बलुते व ते त्यांना देणार ती स्पृश्य जनता! अशी ही वतनाची व्यवस्था असल्याकारणाने महार जात ही सहजासहजी स्पृश्यावलंबी झाली आहे. काम जरी सरकारचे करणे झाले तरी त्या कामाबद्दल पगार द्यावयाचा किंवा नाही हे ठरविण्याचा अधिकार रयतेकडे आला आहे व ती रयतही खोट्या धर्माभिमानाला बळी पडली असल्यामुळे महार लोक पायरीने वागतात किंवा नाही याची खबरदारी घेतल्याशिवाय बलुते अदा करीत नाही. एकूण अधिकाऱ्यांच्या व रयतेच्या कैचीत सापडलेल्या महार प्रजेला या वतनव्यवस्थेमुळे स्पृश्यांची गुलामगिरी पत्करावी लागत आहे. ह्या गुलामगिरीतून जर महार लोकांना आपली सुटका करून घ्यावयाची असेल तर त्यांनी आर्थिक स्वातंत्र्य मिळविले पाहिजे व म्हणूनच आम्ही सांगतो की प्रथम महार वतनव्यवस्थेत सुधारणा करा. त्यातील पहिली सुधारणा ही की इनाम जमिनीवर कर आकार देऊन जर जमीनी त्यांना ठेवता आल्या तर त्यांनी वतनी नोकरी अजिबात सोडून द्यावी. म्हणजे एका दमात स्पृश्याधीन व स्पृश्यावलंबी झालेली महार प्रजा आर्थिकदृष्ट्या स्वतंत्र होईल. एवढे जरी करता आले नाही तरी त्यांनी रयतेकडून बलुते घेण्याऐवजी सरकारकडून पगार मागावा. याने ती स्पृश्याधीन राहिली तरी ती निदान स्पृश्यावलंबी राहणार नाही. ही सुधारणा घडून आल्यास बहिष्काराचा जाच आपणास होईल अशी चिंता करण्याचे काही विशेष कारण महार लोकास उरणार नाही.

वतन सोडून तुम्ही स्वतंत्र व्हा असे महार लोकास सांगितले असता वतन सोडले तर आम्हास दुसरा उपजीविकेचा मार्ग कोणता, असा ते लोक उलट प्रश्न करीत असतात. खरे म्हटले असता हा प्रश्न महार लोकांनी करावयाचे काही कारण नाही. जो माणूस जन्माला येतो तो काही आपल्यासाठी एकादा पोट भरण्याचा धंदा बरोबर घेऊन येत नाही. जन्मास आल्यानंतर त्याच्या लायकीप्रमाणे तो कोणता ना कोणता उद्योग करून आपले पोट भरतोच. मग महारांनाच का भरता

येणार नाही? तथापि, आर्थिक स्वातंत्र्याचे उपाय म्हणून आम्ही त्यांना एक दोन सूचना करीत आहोत. आमची महार लोकांना पहिली सूचना अशी आहे की तुम्ही आपल्या निराळया वसाहती करा. महार लोकांना गावाचा मोठा अभिमान आहे. वडिलांचा गाव सोडून जाणे याचे त्यांना मोठे कोडे पडते. वडील मेले तेथेच मरणे हे आपले कर्तव्य आहे असे ते समजतात. गावात महारांना जर मानापानाने लोक वागवते तर गावाबद्दल अभिमान बाळगणे रास्त होते. पण जेथे गावातले लोक महारांना कसपटासमान लेखतात, लहान सहान कारणावरून त्यांचा गाव बंद करतात, ज्या गावात शिवीशिवाय कोणी बोलत नाही, त्या गावात राहण्याचा आग्रह महारांनी धरावा ही मोठ्या शरमेची गोष्ट आहे. अशा प्रकारच्या जुलूमाची कहाणी महार लोकांस कोणी सांगावयास नको. सोलापूर जिल्ह्यात मासणूर, रातंजन, राळेरास, पानगाव, सुरडी, मालवंडी, चिखरडे, कासेगाव, शिरबाबी वगैरे गावात महार लोकांवर गावकऱ्यांचा कसा जुलूम चालला आहे हे बहिष्कृत भारताच्या वाचकास श्रुत आहेच. या गावापैकी कित्येक गावांनी महारांना हाकून द्यावयाचा निश्चय केला आहे व तो ते शेवटास नेण्याच्या विचारात आहेत. या परिस्थितीस तोंड देणे महार लोकांना कठीण पडते. कारण दोन अडीचशे उंबऱ्यांच्या गावात महारांची काय ती दहा-पाच घरे असतात. अशा चिमुकल्या लोकास बहुसंख्यांक जातीतील गुंड लोकांच्या अत्याचारास पुरे पडणे शक्य नाही. तेव्हा दरेक गावात पाच-पाच, दहा-दहा घरांची तुरळक वस्ती ठेवून कोंडमारा करून घेण्याऐवजी निरनिराळया गावातील लहान लहान वस्ती उठवून त्यांची एक निराळी वसाहत केली तर ही व्यवस्था त्यांच्या सर्वस्वी हिताची होणार आहे. अशा प्रकारच्या वसाहती जेथे जेथे फॉरेस्ट जमीनी आहेत तेथे जर करण्यात आल्या तर वतन गेल्यामुळे होणारे नुकसान शेती करून महारांना हजारो पटीने भरून काढता येईल व तेही कोणाची गुलामगिरी न करता स्वतंत्रपणे करता येईल. अशा वसाहतीपासून नुसती उपजीविकाच होईल इतकेच नव्हे तर त्यापासून दुसरे पुष्कळसे फायदे होण्यासारखे आहेत. गावात राहिल्याने महारांना कोणताच व्यवसाय करता येत नाही. परंतु तेच महार लोकांनी निराळी वस्ती केली तर त्यांना सर्व प्रकारचे मार्ग मोकळे होतील. महार पाटील होऊ शकेल, महाराला किराणा मालाचे दुकान घालता येईल, महाराला शिंप्याचे दुकान घालता येईल. जो उद्योग आज महारांना गावात राहून करता येत नाही तोच उद्योग निराळी वस्ती केल्यावर महारांना करावयास सापडेल. निराळी वस्ती

केल्यापासून एवढाच फायदा आहे असे नाही त्याशिवाय आमच्या मते दुसराही आणखी महत्त्वाचा फायदा आहे. उपजताच महाराच्या मुलाच्या पोटात शिवाशिवीचे भय बसते. ह्याला शिवशील, त्याला शिवशील हा नित्याचा शब्द त्याच्या कानावर पडत गेल्याने ते मूल स्वतःस जे अपवित्र व हीन मानू लागते ते शेवटपर्यंत तसेच मानून राहाते. हे त्याच्या मनावरील दडपण एकदा बसले की ते कायमचे राहते व त्याचे मन असे कमकुवत झाल्यामुळे त्याच्या हातून पुढे कोणतेच पुरुषार्थाचे कार्य होत नाही. या नव्या वस्तीत वाढलेली महारांची मुले निर्भयपणे वाढतील. शिवाशिवीची भाषा त्यांच्या कानावर पडण्याचा कूयोग येणार नाही. आपण इतर कोणापेक्षा कमी आहोत व इतर कोणी आपणापेक्षा श्रेष्ठ आहेत असे त्यांना वाटणार नाही व ती मनाने दुबळी होणार नाहीत. हा लाभ फार महत्त्वाचा आहे व त्याबरोबरच जर शेतीसारख्या स्वतंत्र उपजीविकेचे साधन हाती येत आहे तर याचा फायदा महार लोकांनी अवश्य घ्यावा. या नव्या वसाहती घडवून आणण्यास दोन प्रकारची मदत पाहिजे आहे. (१) सरकारचे सहाय्य पाहिजे. (२) महार लोकांनी गाव सोडण्यास तयार झाले पाहिजे. पैकी सरकारचे सहाय्य मिळणे कठीण नाही. म्हैसूर संस्थानात अस्पृश्य वर्गातील लोकांना प्रत्येक कुटुंबास ७ एकर जमीन देऊन त्यांची निराळी वसाहत करण्याचे निश्चित झाले आहे. आपल्या इलाख्यातही इंग्रज सरकारने बेरड लोकांची अशाच प्रकारची वसाहत करण्याचे योजिले आहे. तेव्हा तीच योजना महार लोकास लागू करण्यास सरकार माघार घेईल असे वाटत नाही. प्रश्न इतकाच आहे की, महार लोक आपला गाव सोडून आपली निराळी वसाहत करण्यास तयार होतील काय?

सर्वच महार लोकांना शेतीवर उपजीविका करता येईल इतके मोठे क्षेत्र सापडणे कठीण आहे. तेव्हा शेतीला जोडून दुसरा काही तरी धंदा महार लोकांनी करणे अवश्य आहे. महार जात ही धंदेवाईक जात नाही. अर्थात तिला जो धंदा करता येईल तो धंदा तिने करण्यास काही हरकत नाही. एवढी गोष्ट कबूल करणे प्राप्त आहे की, पैशाच्या व अनुभवाच्या अभावी श्रेष्ठ प्रतीचे किफायतशीर धंदे या जातीतील लोकांना करता येणे शक्य होणार नाही. शक्य झालेच तर एखादा कनिष्ठ प्रकारचा धंदा हाती घेता येईल. परंतु ब्राह्मण्याच्या भुताटकीने पछाडलेले महार लोक हीन धंदा पत्त्करण्यास तयार होतील असे संभवत नाही. ज्या धंद्याला घाण नाही किंवा जो अमूक एका जातीचा धंदा होऊन बसला नाही असा एखादा धंदा करता येण्यासारखा असला तर तो करण्यास कदाचित महार लोक उद्युक्त होतील. आमच्या मते अशा प्रकारचा एकच एक धंदा म्हणजे खादी विणण्याचा आहे व महार लोकांना आमची शिफारस आहे की, तुम्ही खादी विणा.

त्यांना आता कदाचित असे वाटेल की, आम्ही विणलेली खादी घेणार कोण? व ती जर कोणी घेतली नाही, तर खादी विणल्याचा उपयोग काय? परंतु हा प्रश्न सोडविणे काही बिकट नाही. महार लोकांना स्वतःचे उपयोगासाठी कपडा विकत घ्यावा लागतोच. तेव्हा सर्व महार लोकांनी जर खादीचे कपडे वापरण्याचा निश्चय केला आणि महारांनी विणलेल्या खादीशिवाय दुसऱ्या कोणाची खादी घ्यावयाची नाही अशी जरी शपथ घेतली तरी विणकर महारांना स्वजातीची इतकी मोठी गिऱ्हाईकी होईल की ते त्यांना पुरून उरेल. या दोन गोष्टी अंमलात आणण्यास द्रव्याचे साहाय्य लागेल. परंतु ते साहाय्य मिळण्यास फारसे प्रयास पडणार नाहीत. महार लोकांचा निश्चय झाला म्हणजे बस्स आहे.

महारांना जर आपली माणुसकी मिळवावयाची असली तर त्यांनी रयतेच्या गुलामगिरीतून मुक्त झाले पाहिजे आणि जर त्यांना मुक्त व्हावयाचे असेल तर त्यांना वरील गोष्टी एकनिश्चयाने करावयास पाहिजेत. त्याशिवाय त्यांचा मार्ग सुकर होणार नाही हे त्यांनी ध्यानात घ्यावे.

पहिल्या दिवसाचे काम आटोपले. नंतर त्याच मंडपात त्याच वेळी महार वतनाचे दुरुस्तीचे जे बिल डॉ. आंबेडकर साहेबांनी मुंबई कौन्सिलमध्ये आणले आहे त्याला पाठिंबा देण्याकरिता शेट माणेकचंद शहा यांच्या अध्यक्षतेखाली दुसरी सभा सुरू झाली. त्या सभेत पुढे लिहिलेला ठराव मांडण्यात आला. ''डॉ. आंबेडकर साहेब यांनी महार वतनात सुधारणा करण्याच्या दृष्टीने जे बिल आणिले आहे, त्या बिलास ही वतनदार महार परिषद आपला पूर्ण पाठिंबा देते.''

हा ठराव श्री. हरीभाऊ तोरणे यांनी मांडला. त्यास गो. गो. कांबळे यांनी अनुमोदन व भिमा तात्या वेसकर आणि निवृत्ती बंदसोडे यांनी पुष्टी दिल्यावर शेट माणेकचंद यांनी महार वतनाच्या बिलाचे स्पष्टीकरण करण्याकरिता डॉ. आंबेडकर साहेबांना विनंती केली. त्यांनी लोकांना आपण आणलेल्या दुरुस्तीचे बिल अगदी साध्या आणि सोप्या भाषेत समजावून सांगितले. लोकांना ते तात्काळ पटले. सर्व लोक सभेत म्हणू लागले की, डॉ आंबेडकर साहेब यांनी आता समजावून सांगितल्याप्रमाणे जर बिलात सुधारणा झाली तर आम्हा वतनरुपी रौरव नरकात पडलेल्या किड्यांचा उद्धार झाल्याशिवाय राहणार नाही. असे म्हणून सर्व लोकांनी डॉ. आंबेडकर यांचा जयजयकार केला व म्हणू लागले की जे लोक महार वतनावर गदा म्हणून महार लोकांची दिशाभूल करीत आहेत ते महामूर्ख किंवा पाजी तरी असले पाहिजेत. सभेचे अध्यक्ष माणेकचंद यांनी देखील बिलाच्या पुष्ट्यर्थ भाषण केले व लोकांना या ठरावाच्या विरुद्ध किंवा काही प्रश्न विचारावयाचे असतील ते खुशाल विचारा असे सांगितले. पण कोणीही प्रश्न विचारिले नाहीत. नंतर ठराव मताला टाकता तो प्रचंड टाळयांच्या गजरात पास झाला. नंतर सभेचे काम दुसऱ्या दिवसापर्यंत तहकूब ठेवण्यात आले.

ता. २७-१२-२७ रोजी सकाळी विषयनियामक कमिटीची बैठक भरविण्यात आली. सदर बैठकीत खाली लिहिलेले ठराव परिषदेपुढे मांडण्याकरिता सर्वानुमते ठरविण्यात आले. परिषदेच्या कामास रविवारी ११.३० वाजता डॉ. आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली सुरवात झाली.

## परिषदेत खालील ठराव पास झाले

(१) गीतेत सांगितलेल्या गुणकर्म विभागशः तत्त्वांची पायमल्ली करून जन्मजाति विभागशः या तत्त्वावर समाजाची रचना करण्यात आल्यामुळे हिंदू समाजाचा सर्वस्वी घात झाला आहे असे या परिषदेचे ठाम मत आहे. यास्तव ही परिषद हिंदू धर्माधिकारी वर्गास असे सुचविते की, त्यांनी प्रचलित चातुर्वर्ण्याची कल्पना सोडून हिंदू समाजाचा एक वर्ण होईल अशा प्रकारची पुनर्घटना करण्याचे कार्य त्वरित हाती घ्यावे. या बाबतीत दिरंगाई अगर कसूर झाल्यास चातुर्वर्ण्याच्या चौकटीत सापडून चिरडून गेलेल्या अस्पृश्यवर्गास आपली सुटका करून घेण्यास धर्मांतर करावे की काय, याचा विचार करावा लागेल.

(२) या परिषदेचे असे मत आहे की, श्रीक्षेत्र पंढरपूर येथील श्री विठोबाचे देवालयात प्रवेश होईल अशी व्यवस्था अस्पृश्य वर्गानी करावी व प्रसंग पडल्यास येथे सत्याग्रहही करण्यात यावा.

(३) ही परिषद असे ठरविते की, वतनदार महारांच्या गाऱ्हाण्याची दाद लावून घेण्याची कायमची व्यवस्था करण्याकरिता दरेक जिल्ह्यास एक महार वतनदार संघ स्थापन करण्यात यावा. त्याप्रमाणे सोलापूर जिल्ह्याकरिता एक संघ स्थापन करण्यास व गावागणिक वार्षिक वर्गणी रु. ५ घेण्यास आपली मंजुरी देत आहे व संघाचे चालकत्व खालील गृहस्थांकडे सोपवीत आहे.

सोलापूर तालुका––विश्वनाथ मेघाजी बंदसोडे

पंढरपूर तालुका––बापू ऐलूनी सर्वगोड

करमाळे तालुका––गोविंद गोपाळ कांबळे

माळशिरस तालुका––तात्याबा पांडुरंग सावंत

सांगोले तालुका––चोखा शिदू काटे

मांढे तालुका––पिराजी मरीबा सरवदे

बार्शी तालुका––सखाराम महादू बोकेफोडे

सोलापूर शहर––जिवाप्पा सुभानराव ऐदाळे

सेक्रेटरी––हरिभाऊ तोरणे

वरील नेमलेल्या लोकांस या संघाचे नियम तयार करण्याचा अधिकार ही सभा देत आहे आणि त्यांनी केलेले नियम पुढील वतनदार जिल्हा सभेत मंजूर करुन घ्यावेत व ती सभा निदान दोन वर्षाच्या आत भरविण्यात यावी.

(४) सोलापूर, पंढरपूर वगैरे म्युनिसीपालिटीच्या गावी आणि जिल्ह्यातील रातंजन, कारी, देगाव वगैरे गावी महारांच्या मालकीच्या जागा गावठाणामध्ये सामील करण्यात आल्या आहेत, त्यामुळे महारांचे अतिशय नुकसान झाले आहे. तरी जिल्ह्याच्या कलेक्टरास या बाबतीत फेरचौकशी करण्याची ही सभा विनंती करिते.

(५) या जिल्ह्यात ज्या गावी महारांना वतनी इनाम जमीनी नाहीत अशा गावच्या महार लोकांना त्यांच्या गावी जर पडित अगर फॉरेस्ट जमीनी असतील तर त्या जमीनी त्यांना वतन इनाम म्हणून देण्यात याव्या.

(६) बेलापूर, मासणूर, राळेरास, पानगाव, चिखरडे, कोसगाव, चाकुरे, शिखावी, मेडद, दहिंगाव, भांबुर्डी, रातंजन, सुरडी, गुरसाळे ता. माळशिरस, लोणंद या गावात पाटील कुळकर्ण्यांच्या चिथावणीवरून रयत लोकांनी कट करून महाराना गावातून हाकून देण्याचा घाट घातला आहे. तरी सदरहू गावात होत असलेल्या जुलूमाची चौकशी सरकारने करून महारांचे संरक्षण करण्यास योग्य तो उपाय योजावा. अशी या संस्थेची आग्रहाची विनंती आहे.

(७) या जिल्ह्यात ज्या गावी महारांना वतनी इनाम जमीनी नाहीत अशा गावच्या महार लोकांना त्यांच्या गावी जर पडित अगर फॉरेस्ट जमीनी असतील तर त्या जमीनी त्यांना वतन इनाम म्हणून देण्यात याव्या.

(८) या सोलापूर जिल्हा वतनदार महार परिषदेचे असे मत आहे की, जिल्ह्या-जिल्ह्यातील महार लोकांची आर्थिक गुलामगिरी नाहीशी करण्यासाठी व त्यांचा संसार अधिक सुखमय व्हावा म्हणून प्रत्येक जिल्हा वतनदार महार संघाने सहकारी मंडळया स्थापन करण्याची, सूत कातणे व कापड विणणे या कामांचा प्रसार करण्याची व सहकारी शेतवर्ग वसाहती स्थापन करण्याची शक्य तितक्या लवकर व्यवस्था करावी.

(९) या सभेची सरकारला अशी विनंती आहे की, फॉरेस्ट जमीनी इतर वर्गाच्या लोकाना देण्यापूर्वी अस्पृश्यांच्या अर्जाचा विचार प्रथम करण्यात यावा व जर ज्या अटीवर फॉरेस्ट जमीन देण्याचे ठरले असेल त्या अटी अस्पृश्य वर्गातील माणसास कबूल असतील तर इतर जातीतील अर्जदारास न देता त्या अस्पृश्य वर्गातील अर्जदारासच देण्यात याव्या.

वरील ठरावावर मेसर्स सीताराम नामदेव शिवतरकर, धोंडीराम गायकवाड, बोरकर, माने, कांबळे, बंदसोडे, गोविंद कांबळे, वेसकर, शिवणकर, बोकेफोडे, साबळे, तोरणे या वक्त्यांची समयाला अनुसरून भाषणे झाली.

येणेप्रमाणे ठराव पास झाल्यावर अध्यक्षाचे व आलेल्या मंडळीचे आभार मानल्यावर हारतुरे झाले नंतर डॉ. आंबेडकर यांच्या जयजयकारात परिषदेचे काम संपले.



१६

# हक्क बजावण्यासाठी सर्वांनी सिध्द झाले पाहिजे

बारा पाखाडी, पाली, दांडा रोड, वांद्रे येथील मंडळीच्या विद्यमाने रविवार ता. ११ डिसेंबर १९२७ रोजी संध्याकाळी ४ वाजता वांद्रे मुक्कामी डॉ. भीमराव आंबेडकर याच्या अध्यक्षतेखाली महाड सत्याग्रहाच्या मदतीकरिता जाहीर सभा भरली होती. सभेकरिता मंडळीनी शोभिवंत मंडप उभारला होता. वांद्रे व आसपासच्या खेड्यातील मिळून एक हजारावर लोकसमुदाय जमला होता. मुंबईहून डॉ. आंबेडकर यांच्याबरोबर मेसर्स शिवतरकर, प्रधान, गुप्ते, जाधव, गंगावणे, गायकवाड, खोलवडीकर वगैरे मंडळी गेली होती. शिवाय बहिष्कृत हितकारिणी सभेने नवीन उभारलेले आंबेडकर पथक सभेच्या व्यवस्थेकरिता मुद्दाम सभाचालकांनी बोलाविले होते. मुंबईची मंडळी स्टेशनवर उतरल्यावर वांद्रेकरांनी त्यांच्याकरिता खास रिझर्व करून ठेविलेल्या मोटारीने मंडळी सभामंडपाकडे गेली. तेथे गेल्यावर लागलीच सभेच्या कामास सुरवात करण्यात आली व पुढे लिहिलेला ठराव सभेपुढे मांडण्यात आला. '' आम्ही बारा पाखाडी, मुक्काम वांद्रे येथे राहणारी मंडळी ता. २५ डिसेंबरपासून डॉ. आंबेडकर यांच्या नेतृत्त्वाखाली महाड येथे सुरू होणाऱ्या सत्याग्रहाला १७५ रु. देणगी देत आहो. तसेच येथे आलेल्या इतर मंडळीस विनंती करितो की त्यांनी शक्य तितकी जास्त मदत सत्याग्रहाकरिता करावी. '' या ठरावावर स्थानिक मंडळी पैकी मेसर्स जयगुरु देवगावकर, सखाराम भिकू , काशिराम हवालदार, गोविंद तुळसकर यांची भाषणे झाल्यावर तेथील स्थानिक पुढारी सोनू सजन संदीरकर यांनी भाषण करून १७५ रु. देणगी डॉ. आंबेडकर यांच्या स्वाधीन केली. डॉ. साहेबांनी आभारपूर्वक देणगीचा स्वीकार करून पुढीलप्रमाणे भाषण केले. .ते म्हणाले,

सद्‌गृहस्थहो!

आपण दिलेल्या देणगीबद्दल मी आपला आभारी आहे. आज येथे जमलेल्या लोकांनी आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाचे सिंहावलोकन केले तर आपणाला मान खाली घालावी लागेल. कोकणात दापोली मुक्कामी पूर्वी सुभेदार, जमेदार, हवालदार वगैरेंचे टोलेजंग वाडे होते. पण त्या वाड्यावर आज मुसलमान लोकांनी नांगर फिरवला आहे. त्या वाड्यांचा तुम्हाला मागमूसही लागणार नाही. ही आपली दशा का झाली ह्याचा विचार करा. ईस्ट इंडिया कंपनी

---

बहिष्कृत भारत : २३ डिसेंबर १९२७.

येथे आली त्या कंपनीला राज्यस्थापना करण्याकरिता आपल्या लोकांनी मदत केली आणि जोपर्यंत आपले लोक पलटणीत होते तोपर्यंतच आपली भरभराट होती. पलटणीचा दरवाजा बंद होताच आपली स्थिती खालावत चालली. आज आपल्या लोकांना पोलिसात घेत नाहीत व इतर ठिकाणी नोकरी मिळण्याची मारामार पडत आहे. पुण्यात आपल्या वर्गापैकी एक ग्रॅज्युएट झालेला मुलगा आहे त्याला नोकरी मिळण्याकरिता मी आज दोन वर्ष सरकारबरोबर झगडत आहे. याच्या आड सरकारातीलच काही वरिष्ठ अधिकारी आहेत हे मी जाणून आहे. महाडला जो आम्ही सत्याग्रह करणार आहोत आणि ज्याकरिता तुम्ही आम्हास आर्थिक मदत केली त्याबद्दल तुम्ही असे समजू नका की, आम्ही तुमच्या गाडीचे घोडे आहोत व त्याकरिता तुम्ही ही चंदी देता. हे काम सर्वांचे आहे. महाडच्या चवदार तळ्यावर जो सत्याग्रह करावयाचा तो स्पृश्य हिंदू आपणास अपवित्र मानतात म्हणून. महाडला अस्पृश्यांना पाण्याचा दुष्काळ आहे म्हणून नव्हे, तर स्पृश्य हिंदू व आपण हे बरोबरीचे आहो. आपला तो हक्क आहे आणि हा हक्क बजावण्याकरिता सर्वांनी सिद्ध झाले पाहिजे. तेथे कोणताही अनिष्ट प्रकार होणार नाही अशी माझी खात्री आहे. म्हणून तुम्ही अगदी निर्भय मनाने या सत्याग्रहात भाग घ्यावा, अशी माझी विनंती आहे.



## १७

# महाड सत्याग्रह परिषद

महाडच्या संग्रामाची पूर्वतयारी करण्यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी एक पत्रक प्रसिद्ध केले की, अस्पृश्यांनी सत्याग्रहासाठी जय्यत तयार रहावे. हा संदेश देणारे पत्रक येणेप्रमाणे :–

**'' बहिष्कृत हितकारिणी सभेच्या विद्यमाने**

महाड येथे ता. २५ डिसेंबर १९२७ पासून सत्याग्रह सुरू होणार !

महाड सत्याग्रहास मदत करा.

जेणे कुलवंत म्हणावे । तेही वेगी हजीर व्हावे ।।
हजीर न होता कष्टावे । लागेल पुढे ।। १ ।।

सर्व अस्पृश्य ज्ञातिबंधूंस कळविण्यात येते की, ता. २५ डिसेंबर १९२७ रोजी महाड मुक्कामी एक सभा भरविण्याचे ठरले आहे. गेल्या मार्च महिन्याच्या १९ तारखेस महाडास सभा भरविण्यात आली असता पुन्हा त्याच ठिकाणी दुसरी सभा भरविण्याचे कारण काय, असे कदाचित काही लोकांकडून विचारण्यात येईल. त्यास उत्तर असे की, महाड येथील चवदार तळयावर जाऊन पाणी पिण्याचा उपक्रम आपल्या ज्ञातिबंधुंनी केला असता स्पृश्य लोकांनी त्यांना हरकत करण्याच्या हेतूने मारामार केली. तीत स्पृश्य लोकातील मारामारी करणाऱ्या गुंडांना ४/४ महिने सक्तमजुरीची शिक्षा झाली. हा कोर्टाचा निकाल दोघांच्याही दृष्टीने महत्त्वाचा आहे.

स्पृश्य लोकांच्या मनात जी एक भावना होती की, अस्पृश्यांना चवदार तळयावर येऊ न देणे हा आपला अधिकार आहे, या भावनेला आता काही आधार उरला नाही. आता पुन्हा भ्रमिष्टासारखे जर ते आपल्या आड येतील तर, त्यांना पुन्हा तुरुंगाचे दार पाहावे लागेल यात संशय नाही. त्याचप्रमाणे आपल्या अस्पृश्य ज्ञातिबंधुंच्या मनात जी एक भावना होती की, आपल्याला चवदार तळयावर जाण्याचा हक्क नाही, ते चूक असून आता आपला हक्क प्रस्थापित झाला आहे, असे म्हणावयास काहीच हरकत नाही. तसे नसते तर ज्यांनी आपणास तळयावर जाण्यास हरकत केली त्यास शिक्षा न होता आपणासारख्या तळयावर

जाणारांस झाली असती. हा जो आपला हक्क कायद्याने प्रस्थापित झाला आहे, त्याची वहिवाट पाडण्याचे काम आता उरले आहे व ता. २५ डिसेंबर रोजी जी सभा बोलविण्यात आली आहे ती केवळ ही वहिवाट चालू करण्याचे हेतुनेच बोलावण्यात आली आहे.

प्रस्तुत प्रकरणी सभेस हजर राहण्यास कोणासही वचक वाटण्याचे कारण नाही. त्याचप्रमाणे कोणाही सनातनधर्मी माणसाचा स्वार्थमूलक उपदेश ऐकण्याचे कारण नाही. हा प्रश्न सर्वांच्या माणुसकीचा आहे. इतर स्पृश्य लोकांकडून आपण जन्मतः अपवित्र आहोत असा जो आपल्यावर कलंक लावण्यात आला आहे तो धुवून टाकावयाचा आहे.

हा आपल्यावर कलंक आहे इतकेच नव्हे तर, ज्या सुशील आईबापांच्या पोटी आपण जन्म घेतला त्या बिचाऱ्यांवर हा कलंक आहे. तो काढून टाकणे हे दरेक सूपुत्राचे कर्तव्यकर्म आहे. ते कर्तव्य बजाविण्यासाठी वरील परिषदेस सर्वांनी हजर राहावे, अशी विनंती आहे.

या कामी द्रव्याची आवश्यकता आहे. तरी ज्या कोणास द्रव्याच्या रूपाने अथवा धान्याच्या रुपाने सहाय्य करणे असेल त्यांनी ते अवश्य करावे. या कामाकरिता आमच्या सहीशिक्क्याची पत्रे व पावती घेऊन स्वयंसेवक फिरतीवर जात आहेत. जी मदत देणे असेल ती त्यांच्याजवळ द्यावी व पावती घ्यावी किंवा सेक्रेटरी, बहिष्कृत हितकारिणी सभा, दामोदर हॉल, परळ, मुंबई, या पत्त्यावर परस्पर पाठवावी, अशी नम्र विनंती आहे.

आपले नम्र,

डॉ. भीमराव आंबेडकर,

एम्. ए., पीएच्. डी., डी. एस्सी. बार-ॲट-लॉ., एम्. एल्. सी.

अध्यक्ष.

सभासद

रा. रा. शिवराम गोपाळ जाधव

" संभाजी तुकाराम पौडकर

" बाळाराम रामजी आंबेडकर*

" निर्मळ लिंबाजी गंगावणे

" राघो नारायण वनमाळी

" गणपत महादेव जाधव

" गोविंद रामजी आडरेकर

" पांडूरंग महादेव ववूरकर

" लक्ष्मण गणू पुसईनकर

---

*बाळाराम रामजी आंबेडकर यांचे निधन १२ नोव्हेंबर १९२७ रोजी झाले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी प्रस्तुत पत्रक या घटनेपूर्वी काढले असावे.–संपादक.

रा. रा. सखाराम रत्नाजी नागावकर

" अर्जुन रामजी नागावकर

" चांगदेव रामायण मोहिते

" पांडुरंग बाबाजी मांडलेकर

" भागुराम रामजी शिरगावकर

" सोनू सजन संदीरकर

" विठ्ठल लक्ष्मण तिडकर

" भाऊ बाळू जाधव

" भाविकनाथ रत्नू साळवे

" पंढरीनाथ रामचंद्र आसुडकर.

रा. रा. सीताराम नामदेव शिवतरकर,
सेक्रटरी, सत्याग्रह कमिटी.''[1]

'' सदरहू परिषद ता. २५/२६/२७ डिसेंबर १९२७ रोजी भरविण्यात आली होती. सभेची पूर्वतयारी करण्याकरिता रा. अनंत विनायक चित्रे यांची योजना करण्यात आली होती. महाड सत्याग्रहाच्या बाबतीत चित्रे हे आघाडीचे वीर होते. त्यांच्या शरीरप्रकृतीच्या मानाने हा लहानसा जीव एवढी मोठी कामगिरी पार पाडील की नाही, याबद्दल कोणासही शंका आली असती. परंतु ज्या सत्याग्रह कमिटीने या कामी रा. चित्रे यांची नेमणूक केली त्या कमिटीला रा. चित्रे यांच्यात केवढे मोठे चैतन्य भरले आहे, याची पूर्ण जाणीव होती व या परिषदेच्या कामी, रा. चित्रे यांनी जी कामगिरी करून दाखविली ती ज्यांनी ज्यांनी पाहिली त्यांना त्यांना याबाबतीत खात्री झाल्याशिवाय राहिली नाही. ही परिषद जर यशस्वी झाली असेल तर त्यातील सारे श्रेय रा. चित्रे यांनाच दिले पाहिजे. रा. चित्रे हे १५ दिवस अगोदर महाडास जाऊन पोहोचले. काही तरूण मंडळीखेरीज महाडातील सर्व स्पृश्य लोक सत्याग्रहास प्रतिकूल आहेत असे त्यांना दिसले व परिषदेच्या कार्यात सर्वतोपरी विघ्ने उत्पन्न करून गावात परिषदेला कोणत्याही प्रकारचे सामान मिळू द्यावयाचे नाही, असा गाववाल्याचा कट असल्याचेही त्यांना दिसून आले. तेव्हा आपल्या कायस्थ ज्ञातीतील काही तरूण मंडळींना हाती धरून आपला उद्योग तडीस नेण्याचे त्यांनी ठरविले व त्यांना शांताराम पोतनीस, केशवराव देशपांडे, रा. वामनराव पत्की, कमलाकर टिपणीस वगैरे मंडळीचे

[1]डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड ३, पृष्ठ-१४१-४२.

पुष्कळ साहाय्य झाले, त्यातल्यात्यात रा. पत्की यांचा तर फारच उपयोग झाला. त्यांची मदत नसती तर परिषदेच्या सामग्रीसाठी लागणारे सामान मुळी मिळालेच नसते. परिषदेला पुष्कळशा गोष्टी उसनवार घेऊन थोड्या खर्चात कार्यभाग आटोपता आला असता. पण गावात लोकमत प्रतिकूल असल्याकारणाने सर्वच वस्तू तात्पुरत्या कामासाठी देखील खरेदी कराव्या लागल्या, तेणेकरून परिषद खर्चाची झाली. परंतु जेथे भाराभर सुवर्ण दिले असताही काही मिळणे शक्य नव्हते, तेथे इतकी उत्तम व्यवस्था करण्यात आली हीच मोठी आश्चर्य करण्यासारखी गोष्ट आहे व त्याबद्दल रा. चित्रे व पत्की यांना द्यावा तेवढा धन्यवाद थोडाच आहे. त्यांच्या जोडीला पुण्याहून सुभेदार घाडगे, रा. थोरात व भानगरहून रा. भानगरकर जमेदार हे ता. २४ रोजी महाडास येऊन दाखल झाले होते. जमलेल्या प्रतिनिधीस लष्करी शिस्त लावणे, एवढ्या समुदायाची जेवणाची व्यवस्था करणे वगैरे अवघड कामे सुभेदार घाटगे यांच्यावर सोपविण्यात आली होती. ती त्यांनी इतक्या शिताफीने व धडाडीने पार पाडली की, सगळे लोक थक्क झाले. सभेचे महत्त्व ओळखून १९ तारखेपासूनच कलेक्टर, जिल्ह्याचे पोलीस सुपरिंटेंडेंट वगैरे अधिकारी लोक यांनी महाडास येऊन तळ दिला होता. २३ तारखेपासून प्रतिनिधी येण्यास सुरवात झाली व २५ तारखेस तर हा समुदाय दहा हजारांवर झाला होता. मध्यंतरी कलेक्टर साहेबांकडून मनाई हुकूम मिळत नाही असे कळल्यावरून अस्पृश्य वर्गास काहीतरी करून तळयावर जाण्यास प्रतिबंध करावा या हेतूने महाडच्या स्पृश्य लोकांनी डॉ. आंबेडकर व इतर चार अस्पृश्य लोकांवर महाड येथील दिवाणी कोर्टात फिर्याद केली होती व कोर्टास अर्ज करून २५ तारखेस अस्पृश्य लोकांनी तळयावर जाऊ नये, असा तात्पुरता मनाई हुकूम मिळविला होता. या कारवाईमुळे कलेक्टरसाहेब जरी नाराज होते तरी दिवाणी कोर्टाचा अपमान होऊ नये, यास्तव त्यांना आपल्या पूर्वीच्या धोरणात फरक करणे भाग झाले. तथापि, त्यांनी अखेरपर्यंत सामदामाचाच अवलंब केला व क्रि. प्रो. कोडच्या १४४ कलमाखाली आपल्या अधिकारात काढता येणारा मनाई हुकूम काढण्याच्या भरीस ते पडले नाहीत ही गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे. मात्र २३ तारखेपासून परिषदेच्या कँपात सकाळ संध्याकाळ फेरे घालून, लोकांना उपदेश करून, सत्याग्रहापासून परावृत्त करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. परंतु उपदेश केल्यानंतर तुम्ही जिल्ह्याच्या कलेक्टराचे ऐकाल किंवा डॉ. आंबेडकरांचे ऐकाल असा जेव्हा जेव्हा ते प्रश्न करीत तेव्हा तेव्हा आम्ही डॉ. आंबेडकरांचे ऐकू असेच उत्तर त्यास मिळे.

## डॉ. आंबेडकर यांचे महाडला प्रयाण

मुंबईहून डॉ. आंबेडकर व दोन-अडिचशे मंडळी ता. २४ रोजी सकाळी पद्मावती बोटीने निघाली. या मंडळीत मुंबईचे रा. शिवतरकर, धोंडी नारायण गायकवाड, कांबळे, गंगावणे, वनमाळी, पुण्याचे राजभोज, नाशिकचे भाऊराव गायकवाड,

वगैरे अस्पृश्य पुढारी होते. त्यांच्याबरोबरच स्पृश्य लोकांपैकी सोशल सर्व्हिस लीगचे कार्यकर्ते श्री. सहस्त्रबुद्धे व समतासंघाचे प्रधान बंधू सामील झाले होते. ब्राह्मण-ब्राह्मणेतरांचे संपादक रा. देवराव नाईक यांना आजारीपणामुळे येता आले नाही. सत्याग्रही मंडळी धक्क्यावर पोहोचण्याचे पूर्वीच त्यांच्या अभिनंदनार्थ तेथे बरीच मंडळी जमलेली होती. त्या मंडळीतर्फे पुढाऱ्यांना हारतुरे घालण्यात आले व ' महाड सत्याग्रहकी जय ' अशा घोषणांनी किनारा दुमदुमून गेला. पद्मावती ९ वाजता मुंबईहून सुटली. ती संध्याकाळी साडेपाच वाजता हरेश्वर बंदरात येऊन पोहोचली. वाटोवाट व बंदरोबंदरी ' सत्याग्रहकी जय ' असा जयघोष सारखा चालूच होता.

## कोळमांडला येथील स्वागत

महाडला धरमतरहून जाणे अगदी सोपे होते. परंतु मोटरवाले लोक कदाचित संप करतील व तसे झाल्यास मुंबईच्या लोकास ५०/५५ मैल महाडास पोहोचणे अशक्य होईल यास्तव धरमतरचे वाटेने न जाता दासगावाच्या वाटेने जाण्याचा निश्चय मुंबईच्या मंडळीने केला होता. ही गोष्ट कोळमांडला येथील लोकास माहीत होती व त्याचप्रमाणे त्यांनी एक स्वागत कमिटी स्थापन करून मुंबईहून येणाऱ्या सत्याग्रही मंडळाचे स्वागत करण्याची सर्व तयारी केली होती. या स्वागत कमिटीचे अध्यक्ष रा.पांडूरंग बाबाजी मांडलेकर हे होते. कोळमांडल्यासारख्या खेडेगावी जी व्यवस्था त्यांनी केली होती ती इतकी उत्तम होती की, तशी व्यवस्था मुंबईसारख्या ठिकाणी देखील झाली नसती. या ठिकाणी मंडळीने सुखाने रात्र घालविली व सकाळी अल्पहार करून मंडळी आठ वाजता दासगावला जाण्यास ' अंबा ' बोटीत चढली. दुतर्फा डोंगर व मधून खाडी आणि आजुबाजूला हिरवी गर्द झाडी असा हा खाडीतील अत्यंत रमणीय असा देखावा सकाळच्या सूर्यप्रकाशात मनाला आनंदवीत होता. ' अंबा ' साडेबारा वाजता दासगाव बंदरास पोहोचली. तेथे सुमारे तीन हजार लोक महाडला जाण्यास डॉ. आंबेडकरांची व मुंबईकरांची वाट पाहात बसले होते. त्याचप्रमाणे कुलाबा जिल्ह्याचे पोलीस सुपरिंटेन्डेन्ट मि. फॅरेन्ट, पोलीस इन्सपेक्टर, फौजदार वगैरे पोलीस अधिकारी हजर होते. पोलीस सुपरिंटेन्डेन्ट साहेब व डॉ. आंबेडकर यांनी एकमेकास कुशल प्रश्न विचारल्यानंतर आपणास कलेक्टर साहेब मि. हूड यांनी भेटण्यास बोलाविले आहे, अशा आशयाचे पत्र त्यांनी दिले. त्याप्रमाणे डॉ. आंबेडकर व श्री. सहस्त्रबुद्धे हे फॅरेन्ट साहेबांच्या मोटारीत बसून महाडला गेले. जाण्यापूर्वी दासगाव येथे जमलेल्या लोकास एकत्र करून शिस्तीने व शांततेने आपल्या पाठीमागून महाडला यावे, अशी डॉ. आंबेडकर यांनी सर्वांना ताकीद दिली.

## दासगाव ते महाड

दासगाव बंदराहून महाड सुमारे पाच मैल आहे. डॉ. आंबेडकर व रा. सहस्त्रबुद्धे निघून गेल्यानंतर रा. शिवतरकर व प्रधान बंधुंनी जमलेल्या सत्याग्रही मंडळीला डॉ. साहेबांनी दिलेली ताकीद ध्यानात ठेवण्यास विनंती केली व पाच जणांची एक एक रांग करून आलेल्या लोकांचे एक प्रकारचे पायदळ तयार केले. या प्रचंड पायदळाची मिरवणूक ' हरहर महादेव,' ' महाड सत्याग्रहकी जय ' वगैरे जयघोषात निघाली. मिरवणुकीत उद्‌बोधक वचने लिहिलेल्या पताका व बावटे वीस पंचवीस होते. बहिष्कृत हितकारिणी सभेने उभारलेल्या स्वयंसेवक दलाचे बँड वाजवीत व सत्याग्रह विषयक गाणी गात ही मिरवणूक महाड गावात आली. पोलीस सुपरिंटेंडेन्ट साहेब मिरवणुकीबरोबर धिरट्या घालीत होते. ठरविलेल्या रस्त्याने हे पायदळ सत्याग्रहाच्या छावणीजवळ येताच श्री. अनंतराव चित्रे सामोरे आले व त्यांनी तेथून दिसत असलेल्या रायगड किल्ल्याकडे बोट करून अंगीकृत कार्यास यश यावे म्हणून श्री. शिवरायाचा व जिजामातेचा जयजयकार करण्यास सांगितले. त्या जयजयकाराने चोहो दिशा दुमदुमून गेल्या, सर्व लोकात वीरश्रीचा संचार झाला व मोठ्या उत्साहाने लोकांनी सत्याग्रह छावणीत प्रवेश केला.

## परिषदेचे अधिवेशन

### दिवस पहिला २५-१२-१९२७

महाडच्या स्पृश्य लोकांनी कट केल्यामुळे परिषदेच्या कामाला कोणत्याच प्रकारची सामुग्री मिळू नये अशी गावकऱ्यांकडून खबरदारी घेण्यात आली होती हे मागे सांगितलेच आहे. त्यामुळे मंडपासाठी जागा मिळणे ही एक मोठीच अडचणीची बाब होऊन बसली होती. महाड शहरातल्या आजुबाजूच्या बहुतेक सर्व जमीनी गुजर ब्राह्मणांच्या असल्यामुळे परिषद भरविणारांची शेंडी ऐतीच आपल्या हातात सापडली आहे म्हणून हे लोक अगदी खुशीत गाजरे खात बसले होते. परंतु जवळपासच फत्तेखान नावाच्या एका मुसलमान गृहस्थाची जमीन होती. ती जमीन त्याने मोठ्या खुषीने परिषद भरविण्याकरिता दिली. ही बातमी गुजर ब्राह्मणांच्या कानावर गेल्याबरोबर त्यांचे हात पाय थंडगार पडले. परंतु शक्य तो उपाय करून परिषद भरवू द्यावयाची नाही असा त्यांनी चंग बांधला असल्याकारणाने रा. फत्तेखानाच्या दारी जाऊन त्यांनी धरणे घेतले व तुम्ही अस्पृश्य लोकांना परिषद भरविण्याकरिता जागा देऊ नका म्हणून त्यांचे पाय धरले.

परंतु त्यांची डाळ शिजली नाही. "दिलेले वचन मी कधीही मोडणार नाही." असे सांगून त्यांनी या पाजी याचकांची हकालपट्टी केली. अशा-प्रकारे मिळविलेल्या जागेत सात आठ हजार लोक बसू शकतील इतका मोठा मंडप उभारण्यात आला होता. तो लतापल्लवांनी व तोरणांनी विभूषित केलेला होता. खालील उद्‌बोधक वचने लिहिलेल्या पताका आजुबाजूस लटकाविल्या होत्या :–

ब्राह्मण किंवा महार मी । गणी न कवणालाच कमी ।।
या सृष्टींतील दिव्यपण । तेंचि तेंचि ते मनुजपण ।। १ ।।
तुम्ही नका करू गर्व । उंच याती मिळुनी सर्व ।।
शुक्र शोणिताच्या खाणी । तुम्हा आम्हा एकचि योनी ।। २ ।।
विष्णुमय जग वैष्णवाचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ।। ३ ।।
ईश्वरः सर्व भूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।। ४ ।।
सतीचा वोवसा जेणे पदरी घ्यावा । संकल्प सोडावा जिवित्वाचा ।। ५ ।।
ब्रीद बांधोनिया म्हणवी जो गाजी । तेणे मरणामाजी फिरू नये ।। ६ ।।
ऐसें कैसें रे सोंवळे । शिवतां होतसे ओवळें ।। ७ ।।
हे धर्मयुद्ध आतां ऐसें । असुनी जरी न करशील ।
तरि तूं स्वधर्म कीर्ती । बुडवूनियां पातकास वरशील ।। ८ ।।
मरशी तरि कीर्ति मिळे जय । आल्या भोग सर्वही धरणी
ह्याकरितां ऊठ सख्या । निश्‍चित करि सर्वथैव युद्धरणी ।। ९ ।।
तुं अझूनि कां न विचारिसी । काय हे चिंतित आहासी ।
स्वधर्म तो विसरलासी । तरावें जणें ।। १० ।।

आत फक्त म. गांधींची एक तसवीर ठेवण्यात आली होती. मंडपाच्या दारात मनुस्मृतीचा दहनविधी करण्याकरिता एक उत्तम प्रकारे शृंगारलेली वेदी तयार करण्यात आलेली होती. मनुस्मृतीचे दहन केल्याबद्दल ज्या ब्राह्मण्यग्रस्त लोकांना त्वेष आला आहे ते लोक असे सांगत सुटले आहेत की, सत्याग्रह करिता आला नाही, म्हणून आल्यासारखे काही तरी करावे म्हणून मनुस्मृती जाळण्याचा उपक्रम डॉ. आंबेडकर यांनी केला. हे म्हणणे किती खोटे आहे, हे मंडप उभारतानाच मनुस्मृती जाळण्याकरिता वेदीही तयार करण्यात आली होती, हे जो ध्यानात घेईल, त्यास सहज कळण्यासारखे आहे. मनुस्मृती जाळण्याचा निश्चय हा आयत्या वेळचा नसून पूर्वीच ठरलेला होता, हे खाली दिलेला परिषदेचा जो कार्यक्रम ठरलेला होता त्यावरूनही दिसून येण्यासारखे आहे :–

## महाड सत्याग्रह परिषद

### कार्यक्रम

### ता. २५ माहे डिसेंबर सन १९२७

सकाळी १० वाजता अध्यक्षांचे भाषण, नंतर सर्व परिषदेने तळयावर जावयाचे व पाणी भरून आणावयाचे.

दुपारी साडेबारा वाजता जेवण, नंतर ३ वाजता मनुस्मृतीचा दहनविधी व प्रासंगिक भाषणे, त्यानंतर सर्व परिषदेने पुन्हा तळयावर जाऊन पाणी भरून आणावयाचे. रात्री ७-३० वाजता अल्पाहार, नंतर कीर्तन व सत्यशोधक तमाशा.

### ता. २६ डिसेंबर सन १९२७

सकाळी १० वाजता जातीची अंतर्व्यवस्था सुधारण्यासंबंधी ठराव. नंतर सर्व परिषदेने तळयावर जाऊन पाणी भरून आणावयाचे. दुपारी साडे बारा वाजता जेवण, नंतर ३ वाजता सार्वजनिक ठराव व पुन्हा परिषदेने तळयावर जाऊन पाणी भरून आणावयाचे. रात्रौ साडे सात वाजता अल्पाहार, नंतर कीर्तन व सत्यशोधक तमाशा, त्यानंतर सर्व परिषद बरखास्त करण्यात येईल. फक्त २५० लोक मागे ठेवण्यात येतील व त्यांच्या हस्ते हा पाणी भरण्याचा उपक्रम तारीख २ जानेवारी सन १९२८ पर्यंत चालू ठेवण्यात येईल.

**विशेष सूचना** :—सदर प्रसंगी सर्व जमलेल्या मंडळीस अत्यंत विनयाने व शांततेने वागण्याची सत्याग्रह कमिटीची विनंती आहे व कोणताही प्रसंग आला असताना सत्याग्रहाकरिता जमलेली मंडळी शांततेचा भंग होऊ देणार नाहीत, याची खबरदारी घेतील, अशी आशा आहे.

आपला नम्र,
सीताराम नामदेव शिवतरकर,
सेक्रेटरी, सत्याग्रह कमिटी.

आता मुंबईची मंडळी वेळेवर महाडास न पोहोचल्याकारणाने व इतर कारणांमुळे परिषदेच्या कार्यक्रमात फेरबदल करावा लागला तो प्रश्न निराळा. परंतु ठरलेल्या कार्यक्रमाप्रमाणे पाहता मनुस्मृतीचा दहनविधी करणे, ही काही आयत्या वेळेची कल्पना नव्हे हे खास. बदललेल्या कार्यक्रमानुसार परिषदेच्या कामास सुमारे ४ वाजता सुरूवात झाली. प्रारंभी मुलांकडून ईशस्तवन झाल्यानंतर सत्याग्रह कमिटीचे सेक्रेटरी रा. शिवतरकर यांनी रा. श्रीधर बळवंत टिळक, डॉ. पुरूषोत्तम सोळंकी, एम. एल. सी. यांच्या सहानुभूतिपर तारा व इतरांची पत्रे वाचून दाखविली. नंतर टाळयांच्या प्रचंड कडकडाटात सत्याग्रह कमिटीचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आपले भाषण वाचून दाखविले.

ते आपल्या भाषणात म्हणाले,

सद्गृहस्थहो ! सत्याग्रह कमिटीच्या आमंत्रणास मान देऊन आपण आज येथे आलात, याबद्दल कमिटीचा अध्यक्ष या नात्याने मी आपणा सर्वांचे स्वागत करतो.

आपल्यापैकी पुष्कळ जणांना आठवत असेल की, आपण सर्व मिळून गेल्या मार्च महिन्याच्या १९ व्या तारखेस येथील चवदार तळयावर गेलो होतो. आपल्याला तळयावर जरी महाडच्या स्पृश्य लोकांनी हरकत केली नव्हती, तरी त्यांची या कामी हरकत आहे, हे त्यांनी मागाहून मारामारी करून आपणास जाणविले. त्या मारामारीचा शेवट ज्या रितीने व्हावयाचा त्या रितीने झाला. मारामारी करणाऱ्या स्पृश्य लोकास चार चार महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा झाली व ते लोक आज तुरुंगात आहेत. गेल्या ता. १९ मार्च रोजी जर आपल्याला अडथळा झाला नसता, तर आपला ह्या तळयावर पाणी भरण्याचा हक्क स्पृश्य लोकास मान्य आहे असे शाबीत झाले असते व आपणास आजचा हा उपक्रम करावा लागला नसता. परंतु दुर्दैवाने तसे झाले नाही. म्हणून आजची ही सभा बोलावणे भाग पडले आहे. महाडचे हे तळे सार्वजनिक आहे. महाड येथील स्पृश्य लोक इतके समजूतदार आहेत की, ते आपणच या तळयाचे पाणी नेतात असे नव्हे, तर कोणत्याही धर्माच्या माणसाला त्या तळ्याचे पाणी भरण्यास त्यांनी मुभा ठेविली आहे व त्याप्रमाणे मुसलमानादी परधर्मीय लोकही या तळयाचे पाणी नेतात. मानव योनीपेक्षा कमी मानलेल्या पशुपक्ष्यादी योनीतील जीवजंतूस या तळयावर पाणी पिण्यास ते हरकत करीत नाहीत. इतकेच नव्हे तर अस्पृश्यांनी बाळगिलेल्या जनावरांना देखील ते खुशाल पाणी पिऊ देतात. स्पृश्य हिंदू लोक दयेमायेचे माहेरघर आहेत. ते कधी हिंसा करीत नाहीत व कोणाचा छळ करीत नाहीत. उष्ट्या हाताने कावळा न हाकणाऱ्या कृपण व स्वार्थी लोकांचा हा वर्ग नाही. साधूसंतांची व याचकांची झालेली बेसुमार वाढ ही त्यांच्या दातृत्वाची जागतीज्योत साक्ष आहे. परोपकार हे पुण्य आणि परपीडा हे पाप अशी त्यांची वागणूक आहे. इतकेच नव्हे तर, '' दिधले दुःख पराने उसने फेडू नयेचि सोसावे। '' हा त्यांचा स्वभावधर्म आहे आणि म्हणूनच गाईसारख्या निरुपद्रवी प्राण्याला जसे ते दयेने वागवितात तसे सर्पासारख्या उपद्रवी कृमी कीटकांचीही ते रक्षा करतात. अर्थात् 'सर्व भूतिं एक आत्मा' असे त्यांचे शील आहे. असे हे स्पृश्य लोक आपल्याच धर्मातील काही माणसांना त्याच चवदार तळयातील पाणी घेण्यास बंदी करितात !! तेव्हा आपणासच ते बंदी का करितात असा प्रश्न कोणाच्याही मनात उद्भवल्याखेरीज राहणार नाही. या प्रश्नाचे उत्तर काय आहे हे सर्वांनीच नीट समजून घेणे अत्यंत जरूरीचे आहे. त्याशिवाय आजच्या सभेचे महत्त्व पूर्णपणे आपल्या लक्षात येईल असे मला वाटत नाही.

हिंदू लोकांचे शास्त्रपरत्वे चार, पण रूढीपरत्वे पाच वर्ण आहेत. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व अतिशूद्र. वर्णव्यवस्था हा हिंदू धर्माच्या यमनियमाचा पहिला नियम आहे. त्याच धर्माच्या यमनियमाचा दुसरा नियम असा आहे की, हे वर्ण असमान दर्जाचे आहेत. एकापेक्षा दुसरा हलका अशी त्यांची उतरती मालिका आहे. या यमनियमाप्रमाणे नुसते दर्जे ठरून गेले आहेत, इतकेच नव्हे तर कोण कोणत्या दर्जाचा आहे हे ओळखिता यावे म्हणून प्रत्येक वर्णाची मर्यादा ठरवून टाकिलेली आहे. हिंदू धर्मात बेटीबंदी, रोटीबंदी, लोटीबंदी व भेटीबंदी या परस्परातील नुसत्या सहवासाच्या मर्यादा आहेत, असा सर्वसाधारण समज आहे. पण हा समज अपुरा आहे, कारण या पंचप्रकारच्या बंदी या सहवासाच्या मर्यादा तर आहेतच, पण त्या असमान दर्जाच्या लोकांना त्यांचा दर्जा कोणता हे दर्शविण्याकरिता घातलेल्या आहेत. अर्थात् या सहवासाच्या मर्यादा म्हणजे असमानतेची चिन्हे आहेत. जसे डोक्यावर मुकुट असला म्हणजे तो राजा समजला जातो, हातात धनुष्य असले म्हणजे तो क्षत्रिय ओळखला जातो तसेच, ज्याला या पंचबंदापैकी कोणताच धरबंद नाही तो वर्ग सर्वात श्रेष्ठ मानला जातो व ज्याला या चारी बंदांनी बांधून टाकले आहे त्या वर्गाचा दर्जा सर्वात हीन मानला जातो. या पंचबंद्या कायम राखण्यासाठी जी एवढी धडपड करण्यात येते ती एवढ्याच करिता की, तसे झाल्याने धर्माने ठरवून दिलेली असमानता मोडून तिच्याऐवजी समता प्रस्थापित होईल. महाडचे स्पृश्य लोक अस्पृश्य लोकाना चवदार तळ्याचे पाणी पिऊ देत नाहीत याचे कारण अस्पृश्यांनी स्पर्श केला असता, ते पाणी नासेल किंवा त्याची वाफ होऊन ते नाहीसे होईल अशामुळे नव्हे. अस्पृश्यांना ते पिवू देत नाहीत याचे कारण हेच की, शास्त्रांनी असमान ठरविलेल्या जातींना आपल्या तळ्यात पाणी भरू देऊन त्या जाती आपल्यासमान आहेत असे मान्य करण्याची त्यांची इच्छा नाही. सद्गृहस्थहो! आपण आरंभिलेल्या या झगड्याचा भावार्थ काय आहे, हे यावरुन आपणास कळेलच. सत्याग्रह कमिटीने आपणास महाडला बोलाविले आहे, ते महाडच्या चवदार तळ्याचे पाणी पिण्याकरिता बोलाविले आहे, असा आपला समज होऊ देऊ नका. चवदार तळ्याचे पाणी प्याल्याने तुम्ही आम्ही अमर होऊ अशातला काही भाग नाही. आजपावेतो चवदार तळ्याचे पाणी प्यालो नव्हतो तरी तुम्ही आम्ही काही मेलो नव्हतो. चवदार तळ्यावर जावयाचे ते केवळ त्या तळ्याचे पाणी पिण्याकरिता जावयाचे नाही. इतरांप्रमाणे आम्हीही माणसे आहोत हे सिद्ध करण्याकरिताच त्या तळ्यावर आपणास जावयाचे आहे, म्हणजे.

ही सभा समतेची मुहूर्तमेढ रोविण्यासाठीच बोलाविण्यात आली आहे हे उघड आहे. या दृष्टीने या सभेचा विचार केला असता ती अपूर्व आहे, याबद्दल कोणासही शंका वाटणार नाही, अशी माझी खात्री आहे. आजच्या प्रसंगास या हिंदुस्थानच्या इतिहासात तिला तोड सापडेल असे मला मुळीच वाटत नाही. याच तोडीची पूर्वकाली भरलेली दुसरी सभा आपण शोधू लागलो तर, आपल्याला युरोप खंडातील फ्रान्स देशाच्या इतिहासात शिरावे लागेल. १३८ वर्षापूर्वी फ्रान्स देशातील सोळाव्या लुई राजाने तारीख २४ जानेवारी सन १७८९ या दिवशी एक आज्ञापत्र काढून आपल्या राज्यातील प्रजेच्या प्रतिनिधींची अशीच एक सभा बोलाविली होती. या फ्रेंच राष्ट्रीय सभेच्या नावाने काही इतिहासकार खडे फोडतात. या सभेने फ्रान्स देशाच्या राजाराणीस सुळी दिले; वरिष्ठ वर्गास सळो का पळोसे करून त्यांची कत्तल केली व उरले त्यांना देशोधडीस लाविले. श्रीमंतांची मालमत्ता जप्त केली व १५ वर्षांहून अधिक साऱ्या युरोपखंडात यादवी माजवून ठेवली. असा त्यांचा या फ्रेंच राष्ट्रीय सभेवर आरोप आहे. माझ्या मते हा टपका अस्थानी आहे इतकेच नव्हे तर अशा इतिहासकारांना या फ्रेंच राष्ट्रीय सभेने जी कामगिरी केली, तिचे खरे इंगित कळले नाही असेच म्हणावे लागते. या सभेच्या कामगिरीमुळे फ्रान्स देशाचेच कल्याण झाले आहे असे नव्हे, तर साऱ्या युरोपखंडाचे कल्याण झाले आहे. आज युरोपियन राष्ट्रे सुख व समृद्धी भोगीत असतील त्याला कारण एकच व ते हे की, या १७८९ साली भरलेल्या क्रांतिकारक फ्रेंच राष्ट्रीय सभेने समाजसंघटनेची जी तत्त्वे विस्कळीत व निर्माल्यवत झालेल्या तत्कालीन फ्रेंच राष्ट्रापुढे मांडली व त्यावर ती जबरीने लादली तीच तत्त्वे युरोप खंडाने मान्य केली व आचारात आणली.

या फ्रेंच राष्ट्रीय सभेचे महत्त्व व तिच्या तत्त्वांची महती कळण्याकरिता त्या काळची फ्रेंच समाजाची परिस्थिती ध्यानात घेतली पाहिजे. आपला हा हिंदू समाज वर्णाश्रम धर्मावर रचण्यात आला आहे हे आपणा सर्वांस विदित आहेच. तशाच प्रकारची वर्णाश्रमव्यवस्था फ्रान्स देशामध्येही सन १७८९ साली होती. फरक इतकाच की, फ्रेंच समाज हा त्रैवर्णीकांचा होता. हिंदू समाजाप्रमाणे फ्रेंच समाजातही ब्राह्मण वर्ण होता व क्षत्रिय वर्णही होता. मात्र फ्रेंच समाजामध्ये वैश्य, शूद्र व अतिशूद्र असे तीन निरनिराळे वर्ण न करिता तिघांचा मिळून एकच तृतीय वर्ण करण्यात आला होता. हा फरक अगदी गौण आहे. महत्त्वाची गोष्ट ही की, हिंदू समाज व फ्रेंच समाज या उभय समाजात वर्णाश्रमव्यवस्था सारखीच होती. वर्णव्यवस्थेमुळे उभयतात उत्पन्न होणारी

भिन्नता एवढेच काय ते साम्यतेच्या दृष्टीने ध्यानात घेण्यासारखे आहे असे नाही, तर वर्णव्यवस्थेतील असमानताही फ्रेंच समाजात होती. फ्रान्स देशात या असमानतेचे स्वरूप निराळ्या प्रकारचे होते. तेथे परस्पर वर्णांतील असमानता आर्थिक स्वरूपाची होती पण ती तितक्याच तीव्र प्रकारची होती. एकूण लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही की, आजच्या या आपल्या सभेत व फ्रान्समधील व्हरसाय मुक्कामी ता. ५ मे सन १७८९ रोजी भरलेल्या फ्रेंच लोकांच्या क्रांतीकारक राष्ट्रीय सभेत अत्यंत मोठे साम्य आहे.

त्यांच्या परस्परातील परिस्थितीत साम्य दिसते इतकेच नव्हे तर त्यांच्या ध्येयातही पुष्कळसे साम्य आहे. फ्रेंच लोकांची ती सभा फ्रेंच समाजाची संघटना करण्यास्तव बोलाविण्यात आली होती. आजची ही सभा हिंदू समाजाचे संघटन करण्यासाठी बोलाविण्यात आलेली आहे. अर्थात ही संघटना कोणत्या तत्त्वावर करण्यात यावी याची चर्चा करण्यापूर्वी या फ्रेंच लोकांच्या सभेने फ्रान्स देशाची संघटना करण्याकरिता कोणते धोरण स्वीकारिले व कोणत्या तत्त्वांचा आधार घेतला याची बूज आपण सर्वांनी करून घेतली पाहिजे. या फ्रेंच सभेचा व्याप आपल्या आजच्या सभेच्या व्यापापेक्षा पुष्कळच विस्तृत असा होता. फ्रेंच लोकांच्या या सभेस राजकीय, सामाजिक व धार्मिक असे त्रिविध प्रकारचे संघटन करावयाचे होते. आपल्याला फक्त सामाजिक व धार्मिक संघटना कशी होईल याचाच विचार करणे अवश्य आहे. आपणास राजकीय संघटनांशी तूर्त कर्तव्य नसल्यामुळे धार्मिक व समाजिक संघटनेचे बाबतीत या फ्रेंच सभेने काय केले एवढेच काय ते आपणास पाहावयाचे आहे. या फ्रेंच सभेने सामाजिक व धार्मिक संघटनेचे बाबतीत जे धोरण ठेविले होते ते धोरण कोणत्या प्रकारचे होते हे या सभेने जे तीन महत्त्वाचे जाहीरनामे काढले त्यावरून कोणासही उघड दिसून येणार आहे. पहिला जाहीरनामा ता. १७ जून १७८९ रोजी काढण्यात आला. तो जाहीरनामा फ्रान्स देशातील वर्णाश्रम धर्मासंबंधाने होता. पूर्वी सांगितल्याप्रमाणे फ्रेंच समाज त्रैवर्णिक होता. या जाहीरनाम्याने हा त्रैवर्णिक समाज मोडून साऱ्या समाजाचा एकवर्ण करण्यात आला. इतकेच नव्हे तर राजकीय सभागृहात या त्रैवर्णिकांसाठी ज्या निरनिराळ्या जागा राखण्यात आल्या होत्या त्या खालसा करण्यात आल्या. दुसरा जाहीरनामा धर्मोपदेशकासंबंधाने होता. पुरातन रूढीप्रमाणे हे धर्मोपदेशक नेमणे किंवा काढणे हे राष्ट्राच्या स्वाधीन नसून, पोपसारख्या परदेशीय धर्माधिकाऱ्याची मिरास होऊन बसली होती. ज्यास धर्मोपदेशक पोप नेमील तो धर्मोपदेशक होत असे; मग, ज्यांना

हा धर्मोपदेशक धर्माचा उपदेश करणार त्यांच्या दृष्टीने तो त्या अधिकारास लायक असो किंवा नसो! या जाहीरनाम्याने धर्माधिकारी वर्गाचे स्वयंभूपण नाहीसे करण्यात आले व हा पेशा कोणी करावा, त्याला लायक कोण व नालायक कोण, त्याला वेतन द्यावयाचे किंवा न द्यावयाचे वगैरे गोष्टी ठरविण्याचा अधिकार फ्रेंच राष्ट्राला देण्यात आला. तिसरा जाहीरनामा राजकीय, आर्थिक अथवा धार्मिक व्यवस्थेसंबंधी नव्हता. तो सर्वसाधारण असून हरएक प्रकारची सामाजिक व्यवस्था, कोणत्या तत्त्वाच्या पायावर उभारली जावी, यासंबंधाचा होता. त्यादृष्टीने हा जाहीरनामा या तीनही जाहीरनाम्यात अत्यंत महत्त्वाचा असा जाहीरनामा आहे. किंबहुना त्यास या सर्व जाहीरनाम्यांचा राजा आहे, असे म्हटले तरी चालेल. हा जाहीरनामा जन्मसिद्ध मानवी हक्कांचा जाहीरनामा या नावाने सर्व जगतीतलावर सुप्रसिद्ध होऊन राहिला आहे. तो जाहीरनामा नुसत्या फ्रान्स देशाच्या इतिहासातील एक अपूर्व अशी चीज आहे इतकेच नव्हे तर साऱ्या सुधारलेल्या राष्ट्रांच्या इतिहासात तो अपूर्व होऊन राहिला आहे. कारण या सभेचे अनुकरण करून युरोपातील दरेक राष्ट्राने आपल्या राज्यव्यवस्थेत त्याला अधिष्ठान दिले आहे. यास्तव त्याने नुसत्या फ्रान्स देशातच क्रान्ती केली नाही, तर सर्व जगात क्रान्ती केली, असे म्हणण्यास मुळीच हरकत नाही. या जाहीरनाम्याची एकंदर १७ कलमे आहेत. त्यापैकी खालील कलमे महत्त्वाची आहेत.–

(१) सर्व माणसे जन्मतः समान दर्जाची आहेत व ती मरेपर्यंत समान दर्जाचीच राहतील. लोकहिताकारणेच त्यांच्या दर्जात अंतर करता येईल. एरवी, त्यांचा समान दर्जा तसाच कायम राहिला पाहिजे.

(२) वरील जन्मसिद्ध मानवी हक्क कायम राहावेत हाच राजकारणाचा अंतीम हेतू असला पाहिजे.

(३) अखिल प्रजा ही सर्वाधिकाराची मायभूमी आहे. कोणत्याही व्यक्तीचे, समुदायाचे अगर वर्गाचे विशिष्ट हक्क जर ते प्रजेने दिले नसतील तर ते इतर कशाच्याही आधारावर मग तो आधार राजकारणाचा असो, धर्मकारणाचा असो–मान्य केले जाणार नाहीत.

(४) कोणत्याही व्यक्तीला आपल्या जन्मसिद्ध हक्काप्रमाणे वागण्यास पूर्ण स्वातंत्र्य आहे. त्यावर जर मर्यादा घालण्यात आली तर ती दुसऱ्या व्यक्तीला तिचा जन्मसिद्ध हक्क उपभोगण्यास अवसर मिळावा, इतक्यापुरतीच घालता येईल व ती मर्यादा कायद्याने ठरविली जाईल. ती धर्मशास्त्राच्या आधाराने किंवा इतर कशाच्याही आधाराने ठरविली जाणार नाही.

(५) जेवढ्या गोष्टी समाजासं विघातक होतील तेवढ्याच गोष्टी करण्याची कायद्याने बंदी केली जाईल. जी गोष्ट कायद्याने मना केली नसेल ती करण्यास सर्वांना मुभा असावी. तसेच जी गोष्ट करणे कायद्याने अवश्य ठरविली नसेल ती गोष्ट करावयास कोणासही भाग पाडले जाऊ नये.

(६) कायदा म्हणजे अमूक एका वर्गाने ठरविलेली बंधने नव्हे. तो कोणत्या प्रकारचा असावा, हे ठरविण्याचा हक्क सर्व प्रजेस अगर तिच्या प्रतिनिधीस आहे. हा कायदा संरक्षक असो अगर शासनात्मक असो, तो सर्वांस सारखाच असला पाहिजे आणि सर्वांची समानता या तत्त्वाच्या आधारावरच सर्व प्रकारची व्यवस्था उभारणे न्याय्य असल्यामुळे सर्व व्यक्ती कोणत्याही प्रकारच्या मानसन्मानास, अधिकारास, व्यवसायास सारखीच पात्र आहेत. या बाबतीत जर काही भेदाभेद झाला तर तो केवळ व्यक्तीतल्या गुणभेदामुळेच होऊ शकेल. जन्मामुळे होऊ शकणार नाही.

आजच्या या आपल्या सभेने या फेंच राष्ट्रीय सभेची प्रतिमा आपल्या डोळ्यांपुढे ठेविली पाहिजे असे मला वाटते व तिने जो मार्ग फ्रेंच राष्ट्राच्या संवर्धनासाठी आखून ठेवला व जो मार्ग सर्व सुधारलेल्या राष्ट्रांनी मान्य केला, तोच मार्ग हिंदू समाजाच्या संवर्धनासाठी या सभेने आखला पाहिजे व बेटीबंदीपासून भेटीबंदीपर्यन्त वर्णाश्रमाच्या चौकटीचे हे खिळे उडवून हिंदू समाजाचा एक वर्ण केला पाहिजे. त्याशिवाय अस्पृश्यता जाणार नाही व समताही प्रस्थापित होणार नाही.

आता आपणापैकी काही जणाना असे वाटेल की, आपण अस्पृश्य आहोत तेव्हा आपली लोटीबंदी व भेटीबंदी गेली म्हणजे पुरे. वर्णव्यवस्थेशी आपणास कर्तव्य नाही; ती आहे तशी राहिली तर हरकत काय आहे? पण तो समज माझ्या मते अगदी चुकीचा आहे. वर्णाश्रम कायम राखला व नुसती अस्पृश्यता घालविण्याचे धोरण ठेवले तर आपले ध्येय अगदीच हलके आहे असे लोक म्हणतील. मनुष्यमात्राच्या उद्धारासाठी जशी बाह्य प्रयत्नांची जरूरी असते तशी वासनेचीही जरूरी असते. किंबहुना वासनेशिवाय माणसाच्या हातून प्रयत्न होईल किंवा नाही, याची शंका आहे. यास्तव मोठा प्रयत्न करावयाचा असला तर तेवढी मोठी वासनाही ठेविली पाहिजे. वासना धरताना आपणास ती तृप्त करता येईल किंवा नाही याची लाज किंवा भय बाळगण्याचे काही कारण नाही. लाज असावयाची ती फक्त लहान वासना धरल्याची. मोठी वासना धरल्यामुळे अपयश पदरी आले याची लाज वाटावयास नको. अस्पृश्यता गेल्याने आज जे आपण अतिशूद्र आहोत ते शूद्र होऊ पण अतिशूद्राचे शूद्र होणे

यात अस्पृश्यता समूळ गेली असे म्हणता येईल काय? अस्पृश्यता निवारण्यासाठी भेटीबंदी, लोटीबंदी मोडण्यासारखी लहान वासना ठेवून जर आपले कार्य भागते म्हणजे अस्पृश्यता जाती, तर वर्णव्यवस्था मोडा असा आग्रह धरण्यास मी आपणास सुचविले नसते. सद्‌गृहस्थहो! आपल्यास ठाऊक आहे की, सापाला मारावयाचे झाले तर त्याच्या शेपटीवर मारून चालत नाही. त्याचे तोंड ठेचावे लागते. कोणत्याही उपसर्गकारी कारणाचा नाश करावयाचा झाला तर त्याचे मूळ कशात आहे, हे शोधून काढून त्या मुळावर घाव घातला पाहिजे.

कोणाचे मरण कशात आहे हे ओळखूनच त्यावर मारा करावयाचा असतो. भीमाने दुर्योधनाच्या मांडीवर गदा घातली म्हणून दुर्योधन मेला. ती त्याच्या डोक्यावर घातली असती तर तो मेला नसता. कारण दुर्योधनाचे मरण त्याचे मांडीत होते, डोक्यात नव्हते. शारीरिक रोगाचे मरण कशात आहे याची पूर्ण जाणीव न झाल्यामुळे, रोगपरिहार करण्याकरिता वैदूने केलेले प्रयत्न कसे निष्फळ ठरतात याची जशी अनेक उदाहरणे सापडतात, तशीच सामाजिक रोगाचे निदान कशात आहे याची पूर्ण जाणीव न झाल्यामुळे तो परिहार करण्याकरिता केलेले प्रयत्न निष्फळ झाल्याची उदाहरणे इतिहासात नमूद नाहीत व त्यामुळे ती आपणास वाचावयास सापडत नाहीत. तथापि, तशा प्रकारचे जे एक उदाहरण माझ्या वाचनात आले आहे, त्याचा मी आपणास परिचय करून देत आहे. युरोपातील एका प्राचीन रोमन नावाच्या राष्ट्रात प्याट्रिशीयन व प्लेबियन असे दोन वर्ग होते. पैकी प्याट्रिशीयन हे उच्च वर्णाचे व प्लेबियन हे कनिष्ठ वर्णाचे मानले जात असत. प्याट्रिशीयन लोकांच्या हातात सर्व सत्ता होती व ते या सत्तेच्या जोरावर प्लेबियन लोकास अतिशय वाईट रितिने वागवीत असत. या त्रासातून मुक्त व्हावे म्हणून त्यांनी ऐक्याच्या जोरावर असा आग्रह धरला की, मन मानेल तो कायदा अशी बेबंदशाही न ठेवता सर्वांच्या माहितीकरिता व न्यायाच्या सोईकरीता कायदे लिहून ठेवण्यात यावेत. त्यांचे प्रतिपक्षी जे प्याट्रिशीयन लोक यांनी ते मान्य केले व त्याप्रमाणे बारा कायद्याचा एक लेखी तक्ता तयार करण्यात आला. पण तेवढ्याने त्या गांजलेल्या प्लेबियन लोकांचा त्रास वाचला नाही. कारण कायद्याची अंमलबजावणी करणारे अधिकारी सारे प्याट्रिशीयन वर्गाचे होते; इतकेच नव्हे तर रोमन राष्ट्राचा मुख्य अधिकारी ज्याला ट्रायब्यून असे म्हणत तो प्याट्रिशीयन वर्गाचाच असे. तेणे करून कायदे जरी सारखेच असले तरी त्यांची अंमलबजावणी करताना पक्षपात झाल्याशिवाय राहत नसे. तेव्हा शेवटचा उपाय म्हणून त्यांनी प्याट्रिशीयन लोकांजवळ अशी मागणी केली की रोमन राष्ट्राचा कारभार एका ट्रायब्यूनच्या हाती राहण्यापेक्षा तो दोघा ट्रायब्यूनाच्या हाती असावा व त्यापैकी एक प्याट्रिशीयन लोकांनी निवडून द्यावा

व दुसरा प्लेबियन लोकानी निवडून द्यावा. ही देखील मागणी प्याट्रिशीयन लोकांनी कबूल केली व प्लेबियन लोकांना , साऱ्या क्लेशाचे निवारण झाले असे वाटून आनंद झाला. परंतु त्यांचा आनंद फार दिवस टिकला नाही.. रोमन जनतेचा असा प्रघात असे की कोणतीही गोष्ट तिच्या डेल्फी नावाच्या ग्रामदेवतेस मान्य झाल्याशिवाय ती करावयाची नाही. त्याप्रमाणे ट्रायब्यून जरी निवडला पण तो या देवतेला मान्य झाला नाही, तर त्याची निवडणूक रद्द समजून देवतेला पसंत पडेल असा दुसरा निवडावा लागत असे. देवतेला कोणती गोष्ट आवडते किंवा कोणती आवडत नाही हे ठरविण्याकरिता कौल लावण्याचे काम ज्या पुरोहिताचे असे तो रोमन लोकात ज्या अनेक लग्नाच्या पद्धती असत, त्यांपैकी कानफेराशियो पद्धतीने ज्यांचे लग्न झाले असेल अशा आई बापाच्या पोटी जन्मला असला पाहिजे असा शास्त्रार्थ असे. कानफेराशियो पद्धतीने लग्न करण्याची चाल फक्त प्याट्रिशीयन लोकांपुरतीच होती. म्हणून या डेल्फी देवाचा पुरोहित प्याट्रिशीयन वर्गातलाच असे. या पुरोहिताच्या कारवाईमुळे शेवट असा झाला की, प्लेबियन लोकांनी आपला कट्टाभिमानी असा एकादा पुरुष ट्रायब्यून निवडला तर देवता कौल देत नसे. ट्रायब्यूनच्या दर्जासाठी प्लेबियन लोकांनी निवडलेला पुरुष जर प्याट्रिशीयन लोकांच्या ताटाखालचे मांजर असला तरच ती देवता त्याला पसंत करून त्याला अधिकारारूढ होण्याची संधी प्राप्त होत असे. ट्रायब्यून निवडण्याचा अधिकार मिळवून प्लेबियन लोकांनी काय साधले? काहीच नाही असेच उत्तर देणे भाग पडते. हा त्यांचा प्रयत्न निरर्थक ठरला याचे मुख्य कारण हेच की रोगाचे मरण कशात होते हे त्यांनी पूर्णपणे जाणून घेतले नाही. ते जर त्यांना कळले असते तर आपला ट्रायब्यून असावा अशी मागणी करतानाच पुरोहित कोण असावा हाही प्रश्न त्यांनी सोडवून घेतला असता. रोगाचे मरण नुसते ट्रायब्यून मागण्यात नव्हते, ते पुरोहितपण बळकावण्यात होते हे त्यांनी जाणले नाही. आपणही अस्पृश्यता निवारणाचा उपाय शोधीत असताना या रोगाचे मरण कशात आहे, याची पूर्ण चौकशी केली पाहिजे. नाही तर आपलेही संधान चुकण्याचा संभव आहे.

नुसती भेटीबंदी किंवा लोटीबंदी गेली म्हणून अस्पृश्यता गेली असे मानण्याचा मूर्खपणा करू नका या बाबतीत एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे, ती ही की लोटीबंदी व भेटीबंदी उठल्याने समूळ अस्पृश्यता जात नाही. या दोहीमुळे फार फार तर घराबाहेरची अस्पृश्यता जाईल. पण घरातल्या अस्पृश्यतेला काही ढका लागत नाही. दारातल्या अस्पृश्यतेबरोबर घरातली अस्पृश्यता आपणास

घालवावयाची असल्यास बेटीबंदी उठविली पाहिजे. त्याशिवाय दुसरा इलाज नाही. दुसऱ्या दृष्टीने विचार केला तरी अखेर बेटीबंदीचा उठावा करणे हाच खरा समता प्रस्थापित करण्याचा मार्ग ठरतो. कोणासही कबूल करावे लागेल की, मुख्य भेद लोपला की पोटभेद आपोआप लोपतातच. परंतु पोटभेद लोपले तर मुख्य भेद लोपेलच असे मात्र होत नाही; रोटीबंदी, लोटीबंदी व भेटीबंदी ह्या साऱ्या बंद्या एका बेटीबंदीमुळे उद्भवल्या आहेत. ती उठली की, बाकीच्यांना उठविण्याचा प्रयत्न करावयास नको, त्या आपोआप उठतातच. माझ्या मते बेटीबंदीचा बांध फोडणे ह्यातच खरे अस्पृश्यता निवारण आहे व त्यामुळेच खरी समता प्रस्थापित होणार आहे. आपणास जर अस्पृश्यता नष्ट करावयाची असेल तर अस्पृश्यतेचे मूळ बेटीबंदीत आहे हे आपण ओळखिले पाहिजे व आपला आजचा हल्ला जरी लोटीबंदीवर असला तरी त्याचा मारा अखेर बेटीबंदीपर्यन्त भिडवला पाहिजे. त्याशिवाय अस्पृश्यता ही मुळासकट उपटली जाणार नाही.

हे कार्य कोण तडीस नेऊ शकेल ? ते ब्राह्मण वर्ग पार पाडू शकणार नाही हे कोणास उघड करून सांगावयास नको. जोपर्यन्त वर्णव्यवस्था कायम आहे तोपर्यंतच ब्राह्मणवर्गाचे श्रेष्ठपण कायम आहे. कोणालाही आपले श्रेष्ठपणाचे अधिकार सोडणे शक्य नाही. कोणीही आपखुषीने आपल्या हातात असलेली सत्ता सोडून देत नाही. ब्राह्मणवर्गाने इतर वर्गावर अनेक शतकांपासून आपले सार्वभौमत्व गाजविले आहे. ते सोडून देऊन इतरांबरोबरीचा म्हणून वागण्यास तो वर्ग तयार होईल हे मुळीच संभवत नाही. जपानातील सामुराई वर्गाचे राष्ट्रप्रेम ब्राह्मण वर्गात नाही तेव्हा सामुराई वर्गाने आपले विशिष्ट सामाजिक हक्क सोडून देऊन राष्ट्रैक्य साधण्यासाठी समतेच्या पायावर राष्ट्राचा एकोपा करण्यासाठी जो स्वार्थत्याग केला, तितका स्वार्थत्याग करणे आमच्या ब्राह्मणवर्गाच्या हातून होईल अशी आशा करणे नको. ब्राह्मणेतर वर्गाच्यानेही ही कामगिरी होईलसे दिसत नाही. ब्राह्मणेतर म्हणजे मराठा व तत्सम जातींचा वर्ग हा अधिकारसंपन्न व अनधिकारी या दोन वर्गांच्या मधला वर्ग आहे. अधिकारसंपन्न वर्गाला थोडाबहुत स्वार्थत्याग करून औदार्य दाखविणे शक्य असते. अनधिकारी जो वर्ग असतो तो नेहमी ध्येयधारी असतो. कारण त्याला स्वार्थासाठी का होईना समाजक्रांती घडवून आणावयाची असते व त्यामुळे स्वार्थप्रियतेपेक्षा त्याच्या अंगी तत्त्वप्रियता विशेष प्रमाणात बाणलेली असते. ब्राह्मणेतर वर्ग या दोहोंच्या मधला वर्ग असल्यामुळे एकाला शक्य असलेले औदार्य त्याला शक्य नाही व दुसऱ्यात

बाणलेली तत्त्वप्रियता त्याला बाणू शकत नाही आणि म्हणूनच ब्राह्मणाशी समान अधिकारी होण्याऐवजी अस्पृश्यांपासून आपले विशिष्ट अधिकार कायम राखण्याची जास्त दक्षता हा वर्ग घेत असलेला दिसतो. या समाजक्रांतीच्या कामी तो समाज लुळा आहे. त्याच्या मदतीची आपण अपेक्षा करीत बसल्याने लावी पक्षीण आणि तिची पिले या धड्यात सांगितलेल्या पिकाच्या कापणीकरिता शेजाऱ्यावर अवलंबून राहणाऱ्या शेतकऱ्याची जी गत झाली तीच गत आपली होईल. अस्पृश्यता निवारण करून समता प्रस्थापित करण्याचा हा जो कार्यभाग आपण शिरावर घेतला आहे, तो आपणच तडीस नेला पाहिजे. आपल्याशिवाय इतरांच्या हातून हा कार्यभाग होणार नाही. आपला जन्म या कार्यासाठीच आहे असे मानून ते करावयास लागणे, यातच आपल्या आयुष्याची सार्थकता आहे. हे पुण्य आपल्या पदरी पडत आहे ते ओटीत घेऊ या.

हे कार्य आत्मोद्धाराचे तर आहेच यास्तव हे कार्य आपल्या उन्नतीच्या मार्गातील अडचणी दूर करण्यासाठी शिरावर घेणे आपणा सर्वास प्राप्त आहे. अस्पृश्यतेमुळे आपल्या अन्नात कशी माती कालविली गेली आहे, याची आपणास पूर्ण कल्पना करता येण्यासारखी आहे. आपल्याला अवगत आहे की, एकेकाळी आपल्या लोकांचा पलटणीत मोठ्या प्रमाणात भरणा होत असे. पलटणची नोकरी म्हणजे एक प्रकारची आपल्या लोकांची वतनदारी होती व त्या वतनदारीमुळे आपल्याला कोणाला पोटाची चिंता करण्याचे विशेष कारण पडत नव्हते. आपल्या बरोबरीचे इतर वर्गाचे लोक पलटणीत, पोलिसात, कोर्टकचेरीत आपला शिरकाव करून घेऊन आनंदाने पोट भरीत आहेत. परंतु त्याच खात्यात आपल्यातील एकही माणूस औषधालासुद्धा आज मिळावयाचा नाही! याचे कारण आपणाला कायद्याने बंदी केली आहे असे नाही. कायद्याने सर्व गोष्टी मोकळ्या आहेत. परंतु इतर हिंदू लोक आपणास अस्पृश्य मानतात व हीन लेखतात म्हणून सरकार हात टेकीत आले आहे व ते आपला सरकारी नोकरीत प्रवेश होऊ देत नाही. तसेच आपणाला उजळ माथ्याने कोणता धंदाही करता येत नाही. पैसे नसल्यामुळे आपल्याला धंदा करता येत नाही हे जरी एकांशी खरे असले तरी, आपल्या अस्पृश्यतेमुळे आपल्या हातचा माल कोणी घेणार नाही हीच पुष्कळ अंशी व्यापार करण्याच्या मार्गातील आपली अडचण आहे. एकूण अस्पृश्यता ही साधी सुधी गोष्ट नसून ही आपल्या दारिद्र्याची व हीनतेची माय आहे व तिच्यामुळेच आपली ही विपन्न दशा आज झाली आहे. आपल्याला जर या हीन दशेतून वरती यावयाचे असेल तर आपण हे कार्य हाती घेतलेच पाहिजे. त्याशिवाय आपली धडगत लागावयाची नाही.

हे कार्य जसे स्वहिताचे आहे तसेच हे कार्य राष्ट्रहिताचेही आहे. चातुर्वर्णांतर्गत अस्पृश्यता नाहिशी झाल्याशिवाय हिंदू समाजाचा तरणोपाय नाही. परस्परांच्या जीवनकलहात तरणोपाय म्हणून कोणत्याही समाजास जी साधनसामग्री अवश्यमेव लागते त्या साधनसामग्रीत समाजाची नीतिमत्ता हे एक मोठेच साधन आहे. एवढी गोष्ट कोणासही कबूल करावी लागेल की, ज्या समाजाची नीतिमत्ता अशा प्रकारची आहे की, ज्या गोष्टीमुळे समाज एकवट होत नाही त्या गोष्टी स्तुत्य धरल्या जातात व ज्यामुळे तो एकवट होऊ शकतो अशा गोष्टी निषिद्ध मानिल्या जातात. त्या समाजास जीवनकलहात हार खावी लागणार आहे. उलटपक्षी ज्या समाजाची नीतिमत्ता अशा प्रकारची आहे की, ज्या कारणामुळे समाज एकवट होतो ती कारणे स्तुत्य धरली जातात व ज्या कारणामुळे समाज दुभंग होतो ती कारणे निंद्य मानली जातात त्या समाजास जीवनकलहात यशप्राप्ती झाल्याशिवाय राहणार नाही. तोच न्याय हिंदू समाजव्यवस्थेस लागू करणे प्राप्त आहे. चातुर्वर्ण्यव्यवस्था ही लोकविग्रहकारी व्यवस्था आहे व एकवर्णी व्यवस्था लोकसंग्रहकारी व्यवस्था आहे हे उघड्या डोळयांनी दिसत असता जेणे विग्रह होतो अशा व्यवस्थेचा उदो उदो करणाऱ्या हिंदू समाजाला वारंवार हार खावी लागली तर त्यात नवल काय ? ही होत असलेली अनवस्था जर टाळावयाची असेल तर चातुर्वर्ण्याची चौकट मोडून तिचा एक वर्ण केलाच पाहिजे. एवढ्यानेच भागणार नाही. त्याबरोबरच चातुर्वर्णांतर्गत असमानतेचेही उच्चाटन झाले पाहिजे. पुष्कळ लोक समतेच्या तत्त्वाची कुचेष्टा करतात. निसर्गदृष्ट्या कोणीही मनुष्य दुसऱ्याच्या समान नसतो. कोणाची शरीरप्रकृती भव्य असते, कोण शरीराने अगदी बटु असतो, कोण जन्मतः बुद्धीने श्रेष्ठ असतो, दुसऱ्याची बुद्धी अगदी मंद असते. जन्मजात माणसे असमान उत्पन्न झाली असताना त्यांना समसमान माना असे समतावादी लोकांनी सांगणे हे या लोकांच्या दृष्टीने खुळेपणाचे वाटते. परंतु या कुचेष्टेखोर लोकांना समतेच्या तत्त्वाचा पूर्ण अर्थ कळला नसावा असे म्हणणे भाग पडते. अधिकारप्राप्ती ही कोणाच्याही जन्मावर अगर दौलतीवर अगर इतर कशावरही अवलंबून न ठेविता, ती ज्याच्या त्याच्या गुणावर अवलंबून ठेवणे असा जर समतेच्या तत्त्वाचा अर्थ आहे तर जो गुणहीन आहे, गलिच्छ आहे व दुर्वर्तनी आहे अशा माणसाला जो गुणी आहे, स्वच्छ आहे, सद्‌वर्तनी आहे अशा माणसाने समानतेने वागवावे अशी मागणी कशी करता येईल? असा उलट प्रश्न करण्यात येतो. गुणाने समान असलेल्या माणसाला समानतेने वागविण्यात यावे ही समतेची व्याख्या अधिकार देताना लागू करणे रास्त आहे. पण व्यक्तीतील अंगभूत गुणांचा विकास होऊन

ते अधिकारास लायक होण्यापूर्वी सर्वांना, मग ते कितीही असमान असोत, सारखे वागवणे हाच न्याय आहे. समाजशास्त्राच्या मते ज्याच्या अंगी जो गुण आहे त्याचा पूर्ण विकास होण्यास सामाजिक व्यवस्था ही अत्यंत मोठी कारणीभूत अशी गोष्ट आहे. गुलामांना नेहमीच असमानतेने वागविण्यात आले तर त्यांच्या ठायी दास्यत्वाला योग्य अशा गुणांखेरीज कोणताच गुण उत्पन्न व्हावयाचा नाही व गुलाम दुसऱ्या कोणत्याच अधिकारास पात्र होणार नाही. त्याचप्रमाणे अस्वच्छ माणसास स्वच्छ माणसाने दूर लोटले व त्याशी व्यवहार बंद केला तर अस्वच्छ वृत्तीचा माणूस स्वच्छपणे राहण्याची इच्छा करणार नाही. गुन्हेगार जातींना म्हणजे अनैतिक जातींना नैतिक जातींनी आश्रय दिला नाही तर अनैतिक जातीस नीतीचे शिक्षण केव्हाच प्राप्त होणार नाही. यावर दिलेल्या उदाहरणावरून एवढी गोष्ट सिद्ध आहे की, समतेची वागणूक ही ज्याच्या ठायी गुण नसतील ते गुण उत्पन्न करण्यास ती कारणीभूत होत नसली, तरी एवढे खरे की, समतेच्या वागणुकीशिवाय अंगी असलेले गुण कधीही विकास पावणार नाहीत. समतेच्या वागणुकीशिवाय नैसर्गिक गुणांचा विकास होत नाही हे जसे खरे आहे तसेच समतेच्या वागणुकीशिवाय अंगी असलेल्या गुणांचेही चीज होत नाही. एका हाताने हिंदू समाजातील असमानता व्यक्तीचा विकास खुंटवून समाजाला खुरटा करते. दुसऱ्या हाताने हीच असमानता व्यक्तीत साठवून ठेवलेल्या शक्तीचा समाजास योग्य तो उपयोग करू देत नाही. दोन्ही बाजूने चातुर्वर्ण्याने विस्कळित झालेल्या या हिंदू समाजास ही असमानता दुर्बल करीत आहे. यास्तव हिंदू समाज समर्थ करावयाचा असेल तर चातुर्वर्ण्य व असमानता याचे उच्चाटन करून हिंदू समाजाची रचना एकवर्णत्व व समता या दोन तत्त्वांच्या पायावर केली पाहिजे. अस्पृश्यता निवारणाचा मार्ग हा हिंदू समाज समर्थ करण्याच्या मार्गापासून भिन्न नाही. म्हणून मी म्हणतो की, आपले कार्य जितके स्वहिताचे आहे तितकेच राष्ट्रहिताचे आहे, यात काही किंतु नाही.

हे कार्य खरी समाजक्रांती घडवून आणण्यासाठी आरंभिले आहे. केवळ गोड शब्दांच्या मधुर स्वराने मोहून गेलेल्या मनाची समजूत करण्यासाठी मांडलेला हा खेळ आहे, अशी कोणीही आपली भूल करून घेऊ नये. या कार्याला भावनेचा ठाव आहे व ती भावना या कार्याला चालना देणारी शक्ती असल्यामुळे या कार्याची गती थांबणे किंवा थांबविणे आता कोणालाच शक्य नाही. ज्या समाजक्रांतीचा आज येथे प्रारंभ होत आहे ती समाजक्रांती शांततेने घडून येवो अशी मी या ठिकाणी त्या जगन्नियंत्याची प्रार्थना करतो. ही समाजक्रांती शांततेने घडू देण्याची जबाबदारी आमच्यापेक्षा आमच्या प्रतिपक्षावर जास्त प्रमाणात आहे, याबद्दल कोणाला शंका घेता येणार नाही. ही समाजक्रांती अत्याचारी होईल किंवा अनत्याचारी होईल हे सर्वस्वी स्पृश्य लोकांच्या वागणुकीवर अवलंबून

राहील. १७८९ सालच्या फ्रेंच राष्ट्रीय सभेस अत्याचार केल्याबद्दल जे लोक दोष देतात, त्या लोकांना एका गोष्टीचा विसर पडतो. ती ही की, फ्रेंच राष्ट्रीय सभेला फ्रान्स देशातील राजाने कपटाने वागविले नसते, वरिष्ठ प्रजेने जर विरोध केला नसता, परकियांची मदत घेऊन तिला दडपून टाकण्याचे पाप केले नसते तर तिला क्रांतीच्या कार्यात अत्याचार करावा लागला नसता व सर्व समाजक्रांती शांततेने पार पडली असती. आमच्या प्रतिपक्षासही आमचे सांगणे आहे की, तुम्ही आम्हाला विरोध करू नका. परकीय सरकारची अगर परधर्मियांची मदत घेऊन आमच्यावर चढाई करू नका. शास्त्रांना झुगारून द्या, न्यायाला अनुसरा आणि आम्ही खात्री देतो की, हा कार्यक्रम आम्ही शांततेने पार पाडू.

डॉ. आंबेडकरांचे भाषण संपल्यानंतर सभेत खालील ठराव पास करण्यात आले :–

## हिंदुमात्राचा जन्मसिद्ध हक्कांचा जाहीरनामा

**ठराव १.**–सामाजिक अन्याय, धार्मिक ग्लानी, राजकीय अवनती आणि आर्थिक गुलामगिरी यांच्यामुळे राष्ट्र कसे अधोगतीस जाते याचे सांप्रतचा हिंदू समाज हे एक ठळक व अनुकंपनीय उदाहरण आहे, असे या सभेचे ठाम मत आहे. हिंदू समाजास अशी घोर दशा प्राप्त होण्याचे मुख्य कारण असे की, बहुजन समाजाने मनुष्यमात्राचे जन्मसिद्ध हक्क कोणते याची जाणीव करून घेण्याची तत्परता दाखविली नाही आणि ते अबाधित ठेवण्याची खबरदारी घेतली नाही व स्वार्थसाधू लोकांच्या कृष्णकारस्थानांना आळा घातला नाही. आपले जन्मसिद्ध हक्क समजून घेणे, त्यांचे आपद्प्रसंगी संरक्षण करणे व परस्परामधील व्यवहारात त्यांची पायमल्ली होणार नाही, अशाविषयी काळजी घेणे हे समाजातील प्रत्येक मनुष्यमात्राचे पवित्र कर्तव्य आहे. हिंदुमात्राचे जन्मसिद्ध हक्क कोणते हे सतत हिंदुजनांच्या डोळयांसमोर असावेत म्हणून जगन्नियंत्या सर्वसाक्षी परमेश्वराला साक्षी ठेवून आणि त्याचा आशीर्वाद मागून खालील जाहीरनामा ही सभा सर्वांच्या माहितीकरिता प्रसिद्ध करीत आहे.

(१) सर्व माणसे जन्मतः समान दर्जाचीच आहेत व ती मरेपर्यंत समान दर्जाचीच राहतील. लोकोपयोगित्वाच्या दृष्टीनेच त्यांच्या दर्जात फरक पडू शकेल. एरव्ही त्यांचा समान दर्जा तसाच कायम राहिला पाहिजे. म्हणून राज्यकारभारात आणि सार्वजनिक व्यवहारात समानतेच्या तत्त्वाला बाध येईल अशा कोणत्याही धोरणाला व विचारांना थारा मिळू नये, असे या सभेचे मत आहे.

(२) वरील जन्मसिद्ध मानवी हक्क कायम राहावेत हाच राज्यव्यवस्थेचा व समाजव्यवस्थेचा अंतीम हेतू असला पाहिजे. याकरिता हिंदू समाजाच्या विषमतामूलक रचनेचा व तशा रचनेचा पुरस्कार करणाऱ्या प्राचीन व अर्वाचीन ग्रंथवचनांचा ही सभा तीव्र निषेध करते.

(३) अखिल प्रजा हेच सर्व प्रकारच्या अधिकारांचे व सत्तेचे उगमस्थान आहे. कोणत्याही व्यक्तीचे, समुदायाचे अगर वर्गाचे विशिष्ट हक्क जर ते बहुजन समाजाने दिलेले नसतील तर ते इतर कशाच्याही आधारावर मग तो आधार राजकारणाचा असो अगर धर्मकारणाचा असो, मान्य होण्यास पात्र नाहीत. यास्तव समाजव्यवस्थेच्या बाबतीत श्रुती, स्मृती व पुराणे वगैरे ग्रंथांचे प्रामाण्य कबूल करण्यास ही सभा तयार नाही.

(४) कोणत्याही व्यक्तीला आपल्या जन्मसिद्ध हक्कांप्रमाणे वागण्यास पूर्ण स्वातंत्र्य आहे. त्यावर जर मर्यादा घालण्यात आली तर ती दुसऱ्या व्यक्तीला तिचा तशाच प्रकारचा जन्मसिद्ध हक्क उपभोगण्यास अवसर मिळावा, इतक्यापुरतीच घालता येईल. ती मर्यादा खुद्द लोकांनी केलेल्या कायद्यांनी ठरविली पाहिजे. धर्मशास्त्राच्या किंवा दुसऱ्या कसल्याही आधाराने ती ठरविली जाता कामा नये. यास्तव, अष्टाधिकारासारख्या बाबतीत जातीजातीत ठरवून दिलेल्या असमानतेच्या व्यवस्थेचा ही सभा धिःकार करते.

(५) जेवढ्या गोष्टी समाजास विघातक होतील तेवढ्याच करण्याची कायद्याने बंदी केली पाहिजे. जी गोष्ट कायद्याने मना केली नसेल ती करण्यास सर्वांना मुभा असली पाहिजे. तसेच, जी गोष्ट करणे कायद्याने अवश्य ठरविले नसेल ती गोष्ट करावयास कोणालाही भाग पाडता कामा नये. यास्तव, रस्त्यांचा, सार्वजनिक जागांचा, सार्वजनिक पाणवठ्यांचा व देवालयांचा वगैरे उपयोग करण्यास कोणाचा कोणाला मज्जाव असता कामा नये. यास्तव तसा मज्जाव करू पाहणारे लोक हे सुव्यवस्थित समाजरचनेचे आणि न्यायाचे शत्रू आहेत, असे ही सभा समजते.

(६) कायदा म्हणजे अमूक एका वर्गानेच ठरविलेली बंधने नव्हेत. तो कोणत्या प्रकारचा असावा, हे ठरविण्याचा हक्क सर्व प्रजेस अगर तिच्या प्रतिनिधीस असला पाहिजे. हा कायदा संरक्षणात्मक असो वा शासनात्मक असो, तो सर्वांना सारखाच लागू असला पाहिजे आणि समाजरचना समतेच्या पायावर करावयाची असल्यामुळे मानसन्मान, अधिकार व व्यवसाय यांच्याबाबतीत जात आड येता कामा नये. भेदाभेद व्हावयाचा तो केवळ व्यक्तींच्या गुणभेदामुळेच झाला पाहिजे, जन्मामुळे होता कामा नये. याकरीता प्रचलित जातिभेदपद्धतीचा व तद्नुषंगिक विषमतेचा ही सभा तीव्र निषेध करते.

मांडणार–रा. सीताराम नामदेव शिवतरकर.

अनुमोदन देणार–रा. भाऊ कृष्णराव गायकवाड.

पुष्टी–रा. एन. टी. जाधव.

दुजोरा–श्रीमती गंगाबाई सावंत.

**ठराव २ रा.**–शूद्र जातीचा उपमर्द करणारी, त्यांची प्रगती खुंटविणारी, त्यांचे आत्मबल नष्ट करून त्यांची सामाजिक, राजकीय व आर्थिक गुलामगिरी कायम

करणारी मनुस्मृतीतील पुढील वचने ध्यानात घेऊन व वरील हिंदुमात्राच्या जन्मसिद्ध हक्कांच्या जाहीरनाम्यात गोवलेल्या तत्त्वांशी तुलना करून सदरहू ग्रंथ ' धर्मग्रंथ ' या पवित्र नावास शोभण्यास अपात्र आहे असे या परिषदेचे ठाम मत झाले आहे व ते मत व्यक्त करण्यासाठी असल्या लोकविग्रही व माणुसकीचा उच्छेद करणाऱ्या धर्मग्रंथाचा ती दहनविधी करीत आहे.

मांडणार–रा. गंगाधर नीळकंठ सहस्त्रबुद्धे.

अनुमोदन–रा. राजभोज.

पुष्टी–रा. थोरात.

**टीपः**–वरील ठरावात म्हटलेली वचने पुढील अंकात प्रसिन्द्ध करण्यात येतील. सं. ब. भा.†

**ठराव ३ रा.**–सर्व हिंदुधर्मीय लोक हे एकवर्णीय समजण्यात यावेत. हिंदू या संज्ञेने हा वर्ग ओळखण्यात व संबोधण्यात यावा. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र वगैरे वर्णविषयक संज्ञांनी अगर महार, मांग वगैरे जातिविषयक संज्ञांनी स्वतःला अगर दुसऱ्याला संबोधण्याची कायदेशीर मनाई करण्यात यावी असे या परिषदेचे मत आहे. वाटल्यास धंद्यावरून शिंपी, सोनार, माळी असे म्हणवून घेण्यास तसेच मराठा, कोकणस्थ, देशस्थ वगैरे प्रांत अगर देशनिदर्शक नावे उपयोगात आणण्यास हरकत नाही.

मांडणार––रा. कोंडीराम खोलवडीकर.

अनुमोदन––सुभेदार घाटगे.

पुष्टी––रा. निर्मळ गंगावणे.

दुजोरा––धोंडीराम नारायण गायकवाड.

**ठराव ४ था.**– या परिषदेचे असे मत आहे की (१) धर्माधिकारी ही संस्था लोकमतानुवर्ती व लोकनियुक्त करण्यात यावी. (२) हा पेशा स्वीकारण्याचा व त्याच्याकरिता स्वतःला लायक करून घेण्याचा हक्क व योग प्रत्येक हिंदुमात्राला देण्यात यावा. (३) धर्माधिकाऱ्यांची परीक्षा घेण्यात येऊन मग त्यांना प्रशस्तीपत्रे देण्यात यावीत. प्रशस्तीपत्रे न मिळालेल्या कोणत्याही व्यक्तीला धर्माधिकारी म्हणविण्याची अगर तत्संबंधी विधीकर्मे करण्याची कायदेशीर मनाई करण्यात यावी. (४) ग्राम धर्माधिकारी, तालुका धर्माधिकारी व प्रांत धर्माधिकारी अशी सामान्यतः धर्माधिकाऱ्यांची योजना करण्यात यावी. (५) वरीलप्रमाणे

† संबंधित अंक उपलब्ध होऊ शकला नाही–संपादक.

नियोजित केलेल्या धर्माधिकाऱ्यास धर्मविधी केल्याबद्दल दक्षिणा अगर इतर प्रकारचा मेहनंताना अगर पारितोषिक घेण्याचा अधिकार असू नये. त्याऐवजी इतर सर्व खात्यातील अधिकारी वर्गाप्रमाणे याही खात्यातील लहानमोठ्या अधिकाऱ्यांना सरकारी नोकर समजण्यात यावे व त्यांना सरकारातून योग्य तो पगार देण्यात यावा.

मांडणार--रा. पतितपावनदास बुवा.

अनुमोदन--रा. गिरजाशंकर शिवदास.

पुष्टी--रा. चवरे मास्तर.

दुजोरा--रा. राघो नारायण वनमाळी.

वरील ठरावावर अत्यंत मार्मिक व मनोवेधक भाषणे झाली. '' [१]

''सत्याग्रह सभेतील मनुस्मृतीची दहनभूमी तयार करायला सहा कारागीर दोन दिवस खपत होते. सहा इंच खोल व सुमारे दीड फूट चौरस खड्डा खणून तो चंदनाच्या लाकडांनी भरून काढला होता. चार फूट उंचीचे चार खांब चार कोनावर उभे केले होते, ' मनुस्मृतीची दहनभूमी ' , ' अस्पृश्यता नष्ट करा ', ' भिक्षुकशाहीला गाडून टाका ' वगैरे पताका तीन बाजूंनी लावल्या होत्या. तारीख २५ डिसेंबर १९२७ रोजी रात्री ९ वाजता बापूसाहेब सहस्त्रबुद्धे व दुसरे पाच सहा अस्पृश्य साधू यांच्या हस्ते या दहनभूमीवर मनुस्मृतीचे पुस्तक ठेवून ते जाळण्यात आले.'' [२]

एवढ्याने पहिल्या दिवसाचे काम संपले.

## '' दिवस दुसरा

पहिल्या दिवसाचे सभेचे काम रात्री साडेसात वाजता संपल्यानंतर मंडळी जेवणाची आतुरतेने वाट पहात होती. जिल्ह्यांतून आलेल्या लोकांनी सत्याग्रह कमिटीने कळविल्याप्रमाणे आपापल्याबरोबर भाकऱ्या आणल्या होत्या. परंतु या लोकांनी सभेच्या पूर्वीच येऊन दोन दिवस तळ दिल्याकारणाने

---

१. बहिष्कृत भारत : ३ फेब्रुवारी १९२८.

२. डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड ३ रा, पृ. १९४.

त्यांच्या भाकऱ्या संपून गेल्या होत्या. मुंबईहून आलेल्या मंडळींस तर सारा दिवस कडकडीत उपोषण घडले होते व कधी जेवण पदरात पडेल असे झाले होते. परंतु मुंबईहून जेवणाची भांडी महाडास पोहोचती झाली नसल्यामुळे सामग्री असूनही जेवण करता आले नाही. यामुळे सर्वांची निराशा झाली. असा प्रसंग येणार याची जाणीव सत्याग्रह कमिटीस होती व म्हणून तांदूळ, डाळ वगैरे पदार्थ तिने खरेदी केले त्याबरोबर चणेही खरेदी करून ठेवले होते. त्या रात्री जेवण्याच्याऐवजी सगळयांना चण्यावर राहावे लागले. चण्यावर राहण्यात मंडळी विशेषशी खुश दिसली नाही. परंतु डॉ. आंबेडकरांनी आपल्या वाटणीचे चणे ओटीत घेऊन फक्के मारण्यास सुरवात केल्याचे पाहून जमलेल्या मंडळीने त्यांचे अनुकरण केले. २६-१२-१९२७ ला दुसरे दिवशी सकाळी ९ वाजता परिषदेच्या कामास सुरवात झाली. या दिवशी सत्याग्रहाची वाटाघाट करावयाची असल्यामुळे, परिषदेला विषयनियामक कमिटीचे स्वरूप देण्यात आले व त्याबरहुकूम डॉ. आंबेडकर यांनी सभेच्या भोवती उभे केलेल्या स्वयंसेवकास कोणाही परस्थ माणसास आत येऊ देऊ नये, अशी ताकीद दिली. नंतर डॉ. आंबेडकर यांनी सत्याग्रह करावा अशा अर्थाचा ठराव सभेपुढे मांडला.

ठराव मांडताना डॉ. आंबेडकर म्हणाले,

'' मला काल कलेक्टर साहेबांनी मुलाखतीस बोलाविले होते. त्यात त्यांनी मला असे सांगितले की, आपण काही सत्याग्रहाचे विरूद्ध नाही. परंतु स्पृश्य लोकांनी या बाबतीत दिवाणी कोर्टात फिर्याद केली आहे व खटल्याचा निकाल होईपर्यंत, अस्पृश्य लोकांनी चवदार तळयावर जाऊ नये, अशा अर्थाचा तात्पुरता मनाई हुकूम त्यांनी मिळविला आहे. त्या कोर्टाचा अपमान न व्हावा म्हणून आपणाला या कामात पडावे लागत आहे. त्यास मी असे उत्तर दिले की, मी स्वतः सत्याग्रह करण्याच्या निश्चयाने आलो आहे. तो माझा निश्चय मी ढळू देणार नाही व सत्याग्रहास जमलेल्या लोकास सत्याग्रह करा असाच सल्ला मी देईन. परंतु सत्याग्रहास आलेल्या लोकांवर मी माझ्या मताचे दडपण पाडणार नाही. पण मनाई हुकूम मिळविला आहे म्हणून तुम्ही सत्याग्रह करू नका असे म्हणून मी त्यांना परावृत्त करणार नाही. त्यावर कलेक्टर साहेबांनी अशी इच्छा दर्शविली की, जर सत्याग्रह करण्याचे बहुमताने ठरले तर जमलेल्या लोकास दोन सदुपदेशाचे शब्द सांगण्याची मला सवलत द्यावी. ती सवलत देईल असे वचन

मी कलेक्टर साहेबांस देऊन आलो आहे. त्याच्यापेक्षा मी स्वतःला जास्त काही बांधून दिलेले नाही. तरी तुम्हास जो काही निश्चय करणे असेल तो तुम्ही करावा. या प्रकरणात एकच गोष्ट ध्यानात ठेवावयास पाहिजे की, कोणतेही कायमचे हित साधवून घ्यावयाचे असेल तर त्रास व क्लेश हे सोसावे लागणार आहेतच. तपश्चर्येशिवाय कोणताही वर प्राप्त झाल्याची पुराणात किंवा इतिहासात साक्ष नाही. सुख हे नेहमीच दुःखाअंती प्राप्त होत असते. तेव्हा मनाई हुकूम मोडल्यामुळे तुरुंगात जाण्याचा प्रसंग आला तरी त्याला डगमगता कामा नये. मनाई हुकूम हा वहिवाटीच्या आधारावर देण्यात आला आहे. ती वहिवाट न्याय्य आहे किंवा अन्याय्य आहे हे देखील पाहावयास पाहिजे आहे. नाही तर कोर्टाचा हुकूम पाळण्याच्या भ्रांतीने ज्या अन्यायाविरुद्ध आपण झगडतो आहोत तोच अन्याय मान्य करण्याची पाळी येण्याचा संभव आहे. सत्याग्रह ही खडतर तपश्चर्या आहे. मनावर काबू राखून सत्याग्रही लोकांना फार त्रास सहन करावा लागेल. आपण होऊन आपली मान दुसऱ्याचे हातात खुशीने द्यावयाची आहे. तुम्हास काठ्या घेऊन सत्याग्रहास जाता येणार नाही. अधिकाऱ्याची कोणतीही आज्ञा मोडता येणार नाही. सत्याग्रहास जाताना वाटेत सरकारी अधिकाऱ्यांनी पकडून तुरुंगात घातल्यावर कोणीही माफी मागता कामा नये. आपण जे केले ते योग्य केले असे शेवटपर्यंत सांगितले पाहिजे. एकंदरीत (१) काठ्या जवळ न बाळगणे, (२) सरकारची आज्ञा पाळणे, (३) तुरुंगात जाण्याची तयारी दाखविणे, (४) सरकारपुढे माफी न मागणे ह्या अटी तुम्ही कसोशीने पाळल्या पाहिजेत. तरच सत्याग्रहात सामील होऊन उपयोग. मी सांगतो म्हणून तुम्ही सत्याग्रहात येऊन उपयोगी नाही. आपला मार्ग न्यायाचा आहे, असे तुम्हास पटले असल्यास व अनेक हालअपेष्टा सहन करण्यास तुम्ही तयार असल्यास सत्याग्रह करा.''

ठरावावर अशाप्रकारचे भाषण झाल्यानंतर डॉ. आंबेडकरांनी सांगितले की, या ठरावावर आता जी अनुकूल, प्रतिकूल भाषणे होतील ती शांतचित्ताने ऐकून घेऊन, मग जे काही ठरवावयाचे ते ठरवा. यानंतर एक अनुकूल व दुसरा प्रतिकूल अशी व्यवस्था ठेवून खालील गृहस्थांनी सत्याग्रहास अनुकूल भाषणे केली :–

(१) पद्मनाथ राजाराम हाटे. (२) पांडूरंग बाबाजी मांडलेकर. (३) धोंडीराम गायकवाड. (४) पांडूरंगजी नाथुजी राजभोज. (५) भिकाजी महादू पेन्शनर. (६) भांबू गणू शेणवलीकर. (७) सोनू देवजी खांबोलीकर. (८) हिरू बारकू शेलार. (९) गोविंदबुवा मालखेडकर. (१०) भिवबा भोवडकर. (११) गिरजा शंकर शिवदास. (१२) गणू धर्मा अंबोलीकर.

खालील गृहस्थांनी प्रतिकूल भाषणे केली.

(१) शिवराम सखाराम हाटे. (२) कृष्णा येसू. (३) गाडगेबुवा साहेब. (४) गोविंद हवालकर. (५) राघू आनंदा शिवतरकर. (६) राघो नारायण वनमाळी. (७) पुंजाजी नवसाजी जाधव. (८) एन. टी. जाधव.

ध्यानात घेण्यासारखी गोष्ट ही की, सत्याग्रह करण्याकरिता रा. रा. विठोबा महादेव वाडवल, राहणार कोलवली हे एकच एक वयोवृद्ध मराठे गृहस्थ आले होते. अनुकूल-प्रतिकूल भाषणे झाल्यावर ते उठून उभे राहिले व म्हणाले, '' मी मराठा आहे. माझ्या गावचे महारबंधू रुसले आहेत. ते गावात येत नाहीत. गावाची वेस रंडकी झाली. तिचा आम्हास काय उपयोग ? आमच्या महार बंधूंचा पाण्याचा हट्ट आहे. तर तो आम्ही पुरविला पाहिजे. म्हणून मी सत्याग्रह करण्यास आलो आहे.''

वरील वक्त्यांच्या भाषणांचा परिणाम काय होणार, याबद्दल कोणासच शंका नव्हती. ज्यांना तशी शंका होती त्यांची शंकानिरसन होण्यास मुळीच वेळ लागला नाही. कारण सत्याग्रहास अनुकूल असलेल्या वक्त्यास जसे लोक बोलू देत तसे सत्याग्रहास प्रतिकूल असलेल्या वक्त्यास बोलू देईनात. इतके की, शेवटी डॉ. आंबेडकरांना '' तुम्ही प्रतिकूल वक्त्यांचेही ऐकून घ्या '' अशी विनवणी करावी लागली. अनुकूल-प्रतिकूल वक्त्यांची भाषणे झाल्यानंतर डॉ. आंबेडकर म्हणाले,

'' एकंदरीत सभेचे मत सत्याग्रहास अनुकूल आहे असेच म्हणणे भाग आहे. त्याबद्दल मला आनंद वाटतो. पण माझ्यापाठी आंधळ्यांचे सैन्य नको. मी सांगतो म्हणून किंवा इतर लोक सांगतात म्हणून तुरुंगात जाऊन फशी पडणारे लोक मला नकोत. तुरुंगात जाईन पण माझी अस्पृश्यता मी घालवीन असे म्हणणारा माणूस मला पाहिजे. सत्याग्रह करावयाचा किंवा नाही हे निश्चित करण्यापूर्वी अशाप्रकारचा आत्मयज्ञ करण्यास किती माणसे तयार आहेत हे ठरविणे प्राप्त आहे. टाळयांच्या गजराने किंवा हात वर केल्याने ठरविण्यासारखी ही सोपी बाब नाही. ती मोजदाद करूनच ठरविली पाहिजे. म्हणून जी माणसे तुरुंगात जावयास तयार असतील अशा लोकांची मोजदाद करावयास मी लावणार आहे. त्या मोजदादीवरून जर बहुमत सत्याग्रहास अनुकूल आहे असे दिसले तर कलेक्टर साहेबांना मी कळवीन व संध्याकाळी त्यांना सभेत येऊन तुम्हापुढे भाषण करण्यास निमंत्रण देईन. त्यांचे म्हणणे ऐकूनही जर तुमचे मत कायम

राहिले तर सत्याग्रह करू. आता १२-३० झाले, तेव्हा ही बैठक संपली आहे असे ते जाहीर करतात तोच मुंबईच्या ब्राह्मणेतर पक्षातर्फे श्री. केशवराव जेधे व श्री. दिनकरराव जवळकर हे मुंबईहून स्पेशल मोटारीतून आले व सभामंडपात दाखल झाले. अध्यक्षांनी त्यांना बोलण्यास विनंती केल्यावरून श्री. जवळकर म्हणाले, धर्माचा लढा लढण्याकरिता आपण आला आहात हे ठीक आहे. दुर्दैवाने काही मराठे लोक तुम्हास विरोध करीत आहेत याबद्दल मी मराठा असल्यामुळे मला फार लज्जा वाटत आहे. आम्ही मराठे व ब्राह्मणांनी तुम्हास जो आजपर्यंत त्रास दिला त्याबद्दल आम्ही फार पातकी आहोत. आम्ही तुमचे हातात जो खराटा दिला आहे तो तुम्ही टाकून दिला पाहिजे. जेथे आमची मालकी आहे तेथे तुमचीही आहे. तुमचे पुढारी बॅरिस्टर आंबेडकर यांनी चालविलेली चळवळ तुमच्या वाजवी हक्कांच्या प्रस्थापनेसाठी आहे. मी दोन वेळा तुरुंगात गेलो. तुरुंगास भिण्याचे मुळीच कारण नाही. इंग्रज सरकारचे तुरुंगात जातीभेद नाही. बाहेरच्या ह्या भेदजन्य नरकात जगण्यापेक्षा तुरुंगवास अधिक बरा. मी व श्री. जेधे तुम्हास सत्यशोधक समाजाची सहानुभूती दाखविण्यास आलो आहो. मराठे लोक महारांकडून जास्त काम करून घेतात. त्यांचा घाम पाहून कुळकर्ण्यास पाझर फुटत नाही. मराठ्यांना परमेश्वराने पुढचा जन्म अस्पृश्याचा द्यावा. डॉ. आंबेडकरांसारखा ज्ञानी व कर्तबगार अस्पृश्यांमध्ये नाही. ते तुमच्याकरिता प्रयत्न करीत आहेत. त्यांचे मागोमाग तुम्ही गेले पाहिजे. हिंदुस्थानचा देव भटाळलेला आहे, तो देव तुमचे दुःख नाहीसे करणार नाही. तो बॅरिस्टर आंबेडकरांसारखाच मनुष्य नाहीसे करील. आज जर मी महार असतो तर आनंदाने तुमचेबरोबर तुरुंगात आलो असतो, तुम्ही कायदा भंग करून आपल्या हक्कांचे प्रस्थापन केले पाहिजे. हा दिवस हिंदुंच्या इतिहासात फारच महत्त्वाचा गणला जाणार आहे. तुरुंगाची भीती तुम्हास वाटण्याचे कारण नाही. ती भीती तूपपोळी खाणाऱ्या ब्राह्मणांना वाटेल. स्पृश्यांना वठणीवर आणणे तुमच्या हाती आहे. तुम्ही हिंदपुत्र आहात. हर हर महादेव असा जयजयकार करून तळे काबीज करा व तुमचे सेनापती डॉ. आंबेडकर साहेब सांगतील तसे वागा. हे माझे स्वतःचे मत आहे. ब्राह्मणेतर पक्षाचे मत यापेक्षा निराळे आहे व ते सांगण्यासाठी मी आलो आहे, फिर्यादीचा निकाल होईपर्यंत सत्याग्रह तहकूब ठेवावा असा ब्राह्मणेतर पक्षाचा आपणास संदेश आहे. सरकारशी विरोध करणे हे या पक्षाच्या मते अस्पृश्य वर्गास हितावह नाही. त्यानंतर श्री. केशवराव जेधे म्हणाले, ज्या लोकांनी आपणास छळले त्यांचे आपण परिच्छेदन केलेच पाहिजे. हा झगडा माणुसकी स्थापन करण्याचा आहे. गाढवे व कुत्री ज्या तळ्यावर पाणी पितात त्या तळ्यावर तुम्हास मज्जाव

असावा हे लांछनास्पद आहे. तुम्ही भाला, संग्राम व मनुस्मृती जाळली हे फार योग्य केले. सत्याग्रह करून तुरुंगात जाणेच इष्ट आहे. जे लोक तुम्हाला विरोध करतील त्यांचे ऐकू नका. येणेप्रमाणे भाषण झाल्यावर सभा दुपारी दीड वाजता तहकूब ठेवण्यात आली.

## कलेक्टर साहेबांची मध्यस्ती

सत्याग्रही लोकांची मोजदाद करण्यासाठी डॉ. आंबेडकर यांनी पूर्वी सुचविल्याप्रमाणे दहा बारा लोकांना तुरुंगात जाण्यास कोण तयार आहेत त्यांची नाव गांव निशी यादी तयार करण्याचे कामावर योजिले. अवघ्या तासात ३८८४ लोकांनी नावे नोंदविली. आम्ही तुरुंगात जाणार असे घरच्या मंडळीस सांगून आलो तर आता आम्ही परत कसे जावे ? अशी भाषा आलेले सारेच लोक वापरू लागले. शेवटी नावे लिहून घेण्यास बसविलेले लोक कंटाळले व म्हणाले, सारेच लोक तयार असलेले दिसतात, मग नावे लिहून घेण्यात काय हशील. त्यामुळे साडे तीन वाजता नावे लिहून घेण्याचे काम बंद केले व डॉ. आंबेडकर यांनी कलेक्टर साहेब यास पत्राने कळविले की, '' मंडळीचा सत्याग्रह करण्याचा निश्चय ठरला आहे. आपल्याला सभेत येऊन आपली बाजू मांडावयाची आहे असे आपण म्हणाला होता तेव्हा सभेस संध्याकाळी ५ वाजता सुरुवात होणार आहे, तरी आपली इच्छा असल्यास आपण यावे.'' त्याप्रमाणे कलेक्टर साहेब व पोलीस सुपरिंटेन्डेण्ट मि. फॅरन्ट, पोलीस इन्स्पेक्टर, फौजदार वगैरे मंडळी आली. डॉ. आंबेडकर म्हणाले,

'' संध्याकाळी मी सांगितलेच होते की, कलेक्टर साहेबांची आपणास दोन शब्द सांगण्याची इच्छा आहे. त्याप्रमाणे ते सभेत हजर झाले आहेत, तेव्हा त्यांनी आपले काय मत असेल ते मांडावे अशी मी त्यांना विनंती करितो.'' यानंतर कलेक्टर साहेब यांनी खालीलप्रमाणे मराठीत भाषण केले :

'' मी कशाकरिता आलो आहे हे तुम्हास अध्यक्ष साहेब यांनी सांगितले. मला मराठी येत नाही, सबब माफी मागतो. तुम्ही ३/४ महिन्यांपासून सत्याग्रहाची तयारी करिता हे आम्ही ऐकतो, व तुम्हास सत्याग्रह करता येणार नाही हे सांगून वाईट वाटेल. त्याबद्दल तुम्हास उपदेश करण्याची माझी इच्छा आहे. मुंबई ले. कौन्सिलचा ठराव-शाळा व सार्वजनिक तलाव, विहीरीस शिऊ देणे जरूर आहे–असा आहे. त्याप्रमाणे मुंबई सरकारने हुकूम दिला व म्युनिसीपालिटी, लोकलबोर्ड यासही कळविले आहे की, अस्पृश्य लोकास हरकत करू

नये. त्याप्रमाणे तुमची इच्छा सरकारचे हुकूमाप्रमाणे चवदार तळ्यावर जाण्याची आहे. हरकत नसती तर आम्ही तळ्यावर जाण्यास परवानगी दिली असती. परंतु १०/१२ स्पृश्य लोकांनी दिवाणी कोर्टात दावा केला की, हे तळे खाजगी आहे. तलाव खाजगी आहे किंवा सार्वजनिक आहे हे मला सांगता येत नाही. परंतु कागदपत्र साक्ष पाहून, वकिलाचे ऐकून निकाल देऊ. खाजगी असल्यास स्पृश्य लोकांनी बंदी करणे योग्य आहे. परंतु खाजगी नसेल तर काही हरकत नाही. परंतु कोर्टाने तलाव सार्वजनिक याबद्दल निकाल दिला म्हणजे खुले होईल. दुसरा प्रश्न असा की, कोर्टाकडून हंगामी हुकूम मिळविला कीं, कोर्टाकडून निकाल होईपर्यंत जावयाचे नाही. आज तुम्हाला माझा उपदेश असा होत आहे की, आपण कोर्टाचा हुकूम मान्य केला पाहिजे. कोर्टाचा हुकूम अमान्य केला तर तुम्हास फायदा मिळेल असे वाटत नाही. मला माहीत आहे की, आता २/४ महिन्यापासून तयारी केली व तुमची उमेद आहे की, तलावात जाऊ. पण शहाणा माणूस नेहमी कायद्याप्रमाणे वागत असतो. तुम्हास माहीत आहे की, तुमचे विरुद्ध लोकांनी कायदा मोडल्याबद्दल त्यांना शिक्षा झाली. त्याचप्रमाणे तुम्ही कायद्याप्रमाणे चालला नाही तर तुम्हास त्रास व शिक्षा होईल, फायदा होणार नाही. तुमचा हेतू कीं, तलावात जावे पण आमची हरकत होईल. आता तुम्हास माहीत आहे की, मी जिल्ह्याचा कलेक्टर आहे. तुम्हाकरिता बोलत आहे की, येथे दोन पक्ष आहेत. स्पृश्य लोक, दुसरे बाजूस अस्पृश्य. सरकार कोणते बाजूस आहे तर अस्पृश्य लोकांचे बाजूस आहे. जर तुम्ही उपदेश ऐकत नाही व सरकारचा अपमान केला तर निराळा परिणाम होईल. हे वरील सर्व लक्षात ठेवा की, मी तुमचा दोस्त आहे व सरकार तुमचे माबाप आहेत. तर आज फार दिलगिरीने ऐकतो कीं, सर्व तयारी करून सत्याग्रह केलाच पाहिजे व सरकारचा अपमान करून तलावास गेले पाहिजे, तर हे असे सांगणारे दोस्त नाहीत, खोटे दोस्त आहेत व हे सर्व काम शांततेने व कायद्याने केले पाहिजे. ह्यासाठी धीराने वागा. कायद्याप्रमाणे कोर्टात दावा चालू आहे. तुमच्यातर्फे निकाल होईल तर तलाव खुला होईल. विरुद्ध झाला तर कोर्टात अपील करा. तोपर्यंत दुसरे सार्वजनिक तलावाबद्दल सत्याग्रह करा. तर आता कायद्याविरूद्ध व सरकारचे विरूद्ध वागू नका. तशाने फायदा मिळणार नाही याबद्दल एक गोष्ट सांगतो. समजा दोन भाऊ आहेत एक हरी व दुसरा भाऊ. तर हरी म्हणाला आता उन्हाळा संपल्यावर भात पेरू. तर भाऊ म्हणाला सर्व तयारी झाल्यावर भात पेरू. तर हरीने घाई करून भात पेरला व भाऊने जमीन सर्व तयार झाल्यावर भात पेरला. तर कोणास चांगले

पीक मिळाले असेल याचा विचार करा. ह्याप्रमाणे तुम्ही कराल त्याप्रमाणे जय मिळेल. आता घाईघाईने सरकारचे हुकूमाविरूद्ध वागला तर वरील उदाहरणाप्रमाणे होईल. मग तुम्ही विचाराल की, आता आम्ही सत्याग्रहासाठी जमलो, तर तुम्ही त्याचेऐवजी असा ठराव करा कीं, आम्ही आता सुरू करून जोपर्यंत जय मिळेल व जोपर्यंत अस्पृश्य लोकांना सार्वजनिक तळे खुले होईल तोपर्यंत आम्ही काम करणार. राहाणार नाही. मग तुमचे अध्यक्षसाहेब बॅरिस्टर आहेत त्यांना कोर्टाचे काम माहीत आहे. त्यांचेबरोबर तुम्ही उपदेश घेऊन पुराव्याकरिता साक्षी तयार करा. शिवाय ह्या कामासाठी काही पैशाची जरुरी आहे. तरी ह्याकरिता तयारी करा. हे माझे काम नव्हे. एक गोष्ट सांगतो व बसतो. १२ वर्षांपासून ह्या तालुक्याचे महार लोक ओळखतो. मला माहीत आहे की, हे चांगले आहेत व सरकारची नोकरी करितात व असे पुष्कळ लोक आहेत की, पलटणीत काम केलेले सुभेदार, हवालदार, जमादार, शिपाई आहेत. ह्यांनी लष्करमध्ये नोकरी केली. सरकारचे अपमान करतील असे मला वाटत नाही. माझा उपदेश असा की, जोपर्यंत दाव्याचा निकाल होईल तोपर्यंत तलावाचे कार्य सोडा. तसे नाही केले तर काय फायदा मिळेल ? तुमचे हेतूला नुकसान होईल. तुम्हाला माहीत आहे की, आम्ही सर्व पोलिसांचा बंदोबस्त केला आहे की, तलावास जाणेस वाट नाही व जर तसे जाणेकरिता प्रयत्न कराल व तुमचे विरूद्ध स्पृश्य लोक होतील व सरकारही होईल, तर यात काही फायदा नाही. जरा थांबले पाहिजे. तर तुमच्यामध्ये पुढारी शहाणे माणसे की, ज्यास कोर्टाचे काम माहीत आहे, त्याच्याकडे काम करा. तुमच्यातर्फे होईल. मग काही हरकत नाही. तुमचेतर्फे उपदेश दिला. तुम्हास जे बोलत आहे ते तुमचे दोस्त असे समजून कराल अशी उमेद आहे.''

नंतर अध्यक्षांच्या परवानगीने श्री. जवळकर म्हणाले, '' सकाळी आल्यापासून आम्ही महाडातील सर्व मराठा पुढाऱ्यांच्या गाठी घेतल्या. त्यापैकी प्रत्येकाने सांगितले की, आम्ही अस्पृश्यांविरुद्ध जाणार नाही. याचा पुरावा म्हणून त्यांनी मला एक जाहीरनामा लिहून दिला आहे. तो खालीलप्रमाणे आहे :

श्री. केशवराव जेधे व दिनकरराव जवळकर यास,

महाड ता. २६-१२-१९२७. आमचे पुढील म्हणणे-महाड मराठे समाजाचे मत-अस्पृश्य समाजापुढे मांडणे.

महाड येथील चवदार तळ्यावर सत्याग्रह करण्याकरिता येथे मोठ्या प्रमाणावर

अस्पृश्य समाज स्वोन्नतीचा प्रयत्न करीत असता, त्यांच्याविरुद्ध मराठे आहेत अशा कंड्या काही परजातीचे बेजबाबदार लोक उठवीत आहेत, त्या सर्वस्वी निराधार आहेत. आम्ही महाडचे मराठे, मराठा समाजाचे पुढारी म्हणून कळवीत आहोत की, अस्पृश्यांनी आपले मनुष्यपणाचे हक्क मिळवावेत. त्यांच्या आड येण्यास मराठा समाज तयार नाही. उलट अस्पृश्यांच्या प्रयत्नाबद्दल आम्हाला पूर्ण सहानुभूती वाटत आहे. मात्र हे प्रयत्न करीत असता अस्पृश्य समाजाने सनदशीर मार्गाने प्रयत्न केल्यास अस्पृश्य समाजाचे क़ल्याण त्वरित होईल असे आमचे मत आहे.

सत्याग्रहाच्या बाबतीत आम्ही तटस्थ राहणार असा ठराव ता. २१-१२-२७ रोजी पासही केला आहे.

हल्ली जो अस्पृश्यांविरुद्ध तळयासंबंधी कोर्टात दावा लागला आहे, त्यात जे ९ स्पृश्य आहेत त्यापैकी जो एकच मराठा गृहस्थ आहे त्याने या बाबतीत मराठा समाजाचे मत घेतलेले नाही व त्यांना मराठा समाजाची या बाबतीत मुळीच संमती नाही.

सह्या

नारायण मामा मांगडे, पेन्टर
कोंडीराम पांडुरंग शिंदे
किसन बाबा धुमाल
तुकाराम सावळाराम पानसरे
कृष्णाजी ग्यानूबा पवार
बाबाजीराव माधवराव दळवी
सीताराम गोपाळ चौधरी

यावरुन तुम्हास दिसेल की, मराठा वर्ग तुम्हाविरुद्ध नाही. तथापि, ब्राह्मणेतर पक्षाचे असे सांगणे आहे की, फिर्यादीचा निकाल होईपर्यंत सत्याग्रह थांबविणे इष्ट आहे. कलेक्टर साहेबांचेही तेच मत आहे. या उभयपक्षांचे म्हणणे तुम्ही ऐकावे, हे बरे असे मला वाटते.'' नंतर सुभेदार घाटगे म्हणाले, '' मला देखील तसेच वाटते. मी स्वतः पेन्शनर सुभेदार आहे. सत्याग्रहात भाग घेतला तर माझ्या पेन्शनला धक्का पोहोचेल, याची मला पूर्ण कल्पना आहे. तरी पण सत्याग्रह करण्याच्या निश्चयाने येथे पुण्याहून आलो. परंतु मला एक गोष्ट सांगणे प्राप्त आहे. ती ही की, मी स्पृश्य लोकांविरुद्ध सत्याग्रह करण्यास आलो होतो. परंतु हे लोक सरकारच्या आड लपून आपली व सरकारची झुंज लावून

देऊ पहात आहेत. तेव्हा ही झुंज खेळताना आपण पुरता विचार करावयास पाहिजे. सरकारचा दुराग्रह असता तर आपण ही झुंज घेणे अवश्य झाले असते. पण कलेक्टर साहेबांच्या भाषणावरून तसे दिसत नाही. त्यांची आपणास पूर्ण सहानुभूती आहे. मग विनाकारण सरकारशी वाद का करावा? आपण जो उत्साह आज दाखविला तो फार अपूर्व आहे. त्याबद्दल मी आपले अभिनंदन करतो. इतका उत्साह असल्यावर आपल्याला जयप्राप्ती झाल्याशिवाय राहणार नाही. परंतु आपण बदललेल्या परिस्थितीचा विचार करून सबूर करावे अशी माझी विनंती आहे.'' नंतर कलेक्टर साहेब यांना लौकर जावयाचे असल्यामुळे डॉ. आंबेडकर यांनी त्यांचे आभार मानिले व त्यांना पोहोचविले. कलेक्टर साहेबांच्या भाषणाचा काहीच परिणाम झाल्याचे दिसले नाही. कारण कलेक्टर साहेब गेल्यानंतर जेव्हा त्यांच्या भाषणावर वक्ते बोलू लागले तेव्हा सत्याग्रहाच्या विरुद्ध बोलणाऱ्या वक्त्यांचे ऐकून घेण्यास लोकांची तयारी नाही, असे दिसले. परंतु रा. कृष्णाजी दावणे व कु. शांताबाई शिंदे यांच्यासारख्या सत्याग्रहास अनुकूल असणाऱ्या वक्त्यांस टाळ्या पडत होत्या. ही चर्चा संध्याकाळी ७ वाजेपर्यंत चालली होती. तेव्हा डॉ. आंबेडकर यांनी सांगितले की, आज रात्री पुनः बसून याचा विचार करण्यात येईल, व उद्या सकाळी नक्की काय ते ठरवू. असे सांगून आताची बैठक संपली आहे, असे जाहीर केले.

## दिवस तिसरा

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी परिषदेची बैठक संपल्यानंतर ठरल्याप्रमाणे सत्याग्रह करावा किंवा न करावा याचा निकाल करण्याकरिता पुन्हा रात्री काही निवडक मंडळीची बैठक भरविण्यात आली व त्यात पुष्कळ भवति न भवति होऊन सत्याग्रह तहकूब करून तूर्त गावातून मिरवणूक काढून तळयाभोवतालून न्यावी ही तडजोड बहुमताने मान्य झाली व त्याप्रमाणे रात्री कलेक्टर साहेबास कळविण्यात आले. परंतु तहकुबीचा ठराव सभेपुढे कोणी मांडावा हा मोठाच प्रश्न येऊन पडला. डॉ. आंबेडकरांनी मांडला तरच त्याला पाठिंबा मिळण्याचा संभव होता. कारण सभा जर कोणाचे ऐकेल तर एकट्या डॉ. आंबेडकरांचे ऐकेल; दुसऱ्या कोणाचे ऐकणार नाही हे सर्वांना ठाऊक होते. त्याप्रमाणे डॉ. आंबेडकरांनीच ठराव मांडावा असा सर्वांचा आग्रह पडला व ती जबाबदारी डॉ. आंबेडकरांनी आपल्या अंगावर घेतली. तद्नुसार तिसऱ्या दिवशी सकाळी

जेव्हा परिषदेस सुरुवात झाली तेव्हा त्यांनी खालील ठराव सभेपुढे मांडला :

**ठराव**.–जे स्पृश्य हिंदू लोक चवदार तळ्याचे पाणी अस्पृश्य लोकास घेऊ देत नाहीत त्यांच्याविरूद्ध सत्याग्रह करण्याकरिता ही सभा बोलावण्यात आली असता, त्याच स्पृश्य हिंदूंनी सरकारची पाठ फिरुन आयत्या वेळी दिवाणी कोर्टाचा तात्पुरता मनाई हुकूम अस्पृश्य वर्गाच्या विरुद्ध मिळविल्यामुळे या सभेस सरकारविरूद्ध सत्याग्रह करण्याचा प्रसंग आणला ही गोष्ट ध्यानात घेऊन आणि मे. कलेक्टर साहेबांनी आपल्या भाषणात या बाबतीत सरकारचा दुराग्रह नसून, समान हक्कांकरिता अस्पृश्यांनी चालविलेल्या झगड्यात त्याला सरकारची पूर्ण सहानुभूती आहे असे भर सभेत दिलेले आश्वासन याचा विचार करून ही परिषद दिवाणी दाव्याचा निकाल होईपर्यंत सत्याग्रह तहकूब करीत आहे.

ठराव मांडताना डॉ. आंबेडकर म्हणाले,

'' सत्याग्रह करा असा ठराव काल मी मांडला आणि सत्याग्रह तूर्त करू नका असा ठराव आज मीच मांडीत आहे हे पाहून आपल्याला मी चंचल वृत्तीचा माणूस आहे असे वाटेल. पण तसे काही नाही. दोनही गोष्टी पूर्ण विचारांतीच मी करीत आहे. काल आपल्यात निश्चय किती आहे याचा मला अंदाज पाहावयाचा होता. तो अंदाज मिळाला. आपला पूर्ण निश्चय असल्याबद्दल आता कोणालाही शंका उरली नाही. इतक्याने माझे समाधान झाले आहे. आपल्यात निश्चयाचे बळ नव्हते हीच आपल्यातील मोठी उणीव होती. ती उणीव तुम्ही भरून काढली आहे. आपण सत्याग्रह करु नये असे जे मी आपणास सांगत आहे ते देखील मी पूर्ण विचारांतीच सांगत आहे. शक्ती अंगात आली म्हणून तिचा उपयोग लगेच केला पाहिजे अशातला काही भाग नाही. शक्तीचा उपयोग करणे तो काळ वेळ पाहून करणे प्राप्त आहे. विचारांती मलाही पटले आहे की, आज या शक्तीचा आपण उपयोग करू नये. आज सत्याग्रह केला तर, तो सरकारविरूद्ध होणार आहे. सरकारचा दुराग्रह असेल तर सरकारविरूद्धही सत्याग्रह करावयाला हरकत नाही. पण सरकारचा दुराग्रह आहे का ? याचा विचार करा. सरकारची आपल्याला सहानुभूती आहे. मग विनाकारण सरकारला पेचात का टाकावे ? दुसरे असे की, आपल्या सत्याग्रहाला स्पृश्य लोकांची मुळीच सहानुभूती नाही, हे तुम्ही पाहात आहा. स्पृश्य लोक सर्वस्वी आपल्याशी असहकारिता करीत आहेत. व्यापारी लोकांनी बाजार बंद केला आहे, खोतांनी शेती काढून घेण्याचा सपाटा लावला आहे व कुणबी लोकांनी गुरे

कोंडवाड्यात घालण्याचे सत्र सुरू केले आहे. या जोर जुलूमातून आपल्याला निभावून जावयाचे आहे. तशाप्रकारे निभावून जाण्यास सरकारचे सहाय्य अवश्य आहे. ते मिळविण्याचे आश्वासन सरकार देत असताना आम्ही सरकारविरूद्ध सत्याग्रह करणे अनुचित आहे असे जर काही लोक म्हणाले तर ते वावगे आहे असे कोणाला म्हणता येणार नाही. तेव्हा तुम्ही या प्रसंगी, माझे ऐका आणि या ठरावास संमती द्या. तुम्हाला लोक हसू शकत नाहीत. खुद्द कलेक्टर साहेब तुमची विनवणी करीत आहेत, तेव्हा तुम्ही भ्याड म्हणून सत्याग्रह तहकूब करीत आहात असे कोणीही म्हणू शकणार नाही, फार तर तुमच्या पुढाऱ्यांनी माघार घेतली म्हणून हिणवतील. पण त्यांची खंती वाटावयाला नको. मला तरी वाटत नाही. कारण मी माघार घेतो ती तुमच्या हिताकरिताच. माझे अनुयायी माझ्यापुढे चार पावले गेले ही मोठ्या आनंदाची, नव्हे अभिमानाची गोष्ट आहे, असे मी समजतो. आज हा सत्याग्रह तहकूब करा असे जरी मी म्हणतो तरी तळे काबीज केल्याशिवाय राहू नये हा जसा तुमचा निश्चय आहे तसा माझा पण आहे. तो तडीस नेल्याखेरीज मी स्वस्थ बसणार नाही हे पक्के ध्यानात असू द्या. ''

वरील प्रकारचे भाषण ऐकून सत्याग्रह मंडळी फार निराश झाली. तरी पण सगळयांनी डॉ. आंबेडकर यांच्या सांगण्यास मान देऊन, त्यांच्या ठरावास मुकाट्याने रुकार दिला.

## प्रतिनिधींची प्रचंड मिरवणूक

नंतर जमलेल्या प्रतिनिधींची शहरातून मिरवणूक काढण्यात आली. मिरवणुकीत प्रथमारंभी मुंबहून आलेले ५० व्हालंटियर होते. त्यानंतर सभेस आलेल्या ५० स्त्रिया होत्या. त्यानंतर एकापाठी एक चार-चारांच्या रांगेत सगळे प्रतिनिधी चालले होते. मधून मधून अंतरावर ब्रीदवाक्ये लिहिलेल्या पताका धरलेले लोक होते. गेल्या मार्च महिन्यात अस्पृश्य लोकांनी तळे भ्रष्ट केले म्हणून महाडातील स्पृश्य लोक सारे धर्मवीर बनले होते व नंगा नाच करून तुरुंगात गेले. आता तर कोर्टाचा मनाई हुकूम मिळविला असल्यामुळे त्यांनी तर छाती काढून चालावयास पाहिजे होते. परंतु सर्वांनी दारे लावून घेतलेली ! बायकापोरे तर काय पण पुरुषसुद्धा रस्त्यावर फिरावयाचे बंद झाले होते! पुढारी लोक तर जीव घेऊन गाव सोडून पळून गेले होते! एकजण गावात असेल तर हराम! कोर्टाचा मनाई हुकूम सुटला असल्यामुळे सरकार घडीपुरते त्यांच्या बाजूचे असता महाडची प्रजा इतकी दीनवाणी कशी झाली, याचे सर्वांनाच मोठे आश्चर्य वाटले. सिंहाचे छावे सगळी मांजराची पिल्ली कशी झाली हे एक कोडे होते. आधीच घाबरून

गेलेल्या या लोकांनी ही प्रचंड मिरवणूक बाजारपेठेतून चाललेली पाहून सर्व महाड शहर गांगरून गेले. असल्याप्रकारची मिरवणूक पाहण्याचा महाड शहराला हा पहिलाच प्रसंग होय. पंचम जार्ज की जय, महाड सत्याग्रहकी जय, गांधीकी जय, आगरकर की जय, लोकहितवादी की जय, एकनाथ महाराज की जय वगैरे जयघोषाने सर्व शहर दणाणून गेले होते. मिरवणूक बाजारपेठेतून निघून चवदार तळ्याच्या कोपऱ्यावर आली व तेथे मिरवणूक उभी फोडण्यात येऊन अर्धी मिरवणूक तळयाच्या एका बाजूने व अर्धी मिरवणूक तळयाच्या दुसऱ्या बाजूने नेऊन तळयाच्या एका कोपऱ्यावर दोहीची मिळणी करून पुढे एक होऊन मंडपाजवळ आली. अशारीतीने तळयाच्या चारही बाजूला वेढा देण्यात आला होता. हा विलक्षण देखावा पाहून आता तळे घ्यावयाचे बाकी काय राहिले ! असे केविलवाणे उद्‌गार गावातील लोकांनी काढल्याचे ऐकू येत होते आणि तसे उद्‌गार निघणे अगदी शक्य होते. कारण खांद्यावर काठ्या घेऊन चालत येत असलेल्या या मिरवणुकीचा देखावा शिवाजीच्या काळच्या मावळयांच्या सैन्याची आठवण करून देत होता. मिरवणूक इतकी मोठी होती की, आघाडीचे लोक मंडपाजवळ परत आले तरी पिछाडीचे लोक मंडपाजवळच होते. मिरवणूक काही मंद गतीने चालत नव्हती, तरी पण साडेदहा वाजता निघालेली मिरवणूक संपण्यास १२ वाजले. यावरून मिरवणूक किती मोठी होती याची कल्पना करता येईल.

मिरवणूक संपून मंडळी परत आल्यानंतर पुन्हा परिषदेस सुरवात झाली व रा. शिवतरकर यांनी खालील ठराव सभेपुढे मांडला :

ही परिषद यशस्वी करण्याचे कामी ज्या अस्पृश्येतर सद्‌गृहस्थांनी मदत केली त्यांचे व विशेषतः खालील सद्‌गृहस्थांचे ही सभा कृतज्ञतापूर्वक आभार मानीत आहे. (१) अ. वि. चित्रे, (२) सुरेंद्रनाथ टिपणीस, (३) फत्तेखानसाहेब मुठोलीकर, (४) शांताराम रघुनाथ पोतनीस, (५) केशवराव देशपांडे, (६) ग. नि. सहस्त्रबुद्धे. या ठरावावर श्रीयुत पांडुरंग नाथूजी राजभोज, श्रीयुत मोरे, श्रीयुत वनमाळी वगैरे मंडळींनी चरित्रात्मक भाषणे केली व हा आभार प्रदर्शनाचा ठराव टाळयांच्या गजरात पसार झाला. त्यावर रा. अनंतराव चित्रे व सहस्त्रबुद्धे यांनी उत्तरादाखल भाषणे केल्यानंतर डॉ. आंबेडकर यांनी सांगितले की, ' जरी सभेचा कार्यक्रम आता संपला आहे तरी इतर काही महत्त्वाच्या गोष्टीची चर्चा करणे राहिले आहे व त्या गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या असल्याकारणाने त्याचा विचार केल्याशिवाय ही परिषद शेवटास गेली असे मला म्हणता यावयाचे नाही.

आता बराच वेळ झाला असल्याकारणाने या विषयाची चर्चा आज संध्याकाळवर ढकलणे मला प्राप्त झाले आहे. म्हणून आपणा सर्वांना माझी अशी विनंती आहे की, आपण घरी न जाता संध्याकाळच्या परिषदेच्या बैठकीस हजेरी द्यावी. वरील प्रकारचे अध्यक्षांचे भाषण झाल्यानंतर सभेचे काम एक वाजता संपविण्यात आले. ''[१]



[१] बहिष्कृत भारत : ३ फेब्रुवारी १९२८.

## १८

# अस्पृश्य असूनही अस्पृश्यांच्या चळवळीत सहभागी न होणे लांछनास्पद

महाड येथील तारीख २५ ते २७ डिसेंबर १९२७ च्या सत्याग्रह परिषदेच्या कार्यक्रमाने तेथील चांभार समाजदेखील खडबडून जागा झाला व दि. २७ डिसेंबर १९२७ ला संध्याकाळी चांभारवाड्यात सभा करण्याचे ठरवून, डॉ. आंबेडकरांना तेथे येण्यास विनंती करण्यात आली. त्यांच्या विनंतीस मान देऊन डॉ. आंबेडकर त्यांच्या मित्रमंडळीसह रात्री साडेसात वाजता चांभार-वाड्यात गेले. महाड येथे चांभारांची वस्ती बरीच मोठी आहे व त्या मानाने सभेस चांभार वर्गातील स्त्रीपुरुषांचा घोळका बराच जमा झाला होता. प्रथमतः श्रीयुत रा. ना. वनमाळी, रा. गिरजाशंकर शिवदास, एल. आर. चांदोरकर, श्रीयुत गोविंद झिपरू जाधव यांची सामाजिक विषयांवर स्फुर्तीदायक भाषणे झाल्यानंतर डॉ. आंबेडकरसाहेब बोलावयास उभे राहिले. ते म्हणाले,

दोन चार चांभार लोक सोडून बाकीचे कोणीच चांभार लोक सत्याग्रहार्सारख्या महत्त्वाच्या कार्यात भाग घेत नाहीत ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. मला याचे काही कारण समजत नाही. महार समाजाशी सहकार्य करण्यास तुम्ही का कचरता, हे मला कळत नाही. तुम्ही स्वतः होऊन सत्याग्रहासारखे मोठे कार्य करू म्हटले तर ते तुम्हास झेपणार नाही असे मला वाटते. कारण तुमची लोकसंख्या अगदी अल्प आहे. तेव्हा महार लोकांसारख्या बहुसंख्यांक लोकांशी कार्यक्षमतेच्या दृष्टीने सहकार्य केल्याशिवाय तुम्हाला गत्यंतर नाही. तसेच महार लोकांशी सहकार्य केल्याने आपली जात बाटेल अशी भीती बाळगण्याचे तुम्हास काही कारण नाही. खरे म्हटले असता सत्याग्रहीचा कंपू हा वीरांचा कंपू आहे व वीरांच्या कंपूत जातीपातीला थारा नाही ही गोष्ट पेशव्यासारख्या ब्राह्मणी राज्यातही मान्य होती. तसे जर नसते तर सिदनाक महाराचा तंबू मराठे सरदारांच्या छावणीत राहू दिला नसता. तरी पण तुम्ही आपली जात मोडा असा कोणीही आग्रह धरीत नाही. खरे म्हटले असता तुम्ही सुखवस्तु, व्यापारी, सधन आहा. तुम्ही उलटी आम्हास मदत केली पाहिजे, तुम्हास जोडे न देण्याचा

---

बहिष्कृत भारत : ३ फेब्रुवारी १९२८.

सत्याग्रह करता येईल. असे सामर्थ्य तुमच्या समाजात असून तुम्ही त्याचा उपयोग करीत नाही. ह्याला तुमची बेफिकीरी म्हणावे की विलक्षण आळस म्हणावा तेच मला कळत नाही. तुम्हास सुख पाहिजे की माणुसकी पाहिजे ते ठरवा. माणुसकीशिवाय तुमचे वैभव व्यर्थ होय. तुमच्यासारख्या स्वतंत्र व सुखी लोकांनी अस्पृश्यांना माणुसकी परत आणून देण्याचे कामात आतुरतेने भाग घेतला पाहिजे. हे पुण्य थोडे तरी पदरात घ्या. ह्यात जर तुम्ही भाग घ्याल तर इतिहासात महारांबरोबर तुमचेही नाव अजरामर होईल. नाही तर तुमची पुढची पिढी तुम्ही नामर्द होतात म्हणून दोष देईल.

त्यानंतर श्री. एस. एन. शिवतरकर म्हणाले, अस्पृश्योद्धाराचे कामात तुम्ही भाग घेत नाही म्हणून तुम्ही भ्याड गणले जात आहा. तुम्ही आपले कर्तव्यकर्म बजावीत नाही. हे कार्य केवळ अस्पृश्यांचे नसून मानव जातीचे आहे. पण तुम्ही अस्पृश्य असूनही ह्या कामात भाग घेत नाही हे तुम्हास लांछनास्पद आहे. तुम्ही भटाळलेले होऊ नका व ह्या कार्यात सहकार्य करून मदत करा. त्यानंतर श्री. पां. ना. राजभोज म्हणाले, चांभार भटाळलेले होऊ लागले आहेत हे पाहून मला फार वाईट वाटते व मातंग समाजातील काही लोकांबद्दल त्याहूनही अधिक वाईट वाटते. चांभार लोक इतर अस्पृश्यांपेक्षा सुखी आहेत. पण त्यांना शिक्षण नाही म्हणून ते असे कर्तव्यच्युत होऊन राहिले आहेत. आज अस्पृश्य पुढाऱ्यावर अरिष्ट कोसळले आहे. या वेळेस तुम्ही मत्सर व द्वेषभावना सोडली पाहिजे. जातीभेद फार भयंकर आहे. तो विसरुन महार समाजाशी तुम्ही सहकार्य करा, सत्याग्रही बना, त्यात सर्वांचाच फायदा आहे. नंतर श्री. सहस्त्रबुद्धे म्हणाले, बॅरिस्टर साहेब तुमच्या कुळात जन्मले आणि आज विलायतेला जाऊन, विद्वान ब्राह्मणांपेक्षाही अधिक विद्वान होऊन आले. म्हणूनच मी ब्राह्मण असून आज त्यांचे शिष्यत्व पत्करिले आहे. तुम्ही तसेच शिक्षण घ्या, जातीभेद मोडा व अस्पृश्योद्धाराचे कार्यात सहाय्य करा. बॅरिस्टर साहेबांबरोबर मी नेहमी जेवणखाण करीत असतो. त्यामुळे माझे काही बिघडले नाही. खाण्यापिण्याच्या भेदास तुम्ही उगीच महत्त्व देऊ नका. नंतर श्री. वनमाळी म्हणाले, तुम्ही सत्याग्रहात भाग घेतला नाही याबद्दल मला फार वाईट वाटते. आपले कर्तव्य बजावण्याची ही संधी उगीच दवडू नका. कर्तव्य बजावाल तर इतिहासात तुमचे नाव अजरामर होईल. ह्याप्रमाणे भाषणे झाल्यानंतर चहापान झाले व अध्यक्षांचे आभार मानल्यानंतर सुमारे ९ वाजता सभा बरखास्त झाली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर त्यांच्या मित्रांसह चांभारवाड्यातून आल्यानंतर रात्री १० वाजता पुन्हा सत्याग्रह परिषदेस सुरुवात झाली. धुळ्याचे खादीप्रसार मंडळाचे आद्य प्रवर्तक रा. देव यांचे व्याख्यान ठरले होते. ते येण्यास थोडा अवकाश लागल्यामुळे, श्रीयुत गणपतबुवा जाधव यांचे व श्रीयुत कांबळे यांचे विनोदयुक्त असे देव व भक्त या विषयांवर पाव, पावतास कीर्तने झाली. यांचा लोकांवर फार मोठा परिणाम झाला. रा. देव व्याख्यान देऊन गेल्यानंतर परिषदेच्या कार्यक्रमास सुरुवात झाली.. प्रथमतः श्रीयुत वामनराव पत्की व कमलाकर-टिपणीस या दोन कायस्थ ज्ञातीतील तरुणांचे आभार मानण्याचा व त्यांनी केलेल्या कामगिरीबद्दल सत्याग्रह कमिटीतर्फे पारितोषिक म्हणून दोघास दोन सोन्याच्या आंगठ्या अर्पण करण्याचा ठराव मांडण्यात आला. ठरावावर श्रीयुत संभाजी गायकवाड, गोविंद रामजी आडेरकर हवालदार व श्रीयुत मोरे यांची भाषणे झाली. त्याच ठरावावर बोलताना डॉ. आंबेडकर म्हणाले,

वरील दोन तरुणांची कामगिरी त्यांच्या जातीस व कुळास शोभण्यासारखी आहे. ब्राह्मण वर्गांनी कायस्थ लोकांवर कमीपणाचा शिक्का मारुन त्यांना हीन ठरविण्याचा अनेक वेळा प्रयत्न केला.. परंतु त्यांनी वेळोवेळी प्रसंगास तोंड देऊन ब्राह्मण जातीच्या या कृष्ण कारस्थानास आळा घातला. समतेचा लढा लढलेल्या कायस्थ ज्ञातीस समतेसाठी झगडणाऱ्या अस्पृश्य वर्गाबद्दल सहानुभूती वाटून त्या कार्याप्रित्यर्थ त्यांनी झटावे हे अगदी साहजिक आहे. त्यानंतर श्रीयुत कमलाकर टिपणीस व श्रीयुत पत्की यांनी प्रत्युतरादाखल भाषणे केली. मग महाड म्युनिसीपालिटीचे अध्यक्ष रा. सुरेंद्रनाथ टिपणीस हे बोलावयास उठले व हिंदुधर्म संरक्षणास अस्पृश्य लोकांची किती जरुरी आहे हे त्यांनी विषद करून सांगितले. त्यांच्या पाठी रा. शांताराम पोतनीस म्हणाले, सर्व गुजर व ब्राह्मणसमाज उलटला तरी आम्ही तुम्हास तन, मन, धनाने मदत करीत राहू. आमच्या कायस्थातील जुने लोकही तुम्हास विरुद्ध आहेत. पण आम्ही त्यांना काडीचीही किंमत देत नाही. चवदार तळयावर जाण्यास जोपर्यंत अस्पृश्यांना परवानगी मिळणार नाही तोपर्यंत मीही त्या तळयावर पाणी पिणार नाही.

त्याच्या पुढील ठराव डॉ. आंबेडकर यांनी स्वतः मांडला. तो असा, '' सत्याग्रह परिषदेकरिता नेमलेले प्रचारक रा. शिवराम गोपाळ जाधव, संभाजी तुकाराम गायकवाड, भाऊ बाळू वारंगकर, पंढरीनाथ रामचंद्र आसूडकर, भाविकनाथ बुवा फलानकर व पांडुरंग महादेव वोउरकर यांनी आपली कामगिरी उत्तमप्रकारे बजाविल्याबद्दल ही परिषद् त्यांचे आभार मानते व रा. बोउरकर, सखाराम, गोपाळ आचलोलकर, महादेव आचलोलकर यांनी आपणास परिषदेच्या कार्याकरिता स्वखुषीने अर्पिले हे ध्यानात घेऊन त्यांना एक एक चांदीचा बिल्ला पारितोषक म्हणून देते ''.[१]



---

१. बहिष्कृत भारत : ३ फेब्रुवारी १९२८.

# १९

# अस्पृश्योन्नती व स्त्रियांची जबाबदारी

ता. २७ डिसेंबर १९२७ रोजी दुपारी परिषद संपवून प्रतिनिधी जेवणाच्या मंडपाकडे गेले व डॉ. बाबासाहेब आंबेडकर परिषदेच्या ऑफिसात, जेथे त्यांची उतरण्याची सोय केलेली होती तेथे गेले. तेथे जाऊन बसतात न बसतात तोच त्यांना पाहण्याकरिता स्त्रियांची गर्दी जमली. या स्त्रिया दूर दूरच्या गावावरून नऊ नऊ, दहा दहा मैलांच्या अंतरावरून मुद्दाम डॉ. आंबेडकरांना पाहण्यास आलेल्या होत्या. डॉ. आंबेडकरांना प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहावयाची त्यांना इतकी उत्कट इच्छा झाली होती की, त्यापैकी पुष्कळशा स्त्रिया, आपली तान्ही मुले सोडून आल्या होत्या. संध्याकाळच्या सुमारास तर स्त्रियांची अतीच गर्दी जमली. त्यापैकी एक वृद्ध स्त्री आली. ती डॉ. आंबेडकरांना पाहून मोठमोठ्याने रडू लागली. हे पाहून जमलेल्या सर्व मंडळींची अशी खात्री झाली की, हिला कोणी तरी स्पृश्य गुंडाने मारले असावे. त्याप्रमाणे तू रडतेस का, तुला कोणी मारिले ते सांग, असे लोक विचारू लागले. तेव्हा ती म्हणाली की, मला कोणी मारिले नाही. परंतु मी इकडे येत असताना वाटेत '' तुमच्या राजाचा खय्यो झाला असे काही दुष्टांनी मला सांगितले '' असे ती म्हणाली. तेव्हा या बाईचे रडण्याचे कारण व इतक्या स्त्रियांचे येण्याचे कारण काय हे लोकांच्या ध्यानी आले. निस्सीम प्रेमाच्या रज्जूने बद्ध झालेला स्त्रीवर्ग आपणास पाहावयास आयताच आला आहे याचा फायदा घेऊन जमलेल्या सर्व स्त्रियांस डॉ. आंबेडकरांनी ठेवून घेतले व सांगितले की, मला तुम्हास काही समाजहिताच्या दोन गोष्टी सांगावयाच्या आहेत, त्यासाठी तुम्ही संध्याकाळी परिषदेस हजर राहावे अशी माझी तुम्हास विनंती आहे. त्याप्रमाणे सर्व स्त्रिया राहत्या झाल्या.

चांभारवाड्यातील सभा आटोपल्यानंतर बाबासाहेबांनी स्त्री वर्गाला उद्देशून भाषण केले आणि त्यानंतर जातीचे पंच, म्हेत्रे वगैरे अधिकारी लोकांना त्यांनी मार्गदर्शन केले. ठरल्याप्रमाणे शेवटच्या व महत्त्वाच्या कार्यक्रमास अध्यक्षांनी सुरुवात केली. हा शेवटचा कार्यक्रम इतका महत्त्वाचा होता की, परिषदेच्या सगळ्या कार्यक्रमात त्यालाच अग्रस्थान देणे प्राप्त आहे. शिवाय तो कार्यक्रम

---

बहिष्कृत भारत : ३ फेब्रुवारी १९२८.

इतक्या गांभीर्यप्रचुर पद्धतीने पार पाडण्यात आला की, त्यामुळे सर्व सभाजनास आपल्या कर्तव्याची जाणीव धगधगीतपणे डोळ्यापुढे उभी राहिली. या कार्यक्रमापैकी पहिला कार्यक्रम म्हणजे स्त्रीवर्गास व्याख्यान हा होय. दुपारी ठरल्याप्रमाणे सर्व स्त्रिया भाडभीड सोडून सभामंडपात येऊन बसल्या होत्या. त्यांच्यासाठी बसण्याकरिता मध्येच जागा राखून ठेवण्यात आली होती. त्यांना उद्देशून डॉ. आंबेडकर म्हणाले,

आपण या सभेत आल्याबद्दल मला अत्यंत आनंद होत आहे. घरप्रपंचाच्या अडचणी ज्याप्रमाणे स्त्री व पुरुष मिळून सोडवितात त्याप्रमाणे समाजाच्या संसारातील अडचणी स्त्रीपुरुषांनी मिळून सोडवावयास पाहिजे आहेत. पुरुषांनीच हे काम अंगावर घेतले तर ते पार पाडण्यास त्यांना पुष्कळ अवधी लागेल याबद्दल शंका नाही. तेच काम स्त्रियांनी जर अंगावर घेतले तर त्या त्या कामात लवकर यशप्राप्ती करून घेतील असे माझे मत आहे. परंतु त्यांना एकट्याने जरी हे काम अंगावरती घेता आले नाही तरी जो पुरुषवर्ग हे काम करीत आहे त्याच्याशी सहकार्य केल्याशिवाय राहू नये. यासाठी तुम्ही यापुढे नेहमी परिषदेस हजर राहिले पाहिजे, असे माझे तुम्हास सांगणे आहे. खरे म्हटले असता, अस्पृश्यता निवारणाचा प्रश्न पुरूषांचा नसून तुम्हा स्त्रियांचाच आहे. तुम्ही आम्हा पुरुषांना जन्म दिलेला आहे. आम्हाला इतर लोक कसे जनावरांपेक्षाही कमी लेखतात, हे तुम्हास ठाऊक आहे. काही ठिकाणी आमची सावलीसुद्धा घेत नाहीत. इतर लोकास कोर्टकचेऱ्यांमध्ये मानासन्मानाच्या जागा मिळतात. परंतु तुमच्या पोटी जन्मलेल्या आम्हा मुलांना पोलीस खात्यातील शिपुर्ड्याचीही नोकरी मिळत नाही इतका आमचा हीन दर्जा आहे. हे सर्व तुम्हास ठाऊक असताना तुम्ही आम्हास जन्मास का घातले असा प्रश्न तुम्हास कोणी केला तर त्याचे उत्तर तुम्ही काय देऊ शकाल ? या सभेत बसलेल्या कायस्थ व इतर स्पृश्य बायांच्या पोटी जन्मलेल्या मुलात व तुमच्या पोटी जन्मलेल्या आम्हा मुलात काय अंतर आहे ? तुम्ही विचार करावयास पाहिजे की ब्राह्मणांच्या स्त्रियात जेवढे शील आहे तेवढे शील तुमच्यातही आहे. ब्राह्मण स्त्रियात जितके पातिव्रत्य आहे तितके पातिव्रत्य तुमच्यातही आहे आणि तुमच्यात जितके मनोधैर्य, करारीपणा व धमक आहे, तितकी ब्राह्मण स्त्रियातदेखील नाही. असे असताना ब्राह्मण स्त्रीच्या पोटी जन्मलेले बालक का सर्वमान्य व्हावे व तुमच्या पोटी जन्मलेले बालक सर्व ठिकाणी का अवमानिले जावे, त्याला साध्या माणुसकीचा हक्क का असू नये, याचा कधी तुम्ही विचार केला आहे काय ? मला वाटते तुम्ही त्याचा मुळीच विचार केला नाही. तुम्ही जर विचार केला असता तर पुरुषांच्या आधी तुम्ही स्त्रियांनी सत्याग्रह केला असता. कारण तुमच्या पोटी जन्म घेतला येवढेच पातक

आमच्या हातून घडले आहे व त्याच पातकामुळे आम्हास ही अस्पृश्यतेची शिक्षा भोगावी लागत आहे. तेव्हा तुम्ही विचार करावयास पाहिजे की, तुमच्या पोटी जन्म घेणे हे पाप का ठरले जावे व इतर स्त्रियांच्या पोटी जन्म घेणे पुण्यप्रद का व्हावे. या प्रश्नाचा जर तुम्ही विचार केला, तर तुम्हास एक तर प्रजा उत्पत्ती करणे बंद करावे लागेल किंवा तुमच्यामुळे त्यांना लागत असलेला कलंक तरी तुम्हास धुवून टाकावा लागेल. या दोहोपैकी कोणती तरी एक गोष्ट तुम्ही करावयास लागले पाहिजे. तुम्ही प्रतिज्ञा करा की, अशा कलंकित स्थितीत आम्ही यापुढे जगणार नाही. समाजोन्नती करण्याचा जसा पुरुषांनी निश्चय केला आहे तसा तुम्हीही करा. दुसरी गोष्ट आपणास जी सांगावयाची आहे ती ही की, तुम्ही सर्वांनी जुन्या व गलिच्छ चालीरिती सोडून दिल्या पाहिजेत. खरे म्हटले असता अस्पृश्य माणसास तो अस्पृश्य आहे अशी ओळख पटविणारा शिक्का त्याच्या कपाळावर मारलेला नाही. परंतु अस्पृश्य लोकांच्या ज्या काही चालीरिती आहेत त्या चालीरितींवरुन लोक अमूक एक माणूस अस्पृश्य जातीपैकी आहे असे चटकन ओळखतात. ह्या चालीरिती एकेकाळी आपल्यावर सक्तीने लादण्यात आल्या होत्या असे माझे मत आहे. परंतु इंग्रज सरकारच्या राज्यांत तशा प्रकारची सक्ती होऊ शकत नाही. म्हणून ज्या गोष्टीमुळे लोक आपण अस्पृश्य आहोत असे ओळखतात त्या साऱ्या गोष्टी आता तुम्ही बंद केल्या पाहिजेत. तुमची लुगडी नेसण्याची पद्धत ही तुमच्या अस्पृश्यतेची साक्ष आहे. ती साक्ष तुम्ही बुजवली पाहिजे. वरिष्ठ वर्गाच्या बाया ज्या पद्धतीने लुगडी नेसतात त्या पद्धतीने तुम्ही लुगडी नेसण्याचा प्रघात पाडला पाहिजे. तसे करण्यात तुमचे काही खर्चत नाही. त्याचप्रमाणे गळयामध्ये भाराभर गळसऱ्या व हातात कोपरभर कथलाचे किंवा चांदीचे गोठ-पाटल्या ही देखील तुम्हास ओळखण्याची खूण आहे. एका गळसरीपेक्षा अधिकांची जरूरी नाही. त्याने नवऱ्याचे आयुष्य वाढते किंवा आपल्या शरीराला शोभा येते अशातला काही भाग नाही. दागिन्यापेक्षा कपड्यालाच जास्त शोभा आहे. तेव्हा कथलाच्या किंवा चांदीच्या दागिन्यात पैसे खर्च करण्याऐवजी चांगल्या कपड्यात पैसे खर्च करा. दागिना घालावयाचाच झाला तर तो सोन्याचा करून घालावा नाहीतर घालू नये. त्याचप्रमाणे स्वच्छतेने वागण्याची खबरदारी घ्या. तुम्ही घरच्या गृहलक्ष्मी आहात; घरात कोणतीही अमंगल गोष्ट होऊ न देणे याबद्दल तुम्ही काळजी वाहिली पाहिजे. गेल्या मार्च महिन्यापासून सर्व लोकांनी मेलेल्या जनावरांचे मांस खाणे बंद केले आहे ही गोष्ट आनंदाची आहे. परंतु एखाद्या घरी तसे झाले नसल्यास ते घडवून आणण्याची जबाबदारी तुम्ही आपल्या अंगावर

घेतली पाहिजे. जो नवरा मेलेल्या जनावरांचे मांस घरात आणील त्यास तुम्ही स्पष्ट सांगा की, असला प्रकार माझ्या घरी चालणार नाही आणि माझी खात्री आहे की, ही गोष्ट जर तुम्ही मनावर घ्याल तर हा अमंगल प्रकार अजिबात बंद होणार आहे. तसेच तुम्ही आपल्या मुलींनाही शिक्षण दिले पाहिजे. ज्ञान आणि विद्या या गोष्टी काही पुरुषांसाठीच नाहीत. त्या स्त्रियांनाही आवश्यक आहेत. ही गोष्ट आपल्या पूर्वजांनीही ओळखिली होती. नाहीतर जे जे लोक पलटणीत राहिले त्या त्या लोकांनी आपल्या मुलींना जे शिक्षण दिले ते दिले नसते. खाण तशी माती, ही गोष्ट ध्यानात ठेवून, आपली पुढील पिढी जर तुम्हास सुधारावयाची असेल तर, तुम्ही मुलींना शिक्षण दिल्याशिवाय राहू नका. हा जो उपदेश मी तुम्हाला केला आहे तो तुम्ही वाऱ्यावर सोडणार नाही अशी मला आशा आहे. तो अंमलात आणण्यास दिरंगाई करता कामा नये. म्हणून तुम्ही सकाळी आपल्या घरी जाण्यापूर्वी, तुमच्या नेसण्याच्या पद्धतीत बदल करून मला दाखवा आणि मग जा. तरच मी सांगितल्याचे चीज झाले असे मी समजेन.

नंतर जमलेल्या स्त्रियांतर्फे श्रीमती विठाबाई हीने सांगितल्याप्रमाणे आम्ही वागू असे आश्वासन दिले.

डॉ. आंबेडकरांच्या भाषणाचा सभेस जमलेल्या स्त्रीवर्गावर तात्कालिक परिणाम झाल्याचे दिसून आले. सकाळी आपापल्या गावी परत जाण्यापूर्वी नखशिखांत, आपल्या पेहरावात बदल केल्याचे दिसून आले. या त्यांच्या निश्चयाबद्दल दरेकीस चोळीबांगडीकरिता आठ-आठ आण्याचे पैसे देण्यात आले. त्याचप्रमाणे पुरुषवर्गावरही परिणाम झाल्याचे दिसून आले. त्यांनीही हाताकानातील रानटीपणा दर्शविणाऱ्या दागदागिन्यांना फटक्यासरशी रजा दिली. इतकेच नव्हे तर, महाड म्युनिसीपालिटीच्या कचरापट्टीत झाडूवाल्याची नोकरी करणाऱ्या महारांनी आपल्या जागेचा राजीनामा दिला.



## २०

# बदललेल्या परिस्थितीची जाणीव ठेवा

ता. २७ डिसेंबर १९२७ रोजी महाड सत्याग्रह परिषदेत स्त्रियांना त्यांची जबाबदारी दाखवून दिल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी जातीचे पंच, म्हेत्रे वगैरे अधिकारी लोकांना एकत्रित करून सांगितले की,

आपल्याला मी आता जे काही बोलणार आहे त्याबद्दल राग येऊ देऊ नका. मी पंचाचे लेकरू आहे. माझे चुकत असल्यास माफी करावी. आपल्या वडिलांनी पंचाची व्यवस्था केली ती फार चांगली गोष्ट केली असे माझे मत आहे. हरेक समाजाच्या चाली रुढी ठरून गेलेल्या असतात. त्या चालीरुढीप्रमाणे सर्वांनी वागावयाचे असते. एखादा कोणी जातीच्या रिवाजाप्रमाणे वागला नाही तर, त्यास ताळ्यावर आणण्यासाठी बहिष्कारासारखी किंवा दंडासारखी शिक्षा जात करते. ही शिक्षा करण्याचा अधिकार जातीने तुम्हा म्हेत्रे लोकास दिला आहे. यावरून तुमची आपल्या समाजात केवढी मोठी योग्यता आहे हे तुम्हास दिसून येईल. तुम्ही समाजातील न्यायाधिकारी व धर्माधिकारी लोक आहा. तुम्ही जसा धर्म लोकांना घालून द्याल व जसा न्याय कराल त्याप्रमाणे समाजाला बरे-वाईट वळण लागणार आहे. परंतु तुमच्यावर सर्व लोकांचा असा आरोप आहे की, तुम्ही बेली तिकडे बोली, अशा धोरणाने वागता व खऱ्याचे खोटे करून, खोट्याचे खरे करता. तेणेकरून समाजामध्ये अधर्म वाढत चालला आहे व या सर्वांस तुम्ही कारणीभूत आहात. तेव्हा मला आपल्याला जे सांगावयाचे आहे ते हे की, तुम्ही आपले कर्तव्य ओळखा. काळ कोणता आला आहे हे ध्यानात घ्या व बदललेल्या परिस्थितीत आपल्याला काय केले पाहिजे याची जाणीव ठेवा. जुन्या चालीरिती टाकून देऊन, नव्या चालीरिती तुम्ही घालून द्यावयास पाहिजे आहेत. इतकेच नव्हे तर जेथे जेथे म्हणून या नव्या पद्धतीस लोक अनुकूल होणार नाहीत तेथे तेथे बहिष्काराची मात्रा लागू करून, त्यांना ताळ्यावर आणिले पाहिजे. हे जर तुम्ही करण्यास तयार असाल तर तुमची वंशपरंपरेची गादी आम्ही मान्य करू व तसे जर तुम्ही करणार नाही तर नवीन वळणाचे व नव्या धोरणाचे पंच नेमून, तुमचा अधिकार काढून घ्यावा लागेल.

---

बहिष्कृत भारत : ३ फेब्रुवारी १९२८.

बदललेल्या परिस्थितीत आपल्या जातीला कोणते नियम लागू करणे योग्य आहेत याचा विचार करण्याकरिता, मी सर्व म्हेत्रे लोकांची सभा बोलावणार आहे. त्या सभेत जे नियम सर्वानुमते पास होतील ते अंमलात आणण्याची दक्षता तुम्ही घ्याल अशी मला आशा आहे.

त्यानंतर रा. शिवतरकर यांनी सभेपुढे शेवटचा ठराव मांडला. त्या ठरावात सत्याग्रह कमिटीच्यावतीने मुंबई इलाख्यातील मराठी भाषा बोलणाऱ्या सर्व जिल्ह्यांतून महाडच्या सत्याग्रहाकरिता जे प्रतिनिधी आले होते त्यांचे आभार मानण्यात आले होते. महाडच्या परिषदेसंबंधाने ज्या काही अपूर्व गोष्टी सांगण्यासारख्या आहेत त्यापैकी सांगण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे महाडच्या चवदार तळ्याचा प्रश्न केवळ कुलाबा जिल्ह्यातील लोकांपुरता आहे असे न मानता तो सर्व अस्पृश्य वर्गाचा आहे असे मानण्यात आले ही होय. मराठी बोलणाऱ्या जिल्ह्यांपैकी असा एकही जिल्हा नव्हता की, ज्या जिल्ह्यातून महाडच्या सत्याग्रहाकरिता लोक आले नव्हते. अशी जुट व एकी हरेक वेळी अस्पृष्य लोकांनी दाखविली तर, अस्पृश्यता निवारण्याचे काम फारच सुलभ होणार आहे. वरीलप्रकारचे रा. शिवतरकर यांचे भाषण झाल्यानंतर व रा. संभाजी गायकवाड यांनी दुजोरा दिल्यानंतर ठराव टाळ्यांच्या गजरात पास झाला व रात्री दीड वाजता सभेचे काम संपले.



## २१

# स्पृश्यांनी अस्पृश्यांऐवजी स्पृश्यांचे प्रबोधन करणे श्रेयस्कर

निवृत्तिनाथाच्या यात्रेनिमित्त श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर येथे अस्पृश्य लोकांचा बराच मोठा समुदाय जमत असतो. त्याचा फायदा घेऊन लोकजागृती करण्याच्या हेतूने तेथेच एक सभा भरविण्याच्या इराद्याने जाहिराती काढण्यात आल्या होत्या. त्याप्रमाणे यात्रेच्या दिवशी म्हणजे बुधवार ता. १८ जानेवारी १९२८ रोजी सभा भरविण्यात आली होती. सभेचे अध्यक्षस्थान डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना देण्यात आले होते, सभेस स्त्रीपुरूषांचा अफाट समुदाय हजर होता. त्यात स्त्रियांचा भरणा तर विशेषच होता. सभेत मुख्यतः त्र्यंबकेश्वर येथे श्री. चोखोबाचे देवालय बांधावे की नाही, हा एकच जरी महत्त्वाचा प्रश्न होता तरी डॉ. आंबेडकरांनी आपल्या भाषणात अस्पृश्य वर्गाच्या सर्व प्रश्नांचे सांगोपांग विवेचन केले व श्री. चोखोबाचे देवालय बांधण्याऐवजी चोखोबाने आरंभिलेल्या अस्पृश्यतानिवारणाचे कार्य शेवटास नेण्यासाठी सतत उद्योग करणे हेच श्री. चोखोबारायाचे खरे स्मारक आहे असे सांगितले व ते जर तुम्हास करणे असेल तर बहिष्कृत भारत पत्रास धोका न येईल अशासाठी आपण उभारलेल्या बहिष्कृत भारताच्या फंडासाठी सर्वांनी मदत करावी असे सुचविले. त्यानंतर श्रीयुत भाऊराव गायकवाड, रा. भालेराव, पुंजाजी, नवसाजी जाधव वगैरे सद्‌गृहस्थांची भाषणे झाली. त्या सर्वांचा परिणाम इतका झाला की, प्रेस फंडाच्या मदतीसाठी जागच्याजागी २०३ रुपयांची मदत झाली. त्यातल्या त्यात सार्वजनिक कामाची ज्यांना कधी वासपूस नव्हती अशा गरीब बिचाऱ्या स्त्रियांनी व साधूंनीही अल्पस्वल्प देणग्या दिल्या. सभा साडेचार वाजता संपविलीच पाहिजे, कारण त्यानंतर सर्व लोक पालखीच्या मिरवणुकीस जाणार असे अगोदरच सुचविण्यात आले असल्यामुळे, सभेस मुद्दाम दोन वाजता सुरुवात करण्यात आली होती. सभा पाच वाजता संपली असती परंतु त्या सुमारास नाशिकचे दातार शास्त्री व स्वराज्य पत्राचे संपादक रा. मराठे हे आले व लोकांचेही पालखीच्या मिरवणुकीपेक्षा सभेकडेच विशेष लक्ष आहे असे दिसून आल्यामुळे सभा बंद करण्याच्याऐवजी ती चालू ठेवावी असे ठरले व नंतर दातार शास्त्री व मराठे यांची अस्पृश्यांच्या चळवळीसंबंधी सहानुभूती दर्शविणारी भाषणेही झाली.

---

बहिष्कृत भारत : ३ फेब्रुवारी १९२८.

भाषणे चालू असतानाच रा. थोरात, वडेकर, जळगावचे चौधरी वगैरे गृहस्थ आले व त्यांचीही भाषणे झाली. त्यात रा. थोरात यांनी स्पष्ट सांगितले की, अस्पृश्यांना तुम्ही आपल्या पायावर उभे राहा असे सांगणे हा मूर्खपणा आहे. त्यांची अस्पृश्यता घालविण्याचा प्रयत्न आम्ही स्पृश्य लोकांनी केला पाहिजे. त्यानंतर रा. भाऊराव गायकवाड यांनी भाषण करून स्पृश्य लोकांनी अस्पृश्यांविरूध्द जे जे मुद्दे मांडले होते त्याचे खंडन केले. त्यानंतर डॉ. आंबेडकर यांनी समारोपादाखल असे सांगितले की,

तुम्ही जर आमच्या लोकांची सहानुभूती बाळगता, तर तुम्ही आमच्या लोकांच्या सभेत येऊन भाषणे करण्याऐवजी स्पृश्य लोकांची सभा भरवून त्यांच्यात आमच्याविषयी सहानुभूती उत्पन्न करण्याचा प्रयत्न कराल तर अधिक बरे होईल. मराठे लोकांनाही त्यांनी सांगितले की, तुम्ही शहरात सभा भरविण्याऐवजी खेडेगावात भरविली पाहिजे. कारण तेथील मराठे लोकांची स्थिती जी आपण कुलाबा जिल्ह्यात पाहिली त्यावरून ती अगदी टोणग्यासारखी आहे. त्यांना शहाणे करण्याचा प्रयत्न तुम्ही केला पाहिजे. अशाप्रकारचे भाषण झाल्यानंतर सभेचा कार्यक्रम संपविण्यात आला व सभा मोठ्या आनंदाने पार पडली. असे असताना ' स्वराज्य ' पत्राच्या संपादकांनी डॉ. आंबेडकरांच्या भाषणाचा विपरीत अर्थ करून, त्यावर जी टीका केली आहे ती वाचून सभेस हजर असलेल्या कोणाही माणसास ' स्वराज्याचा ' संपादक हा एक नीच वृत्तीचा माणूस आहे याची खात्री झाल्याशिवाय राहणार नाही. तेव्हा त्याविषयी जास्त लिहिण्याचे कारण नाही.



## २२

# अस्पृश्यतेचा उगम जाती भेदातूनच

मंगळवार दिनांक २५ सप्टेंबर १९२८ रोजी रात्रौ ८ वाजता मुंबईतील दादर गणेशोत्सवात डॉ. बाबासाहेब आंबेडकर व पुण्याचे श्री. बापूसाहेब माटे यांची व्याख्याने एकाच वेळी ठरविण्यात आली होती. परंतु श्री. माटे यांनी आपला घसा बसल्याचे निमित्त सांगून ते या व्याख्यानाला आले नाहीत. ते येणार नसल्याचे ऐकून स्पृश्यवर्गीय विशेषतः सनातनी मंडळीची निराशा झाली होती. तसेच या जाहीर सभेतील व्याख्यानाच्या वेळी डॉ. बाबासाहेबांना शह देण्याचे, सभेत दंगल किंवा पेचप्रसंग उत्पन्न करण्याचे सारे बेत जवळजवळ ढासळले होते. तरीपण या व्याख्यानात डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्पृश्य वर्गीयांबद्दल काही गैर बोलले तर त्यांचा योग्य तो समाचार घेण्याचाही बेत या मंडळीनी रचला होता. ही सारी हकिकत गुरुवर्य केळुस्कर यांना कळताच ते या सभेत मुद्दाम हजर राहिले होते.

परंतु डॉ. आंबेडकर साहेबांचे भाषणच इतके मुद्देसूद व परिणामकारक झाले की, सभेत दंगल माजविण्याच्या उद्देशाने जमलेली ही सारी मंडळी शांततेने डॉ. बाबासाहेबांच्या विद्वत्तेचे गोडवे गात आपापल्या घरी निघून गेली.

डॉ. बाबासाहेबांनी ही सभा जिंकली होती. ते आपल्या भाषणात म्हणाले,

" अस्पृश्यता निवारणाची अस्पृश्यांनी चालविलेली चळवळ व तिच्यावर ब्राह्मणादी स्पृश्य जातीकडून घेण्यात येणाऱ्या आक्षेपांचा विचार " या विषयावर मी आज आपल्यासमोर बोलण्याचे ठरविले आहे. विषयाचे नाव सुटसुटीत नसून लांबलचक आहे ; पण वेळ थोडा असल्यामुळे त्याची चर्चा आपल्याला कंटाळा येईपर्यंत लांबली जाऊ नये अशी माझीही इच्छा आहे.

आमच्या चळवळीवर मुख्यतः तीन आक्षेप घेण्यात येतात. पहिला आक्षेप असा की, आम्ही स्पृश्य वर्गाशी सहकार्य न करता स्वतंत्र चळवळी करतो. दुसरा आक्षेप आमचे धोरण चढाईचे असते. तिसरा आक्षेप आम्ही जातिभेद व अस्पृश्यता या दोन वेगवेगळया व स्वतंत्र प्रश्नांना अभिन्न लेखून त्यांची निष्कारण खिचडी करतो व ह्यामुळे अस्पृश्यता निवारणाचा दिवस दूर ढकलण्यास कारणीभूत होतो.

पैकी पहिल्या आक्षेपाविषयी मला सांगावयाचे ते हेच की, सहकार्य न करणे याचा अर्थ स्वतंत्रपणे व स्वावलंबनाच्या तत्त्वावर चळवळ चालविणे असा जर

---

समता : ५ ऑक्टोबर १९२८.

असेल तर हा आक्षेप अगदी यथार्थ आहे, पण याचा अर्थ आम्ही कोणत्याच स्पृश्य माणसाबरोबर सहकार्य करीत नाही अगर कोणाचेच सहाय्य घेऊ इच्छित नाही, असा जर होत असेल तर हा आक्षेप खरा नाही. जो ' आमचा माणूस ' आहे असे आम्हाला खात्रीपूर्वक वाटते तो जातीने ब्राह्मण असो की अब्राह्मण असो त्याच्याशी आम्ही सहकार्य करण्यास सदैव तयार असतो. ह्या संघाचा अध्यक्ष होण्याचा बहुमान मला लाभला आहे व जातिभेद मोडून अस्पृश्यतेचे हिंदू समाजातून समूळ उच्चाटन करण्यासाठी आपल्या अल्प शक्तिनुसार जो संघ झटत आहे त्या आमच्या समाज समता संघात ब्राह्मण, ब्राह्मणेतर, अस्पृश्य वगैरे कोणालाच येण्याची मनाई नसून त्यात या सर्व जातीचे लोक आहेत. आपल्या चळवळीची सूत्रे अस्पृश्यांनी आता आपल्या हाती घेतली या घटनेतही विलक्षण असे काही नाही. एखादा समाज अगर वर्ग जेव्हा अगदी खालावलेल्या स्थितीत असतो तेव्हा त्याला सहाय्यतेचा हात देऊन वर घेण्यासाठी पुढारलेल्या जातीतील, काही माणसेच आधी पुढाकार घेत असतात. आपल्या इंडीयन नॅशनल काँग्रेसची स्थापना करण्यात काही इंग्लिश गृहस्थांनी पुढाकार घेतला होता. इंग्लंडातील मजूर पक्ष निर्माण करण्यास उदारमतवादी लिबरल पक्षाच्या लोकांचे प्रयत्नच आधी सहाय्यभूत झाले. पण आरंभी सहाय्य करणाऱ्या पुढारलेल्या वर्गातील लोकांची सहाय्यता मागासलेल्या लोकांना काही विशिष्ट व ठराविक मर्यादेपर्यंतच मिळू शकते. ह्या मर्यादेपलीकडे मागासलेल्या लोकांबरोबर ते येऊ शकत नाही. इतकेच नव्हे तर आधीचे हे कैवारी पुढे पुढे त्यांचे प्रतिस्पर्धी, विरोधक व शत्रू बनतात. एके काळी सहाय्यक व आश्रयदाता असलेला लिबरल पक्ष, लेबर-मजूर, पक्षाचा याचमुळे आज प्रच्छन्न शत्रू व प्रतिस्पर्धी बनल्याचे दृश्य आपण पहात आहो. पण यामुळे मजूर पक्ष कृतघ्न आहे अगर त्याने स्वतंत्र चळवळ करू नये, असे कोणीही विचारी मनुष्य म्हणणार नाही.

अस्पृश्यता निवारण चळवळीचाही असाच इतिहास आहे. ब्राह्मणादी पांढरपेशा वर्गातील काही सुधारक व उदारमतवादी लोकांनी अस्पृश्यांना आधी सहाय्यतेचा हात दिला. कै. आगरकर, रानडे वगैरे लोक, अस्पृश्यांना शिवण्यास हरकत नाही असे म्हणत व त्यांच्या सभेला वगैरे हजर राहून त्यांना सुधारणेच्या सहानुभूतीपर दोन गोष्टीही सांगत आणि यामुळे त्यांना आपल्या जातीची निंदाही सोसावी लागे पण या सुधारकांचा ज्या जातीत जन्म झाला त्याच जातीत त्यांना अनेक सुधारणा घडवून आणावयाच्या होत्या. ज्यांना मागासलेल्या लोकात गावठी मराठी भाषेत 'पाट' असे म्हणतात ते पाट अगर पुनर्विवाह ब्राह्मण स्त्रियांचे करावे अगर करू नयेत, विधवांचे केशवपन करणे शास्त्रसंमत आहे किंवा ते धर्मशास्त्राविरूद्ध आहे, पुरूषांनी केस राखावे की राखू नयेत, स्त्रियांना शिक्षण

द्यावे अगर देऊ नये, याच पांढरपेशा प्रश्नांची चर्चा करण्यात या पुढारलेल्या वर्गातील सुधारकांचा वेळ गेला. अस्पृश्यादी मागासलेल्या लोकांच्या हिताहिताशी या चर्चेचा काहीच संबंध पोहचत नव्हता. ब्राह्मण स्त्रियांचे पुनर्विवाह रूढ झाले काय अगर विधवांचे केशवपन होण्याची रूढी थांबली काय, अस्पृश्यतेच्या रूढीवर यामुळे काहीच आघात होण्यासारखा नव्हता.

ही रानडे, आगरकर वगैरे महाराष्ट्रीय ब्राह्मण सुधारकांच्या अमदानीतील अस्पृश्यता निवारक प्रयत्नांची दिशा व मर्यादा झाली. सध्या हिंदूसभावाल्यांच्या प्रयत्नांची महाराष्ट्रात धामधूम चाललेली आहे. रानडे, आगरकरांच्या ठायी सुधारणेबद्दल जी एक प्रकारची तळमळ होती तीही महाराष्ट्रातील हिंदूशुद्धि-संघटनवाद्यांच्या ठायी दिसत नाही. आत्मशुद्धिपेक्षा परधर्मीयांच्या शुद्धिकडे व संघटनेपेक्षा संख्येकडेच त्यांचा विशेष ओढा आहे. जर खरे सामर्थ्य संख्येत असते तर आजही हिंदूच बहुसंख्यांक आहेत पण त्यांच्यात संघटना नसल्यामुळे त्यांची संख्या अधिक असूनही तिचा काही उपयोग होत नाही, ही गोष्ट त्यांना दिसते पण तिच्याकडे ते मुद्दाम दुर्लक्ष करतात. यांपैकी बहुतेक पुढारी वारा येईल तशी पाठ फिरविणारे आहेत. यांच्यावर विसंबून अस्पृश्यतेच्या जाचातून आपली सुटका होणार नाही असे अस्पृश्यांस वाटले तर त्यात त्यांचा काय दोष ?

एका मानव जातीला स्वकीयांच्या गुलामगिरीतून सोडविण्याकरता दुसरी मानव जात मनोभावाने झटल्याचे फक्त एकच एक उज्ज्वल उदाहरण जगाच्या इतिहासात सापडणारे आहे व ते निग्रो लोकांची गुलामगिरीतून सुटका करणाऱ्या अमेरिकेतील गोऱ्या लोकांचे होय. भाऊ भावाशी, मुलगा बापाशी, मित्र मित्राशी त्या प्रसंगी लढले. जातिभेदावर कुऱ्हाड घालून अस्पृश्यतेचे पाप मुळातच मारून टाकणारा जर एकादा धर्मवीर आपल्या देशात अवतरला असेल तर तो एकटा गौतम बुद्धच होय. पण वरच्यासारखी उदाहरणे व अशा घटना वारंवार घडत नसतात म्हणून असे काही घडेल अशा वेड्या आशेवर आम्हीही विसंबून राहू इच्छित नाही.

आमचे धोरण चढाईचे आहे ; आम्ही विनम्र भावाने व अधोवदनाने जे काही मागावयाचे ते मागत नाही. त्यामुळे अस्पृश्यता निवारणाला अनुकूल असलेले लोकसुद्धा प्रतिकूल बनतात असा एक दुसरा आक्षेप आमच्याविरुद्ध आहे. पण असा आक्षेप घेणाऱ्यांना जनाची नसली तरी निदान मनाची तरी लाज वाटावयाला पाहिजे असे मला वाटते. अस्पृश्याइतका नम्र व लाचार समाज अलम दुनियेत दुसरा कोणता आहे ? आज शतकानुशतके आम्ही नम्र राहिलो नाही काय ?

पाषाणालाही पाझर फोडणाऱ्या दीनावस्थेत व नम्रतेत आम्ही दिवस काढले ना ? आता तरी कृपा करून नम्रतेचे व विनयाचे पाठ आम्हाला देऊ नका. ते आता उच्च वर्णीयांनाच शिकवा. विनंत्या, अर्ज, शिष्टमंडळे यांच्या साहाय्याने गमाविलेली स्वातंत्र्ये व दडपलेले हक्क मिळणे शक्य असते तर नेमस्त पक्षाचे लोक आतापर्यंत हिंदुस्थानचे राजे बनले असते व हिंदुंची धर्मसत्ता अस्पृश्यांच्या घरी पाणी भरू लागली असती ! उद्दामपणाची आम्हाला सवय आहे अगर चढेलपणाचे चाळे करण्याची आम्हाला हौस आहे असे थोडेच आहे ! दिवसभर काबाडकष्ट करून पोटासाठी दोन घास कसे मिळविता येतील ही विवंचना आमची रोजची सोबतीण ; पण भाकरीपेक्षा माणुसकी श्रेष्ठ म्हणून आम्ही या यातायातीत पडलो. कारण ठोठावल्याशिवाय दरवाजे उघडत नाहीत आणि हिसकावून घेतल्याशिवाय माणुसकीचे आमचे साधे हक्कही तुमच्या हातून सुटत नाहीत.

तिसऱ्या आक्षेपाला उत्तर देताना प्रारंभी मी आपल्याला एवढे सांगू इच्छितो की, आमची अस्पृश्यता निवारणाची चळवळ फक्त अस्पृश्य वर्गापुरतीच नाही. तर सगळ्या हिंदू समाजातील या जन्मजात अस्पृश्यतेचा नाश करणे हा आमच्या चळवळीचा मुख्य हेतू आहे. तो साध्य होणे सोपी गोष्ट नाही. याची आम्हाला अगदी पुरेपूर जाणीव आहे. पण हिंदू समाजातील या रोगाचा नायनाट करण्याची जर कोणाला खरी तळमळ लागून राहणे शक्य असेल तर ती आम्हा अस्पृश्यांनाच होय. ब्राह्मणव्यतिरिक्त इतर सर्व जातींना या सामाजिक व धार्मिक अस्पृश्यतेची झळ थोड्याफार प्रमाणात लागलेली आहे व लागत आहे. खुद्द ब्राह्मणाब्राह्मणातच जातिविशिष्ट अस्पृश्यतेचा व उच्चनीचपणाचा भाव आहे. पळशीकर ब्राह्मणाचा चित्पावन ब्राह्मणाला पूजेच्या वेळी विटाळ होतो. कायस्थ स्त्रीच्या स्पर्शाने आपले वस्त्र अस्पर्श होऊ नये म्हणून ब्राह्मण स्त्री कुंकवाचा करंडा खाली ठेवते. अशी स्पृश्य जातीतच परस्परविषयक अस्पृश्यता वसत आहे. अस्पृश्य जातीत ती पूर्णत्वाला पोहचली आहे हाच काय तो फरक. म्हणून आमचे भेटीबंद तुटून आम्ही जरी ' शूद्र ' वर्णात आलो व मुसलमानादी परधर्मीयाइतके जरी स्पृश्य बनलो तरी, अस्पृश्यतेची भावना समूळ मरत नाही. ती मारावयाची असेल तर सर्रास रोटी-बेटी व्यवहार सुरू झाला पाहिजे. त्याशिवाय अस्पृश्यतेचा रोग नष्ट व्हावयाचा नाही आणि तो तर समूळ नष्ट झालाच पाहिजे. तेवढ्यासाठीच आम्ही झटत आहो. नुसते स्पर्शपावनच व्हावयाचे असते तर परधर्मात जाऊनही अस्पृश्यांना तसे सहजासहजी व सन्मानपूर्वक यापूर्वीच होता आले असते. इतक्या यातायातीची व खेचाखेचीची मग जरूरच नव्हती . . . .

• • •

# २३

## याच जन्मी सर्वांगीण उन्नती करायला हवी

वालपाखाडी येथे तारीख २ फेब्रुवारी १९२९ रोजी रात्रौ डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अध्यक्षतेखाली मराठी, गुजराती ' अस्पृश्यांची ' जंगी सभा भरली होती. ' बहिष्कृत भारत ' व ' समता ' या पत्रांचा प्रसार करून अस्पृश्य समाजात जागृती करणे, ता. ९-१० मार्च रोजी भरणाऱ्या मुंबई इलाखा महार वतनदार परिषदेस मदत देणे वगैरे ठराव सभेत पास करण्यात आले. अस्पृश्योद्धारक डॉ. आंबेडकर यांनी आपल्या भाषणात सांगितले,

अस्पृश्यं समाजाने आहे त्या स्थितीतच राहण्याची वृत्ती सोडली पाहिजे व इतर समाज जशी विद्या, अधिकार, संपत्ती मिळविण्याकरिता खटपट व प्रयत्न करितात त्याचप्रमाणे अस्पृश्य समाजानेही केले पाहिजेत. पुढल्या जन्मी आपले कल्याण होईल अशा पोकळ वार्तांवर विश्वास न ठेविता याच जन्मी व याच काळी आपली सर्वांगीण उन्नती करून घेऊन मानवी समाजात समानतेचा दर्जा प्रस्थापित करून घ्यावा व हिंदू समाजाला अस्पृश्यतेच्या पापातून मुक्त करावे. सभेत प्रधान बंधू, कद्रेकर, गणपत बुवा जाधव, खोलवडीकर, गंगावणे वगैरे मंडळी हजर होती.

• • •

---

समता : ८ फेब्रुवारी १९२९.

## २४

# आपले हक्क प्रस्थापित करण्याकरिता चढाईचे धोरण स्वीकारल्याशिवाय गत्यंतर नाही

तारीख २३ मार्च १९२९ रोजी मु. बेळगाव येथे दिवसा ४ वाजता बेळगाव जिल्हा बहिष्कृत वर्गाची सामाजिक परिषद भरली होती ! तिचे नियोजित अध्यक्ष अस्पृश्य वर्गाचे सुप्रसिद्ध पुढारी श्री. सीताराम नामदेव शिवतरकर हे श्री. कोंडदेव श्रीराम खोलवडीकर यांच्यासह ता. २२-३-१९२९ रोजी सव्वादहाच्या मेलने बेळगावास उतरले. या प्रसंगी परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. डी. आर. इंगळे हें अस्पृश्य लोकांसमवेत सामोरे आले. अध्यक्षांचा सत्कार करून त्यांच्या गळयात पुष्पहार घालून जयजयकार करण्यात आला. नंतर उत्तम शृंगारलेल्या गाडीतून श्री. खोलवडीकरासह अध्यक्षांची मिरवणूक, कलभाट रस्ता, लष्कर, हजाम गल्ली, कंगराळ गल्ली, दरबार गल्ली आणि चबाट गल्लीतून कर्नाटक बहिष्कृत विद्यार्थी आश्रम बेळगावपर्यंत आणण्यात आली. या प्रसंगी अस्पृश्य वर्गातील हुनर्गे येथील बँडवाले यांनी आपल्या बँडवादनाने लोकांना तल्लीन केले व मिरवणूक ११ वाजता अस्पृश्यांचे बोर्डींग हौस येथे आली. नंतर संध्याकाळी सहा वाजता श्री. डी. आर. कांबळे यांच्या घरी अध्यक्ष वगैरे मंडळीस चहा पार्टी देण्यात आली.

ता. २३ मार्च १९२९ रोजी शनिवारी परिषदेच्या कामास बेळगाव येथील विद्यार्थी आश्रमाच्या आंबराईत दुपारी चार वाजता सुरवात झाली.

प्रथमारंभीच विषय नियामक कमेटी बसून ठरावाचा मसूदा तयार करण्यात आला होता. या प्रसंगी अस्पृश्य वर्गाच्या सुधारणेकरिता नेमलेल्या स्टार्ट कमेटीचे सभासद डॉ. बाबासाहेब आंबेडकर, डॉ. सोलंकी, मेसर्स जानवेकर, देशपांडे, रावसाहेब चिकोडी, रावसाहेब थोरात तसेच रा. मराठे, रा गजेंद्रगडकर, नागगौडा इत्यादि बेळगावातील स्पृश्य पुढारी याजप्रमाणे रा. कोंडदेव खोलवडीकर, दत्तोपंत पवार, डॉ. रमाकांत कांबळे, रा. यशवंतराव पोळ आणि रामाप्पा कांबळे, धर्मान्ना सांब्राणी इत्यादी अस्पृश्यांचे पुढारी हजर होते.

(२) आरंभी ईशस्तवन व अध्यक्षांच्या स्वागतपर गायन झाले. या प्रसंगी स्वागताध्यक्ष यांचे अगदी मननीय, प्रतिपक्षास चीत करणारे असे सडेतोड भाषण

---

बहिष्कृत भारत : २९ मार्च आणि १२ एप्रिल १९२९.

झाले. त्या भाषणाचा लोकांच्या मनावर फार परिणाम झाला व त्यापासून स्पृश्यांनाही बोध घेण्यासारखा होता व त्यांच्यावरही चांगला परिणाम झाला असे वाटते. अध्यक्षांचे भाषण संपताच स्टार्ट कमेटीचे सर्व सभासद यांसह डॉ. आंबेडकर, सोळंकी, अय्यर आणि अध्यक्ष यांना चहा पार्टी देण्यात आली व पुढे सोबत जोडलेले ठराव पास करण्यात आले. त्यानंतर अस्पृश्यांचे उद्धारक व पुढारी मे. डॉ. आंबेडकर साहेब, अध्यक्षांच्या विनंतीवरून आणि लोकाग्रहावरून बोलावयास उभे राहिले. त्यावेळी टाळयांचा प्रचंड कडकडाट झाला व त्यानंतर त्यांच्या भाषणास सुरवात झाली. ते म्हणाले,

अध्यक्ष साहेब आणि सभ्यगृहस्थहो,

आता वेळही बराच झालेला आहे. पाऊस पडण्याच्या बेतात आहे व तशात आपल्या मातृभाषेपेक्षा माझी मातृभाषा निराळी आहे. भाषाभिन्नत्त्वामुळे माझे विचारही आपणास समजतील किंवा नाही, याबद्दल शंका वाटते. तरी मी माझे भाषण अगदी थोडक्यात आटोपणार आहे.

आपण ठिकठिकाणी सभा भरवतो, भाषणे करतो, ठराव पास करतो. मोठमोठ्या वक्त्यांना आणून त्यांची भाषणेही करवितो ; तथापि, माझ्या मते अस्पृश्यता नष्ट करण्याचा हा काही मार्ग नव्हे. आपल्यावर अन्याय, जुलूम, त्रास होतो या संबंधाने ठराव पास करून सरकारकडे पाठविले आणि हेही समजा की सरकारने आपली अस्पृश्यता नष्ट करण्यासाठी आपणास सार्वजनिक विहीरी, तलाव, चहाची हॉटेले आणि देवालये जरी कायद्याने मोकळी केली तरी त्याची अम्मलबजावणी करण्याचे काम आपणाला केल्याशिवाय गत्यंतर नाही व तशाप्रकारे आपण अंमलबजावणी करण्यास असमर्थ असू तर कितीही चांगले कायदे केले तरी त्यांचा उपयोग होणार नाही.

आपली अस्पृश्यता आपणच घालविली पाहिजे ! व त्यादृष्टीने आपण सबळ व निर्भय होण्यानेच आपली अस्पृश्यता जाणार आहे. या बाबतीत आपणास बरेच कष्ट करावे लागतील व प्रसंगोचित आपणास स्पृश्यांशी दोन हात करण्याचा प्रसंग येणार आहे व त्यासाठी आपण हिम्मत बाळगली पाहिजे. आपला समाज परावलंबी आहे व हे चुकीचे आहे असे मी म्हणत नाही. अस्पृश्य समाज स्पृश्य समाजाशी सहकार्याने वागल्याशिवाय त्याचा तरणोपाय नाही ! अशा प्रबळ समाजाशी असहकारिता पुकारून आपला कार्यभाग कसा साधणार असे पुष्कळ लोकांना वाटते. परंतु बहिष्कृत समाजातील लोकानी हे पक्के लक्षात ठेवावे की, आपला स्वावलंबनाच्या अबाधित मार्गाशिवाय अन्य मार्ग निकामी व घातकी असल्यामुळे ते प्रयत्न सर्वस्वी त्याज्य होत.

अस्पृश्य समाजात कसलाहि मनुष्य असो, तो मनुष्य कितीही सर्वगुणसंपन्न असो ! कितीही विद्वान असो ! तथापि, तो एका विशिष्ट समाजात जन्मला एवढ्याच कारणास्तव त्याच्या गुणाचे चीज होत नाही. करिता आपण आपले हक्क प्रस्थापित करण्याकरिता चढाईचे धोरण स्वीकारले पाहिजे ! हे धोरण स्वीकारल्याशिवाय या धक्काबुक्कीच्या मामल्यात आपणास गत्यंतर नाही.

आपल्यावरील अन्याय दूर करण्याचा अत्यंत महत्त्वाचा दुसरा उपाय म्हणजे सरकारी सत्ता प्राप्त करून घेणे होय ! आपल्याला चातुर्वर्ण्याच्या चौकटीबाहेर असावे लागते तरी ही चातुर्वर्ण्याची चौकट मोडून आत जावयाचे असेल तर आपणास राजकीय सत्ता हवी. राजकीय सत्ता हातात असल्याशिवाय समाजात आपणास वर्चस्व प्राप्त होणार नाही. हल्ली महाराष्ट्रातील ब्राह्मणांचेच एवढे वर्चस्व का आहे ? याचे कारण दुसरे काहीही असले तरी त्यांच्या हातात राजकीय सत्ता प्रबळ आहे हे विसरुन चालणार नाही.

हल्ली महाराष्ट्रातील ब्राह्मणांचे इतके वर्चस्व का ? याबद्दल इतिहास प्रसिद्ध एक गोष्ट सांगतो. पेशवाईपूर्वी माझ्या प्रांतात राहणारा बाळाजी विश्वनाथ आणि त्याचे जातभाई चित्पावन ब्राह्मण अत्यंत निकृष्टावस्थेत होते. परंतु त्यांच्या हातात राजकीय सत्ता आल्याबरोबर त्या समाजाने महाराष्ट्रात प्रमुख स्थान पटकावले आहे. परंतु आज ब्राह्मण समाजाची सरकारी नोकरीतून कायमची हकालपट्टी केली तर ब्राह्मणांचे यत्किंचीतही वर्चस्व राहणार नाही. इतर प्रांतात ब्राह्मणांचे कोणत्याही प्रकारचे महत्त्व नाही. गुजरातमध्ये ब्राह्मणांना पाणकी आणि स्वयंपाकी याशिवाय महत्त्व नाही. संयुक्त व पंजाब प्रांतातील ब्राह्मण हे महार, मांगाप्रमाणे ओले अन्न मागून खातात. एकंदरीत आपले हक्क प्रस्थापित करण्याबद्दलचे आपले चढाईचे धोरण व राजकीय सत्ता प्राप्त करून या दोन साधनांनीच आपली अस्पृश्यता आपणास घालवून टाकता येईल व इतर समाजाशी बरोबरीचा दर्जा आपणास प्राप्त करून घेता येईल. एवढे सांगून, आपण माझे भाषण शांतपणे ऐकिले याबद्दल आपले मी आभार मानून माझे भाषण पुरे करितो.

परिषदेत पास झालेले ठराव यावर मेसर्स माने, वराळे, आसोदे, इंगळे, कोंडदेव, श्रीराम खोलवडीकर, कोल्हापूरचे पोळ (ढोर) व धारवाडचे सांब्राणी (ढोर) या प्रसिद्ध पुढारी लोकांची भाषणे झाली. नंतर हारतुरे होऊन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जयजयकारात सभेचे काम संपले.

# बेळगाव जिल्हा बहिष्कृत वर्गाची सामाजिक परिषद अधिवेशन १ ले यात पास झालेले ठराव

## ठराव १ ला

(अ) अस्पृश्यता मानणे हा कायद्याने गुन्हा समजला जावा.

(ब) सरकारी लिस्टातून जातीची सदरे अजीबात गाळून टाकावीत.

## ठराव २ रा

(अ) जन्मावरून कोणासही श्रेष्ठ किंवा कनिष्ठ न समजणे. वेद, शास्त्र, पुराण . व इतर धर्मग्रंथ यात जन्मावरून उच्चनीचत्वाचे प्रतिपादन केले असल्यामुळे या धर्मग्रंथांचा अधिकार न मानणे.

(ब) वर्णाश्रम धर्माने हिंदू समाजात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र असे भेद पाडिले आहेत, म्हणून वर्णाश्रम धर्माच्या घातुक तत्त्वाचा ही परिषद तीव्र निषेध करिते व आपली जात किंवा समाज दर्शविणारे शब्द आपल्या नावामागे व पुढे जोडू नयेत.

(क) राष्ट्राच्या प्रगतीकरिता व समता प्रस्थापित करण्याकरिता अस्पृश्यतेची रूढी ताबडतोब नाहीशी करणे अत्यंत जरूर आहे; म्हणून समाजाच्या अगर कायद्याच्यादृष्टीने कोणतीही जात उच्च अगर नीच समजली जावू नये. तसेच प्रत्येक सार्वजनिक ठिकाणी जाण्याचा समान हक्क असून, तो हक्क प्रत्येकाने बजाविला पाहिजे.

## ठराव ३ रा

सरकारच्या धार्मिक बाबतीतील वृत्तीमुळे असंख्य अशा बहुजन समाजास अपमान सहन करावा लागत आहे. त्यांच्या सामाजिक हक्काचा अपहार झालेला आहे आणि त्यांची प्रगती खुंटलेली आहे. म्हणून यापुढे सरकारने धार्मिक बाबतीतील तटस्थपणाचे धोरण सोडून द्यावे आणि बहुजन समाजाचे सामाजिक स्वातंत्र्य रक्षण करण्याचे प्रयत्न करावे, तसेच या बाबतीत समाजसुधारकांच्या वतीने प्रचलित कायद्यात फरक करावा.

## ठराव ४ था

(अ) सरकारने सर्व दरखास्त जमीनी इतःपर ज्या समाजातील लोकांची सांपत्तिक स्थिती फारच हलाखीची असते अशा लोकांना द्याव्या आणि अशा जमीनी देताना त्या प्रथम अस्पृश्य लोकांना देण्यात याव्या. या परिषदेचे आणखी असे

मत आहे की, सरकारने त्यांना उदारपणे जादा रकमा ग्रँट म्हणून देऊन अशा जमीनीची डागडूजी करून मशागत करण्यास उत्तेजन द्यावे आणि सरकारी नोकऱ्यात अस्पृश्यवर्गीय उमेदवारांचा भरणा करणेची सरकारने उदारपणाने तरतूद करावी.

(ब) अस्पृश्य वर्गातील साक्षरतेचे प्रमाण इतर समाजातील साक्षरतेचे प्रमाणाबरोबर येईपर्यंत अस्पृश्य वर्गातील विद्यार्थ्यांकरिता दरेक जिल्ह्यात १०० मुलांचे बोर्डींग काढावे.

## ठराव ५ वा

रा. सा. पापण्णा यांचा मुलगा नारायण यांच्या मृत्यूबद्दल ही सभा दुःख प्रदर्शित करते. ईश्वर मृताच्या आत्म्यास शांती देवो अशी सभेची ईश्वरास प्रार्थना आहे.

## ठराव ६ वा

चांभारांच्या धंद्याची स्थिती अत्यंत हलाखीची झाली असल्यामुळे त्यांचे धंदे-शिक्षणाचे वर्ग काढावे व त्या समाजातील लोकांनी सहकारितेच्या तत्त्वावर चालविलेल्या संस्थांना, सरकारांनी सढळ हाताने मदत करावी आणि त्यांच्यातील लायक विद्यार्थ्यांस सरकारी खर्चाने त्यांच्या धंद्याचे शिक्षण घेण्याकरिता परदेशी पाठवावे असे या परिषदेचे मत आहे.

## ठराव ७ वा

(अ) मुलाचे वय वीस वर्षांचे असल्याशिवाय व मुलीचे वय १६ असल्याशिवाय त्यांची लग्ने करू नयेत.

(ब) कोणत्याही जातीतील, वर्गातील व समाजातील स्त्री पुरुषास मिश्र विवाह करण्याची पूर्ण मोकळीक असावी.

(क) लग्न किंवा इतर उत्सव यात अस्पृश्य वर्गांनी शक्य तितका पैसा व वेळ कमी खर्च करावा तसेच सर्व लग्नविधीत एक जेवणापलीकडे अधिक पैसा खर्च करू नये आणि उरलेल्या पैशाचा विनियोग आपल्या मुलामुलींच्या शिक्षणाकडे करावा.

## ठराव ८ वा

ज्या हॉटेलमध्ये व खाणावळीत अस्पृश्य वर्गास मज्जाव करण्यात येतो अशी हॉटेले व खाणावळी सुरू करण्यास सरकारने परवानगी देऊ नये, तसेच रेल्वेच्या ताब्यात असलेली हॉटेले व खाणावळी यामध्ये अस्पृश्य वर्गांना समतेने वागविण्याचा रेल्वे अधिकाऱ्यांनी प्रयत्न करावा.

• • •

## २५

# गुलामगिरीच्या पद्धती नष्ट करुन गलिच्छ चालीरितींना मूठमाती द्या

भारतीय बहिष्कृत समाज सेवक संघाच्या विद्यमाने रत्नागिरी जिल्ह्यातील खेड व चिपळूण या तालुक्यातर्फे रत्नागिरी जिल्हा बहिष्कृत परिषदेचे दुसरे अधिवेशन चिपळूण येथे शनिवार ता. १३ एप्रिल १९२९ रोजी संध्याकाळी ४-३० वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. अधिवेशनासाठी उभारलेला प्रचंड मंडप लतापताकांनी शृंगारला होता. तेथली सर्व प्रकारची व्यवस्था इतकी टापटीपपणाची होती की, स्पृश्य म्हणविणारांनाही नवल वाटल्याशिवाय राहिले नाही. ह्या परिषदेकरिता मुद्दाम मुंबईहून देवराव नाईक, संपादक 'समता', श्री. एस. एन. शिवतरकर, द. वि. प्रधान, शं. शा. गुप्ते, भा. र. कद्रेकर वगैरे मंडळी डॉ. आंबेडकर यांच्याबरोबर आली होती. कऱ्हाडवरून सर्व मंडळी चिपळूण येथे येत असता वाटेत अडरे गावी अस्पृश्य मंडळीकडून पानसुपारीचा लहानसा समारंभ झाला. चिपळूण येथे अध्यक्ष व मुंबईकर पाहुणेमंडळी यांची सोय सरकारी डाकबंगल्यात करण्यात आली होती. शनिवारी अधिवेशनाला सुरुवात होण्यापूर्वी मंडपात जवळ जवळ ८,००० मंडळी जमली होती. शहरातील इतर समाजातील मंडळीही बरीच आली होती. त्यात खानसाहेब देसाई, श्री. साठे, श्री. विनायकराव बर्वे वकील, स्थानिक म्युनिसीपालिटीचे अध्यक्ष श्री. खातू, श्री. राजाध्यक्ष, श्याम कवि, ॐ स्वामी, पितापुत्र बेंडके प्रभूती प्रामुख्याने दिसत होती. अध्यक्षांची रीतसर निवडणूक होताच परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. रगजी यांचे भाषण झाल्यावर अधिवेशनाचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे भाषण करावयास उभे राहताच टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. त्यांच्या भाषणास सुरुवात होताच स्पृश्य व अस्पृश्य लोक मोठ्या आतुरतेने बसलेले दिसत होते. आपल्या भाषणात बाबासाहेब म्हणाले,

आज जे काही मी माझ्या बांधवांना सांगणार आहे त्याची जबाबदारी माझ्या एकट्यावर नाही. मी आज जरी अध्यक्ष असलो तरी मला जे काही तुम्हाला सांगावयाचे आहे, ते माझे स्वतःचे नाही. मी दोन वर्षापूर्वी माझ्या समाज बांधवांपुढे जे म्हणणे मांडले होते त्याचा संदेश आज तुम्हास सांगत आहे. माझ्या संदेशातील उद्देश समाजाने मान्य केला असल्यामुळे त्याची जबाबदारी माझ्या एकट्याकडे नसून तुम्ही सर्वजण त्या जबाबदारीला बांधले गेला आहात. आजचा संदेश आपल्या जातीचा आहे. एकविचाराने आणि जबाबदारीने मान्य केलेला संदेश आपणही मान्य कराल अशी मला बळकट आशा वाटत आहे. हा जातीने

---

बहिष्कृत भारत : ३ मे १९२९.

एकमताने पास केलेला संदेश सर्वांना पूर्णपणे बंधनकारक आहे. हा संदेश असा आहे की, आजच्या प्रसंगी आपण काय करीत आहोत व कशा करिता जमलो आहोत, आजच्या संदेशाची जबाबदारी काय आहे याचा विचार करणे जरूर आहे. अखिल हिंदू समाजाने ज्या वंशपरंपरेने काही गलिच्छ चालीरिती आपल्या समाजावर लादल्या आहेत त्या झुगारून देणे हाच आजच्या संदेशाचा मुख्य उद्देश आहे. एकंदर दृष्टीने विचार करता माझा संदेश फार महत्त्वाचा आहे. हिंदुस्थान देशामध्ये अत्यंत घाणेरडी अशी जी कामे आहेत ती ज्यांची त्यांनी न करता व ती व्यक्तिमात्रांच्या खुषीवर न ठेवता जी आपल्या अस्पृश्य समाजावर सक्तीने लादण्यात आली आहे त्या सक्तीला माझा विरोध आहे. आजच्या परिस्थितीत हीनत्वाचा ठसा एखादी व्यक्ती कितीही उच्च दर्जाला चढली तरी निघून जात नाही. हीनत्वाची भावना हाडीमासी भिनली आहे तोपर्यंत स्वाभिमान जागृत होणार नाही. ' जन्माप्रमाणे वागणे हाच तुझा धर्म पाळ ' अशी शिकवण चांभार, भंगी, महार, मांगादि अस्पृश्यांना दिली जात आहे. अशा परिस्थितीत ह्या समाजात मोठा कर्तृत्ववान पुरुष निर्माण होणे अशक्य आहे. ब्राह्मण वगैरे स्पृश्य जातीत जन्मलेली मुले मुन्सफ, मामलेदार, वकील वगैरे का होतात. मराठे समाजातील मुले पोलीस व पोलीस अधिकारी का होतात ? आणि अस्पृश्य समाजातील मुले अशी का ? अस्पृश्य व स्पृश्य मुलातील भेद कशाने झाला ? ह्या सर्वांचे उत्तर एकच आणि ते म्हटले म्हणजे ' समाज परिस्थिती. ' घाणेरड्या परिस्थितीचे वातावरण अस्पृश्यांच्या मुलांवर होत गेल्यामुळे गुलामगिरीची दीक्षा त्यांना प्राप्त झाली आहे. ही परिस्थिती म्हणजे खुषीचा सौदा नव्हे. गुलामगिरीची पध्दत नष्ट करणे आमचे कर्तव्य आहे. आणि या करिताच आपल्या समाजातून अगोदर गलिच्छ चालीरितींना मूठमाती मिळाली पाहिजे. कोणी म्हणेल अशा चालरिती समाजातून काढून टाकणे आर्थिकदृष्ट्या अहितकारक आणि मोठे नुकसानी करणारे आहे व आपल्या समाजाच्या उपजीविकेला त्यामुळे अडथळा उत्पन्न होईल. परंतु माझ्यामते ह्या मुद्याने आपल्या सुधारणेच्या मार्गात वरिष्ठ म्हणविणारा समाज आपल्याच लोकांना चिथावून फंदफितुरी उत्पन्न करीत आहे आणि त्यांना सर्वांना माझा सवाल आहे की, वेश्या आपल्या छानछोकीच्या उपजीविकेकरीता आक्रमण करीत असलेल्या मार्गाचा व एखाद्या गृहस्थाश्रमी बाईच्या स्वाभिमान वृत्तीच्या काबाडकष्टाने मिळविलेल्या अन्नावरील उपजीविकेचा मार्ग याचे कधीतरी साम्य असू शकेल का ? येथे छानछोकीच्या उपजीविकेच्या मार्गात किती घाणेरडा प्रकार असतो याचा कुणी कधीतरी विचार केला आहे का ? अगदी स्पष्टपणे सांगायचे म्हणजे स्वाभिमानशून्यतेने जीवन कंठणे नामर्दपणाचे आहे. जीवनाकरिता स्वाभिमान

जागृत ठेवा. आपला आर्थिक तोटा असला तरी आपण प्रथम आपल्या कर्तव्याला जागले पाहिजे. सुख किंवा लौकिक सहजगत्या मिळत नाही. टाकीचे घाव सोसल्याशिवाय देवपणा येत नाही. तीच गोष्ट मनुष्यमात्रांच्या संसाराला व व्यवहाराला लागू आहे. आम्ही आमचे योग्य कर्तव्य बजावित असता वरिष्ठ लोक आमच्यावर निष्कारण अत्याचार करतात. ही गोष्ट मी आज नाही म्हणायला तयार नाही. आपणाला मनस्वी त्रास होणार, आपला प्रसंगी छळ होणार ह्या गोष्टी मी पूर्णपणे जाणून आहे. परंतु आपण आपल्या कार्याकरिता टक्केटोणपे सहन केलेच पाहिजेत. कित्येक लोक म्हणतात की खोतीमुळे आम्हाला आमचे योग्य कर्तव्य बजावता येत नाही. ह्या लोकांना माझे स्पष्ट सांगणे आहे की, खोतीविषयीची योग्य व्यवस्था मी लवकरच घडवून आणणार आहे. अमूक एका अडचणीचा निकाल प्रथम लागत नाही म्हणून आपण स्वस्थ बसून चालायचे नाही. आपण स्वस्थ न बसता कार्य करीत रहा. नुसती खोती पद्धत दूर करून कार्य होणार नाही. वरिष्ठ समाज गावातील गुंड जमा करून तुमच्यावर गदा आणतील याची वाट काय ? गावातील सार्वजनिक विहिरीवर पाणी भरणे हे तुमच्या धैर्यावर अवलंबून आहे. तुमचे न्याय्य हक्क प्रस्थापित करताना वरिष्ठ समाजाच्या बुजगावण्याला तुम्ही भीक घालाल तर, तुमच्या हातून काहीच होणार नाही. तुमच्या सुधारणेसाठी मी जर कोकण प्रांतात आलो, तर मला गोळी घालून ठार मारण्याबद्दलच्या मजकुराची अनेक धमकीची पत्रे आली आहेत. ह्या धमक्यांना मी भीक घातली असती तर आज़ आपल्यासमोर मी उभाच राहिलो नसतो. परंतु तुमच्यापुढे मात्र माझा निरुपाय झाला आहे. कोकण प्रांत सर्व दुनियेत भिकारी आहे ही गोष्ट मला ठाऊक आहे. हा प्रांत बुद्धीमध्ये श्रीमंत पण सांपत्तिक स्थितीत अगदी मागासलेला. खोत, ब्राह्मण व मराठे वगैरे लोकांनाही या प्रांतात सुख लाभणे अशक्य आहे. व्यापार उद्योगधंद्याकडे आपण लक्ष दिल्यास आपण आपल्या आपत्तीतून सुटू. खोतीच्या जाचातून ज्यांना मुक्त व्हावयाचे आहे, त्यांना सिंध व इंदोरसारख्या प्रांतात जमीनी लागवडीकरिता मिळवून देण्याचा मी प्रयत्न करीन. ह्या बाबतीत आपण आफ्रिकेत वगैरे ठिकाणी व्यापारधंदा करून श्रीमंत झालेल्या मुसलमानांचे उदाहरण दृष्टीसमोर ठेवा. वाडवडिलांच्या जागा सोडणे जिवावर येते खरे, परंतु आपला सामाजिक दर्जा वाढविण्यासाठी ह्या मार्गाचा आपण अवश्य उपयोग केला पाहिजे. मेलेल्या जनावरांचे मांस खाणे, अमंगल कृत्ये करणे वगैरे प्रकाराला तुम्ही धैर्याने आळा घाला. माझ्या आजच्या संदेशातील ह्या गोष्टीचा आपण विचार करून आजच शपथपूर्वक प्रत्यक्ष कार्याला लागा. आजच्या नवयुगात कोणीही गुलाम नाही हे लक्षात ठेवा.

● ● ●

# २६

# स्वावलंबन आणि स्वाभिमानाशिवाय तरणोपाय नाही

रत्नागिरी जिल्हा शेतकरी परिषद चिपळूण येथे रविवार तारीख १४ एप्रिल १९२९ रोजी भरवण्यात आली होती. पाहुणे मंडळीपैकी मुंबईचे श्री. देवराव नाईक, द. वि. प्रधान, भा. र. कद्रेकर, शंकरराव गुप्ते, शंकर वडवलकर, श्री. शिवतरकर, बाबा आडरेकर, गायकवाड, मोरे वगैरे मंडळी हजर होती. स्थानिक मंडळीपैकी श्री. विनायकराव बर्वे, साठे, राजाध्यक्ष, खानसाहेब देसाई, पितापुत्र बेंडके, शिवराम जाधव वगैरे मंडळी हजर होती.

वरील परिषदेच्या सुरवातीला डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची अध्यक्षस्थानी निवड करण्यात आली. यानंतर श्री. रगजी यांचे भाषण झाले. यानंतर श्री. बेंडके यांनी रायबहादूर बोले, ॲडव्होकेट, आनंदराव सुर्वे, श्री. साळवी, सबजज्ज वगैरे मंडळीचे संदेश व तारा वाचून दाखविल्यावर अध्यक्ष डॉ. आंबेडकर यांनी भाषण केले. ते म्हणाले,

मला असे वाटते की, माझा जन्म सर्वसाधारण जनतेची जबाबदारी घेण्यासाठीच असावा. मी देखील मजूर वर्गांपैकी एक असून, इंप्रुव्हमेंट ट्रस्टच्या चाळीत राहतो. इतर बॅरिस्टरप्रमाणे मला देखील बंगल्यातून राहता आले असते पण माझ्या शेतकरी व अस्पृश्य बंधुंकरिता चाळीत राहूनच काम केले पाहिजे. याबद्दल मला केव्हाही वाईट वाटत नाही. मला मुंबईला येऊन अवघी चार वर्षे झाली. अत्यंत हीन मानलेल्या समाजात जन्म झाल्यामुळे त्याच समाजासाठी जीवापाड मेहनत करणे मला भाग पडले आहे. तशात अस्पृश्य कामगारांना इतर कामगारांचे हक्क मिळवून देणे माझे कार्य आहे. गेल्या दोन वर्षापूर्वी श्री. बेंडके यांचा परिचय झाला. त्यांनी खोती प्रकरणाची जबाबदारी माझ्यावर टाकली आहे व ती मी मान्य केली आहे. खोती पद्धतीचा फायदा व तोटा याचा विचार करून त्यासंबंधी नक्की योजना बिलांच्या रुपाने कायदेकौन्सिलात आणणे माझे कर्तव्य आहे. खोतीसारखी दुष्ट पद्धत कशी अंमलात आली याचे मला मोठे आश्चर्य वाटते. ह्या पद्धतीमुळे शेतकऱ्यांच्या चित्ताला शांती नाही. काबाडकष्ट करून तयार केलेल्या शेतीवर धनिकांनी ' आयत्या बिळावर नागोबा ' या नात्याने हल्ला

---

बहिष्कृत भारत : ३ मे १९२९.

करून त्या आपल्या ताब्यात घ्याव्या. अशा परिस्थितीत शेतकऱ्यांचे जीवन चारी बाजूंनी संकटात राहिले तरी धनिकांना व खोतांना त्याची पर्वा नसते. अशा वेळी श्रमजिवी शेतकऱ्यांच्या कष्टाचे, मेहनतीचे फळ सरकारने मिळवून दिले पाहिजे. माणसाच्या जीविताचे व वित्ताचे रक्षण करणे हे सरकारचे आद्य कर्तव्य आहे आणि अशा बाबतीत सरकारने गरिबांची दाद घेतली नाही तर ते सरकार सुधारलेले आहे असे म्हणता येणार नाही. रत्नागिरी जिल्ह्यातील एक जुलमी खोत आपल्या अधिकाराचा अतिरेक स्त्रियांच्याही अब्रुवर घाला घालून करू शकतो. शेतकरीवर्ग आज खोती पद्धतीमुळे गुलामगिरीत खिचपत पडला आहे. सत्तेचा दुरुपयोग ही न्यायनीती आहे असे कसे म्हणता येईल ! ब्रिटिश राज्यात चाललेली गुलामगिरी सरकारला नालायक ठरवित आहे. अन्यायाच्या चौकटीवर कोणत्याही समाजात स्वास्थ निर्माण होणार नाही. शांतता टिकवायाची असेल तर सरकारने न्याय दिला पाहिजे ; न्यायी सरकारने इतके दिवस खोती पद्धती चालू ठेविली ही गोष्ट अन्यायाची आहे. सरकारी रानावर खोतांनी हक्काचा अंमल गाजवावा आणि कुळांना जुलुमाखाली नाहक छळावे हे काय गौडबंगाल आहे हेच कळत नाही. सारासार विचार करता खोतीची पद्धत मुळासकट सदोष आहे. सरकार कधीही लहानसहान ओरडीला भीक घालीत नसते. तुम्ही तुमची चळवळ अत्यंत धिटाईने चालू ठेविली पाहिजे. आपल्यावरील अन्यायाची ओरड सारखी करीत राहून उलटपक्षाशी लढत राहिले, तरच चारपाच वर्षात स्वराज्याला पोषक असे हक्क मिळणार आहेत. आजतागायत चळवळी करताना सरकारची मिनतवारी करावी लागत असे. पण चारपाच वर्षांनी पूर्ण सत्ता स्थापन होणार आहे. कौन्सिलमध्ये तुमच्या प्रांतातर्फे प्रतिनिधी पाठविताना योग्य काळजी घ्या. काही झाले तरी कुणाच्या भिडेस बळी न पडता आपल्या मताला पाठिंबा देणारा मनुष्य कौन्सिलात पाठविला पाहिजे. तावून सुलाखून प्रतिनिधी पाठवा, खोतांच्या व खोतांच्या जातभाईंना मते देऊन कौन्सिलात पाठवू नका. समाजाचे जीवन परस्वाधीन असल्यामुळे एकमेकावर अवलंबून राहिल्याशिवाय गत्यंतर नाही. कुणबी लोकांनी आपल्या स्वाभिमानाला जागून वरिष्ठ लोकांची हलकीसलकी कामे करून स्वतःचा सामाजिक दर्जा मुळीच कमी करून घेऊ नये. स्वावलंबन आणि स्वाभिमान बाळगून आपण आपले कार्य नेटाने करताना ऐक्य व संघटना स्थापन करा. आणि अशा एकोप्याच्या संघटनेच्या चळवळीने आपल्या गाऱ्हाण्यांची दाद कौन्सिलपर्यंत जाऊन लावून घेता येईल. असल्या नेटाच्या प्रयत्नांचा परिणाम खात्रीने यशस्वी होईल याची मला खात्री वाटते.

अध्यक्षांच्या भाषणानंतर खालील ठराव एकमताने पारित करण्यात आला.

'' खोतीपद्धत ही निखालस गुलामगिरी आहे, ह्या पद्धतीमुळे रत्नागिरी जिल्ह्यातील शेतकरी वर्ग सर्वस्वी खोताचा ताबेदार झाला आहे. उपरी कुळांची दशा तर होतेच होते पण पोचपावती देण्याची पद्धत अस्तित्त्वात नसल्यामुळे कायम धारेकऱ्यांचे हक्कही सुरक्षित राहत नाहीत. आर्थिक-दृष्ट्या खोतीपद्धत कुळांना घातक आहे, इतकेच नव्हे तर, नैतिकदृष्ट्याही ही पद्धत विघातक असून कुळांना कोणत्याही प्रकारे सुस्थिती करून घेण्यास स्वातंत्र्य उरत नाही. अशा या खोती पद्धतीचा ही परिषद तीव्र निषेध करते व ती नाहीशी करावी अशी सरकारास आग्रहाची सूचना करते. ''

वरील ठरावावर श्री. रगजी, श्री. बेंडके यांची भाषणे झाली. याशिवाय किरकोळ ठराव पास झाल्यावर या परिषदेचे काम सायंकाळी ७ वाजता संपले. ' डॉ. आंबेडकर की जय ' ह्या घोषणेत परिषद आभार प्रदर्शन व पानसुपारीच्या समारंभानंतर बरखास्त करण्यात आली.



## २७

# मुंबई इलाख्यातील प्राथमिक शिक्षणाची प्रगती

मुंबई सरकारचे शिक्षणमंत्री ना. मौलवी रफिउद्दिन अहमद यांच्या निमंत्रणावरून महाबळेश्वर येथे गेल्या तारीख ६ मे १९२९ रोजी प्राथमिक शिक्षणाच्या प्रसाराच्या बाबतीत अगत्य बाळगणाऱ्या वेगवेगळया जिल्ह्यातील आणि वेगवेगळया जातिधर्माच्या गृहस्थांची एक लहानशी परिषद, या इलाख्यात प्राथमिक शिक्षणाची प्रगती विशेष झपाट्याने कशी करता येईल आणि सध्याच्या प्राथमिक शिक्षणासंबंधाच्या कायद्यात कोणत्या दुरूस्त्या करण्याची आवश्यकता आहे, याचा विचार करण्याकरिता भरली होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हेही या परिषदेला हजर होते. त्यांनी आपले विचार शिक्षणमंत्री व परिषदेचे सभासद यांच्यापुढे स्पष्टपणे मांडले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

प्राथमिक शिक्षणाचा प्रसार हा राष्ट्रीयदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे. सध्याच्या युगात ज्या देशामधील बहुजनसमाज निरक्षर आहे अशा देशाचा जीवनकलहात टिकाव लागावयाचा नाही हे सांगावयास नकोच. प्राथमिक शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार सर्वांगीण राष्ट्रीय प्रगतीच्या इमारतीचा पाया आहे. केवळ लोकांच्या खुषीवर हा प्रश्न सोपविल्यास प्राथमिक शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार होण्यास कैक शतके लागतील म्हणून प्राथमिक शिक्षणाच्या बाबतीत सक्तीचा कायदा करावा लागतो. आघाडीस आलेल्या जगातील सर्व देशांनी सक्तीचा कायदा करूनच लोकांची निरक्षरता हद्दपार केली असे आपणास दिसून येते. जे वर्ग आधीच शिक्षणाचा लाभ घेतात त्यांच्यावर शिक्षणासाठी अर्थातच सक्ती करावी लागत नाही. ज्यांना शिक्षणाचे महत्त्व कळत नाही व जे त्या बाबतीत उदासीन असतात त्यांच्याकरिताच सक्तीच्या कायद्याची आवश्यकता असते. म्हणून या देशात शिक्षणामध्ये मागासलेले जे वर्ग आहेत त्यांच्या जिव्हाळयाचा हा प्रश्न आहे. प्राथमिक शिक्षणाच्या बाबतीत कायद्याने सक्ती असावी अशासाठी, कै. ना. गोपाळ कृष्ण गोखले यांनी आणलेल्या तद्विषयक बिलापासून चळवळ सुरू झाली. त्या बिलाला देशातील सर्व जनतेने विशेषतः मागासलेल्या वर्गाच्या पुढाऱ्यांनी जोराने पाठिंबा दिला. परंतु वेगवेगळया प्रांतात सक्तीचा कायदा होण्यास मध्यंतरी कैक वर्षे जावी लागली. मुंबई इलाख्यात प्राथमिक शिक्षणाच्या सक्तीचा कायदा झाला आहे. परंतु त्याची अंमलबजावणी

---

बहिष्कृत भारत : ३१ मे १९२९.

सरसहा सर्वत्र झालेली नसून ती म्युनिसिपालिट्या व लोकल बोर्डस् यांच्यावर अवलंबून ठेवलेली आहे आणि सरकारने विशिष्ट प्रमाणात मदत देण्याचे ठरविले आहे तरी सक्तीचे तत्त्व अंमलात आणण्याने जो जादा खर्च पत्करावा लागतो, तो पत्करण्यास पुष्कळ म्युनिसीपालिट्या व लोकल बोर्डस् तयार होत नाहीत. त्यामुळे सक्तीच्या तत्त्वाची अंमलबजावणी मुंगीच्या पावलांनी होत आहे असे म्हटले तरी चालेल. १९२०-२१ साली या इलाख्यातील मुलामुलींच्या प्राथमिक शाळांची एकंदर संख्या १३,००० पेक्षा कमी होती व त्यातील विद्यार्थी विद्यार्थिनींची संख्या ८ लक्ष १ हजार इतकी होती. १९२६-२७ साली शाळांची संख्या १३,८३५ व विद्यार्थी विद्यार्थिनींची संख्या दहा लक्षांपेक्षा थोडी कमी इतकी असल्याचे दिसून येते. १९२०-२१ ते १९२५-२६ या पाच वर्षाच्या मुदतीत शाळांच्या संख्येत शेकडा ४.८ टक्के आणि विद्यार्थी विद्यार्थिनींच्या संख्येत शेकडा १४ टक्के वाढ झाली. १९२०-२१ साली प्राथमिक शिक्षणावर एकंदर खर्च १ कोटी २७ लक्ष रुपये झाला होता तो १९२६-२७ साली १ कोटी ९८ लक्ष रुपये झाला. हे सर्व आकडे सकृतदर्शनी प्रगतिदर्शक दिसले तरी बहुजनसमाजातील निरक्षरता अद्यापि किती विस्तृत प्रमाणावर आहे ते ध्यानात आणले म्हणजे एकंदरीत अगदी मंदगतीनेच प्रगती होत आहे असे म्हणावे लागते. १९२१ सालच्या चंदावरकर कमिटीच्या रिपोर्टातील शिफारशी अंमलात येऊ शकल्या असत्या तर आजमितीस सक्तीच्या प्राथमिक शिक्षणामध्ये पुष्कळ प्रगती दिसून आली असती. या कमिटीने दहा वर्षांचा कार्यक्रम आखून तो अंमलात आणण्यास १ कोटी १० लक्ष रुपये इतक्या रकमेपर्यंत वार्षिक खर्च करावा लागेल असा अंदाज केला होता. या रकमेपैकी ७७ लाख रुपये सरकारने द्यावयाचे होते. परंतु पुढे वाढता खर्च लक्षात घेऊन त्या आकड्यात दुरुस्ती करावी लागली. सक्तीचे तत्त्व सर्वत्र अंमलात आणण्यास १ कोटी ८३ लक्ष रुपयांचा जादा वार्षिक खर्च करावा लागेल आणि त्यापैकी १ कोटी २१ लक्ष रुपये सरकारला द्यावे लागतील असा हल्लीचा अंदाज आहे. सक्तीच्या शिक्षणाप्रित्यर्थ होणाऱ्या खर्चाचा जिल्हा लोकल बोर्डाच्या बाबतीत दोन तृतीयांश भाग व म्युनिसीपालिट्यांच्या बाबतीत एक द्वितीयांश भाग सोसण्याची जबाबदारी कायद्याने सरकारावर टाकलेली आहे आणि खुषीच्या शिक्षणासंबंधाच्या योजनांचा खर्चही त्याच प्रमाणात अर्थातच पैशाच्या सवडीप्रमाणे देण्याचे सरकारने आश्वासन दिलेले आहे. १९२२-२३ सालापासून प्राथमिक शिक्षणासंबंधाचा मुंबई सरकारचा खर्च मुंबई म्युनिसीपालिटीची ग्रँट हिशोबी धरुन २८ लाखांनी वाढलेला आहे, परंतु या वाढीचा बराचसा भाग शिक्षकांच्या पगारवाढीने गिळंकृत केला आहे. सक्तीच्या व खुषीच्या शिक्षणाच्या ज्या योजना सरकारपुढे मदतीची मागणी करून मांडण्यात

आल्या त्यापैकी फक्त ६ लक्ष रुपये खर्चाच्याच योजना सरकार मंजूर करु शकले. कायद्यात योजिल्याप्रमाणे सक्तीच्या शिक्षणाचा कार्यक्रम पुरा करण्यास आणखी १ कोटी ७२ लक्ष रुपये खर्च करावा लागेल आणि त्यातले १ कोटी १५ लक्ष रुपये सरकारने द्यावे लागतील. इतकी रक्कम खर्चता येण्यासाठी लोकांवर जादा कर बसवावे लागतील, तरी कोणकोणत्या प्रकारचे हे कर असावे, तेही चंदावरकर कमिटीने सुचविले होते. परंतु त्या बाबतीत सरकारने अद्यापि काही हालचाल केलेली नाही. एक तर प्रांतिक सरकार व वरिष्ठ सरकार यांच्या दरम्यान महसुलाच्या विभागणीच्या बाबतीत ओढाताण चालू आहे. मध्यवर्ती सरकारकडून मुंबई सरकारच्या वाट्याला दरसाल अधिक रक्कम मिळेल तर तितक्या रकमेपुरती काळजी दूर होईल. या बाबतीत सायमन कमिशनकडूनही काही सूचना करण्यात येतील असा अंदाज आहे. तेव्हा जादा कर बसवून शिक्षणासाठी पाहिजे असलेली जादा रक्कम उभारण्याचा प्रश्न तूर्त सोडविला जाण्याची आशा नाही. आमच्या मते सक्तीच्या शिक्षणासंबंधाच्या प्रश्नांची मुख्य दोन अंगे आहेत. एक, शिक्षणावरील ताबा आणि दोन, सक्तीचे तत्त्व अंमलात आणण्याची जबाबदारी. या दोन्ही बाबतीत सध्याच्या सक्तीच्या प्राथमिक शिक्षणासंबंधाचा कायदा मूलतः सदोष आहे असे आमचे मत आहे. स्थानिक स्वराज्याच्या वाढीच्या विरुध्द आम्ही नाही. परंतु शिक्षण ही बाब सध्याच्या परिस्थितीत तरी स्थानिक स्वराज्याच्या मर्यादेत येणे इष्ट नाही. म्युनिसीपालिट्या व लोकल बोर्डस् यांच्यात सध्या जी माणसे निवडून येतात त्यातील पुष्कळशी माणसे शिक्षणावर ताबा ठेवण्यास अपात्र असतात. कित्येकांना शिक्षणाचे ध्येय व पध्दती यांची अंधुक कल्पनाही नसते. त्याशिवाय जातिभेद व पक्षभेद यांच्यामुळे सभासदांमध्ये चुरस असते. त्याचा परिणाम शाळांच्या व्यवस्थेवर झाल्याखेरीज राहत नाही. शिक्षक लोकही सभासदांपाशी आपल्या फायद्यासाठी किंवा बचावासाठी वशिला बांधण्याच्या खटपटी करितात. उलटपक्षी सभासदांनाही निवडणुकीच्या वेळी मते मिळविण्याकरिता शिक्षक पाहिजे असतात, या भानगडीमुळे शाळांच्या कारभारात राहावी तशी शीस्त राहत नाही. मुंबई म्युनिसीपालिटीच्या शाळांच्या कारभारात सुध्दा वरील प्रकार दिसून येतात, मग इतर लहान म्युनिसीपालिट्या व लोकल बोर्डस् यांच्या नियंत्रणाखालील शाळांचा कारभार कसा चालतो याची कल्पनाच केली पाहिजे. सध्याच्या पध्दतीमुळे अगदी मागासलेल्या किंवा अल्पसंख्यांक लोकांच्या हितसंबंधाचे व्हावे तसे रक्षण होत नाही. कित्येक ठिकाणी अस्पृश्यवर्गापैकी व मुसलमानांपैकी एक एकटाच सभासद असतो. त्याला म्युनिसीपालिटीच्या किंवा लोकल बोर्डाच्या कारभारात वतनदार बनलेल्या जातीच्या सभासदांपुढे लाचार व्हावे लागते. या एकंदर

गोष्टीचा विचार करता शिक्षणावर प्रांतिक सरकारचाच ताबा असणे इष्ट व अवश्य आहे. शिक्षण ही बाब रस्ते बांधणे, गटारे साफ ठेवणे वगैरे बाबींपेक्षा निराळ्या प्रकारची आहे. बारभाईंचा कारभार तेथे उपयोगी नाही. प्रांतिक स्वायत्तता मागा आणि राष्ट्रीय दृष्टीने शिक्षणाचे धोरण ठरवा, आमची त्याला हरकत नाही. परंतु शिक्षणामध्ये एकसूत्रीपणा असला पाहिजे, शाळांचा कारभार शिस्तीनें चालला पाहिजे आणि शिक्षण चोख असले पाहिजे. भलत्याच माणसांना शिक्षणामध्ये ढवळाढवळ करण्यास सवड मिळता कामा नये. गेल्या थोड्या वर्षात अनेक स्थानिक स्वराज्य संस्थांचा बेशिस्त कारभार चव्हाट्यावर आला आहे आणि त्या संस्थांचे तात्पुरते अधिकार काढून घेणेही सरकारला भाग पडले आहे. इतर बाबतीत अंदाधुंदीच्या कारभारामुळे सार्वजनिक पैशाचेच नुकसान होईल, परंतु शिक्षणाच्या कारभारात अंदाधुंदी माजल्याने नवीन पिढीचे नुकसान होईल, हा भेद केव्हाही विसरता कामा नये. याखेरीज शिक्षणावर प्रांतिक सरकारचेच का नियंत्रण असावे हे शाबीद करणारा महत्त्वाचा मुद्दा आहे तो हा की, शिक्षणाप्रित्यर्थ ८० टक्क्यापेक्षा अधिक खर्च प्रांतिक सरकाराकडून होत असतो. स्थानिक संस्था फक्त १५/२० टक्केच खर्च करितात. अर्थात नियंत्रणाचा हक्क प्रांतिक सरकारलाच असला पाहिजे. त्याचप्रमाणे प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक करण्याची जबाबदारीही सरकारवरच असणे जरूर आहे. सध्याच्या सक्तीच्या शिक्षणासंबंधाच्या कायद्यात बरीचशी जबाबदारी लोकल बोर्ड व म्युनिसीपालिट्या यांच्या अंगावर टाकून सरकार मोकळे झाले आहे. लोकल बोर्डाच्या बाबतीत दोन तृतियांश व म्युनिसीपालिट्यांच्या बाबतीत निम्मे खर्चाची जबाबदारी अपुरी आहे, लोकल बोर्ड व म्युनिसीपालिट्या यांची सांपत्तिक स्थिती असमाधानकारक असून सध्यापेक्षा खर्चाचा अधिक बोजा घेण्याचे सामर्थ्य त्यातील पुष्कळांना नाही. नवीन खर्च भागविण्यासाठी उत्पन्न वाढविण्याची त्यांच्यापाशी असलेली साधनेही अगदी मर्यादित आहेत. त्यामुळे इच्छा असूनही पुष्कळ लोकल बोर्डस् व म्युनिसीपालिट्या सक्तीच्या शिक्षणाची योजना हाती घेण्यास धजत नाहीत. त्याशिवाय, ज्या लोकल बोर्डामध्ये व म्युनिसीपालिट्यांमध्ये शिक्षणात पुढारलेल्या लोकांचा भरणा विशेष असतो त्यांना तर सक्तीच्या शिक्षणाविषयी मुळी अगत्यच वाटत नाही. सक्तीशिवाय त्यांच्या जातींमध्ये शिक्षणप्रसार होत असतो. मग ज्या जाती शिक्षणात मागासलेल्या आहेत त्यांना मुद्दाम शिक्षण देऊन आपल्या सामाजिक वर्चस्वावर ते मुद्दाम कशाला कुऱ्हाड घालून घेतील ? वरील दोन अडथळयांमुळे, सक्तीच्या शिक्षणाचा कायदा होऊन इतकी वर्षे झाली तरी फारशी प्रगती झालेली नाही. लोकांना साक्षर करणे, निरक्षरतेला हद्दपार करणे ही प्रांतिक सरकारची जबाबदारी आहे. ती त्याला केव्हाही टाळता येणार नाही.

नाहीपेक्षा त्याने आपले एक पवित्र कर्तव्य करण्यात चुकारपणा केला असेच म्हणावे लागेल. ज्या सरकारला आपल्यावरील या जबाबदारीची, आपल्या या पवित्र कर्तव्याची जाणीव आहे ते सरकार अशी टाळाटाळी केव्हाही करणार नाही. सार्वत्रिक शिक्षणाचा प्रश्न हा तुटक तुटक रीतीने सोडविण्याचा प्रश्न नव्हे. तो एकसूत्री धोरणानेच सोडविण्यात आला पाहिजे. सर्व प्रांतांची समप्रमाणाने शिक्षणप्रगती झाली पाहिजे तर प्रांतिक सरकारनेच सर्व जबाबदारी आपल्या अंगावर घेणे अवश्य आहे. सर्व लोकल बोर्डस् व म्युनिसीपालिट्या यांची सांपत्तिक स्थिती सारखी नसते. परिस्थितीप्रमाणे उत्पन्नाची साधने कमी जास्त असतात. सुपीक जमीन, व्यापार, कारखाने, गिरण्या, यात्रा यांच्यायोगे कित्येकांपाशी उत्पन्नाची भक्कम साधने असतात तर कित्येकांचे उत्पन्न त्यांच्या नेहमीच्या साधारण खर्चासही पुरेसे नसते व उत्पन्न वाढविणे शक्य नसते. ज्या त्या जिल्ह्याने आपआपल्या साधनसंपत्तीच्या जोरावर सक्तीच्या शिक्षणाची योजना हाती घ्यावी असे म्हटले तर रत्नागिरी, पंचमहाल अशासारख्या दरिद्री जिल्ह्यांना जगाच्या अंतापर्यंत वाट पाहावी लागेल ! अशा भागांना त्यांच्या दारिद्र्याबद्दल सक्तीच्या शिक्षणाला मुकण्याची शिक्षा करणे रास्त होईल काय ? एवंच, प्रांतिक सरकारचीच ही जबाबदारी आहे. ती जबाबदारी कबूल केली तरी, सर्व इलाख्यात सक्तीच्या शिक्षणाची योजना सर्वत्र अंमलात आणण्यासाठी करावा लागणारा खर्च भागविण्यास पैसा कोठून आणावा ? हा प्रश्न शिल्लक राहतोच. प्रांतिक सरकार व हिंदुस्थान सरकार यांच्यामधील जमाबंदीची वाटणी योग्य रीतीने झाल्यास मुंबई सरकारला शिक्षणाप्रित्यर्थ खर्च करण्यास आजच्यापेक्षा काही जास्त रक्कम मिळू शकेल. त्याखेरीज, प्राथमिक शिक्षण सक्तीचे केले तरी सर्वांना मोफत ठेवण्याची आवश्यकता आहे, असे आम्हास वाटत नाही. प्राथमिक शाळांची फी म्हणण्यासारखी नसते. ती देण्याचे ज्यांना सामर्थ्य आहे त्यांच्याकडून ती वसूल करण्यास मुळीच हरकत नाही. इंग्लंडात जेव्हा प्राथमिक शिक्षण सक्तीने देण्याचा उपक्रम झाला तेव्हा ते सर्वांना मोफत ठेवण्यात आले नव्हते. शिक्षण मोफत देणे ही मागाहूनची गोष्ट असून सक्ती ही पहिली गोष्ट आहे. ज्या वर्गांना प्राथमिक शाळांतली स्वल्प फी सुद्धा देणे कठीण जाते त्यांनाच फक्त ते मोफत देण्यात यावे, फी माफी सढळ हाताने द्यावी, म्हणजे झाले. परंतु ज्यांना फी देण्याचे सामर्थ्य आहे त्यांकडून ती घेण्यात काही पाप नाही की काही अन्याय नाही. त्याप्रमाणे फी वसुली झाली तर थोडी का होईना सक्तीच्या शिक्षणाचा जादा खर्च भागविण्यास मदत होईल. सध्याच्या द्विदल राज्यपद्धतीमुळे एकीकडून शिक्षणाचा खर्च वाढता आहे तर दुसरीकडून अबकारीचे उत्पन्न कमी करून दारूबंदीचे धोरण अंमलात आणावे ही लोकांची

मागणी असल्यामुळे सोपीव खात्यांचा खर्च भागविण्याचा पेच येऊन पडलेला आहे. दारूबंदीचे धोरण व सार्वत्रिक शिक्षण ही दोन्ही अंमलात येणे जवळ जवळ अशक्य झाले आहे. सक्तीच्या शिक्षणाचा जादा खर्च भागविण्यास लोकांवर नवीन कर बसविले पाहिजेत, तसेच दारूबंदीचे धोरण अंमलात आणण्यासही ते बसविले पाहिजेत. करांचा हा दुहेरी बोजा सोसण्यास जनता कितपत समर्थ आहे याची आम्हास तरी शंकाच वाटते. बाकी, दोनही सुधारणा अत्यंत आवश्यक असल्याकारणाने आणि त्यांची गोड फळे एका पिढीच्या काळानंतर सर्वांना चाखावयास मिळण्याची खात्री असल्यामुळे, इतर बाबतीत शक्य तितकी काटकसर सरकारला करावयास लावून त्या सुधारणांसाठी करांचा अधिक बोजा डोक्यावर घेण्यास तयार होणे परिणामी दूरदर्शीपणाचेच ठरणार आहे. तथापि, आधी दारूबंदी की आधी सार्वत्रिक शिक्षण ? असा सवाल आम्हाला कोणी विचारला तर ' आधी सार्वत्रिक शिक्षण ' असाच आम्ही जबाब देऊ. शिक्षणप्रसार सार्वत्रिक झाल्यास दारूबाजीला आळा घालणे सोपे जाईल, इतकेच नव्हे तर दारूबंदी संबंधाची लोकांची मागणी विशेष नेटाने पुढे येईल, याविषयी आमची खात्री आहे. शिवाय, दारूबंदीचे धोरण अंमलात आणण्याच्या बाबतीत सरकारने टोलवाटोलवीच चालविलेली आहे. सध्याच्या स्थितीत पूर्ण दारूबंदी केव्हा अंमलात येईल हे मुळीच सांगता येणार नाही. मग दारूबंदी नाही आणि सार्वत्रिक शिक्षणही नाही, अशी स्थिती पत्करण्यात अर्थ तरी कोणता ? त्यापेक्षा तूर्त, दारूबंदीचे धोरण अंमलात आणण्याच्या दृष्टीने, अबकारी उत्पन्न भरून काढण्याकरिता लोकांना जो नवीन करांचा बोजा सोसावा लागेल तो त्यांनी पत्करावा आणि सार्वत्रिक शिक्षणाची सुधारणा तरी आपल्या पदरी पाडून घ्यावी. साठे कमिटीने दारूबंदीच्या बाबतीत जी करांची वाढ सुचविली होती तिचा उपयोग प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक करण्याकरिता होईल तर एक महत्त्वाचा प्रश्न हातावेगळा होईल. सदरील कमिटीच्या शिफारसीमध्ये सुधारणेस जागा नाही असे नाही. परंतु ते धोरण सक्तीच्या शिक्षणाचा खर्च भागविण्यास थोडेबहुत उपयोगी पडू शकेल, काही झाले तरी शिक्षणाचा प्रश्न लांबणीवर टाकता कामा नये.



# २८

# माणुसकीच्या हक्कासाठी जुलूमाविरूद्ध बंड पुकारा

स्वाभिमान संरक्षक परिषदेचे अधिवेशन नाशिक जिल्ह्यातर्फे मु. चित्तेगाव येथे गेल्या रविवारी ता. २६ मे १९२९ रोजी भरले होते. अध्यक्षस्थानी डॉ. भीमराव आंबेडकर, बार-ॲट-लॉ, एम. एल. सी. यांची निवड केली होती. त्या परिषदेस जवळजवळ सहा हजार प्रेक्षक व प्रतिनिधी जमले होते. परिषदेकरिता नाशिकहून प्रो. सबनीस, मेसर्स गायकवाड, शेठ रणखांबे, काळे वगैरे मंडळी व देवळालीहून स्वयंसेवकांचे पथक आणि मुंबईहून समतापत्राचे संपादक श्री. देवराव नाईक, समाज समता संघाचे मेसर्स द. वि. प्रधान, रा. कवळी, बी. ए., भा. वि. प्रधान, बी. ए., एलएल. बी., भो. बा. देशमुख, एम. ए., शं. शां. गुप्ते. बी. एससी., भा. र. कद्रेकर वगैरे मंडळी आली होती. स्वागताध्यक्ष श्री. रोकडे शेठ आजारी असल्यामुळे त्यांचे भाषण होऊ शकले नाही.

अध्यक्ष, डॉ. आंबेडकर यांनी आपल्या भाषणात सांगितले,

स्वाभिमान संरक्षणाची चळवळ जोरात सुरू करणे आजच्या परिस्थितीत प्राप्त झाले आहे. ह्या चळवळीच्या बळावर स्पृश्य व अस्पृश्य समाजातील भेदाभेदाची जाणीव होईल आणि सर्व समाजात समता प्रस्थापित करण्यास संधी प्राप्त होईल. अस्पृश्योद्धार वगैरे उद्धाराच्या गप्पा मारण्याचा समय निघून गेला असून आज प्रत्यक्ष स्वाभिमान जागृतीचा समय येऊन ठेपला आहे. अस्पृश्य समाजाच्या एकंदर परिस्थितीकडे पाहिले तर त्यांच्या स्थितीबद्दल पूर्ण असमाधान दिसून येईल. जन्माने अस्पृश्य मानलेल्या समाजात समावेश झाल्यामुळे उच्चवर्णीय समाजबांधवांपेक्षाही अंगी अलौकिक गुण असून काही करता येत नाही. उच्चवर्णीयांनी उपस्थित केलेली परिस्थिती आपणास आपल्या स्वाभिमानपूर्वक ध्येयास किंवा कार्यास बाधक होत आहे. देवालय प्रवेश, तळी, विहिरी इत्यादी ठिकाणी प्रवेश करण्यास अस्पृश्यांना मनाई केली जाते, त्यांच्यावर अत्याचार केले जातात. अशा हीन परिस्थितीतून मुक्त होण्यासाठी अस्पृश्य बांधवांना आपला स्वाभिमान जागृत करून माणुसकीच्या हक्कासाठी निकराचा हल्ला चढविला पाहिजे. नुसत्या शिक्षणाने माणुसकी मिळती तर वरिष्ठ वर्गासारख्या सुशिक्षित वर्गाकडून आम्हा अस्पृश्य बांधवांवर ह्या सुधारणेच्या काळात अन्यायाचे अत्याचार झाले नसते. हिंदुसमाजाने निष्कारण आपला हीन दर्जा ठरविला आहे. हा हिनत्वाचा कलंक धुवून काढण्याकरिता मला हा स्वाभिमान जागृतीचा मार्ग योग्य असा वाटत आहे. एवढ्याकरिता माझ्या बांधवांनो, स्वाभिमान जागृत ठेवा. आपणावर होत असलेल्या अन्यायी जुलुमाविरुद्ध बंड पुकारल्याशिवाय आपल्याला खऱ्या माणुसकीचे हक्क प्राप्त होणार नाही.

● ● ●

---

वहिष्कृत भारत : २१ जून १९२९.

# २९

# अस्पृश्यांनी दिलेली धर्मांतराची नोटीस

पूर्वी जाहीर केल्याप्रमाणे मु. पातुर्डा, जिल्हा बुलडाणा येथे ता. २९ मे १९२९ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर, बार-ॲट-लॉ यांचे अध्यक्षतेखाली मध्यप्रांत व वऱ्हाड अस्पृश्य परिषदेचे अधिवेशन निर्विघ्नपणे पार पडले. या परिषदेस बाहेर गावावरून अस्पृश्य वर्गाचे पुढारी रा. पी. मटकर, रा. सोनोने, रा. मकेसर, रा. केशवराव खंडारे, रा. संभाजी जाधव, रा. रायभान इंगळे, रा. संभूजी खंडारे वगैरे मंडळी हजर होती. तसेच ब्राह्मणेतर पक्षाचे पुढारी वे. शा. सं. आनंदस्वामी, श्री. उकंडराव टाले वगैरे मंडळीही हजर होती. लोकसमुदाय दीड हजारावर जमला होता. परिषदेस सायंकाळी ७ वाजता सुरवात झाली. प्रथमारंभी याच परिषदेत रा. बक्षुरामजी दाभाडे यांची कन्या कु. कवतीकाबाई व सखाराम इंगळे यांचा विवाह सुधारलेल्या पद्धतीने व अल्प खर्चात करण्यात आला असून रा. बक्षुरामजीने अस्पृश्य वर्गास अनुकरणीय उदाहरण घालून दिले आहे.

यानंतर परिषदेच्या कार्यास सुरवात होऊन परिषदेचे स्वागताध्यक्ष यांचे भाषण झाल्यावर डॉ. आंबेडकर यांचे विद्वत्ताप्रचुर व मुद्देसूद असे भाषण झाले. ते म्हणाले,

विशेषतः या जिल्ह्यातील अस्पृश्य वर्गाच्या व ब्राह्मणेतर वर्गाच्या पुढाऱ्यांनी मिळून अस्पृश्यता निवारण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु त्यांना या कामी यश न येता उलट त्यांचा भिक्षुकशाहीकडून प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीने अनेकप्रकारे छळ करण्यात येऊन त्यांची योग्य चळवळ हाणून पाडण्याचा कसून प्रयत्न करण्यात आला. पुढाऱ्यांविषयी वृत्तपत्रात खोट्यानाट्या बातम्या प्रसिद्ध करणे, अस्पृश्य वर्गात दुही उत्पन्न करणे, ब्राह्मण अधिकाऱ्यांकडून त्यांचा छळ करविणे, त्यांच्यावर बहिष्कार घालणे अशा तऱ्हेचे निंद्य प्रकार त्यांनी सुरू करून ती चळवळ अजिबात नेस्तनाबूद करून टाकण्याचा जणू विडाच उचलला आहे. या त्यांच्या अनन्वीत छळाला व लिलेला कंटाळून या जिल्ह्याच्या काही भागातील हजारो अस्पृश्य धर्मांतर करण्यास तयार झालेले आहेत व त्यांनी अशा प्रकारची नोटीस सुद्धा स्पृश्य वर्गाला उद्देशून दिलेली होती ; परंतु या स्वार्थलोलूप अशा अंतःकरणाच्या भिक्षुकशाहीला याची काहीच कल्पना झाली नाही. शुद्धीवाले आणि हिंदुसभावाले यांना तर जणू काय या वार्तेचा गंधही नाही, हे दाखविण्याकरिता त्यांनी त्यांच्या दुःखाची थोडीदेखील पर्वा केली नाही.

---

बहिष्कृत भारत : २१ जून १९२९.

या धर्मांतराच्या बाबतीत आपल्या अस्पृश्य बंधूंचे मत काय आहे, ते जाणून घेण्यासाठी जळगाव तालुक्यातील अस्पृश्य वर्गाच्या पुढाऱ्यांनी ही परिषद बोलाविली होती. या परिषदेत पहिल्या दिवशी धर्मांतर करण्याबद्दलच्या ठरावावर उहापोह झाला. त्यात सर्व बहिष्कृत समाज या ठरावाला अनुकूल आहे असेच दिसून आले. ब्राह्मणेतर पक्षाच्या पुढाऱ्यांनी यावर जोरदार भाषणे करून ठरावाला अनुकूल अशीच मते दिली. अध्यक्षसाहेबांनी ठराव मताला टाकला असता त्याला कोणीही विरोध न करता तो सर्वानुमते पास झाला व पहिल्या दिवसाचे काम आटोपले.



## ३०

# आम्ही अस्पृश्य तेवढा एक समजतो

शनिवार ता. २९ जून १९२९ रोजी रात्रौ ७ वाजता परळ, मुंबई येथे दामोदर हॉलमध्ये रावबहादूर बोले, जे. पी. यांच्या अध्यक्षतेखाली बहिष्कृत वर्गाची जंगी जाहीर सभा भरली होती. सभेस बहिष्कृत वर्गातील अलोट समुदाय जमला होता. व्यासपीठावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर, मे. डॉ. सोळंकी, मे. शिवतरकर, मे. द. वि. प्रधान, भा. र. कद्रेकर, रा. गुप्ते, ति. गायकवाड, ति. आडरेकर, ति. जाधव इत्यादि मंडळी प्रामुख्याने दिसत होती. ति. गायकवाड यांनी अध्यक्षांची सूचना मांडून तीस रा. वालावलकर यांनी अनुमोदन देताक्षणीच नियोजित अध्यक्ष रावबहादूर बोले, जे. पी. हे टाळयांच्या कडकडाटात अध्यक्षस्थानी स्थानापन्न झाले. अध्यक्षांचे प्रास्ताविक भाषण होऊन, सभेत खालीलप्रमाणे ठराव पास करण्यात आले :–

**ठराव १ ला.**–कोकण भागातील विशेषतः चिपळूण, खेड व दापोली तालुक्यातील बहिष्कृत वर्ग आपल्या उन्नतीचा मार्ग आक्रमण करीत असता सोवळया हिंदू लोकांकडून त्यांचा अनन्वित छळ होत आहे, या त्यांच्या अधम कृतीबद्दल ही सभा त्यांचा तीव्र निषेध करून आपला संताप व्यक्त करीत आहे आणि वरील गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्याकरिता अस्पृश्य पुढाऱ्यांचे एक शिष्टमंडळ नेक नामदार गव्हर्नरसाहेब याजकडे पाठविण्याची परवानगी देत आहे.

**ठराव २ रा.**–कोकणातील बहिष्कृत वर्गाचे हितसंरक्षणाकरिता एक '' कोकण संरक्षक फंड '' उभारण्यात यावा अशी या सभेची सूचना आहे.

**ठराव ३ रा.**–बहिष्कृत वर्गातील श्री. चां. भ. खैरमोडे आणि रा. गाडेकर हे दोन विद्यार्थी चालू सालच्या बी. ए. च्या परीक्षेत व रा. कदम हा मॅट्रिकच्या परीक्षेत उत्तीर्ण झाल्याबद्दल ही सभा त्यांचे अभिनंदन करीत आहे.

**ठराव ४ था.**–डॉ. पी. जी. सोळंकी, एम. एल्. सी. यांची सरकारने मुंबई म्युनिसीपालिटीमध्ये निवड केल्याबद्दल ही सभा डॉक्टर साहेबांचे अभिनंदन करिते व योग्य नेमणूक झाल्याबद्दल संतोष व्यक्त करिते.

---

बहिष्कृत भारत : १२ जुलै १९२९.

शेवटी लोकाग्रहास्तव आणि अध्यक्षांच्या इच्छेकरिता डॉ. बाबासाहेब आंबेडकर बोलावयास उभे राहिले. ते म्हणाले,

आजच्यासारख्या आणीबाणीच्या प्रसंगी आपण सर्व अस्पृश्यांनी सुसंघटीत झाले पाहिजे. मोठ्या दुःखाची गोष्ट ही की, आपल्यातील काही लोक 'महार-महारेतर' हा वाद माजवितात !! महार जरी महाडच्या चवदार तळ्याकरिता आपल्या प्रतिस्पर्ध्यांशी झगडले आणि त्यांनी तो तलाव आपलासा करून घेतला तरी त्या तळ्यातील पाणी चांभारांना आणि मांगांना देखील पिता येईल ! तरी आपण सर्वांनी एक झाल्याखेरीज आपला निभाव लागणार नाही ! इतकेच नव्हे तर आपल्या संस्थेतर्फे ह्या इलाख्यात जी जी बोर्डिंगज् चालू आहेत त्यात कसल्याही प्रकारचा भेदभाव नसून, वाटेल त्या जातीतील अस्पृश्य मुलास त्यात आपला समावेश करून घेता येतो, त्याप्रमाणे बहुतेक सर्व जातीतील मुले त्या बोर्डींगात आहेत.

स्वतःच्या स्वार्थासाठी काही चांभार मंडळी उगाच महाराविरुद्ध डांगोरा पिटून आपणास धन्य मानून घेत आहेत. वास्तविक आमची चळवळ ज्या धर्तीवर चाललेली आहे ; तीजपासून महाराष्ट्रातील इतर चळवळीच्या प्रमुख लोकांनी धडा घ्यावयास पाहिजे. पुणे, सोलापूर येथील म्युनिसीपालिटीच्या निवडणुकीत ह्या दोन्ही ठिकाणी मी स्वतः खटपट करून महार उमेदवारांस आपली नावे परत घ्यावयास लाविली व ह्या दोन्हीही म्युनिसीपालिट्यांमध्ये अस्पृश्यांतर्फे फक्त चांभार मंडळीच निवडून जाऊ दिली. ह्यावरून हे कोणाच्याही लक्षात येईल की, आम्ही अस्पृश्य तेवढा एक समजतो, मग त्यात जाती अगर प्रांतावरून भेदाभेद पाडून घेण्याची आम्हास काही जरूर लागत नाही कारण परिस्थितीचा वरवंटा सर्वांवर थोड्याबहुत प्रमाणावर सारखाच फिरत आहे. शेवटी अध्यक्षांचे आभार मानल्यावर हारतुरे झाल्यावर सभा बरखास्त झाली.



## ३१

# कामगारांना जात नाही म्हणून ओरडणाऱ्या स्पृश्य पुढाऱ्यांनी याचा जबाब द्यावा

बुधवार ता. १६ ऑक्टोबर १९२९ रोजी संध्याकाळी ६-३० वाजता परळ येथे मुंबईतील बहिष्कृत वर्गाची एक जंगी जाहीर सभा पुणे येथील पर्वतीच्या सत्याग्रहास पाठिंबा देण्याकरिता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. सबंध हॉल लोकांनी भरून गेला होता. व्यासपीठावर श्री. भुस्कुटे, देवराव नाईक, ठाकरे, प्रधान, खांडके, कवळी, कद्रेकर, आचार्य डॉ. सुरतकर वगैरे स्पृश्य मंडळी, शिवाय श्री. शिवतरकर, माळी, आडरेकर, वगैरे अस्पृश्य मंडळीही दिसत होती. श्री. शिवतरकर ह्यांनी डॉ. आंबेडकरांनी अध्यक्षस्थान स्वीकारण्याविषयी सूचना मांडली व त्यास खांडके ह्यांनी अनुमोदन दिल्यावर डॉ. आंबेडकर टाळ्यांच्या गजरात अध्यक्षस्थानी बसले.

भाषणाच्या सुरूवातीला त्यांनी पुणे येथील सत्याग्रहाचा त्रोटक इतिहास सांगून पुणे येथील बहिष्कृतांच्या सत्याग्रहास सर्व ठिकाणच्या बहिष्कृतांनी सर्वतोपरी मदत करणे हे त्यांचे पवित्र कर्तव्य आहे असे सांगितले व जरूर पडल्यास आपण पुण्यास सत्याग्रहास जाण्याची तयारी करण्यास तयार आहात काय म्हणून जमलेल्या समुदायास सवाल टाकताच चोहोकडून ' होय ' म्हणून उत्तर मिळाले.

स्पृश्य लोकांच्या वागणुकीचा व त्यांच्या बहिष्कृतांबद्दलच्या दृष्टिकोनाचा निषेध करून, आणखी काही काळ थांबा व मतपरिवर्तनाची वाट पहा म्हणणाऱ्या लोकांची हाव किती नीच वृत्तीची असते. काँग्रेसने देखिल विवक्षित मर्यादेत म्हणजे ३१ डिसेंबरच्या आत जर डोमिनियन स्टेटस दिले नाही, तर आपला ब्रिटिश राज्यसत्तेचा संबंध अजिबात तोडून टाकू, असे जाहीर केले असताना उगाच बहिष्कृत वर्गास थापा सांगण्यात काही अर्थ आहे की काय, असा उघडपणे सवाल आहे. हजारो वर्षे थांबून देखील काही न देणाऱ्या स्पृश्यांच्या मनाचाच नीचपणा जास्त उघड होत असून ' थांबा ' म्हणणे हा त्यांचा लपंडाव असून बेगडी मुलामा आहे. तरी पण असल्या भुलभुलावणीला आता अस्पृश्य वर्ग बळी पडण्याइतका नादान राहिला नसून तो स्वाभिमानी व जागृत बनलेला आहे व त्याचेच प्रत्यंतर म्हणजे पुण्याचा सत्याग्रह होय. मुंबई येथे लवकरच मंदीर प्रवेशाच्या सत्याग्रहाची मोहीम सुरू करण्यात येणार असून ती यशस्वी करून दाखविण्यास

---

बहिष्कृत भारत : १५ नोव्हेंबर १९२९.

मुंबईतील बहिष्कृतांनी आपल्या कंबरा कसल्या पाहिजेत. प्रास्ताविक भाषणानंतर त्यांनी श्री. वनमाळी ह्यास खालील ठराव मांडण्यास विनंती केली :–

" समाज समता संघ व भारतीय बहिष्कृत समाज सेवा संघ ह्यांच्या विद्यमाने भरलेली ही जाहीर सभा पुणे येथील बहिष्कृत हिंदूंनी त्यांच्या न्याय्य व मानवी हक्कांकरता सुरू केलेल्या सत्याग्रहास आपला पूर्ण पाठिंबा देत असून ज्या ज्या स्पृश्य लोकांनी त्यांना मदत केली त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानते व आपल्या दृढनिश्चयापासून न डगमगता आपला सत्याग्रहाचा लढा चालू ठेवण्याची बहिष्कृत वर्गास विनंती करते "

वरील ठराव मांडताना श्री. वनमाळी ह्यांनी बहिष्कृतांना मंदिरात जाण्याच्या आपल्या हक्कांचे समर्थन करून तो हक्क बजावून घेत असताना स्पृश्य लोकांनी का विरोध करावा ह्याबद्दल आश्चर्य प्रकट केले.

श्री. वडवलकर ह्यांनी ठरावास दुजोरा देणारे भाषण केले. त्यानंतर ही सभा शांततामय सत्याग्रही लोकांवर हल्ला करणाऱ्या स्पृश्य लोकांचा निषेध करते, अशा अर्थाचा ठराव श्री. के. सी. ठाकरे ह्यांनी मांडिला.

वरील ठरावास श्री. द. वि. प्रधान यांनी दुजोरा देणारे भाषण केले.

श्री. खटावकर व आचार्य ह्यांची भाषणे होऊन ठराव पास झाला. तिसऱ्या ठरावान्वये अस्पृश्य लोकांवर होत असलेला हल्ला स्वतःच्या डोळ्याने पाहात असताना देखील कलेक्टरने ताबडतोब बंदोबस्त केला नाही म्हणून दिलगिरी प्रदर्शित करण्यात आली. या सभेत श्री. देवराव नाईक व भुस्कुटे यांचीही भाषणे झाली. कोणत्याही जुलुमी सत्तेविरुद्ध सत्याग्रह करण्याचा हक्क जुलुमाखाली दडपलेल्या लोकांस असतो म्हणून तो करण्याचा सल्ला डॉ. आंबेडकर बहिष्कृतास देतात परंतु येथे गिरणी कामगार युनियनचा गिरण्यांच्या मालकांविरुद्ध जो लढा सुरू झाला होता, त्यास डॉ. आंबेडकरांनी का विरोध केला, असा प्रश्न सभेच्या सुरुवातीला एका पृच्छकाने केला असता सभेचे काम बरखास्त करण्यापूर्वी त्याचे उत्तर देण्याचे आश्वासन त्यांनी त्यास दिले होते. त्यानुसार डॉ. बाबासाहेब म्हणाले,

आपण गिरणी कामगार युनियनला का विरोध केला याबाबत गेल्या संपाच्या कारणांची व परिस्थितीची बऱ्याचशा जणांना माहिती नाही असे दिसते. एकतर हा संप सार्वत्रिक नव्हता, गिरण्यात काम करणाऱ्या मुसलमान कामकऱ्यांपैकी एकही कामगार संपात सामील झालेला नव्हता व ज्या भागातील गिरण्यांमध्ये मुसलमान कामगार जास्त संख्येने आहेत, त्या गिरण्या अगदी बिनबोभाट चालू होत्या. तसेच संपाच्या एक दिवस अगोदर गिरणी कामगार युनियनचे अध्यक्ष,

सेक्रेटरी व इतर दोन लोक मला भेटावयास आले. त्या वेळेस तेथे श्री. देवराव नाईक व श्री. द. वि. प्रधान हेही हजर होते. बरीचशी चर्चा होऊन संपास पुरेशी कारणे नसताना व भरभक्कम पैशाचे पाठबळ नसताना संप करणे मूर्खपणाचे आहे, असे गिरणी कामगार युनियनच्या लोकास मी सांगितले व जर संपास अगदी पुरेशी कारणे असतील व त्यात जर आमच्या बहिष्कृत वर्गाचा काही फायदा होत असेल तर मी मोठ्या आनंदाने संपास पाठिंबा देऊन संपात सामील होईन, असे सांगितले.

नंतर मी स्वतः संपाच्या सर्व कारणांचा तपास केल्यावर माझी अशी खात्री झाली की, हा संप काही लोक स्वतःच्या अरेरावी मतावर करून टिकवू पहात आहेत. युनियनने दिलेली अभिवचने जर युनियनचे चालक पाळणार नाहीत, तर त्या युनियनच्या शब्दास कवडीकिंमत राहणार नाही, अशी परिस्थिती होती. मुंबई सरकारने नेमलेल्या संप चौकशी कोर्टापुढे साक्षी देताना ह्याच युनियनच्या अधिकाऱ्यांनी आपली संघटना विस्कळीत झाली म्हणून आपण संप केला असा धडधडीत कबुलीजबाव दिलेला आहे, हे सर्वांनी लक्षात ठेवावे.

तिसरे मुख्य कारण म्हणजे अजूनपर्यंत जे जे काही संप झाले त्यात बहिष्कृतांना कोणत्याही प्रकारे न्याय मिळाला नसून त्यांना कपडे खात्यात असलेली बंदी अजूनही कायम आहे. जमल्यास कपडे खाते बहिष्कृतांस मोकळे व्हावे व मुंबईच्या लोकास कपड्याचे काम यावे म्हणून विरोध केला. कारण येथील स्पृश्य लोक त्यास काम शिकविण्यास तयार नाहीत. म्हणून वऱ्हाडातून १३० माणसे आणली. परंतु कपडे खात्यातील स्पृश्य लोकांनी आपण अस्पृश्य लोकांबरोबर काम करणार नाही म्हणून ठिकठिकाणी ह्या स्पृश्य वर्गीय मजुरांनी संप केले व त्यामुळे आपण आणलेल्या अस्पृश्य मजुरांना परत जावे लागले, अस्पृश्यांवर जुलूम हाच जर कामगार चळवळीचा न्याय असेल तर कामगारांना जात नाही म्हणून नेहमी ओरडणाऱ्या स्पृश्य पुढाऱ्यांनी याचा जबाब द्यावा.

त्याचप्रमाणे गिरणीतील कोणतीही मोठी जागा अस्पृश्य वर्गाच्या लोकास देण्यात येत नाही. कारण काय तर हे जात मानणारे स्पृश्य कामगार अस्पृश्य अंमलदारांच्या व मुकादमाच्या हाताखाली काम करण्यास तयार नसतात. गिरणीतील नळावरची भांडणे व स्पृश्य स्त्रियांकडून अस्पृश्य स्त्रियांचा होणारा पाणउतारा करणे या नित्याच्या बाबी आहेत, ज्या चळवळीमध्ये बहिष्कृतांच्यावर जुलूम होत असून तो चालू ठेवण्याची प्रवृत्ती त्यात असेल अशा कोणत्याही चळवळीस विरोध करणे हेच आपले कर्तव्य होय.

ज्यांना बहिष्कृत वर्गाच्या सहकार्याची अपेक्षा असेल त्यांनी बहिष्कृतांस न्याय दिला पाहिजे. जेथे जी माणसे माझ्या बहिष्कृत वर्गास न्याय देऊन त्यांची गुलामगिरीतून व आहे त्या स्थितीतून वर आणण्याची अंतःकरणपूर्वक चळवळ करीत असतील त्या लोकांशी सहकार्य करण्यास मी कधीही मागे पाहणार नाही. परंतु प्रत्येक चळवळीचे सूत्र म्हणजे बहिष्कृतांस न्याय व समतेची वागणूक हेच असेल, तरच ते न्याय्य व रास्त ठरेल. अप्पलपोट्या स्पृश्यांच्या फायद्याच्या चळवळीशी मला काही कर्तव्य नाही. पुन्हा आपण सर्व लोकांस पर्वतीच्या सत्याग्रहास मदत करण्याची विनंती करतो. अशाप्रकारे सभेचे काम संपल्याचे ९ वाजता जाहीर झाले.



# ३२

# केवळ शिक्षणाने योग्यता येते असे नाही

धारवाड जिल्ह्यातील बहिष्कृतांची पहिली परिषद डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली धारवाड येथे ता. २८ डिसेंबर १९२९ रोजी सायंकाळी किल्ल्याच्या अद्याप उभ्या असलेल्या भव्य वेशीनजीकच्या विस्तीर्ण पटांगणात मोठ्या विलक्षण उत्साहाने भरली होती. सभेला जिल्ह्यातून अस्पृश्य प्रतिनिधी महार, मांग, चांभार, भंगी, ढोर इत्यादि हजारावर आले होते. सभास्थानी अस्पृश्यांखेरीज इतर स्पृश्य नागरिकही अनेक आले होते. व्यासपीठावर म्हैसूरच्या सौ. कनकलक्ष्मी आम्मा, श्री. गुदलेडू कृष्णारायपा हे बसले होते. स्पृश्यांमध्ये डॉ. किर्लोस्कर, डॉ. कमलापूर वगैरे बरीच ठळक ठळक मंडळी दिसत होती. रीतीप्रमाणे स्वागतपर पद्ये झाल्यावर स्वागताध्यक्ष वाय. बी. सांबाणी यांचे लहानसेच भाषण झाले.

नंतर येथील कर्नाटक कॉलेजमधील अस्पृश्य विद्यार्थी मि. एस. एन. माने यांनी डॉ. आंबेडकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावे म्हणून मराठीत सूचना आणली, तीत सेक्रेटरी मि. सबाणी यांनी कानडीत अनुमोदन दिले. रा. सा. पापाण्णा जालिहाल, बेळगाव यांनी दुजोरा दिल्यावर अध्यक्ष टाळयांच्या गजरात स्थानापन्न झाले. अध्यक्षांच्या भाषणाच्या आरंभी सेक्रेटरींनी परिषदेला परगावाहून आलेले संदेश वाचून दाखविले ते मि. राजभोज, पुणे, मि. स्टार्ट, नाशिक, दे. भ. गंगाधरराव देशपांडे, हुबळी (बेळगाव), ना. जाधव, सुभेदार, घाडगे, डी. सी. मिशन, पुणे वगैरे संदेश वाचल्यानंतर अध्यक्षांचे भाषण झाले. ते अर्थात मराठीतच झाले. डॉ. आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

झालेल्या स्तुतीला आपण स्वतः पात्र आहो की नाही हे ठरविणे आपण स्वतःला केवळ अशक्य आहे, तरी स्तुतीला पात्र ठरविणे श्रोत्यांच्याचकडे आहे. आपण विलायतेहून आलो तेव्हा मानपत्र देण्याविषयी मंडळींनी फारच खटपट केली. पण मी कोणत्या मोहाला न जुमानता मानपत्र स्वीकारले नाही. याचे कारण माझ्या मते उघड आहे. मानपत्र घेण्याला लायकी पाहिजे. केवळ शिक्षण घेतले म्हणजे ती योग्यता आपणास येते असे मला वाटत नाही. मनुष्य विद्वान झाला की, तो समाजाला उपयुक्त होतोच असे नाही. विद्वान मनुष्य लुच्चा, लबाड, उसण्या, लटपट्या आणखी वाटेल त्या दुर्गुणांचा असतो. आजच्या

---

ज्ञानप्रकाश : १ जानेवारी १९३०.

परिस्थितीत विद्वान, शिकलेले, पुढारलेले हे अस्पृश्यांशी कसे वागतात ते पाहातच आहोत. पण हे असे चालायचेच कारण, स्पृश्यास्पृश ही घडी कालातीत आहे आणि कोणीही व्यक्ती ही घडी केव्हा निघेल हे आज छातीठोकपणे सांगू शकणार नाही. अस्पृश्यता निवारणाचे अनेक मार्ग आहेत, त्यात महत्त्वाचा म्हणजे, राजकीय सत्ता आपल्या ताब्यात घेणे हाच होय. तुमच्या सुधारणेसाठी तुमच्यात अलिकडे अनेक स्पृश्य लोक वावरू लागले आहेत. साहेब लोकही आपल्याविषयी कळकळ दाखवितात. पण हळूच म्हणतात की, राहणी सुधारा, स्वच्छ राहा, नवीन दृष्टी ठेवा. या गोष्टी योग्य आहेत, नाहीत असे नाही. पण लक्षात ठेवा की, या सर्व गोष्टी राजकीय सत्तेच्या आधीन आहेत.

राजकीय सत्ता आली की सर्व काही होईल. राजकीय सत्तेच्या अभावी जी काय होत आहे ती केवळ सुधारणा आहे, आणि राजकीय सत्ता मिळेपर्यंत ही सुधारणा काही बंद होत नाही. नुकताच आपणाला स्टार्ट कमिटीवर जाण्याचा योग आला आणि त्यामुळे ' रानटी लोक ' ज्यांना मानण्यात येते त्यांच्याशी आपला परिचय झाला. त्यांच्यात आणि आपल्यात काय फरक आहे, केवळ वस्त्रप्रावरण हाच बाह्यात्कारी फरक. कोणी कितीही सांगितले तरीही हे लोक आपला पेहराव कधीही सोडणार नाहीत. आज ह्या पेहरावामुळेच ते अगदी निराळेच दिसतात. या लोकांची सुधारणा काही पोशाखाने होणे नाही. सुधारणेच्या कामी पेहराव वगैरे कुचकामाचे आहे.

रानटी लोक आणि हिंदू समाज व अस्पृश्य समाज यामध्ये बराच फरक दिसतो. एकमेकातील चाली वगैरे भिन्न भिन्न आहेत. सरकारला अस्पृश्योद्धाराच्या बाबतीत कायदा करण्याचे धारिष्ट्य नाही. इतर जातींचा रोष आपणावर ओढून घेण्याला सरकार धजत नाही. राजकीय सत्तेचा काही अंश हाती आल्याखेरीज आपल्या सुधारणेला खरा जोर बसत नाही. राजकीय सत्ता हाती घेण्याचा आम्ही प्रयत्न केला पाहिजे, तसा वरिष्ठ दर्जाच्याही जुलुमाला दूर करण्याला झटले पाहिजे. झटापट सर्व बाजूनेच करायची आहे. कोकणात अस्पृश्यांची स्थिती केवळ गाववाल्यांच्या मर्जीवरच अवलंबून आहे. अस्पृश्यांना गावाचे पाटील अनुकूल पाहिजेत. पाटील बिथरले की, तो व गुंड अस्पृश्यांना अगदी भंडावून सोडतात. त्यांच्यावर कडकडीत सामाजिक बहिष्कार घालतात तसा तो त्यांना तेथे घालता येतो. अशा बहिष्काराला अर्थातच अस्पृश्य घाबरतात आणि साहजिकच ते प्रस्तुतच्या चळवळीपासून दूर राहू इच्छितात आणि राहतातही. अस्पृश्यांची स्थिती आजही विचित्र आहे.

या इंग्रजी राज्यात अस्पृश्यांवरील सामाजिक बहिष्कार दूर करणारा कायदा काही खास होत नाही. आपले आता स्पष्ट मत झाले आहे की आपण सर्वांनी स्वराज्यवादीच झाले पाहिजे. या देशात निदान महार, मांगांना स्वराज्य पाहिजे. सद्याच्या स्वराज्याच्या भानगडीत देणेही दुसऱ्याचे पदरात पडेल. आता स्वराज्याची घटना होत आहे. त्यात आम्हा गरजू लोकांना मात्र वाटा आला पाहिजे ; पण या स्वराज्याच्या वाटाघाटीत काही तथ्य आहे असे मला वाटत नाही. माझा इंग्रज सरकारवर विश्वास नाही मी स्पष्ट सांगतो. आमच्या उद्धारार्थ हे सरकार काही करणार नाही, आमचा उद्धार आम्हीच करून घेतला पाहिजे. स्वागताध्यक्ष म्हणतात की, अस्पृश्यता आहे तोपर्यंत स्वराज्य मिळत नाही. पण ही केवळ भूल आहे. इंग्रज सरकार काही तत्त्वज्ञानानुवर्ती नाही. ते पक्के व्यवहारी आहे. ते काही मागतील त्याला स्वराज्य द्यायला आलेले नाही. इंग्रज सरकार चावणाऱ्या, ओरबडणाऱ्याला खूष करणार, ते आपले साम्राज्य सुरक्षित आहे की नाही हे पाहाणार. त्याला तुमच्या भानगडीशी काहीच कर्तव्य नाही. या देशातील सुखाकरिता स्वराज्य कोणी देणार नाही. सांप्रत स्वराज्याच्या बाबतीत वाटाघाटी चाललेली आहे. त्यात तुम्हा आम्हाला विचारताहेत काय ? महात्मा गांधी, सप्रू, नेहरू, जिना यांच्याशी विचारविनिमय करीत आहेत. या लोकांचा आपल्याशी किती संबंध येत असेल ते दिसतेच आहे. यासाठी आता आपण स्वराज्यवादी झाले पाहिजे ; पण नुसते ते स्वराज्य मिळवून तरी काय होणार आहे ? स्वराज्याची आपणास लायकी पाहिजे. आपण आरडा ओरड केली तर आपणाला पाहिजे ती सत्ता मिळेल ; पण ज्ञानाशिवाय ती व्यर्थ आहे. अस्पृश्यांच्या नुसत्या बहुसंख्येप्रमाणे काही होणे नाही. स्वराज्याच्या उपभोगार्थ लायकीच पाहिजे. आपली सामाजिक स्थिती इतर समाजाच्याहून अगदी भिन्न आहे. आपला हा जातिभेद इतर समाजातही आहेच ; पण आपल्यात एक अगदी विशेष नमूनादाखल असा दुसरा गुणभेद आहे.

जातीभेद व गुणभेद समांतरगामी आहेत. ते आजही पॅरलल आहेत. असा प्रकार इतर कोणत्याही देशात आढळणार नाही. आम्ही अनादी काळापासून आनुवंशिक गुण मान्य केले, त्याचे दुष्परिणाम भोगतो आहो. कितीही विद्वान अस्पृश्य दूरच राहतो. पण अडाणी ब्राह्मण वरच्या जागी वावरतो. हे आजवर केवळ अज्ञानानेच चालू देण्यात आले. अज्ञान नसते तर समतेचा लढा केव्हाच सुरू झाला असता. ब्राह्मण गुणाने कनिष्ठ असला तरी जन्माने श्रेष्ठ असतो.

गुणभेदाचे अंतर नाहीसे झाले पाहिजे. त्यासाठी शिक्षणाचा प्रसार झाला पाहिजे. आपण फार जागृत झाले पाहिजे. संधी प्राप्त होणे आणि ती पदरात पाडून घेणे हे आपल्याकडे आहे. शिक्षणाच्या अभावी हे सुसाध्य होत नाही. आपण स्वतः आपले हक्क बळकावण्याचा, मी बळकावण्याचाच म्हणतो– प्राप्त करुन घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

आपला हा माणुसकीचा झगडा आहे. यासाठी शेवटी सत्याग्रह करावा लागेल. तो शेवटचा उपाय होय. स्वकीय आणि परकीय या उभयतांशीही सत्याग्रह करावा लागेल. उभयतांही अन्याय जसे करतील तसेच त्यांच्या विरोधात उपाय योजले पाहिजेत. पुराणकालीन कौरवपांडवांचा एवढा मोठा लढा का झाला ? तर केवळ राज्य. अस्पृश्यता सर्व समाजाचे कल्याण होऊ देणार नाही. मात्र आपला आपण दर्जा वाढविला पाहिजे. लक्षात ठेवा की, आपल्या उद्धाराचा लढा आपणाला केव्हा तरी करावा लागणारच. स्पृश्य जनतेतील दुराभिमान कसा जाणार. पुराणमताभिमानी हे असणारच. मला अखेरीस इतकेच सांगावयाचे आहे की, स्वावलंबनाचा मार्ग चोखाळा. तुम्हाला या स्थितीत ठेवण्याची कारवाई फारच बध्दमूल आहे. तुमचे ते महारकी वतन, त्या वतनाच्या अभिमानाने तुम्ही किती परावलंबी झाला आहात याची तुम्हाला कोठे कल्पना आहे. या महारकी वतनाने महार हा खेडेगावात कायमचाच डांबून टाकला आहे.

महार म्हणजे सरकारी भिकारी. प्रत्येक खेड्यात असे सरकारी भिकारी या वतनामुळे लाभले आहेत. महाराने या भिकारी करणाऱ्या वतनाच्या नादी न लागता मनगटाचे जोरावर संघर्ष केला पाहिजे. स्वतःच्या शिक्षणार्थ त्याने स्वतःच मदत केली पाहिजे. त्याला दुसरे कोणीही मदत करणार नाहीत. काही उदारमनस्क मदत करतील.

उंदरांची मदत केवळ उसनवारी होय. महार लोक गरीब पण संख्येने काय कमी आहेत ? त्यांनी स्वतःचीच मदत एकवटावी म्हणजे त्यांच्या शिक्षणाचा प्रश्न आपोआपच सुटेल. धारवाड जिल्ह्यातून एक लाख महार असतील. प्रत्येकाने एक एकच रूपया दिला असता एक लाख रूपयांचा फंड जमेल आणि त्यावर शंभर मुलांचे बोर्डिंग चालेल. सांप्रत येथे एक बोर्डिंग स्थापन झाले आहे. सरकारी आश्रम आहे. ग्रँट पुरेशी आहे. प्रत्येक विद्यार्थ्यामागे दहा रूपये मिळतात. इतरत्र इतर मदत दिली जात नाही. तूर्त पंधराच मुलांची सोय झालेली आहे. भांडले असता ही संख्या दुपटीपर्यंत नेता येईल; पण यापेक्षा तुमची सोय तुम्ही करा. सध्या ह्या बोर्डिंगची व्यवस्था आपल्याकडे

आहे. आपण मुबईस आणि बोर्डिंग येथे. अंतर फार दूर. व्यवस्था व्हावी तशी होत नाही यासाठी एक कमिटी स्थापन करा आणि आपली आपण व्यवस्था पहा. धारवाड जिल्ह्याच्या अस्पृश्य विद्यार्थ्यांची सोय आहे, यापेक्षा विशेष झाली पाहिजे ती तुमची तुम्हाला करून घेता येईल.

याप्रमाणे डॉ. आंबेडकरांनी आपल्या बांधवांस कळकळीने सांगून आपणास अध्यक्षस्थान दिल्याबद्दल आभार मानून टाळयांच्या गजरात आपले भाषण संपविले.



# ३३

# एकसंध भारत आमचे ध्येय आहे

'' सायमन कमिशनच्या शिफारशीबाबत अस्पृश्य वर्गाची प्रतिक्रिया समजून घेण्याची आणि त्यांच्या राजकीय हक्काकरिता भावी धोरण ठरविण्याची आवश्यकता होती. शिवाय विलायतेत होणार असलेल्या राउंड टेबल परिषदेत अस्पृश्य वर्गाचे प्रतिनिधी जाणे तितकेच महत्त्वाचे होते. कारण हिंदुस्थानच्या भावी राज्यघटनेची योजना त्या परिषदेत आखली जाणार होती आणि देशाचे भवितव्य निश्चित करताना या देशातील सात कोटी अस्पृश्य वर्गाचे राजकीय भवितव्य त्या समाजाच्या प्रतिनिधींना ठरविण्याचा हक्क मिळणे अगत्याचे होते. त्याकरिता अखिल भारतीय स्तरावर अस्पृश्य वर्गाचे अधिवेशन बोलावण्याची निकड होती. अशा प्रकारचे अधिवेशन घेण्याचा अग्रमान नागपूरला लाभला.

येथील स्थानिक पुढाऱ्यांनी ही अखिल भारतीय अस्पृश्य परिषद नागपूरला घेण्यात यावी असा निर्णय घेतला आणि त्याप्रमाणे दशरथ पाटील व लक्ष्मणराव ओगले, एम. एल. सी, यांनी मुंबईला जाऊन डॉ. आंबेडकरांची भेट घेतली. त्या भेटीत अ. भा. दलित वर्गाची परिषद डॉ. आंबेडकरांच्या अध्यक्षतेखाली नागपूरला भरविण्याचे निश्चित झाले. नागपूरला घेण्यात येणारे ८ व ९ ऑगस्ट १९३० चे अ. भा. डिप्रेस्ड क्लासेस काँग्रेसचे अधिवेशन हे अस्पृश्य वर्गाच्या उत्थानाच्या चळवळीतील अशा व्यापक स्तरावरील व प्रातिनिधिक स्वरूपाचे पहिलेच होय !

## स्वागत कमिटीचे पदाधिकारी

स्वागताध्यक्ष टी. सी. साखरे, नागपूर, उपाध्यक्ष दशरथ लक्ष्मण पाटील, बेला, खजिनदार विश्रामजी सवाईथूल, नागपूर, सेक्रेटरीज एल. के. ओगले, एम. एल. सी; अमरावती, हरदास एल. एन., कामठी, पी. के. भटकर, अमरावती, शामराव जी. राहाटे, वडगांव, एच. डी. बेहाडे (मातंग पुढारी), नागपूर. ''[१]

अ. भा. दलित काँग्रेस परिषदेसाठी कोणाकोणाला बोलवावे आणि परिषद कोणाच्या अध्यक्षतेखाली व्हावी यासाठी परिषदेचे सचिव हरदास एल. एन. यांनी शिवराम जानबा कांबळे, पुणे, यांना पत्र लिहिले. ते पत्र आणि शिवराम जानबा कांबळे यांनी पाठविलेले उत्तर पुढीलप्रमाणे–

---

[१] विदर्भातील दलित चळवळीचा इतिहास : हि. ल. कोसारे, पृ. १४७-१४८

" THE ALL INDIA DEPRESSED CLASSES CONGRESS

Office
Vishram Hall,
Lakadganj Cir. 15/10
Nagpur city
Dated the 1st February, 1930.

Reception Committee Chairman-K.G. Nandagawali,
Vice-Chairman-D.L. Patil,
Treasurer-V.S. Sawaitul,
Secretaries-L.K. Ogale, MLC, Hardas L. N.,
P. K. Bhatkar, H.D. Behade.

To,
Mr. S.J. Kamble,
Poona,
Dear Sir,

You are aware of the proposed Round Table Conference which is to be held in London next autumn to discuss the future political Constitution of India. I am sure, you will agree that the Depressed Classess must at this critical juncture assert themselves and make it clear to the power that be as to what safeguards and guarantees the future Constitution of India must contain for the protection of their civic right. The discussion of this momentous issue requires the immediate attention of our people. To bring out people from the different provinces of India together for the purpose of this discussion we have in consulation with Dr. B. R. Ambedkar, MA., Ph.D., D.Sc., Bar-at-Law., MLC, Bombay, thought of convening an All India Depressed Classess Congress at Nagpur some time immediately after the publication of the Report of the Simon Commission and have in anticipation of your consent formed a Reception Committee.

We shall feel obliged, if you kindly favour us before the 15th February next with your views about the advisibility of holding such a Congress and name of the person, whom you would like to preside over it.

Thanking you in anticipation,
Remain,
Yours sincerely,
Hardas L.N.
Secretary, A.I.D.C
C.C., Nagpur.

शिवराम जानबा कांबळे यांनी उत्तरादाखल पाठविलेले पत्र.

Kamtipura, 5th Street,
Camp Poona
February, 1930.

To,
The Secretary,
All India Depressed Classes Congress,
Nagpur.

Dear Sir,

I am in receipt of your printed letter of 1st February 1930 and I am glad to read that you are holding shortly an " All India Depressed Classes Congress " at Nagpur.

With regards to the Presidentship of the proposed Congress. I suggest the name of Dr. Ambedkar and also that he should be sent to London as the representative of the Depressed Classes for the Round Table Conference.

Wishing every success in your endeavours, to uplift the cause of our six crores of fellow brothers, who have been downtrodden by the Caste Hindus for years together.

I remain,
Yours Sincerely,
Shivram J. Kamble."[१]

दि. ८ आणि ९ ऑगस्ट १९३० ला परिषद घेण्याचे निश्चित झाल्यावर परिषदेचे सेक्रेटरी हरदास एल. एन. यांनी खालीलप्रमाणे पत्रक प्रसिद्ध केले.

" THE ALL INDIA DEPRESSED CLASSES CONGRESS
OFFICE VISHRAM HALL, NAGPUR CITY

Dated 20th June, 1930.

Circular No. 5
Ref. No.
Dear Sir,

As it was noticed from reports in the papers that the Report of the Simon Commission will be published on the 24th June, we were in a position to fix the date of our Congress and the Provincial Reception Committee at it's meeting dated 24th May 1930 had appointed the 12th and 13th of July 1930, giving sufficient time for our leaders to study the Report and come to some definite understanding.

But we are asked by Dr. Ambedkar to reconsider the dates fixed. He says that the first volume of the Simon report was out on 10th instant, but there is no copy available as yet and he is told that it will not be available till the 22nd. The Second Volume is due on the 24th and if similar delay taken place in getting the copies thereof, we are afraid we shall be holding the Congress, if we keep to the above dates, either without seeing the

[१] Dr. B.R. Ambedkar through correspondence : Edited by V.G. Surwade, Vol. I P.P. 83,84.

Report or without having studied it. Such a situation if it were to materalise will render the Congress futile. We must, therefore, guard against such a contingency and the dates of the Congress ought to be changed.

For this purpose our Reception Committee met on 20th and fixed the 8th and 9th of August 1930 as the dates for our Congress. We may also have time for the subject committee to meet and according to the suggestion of Dr. Ambedkar on Reception Committee invites all our leaders to be in Nagpur on the 7th, a day previous to the meeting. No doubt these dates being holidays will suit to our leaders to attend the Session.

It has also been decided by the Provincial Reception Committee from the opinions received that Social, Educational, Youth and Women's Conference's should also be held along with the Congress and that Rao Sahib Rama Charan, B.A., LL.B. Advocate, MLC (U.P.) of Lucknow, Rao Sahib V.I. Munishwamy Pillay, F.M.U.M.T.C. (Madras) of Ottacamund, Mr. M.B. Mullick, M.A., B.L., Advocate, MLC (Bengal) of Calcutta and Shreematee Gunabai Gadekar of Poona should be invited to preside over the Conferences in the order they have been mentioned above and I have the pleasure to inform you that they have accepted the offers. Separate Reception Committees have been formed for each of these Conferences and 10th and 11th have been appointed for them.

Depressed Classes all over India are earnestly requested to send their delegates to make the Congress and the Conferences successful. The names of delegates, draft resolutions will be sent to the Secretary of the All India Depressed Classes Congress Office, Vishram Hall, Nagpur City.

I remain

Yours most sincerely,

Nagpur City — Hardas L.N.

The 20th June, 1930. — Secretary "[1]

" डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या राहण्याची सोय राज्यपाल भवनाशेजारी असलेल्या अबदुलभाई खाकरांच्या बंगल्यात करण्यात आली होती. परंतु डॉ. आंबेडकरांनी एकटे वेगळे राहण्याचे नाकारले आणि परिषदेला आलेल्या इतर पुढारी मंडळीच्या बरोबरच ते राहिले. या पाहुणे मंडळीकरिता कॉटन मार्केटात शामियाना टाकून त्यांच्या राहण्याची सोय करण्यात आली होती. अधिवेशन व्यंकटेश थिएटर* येथे पार पडले.

---

[१] तत्रैव : पृ. ९९-१००

* नंतरचे शाम टाकीज

ह्या परिषदेबरोबर सामाजिक, महिला, युवक व शिक्षणविषयक परिषदा घेण्यात आल्या. हे कार्यक्रम १० ऑगस्टला घेण्यात आले. सामाजिक परिषदेचे अध्यक्ष पां. ना. राजभोज व स्वागताध्यक्ष दशरथ पाटील होते. महिला परिषद पुण्याच्या सौ. गुणाबाई गडेकर यांच्या अध्यक्षतेखाली झाली. महिला परिषदेच्या स्वागताध्यक्षा सौ. शेवंताबाई ओगले, अमरावती आणि सेक्रेटरी सौ. तुळसाबाई बनसोडे पाटील, नागपूर, सौ. जाईबाई चौधरी, नागपूर व सौ. काशीबाई मांडवधरे, अकोला ह्या होत्या. युवक परिषदेचे अध्यक्ष लखनौचे ॲड. शीवदयालसिंग चौराशिया आणि स्वागताध्यक्ष राघवेन्द्रराव बोरकर होते.

## दलित काँग्रेस परिषदेचे महत्त्व

१९३० मध्ये नागपूरला झालेल्या अ. भा. दलित काँग्रेस परिषदेला दलित वर्गाच्या उत्थानाच्या चळवळीत एक विशेष राजकीय ऐतिहासिक महत्त्व आहे. पहिली गोष्ट, भारतातील सर्व अस्पृश्य समाज एका छत्राखाली येऊन अखिल भारतीय पातळीवर भरविण्यात आलेले दलित काँग्रेसचे हे पहिलेच अधिवेशन होय! दुसरी गोष्ट, अस्पृश्य वर्गाच्या पुढाऱ्यांनी डॉ. आंबेडकरांचे एकमेव नेतृत्व प्रथमतःच मान्य करून आपल्या राजकीय मागण्या भारतीय स्तरावर एकमुखाने समोर ठेवल्या. तिसरी गोष्ट, विलायतेस होणाऱ्या राऊंड टेबल परिषदेकरिता अस्पृश्य समाजाचे एकमेव नेते म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची एकमताने निवड केली गेली. चवथी गोष्ट, दलित वर्गाची अखिल भारतीय संघटना कायम करण्यात आली आणि पाचवी गोष्ट, या परिषदेत बहिष्कृत वर्गाच्या भावी राजकीय जीवनाचा ध्येयधोरणात्मक मूलभूत पाया घातला गेला. सारांश, माणुसकीस मुकलेल्या ह्या बहिष्कृत भारताच्या स्वातंत्र्य आंदोलनातील इतिहासाचे पहिले पान दलित काँग्रेसच्या अधिवेशनाने लिहिले गेले!

## समाजाचे शतशः धन्यवाद !

ज्या समाज पुढाऱ्यांनी व समाज कार्यकर्त्यांनी आणि सेवकांनी ह्या दलित काँग्रेसच्या अधिवेशनाची धुरा सांभाळली नि बहिष्कृत वर्गाच्या राजकीय क्रांतीला प्रथमतः चालना दिली आणि सामाजिक जीवनात आमुलाग्र परिवर्तन घडवून आणण्याकरिता संघटीत पाऊल उचलले, त्यांचे या समाजावर अनंत उपकार आहेत. आत्मोद्धाराच्या आंदोलनातील पहिले संघटीत पाऊल डॉ. आंबेडकरांच्या प्रभावी नेतृत्वाखाली १९३० साली दलित काँग्रेसने या अधिवेशनाद्वारे प्रथम टाकले.

## परिषदेतील ठराव

अ. भा. डिप्रेस्ड क्लासेस काँग्रेसच्या १९३० च्या नागपूर अधिवेशनात पास झालेले ठराव खालीलप्रमाणे आहेत :–

**१.** ही काँग्रेस असे निःसंदिग्ध जाहीर करते की, भारतीय राष्ट्रीय काँग्रेसने संपूर्ण स्वातंत्र्याचा जो विचार जाहीर केला आहे, तो भारताच्या हितसंबंधाला

घातक व नुकसानकारक ठरणार आहे आणि म्हणून त्या राष्ट्रीय काँग्रेसच्या संपूर्ण स्वातंत्र्याच्या मागणीला आमचा मुळीच पाठिंबा नाही. ह्या काँग्रेसच्या मते वसाहतीचे स्वराज्य हेच भारताच्या परिस्थितीला सर्वोत्तम असे ध्येय होय.

२. वसाहतीचे स्वराज्य ताबडतोब मिळण्याच्या उद्दिष्टांच्या बाबतीत सत्तेचे हस्तांतरण करताना, ज्या जबाबदारीच्या अधिकाराच्या बाबीसंबंधी ताबडतोब सत्तांतर करणे राज्यकारभाराच्या कुशलतेच्या कारणास्तव अव्यवहार्य आहे त्या बाबी खेरीज करून, बाकी सर्व जबाबदारीच्या अधिकारविषयक बाबीसंबंधीची अधिसत्ता प्रदान करण्यास ह्या काँग्रेसचा कोणताही विरोध नाही, परंतु हे करीत असताना अस्पृश्य वर्गाच्या हितसंबंधाचे संरक्षण होण्याकरिता हिंदुस्थानच्या राज्यघटनेत खालील बाबींचा अंतर्भाव करण्यात यावा :–

(१) देशाच्या सर्व कायदे मंडळात, मध्यवर्ती त्याचप्रमाणे प्रांतिक, यथायोग्य प्रतिनिधित्व;

(२) देशातील सरकारी नोकऱ्यात योग्य प्रमाणात राखीव जागा.

३. अस्पृश्य वर्गाच्या शिक्षण विषयक, स्थानिक स्वराज्य संस्था आणि त्यांचे हक्क व हितसंबंधाच्या बाबीकडे दुर्लक्ष होत असल्यास त्यासंबंधी भारत मंत्र्याकडे (सेक्रेटरी ऑफ स्टेट) दाद मागण्याचा अधिकार असावा; आणि अशा बाबतीत अंदाजपत्रकामध्ये अथवा कायद्यात तरतूद करण्यासंबंधी भारत मंत्र्याने केलेली सूचना ही मध्यवर्ती व प्रांतिक मंत्रिमंडळास बंधनकारक असावी.

४. सनातनी सवर्ण वर्गाकडून अस्पृश्य वर्गाच्या लोकांना मिळत असलेल्या त्यांच्या अमानुष वागणुकीत त्यांनी कोणताही खरा बदल घडवून आणलेला नसल्यामुळे अस्पृश्य वर्गाचा विश्वास ते गमावून बसले आहेत, तसेच हिंदुस्थानच्या भावी राज्यघटनेत अस्पृश्य वर्गाला संरक्षणात्मक हमी देण्यास ते तयार नाहीत आणि अस्पृश्य वर्गाची अशी धारणा आहे की, सर्वमान्य अशी हिंदुस्थानची राज्यघटना बनवताना त्यात या देशात अस्तित्वात असलेल्या सामाजिक परिस्थितीचासुद्धा योग्यप्रकारे विचार होणे अगत्याचे आहे आणि त्याकरिता राज्यघटनेत आवश्यक ती तरतूद केवळ परस्पर संमतीच्या द्वारेच होवू शकते आणि कायदेभंगाची चळवळ ही दबावाची नीती असून शांततापूर्ण तडजोडीच्या धोरणाशी विसंगत असल्यामुळे, ही काँग्रेस कायदेभंगाचे धोरण मान्य करू शकत नाही आणि अस्पृश्य वर्गाच्या लोकांनी त्यात भाग घेऊ नये, असा त्यांना हितोपदेश करते.

५. सद्याचा राज्यघटनात्मक पेचप्रसंग सोडविण्याचा वर्तुळ परिषद हा अत्युत्तम मार्ग असल्याचे ही काँग्रेस मान्य करते आणि अस्पृश्य वर्गांनी त्यात सहभागी व्हावे असा हितोपदेश करते. ही काँग्रेस सरकारला असे सुचवू इच्छिते की, ही वर्तुळ परिषद पूर्णतः यशस्वी करण्याकरिता सरकारने सर्वच पक्षांना त्यात भाग घेण्याकरिता अस्पृश्य वर्गालासुद्धा योग्य प्रतिनिधीत्व देऊन बोलावले पाहिजे.

६. या देशाच्या कायदेमंडळावर अस्पृश्य वर्गाचे प्रतिनिधी नियुक्त करण्यात येत असल्याच्या पद्धतीला ह्या काँग्रेसचा विरोध आहे. अस्पृश्य वर्गाचे प्रतिनिधी त्याच समाजाने निवडणुकीद्वारे निवडून द्यावेत अशी ह्या काँग्रेसची मागणी आहे आणि सायमन कमिशनने ज्या शिफारसी केल्या आहेत, ज्यात अस्पृश्य वर्गाचे नियुक्त प्रतिनिधी हे दुसऱ्या वर्गाच्या प्रतिनिधींनी निवडून द्यावे व त्यास गव्हर्नरचे प्रमाणपत्र असावे अशी तरतूद आहे, त्याचा निषेध करते.

७. स्वतंत्र मतदार संघाच्या उपयुक्ततेबाबत विश्वास असूनसुद्धा अस्पृश्य वर्गांच्या प्रतिनिधीत्वाकरिता राखीव जागासहित संयुक्त मतदार संघाचे तत्त्व मान्य करण्यास ही काँग्रेस तयार आहे, परंतु त्याकरिता प्रौढ मतदान पद्धती स्वीकारणे आवश्यक आहे.

८. ज्या अस्पृश्य वर्गांना सामाजिक विषमतेच्या अत्यंत निकृष्ट अवस्थेत जीवन जगावे लागत आहे, त्यांच्या तुलनेत इतर दुसरे अल्पसंख्य वर्ग काहीच नाही, असे असूनही सायमन कमिशनने अस्पृश्य वर्गाला प्रतिनिधीत्व मिळण्याच्या मागणीला कमी लेखून त्यांच्या हक्कांना डावलले व इतर अल्पसंख्य वर्गांना मात्र विशेष प्रतिनिधीत्व बहाल केले, याबद्दल ही काँग्रेस खेद व्यक्त करते. सर्व अल्पसंख्यांकांना समानतेचे तत्त्व समान प्रमाणात लावण्यात यावे असे या काँग्रेसचे मत असून, अशी मागणी करते की, अस्पृश्य वर्गाला त्यांची विशिष्ट सामाजिक निकृष्टता विचारात घेऊन त्यांना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात मिळणाऱ्या प्रतिनिधीत्वाव्यतिरिक्त अधिक प्रमाणात जागा देण्यात याव्या.

९. ही काँग्रेस असेंब्ली आणि कौंसिल ऑफ स्टेट मध्ये अस्पृश्य वर्गाचे प्रतिनिधी त्याच लोकांनी निवडून देण्याकरिता अप्रत्यक्ष निवडणुकीची पद्धत मान्य करते, परंतु त्यात अस्पृश्य वर्गाचा यथायोग्य प्रतिनिधीत्वाचा हक्क मान्य करण्यात यावा अशी मागणी करते.

१०. सायमन कमिशनने कौंसिल ऑफ स्टेट मध्ये अस्पृश्य वर्गाच्या प्रतितिधीत्वाची कोणतीही तरतूद केलेली नाही. याबद्दल ही काँग्रेस खेद व्यक्त करते आणि मागणी करते की, कौंसिल ऑफ स्टेट मध्ये अस्पृश्य वर्गाचे योग्य प्रतिनिधीत्व मान्य करण्यात यावे.

**११.** असेंब्लीची फेरघडण करण्याच्यादृष्टीने सायमन कमिशनने जो आराखडा तयार केलेला आहे त्याची उपयुक्तता लक्षात घेता ह्या काँग्रेसचे असे मत आहे की, तो आराखडा असेंब्लीपेक्षा कौंसिल ऑफ स्टेटकरिता अधिक उपयुक्त आहे. ही बाब लक्षात घेऊन आणि कौंसिल ऑफ स्टेट हे अधिक लोकशाहीप्रधान बनवण्याच्या दृष्टीने त्याच्यात आवश्यक ती घटनात्मक सुधारणा करण्याची गरज लक्षात घेता, ह्या परिषदेचे असे मत आहे की, असेंब्लीकरिता सायमन कमिशनने जो आराखडा तयार केला आहे, तो कौंसिल ऑफ स्टेटकरिता लागू करण्यात यावा आणि असेंब्लीची घडण ही प्रत्यक्ष निवडणुकीच्याद्वारे करण्यात यावी.

**१२.** सायमन कमिशनने हिंदुस्थानातील लष्कराच्या बाबतीत जी योजना सुचविली आहे, ती ह्या काँग्रेसला मुळीच मान्य नाही. ह्या काँग्रेसचे असे मत आहे की, लष्कर हे जरी राखीव खाते असले तरी हिंदुस्थान सरकारच्या जबाबदारीच्या अधिकारातून ते काढून घेण्यात येऊ नये.

**१३.** ह्या काँग्रेसची अशी खात्री पटली आहे की, हिंदुस्थानातील अस्पृश्य वर्गाची एक मध्यवर्ती अखिल भारतीय संघटना असणे आवश्यक आहे. ही बाब लक्षात घेऊन ही काँग्रेस एक कमिटी नियुक्त करीत आहे ; आणि

(१) या कमिटीने अशा अखिल भारतीय संघटनेची घटना तयार करून ती काँग्रेसच्या पुढील अधिवेशनासमोर मांडावी; आणि

(२) ही कमिटी काँग्रेसची वर्किंग कमिटी म्हणून पुढील वर्षाकरिता कार्य करील आणि अस्पृश्य वर्गासंबंधी निगडीत असलेल्या सर्व प्रश्नाबाबत तसेच देशातील सद्याच्या राजकीय परिस्थितीत उद्‌भवणाऱ्या प्रश्नासंबंधी विचार करील.''[१]

## अध्यक्षीय भाषण

या अधिवेशनात दि. ८ ऑगस्ट १९३० रोजी डॉ. आंबेडकरांनी केलेले अध्यक्षीय भाषण फारच महत्त्वाचे व विचार प्रवर्तक होते. ते आपल्या भाषणात म्हणाले,–

'' सज्जनहो !

आपण आजच्या कामकाजाचे अध्यक्षपद स्वीकारण्यासाठी मला दिलेल्या निमंत्रणाबद्दल मला आनंद होत असून आपण हा बहुमान मला दिल्याबद्दल मी आपला कृतज्ञ आहे. तुम्ही माझ्यावर हा जो विश्वास टाकला त्याचे

[१] विदर्भातील दलित चळवळीचा इतिहास : हि. ल. कोसारे पृ. १४८, १४९, १६९ आणि १७१.

मूल्य मी ओळखतो. तथापि, त्याद्वारे तुम्ही माझ्यावर टाकलेली जबाबदारी अतिशय कठीण व असामान्य स्वरुपाची असून ती मी टाळण्याचा प्रयत्न केला असता तर शहाणपणाचे ठरले असते, असे मला वाटते. असे असूनही त्याला मी संमती दिली याचे कारण म्हणजे सध्याच्या आणीबाणीच्या प्रसंगी आपल्या समाजबांधवांच्या हितासाठी प्रत्येकाने आपल्या शक्तीनुसार आपली सेवा उपलब्ध करून दिली पाहिजे, असे मला सतत वाटते. तथापि, ही जबाबदारी पार पाडण्यास तुम्ही तुमच्या सहकार्यात व मदतीत कसलीही कसूर ठेवणार नाही व येथे गोळा झालेले आपल्या समाजाचे पुढारी आपल्या समृद्ध अनुभवाचा व विचारशील निर्णयाचा लाभ मला देणार आहेत, याची मला जाणीव असल्यामुळेच मी ती स्वीकारली आहे.

## १. भारतातील स्वराज्याचा प्रश्न

२. भारतातील लोकांचा स्वयंशासित अशाप्रकारचा एकसंध समाज होऊ शकेल काय? हा प्रश्न आज भारताच्या क्षितिजावर बऱ्याच मोठ्या प्रमाणात डोकावताना दिसत आहे. या प्रश्नाच्या संदर्भात दलित वर्गाचे मत काय आहे, याचा निर्णय घेण्यासाठी आज आपण येथे जमलेलो आहोत. या प्रश्नाने केवळ भारतीय लोकांच्याच नव्हे तर संपूर्ण ब्रिटिश राज्यात आणि संपूर्ण जगात हलचल माजून राहिली आहे. या प्रश्नाच्या आपल्या उत्तरावरच या देशाचे भवितव्य बऱ्याच मोठ्या प्रमाणावर अवलंबून आहे. आपण त्याला दुजोरा देऊन चालना देऊ शकतो किंवा त्याला विरोध करून त्यात खोळंबाही निर्माण करू शकतो. एकंदरीत ते आपल्याच मतावर अवलंबून आहे. म्हणून हा प्रश्न तुम्हाला ढिलाईने हाताळता येणार नाही, असे माझे मत आहे. तुम्ही त्याच्या उलट सुलट बाजूंचा विचार करूनच निर्णय घेतला पाहिजे. आपला निर्णय इतरांपेक्षा वेगळा झाला तर कसे होईल अशी भीती आपण बाळगू नये. परंतु आपला निर्णय स्वतंत्र विचाराने व विशुद्ध श्रद्धेने घेतल्या गेला पाहिजे, याची आपण काळजी घेतली पाहिजे.

३. या प्रश्नाला दोन बाजू आहेत, याची तुम्हाला जाणीव आहेच. भारतातील जनता विभिन्न मानव वंशाची मिळून बनलेली असल्याचे सांगण्यात येते. कारण येथील लोक परस्परविरोधी अशा रूढी, प्रथा व तत्त्वे असणाऱ्या भिन्न धर्माचे उपासक आहेत. ते वेगवेगळ्या भाषा बोलतात आणि परस्परविरोधी सामाजिक रूढींमुळे व विभिन्न हितसंबंधांमुळे येथील जनतेत परस्पराबद्दल बेताल द्वेष भरलेला आहे, असे त्यांचे म्हणणे आहे. असा प्रश्न विचारण्यात येतो की, अशातऱ्हेचा भिन्नवंशीय लोकांचा समूह स्वयंशासित समाज म्हणून कसा यशस्वी होऊ शकेल? ही कठोर वस्तुस्थिती असून भारतातील स्वराज्यावर त्याचे काय

परिणाम होऊ शकतील, हे कोणीही शहाणा माणूस नजरेआड करू शकत नाही. परंतु ही कठोर सत्ये मान्य केली तरी त्यापासून निर्माण होणारे निष्कर्ष कोणते ? सभ्य गृहस्थहो, या प्रश्नावरील तुमची मते मांडण्यास तुम्ही सुरू करण्यापूर्वी दुसऱ्याही काही तितक्याच कठोर सत्यांकडे मी तुमचे लक्ष वेधू इच्छितो. लॅटिव्हिया, रुमानिया, लिथिआनिया, युगोस्लाव्हिया, इस्टोनिया आणि झेकोस्लोव्हाकिया यासारख्या देशात असलेल्या स्थितीचाही विचार करा. ही नवीन राज्ये असून 'स्वयंशासन' तत्त्वाच्या स्थापनेसाठी शपथपूर्वक लढण्यात आलेल्या १९१४ च्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर अस्तित्वात आली आहेत. ही नवीनच अस्तित्वात आलेली राष्ट्रे स्वयंशासित, सार्वभौम, स्वतंत्र आणि अंतर्गत किंवा बाह्य निर्णयाबाबत सर्वश्रेष्ठ अधिकारी अशी आहेत. या राष्ट्रातील अंतर्गत सामाजिक परिस्थिती कशी आहे? तुम्हाला ऐकून आश्चर्य वाटेल की भारतापेक्षा अधिक नसली तरी भारताइतकीच तेथेही वाईट स्थिती आहे. लॅटिव्हियात लेट लोक, रशियन, ज्यू आणि जर्मन व याशिवाय इतर लोकही आहेत. लिथिआनियात लिथोनिअन, ज्यू, पोल आणि रशियन हे अन्य इतर लोकांसमवेत आहेत. युगोस्लाव्हियात सर्ब, क्रोट, स्लाव्हन रुमानियन, हंगेरियन, अल्बेनियन, जर्मन व शिवाय इतर स्लाव लोक आहेतच. इस्टोनियात इस्टोनियन, रशियन, जर्मन व इतर लहान गटाचे लोक आहेत. झेकोस्लोव्हाकियात झेक, जर्मन, मेग्यर, रुथिनिअयन आणि इतर लोक आहेत. हंगेरीत मेग्यर, जर्मन आणि स्लोव्हाक लोक आहेत. वंशांनी व भाषांनी भिन्न-भिन्न असूनही अत्यंत लढाऊ अशी आपली राष्ट्रे त्यांनी तयार केली. एकसंध राष्ट्राच्या निर्मितीसाठी या भिन्न वंशांच्या लोकांना जोडण्यासाठी धार्मिक ऐक्याचाही दुवा नाही. त्यांच्यामध्ये चार किंवा पाच प्रकारचे कॅथालिक पंथाचे लोक तुम्हाला आढळतील. तेथे रोमन कॅथॉलिक, ग्रीक कॅथॉलिक, झेकोस्लोव्हाक कॅथॉलिक पंथांचे लोक आहेत. या कॅथॉलिकांशिवाय एव्हॅंजकीलन, ज्यू, प्रॉटेस्टंट लोक व इतर लहान लहान पंथाचे अनेक लोक आहेत. यावर गंभीरतापूर्वक विचार करा. या देशात आढळणाऱ्या मानवी जगतापेक्षा भारतातील मानवी जगत अधिक भिन्न वंशीय व अधिक बजबजपुरी असलेले आहे काय ? मला खात्री आहे की ते तसे नाही. जर तुमचा भारतासंबंधीचा निर्णय प्रामाणिक व स्वतंत्र व्हावा अशी तुमची इच्छा असेल तर ही वस्तुस्थिती तुम्ही विचारात घेतली पाहिजे. सज्जनहो, या तुलनेचा परिणाम म्हणून असा प्रश्न उद्‌भवतो की, जर लॅटिव्हिया, लिथिओनिया, युगोस्लाव्हिया, इस्टोनिया, झेकोस्लोव्हाकिया, हंगेरी आणि रुमानिया हे देश, वंश, भाषा, धर्म आणि संस्कृती यामध्ये विभिन्नत्व असूनही एकसंध व स्वयंशासित राष्ट्रे म्हणून निर्वाह करू शकतात तर भारतही तसा निर्वाह का करू शकणार नाही? याला काही उत्तर आहे काय? माझ्याजवळ तर कोणतेही उत्तर नाही आणि आपल्या मित्रांपैकी जे कोणी याचे उत्तर देऊ शकतील ते ऐकण्यासाठी मी मोठ्या उत्सुकतेने वाट पाहात आहे.

४. स्वराज्याची सुविधा प्राप्त होण्यापूर्वीच एखाद्या राष्ट्रातील सर्व परस्पर विरोधी घटक नष्ट होऊन ते पूर्णतः एकसंध राष्ट्र व्हावे असा दुराग्रह धरणे माझ्या मते वस्तुस्थितीचा उलटा क्रम लावण्यासारखे असून, स्वयंशासनाच्या प्रक्रियेत एकराष्ट्रीयत्व निर्माण करण्याची जी शक्ती आहे तिच्याकडे दुर्लक्ष करणेच होय. एक भाषा, एक धर्म व एक संस्कृतीच्या सूत्रबंधनाने बांधलेली राष्ट्रे या जगात फारच कमी आहेत. परंतु धर्म, भाषा व संस्कृती यांनी भिन्न असलेल्या लोकसमूहांनी राजकीय, भौगोलिक व ऐतिहासिक समानतेमुळे एकत्र येऊन परिणामतः एकराष्ट्रीय जनता झाल्याची उदाहरणेच अनेक आहेत. अशा राष्ट्रांना एकराष्ट्रीयत्वाची कठोर कसोटी जर लावली असती, तर त्यांना स्वयंशासनाचा हक्क कधीही प्राप्त होऊ शकला नसता. यासंबंधी जे काही सांगण्यात आले व जे करण्यात आले ते जमेस धरले तरी अनेक राष्ट्रांना संघटित होण्यासाठी स्वयंशासन हेच एक महत्त्वाचे कारण ठरले नाही काय? आणि ती राष्ट्रे स्वयंशासनाच्या अभावी पूर्वी होती तशीच विभिन्न लोकांच्या समूहाच्या स्वरुपात स्पष्टपणे होती तशीच राहिली नसती काय? जर्मन साम्राज्याने स्वयंशासनाचा नियम स्वीकारणे, हेच त्याच्या एकराष्ट्रीय होण्याला कारणीभूत ठरले नाही काय? बव्हेरिअन, प्रुशिअन, सॅक्सन आणि इतर अनेक विभिन्न जनसमूह एका राष्ट्रात अंतर्भूत होऊन एका सामान्य शासनाखाली आले नसते तर १८७० सालापूर्वी होते तसेच राहिले नसते काय? विभिन्न वंशाच्या जनसमूहांना एका राष्ट्रात अंतर्भूत करण्यासाठी 'एक शासन' बरेचदा एक उत्तम उपाय ठरू शकतो. भारताच्या स्वतःच्या उदाहरणावरूनही हे सिद्ध होत नाही काय? आज भारतामध्ये जी काही किंचित एकराष्ट्रीयत्वाची व एकत्वाची भावना दिसून येते ती ब्रिटिश राज्यामध्ये एका सर्वसामान्य शासनामुळेच उद्‌भवली ही सर्वमान्य बाब नाही काय? ऐतिहासिक किंवा तर्कदृष्टीने पाहिले तरी भारतातील जनतेची विभिन्नता ही भारताच्या स्वयंशासनाच्या मार्गात आड येऊ शकत नाही, असे मला वाटते; आणि भारत हे एकराष्ट्र व्हावे असे जर ध्येय असेल तर या ध्येयाच्या पूर्ततेसाठी स्वराज्य सर्वात महत्त्वाचे साधन ठरेल, असे मी म्हणेन.

## २. या समस्येतील अटी

५. भारतामध्ये अस्तित्वात असलेल्या जनसमूहाच्या या विभिन्नत्वाचा काहीच परिणाम होणार नाही काय? स्वराज्याची घटना तयार करताना आपण त्याचा काहीच विचार करावयास नको काय ? हे प्रश्न तुम्ही मला विचाराल, याबद्दल मला मुळीच शंका नाही. परंतु का कू न करता याचे मी स्पष्ट उत्तर देतो की,

ते विचारात घेतलेच पाहिजे ! या जनसमूहाच्या भिन्नतेच्या स्थितीकडे दुर्लक्ष करून कसल्याही शर्ती व मर्यादांशिवाय भारताच्या स्वातंत्र्यासाठी अट्टाहास धरण्याची भारतातील कॉंग्रेसवाल्या लोकांची वृत्ती आहे. सज्जनहो, जर भारतातील विभिन्नता लक्षात न घेता घटना तयार करण्याचे ठरविले तर शासनाची शक्ती कोणाच्या हातात जाऊ शकेल ? अल्पसंख्यांक जमातीच्या हाती दिल्या जावी असे तुम्हास वाटते काय? खालच्या वर्णाच्या लोकांच्या हाती ती दिल्यास योग्य होईल, असे तुमचे मत आहे काय? मला जर कशाची पक्की खात्री असेल तर ती याचीच की, भारतीय समाजातील वस्तुस्थिती जमेस न धरण्यास भारताच्या भावी स्वराज्याच्या शासनशक्तीची सूत्रे भारतीय समाजातील उच्चशिक्षित, मातब्बर व महत्वाकांक्षी अशा उच्चवर्णातील लोकांच्याच हाती जातील, म्हणजे संपत्ती, शिक्षण व सामाजिक दर्जा प्राप्त असलेल्या सरंजामदारांच्या हाती ही सूत्रे जातील. जीवनाच्या अन्य क्षेत्राप्रमाणेच राजकारणातही शक्तीशाली लोकांनाच विजय प्राप्त होत असतो. या सरंजामदार वर्गाला शिक्षण व संपत्तीची शक्ती सहजपणे सहाय्यक होईल. परंतु आपल्या राजकीय वाट्यासाठी दुर्बल समाजघटकांना सरंजामदार गटाला सहाय्यकारी असलेल्या केवळ या शक्तीविरुद्धच लढून भागणार नाही तर वरपांगी अत्यंत सूक्ष्म दिसणारी पण बरीच प्रभावकारी अशी आणखीही एक शक्ती आहे. ती त्याच्या सामाजिक दर्जामध्ये अंतर्भूत आहे. या समाजरचनेच्या ठराविक साच्यात पात्रतेला किंवा गुणवत्तेला काहीच स्थान नाही. भारतात केवळ जातभावनेला विशेष महत्त्व असून ही भावना परजातीच्या लोकांशी लढण्यास प्रवृत्त करते. या भावनेचे वर्चस्व बहुसंख्यांक जमातींच्या मनात कार्यरत असल्यामुळे अल्पसंख्यांक जमातींना ते भयानक अडथळे निर्माण करतील आणि राज्य शासनाचे दरवाजे कदाचित त्यांच्यासाठी कायमचे बंद करून टाकतील. या सामाजिक परिस्थितीच्या कार्यवाहीचा भयानक परिणाम दलित वर्गावर झाल्यावाचून राहू शकत नाही. हिंदू धर्मानुसार भारतातील जातीची रचना चढत्या क्रमात आदराची व उतरत्या क्रमात तिरस्कारपूर्ण आहे, याची जाणीव तुम्हाला आहेच. या दर्जावर उतरंडीचा परिणाम म्हणून खालच्या दर्जाच्या जातीतील लोकांच्या मनात उच्च दर्जाच्या जातीतील उमेदवारासंबंधी पसंतीची भावना निर्माण होते, तर या उलट खालच्या जातीतील उमेदवारासंबंधी तिरस्काराची भावना निर्माण होते. या मानसिक स्थितीचा दलित वर्गाच्या शासन सत्तेसाठी चाललेल्या धडपडीवर निश्चितच वाईट परिणाम होईल. अस्पृश्य उमेदवाराला एकही मत न टाकता स्पृश्य लोक अस्पृश्यांची अनेक मते यामुळे मिळवू शकतील; आणि याचा परिणाम असा होईल की, अस्पृश्य केवळ निवडणूक हरतील इतकेच नाही तर अजाणपणे आपल्या

प्रतिस्पर्ध्याला साहाय्यभूत होतील. सामाजिक स्थितीकडे दुर्लक्ष केल्यामुळे धनसंपन्न, उच्चशिक्षित व उच्चवर्णाच्या लोकांची शासन सत्तेत सरंजामशाही स्थापन होणार असेल तर, आपल्या ध्येयाशी सुसंगत अशा सर्व उपायांनी त्याला आळा घालणे हे आपले कर्तव्य आहे, असे मला वाटते. कारण, केवळ आपल्या धन्याचा बदल होण्यावर आपण मुळीच समाधान मानता कामा नये. कोणत्याही देशाचे दुसऱ्या देशावर राज्य असणे चांगले नाही, हे काँग्रेसवाल्यांचे मत मला मान्य आहे. परंतु मलाही त्यांना हे स्पष्टपणे सांगण्याचे स्वातंत्र्य आहे की, त्यांचे वरील विधान तेथेच संपत नसून ' कोणत्याही वर्गाचे दुसऱ्या वर्गावर राज्य असणे ही चांगली गोष्ट नाही ', हेही तितकेच खरे आहे. युरोपियन नोकरशाही व स्वदेशीयांची सरंजामशाही हा शब्द संपत्ती, शिक्षण व सामाजिक दर्जा यासाठी मी समुच्चयाने वापरीत आहे, या दोहोंपैकी जनतेची कोण अधिक उत्तम काळजी घेऊ शकेल? सरंजामदारांचे असे म्हणणे आहे की, जनतेची परिस्थिती, त्यांच्या सवयी, त्यांच्या विचार करण्याच्या व जीवन जगण्याच्या पद्धती, गरजा व तक्रारी, आणि तडजोड करण्याच्या त्यांच्या रीतींची माहिती यांचे ज्ञान त्यांना ब्रिटिश नोकरशाहीपेक्षा कितीतरी अधिक आहे. तसे कदाचित असेलही, परंतु सरंजामदार वर्गाच्या मनात इतर वर्गासंबंधी पक्षपाताची भावना आहे; उघड दिसणारा वंशाभिमान आहे, आपल्या जातभाईची कड घेण्याची वृत्ती आहे आणि त्यामुळे सामान्य जनतेचे भवितव्य ठरविणारी शासनसत्ता त्यांच्या हाती दिल्या जाऊ नये, असा जो आरोप त्यांच्यावर आहे, त्यातून ते सुटू शकत नाहीत, असे मला वाटते. वास्तविक पाहता, कोणी याही पुढे जाऊन म्हणू शकेल की, त्यांना व सामान्य जनतेला विभाजित करणाऱ्या फार मोठ्या सामाजिक दरीमुळे त्यांना सामान्य जनतेच्या गरजा, आशाआकांक्षा यांचे ज्ञान असूच शकत नाही. इतकेच नव्हे तर हा वर्ग सामान्य जनतेच्या आकांक्षाचा फार मोठा शत्रू आहे. मी एवढा भर देऊन सांगत आहे याचे कारण म्हणजे या सरंजामदार वर्गाच्या हाती शासनसत्ता सोपविल्या जाऊ शकत नाही; कारण हजारो वर्षापासून चालत आलेल्या व आजही लागू असलेल्या लोकशाहीच्या सामान्य जनतेच्या कल्पनेशी ही कोऱ्या स्वराज्याची कल्पना विरोधी आहे. आधुनिक लोकशाही राज्यातील मूलभूत तत्त्व म्हणजे, प्रत्येक व्यक्तीचे मूल्य मान्य करणे हेच होय आणि प्रत्येक व्यक्तीला केवळ एकदाच हे जीवन जगण्याची संधी मिळत असल्यामुळे त्याला त्याच्या सुप्त गुणांची वाढ करण्यास पुरेपूर संधी मिळाली पाहिजे. परंतु भारतातील सरंजामदारांना या तत्त्वांपैकी कोणतेही तत्त्व मान्य आहे, असे म्हणता येणार नाही. त्यांचे काहीसे असे मत आहे की, सध्याचे जीवन हे अनेक जीवनांच्या शृंखलेपैकी एक असून या जीवनातील त्यांची स्थिती ही गत जन्मातील

पापपुण्यामुळे ठरते आणि म्हणून एखाद्याचे शील कितीही उज्वल असले किंवा त्याने कितीही मोठी पात्रता मिळविली तरी जन्मामुळे प्राप्त झालेल्या त्याच्या सामाजिक स्थितीत काहीच बदल होऊ शकत नाही. या सरंजामशाहीचे असे तत्त्व आहे की, एकदा ब्राह्मण म्हणून एखादा जन्मला की तो ब्राह्मणाशिवाय दुसरे काही असू शकत नाही. आणि परिया काहीही झाले तरी परियाच राहतो. या काही रिकामटेकड्या गप्पा नव्हेत. तर सध्या अस्तित्वात असलेले ते धर्ममत आहे. अशाप्रकारच्या लोकांच्या हातात अनिर्बंध सत्ता देणे म्हणजे फाशी देणाऱ्याच्या हाती सुरीही देण्यासारखे आहे.

६. अशा प्रकारची मते बाळगल्याबद्दल आपण जातीयवादी व देशाचे शत्रू आहोत, असे बहुधा निर्दयपणे घोषित करण्यात येते. प्रत्येक देशात राज्य शासनाची सूत्रे सुशिक्षित वर्गाच्या हातात असतात व समर्थ शासनाच्या दृष्टीने ती तशीच असावीत, असे पुनःपुन्हा सांगताना कॉंग्रेसवाले कधीच थकत नाहीत. भविष्यात आमचे कोणीही मालक बनोत, परंतु ते या सरंजामदारांच्या हातात शासन सत्ता देताना सामाजिक व राजकीय प्रश्न या दोन वेगवेगळ्या बाबी असून त्याचा परस्परांशी काही संबंध नाही, असा विचार बाळगून असल्याचे दिसतात. सद्गृहस्थहो, मानवी जीवनासंबंधी अशा प्रकारच्या यांत्रिक कल्पनांद्वारे मार्गच्युत करण्याचा प्रयत्न करणाराबद्दल तुम्ही सतर्क राहिले पाहिजे. अशा प्रकारच्या चोरट्या प्रयत्नांपासून तुम्ही सावध झालात तर तुम्हाला दिसून येईल की, व्यक्तीला तिच्या स्वभावजन्य इतर गुणांविरहित केवळ राजकारणासाठी वेगळे काढता येऊ शकत नाही. जेव्हा एखादा माणूस राजकारणी या नात्याने मते मागावयास येतो तेव्हा तो आपला कोट काढून ठेवावा त्याप्रमाणे त्याची मते, हितसंबंध व आपली वृत्ती खुंटीवर टांगून ठेवून व स्वच्छ कोरा होऊन काही येत नाही, तर त्याचे व्यक्तिमत्व, वृत्ती इत्यादी सर्व बाबी सोबत घेऊनच तो मते मागावयास येत असतो. सरंजामदार वर्गाची बुद्धी ही देशाची फार मोठी मालमत्ता आहे. परंतु या बुद्धीमुळे त्यांना शासनाचा स्वयंसिद्ध अधिकार मिळालाच पाहिजे, असे नाही. हा अधिकार शीलावर व या बुद्धीचा उपयोग ते कसा करणार आहेत यावर अवलंबून असतो. आपण केवळ कार्यक्षमतेकडे ध्यान दिले पाहिजे. कारण, ॲडिसन म्हणतो की , ''एखाद्याच्या बुद्धीने समाजाचे कसे हित किंवा अहित होत आहे याचा फारसा विचार न करता जर लोक त्यांच्या पात्रतेबद्दल आदर बाळगत असतील तर यापेक्षा समाजाला अन्य मोठी घातक गोष्ट असू शकत नाही. बुद्धीच्या या नैसर्गिक देणगीचा व कलात्मक सिद्धीचा उपयोग सद्गुणांच्या विकासासाठी होत असेल व सभ्यतेला बाध आणीत नसेल तरच ती

सिद्धी मूल्यवान ठरते. आपण ज्यांच्याशी संभाषण करतो त्यांच्या मनाचा कल व वृत्ती आपल्या नीट लक्षात येईपर्यंत त्यांच्याबद्दल चांगली मते बनविण्याचे टाळले पाहिजे. नाहीतर त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील आकर्षणामुळे विचारांती तिरस्कार करण्याजोग्या माणसांच्या जाळयात आपण सापडू.'' शासन सत्तेसाठी धडपडत असलेल्या अमीर लोकांच्या चारित्र्याबद्दल मी यापूर्वीच विवरण केले असल्यामुळे त्यासंबंधी आता अधिक काही सांगण्याची गरज नाही. परंतु या अमीर उमरावांमुळे या देशात घडत असलेल्या काही लज्जास्पद बाबींकडे कोणीही दुर्लक्ष करू शकत नाही. या देशात पाच ते सहा कोटी लोक अस्पृश्यतेचा शाप भोगीत आहेत, हा शाप व त्यांचे दुःख इतके भयानक आहे की, जगात दुसरीकडे ते कोठेही आढळत नाही. प्रत्येक मानवाला आवश्यक असलेले मूलभूत हक्क त्यांना नाकारण्यात आलेले आहेत आणि संस्कृती व सुधारणेच्या फायद्यांपासून त्यांना वंचित ठेवण्यात आले आहे. समान संधीचा अभाव असल्यामुळे त्यांची स्थिती अत्यंत हीन झाली आहे. या अस्पृश्यांशिवाय या देशात तितकीच मोठी लोकसंख्या आदिवासी व वन्य जमातींची आहे. संस्कृती व सुधारणेच्या प्रकाशात आणण्याचा प्रयत्न करण्याऐवजी त्यांना तशाच रानटी व पुरातन अवस्थेत सोडण्यात आलेले आहे. सरंजामदारांनी भूतकाळात दर्शविलेल्या बेजबाबदारपणाचे व सेवावृत्तीचा अभाव दर्शविणारे हे पुरेसे बोलके पुरावे आहेत. या अमीर उमरावांचे वर्तन भविष्यामध्ये पूर्णतः वेगळे राहील, यावर विश्वास ठेवण्यास आम्हास सांगण्यात येते. यावर विश्वास ठेवण्याइतका मी भोळा नाही. कारण, आजच्या सैतानात एका रात्रीत बदल होऊन उद्या तो देवदूत बनला, असे उदाहरण मला तरी माहीत नाही.

७. देशाचे राजकीय स्वातंत्र्य प्राप्त होईपर्यंत सामाजिक समस्या सोडविण्याचे पुढे ढकलले पाहिजे, असेही आपणास सांगण्यात येते. कोणताही शहाणा माणूस अशा विचारांच्या जाळयात सापडणार नाही. एखाद्या दिवाणखान्यात शिरण्यापूर्वी दिवाणखान्याऐवजी तो एखादा पिंजरा तर नाही ना हा विचार कोणीही केलाच पाहिजे. आपणापैकी प्रत्येकजण जाणतोच किंवा त्याने जाणून घेतले पाहिजे की, साधनांनी संपन्न असलेला माणूस साधनहीन माणसापेक्षा अधिक शक्तीशाली असतो. आपणापैकी प्रत्येकाला हेही माहीत आहे किंवा माहीत करून घेतले पाहिजे की, ज्याच्या हातात सत्ता असते तो सत्तेबाहेरील लोकांची क्वचितच बाजू घेऊन त्यांना सत्तेचा वाटा देतो. म्हणून आता सामाजिक प्रश्न सोडविण्यामुळे ज्यांचे नुकसान होण्याची शक्यता आहे, त्यांच्या हातात शासनसत्ता जर तुम्ही सहजगत्या जाऊ दिली तर सामाजिक प्रश्न सुटण्याची तुम्ही आशा

करू शकत नाही व आता तुम्ही शासन सत्तेवर आरूढ करण्यासाठी ज्यांना मदत कराल त्यांनाच गादीवरून खाली खेचण्यासाठी तुम्हास पुढे क्रांती करावी लागेल! सद्‌गृहस्थहो, हा माझा सल्ला एका फार मोठ्या राजकीय तत्त्वज्ञाने-एडमंड बर्कने-दिलेला सल्ला आहे. तो म्हणतो, ''आपली स्वीकृती देताना इतरांनी आपला तिरस्कार करण्यास कारणीभूत होण्याइतका फाजील चौकसपणा दाखविला तरी विश्वासात जाऊन सर्वनाश ओढवून घेण्यापेक्षा तो अधिक चांगला ठरतो.'' या सल्ल्याला अनुसरून मला असे वाटते की, सामाजिक समस्या सोडविण्याच्या तरतूदीवर विशेष जोर देऊन राज्यघटनेतच सामाजिक प्रश्नांविषयी तडजोड नमूद करण्यात यावी, असा आपण आग्रह धरला पाहिजे आणि जे लोक अनिर्बंध शासनसत्ता आपल्या ताब्यात यावी म्हणून धडपडत आहेत, त्यांच्या इच्छेवर हा प्रश्न आपण कदापि सोडू नये.

## ३. दलित वर्गासाठी संरक्षण तरतुदी

८. म्हणून, मला स्पष्टपणे सांगितले पाहिजे की, भारतीय स्वराज्याच्या आड सामाजिक प्रश्न येतात. असे आम्हास वाटत नसले तरी, भारताची राजकीय पुनर्घटना करीत असताना दुर्बल समाजघटक दुःखाच्या खाईत लोटल्या जाऊ नयेत, यासाठी भारताच्या राज्यघटनेत 'राजकीय समतोलाच्या तत्त्वाचा अवलंब करण्याची काही आवश्यकता नाही,' या मताला आमचा विरोध आहे. दलित वर्गाच्या संबंधापुरता विचार करता हा प्रश्न शक्य तितक्या उत्तम पद्धतीने कसा सोडविता येईल याचा ऊहापोह आता यापुढे करण्याचा माझा विचार आहे. हा प्रश्न सोडविण्यासाठी काही उपाययोजना केली पाहिजे, अशा विचाराचे काही राजनीतिज्ञ आहेत आणि या उपाययोजनेचा अंतर्भाव स्वयंशासित भारताच्या राज्यघटनेत करण्यात यावा, हेही मत त्यांना मान्य आहे. या राजनीती तज्ज्ञांनी महायुद्धानंतर अस्तित्त्वात आलेल्या व माझ्या भाषणाच्या या आधीच्या भागात उल्लेख आलेच्या राष्ट्रांच्या घटनांचा अभ्यास करून या प्रश्नावर काही उपाय सुचविलेले आहेत. या राष्ट्रांच्या राज्यघटनांचा अभ्यास करून मार्ग शोधण्याचा त्यांनी प्रयत्न करणे स्वाभाविकच आहे. कारण केवळ या देशांमध्येच भारतातील परिस्थितीशी मिळती जुळती स्थिती आहे. या राष्ट्रांमध्ये अल्पसंख्यांकांच्या संरक्षणाची व्यवस्था घटनेच्या कायद्याद्वारे करण्यात आली असून अल्पसंख्यांकांचा मूलभूत हक्क असे तिला संबोधण्यात येते. नेहरू कमिटीनेही दलित वर्गाच्या संरक्षणाची व्यवस्था म्हणून या योजनेला आपल्या अहवालामध्ये मान्यता दिलेली आहे. परंतु अशाप्रकारच्या योजनेमुळे तुम्ही नागवल्या जाल अशी माझी तुम्हास

धोक्याची सूचना आहे. भारतीय राजकारणी लोकांचा, मूलभूत हक्क या नावाने ओळखल्या जाणाऱ्या घटनेच्या कलमावर अत्यंत विश्वास असल्याचे दिसते आणि इंग्रज लोकांच्या आक्रमणाच्या विरोधात ते स्वतःसाठी जसे हे मूलभूत हक्क मागताहेत त्याचप्रमाणे आपल्या स्वतःच्या वर्गाच्या अन्यायाविरुद्ध अल्पसंख्यांकांनाही तसेच मूलभूत हक्क देऊन टाकण्यास हे लोक बरेच उत्सुक दिसतात. परंतु आपल्या संरक्षणासाठी अशाप्रकारच्या तरतुदींच्या योजनेचा आपण धिःकार केला पाहिजे. अशाप्रकारच्या योजना स्वागतार्ह असल्या तरीसुद्धा मी स्पष्ट करू इच्छितो की, मूलभूत हक्कांसंबंधीची कोणतीही द्वाही, मग ती कितीही व्यापक असो, व अर्थाच्या व अनुसंधानाच्या दृष्टीने कितीही स्पष्ट असो त्या हक्कांच्या उपभोगांची ग्वाही देऊ शकत नाही. मूलभूत हक्क हिरावून घेण्यात आल्यास त्याविरुद्ध करण्यात आलेल्या उपाययोजनेवर मूलभूत हक्कांची हमी अवलंबून असते. केवळ हक्कांच्या उद्घोषावर नव्हे. १९१४ सालच्या महायुद्धानंतर निर्माण झालेल्या व मी या आधीच उल्लेखिलेल्या राष्ट्रांच्या घटनेमध्ये अशी व्यवस्था करण्यात आली आहे की, जर अल्पसंख्यांकांना आपल्या मूलभूत हक्कांवर अतिक्रमण होत आहे व ते हक्क सत्ताधारी बहुसंख्यांकांकडून मोडले जात आहेत, असे वाटले तर, त्यांना राष्ट्रसंघाकडे अपील करता येते. राष्ट्रसंघानेही या कार्यासाठी एक कमिटी नेमलेली असून अशा अपिलांचा विचार करून तिला निर्णय द्यावा लागतो. मूलभूत हक्कांचे उल्लंघन झाले तर त्याविरुद्ध एखादी उपाययोजना नेहरू कमिटीच्या रिपोर्टमध्ये आहे काय? मला तर कोणतीच आढळली नाही. इतकेच नव्हे तर अपिलाचीही व्यवस्था नाही. म्हणून नेहरू कमिटीतील संरक्षण तरतुदींची हमी पूर्णतः फसवी आहे.

९. नेहरु योजनेमध्ये जरी अशा प्रकारच्या अपीलांची व्यवस्था असती तरीसुद्धा ती योजना तुम्ही स्वीकारु नये, असाच सल्ला मी तुम्हाला दिला असता. गव्हर्नर, व्हाईसरॉय किंवा राष्ट्रसंघाकडे अपील करण्याचा हक्क असणे म्हणजे दलित वर्गाच्या शस्त्रागारामध्ये एका हत्याराची भर पडण्यासारखे असून ती अपेक्षा करण्यालायक बाब आहे. परंतु हे हत्यारही परिणामकारक ठरू शकत नाही. तुमच्या हितसंबंधाचे रक्षण करण्याची सर्वात उत्तम हमी म्हणजे तुमच्याच हातात शासन सत्ता येणे हे होय; कारण त्यामुळे तुमच्या हिताच्या बाधक हालचाली करणाऱ्यास तुम्ही शिक्षा करू शकाल ; एवढेच नव्हे तर पुढे संभवनीय असलेल्या अशा बाधक हालचालींना आळा घालण्यासाठी तुमच्या हितांच्या रक्षणासाठी प्रत्यक्ष करडी नजरही ठेवता येईल. त्रयस्थांच्या हाती, मग तो गव्हर्नर असो, व्हाईसरॉय असो की राष्ट्रसंघ असो, हा अधिकार देऊन हे कधीच साध्य होऊ शकणार नाही. ज्याच्या हातात हा अधिकार आपण सोपवून देऊ त्याने आपण त्याच्या हस्तक्षेपाची मागणी केली असताही ती

वापरण्याचे त्याने नाकारले तर या अधिकाराचा आपणास काय उपयोग होईल? आपल्या हितरक्षणाकरिता रामबाण उपाय म्हणजे भावी स्वयंशासित भारताच्या कार्यकारी मंडळावर ताबा मिळविण्यातच उपाय आहे, असे दिसते आणि देशाच्या कायदेमंडळात पुरेसे प्रतिनिधीत्व प्राप्त करण्यानेच हे तुम्हाला साध्य होऊ शकेल. केवळ याच एकमेव साधनामुळे आपण सत्ताधाऱ्यांच्या दैनंदिन वागणुकीवर नजर ठेवू शकू. तुम्हाला याशिवाय आणखी काही संरक्षण तरतूदी व हमी मिळत असल्यास तीही अवश्य घ्या. कारण त्यामुळे तुमच्या संरक्षण-साधनात भर पडेल. परंतु पुरेशा प्रतिनिधीत्वाच्या बदलीमध्ये मात्र दुसऱ्या कोणत्याही बाबींचा तुम्ही स्वीकार करू नये. आणि तुम्हाला पुरेशा प्रतिनिधीत्वाच्या स्वरुपात हमी दिल्याशिवाय जर सध्याच्या घटनेमध्ये काही बदल करण्याचा प्रयत्न झाला तर तो नाकारणे ही पूर्णतः तुमच्या अधिकारातील बाब आहे.

१०. ' पुरेसे प्रतिनिधीत्व ' हे शब्द आज प्रत्येक अल्पसंख्यांक जमातीच्या तोंडी आढळून येतात. परंतु प्रत्यक्ष संख्येच्या स्वरूपात त्याचा अर्थ सांगणे कठीण असल्यामुळे या संदिग्ध व अनिश्चित अर्थाच्या रुपात, तो एक टिंगलीचा विषय होऊन बसला आहे. म्हणून जर आपणाला आपल्या मागण्या सादर करावयाच्या असतील तर, त्या ' शब्दाचा' निश्चित अर्थ संख्येच्या स्वरूपात आपण तयार केला पाहिजे. काँग्रेसच्या वर्तुळात प्रचलित असलेल्या मतप्रणालीनुसार ' पुरेसे प्रतिनिधीत्व' याचा अर्थ 'लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधीत्व' असा ते करतात. माझ्या मते अल्पसंख्यांकांच्या प्रतिनिधीत्वाची ही गणीती बुद्धीची विचारसरणी अपक्व आणि मूर्खपणाची कल्पना आहे व भारतातील बहुसंख्यांकांच्या मनात अल्पसंख्यांकांबद्दल जी अनुदारपणाची भावना प्रचलित आहे तिचीच ती प्रतिक्रिया मात्र आहे. आपल्या जातबांधवांपासून व तिच्या सामाजिक दर्जापासून जेवढी शक्ती मिळण्यासारखी आहे ती तर अजूनही या अल्पसंख्यांक जमातीजवळ आहेच, परंतु ती अत्यंत तुटपुंजी आहे, असे वाटल्यामुळेच त्या आपल्या संरक्षणासाठी तिच्यात वृद्धी झाली पाहिजे, असा हक्क सांगत आहेत. या अशाप्रकारच्या प्रतिनिधीत्वातील वाढीशिवाय शासकीय सत्तेने सुसज्ज झालेल्या बहुसंख्यांकांशी सामना देण्यास त्या पुरेशा समर्थ आहेत, असे त्यांना वाटत नाही. या दृष्टिकोनातून पाहिल्यास अल्पसंख्यांकांना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात ज्या जागा मिळणार आहेत त्यामध्ये वाढ केल्यानेच त्यांना संरक्षण दिल्यासारखे होईल. आता हे जर खरे असेल तर, कोणीही असे विचारील की, अल्पसंख्यांक जमातीस तिच्या लोकसंख्येच्या प्रमाणातच प्रतिनिधीत्वाच्या जागा ठेवल्यास त्यांच्या संरक्षणाची व्यवस्था झाली असे कसे होईल? अल्पसंख्यांकांच्या संरक्षणाची भाषा वापरून त्यांचे प्रतिनिधीत्व केवळ त्यांच्या लोकसंख्येइतकेच मर्यादित ठेवणे हे परस्परविरोधी आहे. अल्पसंख्यांकांना

त्या प्रमाणात कायदेमंडळामध्ये प्रतिनिधीत्व देण्याचे ठरवून देणे म्हणजे प्रत्यक्ष समाजामध्ये आज जी स्थिती आहे तिचीच कायदेमंडळाच्या रूपाने लहान प्रतिकृती उभारणे होय व अशाप्रकारे बाहेरच्या समाजामध्ये बहुसंख्य व अल्पसंख्य जमातीचे जे बलाबल आहे ते तसेच संसदेमध्येही कायम ठेवणे होय. अशा प्रकारची योजना समाजातील बलाबल शाबूत ठेवते. ती सामाजिक स्थिती जशीच्या तशी कायम राखते. म्हणून अल्पसंख्यांकांच्या संरक्षणाच्या दृष्टिकोनातून जर खऱ्या स्वरूपात सुधारणा करावयाची असेल तर, अल्पसंख्यांकांना सोईचा होईल असा बदल सामाजिक शक्तींच्या समतोलामध्ये केला पाहिजे आणि लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षा अतिरिक्त अशा पासंगाच्या जागा अल्पसंख्यांकांना देऊनच हे साध्य होऊ शकते.

११. सर्व अल्पसंख्यांकांना पासंगाच्या अतिरिक्त जागा प्रतिनिधीत्वात देणे आवश्यक आहे, हे मान्य झालेले असले तरी, त्याची प्रत्यक्ष कार्यवाही करण्याबद्दल एकमत झाल्याचे दिसत नाही. या पासंगामुळे काय साध्य होऊ शकते, याची नीट कल्पना नसल्यामुळेच हे असे घडून येत आहे, असे मला वाटते. वर मी जे सांगितले आहे त्यावरून ही पासंगाच्या अतिरिक्त जागांची योजना अल्पसंख्यांकांचे हात बळकट करण्यासाठी करण्यात आली आहे, हे तुम्हास स्पष्टपणे दिसून येईल. नाहीतर या अतिरिक्त जागांशिवाय अल्पसंख्यांकांची शक्ती त्यांच्या संरक्षणासाठी अत्यंत तोकडी पडेल. म्हणून शक्तीचा जो पुरवठा करावयाचा आहे तो सध्याच्या स्थितीत किती प्रमाणात कमी आहे, याचे नापजोख घेऊन वाढविला पाहिजे. ज्यांच्या हातातील शक्ती कमी असेल त्यांना तिचा पुरवठा अधिक प्रमाणात झाला पाहिजे. कोणाच्या हातात वाजवीपेक्षा जास्त शक्ती असेल तर ती काढून घेतली पाहिजे. दुसऱ्या शब्दात हेच सांगायचे म्हणजे सर्वच अल्पसंख्य जमातींना सारख्या प्रमाणात या अतिरिक्त पासंगाच्या जागा मिळणार नाहीत, तर त्यांच्या सामाजिक दर्जानुसार त्यांचे प्रमाण बदलते राहील. एखाद्या अल्पसंख्य जमातीचा सामाजिक दर्जा नीच असला तरी तिला जास्त जागा मिळतील आणि तिचा दर्जा प्रतिष्ठेचा असेल तर तिला कमी जागा मिळतील. दुर्दैवाने काही अल्पसंख्यांकांची वृत्ती केवळ स्वतःला इतरांपेक्षा उच्च बैठकीवर स्थानापन्न करण्याचीच नाही, तर जास्त प्रमाणात प्रतिनिधीत्वाच्या जागा हडप करण्याची आहे आणि तीसुद्धा त्यांचा सामाजिक दर्जा उच्च आहे म्हणून! मी आधिच सांगितले आहे की, पासंगाच्या अतिरिक्त जागा देण्यामागील हेतू केवळ एवढाच आहे की, वादळामध्ये कुडकुडणाऱ्या कोकराला थंडीपासून संरक्षण मिळावे आणि म्हणून आपण वर उल्लेखिलेल्या विपर्यस्त वृत्तीला विरोध केला पाहिजे कारण त्यामुळे देशहिताला व अन्य अल्पसंख्यांकांच्या हितालाही धोका पोहोचल्याशिवाय राहू शकत नाही.

१२. अल्पसंख्यांकांना द्यावयाच्या पासंगाच्या अतिरिक्त जागा कोणत्या तत्त्वाप्रमाणे देण्यात याव्या याबद्दल योग्य मार्ग मी आतापर्यंत सूचित केलेला आहे. म्हणून या अतिरिक्त नक्की जागा किती देण्यात याव्या, हा प्रश्न अजून शिल्लक राहतोच. प्रतिनिधींची संख्या परिस्थितीनुसार बदलली पाहिजे व त्यामुळे त्यांची संख्या ठरविण्यासाठी केवळ सर्वसाधारण तत्त्व सुचविण्यापलीकडे सध्यातरी अधिक काही करता येण्यासारखे नाही. ते तत्त्व असे, सर्वप्रथम बहुसंख्य व अल्पसंख्य जमातींना परस्परांच्या संगनमताने लोकसंख्येच्या प्रमाणातील प्रतिनिधीत्वापेक्षा जास्तीत जास्त किती जागा अतिरिक्त पासंगाच्या जागा म्हणून दिल्या जाऊ शकतील याचा निश्चित आकडा ठरवावा. नंतर एखाद्या विशिष्ट अल्पसंख्यांक जमातीच्या अतिरिक्त प्रतिनिधीत्वाचा वाटा ठरविताना हे जादा प्रतिनिधीत्व त्या जमातीच्या सामाजिक परिस्थितीच्या विरूद्ध प्रमाणात ठरवावे. ही सामाजिक परिस्थिती ठरविताना त्या जमातीचा एक, सामाजिक दर्जा, दोन, आर्थिक बळ आणि तीन, तिची शैक्षणिक अवस्था लक्षात घ्यावी. असे झाले तर एका बाजूने इतर अल्पसंख्य जमातींशीही न्याय्य व योग्य तडजोड होऊन जाईल आणि कोणत्याही संबंधित पक्षाला तक्रार करण्यास कारण उरणार नाही.

१३. आपल्या विचारासाठी यापुढील प्रश्न मतदारसंघ व मतदानाच्या हक्कासंबंधी आहे. सद्‌गृहस्थहो, या संबंधात आपली मागणी कोणती असावी? मतदारसंघाच्या रचनेबद्दल आपल्यासमोर दोन पर्याय आहेत. एक स्वतंत्र मतदारसंघाची योजना असून दुसरी राखीव जागांसह संयुक्त मतदारसंघाची योजना आहे. या मुद्यावर दलित वर्गामध्ये मतभेद आहे, हे मी जाणून आहे. बऱ्याच मोठ्या लोकसंख्येचा गट स्वतंत्र मतदारसंघाच्या बाजूचा आहे. त्यांना अशी भीती वाटते की, संयुक्त मतदारसंघाच्या पद्धतीत बहुसंख्य जमातही आमच्या जमातीच्या उमेदवाराच्या बाजूने मतदान करणार असल्यामुळे ते त्यांना उपकारक होऊ शकेल अशा उमेदवारालाच मते देतील, ही भीती पूर्णतः निराधार आहे, असे मी म्हणत नाही. हे जरी खरे असले तरी स्वतंत्र मतदारसंघामध्ये कोंडून घेणे हाच काही त्यावर उपाय नाही. तर प्रौढ मतदानपद्धतीची मागणी करून आपल्या जमातीची मतदानाची शक्ती जास्तीत जास्त वाढवून घेणे, हाही एक उपाय आहे. त्यामुळे बहुसंख्य जमातीने आपल्या उमेदवाराच्या बाजूने मते टाकल्यामुळे जे दुष्परिणाम उद्‌भवू शकतात ते कमी करता येण्याची शक्यता निर्माण होते. जर आपणाला प्रौढ मतदान प्राप्त झाले, येथे मला हे सांगितलेच पाहिजे की, आपण त्याबद्दल आपली एक अनिवार्य मागणी म्हणून आग्रह धरला पाहिजे, तर दलित वर्गासाठी राखीव जागा ठेवून आपण संयुक्त मतदारसंघही स्वीकारण्यात काही हरकत घेऊ नये, असे मला वाटते.

१४. याबाबतीत मला आणखी एका मुद्याचा उल्लेख करावासा वाटतो. हा देश जातीजमातींनी व पंथांनी विभागलेला असून जातीजमातींच्या संरक्षणाची तरतूद घटनेमध्येच करून ठेवल्याशिवाय हा देश एकसंध व स्वयंशासित असा देश होऊच शकत नाही. ही वस्तुस्थिती असून त्यावर कोणतीही हरकत घेता येण्यासारखी नाही. परंतु अल्पसंख्यांकांनी हे सुद्धा ध्यानात ठेवले पाहिजे की आज आमच्यावर हे पंथ स्वार झालेले असले आणि आम्ही जातीपातींनी खंडित झालो असलो तरी एकसंध भारत हे आमचे ध्येय आहे.' ज्या अल्पसंख्यांकांना आपली प्रतिष्ठा राहावी असे वाटते त्यांनी हे ध्येय उराशी बाळगलेच पाहिजे. यावरून स्पष्टपणे दिसून येईल की, जी जी अल्पसंख्य जमात संरक्षण तरतुदीची मागणी करीत असेल तिने आपले संरक्षण हक्क मिळविताना ते भारतीय ऐक्याच्या आड येणार नाहीत, याची काळजी घेतली पाहिजे. तुमच्यावर घालण्यात आलेली बंधने व अडचणी सत्य आहेत, त्यामुळे त्यांच्याविरूद्ध संरक्षण मिळविण्याचा आटोकाट प्रयत्न करा. परंतु तुमच्या संरक्षण तरतुदीमुळे या देशातील भेदाची दरी कायम स्वरूपाची होणार नाही, अशा स्वरूपाचे ते असावेत. ही भिन्नत्वाची दरी पुलाद्वारे सांधल्या जावी अशीच आपली अपेक्षा असली पाहिजे. अल्पसंख्यांकांच्या संरक्षण तरतुदींना मान्यता देणे हे बहुसंख्य जमीतीचे कर्तव्यच आहे. परंतु अल्पसंख्यांकांचेही तितकेच पवित्र कर्तव्य आहे की सर्वांचे एकत्व निर्माण करण्याच्या मार्गात अडथळे निर्माण करू नये. या दृष्टिकोनातून संयुक्त मतदारसंघाची योजना व राखीव जागा, स्वतंत्र मतदारसंघा-पेक्षा अधिक उत्तम उपाय आहे, असे म्हटले पाहिजे.

१५. दलित वर्गाच्या संरक्षणासाठी दुसरीही आणखी एक बाब विशेष महत्त्वाची आहे. तिचा संबंध सरकारी नोकऱ्यात शिरण्यासंबंधी आहे, कायदे तयार करण्याच्या अधिकारापेक्षा कायद्याची अंमलबजावणी करण्याचा अधिकार कमी महत्त्वाचा नाही, आणि अंमलबजावणी करण्याच्या यंत्रणेद्वारा कायदा करणाऱ्यांचे अवसान अगदीच नष्ट करता आले नाही तरी सहजपणे त्याला आळा घालता येतो. शासनाच्या कार्यकारी यंत्रणेवर दलित वर्गाने कब्जा प्राप्त करण्यासाठी उत्सुकता दाखवावी, याचे केवळ हेच कारण नाही. कामाच्या घाईगर्दीमुळे किंवा परिस्थितीच्या अडचणीमुळे बऱ्याच वेळा अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्याच्या हातात तारतम्य पाहून निर्णय देण्याचे अधिकार असतात. या प्रसंगोचित निर्णय देण्याच्या अधिकाराची अंमलबजावणी निष्पक्षपणे होते की नाही यावरच जनतेचे कल्याण अवलंबून असते. अंमलबजावणीचे अधिकार जेथे केवळ एकाच जातीच्या हातात आहेत अशा भारतासारख्या देशात या प्रासंगिक न्याय देण्याच्या अधिकाराचा दुरुपयोग एका वर्गाची फाजील भरभराट साधण्यासाठी होण्याचा फार मोठा धोका असतो. याविरूद्ध योग्य उपाय म्हणजे या देशातील सरकारी नोकऱ्यांमध्ये

दलित वर्गासहित सर्वांचा सरमिसळ समावेश करण्यात यावा, असा आग्रह धरणे होय. दलित वर्गासाठी सरकारी नोकऱ्यांमध्ये एका विशिष्ट प्रमाणात जागा राखीव ठेवण्याची मागणी आपण केली पाहिजे आणि ही संरक्षण व्यवस्था घटनेच्या एका कलमाद्वारे घडवून आणण्यास काहीच अडचण पडणार नाही. अशा प्रकारच्या संरक्षण योजनेद्वारेच तुम्ही भविष्यामध्ये देशाच्या मंत्रिमंडळात काही जागा मागू शकाल. परंतु दलित वर्ग हा नेहमीच अल्पसंख्य राहणार असल्यामुळे याची शक्यता आज तरी अगदीच कमी दिसते. यावरून अशा प्रकारची हमी मागणे का आवश्यक आहे हे स्पष्ट होते.

## ४. दलित वर्ग आणि सायमन कमिशन

**१६.** भारतीय स्वराज्याच्या घटनेमध्ये कोणकोणत्या संरक्षण तरतुदींचा समावेश केला पाहिजे, याकडे मी तुमचे लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला. आता सायमन कमिशनने आपल्या बाजूने ज्या सूचना केल्या त्याकडे मी वळतो. दलित वर्गाच्या घटनांतर्गत संरक्षण व्यवस्थेचा सायमन कमिशनने सहानुभूतिपूर्वक विचार केला, यात कसलीही शंका नाही. जरी कोणत्याही अर्थाने तो परिपूर्ण नसला तरी सायमन कमिशनने दलितांच्या स्थितीचे वास्तव चित्र रेखाटण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यांनी केवळ शाळातील व पाणवठ्यावरील अडचणींचाच विचार केला आहे. या दुर्दैवी वर्गाला भोगाव्या लागणाऱ्या यातनांच्या यादीतील तो एक लहानसा भाग आहे. तरीसुद्धा दलित वर्गाच्या घटनादत्त संरक्षण व्यवस्थेचे महत्त्व मांटफोर्ड रिपोर्टापेक्षा सायमन कमिशनने अधिक जाणून घेतले, हे कबूल केलेच पाहिजे. परंतु आमच्या प्रतिनिधींची संख्या व पद्धती या दोन्हीबाबत सायमन कमिशनच्या शिफारशी अत्यंत निराशाजनक आहेत, असे खेदाने म्हणावे लागते.

**१७.** तुम्हाला माहितच आहे की सध्या दलित वर्गाचे प्रतिनिधी नेमणुकीद्वारे घेण्यात येतात. ज्यांच्यावर तुमचे संसदेतील प्रतिनिधीत्व करण्याची दुर्दैवी पाळी आली ते तुम्हाला या नेमणुकीच्या पद्धतीतील दुष्परिणाम सांगू शकतील आणि सायमंन कमिशनसमोर साक्ष देणाऱ्या आपल्या सर्व लोकांनी या पद्धतीची एकमताने निंदा केली, हे सांगताना मला आनंद वाटतो. आपले प्रतिनिधीत्व करणारी सर्वोत्तम माणसे निवडण्याचा आपला हक्क या पद्धतीत हिरावून घेण्यात येतो आणि नेमणूक करण्यात आलेल्या प्रतिनिधींना तिच्यामुळे आचरण स्वातंत्र्य उरत नाही. या दुष्ट पद्धतीचा त्याग सायमन कमिशनने केला नाही, ही मोठी खेदजनक बाब आहे. ते अजूनही तिला चिकटून असून निवडणुकीसाठी योग्य उमेदवार आढळून आले नाहीत तर गव्हर्नरने दलित वर्गाच्या प्रतिनिधींची नेमणूक करावी, अशी त्यांची शिफारस आहे. केवळ इतकेच नाही तर जे दलित

वर्गापैकीही नाहीत अशा व्यक्तींनासुद्धा दलित वर्गाचे प्रतिनिधी म्हणून नेमण्याचा अधिकार देण्याची अत्यंत अनपेक्षित शिफारस सायमन कमिशनने केलेली आहे. तथापि, हे राखीव उपाय असल्यामुळे त्यांचा विचार करण्यासाठी आपणाला वेळ खर्च करण्याची आवश्वकता नाही. परंतु सायमन कमिशनची मुख्य योजनासुद्धा माझ्या मते स्वीकारणीय नाही. त्यानुसार दलित वर्गासाठी राखीव जागा ठेवून संयुक्त मतदार संघाद्वारा त्यांच्या प्रतिनिधींची निवडणूक व्हावयाची आहे. यापेक्षा अधिक जर त्यात काहीच नसते तर आपल्या सध्याच्या स्थितीत यामुळे बरीच सुधारणा झाली असती. परंतु त्या प्रांताच्या गव्हर्नरकडून तसे प्रमाणपत्र प्राप्त केल्याशिवाय कोणत्याही दलित वर्गाच्या उमेदवाराला निवडणुकीसाठी उभे राहता येणार नाही, अशी या योजनेला अट घालण्यात आली आहे. ही पद्धती अस्विकारणीय आहे, याचे कारण म्हणजे ही पद्धती सध्या अस्तित्वात असलेल्या नेमणुकीशी इतकी मिळती जुळती आहे की त्या दोहोपैकी कोणती निवडावी हा प्रश्नच आहे आणि ज्या मतदार संघामध्ये केवळ एकाच उमेदवाराची जागा आहे तेथे फक्त गव्हर्नर एकालाच असे प्रमाणपत्र देणार आहे. त्यामुळे अशा मतदार संघाबाबत ही निवडणुकीची पद्धत म्हणजे केवळ साधी व सोपी नेमणुकीची पद्धत ठरते. ही प्रमाणपत्रवाली पद्धती प्रत्यक्षात कशी कार्य करणार आहे, याबद्दल काहीच सांगता येण्यासारखे नाही आणि हे प्रमाणपत्र देण्यासाठी कोणत्या बाबी विचारात घेतल्या जाणार आहेत हेही गौप्यच आहे. कमिशनची सूचना अशी की ''गव्हर्नरांनी दलित वर्गाच्या संघटनांचा सल्ला घेऊन हे ठरवावे किंवा त्यांना योग्य वाटल्यास अशा सल्ल्याविरहितही सर्टिफिकेट द्यावे.'' या दोन्हीपैकी कोणत्याही सूचनेला आपण संमती देऊ नये. जर संघटनांचा सल्ला घेण्याची पद्धती लागू करण्यात आली तर जनतेला कितीही नावडता असला तरीसुद्धा आपला उमेदवार स्वीकृत व्हावा या उद्देशाने त्याला केवळ पाठिंबा देण्यासाठी अनेक दिखाऊ संघटना त्यामुळे निर्माण होतील. दुसरी पद्धती लागू करण्यात आली तर त्याचा परिणाम घाणेरड्या अधिकारशाहीमध्ये होऊन सर्टिफिकेट देण्याची शक्ती मामलतदार व तहसीलदारांच्या हातात जाईल. कारण गव्हर्नरला जर काही बुद्धिवादी धोरण स्वीकारावयाचे असेल तर या अधिकाऱ्याच्या सल्ल्यानुसारच त्याला प्रमाणपत्र द्यावे लागेल. हे तहसीलदार व मामलतदार लोक कोणत्या वर्गापैकी आहेत, हे तुम्ही जाणताच आणि दलित वर्गासंबंधीची व त्यांच्यातील शिकलेल्या लोकांसंबंधी त्यांची वृत्ती कशी आहे, हेही तुम्हाला माहीत आहेच आणि म्हणून हे लोक प्रमाणपत्रासाठी कोणत्या प्रकारच्या लोकांची शिफारस करतील, याचा अंदाज तुम्ही बांधू शकाल.

१८ दलित वर्गाच्या प्रतिनिधीला प्रमाणपत्राची काही खास आवश्यकता आहे, या कमिशनच्या मताशी मी सहमत होऊ शकत नाही. याचा हेतू जर संसदेतील अकार्यक्षमता दूर करण्याचा असेल तर अशा अनेक जमाती आहेत की या दृष्टीने त्यांनाही अशी प्रमाणपत्राची पद्धती लागू केली पाहिजे, असे माझे सांगणे आहे. जर अकार्यक्षमता याचा गर्भित अर्थ इंग्रजीच्या ज्ञानाची कमतरता व त्या भाषेत आपले मत मांडू शकण्याची असमर्थता असा असेल तर बॉम्बे लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमधील बहुसंख्यांक अब्राह्मण व सिंधी मुसलमानांना इंग्रजीचा गंधही नव्हता, असे अनेक प्रसंग मला माहीत आहेत. त्यांनी कदाचितच प्रश्न विचारले किंवा क्वचितच भाषण दिले. माझी खात्री आहे की अनेक विधानसभातून असलेले दलित वर्गाचे प्रतिनिधीत्व करणारे आमचे मित्रही अशाच प्रकारचे त्यांच्या विधानसभातील अनुभव सांगू शकतील. त्यांच्या बाबतीत जर प्रमाणपत्राची आवश्यकता नसेल तर दलित वर्गाच्या बाबतीत मात्र ती का आवश्यक असावी हेच मला कळत नाही. म्हणून सायमन कमिशनने तयार केलेली ही योजना फेटाळून कोणत्याही अटीचा निर्बंध न घालता आमचे प्रतिनिधी आम्हीच निवडण्याच्या स्वातंत्र्याची आम्ही मागणी केली पाहिजे. आमच्या हितासंबंधी निर्णय घेण्यास आम्हीच सर्वाधिकारी आहोत आणि आमचे हित कशात आहे हे ठरविण्याचा अधिकार आपण गव्हर्नरांनासुद्धा मुळीच देता कामा नये.

१९. केंद्रीय संसदेच्या घडणीसंबंधी या सायमन कमिशनच्या योजनेबद्दल तुमची काय मते आहेत कोणास ठाऊक. सध्याच्या राज्यसभेतील निवडणुकीची पद्धती व प्रांतातील लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या निवडणुकीची पद्धती 'प्रत्यक्ष' अशी आहे. सायमन कमिशनची या बाबतीतील शिफारस अशी की प्रांतिक सभेच्या निवडणुकीची पद्धती सध्या आहे तशीच कायम राहावी परंतु विधानसभेची निवडणूक प्रांत विधान परिषदातील सभासदांद्वारा अप्रत्यक्षरीतीने व्हावी. मुंबई प्रांताचा सायमन कमिशनचा एक सभासद या नात्याने मी याच्या विरोधात एक टिपण सादर केलेले असून त्यात याबद्दल दोष दिलेला आहे. परंतु ज्या स्वरूपात सायमन कमिशनने ही योजना मांडली त्यामुळे काही सुविधा तशाच असुविधाही निर्माण होणार आहेत. प्रथमतः अल्पसंख्यांकांच्या बाबतीत स्वतंत्र मतदार संघ की संयुक्त मतदार संघ या प्रश्नाला त्याने बगल दिलेली आहे. दुसरी बाब म्हणजे, तिने दुहेरी मतदानाचा अधिकार टाळलेला आहे. (एक प्रांतीय कौन्सिलसाठी व दुसरा संसदेसाठी). तिसरी बाब अशी की त्याने संसदेला सुचारू गटाचे रूप दिलेले आहे. असुविधेच्या बाजूने पाहता, सरकार व जनता यामधील दुवा दुरावण्याचा यामुळे संभव असून राष्ट्रीय

एकसंधतेची वाढ यामुळे निश्चितपणे खुंटणार आहे. कारण यात संपूर्ण देशाशी असलेल्या लोकांच्या कर्तव्याचा लोप होत असल्यामुळे त्यांच्या दृष्टीने संपूर्ण देशाबद्दल त्यांचे कोणतेच कर्तव्य उरत नाही. या बाबतीत सुविधेच्या बाजूने पारडे झुको की असुविधेच्या बाजूने झुको परंतु केन्द्रीय संसदेच्या बाबतीत सायमन कमिशनच्या योजनेला जागा मिळालीच पाहिजे. तिच्या योग्य स्थानाबद्दलचा प्रश्न शिल्लक राहतो. ती केन्द्रीय विधानसभेसाठी योग्य ठरेल की राज्यसभेसाठी योग्य ठरेल? ती योजना दोन्हीलाही लावता येणार नाही हे स्पष्टच आहे. अप्रत्यक्ष निवडणूक पद्धतीचा मोठा दोष म्हणजे ती पहिल्या पाळीतच संपून जाते. एका मतदाराने एकदाच मत दिल्यामुळे त्याला विशेष महत्त्व प्राप्त होते या विचाराने ही योजना आखली असावी. दोनदा मतदान करण्याची वस्तुतः काही गरजच उरत नाही. याचा अर्थ असा की जर दोन सभागृहांची पद्धत ठेवावयाची असेल तर निवडणुकीची ही पद्धती विधानसभेला लागू केल्यास राज्यसभेतील सभासद निवडण्याचा दुसरा मार्ग उरत नाही. सध्याच्या सरकारच्या रचनेत राज्यसभेची रचना करण्याची पद्धती अत्यंत वाईट आहे. आणि पुनर्परीक्षण करणारी सभा म्हणून तिचे अस्तित्व कायम ठेवावयाचे असेल तर आज आहे त्याच स्थितीत तिला ठेवता येऊ शकणार नाही. माझे मत बरोबर असेल तर असा निष्कर्ष निघतो की, विधानसभेसाठी प्रत्यक्ष निवडणूक पद्धतीचा अवलंब करावा आणि अप्रत्यक्ष निवडणूक पद्धतीने राज्यसभेची रचना करावी. प्रांतीय विधानसभांच्या सभासदांद्वारे ही निवडणूक प्रमाणशीर प्रतिनिधीत्वाच्या पद्धतीने करणे, हाच या बाबतीत सुयोग्य उपाय होय. अंतिमतः केन्द्रीय संसद उभारण्याचा कोणताही आधार निश्चित होवो परंतु दलित वर्गाच्या प्रतिनिधीसाठी अप्रत्यक्ष पद्धती निश्चितच सोपी ठरेल हा काही संशोधनाचा विषय नाही. या उलट नेमणुकीच्या पद्धतीशी तुलना केल्यास आपल्या दृष्टीने ती अधिक हितकारक आहे.

२०. सध्या अस्तित्वात असलेल्या प्रांतीय विधानसभांमध्ये दलित वर्गाचे प्रतिनिधीत्व फारच जुजबी आहे. या बाबतीत १९१९ च्या साऊथबरो कमिटीने बराच अन्याय केला असून त्या कमिटीने ठरविलेल्या वाट्यामध्ये भारत सरकारनेही वाढ सुचविली आहे. परंतु त्या चुका अजूनही तशाच राहिलेल्या आहेत. १९२३ साली नेमलेल्या मुद्दीमन कमिटीने संसदेमधील दलित वर्गाचे प्रतिनिधीत्व किती तुटपुंजे आहे, हे निदर्शनास आणून दिले होते आणि त्यात बऱ्याच मोठ्या प्रमाणात वाढ सुचविली होती, परंतु काही ठिकाणी एखाद्या दुसऱ्या सभासदाची वाढ करण्यावाचून ही तक्रार निवारण्याचा कोणताच भक्कम प्रयत्न

करण्यात आला नाही. दलित वर्गाला त्याच्या अशा दुर्बल अवस्थेमध्ये अधिकारी-वर्गाच्या मदतीवर अवलंबून राहण्यास सांगण्यात येते. अनुभवाद्वारे आम्हास कळून चुकले आहे की अधिकारीवर्ग स्वतःवाचून दुसऱ्या कोणाचाही मित्र नसतो आणि त्याचे मित्रत्व आणि मदत त्याच्या स्वतःच्या हितसंबंधावर अवलंबून असते. या दहा वर्षाच्या काळात या अधिकारी वर्गाने दलित वर्गाजवळून जितके घेतले त्यापेक्षा किती तरी कमी दिले, हे सांगण्यास मला खेद वाटतो. ते काहीही असो,ही संशयास्पद असलेली अधिकारी वर्गाच्या मदतीची अपेक्षाही भावी हिंदुस्थानात दलित वर्गाला करता येणार नाही. म्हणून दुसऱ्या प्रत्येक अल्पसंख्य जमातीला जर पुरेसे प्रतिनिधीत्व देण्यात येत आहे, तर दलित वर्गालाही ते मिळू नये काय? प्रांतीय विधानसभांमध्ये सायमन कमिशनने दलित वर्गासाठी सुचविलेले प्रतिनिधीत्वाचे प्रमाण कोणते? त्यांचे म्हणणे असे, अशा प्रकारच्या राखीव जागांची संख्या त्या मतदार संघाच्या दलित वर्गाच्या लोकसंख्येचे एकूण लोकसंख्येशी जे प्रमाण असेल त्याच्या तीन चतुर्थांश इतकी असावी. आता भारतातील इतर अल्पसंख्य जमातींना सायमन कमिशनद्वारा देण्यात आलेले प्रतिनिधीत्वही पाहा. मुसलमानांनी लखनौ करारामध्ये काँग्रेसवर कुरघोडी करून बळजबरीने मिळविलेले अत्याधिक प्रतिनिधीत्व तसेच कायम राहावे याला परवानगी देण्यात आली आहे. भारतीय ख्रिश्चनांच्या, अँग्लो इंडियनांच्या व युरोपियनांच्या बाबतीत त्यांना केवळ त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधीत्व दिले असे नाही तर, पासंगाच्या अतिरिक्त जागाही त्यांना देण्यात आल्या. ही भूलथाप नव्हे काय? जी जमात अनेक अडचणीत सापडलेली आहे तिला उदार वागणूक द्यावयाची नसेल तर कमीत कमी न्याय्य वागणूक मिळण्याचा तिचा हक्क नाही काय? भारताच्या केन्द्रीय कमिटीनेसुद्धा दलित वर्गावर अन्याय करून केवळ त्याच्या लोकसंख्येच्या प्रमाणात त्याला प्रतिनिधीत्व दिले.

२१. सुरवातीपासूनच केन्द्रीय संसदेचे दरवाजे दलित वर्गासाठी कधीही उघडण्यात आले नसून १९२१ साली जेव्हा लोकसंख्येच्या आधारावर तिचे पुनर्संघटन करण्यात आले तेव्हाही दलित वर्गाला तेथे शिरकाव मिळाला नाही. १९२६ सालापर्यंत १५० सभासद असलेल्या विधानसभेत दलित वर्गाला केवळ एक जागा देण्याची मेहेरबानी करण्यात आली होती. राज्यसभा तर अजूनही त्यांच्यासाठी बंदच आहे. केन्द्रीय विधानसभेत दलित वर्गाला प्रतिनिधीत्व मिळावे म्हणून सायमन कमिशनने थोडासा प्रयत्न केला असला तरी त्याच्या योजना केवळ विधानसभेपर्यंतच मर्यादित असून त्या राज्यसभेपर्यंत पोहोचल्या नाहीत. या तुटपुंज्या सहानुभूतीबद्दल मी त्यांचा आभारी असलो तरी

या त्यांच्या कृपण वर्तनाबद्दल माझी तक्रारही आहे. सायमन कमिशनची नेमणूक होण्याच्या दरम्यानच्या काळात दलित वर्गांपैकी बऱ्याच लोकांना विधानसभेत घेण्यात आले आणि सरकारसहित देशाच्या सर्व भागातून सर्वांनी असा गाजावाजा केला आहे की, दलित वर्गाची लोकसंख्या प्रत्यक्ष शिरगणतीत आढळणाऱ्या लोकसंख्येपेक्षा जास्त आहे. शिरगणतीचा कमीत कमी आकडा घेतला तरी सायमन कमिशननुसार दलित वर्गाची लोकसंख्या शेकडा वीस इतकी आहे. परंतु सायमन कमिशनने विधानसभेत जागा देताना मात्र शेकडा आठपेक्षा अधिक जागा देण्यास नकार दिला आणि राज्यसभेत तर एकही जागा दिली नाही.

२२. आपल्या हक्कांचे व गरजांचे हे पद्धतशीर अवमूल्यन सायमन कमिशनद्वारा का करण्यात यावे हेच मला कळत नाही. सायमन कमिशनने दलित वर्गाबाबत केवळ न्याय्य भूमिकाच नव्हे तर उदार भूमिका घ्यावी, अशी आपणापैकी प्रत्येकाची अपेक्षा आहे. अशी उदार भूमिका घेऊ नये याला कोणतेही कारण नाही. एखाद्या अल्पसंख्य जमातीच्या राजनिष्ठेबद्दल घटना तयार करताना त्यांना काय हक्क मिळतील याचा मला सध्या तरी अंदाज नाही. परंतु ज्याअर्थी, भारतात ही राजनिष्ठा हक्क प्रदान करताना विचारात घेण्यात येत आहे त्याअर्थी, दलित वर्गाची राजनिष्ठा अमर्याद आहे असेच म्हणावे लागेल. त्यांनी इंग्रजी राज्यावर केवळ एक तत्त्वाचा प्रश्न म्हणून प्रेम केले एवढेच नाही तर अकृत्रिम प्रेम केले आहे. तथापि, दलितांना अधिक उदार वागणूक मिळावी या मागणीमागे त्यांची अगतिक स्थिती हाच मुख्य युक्तिवाद आहे. भारतातील कोणतीही अन्य अल्पसंख्य जमात इतक्या हीन दर्जाला पोहोचलेली, दडपून टाकलेली आणि दुर्बल नाही. त्यांच्या गरजा इतक्या अधिक व इतक्या साध्या प्रकारच्या आहेत की भारत हे स्वयंशासित राष्ट्र व्हावे अशी मागणी करणे त्यांना भाग आहे. ज्या जमातीवर एवढे अन्याय करण्यात आले तिला वस्तुतः अत्यंत उदार वागणूक मिळावयास हवी. परंतु सायमन कमिशनद्वारा दलित वर्गाला केवळ उदारपणाची वागणूक मिळाली नाही, इतकेच नव्हे तर साधा न्यायही मिळालेला नाही. कोणी असेही विचारू शकेल की लॉर्ड बर्कनहेड यांनी सायमन कमिशनच्या नियुक्तीचा ठराव पार्लमेंटमध्ये मांडताना ज्या भावना व्यक्त केल्या त्यांचे काय झाले? तेव्हा असे सांगण्यात आले की "दलित वर्गाचे आम्ही विश्वस्त (ट्रस्टी) असून त्यांच्या संरक्षणाची पुरेशी व्यवस्था केल्याशिवाय आम्ही त्यांना दुसऱ्याच्या हातात सोपवू शकत नाही." या गंभीर भावनांची पूर्ती सायमन कमिशनच्या शिफारशीत आढळून येते काय? सद्गृहस्थहो ! आपणाला अन्य लोक कशी वागणूक देत आहेत, याबद्दल आपण

सतर्क राहिले पाहिजे. मला अशी भीती वाटते की इंग्रज आपल्या दुर्दैवी स्थितीची जी जाहिरात करीत आहेत ती आपली दुर्दशा नष्ट करण्यासाठी नसावी तर अशा प्रकारची पळवाट भारताच्या स्वराज़्याची वाट अडविण्यास उपयुक्त वाटल्यामुळे ते अशी जाहिरात करीत असावे. अशा स्थितीत आपल्यासाठी ब्रिटिशांनी काही केले याबद्दल विचलित न होता आणि भविष्यात आपले काय होईल याची अनाठायी काळजी न करता आपल्या पुढाऱ्यांनी कोणाचीही भीती न बाळगता उदारपणाच्या वागणुकीबद्दल नसला तरी सुयोग्य वागणूक आम्हाला मिळालीच पाहिजे, याबद्दल आग्रह धरावा, हे त्यांचे कर्तव्य आहे. कारण आमची स्थितीच तशी वैशिष्ट्यपूर्ण असल्यामुळे आपणाला तसा हक्क आहे.

## ५. दलित वर्ग आणि स्वराज्य

२३. भावी स्वयंशासित भारतात आपणाला कोणत्या संरक्षण तरतुदींची व हमीची आवश्यकता आहे याबद्दल मी पुरेशी माहिती दिली, असे मला वाटते. तथापि, या परिषदेसमोर असलेले विषय एवढ्यानेच संपत नाहीत. सध्या देशात चालू असलेल्या राजकीय चळवळीबद्दल या परिषदेने विचार करण्याचे टाळले व तीवर आपले मत व्यक्त केले नाही तर तिचा उद्देश पूर्ण झाला असे कदापि म्हणता येणार नाही. इंडियन नॅशनल कॉंग्रेसच्या कलकत्ता येथे डिसेंबर १९२८ साली भरलेल्या परिषदेमध्ये ब्रिटिश पार्लमेंटला देण्याच्या अंतिम नोटीसीच्या स्वरूपाचा एक ठराव पास करण्ंयात आल्याचे तुम्हाला आठवत असेलच. या ठरावात डिसेंबर १९२९ च्या आत भारताला ब्रिटिश साम्राज्यांतर्गत सार्वभौम राष्ट्राचा दर्जा लागू करण्यात यावा, अशी मागणी करण्यात आली असून या कर्तव्यात ब्रिटिश पार्लमेंट अयशस्वी ठरल्यास भारतीय कॉंग्रेसच्या ध्येयात बदल करून पूर्ण स्वराज्याची मागणी करण्यात येईल, अशी धमकीही देण्यात आली आहे. या कॉंग्रेसच्या निर्वाणीच्या खलित्याचा व्हाईसरॉयद्वारा भारतीय राज्याचा दर्जा साम्राज्यांतर्गत सार्वभौम असावा, हाच ब्रिटिशांचाही उद्देश असल्याचे जाहीर करण्यात आले. त्याने कॉंग्रेसचे समाधान झाले नाही. 'तो एक उद्देश असावा' इतकेच त्यांना पुरेसे वाटत नव्हते, तर सार्वभौम राज्याचा दर्जा ताबडतोब देण्यात आला पाहिजे असे तिला वाटत होते व म्हणून जेव्हा तिचे अधिवेशन डिसेंबर १९२९ ला भरले तेव्हा तिने आपले ध्येय भारताचे स्वराज्य प्राप्त करणे हे असल्याचा ठराव पास करून एक पाऊल पुढे टाकले. या इंडियन नॅशनल कॉंग्रेसच्या ध्येयाबद्दल तुमचे मत काय आहे, हे तुम्हाला घोषित करावे लागेल. आपल्या दृष्टिकोनातून आपण स्वराज्याची मागणी खारीजही करू शकू. ती अव्यवहार्य असून देशाच्या सध्याच्या स्थितीत संकटकारकही

ठरण्याचा संभव आहे, असे मला वाटते. ज्या देशातील लोक एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेने, एका घटनेने व समान भवितव्याने बांधलेले असतील ते स्वराज्याचा धोका पत्करू शकतील. अशा स्थितीपासून हा देश शकडो मैल दूर आहे, हे कोणीही नाकारू शकत नाही. साम्राज्यांतर्गत स्वयंशासनाचे ध्येयच चांगले आहे, असे मला वाटते कारण पूर्ण स्वराज्याचे धोके टाळून आपणाला स्वयंशासित राष्ट्राचे फायदे त्यामुळे प्राप्त होतात. म्हणून आपण पूर्ण स्वातंत्र्याच्या उद्दिष्टाला पाठिंबा नाकारला पाहिजे. कारण अजून त्याबद्दल काँग्रेसवाल्या लोकांच्या मनातही गंभीर शंका आहे.

२४. परंतु साम्राज्यांतर्गत स्वयंशासनासंबंधी आपले मत काय राहील? कारण ते सुद्धा एकप्रकारचे स्वराज्य-म्हणजे जनतेचे, जनतेसाठी व जनतेने चालविलेले सरकार-असते. या प्रश्नावर निर्णय घेताना तुम्ही काळजीपूर्वक विचार केला पाहिजे. इंग्रजांचे या देशातील आगमन हे त्याला एक मोठे वरदान ठरले, याबद्दल शंका असू शकत नाही. या सुदैवी साहाय्यावाचून भारतातील बौद्धिक जागृती व प्रगती इतकी जलद व इतकी मोठी झाली असती की नाही याबद्दल मला शंकाच वाटते. समता, स्वातंत्र्य आणि बंधुभाव या मूलभूत तत्त्वांनी युक्त असलेल्या युरोपीय संस्कृतीच्या साहचर्यावाचून हिंदू धर्मातील अनेक सामाजिक वाईट चालीरितीबद्दल त्यांना कधीही शरम वाटली नसती. कारण तो त्यांच्या धर्माचा व नीतीशास्त्राचा एक भाग होता. या दोन संस्कृतीच्या एकत्र येण्यामुळे त्यांच्यातील जोरदार विरोध भारतीयांना जाणवला व या सामाजिक दुष्ट रूढी व सामाजिक प्रथा दूर करण्याची गरज त्यांना भासू लागली. दुसऱ्या कोणत्याही उपायाने जे पुनर्संघटन होऊ शकले नसते ते या संधीमुळे भारतास करावे लागत आहे. ब्रिटिशांच्या आगमनावाचून एकच एक शासन पद्धतीची व एकच कायदा सर्वांना सारखा असण्याची फार मोठी सुविधा भारताला कधीच प्राप्त होऊ शकली नसती. कोणत्याही देशाच्या कल्याणासाठी ही काही लहान सहान शक्ती असलेली साधने नव्हेत तर भारतासाठी त्यांचे मूल्य अमर्याद आहे. राष्ट्रीयत्वाची भावना जितकी खोल रुजवावयाची असेल तितकी रुजविणे सोपे जाईल, अशी ही भूमी त्यामुळे तयार झालेली असून स्थिर राज्याचा पायाही त्यांनी तयार करून ठेवला आहे. त्यांनी चलन, रस्ते, कालवे, रेल्वे, पोष्ट, इत्यादि बाबतीत सुधारणा न करता देशाला आधुनिक संस्कृतीच्या साधनांपासून दूर ठेवले, असेही म्हणता येण्यासारखे नाही.

२५. हे सर्व खरे आहे. परंतु प्रश्न असा आहे की, हे कशाच्या बदलीमध्ये? ब्रिटिश शासनाखाली भारतीय जनता एकप्रकारे खुजी होत असून तिची वाढ

खुंटविली जात आहे, यात शंका नाही. कै. गोखल्यांच्या शब्दात सांगायचे म्हणजे ''सारे दिवस आपण न्यूनगंडाच्या भावनेने जगले पाहिजे आणि आपल्यात जे उंच आहेत त्यांनी वाकले पाहिजे.'' स्वयंशासित राष्ट्रातील देशामध्ये आढळून येणारी आत्मसन्मानाची भावना कोणत्याही भारतीयात आढळू शकत नाही. ज्या नैतिक बैठकीवर स्वराज्याची मागणी करण्यात आली ती कदाचित तुम्हाला पसंत पडणार नाही. इतकेच नव्हे तर एखाद्या सैतानाने धर्मग्रंथाचा उल्लेख करून आपले कार्य साधावे त्याप्रमाणेच हे सरंजामदार लोक स्वातंत्र्याची मागणी करीत असलेले पाहून तुम्हास वाटेल व क्षणभर मौजही वाटेल. लोकांच्या नैतिक सामर्थ्याकडे पाहिले तर ब्रिटिशांचे राज्य भारताला अतिशय महाग पडले, यात संशय नाही. हाही मुद्दा कदाचित तुम्हास पटणार नाही व तुम्ही म्हणाल की या देशात शांतता व सुरक्षितता राखण्याच्या बदलीत कोणतीही किंमत द्यावी लागली तरी ती कमीच होईल. परंतु मला वाटते, तुम्हाला पसंत पडेलच अशीही एक बाब आहे ती म्हणजे या देशातील लोकांचे दारिद्र्य! जगाच्या कोणत्याही भागात भारताची बरोबरी करू शकेल इतके दारिद्र्य आहे काय? १९ व्या शतकाच्या पहिल्या २५ वर्षामध्ये जेव्हा इंग्रजांचे राज्य ही एक मान्य वस्तुस्थिती ठरली तेव्हा अंदाजे दहा लक्ष लोकांचा जीव घेणारे पाच दुष्काळ पडले. दुसऱ्या २५ वर्षामध्ये दोन दुष्काळ पडले व त्यात अंदाजे चार लाख लोक मृत्युमुखी पडले. तिसऱ्या २५ वर्षामध्ये सहा दुष्काळ पडले आणि त्यात मृत्युमुखी पडलेल्यांची नोंद पन्नास लक्ष झाली आणि या शतकाच्या शेवटच्या २५ वर्षामध्ये आपणाला काय आढळून येते? अठरा दुष्काळ! आणि त्यात मृत्युमुखी पडलेल्यांचा अंदाजे आकडा एक कोटी पन्नास लाख ते दोन कोटी साठ लाख!! आणि एकाच वर्षी सरकारच्या भिक्षागृहामध्ये ठेवण्यात आलेल्या साठ लाख लोकांचा यात समावेश करण्यात आलेला नाही. सद्‌गृहस्थहो ! याचे कारण काय असले पाहिजे? याचे कारण स्पष्ट शब्दात सांगायचे म्हणजे या देशात ब्रिटिशांनी अवलंबिलेले सरकारी धोरण हेच होय. या देशातील व्यापार व कारखाने यांची वाढ खुंटविण्याचे नेहमीच उद्दिष्ट राहिलेले आहे. हा केवळ तर्कावर आधारलेला दोष नव्हे, तर भारताचे राज्य अशाप्रकारे चालवावे की भारत हा ब्रिटिश मालासाठी नेहमीचा गिऱ्हाईक राहिला पाहिजे, हे ब्रिटिशांच्या शासनाचे मान्य सूत्र होते. या धोरणामुळेच भारत हा युगानुयुगासाठी दरिद्री देश बनला. या दरिद्री बनविण्याच्या प्रगत क्रियेत मुख्यतः बळी पडणारे कोण होते ? दलित वर्गाच्या ज्या शेतकरी लोकांना सहा महिने अजूनही भरपेट जेवण मिळत नसते तेच यामध्ये बहुसंख्येने बळी पडले असले पाहिजेत. त्यांच्या नित्याच्या दारिद्र्याने दुष्काळाला बळी पडण्यास त्यांची स्थिती अनुकूल होतीच व त्यामुळे दुष्काळाला त्यांचाच मोठा घास मिळाला असला पाहिजे. हे ज़र तुमचे लोक

असतील, त्यांच्याबद्दल जर तुम्हाला खराखुरा कळवळा असेल तर तुम्ही डोळे मिटून बसू शकत नाही किंवा या हृदयाचा थरकाप उडविणाऱ्या वस्तुस्थितीच्या बाबतीत उदासीन राहू शकत नाही. सद्‌गृहस्थहो ! केवळ सुधारलेले रस्ते दिल्यामुळे, सुधारलेले कालवे बांधल्यामुळे, रेल्वे रस्त्यामुळे, पै-पैसा पोष्टाद्वारे पोचविल्यामुळे, सुस्थिर चलन आणल्यामुळे, भूगोलाच्या, खगोलशास्त्राच्या नव्या कल्पना प्रसृत केल्यामुळे किंवा अंतर्गत भांडणे थांबविल्यामुळे ब्रिटिशांच्या नोकरशाही वर्गाची स्तुतीस्तोत्रे तुम्ही गात बसू शकत नाही. सुरक्षा आणि सुव्यवस्था सांभाळल्याबद्दल ते स्तुतीला पात्रही आहेत. परंतु सद्‌गृहस्थांनो ! दलित वर्गासहित सर्व लोक काही सुरक्षा व सुव्यवस्था खाऊन जगत नाहीत तर भाकरीवर जगतात, हे आपण विसरता कामा नये. या जीवनाच्या कठोर कायद्यामुळे जे सरकार देशाची आर्थिक भरभराट करू शकेल व त्याद्वारा भौतिक जीवनात सुधारणा घडवून आणू शकेल अशा सरकारची मागणी दलित वर्गालाही करणे भाग आहे. लोकांच्या दारिद्र्याचे कारण उत्पादनातील कमतरता हे आहे आणि जे उत्पादन होते त्याचीही समान वाटणी होत नाही, असा मुद्दा तुमच्या-पैकी कोणी उपस्थित करील. मी हे प्रथमच मान्य करून टाकतो की या देशातील गरीब मजूर जनतेकडून बडे भांडवलदार व जमीनदार लोक जे पैसे बळजबरीने वसूल करतात त्याकडे लक्ष दिल्यास लोकांनी इंग्रजांची वर्षभर केलेली स्तुती एकदम फिक्की पडून जाते. तथापि, या पिळवणूक करणाऱ्या भांडवलदारांच्या व जमीनदारांच्या वरवंट्याखालून लोकांना ब्रिटिश सरकारने सोडवावे अशी अपेक्षा तरी तुम्ही कशी करू शकाल, हेच मला समजत नाही. एक गोष्ट आपण लक्षात ठेवलीच पाहिजे की प्रो. डायसी यांनी दर्शविल्याप्रमाणे कोणतेही सरकार–मग ते कितीही शक्तीशाली–असले तरी त्याला दोन गोष्टींची मर्यादा असते. पहिली मर्यादा आंतरिक असते व ती राज्यकर्त्यांच्या स्वभावावर, हेतूवर व हितसंबंधांवर अवलंबून असते, आणि ज्याअर्थी, ब्रिटिश सरकार भारतीय समाजात प्रचलित असलेल्या शक्तींना चालना देत नाही त्याअर्थी, तसे करणे हे त्यांच्या उद्दिष्टांच्या विरूद्ध आहे, हे होय. ते शिक्षणासंबंधी उदासीन असून स्वदेशीच्या विरूद्ध असण्याचे कारण म्हणजे, ते त्यांना पाठिंबा देऊ शकत नाही, हे नव्हे तर तसे करणे हे त्यांच्या स्वभावाच्या, उद्दिष्टाच्या व हितसंबंधाच्या विरूद्ध आहे. राज्यकर्त्यावर ज्या दुसऱ्या बाबीचे बंधन असते ती बाब म्हणजे बाहेरून प्रतिकार होण्याची त्याला भीती वाटते. भारतीय समाजातील जीवनमूल्ये नष्ट करणाऱ्या सामाजिक दोषांचा गंभीरपणा इंग्रज राज्यकर्त्यांना माहीत नाही काय ? भारतातील जमीनदार

जनतेला पिळून शुष्क करीत आहे, हे सरकारला माहीत नाही काय ? भारतातील भांडवलदार मजुरांना जीवन निर्वाहास आवश्यक ती मजूरी व योग्य सवलती देत नाहीत हे सरकारला माहीत नाही काय ? हे सर्व सरकारला माहीत आहे. परंतु त्यांना स्पर्श करण्याचे धाडस त्याने अजूनही केलेले नाही. का ? त्याला ते नष्ट करण्याचे कायदेशीर अधिकार नव्हते म्हणून काय ? मुळीच नाही. त्याने या बाबतीत ढवळाढवळ केली नाही याचे कारण हेच की, अस्तित्वात असलेले सामाजिक व आर्थिक जीवन जर त्याने दुरुस्त करण्याचा प्रयत्न केला तर त्याला प्रतिकार होईल, अशी त्याला भीती वाटली. या सरकारचा कोणाला काय उपयोग होणार आहे ? अशाप्रकारे दोन बाबतीत लंगड्या असलेल्या सरकारच्या आधिपत्याखाली जीवन जसेच्या तसेच स्थिर राहणे भाग आहे. देशाच्या हितासाठी आपली अविभक्त निष्ठा वाहू शकतील अशी माणसे अधिकारावर असलेले सरकार आम्हाला हवे आहे. आम्हाला असे सरकार हवे आहे की ज्यातील व्यक्तींना आज्ञापालनाची भावना कोठे संपते व प्रतिकार केव्हा सुरू होतो याची जाणीव असूनही जे अत्यंत आवश्यक अशा न्याय, आर्थिक व सामाजिक सुधारणा करण्यास कचरणार नाही. ही भूमिका पार पाडण्यास इंग्रज सरकार कधीही समर्थ ठरू शकत नाही. तर लोकांचे, लोकांसाठी व लोकांनी चालविलेले सरकार, दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे स्वकीयांच्या सरकारलाच हे संभवनीय होऊ शकते.

२६. तुमच्या मर्यादित उद्देशापुरताच या प्रश्नाचा विचार करा. इंग्रज येण्यापूर्वी अस्पृश्यतेच्या कारणाने तुमची स्थिती अत्यंत दयनीय होती. तुमची अस्पृश्यता काढण्यासाठी इंग्रज सरकारने काही तरी केले आहे काय ? इंग्रज येण्यापूर्वी खेड्यातील विहिरींवर तुम्ही पाणी भरू शकत नव्हते. ब्रिटिश सरकारने हा तुमचा हक्क शाबीत करण्यासाठी काहीतरी प्रयत्न केले आहेत काय ? इंग्रजांच्या येण्याआधी तुम्ही देवळात प्रवेश करू शकत नव्हते. आता तुम्ही तसे करू शकता काय ? इंग्रजांच्या आगमनापूर्वी तुम्ही पोलिसाच्या नोकरीत शिरू शकत नव्हते. इंग्रज सरकार आता तुम्हाला पोलिसाच्या नोकरीत भरती करते काय ? इंग्रज येण्याआधी तुम्हाला सैन्यात नोकरी करण्याची परवानगी नव्हती. ती सुविधा आता तुम्हाला खुली आहे काय ? सद्‌गृहस्थहो ! यापैकी कोणत्याही प्रश्नाला तुम्ही होकारार्थी उत्तर देऊ शकत नाही. ज्यांनी या देशावर इतका लांब काळपावेतो राज्य केले त्यांनी काहीतरी चांगल्या गोष्टी केल्याच असत्या. परंतु तुमच्या स्थितीमध्ये निश्चितपणे कोणताच मूलभूत बदल घडून आलेला नाही. ज्या बाबीशी तुमचा संबंध आहे

त्या बाबतीत ब्रिटिश येताना जशी स्थिती होती तशीच्या तशीच त्यांनी मोठ्या इमानदारीने जतन केली. एकदा एका चिनी शिंप्याकडे नवीन कोट शिवावयास टाकला होता व नमुन्यासाठी म्हणून त्याला जुना कोट दाखविला. तेव्हा त्याने मोठ्या गर्वाने त्या नमुन्याबरहुकूम ठिगळे, चिरा इत्यादी सर्वासह नवीन कोट शिवून दिला. ब्रिटिशांच्या काळात तुमच्या समाजरचनेतील दोषांची छिद्रे व वर्णव्यवस्थेची ठिगळे त्यांनी दुरुस्त न करता जशीच्या तशीच ठेवली आणि याहीपुढे जाऊन मी तर असे म्हणेन की इंग्रजांच्या सर्व शक्तीचा व तत्त्वांचा विचार करता तुमच्या तक्रारी निवारण करण्याची व येथील समाजरचनेत बदल घडवून आणण्याची लायकीच ब्रिटिशांजवळ नाही. आणि जोपर्यंत तुमच्या हातात शासन सत्ता येत नाही तोपर्यंत तुम्ही या तुमच्या दुःखाचे निवारण करू शकत नाही, आणि जोपर्यंत ब्रिटिशांचे राज्य येथे आहे तसेच कायम राहील तोपर्यंत तुमच्या हातात शासनसत्तेचा वाटा येऊ शकत नाही, तर केवळ स्वराज्याच्या घटनेमध्येच तुम्च्या हातात शासनसत्तेचा काही वाटा मिळण्याची शक्यता असून त्यावाचून तुम्ही तुमच्या लोकांना मुक्ती मिळवून देऊ शकत नाही. आपल्या देशातील बहुसंख्य लोकांच्या हातातील स्वराज्य म्हणजे भुतांचा बाजार आहे, हेही मला माहीत आहे. दलित वर्गावर आमच्या देशातील लोकांनी पेशवाईच्या काळात जे अन्याय, अत्याचार व जुलूमजबरदस्ती केली त्याची मला आठवण आहे आणि भावी स्वराज्यात असेच जुलूम या लोकांवर होतील की काय अशीही मला भीती वाटते. परंतु, सद्गृहस्थांनो ! काही क्षणासाठी तुम्ही जर भूतकाळ विसरण्याचा प्रयत्न केला आणि भावी स्वराज्यातील काही वर्गापासून सर्वसामान्य जनतेचे संरक्षण करणाऱ्या घटनादत्त संरक्षण तरतुदींचा तुम्ही विचार केला तर भावी स्वराज्य हा भुतांचा बाजार ठरण्याऐवजी तुमच्या हातात सत्ता येण्याची शक्यता तुम्हाला दिसून येईल आणि इतरांबरोबर तुम्हीही या देशाचे सार्वभौम राज्यकर्ते व्हाल. भूतकाळचे भूत तुमच्यावर स्वार होऊ देऊ नये. तुमच्या निर्णयावर कोणत्याही भीतीचा किंवा उपकाराचा परिणाम होऊ देऊ नका. तुमच्या कल्याणाचा विचार करा म्हणजे माझी खात्री आहे की स्वराज्य हेच तुमचे खरे उद्दिष्ट आहे, असे तुम्ही मान्य कराल.

२७. ही विचारसरणी तुम्हाला मान्य असेल तर भारताच्या भावी सरकारच्या बाबतीत सायमन कमिशनच्या योजनेला तुम्ही मान्यता देऊ शकणार नाही. कमिशनच्या रिपोर्टाच्या तपशीलवार परीक्षणात मी शिरू इच्छित नाही. तसे करण्यास वेळ पुरणार नाही कमिशनने सुचविलेल्या योजनेत देशाच्या सरकारचे उत्तरदायित्व किती आहे, एवढ्याच बाबीकडे तुमचे लक्ष

वेधण्यात मी समाधान मानतो. केंद्रीय सरकारातील कार्यकारी मंडळाच्या मंत्री मंडळाच्या स्थितीत कमिशनने कोणताही मूलभूत बदल सुचविलेला नाही. हे कार्यकारी मंडळ सध्या आहे तसेच बेजबाबदार पुढेही राहणार आहे. प्रांतामधील कार्यकारी मंडळ विधानसभेला उत्तरदायी करण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे. परंतु त्यावर गव्हर्नरच्या सत्तेची बंधने घालण्यात आली असून आणीबाणीच्या स्थितीत विधानसभेला उत्तरदायी नसलेले कार्यकारी मंडळ नेमण्याचा अधिकार गव्हर्नरला देण्यात आला आहे आणि अशातऱ्हेने कोणतेही खाते गव्हर्नर आपल्या हातात घेऊ शकेल. सद्गृहस्थांनो ! सायमन कमिशनच्या या योजनेवर मी केवळ एकच अभिप्राय व्यक्त करू इच्छितो. या समस्येकडे पाहण्याचे दोन मार्ग आहेत. पहिला असा की, भारताच्या केन्द्रीय विधानसभेला व प्रांतिक विधानसभांना कार्यकारी मंडळावर किती प्रमाणात अधिकार देण्यात यावे. दुसरा असा की कार्यकारी मंडळाला केन्द्रीय किंवा प्रांतिक-त्यांच्या विधानसभेपेक्षा किती अधिक प्रमाणात अधिकार देण्यात यावे-- या दोन मार्गांपैकी सायमन कमिशनने पहिलीचा स्वीकार केला आहे. असे जर आहे तर प्रत्येक बाबतीत हे उत्तरदायित्व लागू करावयास पाहिजे होते. प्रांतिक कार्यकारी मंडळ पूर्णतः उत्तरदायी का करण्यात आले नाही, याचे कोणतेच कारण मला तरी दिसत नाही आणि मिलिटरी, परराष्ट्रीय व्यवहार वगळला तर केन्द्रीय मंत्रिमंडळही उत्तरदायी बनविणे फारसे कठीण नाही, असे मला वाटते.

२८. आपणापैकी काही जण म्हणतील की दिल्ली अजून फार दूर आहे. दलित वर्गाने सध्या तरी प्रांतिक राज्यापुरतीच स्वतःला मर्यादा घालून घ्यावी. अशा लोकांना मी सुचवू इच्छितो की त्यांनी आपले प्रांतिक किंवा मध्यवर्ती मंत्रिमंडळाच्या उत्तरदायित्वाबद्दल विचार बनविताना दोन गोष्टी विचारात घ्याव्यात. पहिली बाब अशी की दलित वर्गासहित सर्व लोकांचे कल्याण अधिक व्यापकपणे व घनिष्ठपणे प्रांतिक सरकारापेक्षा देशाच्या केन्द्रीय सरकारवर अवलंबून आहे आणि म्हणूनच ही मध्यवर्ती सरकारची चक्की कशी चालेल व सहजपणे चालेल की नाही, यावरच या देशातील लोकांची प्रगती अवलंबून आहे. विधानसभेविषयी तिला किती सहानुभूती आहे यावरच तिची दळण्याची गती ठरेल. या दृष्टिकोनातून पाहिल्यास तुम्हाला जर देशातील लोकांची नैतिक व भौतिक भरभराट हवी असेल तर केन्द्रीय सरकारच्या उत्तरदायित्वाविषयी तुम्ही उदासीन राहू शकत नाही. परंतु हाच निर्णय सूचित करणारा आणखीही एक दृष्टिकोन आहे. सुरक्षा व सुव्यवस्था सांभाळण्याच्या बाबतीत प्रांतिक सरकार हे नेहमीच मध्यवर्ती सरकारचा जबाबदार प्रतिनिधी

म्हणून राहील. या दोघांनी परस्परांच्या सहकार्याने कार्य करावयाचे असेल तर या दोघांनाही एकाच अधिकाऱ्याकडून आज्ञा मिळावयास हव्या. प्रांतिक कार्यकारी मंडळ प्रांतिक विधानसभेला उत्तरदायी असल्यामुळे केन्द्रीय मंत्रिमंडळाच्या हुकुमांची अंमलबजावणी करण्यास ते बांधलेले राहणार नाही. कारण केन्द्रीय मंत्रिमंडळ या योजनेत केन्द्रीय विधानसभेला उत्तरदायी करण्यात आलेले नसून ते देशाच्या सेक्रेटरीला उत्तरदायी करण्यात आले आहे. आणि या बेबनावामध्ये आणीबाणीच्या परिस्थितीत देशाचे शासन पूर्णतः दुर्बल ठरण्याचा संभव आहे. म्हणून, तुम्हाला पसंत असो की नसो, तुम्ही प्रांतिक मंत्रिमंडळाचे उत्तरदायित्व अशा स्थितीत केन्द्रीय मंत्रिमंडळावर सोपवू शकत नाही.

## ६. दलित वर्ग आणि असहकार

२९. सद्‌गृहस्थहो ! आपण ज्याअर्थी, राखीव जागांसह साम्राज्यांतर्गत स्वराज्याच्या उद्दिष्टाला पाठिंबा देत आहोत, त्याअर्थी, महात्मा गांधींनी मागील मार्च महिन्यापासून या देशात जी असहकाराची चळचळ सुरू केली आहे तिच्यात भाग घेणे आपले कर्तव्य ठरते काय ? या प्रश्नाच्या बाबतीत तुमची भूमिका तुम्ही स्पष्ट केली पाहिजे. सर्व उदारमतवादी लोकांनी ही चळवळ सनदशीर नसल्याबद्दल तिला दोष दिलेला आहे. हा युक्तिवाद मला पसंत नाही, हे मला कबूल केलेच पाहिजे. तुमची मंदीर प्रवेशाची चळवळ असनदशीर आहे, असे जर पुराणमतवादी लोक तुम्हाला म्हणतील तर तुम्ही काय उत्तर द्याल ? अशाप्रकारे सरळ कारवाई करण्यापेक्षा पुराणमतवादी लोकांना विनंती अर्ज करणे हे अधिक कायद्यात बसते की कायदा बदलून टाकण्याचा सरळसोट प्रयत्न करणे हे अधिक कायद्याच्या दृष्टीने बरोबर आहे ? पुराणमतवादी लोकांशी आरंभिलेल्या तुमच्या स्वातंत्र्याच्या लढाईमध्ये जर तुमच्या साधनांवर अशी कोणी बंधने घातली तर तुम्हाला बरे वाटेल काय ? मला वाटते की जर काही स्वीकृत घटनात्मक मार्ग आधी तयार असेल तरच तुम्ही सनदशीर मार्गाचा आग्रह धरू शकाल. परंतु जेथे अशा प्रकारची घटनाच नसेल तेथे सनदशीर मार्गाचा उपदेश ऐकण्यास फारच थोडे लोक तयार होतील. हा विचार ब्रिटिशांनासुद्धा नवीन नाही. कारण अल्स्टर चळवळ ही असहकाराचीच चळवळ नव्हती काय ? आणि ब्रिटिशांपैकी अनेक उत्तमोत्तम राजनीतिज्ञांनी तिला पाठिंबा दिला नव्हता काय ? आपल्या हितसंबंधाच्या दृष्टीने ती सुसंगत व समयोचित आहे की नाही हा प्रश्नच येथे महत्त्वाचा आहे. या असहकाराच्या चळवळीला मी विरोधी असण्याचे मुख्य कारण म्हणजे ती मुळीच समयोचित नाही, अशी माझी खात्री

पटलेली आहे. साम्राज्यशाहीत दोष असले तरी ब्रिटिश साम्राज्याने भारतीय लोकांच्या प्रगतीची दारे खुली ठेवलेली आहेत, असे मत बाळगणारा मी एकटाच आहे असे नव्हे. भारतात प्रस्थापित असलेल्या सरकारचा विश्वासघात न करणे हे माझे अनिवार्य कर्तव्य आहे, असे म्हणणाऱ्या महात्मा गांधींचाच हा दृष्टिकोन आहे. ब्रिटिश साम्राज्याची ही केवळ वृत्ती होती असे नव्हे तर भारताच्या स्वयंशासनाच्या प्रगतीकरिता प्रांतिक सत्तेची जबाबदारी लोकांना १९२० साली देऊन आपला हेतू प्रत्यक्षात उतरविण्याचा त्याने प्रामाणिक प्रयत्नही केलेला आहे. कदाचित आदर्शाच्या मानाने हे प्रत्यक्षीकरण अगदीच अपुरे असेल, कदाचित ध्येयाकडे वाटचाल करण्याची गती अगदीच हळू असेल, परंतु ठरलेल्या धोरणाच्या विरुद्ध इंग्रज सरकार वागले, असे म्हणता येऊ शकेल काय? जर इष्ट हेतूच्या विरुद्ध दिशेने त्यांचे वर्तन असेल तर असहकाराची चळवळ समयोचित आहे, हे कोणीही समजू शकला असता. परंतु तसे असण्याऐवजी व्हाइसरॉयच्या घोषणेद्वारा ब्रिटिशांनी आपला हेतू साम्राज्यांतर्गत स्वराज्य देण्याचा असल्याचे पुन्हा नव्याने स्पष्ट शब्दात सांगितलेले आहे आणि त्या ध्येयाचे प्रत्यक्षीकरण लवकरात लवकर व्हावे म्हणून भारतीयांना गोलमेज परिषदेची संधी देऊन स्वराज्याबद्दल चर्चा करून घेण्याचा मार्ग मोकळा करून दिला. साम्राज्यांतर्गत स्वराज्याची मागणी करणाऱ्यांच्या दृष्टिकोनातून त्यात अनेक त्रुटी आहेत, हे खरे आहे, परंतु वर्तुळ परिषदेला काँग्रेसने नकार दिला त्याचे हे कारण नव्हे. व्हाइसरॉयशी किंवा ब्रिटिश मंत्रिमंडळाशी एखाद्या आश्वासनासाठी किंवा करारासाठी किंवा अन्य एखाद्या हेतूसाठी भांडणे निरुपयोगी नसले तरी अनाठायी आहे, असे दिसते. कारण असा करार होणे किंवा न होणे हे भारतीयांच्या एकत्रित आवाजावर अवलंबून असून जर वसाहतीच्या स्वराज्यासाठी आपण सर्व भारतीयांचा आवाज एकत्र करू शकलो तर त्याचा परिणाम ब्रिटिश पार्लमेंटवर झाल्यावाचून राहणार नाही. ते काहीही असो, परंतु काँग्रेसने वर्तुळ परिषद स्वीकारली असती तर आपले कोणतेच नुकसान झाले नसते. तिच्यात जर कदाचित अपयशही आले तरी काँग्रेसला आपला असहकाराचा कार्यक्रम केवळ एक वर्षासाठी पुढे ढकलावा लागला असता व त्यात तिचे काहीच नुकसान न होता उलट फायदाच झाला असता. कारण चुकीच्या कारणासाठी असो की खऱ्या कारणासाठी असो, ज्यांची आज इंग्रज सरकारवर श्रद्धा आहे तिचा भ्रम सर्वांच्या मनातून नष्ट होईल. या सर्व बाबी विचारात घेता, अशा समयी काँग्रेसने कायदेभंगाची चळवळ सुरू करून आणि वर्तुळ परिषदेने उपलब्ध करून दिलेली शांततापूर्वक बोलणी करण्याची संधी नाकारून फार मोठी चूक केली, असे कोणालाही म्हणणे भाग आहे.

३०. या कायदेभंगाच्या चळवळीला मी पाठिंबा देऊ शकत नाही, याचे दुसरे कारण असे, आमच्या हितसंबंधाच्या, संरक्षणाच्या व सुरक्षिततेच्या दृष्टिकोनाशी ती सुसंगत नाही, असे माझे मत आहे. कायदेभंगाची चळवळ ही जनतेची चळवळ आहे. ही अशी चळवळ आहे की, जबरदस्ती हे तिचे मुख्य तत्त्व आहे. ही पळापळीची पद्धती असून बऱ्याच मोठ्या प्रमाणावर जर ती सुरू केली तर क्रांतीमध्ये तिचे रुपांतर झाल्यावाचून राहणार नाही. एखादी क्रांती-मग ती रक्तरंजित असो की रक्तहीन असो– त्यात काही फरक पडत नाही. यशाच्या दृष्टीने अत्यंत अनिश्चित असून या पद्धतीत गोंधळ माजण्याची व भयानक प्रसंग ओढविण्याची फार मोठी शक्यता असते. आपणासमोर फ्रेंच क्रांतीचे उदाहरण आहेच. तिचा दिखाऊ हेतू लोकशाही स्थापन करण्याचा होता परंतु सरतेशेवटी मात्र तिचा परिणाम अनिर्बंध हुकूमशाही निर्माण करण्यात झाला. पुष्कळदा क्रांती अनिवार्यही असते. ज्याप्रमाणे, विजयामुळे एका राष्ट्राकडून किंवा एका वंशाकडून दुसऱ्याच्या हातात सत्ता जाते त्याप्रमाणेच, क्रांतीमुळेही एका पक्षाच्या हातातून सत्ता दुसऱ्या पक्षाच्या हातात जाते. अशाप्रकारचा पोकळ बदल होण्यावर आमचे समाधान होणे शक्य नाही, याची मला खात्री आहे. भारतीय समाजामध्ये ज्या शक्ती सध्या कार्यरत आहेत त्यामध्ये राजकीय सत्तेच्या वाटपाद्वारा खराखुरा सापेक्ष बदल घडून येईल, अशाप्रकारचे सत्तांतर आम्हाला हवे आहे. यासाठी तडजोडीची आवश्यकता आहे. अशाप्रकारची तडजोड होण्यावर व तिची प्रत्यक्षात कार्यवाही होण्यावरच दलित वर्गाचे भवितव्य पूर्णतः अवलंबून आहे. भारतातील खरी समस्या केवळ सरकार स्थापन करण्याची किंवा स्वातंत्र्य मिळविण्याची नसून ती खऱ्या अर्थाने स्वतंत्र शासनसत्ता स्थापन करण्याची आहे आणि बर्कच्या भाषेत पुन्हा सांगायचे म्हणजे, '' खरे सरकार घडविण्यासाठी फार मोठी शहाणपणाची दृष्टी लागते. शासन सत्तेतील जागा निश्चित ठरवा, लोकांना आज्ञाधारकपणाची शिकवण द्या म्हणजे तुमचे कार्य तडीस गेले असे समजा. केवळ स्वातंत्र्य देणे हे फारच सोपे काम आहे. त्याला मार्गदर्शन करण्याची काहीच आवश्यकता नाही. केवळ शासनसत्ता सोडून देण्याचीच त्यास गरज असते. परंतु खरेखुरे स्वतंत्र सरकार घडविणे, म्हणजे स्वातंत्र्याला उत्सुक सर्व विरोधी शक्तींची समजूत घालून एकत्र आणणे व एकराष्ट्रीयत्वाच्या धाग्यात त्यांना बांधणे हे कठीण कार्य असून त्याला बराच विचार व गंभीर चिंतनाची आवश्यकता असते. '' आणि हा प्रश्न योग्य तडजोडीचा असून कायदेभंगाच्या धावपळीच्या पद्धतीने तो साध्य होणे संभवनीय नाही, याबद्दल मला पक्की खात्री आहे.

३१. सद्‌गृहस्थांनो ! या कायदेभंगाच्या चळवळीला दलित वर्गाने पाठिंबा देऊ नये, असे मला का वाटते याची ही कारणे आहेत. वर्तुळ परिषदेद्वारा उपलब्ध झालेल्या शांततापूर्ण पद्धतीनेच त्यांचे कार्य अधिक सुकर होईल. म्हणून या वर्तुळ परिषदेसाठी तुमच्या अत्यंत विश्वासातील व उच्च पात्रतेची तुमच्यातील पुरेशी माणसे घेण्यात यावी, असा तुम्ही आग्रह धरला पाहिजे.

## ७. दलित वर्गाचे संघटन

३२. या आपल्या तटस्थतेच्या धोरणामुळे दलित वर्गाचे फार मोठे नुकसान होईल, असे माझ्या अनेक मित्रांनी सुचविले आहे. दलित वर्गाने ब्रिटिश सरकार व इंडियन नॅशनल काँग्रेस या दोहोंपैकी कोणातरी एकाशी मैत्री जोडावी, असे त्यांचे मत आहे. मी या प्रश्नावर पुन्हा पुन्हा विचार करून पाहिला, तेव्हा माझी खात्री पटली की या दोघांपासूनही वेगळे राहण्यातच दलित वर्गाची सुरक्षितता आहे. मी आधीच सांगितल्याप्रमाणे साम्राज्यांतर्गत स्वराज्याला मी विरोध करू शकत नाही, कारण इंग्रज सरकार आपली समस्या सोडविण्यास कधीच समर्थ ठरू शकत नाही, असा माझा विश्वास आहे. परंतु काँग्रेसमध्ये सामील झाल्यामुळे आपला प्रश्न सुटण्याच्या दृष्टीने आपली प्रगती झाली, असे कसे म्हणता येईल, तेच मला कळत नाही. आता काँग्रेस अस्पृश्यता पाळण्यास मान्यता देत नाही आणि सर्व जनतेची प्रतिनिधी म्हणून तीच केवळ संस्था आहे, असे सांगण्यात येते. महात्मा गांधींच्या नेतृत्वाखाली काँग्रेसने अस्पृश्यतेच्या प्रथेची निंदा करणारा ठराव पास केला आहे, यात शंका नाही. परंतु त्याला वास्तवात उतरविण्यासाठी काँग्रेसने काही केले आहे काय ? आपल्या धोरणाचा प्रसार करण्यासाठी काँग्रेसने आपल्या सभासदांवर खादी वापरण्याची अट घातली आहे. परंतु अस्पृश्यता न पाळण्याची अट काँग्रेसने आपल्या सभासदांवर का घातली नाही ? अशाप्रकारचे बंधन सहजगत्या व्यवहारात उतरविता आले असते. स्पृश्य सभासदाला आपल्या घरी एखादा अस्पृश्य नोकर ठेवून किंवा एखादा विद्यार्थी शिकण्यासाठी ठेवून या अटीचे सहज पालन करता आले असते. महात्मा गांधींनी अस्पृश्यता निवारणासाठी जे काही प्रयत्न केले त्याचा काही परिणाम घडून आला आहे काय ? त्यांचा नैतिक पाठिंबा कितीही मोठा असला तरी त्यांचा व्यक्तिगत प्रभाव व त्यांची वैशिष्ट्यपूर्ण साधने लक्षात घेता त्यांनी आपला हेतू प्रत्यक्षात उतरविण्यासाठी फारच अल्प प्रयत्न केलेला आहे. सूत-कताईसाठी दरवर्षी फंड गोळा करण्यासाठी ते फेरी मारतात. अस्पृश्यतेविरूद्ध त्यांनी कधीतरी अशी एखादी मोहीम उघडली काय ? त्यांनी चरख्यावर जेवढा आपला वेळ खर्च केला त्याच्या एकशतांश भागही या कार्यासाठी खर्च केला नाही. हिंदू आणि मुसलमानांमध्ये ऐक्य प्रस्थापित व्हावे म्हणून ते तीन आठवड्यांच्या उपोषणाला कसे बसले होते.

हे तुम्ही सर्वजण जाणताच. स्पृश्यांच्या मनात अस्पृश्यांबद्दल अधिक दयाभाव निर्माण व्हावा म्हणून महात्मा गांधींनी एका दिवसाचे तरी उपोषण केले आहे काय ? या गोष्टी जर करण्यात आल्या असत्या तर कोणीही काँग्रेसच्या व्यासपीठाचा स्वीकार केला असता. परंतु अस्पृश्यतेचा कलंक दूर करण्यासाठी काँग्रेसने काही प्रामाणिक प्रयत्न तर केले नाहीच पण स्वामी श्रद्धानंदांनी काँग्रेसचा त्याग केवळ एवढ्याच कारणासाठी केला की काँग्रेस याबाबतीत केवळ देखावा करण्यापलिकडे काहीच करावयास तयार नाही, हेही आपणास माहीत आहेच. काँग्रेसने घेतलेल्या ठरावावरून कोणाला तिचे अंतरंग ठरवावयाचे असल्यास काँग्रेस ही सामान्यांसाठी आहे की नाही हा निर्णय घेण्याची त्याने घाई करता कामा नये. तिच्या आर्थिक ठरावांमध्ये उच्च वर्गाच्या व मध्यम वर्गाच्या हितसंबंधांचेच प्रतिबिंब दिसते. तिच्या व्यापारविषयक ठरावांचा संबंध केवळ व्यापारी व कारखानदार यांच्याशीच असून कामकरी माणसाला वगळण्यात आले आहे. जी संघटना केवळ एक चतुर्थांश किंवा एक शष्ठमांश इतक्याच लोकांचे काम करते आहे तिने आपण जनतेची प्रातिनिधीक संघटना असल्याचा दावा करणे सोडून दिले पाहिजे. मिठाच्या सत्याग्रहाचा समावेश काँग्रेसच्या कार्यक्रमात घातल्यामुळे तिचा हा मूळ चेहरा पालटून जात नाही. मिठावरील कराविरूद्ध चालू असलेली जोरजोराची निंदा ही राजकीय चळवळीचा एक भाग आहे. परंतु शिऱ्याची चव जशी खाऊन पाहिल्यावाचून कळत नाही त्याप्रमाणेच मिठाच्या सत्याग्रहाची चळवळ सामान्य जनता कुचलल्या जाऊ नये म्हणून उच्चवर्गाच्या खांद्यावर कितपत देण्यात येईल, त्यावर या चळवळीची चव अवलंबून आहे. तिच्या मागचा प्रामाणिक हेतू केवळ काळच स्पष्ट करू शकेल. परंतु जेव्हा निर्णयाची वेळ येते तेव्हा अनेक काँग्रेसवाले सामान्य लोकांची बाजू घेण्याऐवजी उच्च वर्गीयांचीच बाजू घेतात, याबद्दल मला मुळीच शंका नाही. काँग्रेस सामान्य जनतेबद्दल उदासीन व निष्काळजी असावी हे एकप्रकारे अनिवार्यच आहे. कारण ती राष्ट्रवादी लोकांचे प्रतिनिधीत्व करीत असून ती काही एखादा राजकीय पक्ष नव्हे. त्यामुळे तिचे धोरण व कार्यक्रम ऐसपैस असलेच पाहिजे. प्रत्येकाला हे माहितच आहे की एखाद्या संघटनेवर सर्वांच्या हितसंबंधाची अनेकविध जबाबदारी लादण्यात आली तर सर्वांच्या नावावर ती केवळ काहिचेच हित साधू शकते आणि हितसंबंधामध्ये जर काही विरोध निर्माण झाला तर दुर्बल लोकांना वाऱ्यावर सोडण्यात येते. म्हणून आपल्या कार्याची जबाबदारी काँग्रेसने सांभाळावी आणि ज्याअर्थी, अशाप्रकारचा विरोध आमच्या प्रतिपक्षांशी उद्‌भवणार हे निश्चित आहे; त्याअर्थी, त्या परिस्थितीत आमची बाजू घेऊन तिने आमच्यासाठी लढावे अशी अपेक्षा तरी आपण कशी करू शकू, हेच मला कळत नाही.

३३. आपणापैकी काँग्रेसची सेवा करण्यास जे आतुर आहेत त्यांचा असा समज आहे की स्वराज्य प्राप्तीनंतर या सेवेचा मोबदला म्हणून काँग्रेस आमची अस्पृश्यता नष्ट करील व आपण जर तिची आता सेवा केली नाही तर या गुन्ह्याबद्दल ती नंतर आम्हाला गुलामगिरीत डांबील. फुकटच्या मदतीबद्दल कोणी मोबदला देत नाही व त्यामुळे वरील मतावर मला माझा अभिप्राय देण्याची गरज दिसत नाही. परंतु एक गोष्ट स्पष्ट करणे आवश्यक आहे, असे मला वाटते. ती म्हणजे आता तुम्ही काँग्रेसची कितीही सेवा करा परंतु स्वराज्य प्राप्तीनंतर या काँग्रेसचा तुम्हाला शोधूनही पत्ता लागणार नाही. त्यावेळी आपणाला आपल्याच शक्तीवर विसंबून राहावे लागेल. कारण काँग्रेसचे ध्येय साध्य झाल्यामुळे स्वराज्याच्या आगमनाबरोबरच ती हवेमध्ये विरून जाईल. आणि हॅमिल्टनच्या शब्दात सांगायचे म्हणजे आपणाला येथील जनतारूपी ' भयानक पशूच्या ' द्वेषाशी व खवळलेल्या वासनांशीच दोन हात करावे लागणार आहेत. मला तर अशीही भीती वाटते की, ज्यांच्या नावाने आपले सर्व प्रयत्न सोडून देण्यात यावे असे सांगण्यात येते त्या महात्मा गांधींना जर सामान्य माणसाला जीवन मिळते त्यापेक्षा अधिक काळ जीवन-निसर्गाचे नियम तोडून लाभले व ते स्वराज्याच्या काळात जिवंत राहिले तर ते सुद्धा या ' भयानक पशूपासून ' आपले रक्षण करण्यास असमर्थच ठरतील.

३४. माझा विचार बरोबर असेल तर स्वतःसाठी आपला मार्ग ठरविला पाहिजे, असाच त्यावरून निष्कर्ष निघतो. अशाप्रकारच्या मार्गाचा अवलंब करण्यास जे कचरत आहेत त्यांच्या घाबरेपणाचा हेतू मी समजू शकतो. काँग्रेस आणि सरकार या दोघांपेक्षाही वेगळी अशी भूमिका घेण्यात त्यांना धोका होण्याची शंका येते. ही आपल्या दुर्बलपणाची कबुलीच आहे; आणि दलित वर्गाने शासन-शक्तीच्या आधारावाचून स्वतंत्र भूमिका घ्यावी, ही परिस्थिती काही सुखावह नाही, हे मला कबूल आहे, परंतु मला तुम्हास असे विचारावेसे वाटते की सरकार किंवा काँग्रेस या दोघांपैकी कोणावरही विसंबून राहण्यामुळे आपला काय लाभ होईल ? केवळ एखादा पक्ष शक्तीशाली आहे म्हणून, आपली तेथे कदर होवो की न होवो, त्याच्याशी संगनमत करणे हा भिकाऱ्यांचा मार्ग असून ती लज्जास्पद शरणागती आहे आणि कोणतेही सभ्य लोक तो सहन करू शकत नाहीत. इतरांनी लक्षात घ्यावी अशी शक्ती दलित वर्गाने कशी प्राप्त करून घ्यावी व अशा तऱ्हेने या प्रसंगातून आपले कल्याण कसे साधून घ्यावे हाच खरा त्यांच्यापुढील प्रश्न आहे. दलित वर्गाच्या चळवळीत दोन गंभीर गोष्टींची उणीव आहे असे दिसते. पहिली बाब म्हणजे दलित वर्गाचे लोकमत अशी काही एक वस्तू दिसत नाही आणि दुसरी गोष्ट म्हणजे सर्व दलित वर्गाने मिळून सल्लामसलत करून

निश्चित केलेली अशी कोणतीही साधने त्यांच्याकडे नाहीत. आपली दु:खे जशीच्या तशीच राहिली याचे कारण, आपण युगानुयुगे मुके राहिलो आणि त्याला वाट करून देण्याची काळजी घेतली नाही, हेच आहे, असे दिसते. न्यायाच्या दृष्टीने पाहिले तर आपल्या स्थितीबद्दल आपण सरकारला किंवा सुधारकांनाही दोष देऊ शकत नाही. आपण जाणूनबुजून या अवस्थेत स्वत:ला ठेवले आणि त्यांना आपल्या दु:खाबद्दल कसलीही जाणीव करून न देता किंवा त्यांच्या प्रयत्नांना पाठिंबा न देता त्यांच्या नावाने उगीचच खडे फोडत आहोत, हे कबूल केलेच पाहिजे. आपल्या सभांमध्ये आपण पास केलेले ठराव, आपण सरकारकडे केलेल्या मागण्या व आपल्या तक्रारीचा सरकारकडून इतर जमातींच्या मागण्याप्रमाणेच गंभीरपणे विचार का होत नाही, याचा चिंतातुरपणे मी विचार करीत आलो आहे. त्यावरून माझी खात्री पटली आहे की आपण अजूनही केवळ एखाद्या प्रांतापुरतीच चळवळ उभारू शकतो. एका प्रांतात उभारलेल्या चळवळीला दुसऱ्या प्रांतात पाठिंबा मिळत नाही. परंतु अशी चळवळ जर संपूर्ण देशाच्या मध्यवर्ती संघटनेने उभारली तर तिला निश्चितच सर्व प्रांतांचा पाठिंबा मिळाला असता. मला वाटते दलित वर्गाने याबाबतीत जागृत व्हावे व अखिल भारतीय स्वरूपाची एक संघटना उभारून तिच्या द्वारा आपली सुनिश्चित चळवळ चालवावी यासाठी आता सर्वात नामी संधी लाभलेली आहे. मागील दोन-तीन वर्षापासून ' ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लास असोसिएशन ' नावाची एक संस्था अस्तित्वात आली आहे. परंतु या संस्थेचे केवळ पदाधिकारी असून तिच्याजवळ इतर सभासद मुळीच नाहीत. हे एक उघड गुपित आहे. माझ्या प्रांतातील तिची स्थिती तर निश्चितच अशी आहे. अशाप्रकारची खोटी कल्पनेतील संस्था दलित वर्गाची कोणतीही सेवा करू शकत नाही. तुम्हाला खरीखुरी जिवंत संस्था उभारली पााहिजे व तिच्या कार्यकर्त्यांचे जाळे देशभर पसरून व अनेक कार्यकर्ते तिच्या भोवती गोळा करून तिच्या द्वारा तुम्हाला दलित वर्गाच्या भावना व्यक्त केल्या पाहिजे. मी सांगितल्याप्रमाणे असे एखादे संघटन उभारण्याच्या हेतूने या सभेतच एक घटना तयार करण्यासाठी तुम्ही एखादी लहानशी कमिटी नियुक्त केली तर फार सोईचे होईल. ही आपणात फार मोठी उणीव असून ती आपण अविलंब भरून काढली पाहिजे.

## ८. दलित वर्गाची उन्नती

३५. सद्गृहस्थांनो ! आपण राजकीय सत्ता हस्तगत केली पाहिजे, याबद्दल वाजवीपेक्षा बराच वेळपर्यंत बोलून मी तुम्हाला आग्रहपूर्वक सांगितले. परंतु दलित वर्गाच्या सर्व रोगावर राजकीय सत्ता हे औषध लागू होऊ शकत नाही, हेही मी तुम्हास सांगितलेच पाहिजे. त्यांची मुक्ती सामाजिक उन्नतीमध्ये आहे. दलित वर्गाने आपल्या वाईट चालीरितींचा त्याग केला पाहिजे.

त्यांच्या जीवन निर्वाहाचे जे वाईट मार्ग आहेत ते त्यांनी सोडले पाहिजेत. जीवन जगण्याच्या पद्धतीत बदल केल्यामुळे तुमची राहणी इतकी उत्कृष्ट झाली पाहिजे की इतरांना तुमच्याबद्दल आदर, तुमची मैत्री हवीहवीशी वाटली पाहिजे. तुम्ही सुशिक्षित झाले पाहिजे. केवळ लिहिण्यावाचण्याचे ज्ञान पुरेसे ठरणार नाही; तर आपणापैकी काही शिक्षणाच्या उच्च टोकापर्यंत पोहोचले पाहिजेत. म्हणजे त्यांच्याबरोबर वाटचाल करून संपूर्ण समाजाचा दर्जा उंचावेल. ' ठेविले अनंते तैसेचि राहावे ' या उदासिन वृत्तीचा त्याग करण्यास लोकांना प्रवृत्त केले पाहिजे. कारण आहे त्या स्थितीत समाधानी न होण्याच्या वृत्तीतूनच समाजाची उन्नती होत असते आणि शेवटची परंतु कमी महत्त्वाची नसलेली बाब म्हणजे दलित वर्गात स्फूर्ती व उत्साह निर्माण केला पाहिजे म्हणजे त्यांच्या मनातील भीती नष्ट होऊन इतरांच्या बरोबरीने आपल्या मानवी हक्काच्या वहिवाटीस ते सुरवात करतील. आपल्या हातात केवळ राजकीय सत्ता येण्याने हे परिणाम घडून येणार नाहीत. उद्दिष्ट साध्य करण्याचे ते फक्त एक साधन आहे, हे आपण ओळखले पाहिजे. मी ही धोक्याची सूचना देण्याचे कारण म्हणजे केवळ दलित वर्गातील काही लोकांना विधानसभेत प्रतिनिधित्व मिळाल्याने दलित वर्गाच्या यातना नष्ट होतील, असा काही लोकांचा गैरसमज झालेला आहे. हे सर्व कार्य सामाजिक उन्नतीचे आहे. कै. गोखल्यांच्या ' सर्व्हंटस् ऑफ इंडिया ' किंवा कै. लाला लजपतरॉय यांच्या ' सर्व्हंटस् ऑफ पीपल ' या संस्थेच्या धर्तीवर दलित वर्गाची एक संस्था स्थापून तिच्यावर ही जबाबदारी सोपविली पाहिजे.

## समारोप

३६. सद्गृहस्थांनो ! वाजवीपेक्षा जास्त लांब भाषणाने मी तुम्हास त्रस्त केले, याबद्दल मला खेद वाटतो. परंतु संक्षिप्तता नेहमीच अपेक्षित असली तरी राजकारणाबद्दल परिचित नसलेले लोक जेथे प्रथमच एकत्र झालेले आहेत, अशासारख्या आजच्या सभेत आपल्या प्रश्नांच्या सर्व बाजूंचा विचार करणे मला योग्य वाटले. तुम्हाला शक्य तितके अधिक मार्गदर्शन करावे, असा माझा हेतू होता त्यामुळे लांब भाषणाबद्दल मी क्षमेला पात्र आहे, असे वाटते. ही आपली सभा शेवटची ठरणार नाही, तर आपल्या भव्य चळवळीची ती केवळ सुरवात ठरावी आणि तिच्याद्वारा आपल्या लोकांना मुक्ती मिळून या देशात प्रत्येक व्यक्ती हे एक मूल्य--राजकीय, सामाजिक व आर्थिक मूल्य-मानण्यात येईल, अशी समाजरचना निर्माण करण्यास ती कारणीभूत ठरेल, अशी मी आशा व्यक्त करतो.

आपण मला जो बहुमान दिला आणि माझे भाषण ऐकून घेतले याबद्दल मी आपणा सर्वांचा आभारी आहे.' [1]



---

[1] डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : संपा. मा. फ. गाजरे, खंड-२, पृ. ६५-९८.

# ३४

# देशाच्या स्वराज्यास माझा पाठिंबा असेल

' दिनांक ४ ऑक्टोबर १९३० रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे राऊंड टेबल कॉन्फरन्ससाठी इंग्लंडला जात असल्याने दिनांक २ ऑक्टोबर १९३० रोजी मुंबई इलाख्यातील अस्पृश्य मानलेल्या वर्गाच्यावतीने डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना मानपत्र व थैली अर्पण करण्याचा समारंभ दामोदर हॉलच्या भव्य पटांगणात सायंकाळी ४ वाजता डॉ. सोळंकी यांचे अध्यक्षतेखाली झाला. समारंभास सुमारे ६/७ हजार जनसमूह जमला होता.

अध्यक्षांनी प्रास्ताविक भाषण केल्यानंतर समारंभ कमिटीचे जनरल सेक्रेटरी श्री. सीताराम नामदेव शिवतरकर यांनी मानपत्र वाचून दाखविले व थैलीसाठी रु. ३,७०० जमले असून दुसरे दिवशी संध्याकाळपर्यंत सदर थैलीची रक्कम पाच हजार रुपयांपर्यंत जाईल अशी आशा त्यांनी प्रदर्शित केली.''[1] मानपत्र येणेप्रमाणे :

'मानपत्र

डॉ. भीमराव रामजी आंबेडकर, एम. ए., पीएच. डी., डी. एस्सी बार-ॲट-लॉ., एम. एल. सी.

परमप्रिय महाराज, हिंदुस्थानला ग्रेटब्रिटनने स्वराज्याचे हक्क देण्याच बाबतीत वाटाघाट करण्याकरता लंडन येथे भरणाऱ्या रॉऊंड टेबल कॉन्फरन्साला हजर राहण्यासाठी सरकारच्या निमंत्रणावरून आपण तिकडे जाण्यास निघत आहा, अशा वेळी आपल्या संबंधाने आमच्या दलितवर्गामध्ये वाटत असलेला उत्कट आदर, विश्वास व प्रेम ही व्यक्त करणे हे आमचे पवित्र कर्तव्य आहे असे आम्ही समजतो. आपण संपादन केलेल्या प्रशंसनीय ज्ञानाचा व अनुभवाचा सदुपयोग स्वदेशाच्या व विशेषतः स्वकीय जनांच्या हितार्थ करण्याचा हा असा सुयोग आल्याबद्दल आम्ही आपले अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतो.

विद्वत्‌रत्न महाशय, समाजशास्त्र, राजनीतिशास्त्र, अर्थशास्त्र, इत्यादी गहन विषयांचे दीर्घकाळ अध्ययन करून तदंतर्गत प्रमेयांचे यथोचित मनन आपण केले आहे. त्याचा पडताळा व्यवहारात पाहाण्याचे अनेक प्रसंग आपणास स्वदेशी व परदेशी प्राप्त झाले आहेत. आणि आमच्या देशाच्या उन्नतीस कोणत्या गोष्टींची सांप्रतकाळी आवश्यकता आहे, हे आपण आपल्या मनाशी ठरविले आहेच.

---

[1] डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड ४, पृ. ६६

ह्या सिद्धांतरूप गोष्टीने निर्भयपणे व निरपेक्षबुद्धीने समर्थन करण्याचे मनोधैर्य आपल्याठायी अलौकिक असल्याचा आम्हास चांगला अनुभव आहे. तरी आपण ज्या कामगिरीवर जात आहा तीत आपल्या ह्या प्रशंसनीय गुणांचे योग्य दिग्दर्शन होऊन आपण खरे देशभक्त व सत्यनिष्ठ असल्याबद्दलच्या आपल्या कीर्तीत भर पडेल असा आम्हास पूर्ण भरवसा आहे. लोभलाभास वश होऊन स्वदेशाच्या वास्तविक चिरस्थायी कल्याणाच्या गोष्टींविषयी आपण कदापि उदासीन होणार नाहीत किंवा त्यांचा पुरस्कार करण्यात आपण बिलकूल माघार घेणार नाहीत अशी आम्हास पूर्ण खात्री आहे. कारण आपली संस्कृती अत्युच्च दर्जाची असल्यामुळे असा प्रकार आपणाकडून सहसा होणार नाही. तरी आमच्या देशाची खरी वकिली करण्याचा सुयोग आपणास प्राप्त झाला आहे. त्याचा योग्य फायदा घेण्यास आपण यत्किंचितही कसूर करणार नाहीत अशी आम्हास पूर्ण उमेद आहे.

सुजन महाशय, आमच्या देशातील एका मोठ्या जनवर्गाच्या बाबतीत धार्मिक व सामाजिक संबंधाने अतिघोर अन्याय कैक शतके चालू राहून त्यास हीनदीन स्थिती प्राप्त झाली आहे. तीतून त्याचा उद्धार झाल्यावाचून आमच्या देशास खरी उन्नती प्राप्त होणार नाही. या गोष्टीविषयी अलिकडे कित्येक मोठ्या मनाच्या माणसास थोडेसे वाटू लागले आहे. आणि ह्या जनवर्गाच्या उद्धारासाठी त्यांच्याकडून थोडीसी खटपट चालू आहे. परंतु आपण ती हाती घेतल्यापासून तिला विशेष महत्त्वाचे व विशेष परिणामकारक असे स्वरूप येऊ लागले आहे. आणि आणखी काही वर्षे आपण आपले प्रयत्न चालू ठेवले तर ह्या प्रकरणी बरेच यश प्राप्त होणार आहे. आपल्यासारख्या खऱ्या कळकळीचा व समर्थ वाली ह्या जनवर्गास कधीही प्राप्त झाला नव्हता. आपण चालविलेल्या उद्योगामुळे आपणास ह्या वर्गाकडून देवासारखा मान मिळू लागला आहे. आणि त्यांची आपणावर निःसीम भक्ती बसली आहे. ह्या मानाला व विश्वासाला आपण सर्वतोपरी पात्र आहा. कारण त्यांच्या हिताप्रित्यर्थ वाटेल तो आत्मयज्ञ करण्यास आपण सर्वदा तत्पर असता आणि आपली योग्यता अतिशय मोठी असल्याकारणाने आपल्या वजनाचा, बुद्धिमत्तेचा व स्वहितपरतेचा परिणाम सर्व प्रकारच्या लोकांच्या मनावर उत्तम होत असतो. अशा योग्य व निश्चयी पुरूषाचा ह्या जनवर्गास राजकीय हक्क प्राप्त करून देण्याच्या कामी उत्तम उपयोग होणार आहे. आणि लंडन येथील परिषदेत ह्या जनवर्गाच्या राजकीय हक्कांचे योग्य समर्थन आपल्या हातून अवश्य होणार आहे, ह्या वर्गाची वकिली आपण उत्तमप्रकारे बजावून तीत सुयश संपादाल अशी आम्हास उमेद आहे.

राजकीय बाबतीत आपल्या धोरणाची रूपरेषा नागपूर येथे थोड्या दिवसांपूर्वी भरलेल्या अखिल भारतीय बहिष्कृत वर्ग परिषदेच्या अध्यक्षस्थानावरून केलेल्या आपल्या भाषणात दाखविलीच आहे. ते धोरण एकंदर हिंदी राष्ट्र आणि अस्पृश्य मानलेले वर्ग यांच्या हिताचे आहे, याविषयी आमची खात्री आहे.

हीनदीन जनांचे कैवारी महाराज, आपण नुसती लंडनची यात्रा करूनच परत येणार नसून पूर्वोक्त जनवर्गाच्या उद्धारार्थ लागणारे द्रव्य सहाय्य मिळविण्याच्या उद्देशाने अमेरिका वगैरे देश फिरून तिकडील जगन्मित्रांच्या सहानुभूतीचा ओघ या अकिंचन जनवर्गाकडे वळविण्याचा प्रयत्न करणार आहा असे आम्ही ऐकतो. हा आपला उद्देश अत्यंत स्तुत्य होय. आपल्यासारख्या सुविद्य, थोर व स्वार्थरहित पुरूषाला अमेरिकेसारख्या धनसंपन्न देशात आपला सदुद्देश खात्रीने चांगला सिद्धिस जाईल व स्वकीय जनांचे थोडेबहुत उर्जितसाध्य केल्याचे आपणास सुयश प्राप्त होवो असे आम्ही मनापासून इच्छितो आणि " जे का रंजले गांजले त्यांसी म्हणे जो आपुले, तोचि साधु ओळखावा देव तेथेचि जाणावा " ह्या साधुक्तीप्रमाणे आपण सर्वमान्य व सर्वपूज्य होऊन आपल्या जीविताचे साफल्य होईल.

शेवटी आम्ही असे मनःपूर्वक इच्छितो की, आपणास हा अत्यंत महत्त्वाचा प्रवास सुखाचा होवो व आपले आरोग्य कायम राहून आपण ज्या महत्त्वाच्या कामगिरीवर जात आहा ती यशस्वीरितीने पार पाडण्याचे सामर्थ्य आपल्या ठायी कायम राहो. आणि आपण सुकिर्ती संपादून स्वदेशी सुखरूप येण्याची आम्ही उत्कंठापूर्वक वाट पाहात राहू.

मानपत्र वाचून झाल्यानंतर ते व थैली अध्यक्ष डॉ. सोळंकी यांच्या हस्ते अर्पण केली. डॉ. बाबासाहेब यांनी त्या दोहोंचाही स्वीकार केला."

" नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर मानपत्रास उत्तर देण्यासाठी उभे राहिले परंतु त्यांचा कंठ दाटून आल्याने सुमारे ५/६ मिनिटे त्यांना काहीच बोलता येईना. नंतर त्यांनी आपल्या भाषणास सुरूवात केली. ते म्हणाले,

अध्यक्ष महाराज व बंधु भगिनींनो,

आजच्या प्रसंगी मी आपणास काय सांगावे हे काही सुचत नाही ; कारण आता आपणा सर्वांची व माझी जवळ जवळ ५/६ महिने भेट होणार नाही या विचाराने माझे हृदय भरून येत आहे. गेल्या दोन वर्षात माझ्याकडून जी काही थोडीफार कामगिरी झाली असेल, त्याला हजारो सद्‌गृहस्थांनी मदत केली नसती, तर माझ्या एकट्याच्या हातून काहीच झाले नसते. मी केलेल्या कामगिरींच्या वाट्यापैकी मुंबई कायदे कौन्सिलमधील कामात माझे मित्र डॉ. सोळंकी यांनी जास्त सहाय्य केले आहे. १९२६ साली गव्हर्नरने मला बोलावून विचारले की, जर अस्पृश्य वर्गापैकी डॉ. सोळंकी यांना मुंबई कायदे कौन्सिलतर्फे निवडले तर त्यांचे व तुमचे कौन्सिलमध्ये जमेल किंवा नाही ? यावर मी उत्तर दिले की, सोळंकी हे चांगले

सुशिक्षित असल्याने कौन्सिलमध्ये आमचे जमेल. मी थोडासा उद्धट व रागीट असा आहे. कौन्सिलमध्ये असताना डॉ. सोळंकी यांच्याशी वागताना तसे दोष मजकडून घडले असतील. परंतु डॉ. सोळंकींनी मनात काहीएक न बाळगता मनोभावाने मदत केली आहे व म्हणून कौन्सिलच्या सर्व कामाचे श्रेय डॉ. सोळंकी यांनाच आहे. कौन्सिल बाहेरच्या गोष्टीत समता संघाने मला फार मदत केली आहे. श्री. देवराव नाईक यांनी आजपर्यंत मला केलेल्या मदतीवरून मी त्यांना माझा उजवा हात मानतो. मला खात्री आहे की, जरी मी ५/६ महिन्यांसाठी परदेशात जात असलो, तरी आमच्या एकमेकांच्या सहवासाने आमचे इतके तादात्म्य झाले आहे की, माझ्या मागे श्रीयुत नाईकच काम करू शकतील. दुसरे माझे समता संघाचे स्नेही श्रीयुत प्रधान, कद्रेकर, कवळी इ. मंडळींनी बरीच मदत केली आहे. तसेच श्री. शंकरराव परशा यांनी पैशाच्या बाबतीत फारच मदत केली आहे. श्री. शंकररावसारखा आधारस्तंभ दुसरा मला कोणीच नव्हता. सार्वजनिक कार्याला पैसा आवश्यक असतो परंतु सुरवातीस मी काढलेल्या सोलापूर बोर्डिंगच्या वेळी मजजवळ फक्त रु. ५०० हातात होते. नंतर एका ज्यू मित्रास रु. १,००० ची प्रॉमिसरी नोट लिहून देऊन या बोर्डींग संस्था सुरू केल्या आहेत. त्यात श्री. शंकररावांनी फारच मदत केली आहे. प्रेस घेण्यासाठी त्यांनी रु. १,८०० ची मदत केली आहे.

आजपर्यंत अस्पृश्यवर्गासाठी जी थोडीबहुत कामगिरी मजकडून झाली आहे, तिच्या श्रेयाचे अनेक लोक वेगवेगळया कामातले सहकारी भागिदार आहेत. आपण दिलेली थैली व मानपत्र मी स्वीकारतो परंतु थैलीतल्या रकमेचा आपल्या खाजगी कामाकरिता मुळीच उपयोग करावयाचा नसून, ज्या गरीब समाजाकडून ही थैलीची रक्कम जमा झाली आहे, त्याच गरीब जनतेच्या कार्यात तिचा उपयोग होणे इष्ट आहे. अखिल भारतीय दलित काँग्रेसच्या मध्यवर्ती संघटनेच्या खर्चाकरिता मुंबई इलाख्यातर्फे वर्गणी जमवून देण्याचे मी कबूल केले आहे. त्याकरिता सदरील रकमेचा काही भाग डॉ. सोळंकी यांचेजवळ ठेवून जाणार आहे. बहिष्कृत काँग्रेसकरिता त्यांनी सदर रकमेचा उपयोग करावा. बाकीच्या रकमेचा दुसऱ्या तऱ्हेने उपयोग करणार आहे. आपले बंद पडलेले बहिष्कृत भारत पत्र पुनः सुरू करावे अशी इच्छा आहे. सद्यःस्थितीचे निरीक्षण करून त्यावरील लेख सदर पत्रात येतील. पत्राचे नाव बदलण्याचा मी निश्चय केला आहे. कारण नावामुळे बरेच लोक आपले पत्र घेत नसत व आपले म्हणणे काय आहे हे सर्वांना समजावे हा जो आपला उद्देश तो साधला जात नसे. त्यासाठी नाव बदलण्याचे मी ठरविले आहे. पत्राचे नाव ' जनता ' ठेवून त्याचे संपादकत्व श्री. देवराव नाईक यांच्याकडे राहील. सदर पत्रास वर्गणीदार मिळवून देण्याची कृपा करावी. थैलीच्या रकमेतील काही भाग मी चालविलेल्या

बोर्डींगांना मदत म्हणून द्यावा. याप्रमाणे थैलीच्या पैशाचा विनियोग केला जाईल. 'राऊंडटेबल कॉन्फरन्ससाठी विलायतेस जाण्यायेण्याचा डॉ. आंबेडकरांचा खर्च जर इंग्रज सरकार देणार आहे, तर मग ही थैली कशासाठी ?' असे आपल्यापैकी काही जणांना वाटणे स्वाभाविक आहे ; परंतु ज्यावेळी मला आपल्या मदतीची जरूरी होती त्यावेळीसुद्धा जेथे मी आपल्या मदतीची अपेक्षा केली नाही त्या मला आज माझ्या खाजगी कार्यासाठी तुमच्या मदतीची जरूरी नाही. जेव्हा जरूर लागेल त्यावेळी मी अवश्य मदत मागेन.

मी राऊंड टेबल कॉन्फरन्सला जाणार आहे. या परिषदेपासून निदान अस्पृश्य वर्गाचा तरी फायदा झाल्याशिवाय राहाणार नाही. परंतु ज्या लोकांनी या परिषदेवर बहिष्कार घातला आहे, अशा लोकांना मी असे विचारतो की, जर दोन पक्षात लढाई जुंपली तर तहाची भाषा बोलणे काय वाईट ? आज सरकार व काँग्रेस यांच्यामध्ये निकराचा लढा चालू आहे. काँग्रेसच्या चळवळीमुळे सरकारचे नुकसान होते. असले दोन्ही पक्ष हट्टास पेटले असता कोणी तरी मध्यस्थी करून तडजोडीचा मार्ग काढून भांडण मिटविणे अवश्य आहे. हा तडजोडीचा मार्ग राऊंड टेबल कॉन्फरन्सद्वारे निघू शकेल. या परिषदेपासून काही निष्पन्न होणार नाही असे सांगण्यात येत आहे परंतु मला तसे वाटत नाही. ज्यांना ही परिषद अपेशी वाटत असेल, त्यांना मी असे विचारतो की, या परिषदेस अपेश कसे व का येईल ? सध्या हिंदू, मुसलमान व अस्पृश्य या सर्वांना स्वराज्य असावयास पाहिजे आहे. नुकत्याच नागपूर येथे झालेल्या अखिल भारतीय बहिष्कृत काँग्रेसने तसा ठरावही पास केला आहे. सर्वांची एकवाक्यता आहे. मतभेद एकाच गोष्टीवर आहे व ती ही की, 'स्वराज्य कोणत्या पद्धतीवर द्यावयाचे !' अल्पसंख्यांक लोकांचे संरक्षण होऊन त्यांना कोणत्या परीने सामाजिक, धार्मिक, राजकीय समता मिळेल, सर्व हिंदू मात्र स्वतंत्र असू शकतील असे स्वराज्य आज हवे आहे ; परंतु वाद आहे तो स्वराज्याने मिळणारी सत्ता सर्व समाजामध्ये योग्यरीतीने विभागली जावी की एखाद्या विशिष्ट वर्गाच्या हातीच ती राहावी या संबंधाने आहे. दलित समाज, मागासलेले वर्ग व अल्पसंख्यांक वर्ग यांचे समाधान करण्याच्या कामी पुढारलेल्या वर्गाने व बहुसंख्यांक समाजांनी आपल्या मनाचा मोठेपणा दाखविला तर आपसातला वाद मिटणे अशक्य नाही.

आपल्याला आवश्यक ते मागेनच ; परंतु त्याचबरोबर या देशास स्वराज्य द्यावे असा ठराव आल्यास त्यास मी पाठिंबा देणार आहे. या देशाची सर्वतऱ्हेने उन्नती होऊन हा देश उच्च पदास चढावा हे काँग्रेसप्रमाणे आम्हासही वाटते. शेवटी मी राऊंड टेबल कॉन्फरन्स आटोपल्यानंतर दुसरे काम करु इच्छितो व ते हे की, लोकमत जागृत करणे. हे फार महत्त्वाचे काम आहे. काँग्रेसची चळवळ

अमेरिका, जर्मनी इत्यादी साऱ्या देशभर होत आहे. तद्वतच आपल्या अस्पृश्यतेचे दुःख परक्यांच्या वेशीवर टांगले पाहिजे व म्हणून रशिया, जर्मनी, अमेरिका व जपान इत्यादी देशातील प्रमुख पुढाऱ्यांच्या भेटी घेऊन आपले दुःख त्यांचेपुढे मांडीन. इतकेच नव्हे तर, जुळल्यास लीग ऑफ नेशन्सपुढेही अस्पृश्यांचा प्रश्न मांडणार आहे. तसेच अस्पृश्यांना सध्या पोलीस व लष्करी नोकरीत मज्जाव आहे तो काढून टाकण्यासाठी खास प्रयत्न करीन. मला आपणा सर्वांना शेवटची एकच विनंती करावयाची आहे व ती ही की, आपण सर्वांनी एकोप्याने व ऐक्यानी वागण्याचा प्रयत्न करावयास हवा आहे. आपणामध्ये आपापसात पुष्कळसे गट पडले आहेत. गेल्या दोन चार वर्षात एक अगदीच वाईट दृश्य माझ्या नजरेस पडले व ते हे की, दरेक मनुष्य स्वतःला पुढारी म्हणून मिरवू इच्छितो ही फार वाईट गोष्ट आहे. यापुढे हा प्रकार आपण बंद करावा अशी माझी विनंती आहे. आपल्यापुढे इतक्या अडचणी व कामाचे इतके डोंगर पडले आहेत की, त्यांचे निवारणार्थ एक जिल्हा किंवा एक इलाखा सुद्धा काही करू शकणार नाही. तेव्हा अखिल बहिष्कृत बंधुंनी आपापसातील मतभेद बाजूला सारून खांद्यास खांदा लावून कार्यास लागावे, यातच आपले हीत आहे. माझ्या मागे डॉ. सोळंकी व श्री. नाईक यांच्या मताप्रमाणे वागून समाजात झालेली जागृती वाढीस लागण्याचे कार्य आपणा सर्वांवर सोपवून आपली रजा घेतो.''[1]

'' हे विचार डॉ. आंबेडकर यांनी आपल्या भाषणात सांगितले. सभा संपल्यानंतर अस्पृश्य लोक तेथून बाहेर पडले, तेव्हा बाहेर जमलेल्या काही लोकांनी अस्पृश्यांवर हल्ला केला असे म्हणतात. परेल येथे अस्पृश्य व काँग्रेसच्या पक्षाचे लोक यांच्या दरम्यान बरीच मोठी मारामारी झाली. तीत दगड व लाठ्या यांचा उपयोग करण्यात आला. दंग्यात ८ माणसे जखमी झाली व त्यांना जवळच असलेल्या किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटलमध्ये उपचारासाठी पाठविण्यात आले. ''[2]

---

[1] डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड ४, पृ. ६६-६९

[2] ज्ञानप्रकाश : ४ ऑक्टोबर १९३०



## ३५

# ब्रिटिश सरकार जोपर्यंत या देशात आहे आमच्या हातात राजकीय सत्ता येणे शक्य नाही

( प्रथम गोलमेज परिषद १९३० ला लंडन येथे आयोजित करण्यात आली होती. या परिषदेला डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना आमंत्रित करण्यात आले होते. या पहिल्या गोलमेज परिषदेत डॉ. आंबेडकरांनी २० नोव्हेंबर १९३० ला केलेले पहिलेच भाषण अनेक अर्थांनी क्रांतीकारक ठरून इंग्लंडमधील वृत्तपत्रांनी त्याची विशेष दखल घेतली.– संपादक. )

डॉ. आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

अध्यक्ष महोदय,

मी आणि माझे सहकारी रावबहादूर श्रीनिवासन् दलित वर्गाचे प्रतिनिधी म्हणून येथे हजर झालेलो आहोत. यास्तव भारतीय राज्यघटनेच्या नविनीकरणासंबंधी विचार करीत असता तत्त्वतःच मी दलित वर्गाचा दृष्टिकोन डोळयांसमोर ठेवून भाषणास उभा झालो आहे. या वर्गाचे प्रतिनिधीत्व करणे हा मला व माझ्या सहकाऱ्यास सन्मान वाटतो. हा दृष्टिकोन चारकोटी तीस लक्ष लोकांचा किंवा इंग्रजी अमलाखालील भारतीय लोकांपैकी एक पंचमांश लोकांचा आहे. हा दलित लोकांचा वर्ग स्वतंत्र वर्ग असून स्पष्टपणे मुसलमान वर्गापासून तो निराळा आहे. आणि हिंदू समाजात जरी त्याचा समावेश करण्यात येत असला तरी तो कोणत्याही दृष्टीने त्या समाजाचा एकजीव घटक नाही. दलित समाजाचे केवळ स्वतंत्र अस्तित्व आहे, इतकेच नाही तर हिंदुंनी त्यांचा द्वेषभावनेने वेगळा असा सामाजिक दर्जा ठरवून टाकला आहे. हा दर्जा हिंदू समाजातील दुसऱ्या कोणत्याही जातीपेक्षा ठळकपणे वेगळा आहे. हिंदूत ज्यांना दुय्यम व खालच्या दर्जाचे स्थान प्राप्त झालेले आहे अशा काही जाती आहेत, परंतु दलित वर्गाला देण्यात आलेला दर्जा पूर्णतः वेगळा आहे. त्याला भूदास आणि गुलाम यांच्या मधली स्थिती प्राप्त झाली आहे. भूदास आणि गुलाम यांना स्पर्शबंदी घालण्यात आली नव्हती परंतु दलित वर्गावर स्पर्शबंदी घालण्यात आली आहे. त्यामुळे गुलाम आणि भूदास यांच्यापेक्षाही दलितांची स्थिती फारच शोचनीय झाली आहे. यामुळे भयंकर वाईट गोष्ट कोणती झाली असेल तर त्यांच्यावर गुलामगिरी लादल्या गेली आणि त्यांच्या मानवी व्यवहारात मर्यादा घातल्या गेल्या. केवळ त्यांच्या सार्वजनिक जीवनावरच या अस्पृश्यतेचा परिणाम होतो असे नाही तर तीमुळे प्रत्यक्षात त्यांना संधी समानतेपासून वंचित केल्या जाते ;

आणि मानवाचे अस्तित्वच ज्यावर आधारित आहे अशा प्राथमिक स्वरूपाच्या नागरिक हक्कांपासूनच या वर्गांना वंचित ठेवण्यात आले आहे. मला खात्री आहे की, इंग्लंड किंवा फ्रान्सच्या संपूर्ण लोकसंख्येइतक्या असलेल्या लोकांची जीवन कलहामध्ये इतक्या भयंकरपणे अनेक विघ्नांनी जखडबंदी झाली आहे की, राजकीय समस्या सोडविण्याच्या योग्य मार्गावर त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहू शकत नाही. ह्या परिषदेने हा प्रश्न शक्य तितक्या लवकर सोडविण्याची जबाबदारी स्वीकारावी अशी माझी कळकळीची अपेक्षा आहे.

शक्य तितके थोडक्यात हा प्रश्न मांडण्याचा मी प्रयत्न करणार आहे. मला सांगावयाचे ते हे की, शक्य तितक्या लवकर भारतातील प्रचलित नोकरशाही रद्द करून लोकांचे, लोकांनी व लोकांकरता चालविलेले सरकार स्थापन करण्यात यावे. माझी खात्री आहे की, दलित वर्गाच्या दृष्टिकोनातून या माझ्या विधानाबाबत काही लोकांना खचितच आश्चर्य वाटेल. कारण दलित वर्गाला ब्रिटिश शासकांशी जोडणारा धागा अतिशय वेगळया स्वरूपाचा आहे. धर्मांध हिंदुंनी दलितांचे पिढ्यान् पिढ्या जे दमन केले व त्यांच्यावर अत्याचार केले त्यापासून आंशिक सुटका मिळवून देणारे मुक्तिदाता या दृष्टीने त्यांनी ब्रिटिशांचे स्वागतच केले. इंग्रजांच्या बाजूने त्यांनी हिंदू, मुसलमान व शीख यांच्याविरूद्ध युद्धात भाग घेऊन भारताचे साम्राज्य त्यांना जिंकून दिले. या बदल्यात दलितांचे विश्वस्त म्हणून आपली भूमिका सांभाळण्याचे आश्वासनही ब्रिटिशांनी दिले होते. अशातऱ्हेचा ह्या दोहोंमधील घनिष्ट संबंध लक्षात घेतला म्हणजे, ब्रिटिश सरकारविषयी दलित वर्गाच्या मनात हे जे परिवर्तन घडून आले आहे ही घटना निशंकपणे लक्षणीय म्हणावी लागेल. परंतु ह्या मतपरिवर्तनाची कारणे शोधून काढणे फारसे अवघड नाही. केवळ बहुमताच्या हातात आपले भविष्य झोकून द्यावे एवढ्याच इच्छेने आम्ही हा निर्णय घेतलेला नाही. खरेच ! तुम्हाला माहितच आहे की, भारतातील बहुमत आणि मी ज्या अल्पमताचा प्रतिनिधी आहे त्यांच्यात सलोख्याचे संबंध तसे कधीच नव्हते. आम्ही हा निर्णय स्वतंत्रपणे घेतलेला आहे. केवळ आमच्यावर ओढवलेल्या परिस्थितीच्या प्रकाशात वर्तमान शासनाचे परिक्षण केले आणि चांगल्या शासनास आवश्यक असलेली बहुतेक मूलतत्त्वे ह्या शासन प्रणालीत नाहीत असे आम्हास आढळले आहे. आमची सद्यः परिस्थिती आणि ब्रिटिश राज्याच्या पूर्वीचा भारतीय समाज यांची तुलना करता असे दिसून येते की, पूर्वीच्या समाजात आमच्या वाट्याला जी दुर्दैवी स्थिती आली होती तिच्यातून आम्ही पुढे वाटचाल करण्याऐवजी केवळ कालक्रमणा मात्र करीत आहोत. ब्रिटिशांच्या आगमनापूर्वी अस्पृश्यतेमुळे आम्ही अती किळसवाण्या स्थितीत दिवस कंठीत होतो. ही परिस्थिती दूर करण्यासाठी ब्रिटिश सरकारने काही केले आहे काय ? ' ब्रिटिश येण्यापूर्वी खेड्यांतील विहिरींवर आम्हाला

पाणी भरण्यास बंदी होती. विहिरीवर पाणी भरण्याचा अधिकार ब्रिटीश सरकारने मिळवून दिला काय ? * ब्रिटिश येण्यापूर्वी आम्ही देवळात जाऊ शकत नव्हतो. आता आम्ही जाऊ शकतो काय ? ब्रिटिश येण्यापूर्वी आम्हाला पोलिस दलात प्रवेश नाकारण्यात येत होता. आतातरी ब्रिटिश सरकार आम्हाला पोलिस दलात प्रवेश देते काय ? ब्रिटिश येण्यापूर्वी आम्हाला सैन्यात नोकरी नाकारण्यात येत होती. सरकार सैन्यात नोकरी करण्याची आम्हाला आता परवानगी देते काय ? हे क्षेत्र आम्हाला आज खुले आहे काय ? ह्या प्रश्नां-पैकी कोणत्याही प्रश्नाला आपण होकारार्थी उत्तर देऊ शकत नाही. इतक्या मोठ्या काळापर्यंत ज्यांनी राज्यसत्ता चालविली ते इंग्रज होत म्हणूनच. त्यांनी आमच्यासाठी काही चांगल्या गोष्टीही केल्या आहेत हे मी मोठ्या आनंदाने कबूल करतो. परंतु आमच्या स्थितीत मूलभूत असे कोणतेही परिवर्तन त्यांनी घडवून आणले नाही. खरेच ! ज्या बाबतीत आमचा संबंध आहे त्या बाबतीत ब्रिटिश सरकारने त्यांना जी समाजव्यवस्था आढळून आली तिचेच त्याने मोठ्या विश्वासूपणाने रक्षण केले. एका चिनी शिंप्याला नमूना म्हणून एक जुना कोट देण्यात आला असता त्याने ज्याप्रमाणे मोठ्या अभिमानाने नवीन कोट करताना त्यावर चिरा व छिद्रे पाडली व जुन्याबरहुकूम नवा कोट केला. त्याप्रमाणेच ब्रिटिश सरकारने या बाबतीत वर्तन केले आहे. जरी ब्रिटिशांनी दीडशे वर्षेपर्यंत या देशावर राज्य केले तरी उघड्या व्रणांप्रमाणे आमची दुःखे तशीच राहिली आहेत. त्यांच्यावर काहीच उपचार करण्यात आले नाहीत !

ब्रिटिशांनी आमच्याविषयी सहानुभूती दाखविली नाही किंवा ते आमच्या स्थितीसंबंधी उदासीन राहिले म्हणून आम्ही त्यांना दोष देत आहो, असे मात्र नव्हे, तर आम्हास असे आढळून आले की, आमचे प्रश्न हाताळण्यास ते पूर्णतः अकार्यक्षम आहेत. केवळ उदासीनतेसंबंधीचाच प्रश्न असता तर तो तत्कालिक स्वरूपाचा आहे असे म्हणता आले असते आणि त्याने आमच्या मतांमध्ये इतका गंभीर स्वरूपाचा बदल झाला नसता. परंतु परिस्थितीचे खोलवर पृथःकरण करून पाहिल्यानंतर असे आमच्या लक्षात आले की, हे प्रकरण केवळ उदासीनतेचे नाही, तर प्राप्त कर्तव्य समजून घेण्याच्या पूर्णतः असलेल्या अकार्यक्षमतेमुळेच असे घडून आले आहे. भारतातील ब्रिटिश सरकारवर दोन गंभीर स्वरूपाची बंधने आहेत असे दलित वर्गास वाटते. पहिले बंधन हे अंतस्थ स्वरूपाचे होय. जे आज अधिकारपदावर आहेत त्यांची भूमिका, त्यांचे हितसंबंध आणि त्यांच्या प्रेरणा यांच्यामुळे निर्माण झाले आहे. ब्रिटिश सरकार आम्हाला ह्या

---

* प्रस्तुत वाक्य–डॉ. आंबेडकर : लाईफ ॲंड मिशन : धनंजर कीर, पृ १५०

प्रश्नामध्ये मदत करू शकत नाही म्हणून नव्हे तर असे केल्यास त्याची भूमिका त्यांचे हितसंबंध, त्यांच्या प्रेरणा, त्यांच्याशी न जुळणारे असल्यामुळे ते आम्हास मदत करू शकत नाहीत. त्यांच्या अधिकारावर दुसरे भयंकर स्वरूपाचे बंधन म्हणजे असे काही पाऊल उचलल्यास ह्याला हिंदुसमाजाकडून तीव्र प्रतिकार होईल अशी त्यांना भीती वाटते. भारतीय समाजाच्या मर्मस्थानी इजा करणारे सामाजिक दोष काढून टाकणे अत्यावश्यक आहे हे इंग्रज सरकारने ओळखले आहे. ह्या दोषांमुळे दलित वर्गाच्या जीवनाला हजारो वर्षापासून भयानक स्वरूपाची कीड लागली आहे, हेही त्यांना माहीत आहे. भारतातील जमीनदार बहुजनांची क्रूर पिळवणूक करून त्यांना दिवसेन्‌दिवस शुष्क करीत आहेत. तसेच भांडवलदार मजूर वर्गाला जगण्यासाठी आवश्यक तेवढी मजूरी आणि त्याना कामाच्या उपलब्ध सोयी प्राप्त होऊ देत नाहीत, ह्याचीही जाणीव भारतीय सरकारला आहे. तरी सुद्धा ह्यापैकी एकाही दुष्ट रूढीला हात घालण्याचे धाडस भारत सरकारने केलेले नाही, ही अत्यंत दुःखाची गोष्ट आहे. का ? त्यांना असे करण्यासाठी कायदेशीर अधिकार नाहीत म्हणून त्यांनी असे केले आहे काय ? नाही. त्यांनी अशातऱ्हेची मध्यस्थी केली नाही, कारण अशातऱ्हेच्या सामाजिक व आर्थिक जीवनाच्या प्रचलित संहितेला धक्का लावल्यास हितसंबंधी वर्गाकडून त्याला प्रखर विरोध केल्या जाईल अशी त्यांना भीती वाटत होती. अशा सरकारपासून कोणाचे कोणते कल्याण होणार ! या दोन निर्बधांनी पांगळया झालेल्या सरकारकडून लोकांच्या जास्तीत जास्त कल्याणाची एवढीच अपेक्षा करता येण्यासारखी आहे की, भारतातील सामाजिक परिस्थिती पूर्ववतच राहावी. आम्हाला असे सरकार अधिकारावर हवे की, ज्यातील सत्ताधारी व्यक्तिची बांधिलकी देशाच्या सर्वोच्च हितासाठी असेल. प्रचलित सामाजिक आणि आर्थिक रूढी सुधारण्याचा प्रयत्न केल्यास लोकांची आज्ञापालनाची वृत्ती केव्हा नष्ट होते आणि बंड करून उठण्याची प्रवृत्ती केव्हा उफाळून येते याची सीमारेषा ओळखणारे व निर्भयपणे सुधारणा करण्यास पुढे येणारे सरकार आम्हाला हवे आहे कारण अशा ठिकाणीच न्यायप्रियता आणि उपयुक्तता सिद्ध होत असते. ही कर्तव्ये पार पाडण्यास ब्रिटिश सरकार कधीही पात्र ठरू शकत नाही. हे केवळ लोकांचे, लोकांनी व लोकांकरिता चालविलेल्या सरकारलाच शक्य होऊ शकते.

दलित वर्गाने त्यांच्या दृष्टिकोनातून उपस्थित केलेले काही प्रश्न व त्यांची संभवनीय उत्तरे ही अशी आहेत. म्हणून आम्ही ह्या टाळता न येणाऱ्या अशा निर्णयावर येऊन पोहोचलो आहोत की, आमच्या सध्याच्या वैशिष्ट्यपूर्ण संकटग्रस्त स्थितीत बदल घडवून आणण्याच्या दृष्टीने जरी उद्दिष्ट चांगले असले तरी सध्याचे नोकरशाही भारत सरकार पूर्णतः सामर्थ्यहीन आहे. आमची दुःखे

दूर करण्यास कोणीही समर्थ नाही अशी आमची खात्री झाली आहे. आमची दुःखे आम्हीच नाहीशी करु शकू. यासाठी जोपर्यंत आमच्या हातात राजकीय सत्ता येत नाही तोपर्यंत आम्ही ती नष्ट करू शकणार नाही. ब्रिटिश सरकार जोपर्यंत या देशात आहे तोपर्यंत निश्चितच राजकीय अधिकारांचा अंशही आमच्या हाती येण्याची शक्यता नाही. केवळ स्वराज्यातील राज्यघटनेतच राजकीय सत्ता आमच्या हातात येण्याची संधी मिळणे शक्य आहे. त्याशिवाय आमच्या लोकांची मुक्तता दुसऱ्या मार्गाने होणे शक्य दिसत नाही.

अध्यक्ष महोदय, तुमचे विशेष लक्ष जिच्याकडे मी वेधू इच्छितो अशी आणखी एक गोष्ट आहे. दलित वर्गाचा दृष्टिकोन तुमच्यापुढे मांडत असताना स्वयंसत्तात्मक दर्जाचे राज्य असा शब्दप्रयोग मी आतापर्यंत केलेला नाही. मी तो वापरण्याचे टाळले याचे कारण त्यातील गर्भितार्थ मी ओळखत नाही असे नव्हे किंवा भारताचा दर्जा स्वयंसत्तात्मक राज्याचा व्हावा याला दलितांचा विरोध आहे असाही त्याचा अर्थ नाही. हा शब्दप्रयोग न वापरण्याचा माझा मुख्य हेतू असा आहे की, त्यामुळे दलित वर्गाची भूमिका या शब्द प्रयोगातून पुर्णत्वाने स्पष्ट होत नाही. दलित वर्गाकरिता असलेल्या संरक्षणात्मक तरतुदीसहित स्वयंसत्तात्मक दर्जाचे राज्य दलितांनाही हवे आहे ; तथापि त्यांचा भर मुख्यतः एकाच मुद्यावर आहे : तो मुद्दा म्हणजे स्वयंसत्तात्मक दर्जा असलेल्या भारताचा राज्यकारभार कोणत्या तत्त्वांनुसार चालणार आहे ? राजकीय सत्तेचे केंद्र कुठे राहील ? ते कोणाच्या हातात राहणार आहे ? त्यामध्ये दलित वर्ग वारसदार असेल काय ? या उद्देश पूर्तीसाठी आवश्यक अशा नवीन राज्यघटनेची राजकीय यंत्रणा असल्याशिवाय दलितांना राजकीय सत्तेचा अल्पांशही मिळणे शक्य नाही असे दलितांना वाटते. ही यंत्रणा घडविताना भारताच्या सामाजिक जीवनातील काही कठोर सत्यांकडे डोळेझाक करून चालणार नाही. हे मान्य करावेच लागेल की भारतीय समाज हा विविध जातींच्या उतरंडीने बनलेला आहे. ह्या समाजरचनेत वरच्या क्रमाने सन्मान व उतरत्या क्रमाने अवमान अशी एक, जातीय श्रेणी निर्माण झाली आहे. लोकशाही शासनासाठी अत्यावश्यक अंग म्हणजे समता आणि बंधुभाव या भावना विकसित होण्यास मुळीच अवसर न देणारी अशी ही समाजपद्धती आहे. दुसरी लक्षणीय बाब म्हणजे आपण हेही मान्य केलेच पाहिजे की, बुद्धिमान वर्गाला भारतीय समाजात फार महत्त्वाचे स्थान देण्यात आले आहे , परंतु हा वर्ग केवळ वरच्या श्रेणीतूनच आलेला आहे. हा वर्ग जरी देशाविषयी बोलत असला आणि राजकीय चळवळीचे नेतृत्व करीत असला तरी ज्या जातींमध्ये तो जन्माला आला तिच्यासंबंधीचा संकुचित जातीय दृष्टिकोन त्याने झुगारून दिलेला नाही. दुसऱ्या शब्दात हे सांगायचे म्हणजे समाजाची मानसिकता आणि राजकीय यंत्रणा यांचा परस्पर संबंध असावयास हवा. आणि

या यंत्रणेने सामाजिक मानसिकतेची दखल घ्यावयास हवी असा दलित वर्गाचा आग्रह आहे. असे न झाल्यास, तुम्ही तयार करीत असलेली घटना आखीव व रेखीव तर राहील परंतु ती अग्रच्छेदीत असल्याने, ज्या समाजासाठी ती तयार केली जाईल त्यालाच अयोग्य ठरेल.

माझे भाषण संपविण्यापूर्वी मी आणखी एका मुद्याचा परामर्श घेणार आहे. आम्हाला वारंवार असे सांगण्यात येते की दलित वर्गाचा प्रश्न हा एक सामाजिक प्रश्न आहे आणि तो सोडविण्याचा मार्ग राजकारणापासून वेगळा आहे. ह्या विचारसरणीला आमचा जोरदार विरोध आहे. जोपर्यंत दलित वर्गाच्या हातात राज्य शासनाची सूत्रे येत नाहीत तोपर्यंत त्यांच्या प्रश्नांचे निराकरण कधीही होणे शक्य नाही असे आमचे निश्चित मत झाले आहे. अर्थात दलितांचा प्रश्न राजकीय ठरतो आणि त्याची सोडवणूक सुद्धा तशीच व्हावयास हवी. म्हणून हा प्रश्न मुख्यतः राजकारणातील प्रश्न म्हणून मी पुढे मांडत आहे. राजकीय समस्या म्हणूनच त्याचा विचार व्हावयास हवा. आमच्यावर ज्यांचा भयानक स्वरूपाचा आर्थिक, सामाजिक आणि धार्मिक अंमल आहे अशा लोकांकडे राज्यसत्तेचे हस्तांतरण आज ब्रिटिशांकडून होत असल्याची जाणीव आम्हास आहे. वस्तुतः 'स्वराज्य' हा शब्द उच्चारताच आम्हाला आमच्यावर झालेल्या गतकाळातील अत्याचार, दमन आणि अन्याय यांची आठवण होते आणि भावी स्वराज्यातही त्याची पुनरावृत्ती होईल अशी आम्हास साधार भीती वाटते. तरीही स्वराज्य मिळावे असेच आमचे मत आहे. आमच्या देशबांधवांबरोबर आम्हालाही अधिसत्तेत योग्य त्या प्रमाणात वाटा मिळेल या एकाच आशेने हा अटळ असा गंभीर स्वरूपाचा धोका आम्ही स्वीकारण्याचे धाडस करीत आहोत. परंतु ह्याला आम्ही एकाच अटीवर संमती देऊ शकतो की, आमची समस्या केवळ काळाच्या लहरीवर अधांतरी सोपविल्या जाऊ नये. बदलत्या काळानुसार काही चमत्कार घडून येतील ही वेडी आशा बाळगून आम्ही वर्षानुवर्षे वाट पाहात बसलो आहोत. त्याचीच मला आज भीती वाटते. ब्रिटिश सरकारने यथाक्रम प्रातिनिधीक सरकारला अधिक अधिकार देण्याच्या प्रत्येक क्षणी दलित वर्गाला पद्धतशीरपणे डावललेले आहे. राज्यशासनात त्यांचाही वाटा आहे, हा विचार कोणाच्या मनाला शिवलेलाच नाही. मी माझी सर्व शक्ती एकवटून आज ठासून सांगतो आहे की, 'यापुढे कोणीही आमच्या सहनशीलतेचा अंत पाहू नये. आमच्या समस्येची सोडवणूक सर्वसाधारण राजकीय प्रश्नांच्याबरोबर झालीच पाहिजे आणि कोणत्याही परिस्थितीत भावी अस्थिर राज्यकर्त्यांच्या हातात, केवळ सहानुभूतीवर आणि दयेवर लोटून दिल्या जाऊ नये. दलित वर्ग यावर एवढा जोर का देतो याची कारणे उघड आहेत. आमच्या या आग्रही

भूमिकेची कारणमीमांसा अतिशय स्पष्ट आहे. सर्वांनाच माहीत असलेले एक व्यावहारिक सत्य म्हणजे स्वामित्वहीन व्यक्तीपेक्षा स्वामित्व असलेली व्यक्ती केव्हाही प्रबळ असते · तसेच स्वामित्वहीनाच्या फायद्यासाठी कोणी आजचे स्वामित्व सोडून देण्याची उदाहरणे क्वचितच आढळतात. म्हणूनच आमची ही सामाजिक समस्या पुढे फलदायक रीतीने सुटेल अशी आम्ही आशा करूच शकत नाही. आज हा प्रश्न सामोपचाराने न सोडवता जर आम्ही त्यांच्या हातात सहजगत्या सत्ता जाऊ दिली तर ज्या लोकांना राज्यावर व प्रतिष्ठेच्या जागी बसविण्यासाठी आज आम्ही मदत करीत आहोत त्यांनाच गादीवरून खाली खेचण्यासाठी आम्हास आणखी दुसरी एक क्रांती घडवून आणावी लागेल. या यंत्रणेचा अनिर्बंध ताबा ज़्यांना मिळणार आहे त्यांच्या मर्जीवर आम्हाला आमचे प्रश्न सोपवायचे नाहीत. या अती साशंकतेबद्दल कोणी आम्हाला दुषण दिले तरी चालेल, कारण प्रचंड विश्वासाने दिलेल्या हमीतून ध्वस्त होण्यापेक्षा दुषण केव्हाही बरे ! म्हणून आमचा प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने राज्यसत्तेवर आमचाही हक्क असावा हाच एक न्याय्य व योग्य मार्ग आहे असे मला वाटते. शासन यंत्रणेतच अशातऱ्हेची व्यवस्था करून ठेवणे हाच एक यावर उत्तम तोडगा आहे. ही शासनसत्ता केवळ आपल्याच एकट्याच्या हाती अनियंत्रितपणे यावी म्हणून जे लोक निकराचा प्रयत्न करीत आहेत त्यांच्या लहरीवर हा प्रश्न सोपवून देण्याने तो कदापिही सुटणार नाही.

राज्ययंत्रणेमध्ये दलित वर्गाच्या संरक्षणाच्या व सुरक्षिततेच्या दृष्टीने त्यांना कोणती तडजोड हवी आहे ते योग्य वेळी ह्या परिषदेपुढे मी मांडणार आहे. आम्हाला उत्तरदायी सरकार हवे असले तरी ज्यात केवळ आमचे मालक बदलल्या जातील असे सरकार आम्हास नको. शासक वर्ग जबाबदार असावा असे तुम्हास वाटत असेल तर कायदे मंडळ खऱ्या अर्थाने आणि पूर्णतः प्रातिनिधीक असले पाहिजे एवढेच आज या प्रसंगी मी सांगतो.

अध्यक्ष महोदय, अशातऱ्हेच्या स्पष्ट शब्दात मला बोलावे लागले याबद्दल मला दुःख होत आहे. परंतु याशिवाय मला तरी दुसरा पर्याय दिसत नाही. दलितवर्गाला कोणी मित्र उरलेला नाही. आपले अस्तित्व टिकवून ठेवण्यासाठी सध्याच्या सरकारने आतापर्यंत त्यांना केवळ सबबी सांगून त्यांचा दुरूपयोग करून घेतला आहे. तसेच दूर सारण्यासाठीच हिंदुंनीही त्यांना जवळ केले आहे. किंवा अधिक स्पष्ट सांगायचे म्हणजे हिंदू त्यांना अधिकारापासून पूर्णतः वंचित ठेवू इच्छितात. आपल्या विशेषाधिकारांमध्ये वाटेकरी नकोत म्हणून मुसलमान त्यांचे स्वतंत्र अस्तित्वच अमान्य करतात. म्हणजे शासनाने दुर्बल केलेला, हिंदुंनी दाबून टाकलेला आणि मुस्लिमांनी अवमानित केलेला हा वर्ग आहे. इतकी असह्य आणि असहाय परिस्थिती असलेला वर्ग अन्यत्र कुठेही नसेल याबाबत माझी खात्री आहे. आणि म्हणूनच मला आपले लक्ष याकडे वेधून घेणे भाग पडले आहे.

चर्चेला आलेल्या दुसऱ्या प्रश्नासंबंधी बोलायचे म्हणजे मला मोठ्या खेदाने असे म्हणावेसे वाटते की, हा प्रश्न उगीचच परिषदेतील ह्या सर्वसामान्य चर्चेशी जोडला आहे. त्याची चर्चा परिषदेच्या एका स्वतंत्र सत्रात व्हावी इतके त्याचे महत्त्व आहे. केवळ ओझरता उल्लेख केल्याने त्या प्रश्नाला न्याय मिळू शकत नाही. हा प्रश्न दलितांच्या दृष्टीने अत्यंत जिव्हाळयाचा असल्याने तो महत्त्वाचा आहे. अल्पसंख्यांक समाजाचे प्रतिनिधी या नात्याने आमची केंद्र शासनाकडून ही अपेक्षा आहे की त्याने अल्पसंख्यांकांच्या हिताच्या दृष्टीने पाऊले उचलावीत व प्रांतातील बहुसंख्यांकांच्या अव्यवस्थेवर नियंत्रण ठेवावे. एक भारतीय या नात्याने भारतीय राष्ट्रवादाच्या वाढीबद्दल मला निश्चितच आस्था आहे व म्हणूनच केंद्रीय ( Unitary ) शासन पद्धतीवर माझा प्रगाढ विश्वास आहे. या व्यवस्थेला विघटित करण्याचा विचारही मला अस्वस्थ करतो. ह्या एककेंद्रीय शासन पद्धतीत भारतीय राष्ट्र घडविण्याची फार मोठी सुप्त शक्ती आहे. एककेंद्रीय शासन पद्धतीमुळेच भारतात राष्ट्रवृत्ती वाढीस लागली आहे परंतु ती अजून पूर्णावस्थेस पोहोचलेली नाही. म्हणूनच आजच्या राष्ट्रनिर्मितीच्या प्राथमिक अवस्थेमध्ये ही एककेंद्री शासन पद्धती काढून घेणे मला अमान्य आहे. कारण भारत अजून पूर्णशः एकसंध राष्ट्र झालेले नाही.

तथापि, ज्या स्वरूपात प्रश्न समोर मांडलेला आहे त्याकडे पाहता हा केवळ पुस्तकी प्रश्न दिसतो. म्हणून जर प्रांत सरकारे मध्यवर्ती सरकारशी विसंगत राहणार नसतील तर संघ शासन पद्धतीवरही विचार करण्याची मी तयारी दाखवीन.

अध्यक्ष महोदय, दलितांचा प्रतिनिधी म्हणून त्यांच्यावतीने जे काय मला सांगावयाचे होते ते मी आपल्या पुढे मांडलेले आहे. आता एक भारतीय या नात्याने आम्हाला कोणत्या परिस्थितीशी तोंड द्यावे लागते, या दृष्टीने दोन शब्द बोलण्याची कृपया परवानगी द्याल अशी मी अपेक्षा करतो. राष्ट्रीय चळवळीचा मी जरी केवळ मूक प्रेक्षक नसलो तरीही आतापर्यंत त्या प्रश्नांवर जी गंभीर मते मांडण्यात आली त्याला मी आपली अधिक जोड देत नाही. आमची समस्या सोडविण्याच्या दृष्टीने आम्ही योग्य मार्गाने जात आहोत की नाही याबद्दल मी बराच चिंतातूर आहे. या उपायांचे स्वरुप काय असावे हे ठरविणे ब्रिटिश प्रतिनिधींच्या दृष्टिकोनावर अवलंबून आहे. मी त्यांना इतकेच सांगू इच्छितो की या परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठी सलोख्याचा मार्ग निवडायचा की दमन तंत्राचा अवलंब करायचा हा निर्णय त्यांनी घ्यावा कारण निर्णय कोणताही असला तरी अंतिम जबाबदारी त्यांचीच राहणार आहे. तुमच्यापैकी बळाच्या वापरावर ज्यांचा विश्वास असेल त्यांना मी राजकीय तत्त्वज्ञानाच्या एका महान शिक्षकाच्या–एडमंड बर्कच्या–एका चिरस्मरणीय विधानाची आठवण करून देऊ इच्छितो.

अमेरिकेतील वसाहतीच्या समस्येवर विचार करीत असता ते इंग्लिश राष्ट्राला उद्देशून म्हणाले,

" केवळ बळाचा वापर हा तात्पुरताच असतो. काही काळाकरिताच त्यामुळे सत्ता गाजवता येईल. परंतु त्यामुळे पुन्हा त्यांना अधिपत्याखाली ठेवण्यासाठी बळाचा वापर करण्याच्या गरजेला कायमचे दूर करता येणार नाही. ज्या राष्ट्राला कायमचे अधिपत्याखाली ठेवावयाचे आहे त्यावर अशा पद्धतीने शासन करता येत नाही.

माझा दुसरा आक्षेप बळाच्या परिणामकारकतेच्या अनिश्चितेबाबत आहे. बळाच्या वापरातून नेहमीच दहशत निर्माण होईल असे नाही आणि सुसज्ज सैन्य म्हणजे विजय नव्हे. जर तुम्हाला यश मिळाले नाही तर मग कोणताही मार्ग शिल्लक राहत नाही. वाटाघाटी अपयशी ठरल्यावर फक्त बळाचा वापर उरतो. परंतु बळाचा वापरही अपयशी ठरला तर वाटाघाटीच्या आशाच उरत नाहीत. दयेच्या मोबदल्यात कधी-कधी सत्ता व अधिकार मिळविता येतात, परंतु शक्तिपात व पराभूत झालेल्या हिंसेला भीक म्हणून सत्ता व अधिकार कधीही मागता येत नाही. . . .

बळाच्या वापराला माझा पुढचा आक्षेप असा आहे की, प्रयत्नांची पराकाष्ठा करून तुम्ही जे मिळवाल त्याला तुम्ही हानी पोचवाल. तुम्ही जे मिळविता ते त्याच्या मूळ स्वरुपात मिळत नसते, ते अवमूल्यन झालेले, रसातळास गेलेले, उजाड झालेले आणि नाश पावलेल्या स्वरुपात असते."

वरील उपदेशाकडे तुम्ही दुर्लक्ष केले आणि महान अमेरिका खंड तुमच्या हातातून गेला. तुम्ही त्याची दखल घेतली तेव्हाच उर्वरित राज्ये तुमच्या हातात आहेत. आपल्यापैकी जे लोक सलोख्याच्या पक्षाचे आहेत त्यांना मी एक सल्ला देऊ इच्छितो. येथील प्रतिनिधींची अशी समजूत दिसते आहे की स्वसत्ताक राज्याच्या दर्जाबाबत होणारी ही बौद्धिक लढाई निर्णायक ठरुन त्यावरच अंतिम निर्णय अवलंबून राहील. परंतु इतक्या महत्त्वपूर्ण प्रश्नाला केवळ तार्किक सूत्रांमध्ये बांधण्याचा प्रयत्न करण्याइतकी अन्य मोठी चूक नसेल. तर्क-शास्त्राशी माझे काही वैर नाही, परंतु येथील विद्वानांनी आपली पूर्वानुमाने काळजीपूर्वक निवडावीत इतकेच माझे म्हणणे आहे, नाही तर अटळ अशा स्वरुपाची संकटे आल्याशिवाय राहणार नाहीत, असा माझा त्यांना इशारा आहे. ज्याप्रमाणे डॉ. जान्सनने बर्कलेचे सर्व ' विरोधाभास ' पायदळी तुडवून टाकले त्याप्रमाणे तर्कदृष्ट्या हार झाल्यानंतरही तुम्ही हार मान्य करता की पुन्हा तर्कट चालवून ते मत खोडून काढण्याचा प्रयत्न करणार आहात हे सर्वस्वी तुमच्या स्वभावावर अवलंबून आहे. कदाचित एक गोष्ट कोणीच नीट लक्षात घेतलेली

दिसत नाही ; ती म्हणजे, देशाची सध्याची मानसिकता व प्रवृत्ती अशी आहे की बहुसंख्य लोकांना स्वीकार्य नसलेली कोणतीही घटना येथे कामाची ठरणार नाही. तुम्ही निवडावे व आम्ही मान्य करावे ही वेळ आता कायमची गेली आहे. ती कधीही परत येणार नाही. म्हणूनच, घटना रूढ व्हावी अशी तुमची इच्छा असेल तर नवीन घटना ठरविताना तिला तर्काच्या आधारापेक्षा लोकसंमतीच्या कसोटीवर पारखणेच योग्य ठरेल.



मूळ इंग्रजी भाषणाचा अनुवाद अतिथी संपादकांनी केला आहे.

# ३६

# भारताचे संरक्षण विशिष्ट जातीपुरते नव्हे तर सर्व जनतेशी संबंधित असावे

गोलमेज परिषदेत दि. १६ जानेवारी १९३१ ला डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

महोदय,

या अहवालाच्या दुसऱ्या उपविभागातील चौथ्या परिच्छेदात सुचविलेल्या घटना दुरुस्तीच्या मुद्याकडे मी आपले लक्ष वेधून घेऊ इच्छितो. त्यात सुचविल्याप्रमाणे भारतीय सैन्यात दलित वर्गासह सर्व प्रजाजनांना दाखल होण्याची परवानगी असावी. सैन्यदलात भरती करताना केवळ आवश्यक ती पात्रता व कार्यक्षमता याच गोष्टी विचारात घ्याव्यात. ह्या माझ्या दुरुस्तीची केवळ नोंद घेतल्या जावी एवढीच माझी इच्छा नाही तर एक मूलभूत स्वरूपाची घटना दुरूस्ती या दृष्टीने विचार करून या सभेने तिला त्या स्वरूपात प्रत्यक्ष उतरविण्याचा प्रयत्न करावा, अशी माझी इच्छा आहे. मी सुचवीत असलेली दुरूस्ती अत्यंत साध्या स्वरूपाची आहे. सैन्य दलात प्रवेश देताना भारतीय प्रजाजनात जो भेदाभेद सध्या दिसून येतो तो नाहीसा करण्याचा हा प्रयत्न आहे. मूलतः दलित वर्गाच्या विशिष्ट हक्कांचे संरक्षण व्हावे या दृष्टिकोनातूनच मी या दुरूस्तीला चालना देत आहे, यात शंका नाही परंतु असे करताना या वर्गासाठी परिषदेला काही खास प्रकारची शिफारस करण्यास सांगतो आहे असे नव्हे तर भारतीय सरकारच्या कायद्याने स्वीकारलेली तत्त्वे प्रत्यक्ष अमलात आणावित एवढेच मी सांगतो आहे. भारतीय कायद्यात जात, पंथ, धर्म किंवा वर्ण या कारणामुळे कोणाही प्रजाजनाला सार्वजनिक नोकरीपासून वंचित केल्या जाऊ नये अशी तरतूद आहे. म्हणूनच अशी दुरूस्ती सुचवित असताना मी काही खास सवलती मागतो आहे असे मला वाटत नाही.

महोदय, मी आपल्या निदर्शनास आणून देऊ इच्छितो की, सर्व्हिस कमिटीने स्वीकारलेल्या धोरणानुरूपच ही दुरूस्ती आहे. ह्या परिषदेने नियुक्त केलेल्या सर्व्हिस कमिटीच्या अहवालाचा संदर्भ जर आपण लक्षात घेतला तर सर्व भारतीय प्रजेला सार्वजनिक क्षेत्रात नोकरी करण्याची न्याय्य व पुरेशी संधी प्राप्त व्हावी यासाठी त्या समितीने आटोकाट प्रयत्न केलेले आहेत, असेच तुम्हास दिसून येईल. सरकारी नोकरीपासून वंचित करणाऱ्या बंधनापासून संरक्षण देऊन काही मूलभूत हक्कच या समितीने निश्चित केले आहेत असे नव्हे तर याही पुढे जाऊन दलित वर्ग आणि अँग्लो इंडियन ह्या सारख्या विशिष्ट जातींचा उल्लेख करून त्यांच्याबद्दल विशेष प्रकारच्या शिफारसी केल्या आहेत.

महोदय, ही दुरूस्ती केवळ दलित वर्गांच्याच हिताची आहे असे नव्हे तर सर्वच जातींच्या व भारतीय प्रजेच्या कल्याणासाठी ही दुरूस्ती आहे असे मी नम्रतापूर्वक आपल्या निदर्शनास आणून देत आहे. देशातील कोणत्याही नोकऱ्यांवर भारतातील एखाद्या जातीचा एकाधिकार प्रस्थापित करण्यास परवानगी देणे हा प्रजेच्या दृष्टीने मोठा धोका ठरणार आहे असे माझे स्पष्ट मत आहे. हा प्रजेच्या दृष्टीने मोठा धोका आहे असे जे मी म्हणतो त्याचे कारण म्हणजे त्या विशिष्ठ जातींच्या लोकांना वर्चस्व असलेल्या मान्याच्या जागांवर राहाण्याचा संरक्षणात्मक दर्जा दिल्या जातो त्यामुळे त्या जातींमध्ये केवळ श्रेष्ठत्वाची भावनाच निर्माण होते असे नव्हे तर लोकांच्या कल्याणकारी मार्गावर ते संकट ठरुन त्यांना या जातींवरच अवलंबून राहाण्यास भाग पाडल्या जाते. म्हणून मी निवेदन करीत आहे की, ज्याअर्थी, आपण भारतासाठी नवीन घटना निर्माण करीत आहोत तेव्हा भारतीय प्रजाजनापैकी प्रत्येकाला त्याच्या पात्रतेनुरूप देशातील कोणतीही सरकारी नोकरी करण्याची परवानगी मिळेल अशी पद्धती निर्माण करणे आपले कर्तव्य आहे आणि ही जी दुरूस्ती मी पुढे मांडतो ती केवळ समितीच्या अहवालात ग्रथित केलेल्या तत्त्वांचा तर्कशुद्ध परिणाममात्र आहे. कारण चौथ्या विभागाच्या पहिल्या उपविभागाचे आपण निरीक्षण केले तर तुम्हाला हेच दिसून येईल.

" नव राज्ययंत्रणेतील भारतातील भावी सरकार, त्याचप्रमाणे भारताचे संरक्षण मुख्यतः वाढत्या प्रमाणात भारतीय लोकांशीच संबंधीत असावेत, ब्रिटिश सरकारशी नव्हे, असेच या उपसमितीचे मत आहे. "

महोदय, या विधानाला जर काही अर्थ असेल तर भारताचे संरक्षण अधिकाधिक प्रमाणात भारतातील सर्व जनतेशी संबंधित असावे, केवळ एका विशिष्ट जातीपुरताच त्याचा संबंध असून ते मुळीच भागणार नाही.

म्हणूनच मी विचारार्थ पुढे मांडलेली घटना दुरूस्ती या परिषदेने मान्य करावी असे मी सुचवित आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या भाषणावर नंतर झालेल्या चर्चेत मि. थॉमस म्हणतात की उपसमितीने स्पष्टपणे भारतीयकरण ( Indianisation ) असा शब्दप्रयोग केल्यामुळे वेगळया दुरूस्तीची गरज नाही. यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणतात,

माझ्या म्हणण्याचा स्पष्ट अर्थ आहे की भारतीयकरण अशाच स्वरूपाचे असावे की ज्यात सर्व जातींच्या लोकांना नोकऱ्यांमध्ये शिरकाव करण्याची संधी असावी. आजही भारतीयकरणाला काही जातींचा एकाधिकार असाच अर्थ प्राप्त झाला आहे.



---

मूळ इंग्रजी भाषणाचा अनुवाद अतिथी संपादकांनी केला आहे.

## ३७

# तऱ्हेवाईक देशभक्तांच्या वर्गापैकी मी एक नाही

गोलमेज परिषदेत दिनांक १९ जानेवारी १९३१ ला डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

मान्यवर प्रधानमंत्री,

एखाद्या देशाच्या राजकीय जीवनाचे सूसुत्रिकरण करण्याचे प्रयत्न करीत असताना दोन महत्त्वाचे प्रश्न नेहमी उद्‌भवतात. म्हणून गोलमेज परिषदेने ह्या दोन प्रश्नांवर लक्ष केंद्रित केले पाहिजे. पहिला प्रश्न म्हणजे उत्तरदायी (Responsible) शासनाचा आणि दुसरा प्रातिनिधीक सरकारचा.

प्रांतातील जबाबदार सरकारबद्दल मला फारच थोडे सांगावयाचे आहे. माझे मतभेद गृहित धरुन मंडळाने सादर केलेला अहवाल मला मान्य आहे आणि त्या अहवालाच्या बाजूने मी उभा आहे. परंतु मध्यवर्ती जबाबदार शासनाविषयी, मी साशंक असल्याने माझा दृष्टिकोन पूर्णतः वेगळा आहे. संघराज्याच्या उपसमितीने आजच्या नोकरशाही शासन पद्धतीमध्ये बदल व्हावा याबद्दल काहीच ध्यान दिले नाही, असे म्हणणे म्हणजे माझा अप्रामाणिकपणा होईल. परंतु त्याबरोबरच माझी खरी मते तुमच्या पासून लपवून ठेवणे तितकेच अप्रामाणिकपणाचे होईल. समितीने सुचविलेला बदल हा अवास्तविक आहे, भक्कम पायावर आधारित नाही आणि त्यातील जबाबदारी ही विश्वसनीय नसून केवळ बनावट आहे.

लॉर्ड चान्सेलरांनी आम्हाला सांगितले की, त्यांनी आमच्यासाठी बीजारोपण करून दिले, परंतु रोपाची निगा मात्र आम्हीच ठेवली पाहिजे. महोदय, सध्याच्या अतिशय महत्त्वाच्या परिषदेत चान्सेलरांनी फार मोठे कार्य केले आहे. त्याबद्दल खरोखरीच आम्ही त्यांचे आभारी आहोत. मी त्यांचा ऋणी असलो तरी सुद्धा त्यांनी लावलेले रोपटे त्यांच्या भाकीतानुसार वाढीस लागेल अशी मला आशा नाही. मला अशी भीती वाटते की, बी म्हणून त्यांनी जे धान्य निवडले आहे ते निःसत्त्व असून ज्या भूमीत ते लावण्यात आले ती भूमीही त्यांच्या वाढीस अनुकूल नाही.

भावी भारतीय संघराज्याच्या घटनेसंबंधीचे माझे विचार मी लॉर्ड चान्सेलरांना सादर केलेले आहेत. ज्या समितीचे ते अध्यक्ष आहेत त्या समितीने त्यावर विचार केला किंवा काय हे मला माहीत नाही. कारण ज्या समितीचे ते अध्यक्ष आहेत

तिच्या अहवालामध्ये माझ्या विचारांचा कोणताही परामर्श मला आढळून आलेला नाही. तेथे जे विचार मी मांडलेले आहेत तोच दृष्टिकोन अजूनही मी बाळगून आहे आणि माझ्या विचारांशी मोठ्या प्रमाणात दुरावा असलेल्या घटनेला मी संमती देऊ शकत नाही. खरेच ! सध्या अस्त्वात असलेली प्रणाली व समितीने सादर केलेली संकरित स्वरुपाची पद्धती, या दोहोंपैकी कोणतीही एक निवडा असे जर मला कोणी सांगितले तर मी सध्याची प्रणालीच पसंत करीन. परंतु समितीच्या अहवालात असलेली मध्यवर्ती सरकारची घटना सर टी. बी. सप्रू यांना मान्य असेल तर मला विरोध करण्याचे काही एक कारण नाही. कारण ते परिषदेचे मित्र, तत्त्वज्ञ व मार्गदर्शक आहेत. त्याचप्रमाणे भारतातील तरुणांचे प्रतिनिधी म्हणवून घेणारे श्री. जयकर व भारतातील अब्राह्मणांचे नाव घेऊन बोलणारे श्री. ए. पी. पात्रो हे जर त्या घटनेवर खूष असतील तर मीही तिला विरोध करणार नाही. माझी सद्यःस्थिती अशाप्रकारची आहे की, त्या घटनेला मी विरोधही करीत नाही आणि मान्यताही देत नाही. ज्यांना ती प्रत्यक्षात राबवून घ्यावयाची आहे त्यांच्यावरच हा प्रश्न मी सोडून देतो.

ज्यांचा मी प्रतिनिधी आहे त्यांची शासन पद्धतीविषयी मला कोणतीही आज्ञा नसल्यामुळे हे धोरण स्वीकारणे मला योग्य ठरते. परंतु मला दुसऱ्या एका प्रकारची आज्ञा आहे. ती म्हणजे उत्तरदायी शासनपद्धतीला मी विरोध तर करू नयेच पण त्याचवेळी हे उत्तरदायी सरकार खऱ्या अर्थाने प्रातिनिधीक स्वरुपाचे सरकार असल्याशिवाय त्याला मान्यता देण्यात येऊ नये. परिषदेने प्रातिनिधीक सरकारचा प्रश्न आतापर्यंत कसा हाताळला आहे व त्यात तिला किती यशापयश प्राप्त झाले हे जेव्हा मी पाहतो तेव्हा माझी घोर निराशा होते. मतदानाचा हक्क आणि वेगवेगळया वर्गांना कायदे मंडळात मिळालेले प्रतिनिधीत्व हे अस्सल प्रातिनिधीक शासनाचे दोन आधार स्तंभ आहेत. प्रत्येकाला माहितच आहे की, नेहरू समितीने प्रौढ मतदान स्वीकारलेले आहे आणि हा जो घटनेचा भाग ह्या समितीने घडविला त्याला भारतातील सर्व राजकीय पक्षांचा पाठिंबा आहे. जेव्हा मी या परिषदेला हजर झालो तेव्हा मला असे दिसून आले की, जेथपर्यंत मतदानाच्या हक्कांचा प्रश्न होता तेथपर्यंत आधीच आपण लढाई जिंकलेली आहे. परंतु मताधिकार समितीत मात्र माझा पूर्णपणे भ्रमनिरास झाला. माझ्या आश्चर्याला सीमा न राहिलेली गोष्ट म्हणजे ज्यांनी ज्यांनी नेहरूंच्या अहवालावर सह्या केल्या आहेत त्या सर्वांनी एकांगी विचार केलेला आहे. तो इतका एकांगी आहे की, भारतातील उदारमतवादी लोकांचीही संमती त्या अहवालाला मिळविणे कठीण आहे. कारण त्यामुळे प्रांतिक कायदेमंडळासाठी केवळ २५ टक्के लोकांना मताधिकार प्राप्त होणार आहेत. केन्द्रीय कायदेमंडळासाठी किती लोकांना मताधिकार मिळणार आहे हे अजून अनिश्चितच आहे.

परंतु प्रांतीय सरकार ज्या प्रमाणात प्रातिनिधीक होत आहे तिकडे पाहिले म्हणजे मध्यवर्ती कायदेमंडळ त्याच्यापेक्षा अधिक प्रातिनिधीक स्वरूपाचे होईल याबद्दल मला मुळीच आशा उरलेली नाही. अशा मर्यादित मताधिकारामुळे भारतातील भावी शासन सर्व जनतेशी संबंधित न राहाता विशिष्ट वर्गाधिष्ठित निश्चितच झाल्याशिवाय राहाणार नाही.

बहुसंख्यांक असणाऱ्या जाती व अल्पसंख्यांक असणाऱ्या विविध जाती यांच्यामध्ये कायदेमंडळातील जागांच्या विभागणीसंबंधीही मोठी खीळ निर्माण झालेली आहे, हे आपणा सर्वांस माहीतच आहे. माझ्या मताप्रमाणे मागे जाणीवपूर्वक अपायकारक घेतलेल्या निर्णयामुळेच सध्याची खीळ निर्माण झाली आहे. भारतातील पूर्वाधिकारी जर सर्वांना न्याय आणि कोणावरही मर्जी नाही या न्याय्य तत्त्वानुसार वागले असते तर ही समस्या सोडविणे इतके कठीण होऊन बसले नसते, अशी माझी खात्री आहे. ज्यांचा जसा राजकीय उपयोग करता येईल त्यानुसार ब्रिटिश सरकारने योग्यतेचे वेगवेगळे मोल ठरवून बऱ्याच जातींना राजकीय असाधारण अधिकाराचा हिस्सा प्रदान केला तर दलित वर्गाला त्यांच्या न्याय्य हक्कानुसार प्राप्त होणाऱ्या अधिकारांचे मापही त्यांना नाकारले. या प्रकरणात सर्वात मोठा अन्याय दलित वर्गावर झाला. एकदा चुकीने प्रस्थापित झालेली पद्धती कायमची प्रस्थापित करायची नाही या तत्त्वाप्रमाणे परिषदेने जुन्या मोलाचे पुनर्मुल्यांकन करून दलित वर्गाला त्याच्या हक्कानुसार कायदेमंडळात योग्य तितक्या जागा दिल्या जातील अशी आशा मी करीत होतो परंतु असे घडून आलेले नाही. इतर अल्पसंख्य लोकांच्या मागण्यांचा आधीच स्वीकार करण्यात आलेला असून त्यांचे निश्चित स्वरूप निर्धारित केले आहे. त्याकरिता केवळ त्यांना नवीन शासनाच्या वाढत्या व्यापाशी व व्यवस्थेशी अनुरूप करून घेण्यासाठी काही आवश्यक बदल आणि दुरुस्त्या करणे एवढीच गरज ठेवली आहे. ज्या काही दुरुस्ती किंवा बदल करावयाचे आहेत त्या बाबतीत जो आधीच पाया घातला गेलेला आहे त्यात पायासकट किंचितही बदल करण्याचे धाडस कोणीच करणार नाही. दलित वर्गाची समस्या पूर्णतः वेगळी आहे. त्यांच्या मागण्या आता कोठे ऐकायला आल्या आहेत. ह्या मागण्यांना अजूनपावेतो न्याय देण्यात आलेला नाही आणि त्यापैकी कितीचा स्वीकार केला जाईल याचा तर मला अजून अंदाजही नाही. स्वसंरक्षणासाठी नव्हे तर शासनसत्ता आपल्या हातात यावी म्हणून जे लोक व्यूह रचित आहेत व सारखी चढाओढ करीत आहेत, त्यांना खूष करण्यासाठी दलित वर्गाच्या असहायतेचा फायदा घेऊन त्यांच्या प्रतिनिधीत्वाचा कायमचा बळी कदाचित दिल्या जाईल, असेही मला वाटते, हे असंभवनीय नाही.

या दृष्टिकोनातून माझी विचारसरणी पूर्णतः स्पष्टपणे मांडण्याची जबाबदारी माझ्यावर येते. भावी राज्यघटनेत दलितांना देण्यात येणारे हक्क ज्याअर्थी अजून निश्चितपणे स्पष्ट केले नाही त्याअर्थी, प्रांत शासन त्याचप्रमाणे मध्यवर्ती शासन यांच्याकरिता जबाबदार शासनाची घटना ठरवित असताना ब्रिटिश सरकारने ती जाहीर करण्यापूर्वी ज्या लोकांच्या हातात सत्ता जात आहे त्यांना अटी घालून असा करार स्पष्ट करुन घेणे आवश्यक आहे की, जेणेकरुन दलित वर्गाच्या हितांचे आणि हक्कांचे वास्तविकरित्या संरक्षण होईल. वस्तुस्थितीचे गांभीर्य लक्षात घेता मला अधिक जोंर देऊन तुमच्या नजरेस आणून देणे क्रमप्राप्त आहे की, ही बाब पूर्णपणे स्पष्ट करुन त्याची सोडवणूक केल्याशिवाय आणि त्यावर निर्णय दिल्याशिवाय कोणताही जाहीरनामा आम्ही मान्य करणार नाही. हे अमान्य झाल्यास मी आणि माझे सहकारी या परिषदेच्या पुढील कार्यवाहीत सहभागी होण्याची जबाबदारी स्वीकारण्यास असमर्थ ठरू आणि आम्ही परिषदेशी असहकार करण्यास एकाप्रकारे भाग पडू. अध्यक्ष महोदय, असे सूचवित असताना तुम्ही आधीच दिलेल्या वचनापेक्षा मी अधिक काही मागतो आहे असे नाही. ब्रिटिश लोकसभा आणि जे लोक तिच्या बाजूने बोलतात ते नेहमीच म्हणत आलेले आहेत की, ते दलित वर्गाचे विश्वस्त आहेत. आणि मानवी संबंध शक्य तितके आनंददायक राहावेत म्हणून आपण नेहमी उच्चारीत असतो, अशाप्रकारच्या संस्कृतिमान्य शिष्टाचाराच्या थापापैकी ही काही एक थाप नव्हे अशी माझी खात्री आहे. म्हणून माझ्या दृष्टीने कोणत्याही सरकारचे हे आद्य कर्तव्य आहे की ह्या विश्वासाचा कोणत्याही प्रकारे घात होऊ नये हे सुनिश्चित करणे आवश्यक आहे. माननीय प्रधानमंत्री, मी आपणास असे सांगू इच्छितो की, ज्यांचा उत्कर्ष आणि ज्यांचे श्रेष्ठत्व केवळ आमच्या पूर्ण विध्वंसावर आणि अवनतीवरच आधारलेले आहे, ज्यांनी आमच्या कल्याणाची स्वप्नातही आस्था बाळगली नाही, त्यांच्या दयेच्या भिकेवरच आम्हाला जर ब्रिटिश सरकार सोपविणार असेल तर ब्रिटिश सरकारने आमच्याशी भयंकर विश्वासघात केला, असेच आम्ही समजू.

असे बोलल्यामुळे भारतातील राष्ट्रवादी आणि देशभक्त मला जातीयवादी ठरवतील. मी त्याला घाबरत नाही. भारत हा एक तऱ्हेवाईक देश आहे आणि तेथील राष्ट्रभक्त व देशभक्तही तऱ्हेवाईक लोक आहेत. भारतीय राष्ट्रभक्त व देशभक्त असा आहे की जो आपल्या देशबांधवांना माणसापेक्षाही नीच वागणूक मिळत असताना देखील उघड्या डोळ्यांनी पाहतो तो. परंतु त्याची मानवता त्याविरूद्ध कधीच निषेध व्यक्त करीत नाही. पुरुष आणि स्त्रियांना काहीही कारण नसताना मानवी अधिकार नाकारण्यात आलेले आहेत हे या देशभक्ताला माहीत असते, परंतु कृतिशील मदत करण्याच्या दृष्टीने त्याची नागरी संवेदना जागृत होत नाही. लोकांचा एक मोठा वर्ग सार्वजनिक उद्योगधंद्यात येऊ दिला

गेला नाही अशी या राष्ट्रभक्ताला खात्रीने माहिती असते. पण त्याच्या न्याय-रक्षणार्थ आणि त्याला न्याय्यसंधी देण्याकरिता त्याला त्याच्या कर्तव्याची जाणीव होत नाही. मानवाला आणि समाजाला हानिकारक अशा शेकडो दुष्ट रूढिंची त्याला जाणीव असते, परंतु त्याला या उद्वेग आणणाऱ्या गोष्टींचा वीट आलेला नसतो. या देशभक्ताची, त्याला व त्याच्या वर्गाकरिता अधिकार आणि अधिक अधिकार ही एकच आरोळी असते. मला आनंद होत आहे की मी अशा देशभक्तांच्या वर्गापैकी नाही. मी अशा वर्गातील आहे की जो स्वतः लोकशाहीचा पाठीराखा आहे आणि जो कोणत्याही आकारात आणि पद्धतीत असलेल्या एकाधिकारशाहीचा विध्वंसक आहे. आमचे ध्येय ' एक व्यक्ती एक मूल्य ' या आमच्या साध्याला जीवनाच्या सर्व क्षेत्रात–राजकीय, आर्थिक आणि सामाजिक–कृतिशीलरित्या आचरणात आणावयाचे आहे. या अत्युच्च मूल्यांशी दलित वर्गाची बांधिलकी आहे आणि म्हणून प्रातिनिधीक सरकार हे ध्येय साध्य करण्याचे एक माध्यम आहे. या मूल्यांच्याबद्दल आम्हाला असलेल्या आदरबुद्धिच्या दृष्टिकोनातून आपण त्यांना प्रत्यक्षात आकार देण्यास आवश्यक असा जाहीरनामा घोषित करावा असा मी आपणास आग्रह करीत आहे. दलित वर्गासंबंधी आपली पूर्ण सहानुभूती असल्याचे आपण कदाचित आश्वासन द्याल. माझे याला असे उत्तर आहे की, दुःखी लोकांना जर कशाची गरज असेल तर याहीपेक्षा काहीसे अधिक निश्चित स्वरुपाचे आणि अधिक तरतूद असलेले हवे आहे. मी अनाठायी भीती व्यक्त करतो आहे असा समज करुन घेऊन आपण माझ्यावर रोष व्यक्त कराल. परंतु सुरक्षिततेची खात्री असल्याची निश्चितता बाळगून आपला सर्वनाश ओढवून घेण्यापेक्षा त्या भीतीबाबत चिंतातूर राहिल्याने कोणी दुस्वास केला तरी ते अधिक चांगले हेच माझे त्याला उत्तर आहे.



मूळ इंग्रजी भाषणाचा अनुवाद अतिथी संपादकांनी केला आहे.

## ३८

# स्वराज्यात अस्पृश्य जनतेला समान हक्काने राहता आले पाहिजे

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे जाहीर स्वागत व सन्मान करण्याचे मुंबई इलाख्यातील अस्पृश्य समाजातील लोकांनी ठरविले आणि तो स्वागताचा समारंभ रविवार, तारीख १ मार्च, १९३१ रोजी मुक्रर करण्यात आला. या जाहीर स्वागताच्या सभेला प्रवेश फी दाखल दोन आण्याचे तिकीट ठेवून या तिकीट विक्रीचे सर्व उत्पन्न नाशिक मंदीर प्रवेश सत्याग्रह फंडाला देण्याचे ठरविले होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आपल्या हितसंबंधाची केलेली अपूर्व कामगिरी ऐकण्यासाठी या जाहीर सभेला जवळ जवळ दहा हजार अस्पृश्य जनसमूह हजर होता. परळ दामोदर हॉलमागील भव्य पटांगण माणसांनी फुलून गेले होते. या जाहीर सभेचे अध्यक्षस्थान डॉ. पी. जी. सोळंकी यांनी स्वीकारले होते. सभेकरिता मुंबई इलाख्यातील निरनिराळया शहरातून, तालुक्यातून अस्पृश्यांचे प्रतिनिधी हजर होते. सायंकाळी सात वाजता सभेला सुरवात समाज समता संघाचे उपाध्यक्ष श्री. देवराव नाईक यांनी आपल्या स्वागतपर भाषणाने केली. त्यांनी डॉक्टरसाहेबांच्या विलायतेमधील कामगिरीविषयी उल्लेख करून सांगितले की, डॉक्टरसाहेब हे आपल्या कामगिरीने नुसते अस्पृश्य जनतेचेच पुढारी ठरत नसून त्यांना सामान्य जनतेचा व मुसलमान समाजाचाही भरपूर पाठिंबा आहे आणि भावी काळात ते बहुजन समाजाचे जिव्हाळयाचे पुरस्कर्ते पुढारी ठरल्याशिवाय राहणार नाहीत. सामाजिक, धार्मिक, आर्थिक व राजकीयदृष्ट्या त्यांच्याकडून उत्क्रांतीकारक सेवा घडल्याशिवाय राहणार नाही, अशी माझी प्रामाणिक समजूत आहे. आणि तुम्हा सर्वांतर्फे जनतेच्या या खऱ्या पुढाऱ्यांचे स्वागत करण्यात मला मोठी धन्यता वाटत आहे.

सभेचे अध्यक्ष डॉ. सोळंकी यांनी थोडक्यात स्वागताचे भाषण करून डॉ. आंबेडकर यांच्या भाषणास उत्सुक झालेल्या जनतेच्या आतुरतेकडे लक्ष देऊन डॉक्टर साहेबांना आपले भाषण करण्यास विनंती केल्यानंतर डॉ. आंबेडकर भाषणास उभे राहिले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

आज जवळ जवळ पाच महिन्यांच्या अवधीनंतर आपणा सर्वांची भेट होण्याची संधी प्राप्त झाली, त्याबद्दल मला अत्यानंद होत आहे. आपण सर्वजण माझ्यावर विश्वास ठेवून सहकार्य करता, याबद्दल मला धन्यता वाटते पण तितकीच जोखीम

---

जनता : ९ मार्च १९३१.

व जबाबदारी वाटते. माणसाच्या मागे असलेल्या प्रपंचातून मार्ग काढणे निराळे आणि माझ्यावर तुम्हा सर्वांच्या हितसंबंधाच्या प्रश्नांच्या परिस्थितीतून मार्ग काढणे अगदी कठीण असे काम आहे. या परिस्थितीतून बाहेर पडण्यासाठी लागणारा मार्ग मलाच शोधून काढणे भाग आहे. येथून परिषदेला गेलेल्या मुसलमान, शिख, मवाळ वगैरे प्रतिनिधींना त्यांच्या पक्षातील लोकांनी अमुक तऱ्हेची कामगिरी बजावण्यासाठी निरोपादाखल सांगितले होते. परंतु तुम्ही मला निरोप देताना परिषदेपुढे कोणती कामगिरी बजावावयाची याची सर्वस्वी जोखमीची जबाबदारी मजवरच लादून टाकिली. आपल्या उन्नतीचा मार्ग शोधून काढण्याचे माझ्यावरच सोपविलेत, हा परिषदेला गेलेल्या इतर प्रतिनिधी व माझ्यामध्ये मोठा फरक होता आणि मी परिषदेच्या वाटाघाटीत शोधून काढणारा मार्ग तुम्हाला व मला सारखाच आवडेल याबद्दल मला शंका वाटत होती ; परंतु महत्प्रयासाने व प्रयत्नाने शोधून काढलेला मार्ग व तिची योजना आपणास अमान्य नसल्यामुळे त्यांचे थोडक्यात विवरण करतो. मी, रा. ब. श्रीनिवासन यांच्या सहकार्याने, जी योजना परिषदेपुढे सादर केली त्यात एकंदर आठ अटींचे मागणे मागितले आहे. ते असे, समान हक्काचे नागरिकत्व. हिंदुस्थानला स्वराज्य मिळावे की नाही ? स्वराज्य मिळाल्यास कशा प्रकारचे असावे ? स्वराज्य कोणत्याही प्रकारचे असो, त्या स्वराज्यात अस्पृश्य जनतेला समान हक्काने राहता आले पाहिजे. आम्हाला जर त्या स्वराज्यात थारा नसेल तर ते स्वराज्य शंभर नंबरी असले तरी आम्हाला नको. तसेच हिंदुस्थानात स्वराज्य स्थापन होणार असेल व त्यात जी एखादी निश्चित गोष्ट होणार असेल ती राजकीय सत्ता वरिष्ठ समाजात जाणार आहे आणि ही गोष्ट अगदी निर्विवाद आहे म्हणून स्पृश्य लोकांच्या हाती राजकीय सत्ता जाण्यापूर्वी आपली अस्पृश्यता कायद्याने दूर केली तरच आम्ही ते तत्त्व मान्य करू.

कायद्याने अस्पृश्यता नष्ट करणारे कलम आणले गेले तरी सर्व दर्जाचे लोक समान हक्काने राहतील असे ठरविणेच भाग होते. अस्पृश्यांना कोणी पायाखाली तुडविण्याचा प्रयत्न केल्यास त्याला राजकीय गुन्हेगार ठरवावा. या बाबतीत मात्र फक्त मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅकडोनाल्ड यांचे आश्वासन मिळाले आहे. पुढे होणाऱ्या कमिटीच्या चर्चेत याबद्दल अजून निर्णय होणार आहे.

काहीही झाले आणि आपल्याला कितीही राजकीय हक्क मिळाले तरी पुढील योजनेत आपल्या बाबतीत कायद्याने अगर कार्यकारी मंडळाच्या हुकूमाने भेदभाव दाखविला जाईल, अशी अस्पृश्य वर्गाला भीती वाटते. म्हणून असल्याप्रकारचा द्वेषजनक कसलाही भेदभाव कायदे मंडळांना व कार्यकारी मंडळांना करता येणे अशक्य करून सोडल्याशिवाय बहुसंख्यांक लोकांच्या अंमलाखाली राहाण्याचे कबूल करणे अस्पृश्य समाजाला शक्य नाही. पुढील कायदेमंडळात आपण अल्पसंख्यांकच राहणार आहोत. शंभरामध्ये १०-१५ प्रतिनिधी हे अगदी थोडे

प्रमाणात आहे. यासाठी कायदे मंडळांना जाती जातींमध्ये कोणत्याही प्रकारची प्रतारणा करून कायदे करण्याची संधी नसावी. फक्त माणुसकीचे हक्क प्राप्त होतील असेच धोरण स्वीकारले जावे आणि ही मागणी परिषदेने कबूल केली आहे.

मतदानासंबंधी आजची परिस्थिती समाधानकारक नाही. याबाबतीत फक्त श्रीमंतांना व मध्यम वर्गांना आपला मतदानाचा हक्क प्रस्थापित करता येतो. गरीब, श्रमजिवी लोकांना आपला लायक प्रतिनिधी निवडून देता येत नाही. देशात गरिबांची संख्या शेकडा ९० आहे. त्यांना आपल्या हितसंबंधाच्या प्रश्नांबाबत सरकारच्या तोंडाकडे पाहावे लागते व त्यामुळे परावलंबी राहावे लागते ; आणि म्हणून भावी स्वराज्यात ही अपमानास्पद परिस्थिती नष्ट व्हावी म्हणून सार्वत्रिक मतदान पद्धतीच्या योजनेची मी मागणी केली. या प्रश्नावर बरीच हमरी तुमरी झाली. आम्ही चौघा प्रतिनिधींनीच ह्या प्रश्नावर जोर दिला पण त्यात विशेष उपयोग झाला नाही. अस्पृश्यांना स्वतंत्र की संयुक्त मतदान पद्धती पाहिजे, हा प्रश्न विचारता मी एकतर सार्वत्रिक मतदान पद्धतीने व पहिली दहा वर्षे स्वतंत्र मतदान पद्धतीने व नंतर संयुक्त मतदान पद्धतीने आणि राखीव जागांच्या व्यवस्थेनुसार व्यवस्था असावी असे सुचविले. याबाबतीत काही दिवस स्वतंत्र मतदान पद्धत मान्य केली आहे.

सरकारी नोकरीत प्रवेशाच्या बाबतीत कोणाची निवड करावयाची हे सरकारी अधिकाऱ्याने ठरवावयाचे नसून ते कमिशनच्या निवडणुकीवर अवलंबून राहील. पण त्यापेक्षा फायद्याची गोष्ट म्हटली म्हणजे सरकारी नोकरीत अमुक प्रमाणात अल्पसंख्यांक व अस्पृश्य समाजासाठी जागा राखून ठेविण्यात येतील. याबाबतीतले सर्व जबाबदारीचे हक्क फक्त गव्हर्नरच्याच हाती राहतील.

अल्पसंख्यांकांची जर बहुसंख्यांकांनी कायदे कौन्सिलात हेळसांड केली, बजेटात आमच्या मागण्यांचा काहीच विचार केला नाही तर आम्ही काय करावे ? याबाबतीत अपील करण्याचा अधिकार देण्यात आला आहे. आपल्या न्याय्य मागण्यांचा अनादर झाल्यास गव्हर्नरकडे अपील करणे आणि गव्हर्नरनेही ऐकले नाही तर व्हाईसरॉयकडे अपील करण्याचा हक्क दिलेला आहे. याशिवाय अस्पृश्यतेचा प्रश्न अखिल भारतीय स्वरूपाचा आहे. त्यांच्याकरिता एकसूत्रीपणा पाहिजे होता आणि यासाठी मध्यवर्ती कायदेमंडळात अस्पृश्यांतर्फे एक दिवाण नेमून सर्व प्रकारची गाऱ्हाणी त्यांच्याकडून ऐकली जावीत. परंतु याबाबतीत समाधानकारक निकाल लागलेला नाही. पोलीस व लष्करी खात्यात आपल्या लोकांना सर्व दर्जाच्या नोकऱ्या मिळण्याची मोकळीक ठेविलेली आहे. यापुढे या दोन्ही खात्यात नोकरीसाठी प्रवेश मिळविताना जात, धर्म वगैरे बाबतीत आडकाठी घेण्यात येणार नाही. याबाबतीत सर्व प्रतिनिधींचा पाठिंबा मिळाला आहे.

शेवटी वरील सर्व गोष्टींचा विचार करता हिंदुस्थानला मिळणाऱ्या भावी स्वराज्यात अल्पसंख्याकांच्या अटी निश्चित झाल्याशिवाय कसल्याही प्रकारची नवी राज्यघटना फोल ठरणार आहे ; आणि यासाठी आपणास बहुजन समाजाचे समतेचे असे स्वराज्य प्राप्त व्हावे अशी इच्छा असेल तर वयात आलेल्या दरएक माणसाला मतदानाचा हक्क मिळण्याची खटपट करणे, हे होय ! हा सार्वत्रिक मतदानाचा प्रश्न फारच महत्त्वाचा आहे ; आणि यासाठी माझी अशी प्रामाणिक समजूत आहे की, गरिबांचे जीवित सुरक्षित नाही ते स्वराज्य धोक्याचे होय.

यानंतर चालू महिन्यात नाशिक काळाराम मंदिर प्रवेशाच्या सत्त्याग्रहाला तनमनधने सहाय्य करण्याची कळकळीची विनंती करतो. आपल्या पाठीमागे येथील एकंदर परिस्थिती चिंताजनक असताही माझ्या सहकारी मित्रमंडळींनी, अखिल भारतीय बहिष्कृत समाज सेवा संघ व डॉ. आंबेडकर सेवा दलाने जी जबाबदारीची कामगिरी बजाविली त्याबद्दल आभार प्रदर्शित केल्याशिवाय राहवत नाही.

डॉक्टर आंबेडकर यांच्या भाषणानंतर अध्यक्ष डॉ. सोळंकी यांचे भाषण झाले. त्यांनी डॉक्टर साहेबांनी विलायतेमध्ये भरलेल्या परिषदेमध्ये अस्पृश्यांच्या वतीने किती जबाबदारीची कामगिरी केली याचे विवेचन केले. राऊंड टेबल परिषदेला गेलेल्या इतर प्रतिनिधींच्या गाठीभेटी घेतल्या ; त्यात त्यांनी डॉक्टरांच्या कामगिरीबद्दल व्यक्त केलेले धन्यतेचे व समाधानाचे उद्‌गार जाहीर केले. मध्यंतरी गुरुवर्य श्री. कृष्णराव केळुस्कर यांचे छोटेसे भाषण झाले. त्यांनी आपल्या भाषणात आपले उज्वल स्वप्न पूर्ण झाल्याचे सांगितले. डॉ. आंबेडकर हे आपले तेज युरोपात प्रकाशित करून तेथील मुत्सद्यांना चकित करूनच आले. त्यांनी केलेली कामगिरी फक्त अस्पृश्यवर्गातर्फेची नसून अखिल हिंदुस्थानतर्फेची आहे. ईश्वर त्यांना दीर्घायुषी करो.

शेवटी श्री. शिवतरकर यांनी अध्यक्ष, सभेस हजर असलेले पाहुणे, अस्पृश्य बंधुभगिनी व निरनिराळया सेवादलाचे जाहीररित्या आभार मानले आणि नाशिक मंदिर प्रवेश फंडाला मुसलमान बंधुंतर्फे मि. मनियार यांनी एकशेएक रुपयांची देणगी दिल्याचे जाहीर केले. नंतर डॉ. आंबेडकर सेवादलाचे सर्वाधिकारी श्री. शंकर वडवळकर यांचे स्फूर्तिदायक असे भाषण झाल्यावर डॉ. आंबेडकर यांना निरनिराळया संस्थांकडून हारतुरे अर्पण केल्यानंतर जाहीर सन्मानाचा हा समारंभ समाप्त करण्यात आला.



## ३९

# सन्मानाच्या व नेटाच्या लढ्यातच आपल्या चळवळीचे यश

मु. नारायणगाव, ता. जुन्नर येथे ता. २३ व २४ मे १९३१ रोजी पुणे जिल्हा बहिष्कृत परिषदेचे पहिले अधिवेशन डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. परिषदेस पुणे जिल्ह्यातील निरनिराळ्या ठिकाणाहून सुमारे पाच सहा हजार लोकसमुदाय जमला होता. मुंबईहून श्री. सी. ना. शिवतरकर, श्री. लोटेकर, शंकरराव श्रावण भोसले, श्री. आडरेकर व गणपतबुवा इत्यादी अस्पृश्य वर्गाचे पुढारी तसेच मुनशीशेठ, देविदास, श्री. रामचंद्र अनाजी, पा. बुट्टे, ऑनररी मॅजिस्ट्रेट व प्रेसिडेंट, ता. लो. बोर्ड, जुन्नर, श्री. दशरथ पांडुजी बनकर, मे. डि. लो. बोर्ड, पुणे, श्री. गजानन रावजी पा. भुजबळ, व्हा. प्रेसिडेंट ता. लो. बोर्ड, जुन्नर, श्री. भिमाजी गेनूजी, पा. खेबडे, श्री. डुंबरे, पाटे, खैरे, तांबे, शिंदे मिस्त्री, भुजबळ इत्यादि स्थानिक व पुण्याहून सुभेदार घाडगे, थोरात, गायकवाड, चौरे, चंदनशिवे, घोगरे, मधाळे, रणपिसे वगैरे मंडळी प्रामुख्याने हजर होती. याशिवाय मांग व चांभार समाजातील प्रमुख मंडळींनी भाग घेतला होता.

प्रथम स्वागताध्यक्ष श्री. देवजी दगडूजी डोळस यांनी आपल्या भाषणात परिषदेस आलेल्या सर्व मंडळींचे आभार मानले. परिषद भरलेल्या गावाचे ऐतिहासिक महत्त्व सांगून बहिष्कृत समाजाची संघटना बळकट होण्यास जातीभेद प्रथम नाहीसा करण्याचा प्रयत्न व आपली आर्थिक स्थिती बदलण्याचा प्रयत्न या दोन गोष्टीवरच विशेष विवेचन करून आपले भाषण थोडक्यात संपविले. स्वागताध्यक्षांच्या भाषणानंतर परिषदेचे जनरल सेक्रेटरी श्री. शां. अ. उपशाम यांनी परिषदेस आलेले शुभचिंतनपर संदेश वाचून दाखविले. रा. मा. शा. गायकवाड व रा. कों. रा. मास्तर यांनी सूचना अनुमोदन दिल्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारले. अध्यक्षस्थान स्वीकारताच डॉ. आंबेडकरसाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

आपण मला आजच्या परिषदेचे अध्यक्षस्थान दिले, परंतु त्याचा स्वीकार करताना मला संकोच वाटतो. आज या सभेमध्ये आपले परमपूज्य पुढारी रा. कोंडाजी रामजी मास्तर हे हजर आहेत, त्यांच्याबरोबर काम करणारी इतर माणसेही दिसत आहेत. त्याशिवाय जी हजर नाहीत परंतु ज्यांनी माझे अगोदर पुष्कळ वर्षेपावेतो अस्पृश्य वर्गात नेटाने चळवळ केली होती अशी माणसे या जिल्ह्यात आहेत. मला आठवते की, मी मराठी चवथी इयत्तेत होतो

---

जनता : ८ जून १९३१.

तेव्हा पुण्यात श्री. शिवराम जानबा कांबळे, थोरात, रामचंद्रराव कदम इत्यादी माणसे अस्पृश्यांसंबंधी कार्य करीत आहेत, असे माझे वडील सांगत. त्यापैकी श्री. थोरात आज प्रत्यक्ष येथे हजर आहेत. श्री. कांबळे व कदम आजच्या सभेस येऊ शकले नाहीत. अशी जुनी व वयोवृद्ध पुढारी मंडळी असता आजचा अध्यक्षपदाचा मान केवळ तुमच्या अत्याग्रहास्तव मला पत्करावा लागत आहे, असो. आता आपणाला सध्याच्या परिस्थितीत काय करावयाचे आहे याचा विचार अगोदर केला पाहिजे. आपण जरी अस्पृश्य मानले गेलो आहोत तरी आपण माणसे आहोत. इतर समाजाप्रमाणे आपणाला समानतेच्या दर्जाने राहता आले पाहिजे. आपण खऱ्या मानसन्मानाला पात्र असता इतर समाजाने आपल्या अज्ञानाचा फायदा घेऊन आम्हाला उलट बहिष्कृत ठरविलेले आहे. हा देश काबीज करून घेण्याकरिता ज्या वीरांचे सहाय्य लागले ते बहुतेक सारे लढवय्ये वीर आपल्या समाजातले होते. महार सैनिकांच्या बळावर इंग्रजांना आपला येथला अंमल स्थिरावता आला आणि त्याबद्दलचे विजयाचे चिन्ह म्हणून इंग्रजांनी कोरेगावी विजयस्तंभ उभारून आपल्या समाजातील वीर पुरूषांची स्मृती कायम केलेली आहे. त्यावेळचा आपला दर्जा मात्र आज दृष्टोत्पत्तीस पडू शकत नाही. महारांच्या पराक्रमावर इंग्रजांना राज्य मिळाले खरे, परंतु देशातील इतर उच्चवर्णीय लोकांना खूष करण्याकरिता व महारादी अस्पृश्य समजलेल्या लोकांचा दुसरा कोणीच वाली नसल्यामुळे, इंग्रज सरकारने लष्करातील वरिष्ठ दर्जाच्या व इतर जागा महारांना देण्याची बंदी केली. आज अशी परिस्थिती आहे की, लष्करातील महार अधिकाऱ्यांच्या हाताखाली नोकरी करणे हलक्या वृत्तीचे समजणारे लोक मुसलमान अधिकाऱ्यांच्या हाताखाली काम करण्यास कोणतीच दिक्कत बाळगीत नाहीत. तीच गोष्ट पोलीस खात्यासंबंधी आहे. परंतु आपल्या गेल्या पाच सहा वर्षाच्या स्वावलंबीवृत्तीच्या चळवळीमुळे परिस्थितीत थोडाथोडा बदल होत चालला आहे. पोलीस खात्यात आपल्या समाजबंधुंना बऱ्याच सवलती मिळाल्याचे परवाच्या सरकारी पत्रावरून कळून येईल. आपण सर्वांनी यापुढे इतकेच लक्षात ठेवा की, आपणास इतर समाजामध्ये मोठा हुद्दा प्राप्त करून घ्यावयाचा नसून फक्त माणुसकी प्राप्त करून घ्यावयाची आहे. आपल्या आर्थिक परिस्थितीचा विचार करता हिंदुस्थानातील इतर दरिद्री म्हणविणाऱ्या लोकांपेक्षा आपण अधिक दरिद्री आहोत. दारिद्र्य आपणास का प्राप्त झाले याचा विचार केल्यास ही अस्पृश्यतेची रूढीच आपल्या दुःखाला कारणीभूत आहे, हे दिसून येईल. यासाठी ज्या उपायांनी आपणास आपला माणुसकीचा हक्क प्राप्त करून घेता येईल तो प्रत्येक मार्ग आपण संघटनेच्या बळावर आणि निर्भयपणे आक्रमण करा. नाशिक, पुणे वगैरे ठिकाणची सत्याग्रहाची शस्त्रे पाजळून आपला लढा यशस्वी करण्याची हिंमत बाळगा आणि असल्या सन्मानाच्या व नेटाच्या लढ्याने सर्वजण लढू लागलात तरच आपल्या चळवळीला यश प्राप्त व्हावयास फारसा कालावधी लागणार नाही.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या स्फूर्तिदायक भाषणानंतर परिषदेत स्थानिक, शैक्षणिक, आर्थिक व राजकीय स्वरूपाचे ठराव पास करण्यात आले. विशेषतः लंडन येथे भरलेल्या पहिल्या राऊंड टेबल परिषदेमध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर व रा. ब. श्रीनिवासन यांनी अस्पृश्य वर्गातर्फे बजाविलेल्या अपूर्व कामगिरीबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यात आले. निरनिराळ्या ठरावावर श्री. शिवतरकर, हरिभाऊ रोकडे, गायकवाड, कांबळे, दारूळे, ओझरकर, फुलपगार, कोळोखे, विठ्ठल उपशाम, घोगरे, मधाळे, रणपिसे, थोरात, शिशुपाळ, आमोंडीकर, धोत्रे, ठोसर, चौरे, चंदनशिवे, गायकवाड, आडरेकर वगैरे मंडळींची भाषणे झाली.



# ४०

# अस्पृश्यात भांडणे लावणाऱ्या हितशत्रूंचा डाव ओळखा

शुक्रवार ता. २९ मे १९३१ रोजी डिलाईल रोड, मुंबई येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली अस्पृश्य वर्गाची एक जाहीर सभा भरली होती. सभेत कमीतकमी ५ ते ६ हजारपर्यंत लोक जमले होते. चारशे पाचशे स्त्रीसमुदायही होता. निरनिराळया स्वयंसेवक पथकांकडून सभेच्या ठिकाणी योग्यप्रकारचा बंदोबस्त व शिस्त ठेवण्यात आली होती. याप्रसंगी डॉ. आंबेडकरांनी सरासरी एक तासपर्यंत भाषण केले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

आजच्या या सभेचा ठराविक असा काही कार्यक्रम अगर सभा भरविण्याला विशिष्ट काही कारण नसल्यामुळे येथे येण्याचे मी टाळणार होतो ; पण सभेच्या उत्साही चालकांनी अगदी पिच्छाच पुरविल्यामुळे येणे भाग पडले. आज विशेष काही कारण नसल्यामुळे इतका लोकसमुदाय सभेला जमेल अशी माझी अपेक्षा नव्हती. मी आलो नसतो तर या पाच सहा हजार लोकांचा खरोखरच फार हिरमोड झाला असता. आपल्या लोकमताचा पारा किती जागृत व जिवंत आहे हे ओळखण्यास अशा सभा एकप्रकारे फार उपयोगी पडतात. सभेचा विषयही निश्चित नसल्यामुळे आज काय बोलावे या विचारातच मी होतो पण पुढाऱ्यांच्या एकी संबंधाचा जो ठराव या सभेने पुढे आणला आहे व त्यावर आतापर्यंत निरनिराळया वक्त्यांची जी भाषणे झाली आहेत त्यावरून आज याप्रसंगी कोणत्या विषयावर मी बोलणे समयोचित होईल याचा उलगडा मला झाला आहे. माझा विषय मला सापडला आहे. आपल्या अस्पृश्य समाजातील माझ्या टीकाकारांच्या टीकेला याप्रसंगी जाहीरपणे उत्तर देण्याचे मी ठरविले आहे. इतरवर्गीय लोकांच्या व पत्रकारांच्या टीकेचा उल्लेख या प्रसंगी मी करीत नाही. त्यांच्या टीकेचे स्वरुप, कारण व हेतू यांची आपल्यापैकी पुष्कळांना माहिती आहेच. त्यांच्या आक्षेपांचा समाचार वेळोवेळी मी घेतला आहे व कारण पडले व योगायोग आला म्हणजे पुढेही तो मला घ्यावा लागेल. आज फक्त अस्पृश्य समाजातील काही मंडळींकडून माझ्यावर जे आक्षेप घेण्यात येतात व जे आरोप करण्यात येतात ते किती फोल व निराधार आहेत हेच येथे आज मला सांगावयाचे आहे. माझ्यावर दोन प्रकारची टीका अस्पृश्यातील निरनिराळया

---

जनता : ८ जून १९३१.

जातीकडून करण्यात येते. चांभारादी अस्पृश्य वर्गातील काही मंडळी म्हणते की, डॉ. आंबेडकर हे जातीने महार असल्यामुळे अस्पृश्य वर्गाला ज्या काही सवलती मिळतात त्या सवलतींचा व लाभांचा सारा मलिदा ते आपल्या महार जातीलाच चारू घालतात. चांभारांना वगैरे त्यातला काही वाटा ते मिळू देत नाहीत. हा आक्षेप इतका निराधार व खोटा आहे की, याच्याकडे लक्ष देणेही प्रथम मला प्रशस्त वाटेना. माझ्याशी मतभेद असणारे लोक इतर समाजात आहेत तसे ते चांभारादी अस्पृश्य समाजातही असू शकतील हे मी जाणतो. पण कोणत्याही सुविचारी, प्रामाणिक व जबाबदार चांभाराचा असल्या नीच व खोट्या आरोपाला पाठिंबा अगर संमती असेल असे मात्र मला मुळीच वाटले नव्हते. पण ' राष्ट्रीय ' पत्रातून चांभारांच्या सभेची जी रसभरीत पाने पाहण्यात आली त्यावरून चांभारातील भल्या समजण्यात येणाऱ्या काही पुढाऱ्यांच्या तोंडातून हे नीच आक्षेप निघाल्याचे मला समजले. राष्ट्रीय पत्रातील हे रिपोर्ट खरे असल्यास मला या चांभार मंडळीबद्दल खरोखरच फार खेद वाटतो. असले खोटे व निराधार आरोप माझ्यावर करून त्यांनी आपला इतका अधःपात करून घ्यावयाला नको होता. माझ्यावर टीकाच त्यांना करावयाची होती तर त्यांनी दुसरा एखादा निराळा मुद्दा अगर निमित्त शोधून काढावयाला पाहिजे होते. पण सवलतीचा मलिदा मी एकट्या महार जातीलाच चारतो व चांभारादिकांच्या तोंडाला नुसती पाने पुसतो हा माझ्यावरील आरोप इतका स्पष्टपणे खोटा व निराधार आहे की, त्याच्या खोटेपणाबद्दल मला अगदी सुलभपणे वाटेल त्याची सप्रमाण खात्री पटवून देता येईल.

ठाणे, पुणे, सोलापूर, सातारा वगैरे ज्या जिल्ह्यांशी माझा निकट परिचय व संबंध येतो असे जरी जिल्हे घेतले व तेथील म्युनिसीपालिटी, लोकल बोर्डस् वगैरे स्थानिक संस्थानातून अस्पृश्यांच्या वतीने जाणाऱ्या प्रतिनिधींची जातवारी पाहिली तरी 'महाराला मलिदा चारण्याचा' हा आरोप किती फोल, खट्याळ व दुष्टपणाचा आहे याबद्दल कोणाचीही सहज खात्री पटविता येईल. ठाणे जिल्ह्यात, इतर जिल्ह्यांप्रमाणे महार जात ही बहुसंख्यांक जात आहे. पण तिच्यात लायक लोक असूनही ठाणे म्युनिसीपालिटीत, लोकल बोर्डात, स्कूल बोर्डात जे अस्पृश्य सभासद प्रतिनिधी म्हणून आहेत त्यात एकही महार जातीचा प्रतिनिधी नाही. सर्व चांभार जातीचे प्रतिनिधी आहेत. सोलापूर जिल्ह्यातही हाच प्रकार आहे. तेथील म्युनिसीपल स्कूल बोर्डमध्ये व म्युनिसीपालिटीमध्ये चांभार व ढोर समाजातीलच प्रतिनिधी आहेत. एकही महार नाही. आणि इतरांच्या मानाने महारांची संख्या अधिक आहे व त्यांच्यात जागृतीही मोठी झाली आहे. पुणे म्युनिसीपालिटीतही दोन्ही प्रतिनिधी चांभार जातीचे आहेत. सातारा डिस्ट्रिक्ट बोर्डामध्ये सुद्धा एकही महार जातीचा प्रतिनिधी नाही. धारवाड, विजापूर वगैरे कानडी मुलखातही हाच प्रकार आढळून येईल. याप्रमाणे स्थानिक

संस्थांतून अस्पृश्यांचे प्रतिनिधी म्हणून फक्त महार जातीचेच लोक भरले आहेत हा आरोप आमूलाग्र खोटा व निराधार आहे. पोलीस खाते प्रत्यक्ष व्यवहारात अस्पृश्य समाजाला जवळ जवळ बंदच होते. कौन्सिलमध्ये गेल्यावर या प्रश्नाला मी व माझे सहकारी मित्र डॉ. सोळंकी यांनी चालना दिली व पोलीस खाते अस्पृश्यांना मोकळे होईल अशी खटपट केली. तिला यश येऊन पोलीस खाते अस्पृश्यांना खुले करण्यात आल्याचा सरकारी जाहीर ठराव नुकताच प्रसिद्ध झाला आहे. या प्रयत्नानुसार वरिष्ठ दर्जाच्या पोलीस अधिकारावर जी पहिली नेमणूक झाली आहे ती चांभार जातीतील एका गृहस्थाची झाली आहे. महार जातीतील मनुष्याची वर्णी तेथे आम्हाला लावून घेता आली असती ; पण तसे मी केले नाही. अस्पृश्य वर्गात महार जात ही बहुसंख्यांक आहे. चांभारादी अल्पसंख्यांक जातीचा विश्वास संपादन करणे तिचे कर्तव्य आहे असे मी समजतो व म्हणून महार समाजातील लोकांचा रोष पत्करूनही ज्या काही सवलती मिळतील त्यांच्यातील मोठा हिस्सा चांभारादी अस्पृश्यातील अल्पसंख्यांक जातींना मिळेल अशी मी खबरदारी घेतो. 'गोळीला महार व पोळीला चांभार' असे माझे याबाबतीत धोरण आहे असे म्हणून माझ्यावर टीका करणारे व रागावणारे महार जातीत पुष्कळ लोक आहेत, हे मला माहीत आहे. माझ्याविरूद्ध त्यांचा हाच एक मोठा आक्षेप आहे ! अशी वस्तुस्थिती असता मी महारांनाच सर्व मलिदा चारतो व चांभारादी अल्पसंख्यांकांना काही मिळू देत नाही असा माझ्यावर आरोप करणे अत्यंत नीचपणाचे व निराधार आहे. चांभारातील जबाबदार समजल्या जाणाऱ्या पुढाऱ्यांनी असले वृथा आरोप माझ्याविरूद्ध केल्यामुळे महार समाजातील पुष्कळ लोक साहजिकपणे चिडून गेले आहेत. त्यांना माझे विनंतीपूर्वक पण निक्षून असे सांगणे आहे की, त्यांनी आपला राग आवरून धरला पाहिजे. महार लोक हे बहुसंख्यांक आहेत. . कोणी काही म्हटले तरी त्यांचे कर्तव्य उघड आहे. इतर अल्पसंख्यांक जातींचे जेणेकरून समाधान होईल तेच धोरण आपण अखेरपर्यंत कायम ठेविले पाहिजे. निष्कारण दोषारोप करणाऱ्या लोकांना याच धोरणाची कास धरून आपण समर्पक उत्तर देऊ शकतो. अस्पृश्यात भांडणे लागावी व महाराविरूद्ध चांभाराला उभे करून आपल्या कार्याचा नाश करावा व आपल्याकडे बोटे दाखवून आपल्याला हिणवावे हा तर आपल्या हितशत्रूंचा एक डावच आहे. तो आपण हाणून पाडला पाहिजे. बहुसंख्य समाज या नात्याने ही जबाबदारी महार वर्गावरच अधिक व प्रामुख्याने पडते व त्यांनी ती सांभाळलीच पाहिजे असे महार समाजाला माझे वारंवार निक्षून सांगणे आहे. ' जशास तसे ' या न्यायाने चांभारांच्या या आरोपांना तुम्ही उत्तरे देऊ शकता व त्यांच्याशी जशास तसे वागू शकता. पण यात आपल्या चळवळीचे हित होणार नाही. औदार्य व क्षमावृत्ती यांचीच आपण बळकट कास धरली पाहिजे. हेच धोरण आपल्या कार्याला व ध्येयाला शेवटी हितावह व भूषणावह होणार आहे.

महार जातीतील काही लोकांकडूनही माझ्यावर टीका करण्यात येते. मी शिक्षणाचे कार्य करीत नाही. सत्याग्रहाच्या वगैरे चळवळी करतो असा कित्येकांचा माझ्याविरूद्ध आक्षेप आहे. शिक्षणाचा अर्थ माझे हे टीकाकार काय व किती व्यापक करतात हे समजते तर त्यांचे समाधान करणे अधिक सुलभ झाले असते. सत्याग्रहाच्या व माणुसकीचे हक्क मिळविण्याच्या चळवळीत उत्तम शिक्षण असू शकते व मिळू शकते ही गोष्ट त्यांना मला पटवून देता आली असती. पण ते ज्याला ' शिक्षण ' म्हणून ओळखतात ते शिक्षण देण्याच्या बाबतीतही माझा प्रयत्न माझ्या या कोणत्याही टीकाकाराच्या प्रयत्नापेक्षा मोठा आहे असे मी आव्हानपूर्वक सांगू शकतो. ठाणे, अहमदाबाद, धारवाड वगैरे ठिकाणची बोर्डिंगे मी चालविली आहेत. आज या घटकेला ७० विद्यार्थी माझ्या प्रयत्नाने फुकट शिक्षणाचा लाभ घेत आहेत. माझ्या टीकाकारांनीही या बाबतीतील आपल्या प्रयत्नाचा आढावा काढावा व शिक्षणाकरिता त्यांनी किती पैसा खर्च केला आहे व किती झीज सोसली आहे हे जनतेला सांगावे. स्वतः काही न करता दुसऱ्याने अमुक केले नाही व तमुक करावयाला पाहिजे होते असा पोकळ शिष्टपणा करू नये. वरील प्रकारचे टीकाकार विशेषतः नाशिक जिल्ह्यात मला आढळून आले. त्यांच्या टीकेत काही अर्थ तरी आहे ; पण सातारा जिल्ह्यातील रा. निकाळजे वगैरे महार जातीची काही मंडळी मजवर जी टीका करते तिला शेंडा बुड काहीच नाही. काहीतरी विरूद्ध करून दाखवावयाचे व काहीतरी अद्वातद्वा बोलून पुढारी म्हणवून घ्यावयाचे एवढाच त्यांच्या आयुष्याचा हेतू दिसतो. परवा या निकाळजे वगैरे मंडळींनी सातारा जिल्ह्यामार्फत महार समाजाची एक परिषद बोलावली होती आणि तिचे अध्यक्षपद पुण्याच्या मुजूमदार, इनामदार साहेबांना दिले होते. हे इनामदार साहेब केवळ जातीने नव्हे तर वृत्तीनेसुद्धा पेशवाईचे खरेखुरे वंशज आहेत. पुण्याच्या पर्वती सत्याग्रहाला विरोध करण्यात हे इनामदार साहेब प्रमुख होते. अशा व्यक्तीला अध्यक्ष करून व अस्पृश्यांच्या चळवळीची सूत्रे अशा परकीय व्यक्तीच्या हाती देऊन निकाळजेने काय दाखविले ? अस्पृश्यांची आजची चळवळ स्वावलंबनाच्या व स्वाभिमानाच्या पायावर चालली आहे. मुजूमदार साहेबासारख्याना अध्यक्ष करून या तत्त्वांवर बोळा फासण्याचा या निकाळजे वगैरे मंडळींनी प्रयत्न केला. यापेक्षा ते स्वतः अगर त्यांच्या मताचे एखादे अस्पृश्य पदवीधर जरी या सभेचे अध्यक्ष झाले असते तरी लोकांना ते आवडले असते पण इनामदार साहेबांना अध्यक्ष करून सभेला तेही आले नाहीत व लोकही जमले नाहीत. रा. निकाळजेसारख्या लोकांशी मी जुळते घेत नाही असा माझ्यावर एक आरोप करण्यात येतो पण यांच्याशी जुळते

तरी कसे घ्यावयाचे ? ज्यांना तत्त्वाची जाणीव नाही व ती करून घेण्याची इच्छा नाही आणि स्वाभिमानाची चाड नाही, फक्त स्वतःचे महत्त्व वाढविण्याची इच्छा आहे , त्यांच्याशी कोणी झाला तरी काय व कसे मिळते घेणार अगर त्याची समजूत पटवू शकणार ? अशा माणसांना आपल्यासारख्या सामान्य जनतेनेच ताळ्यावर आणले पाहिजे. खरा व लायक पुढारी कोण व आपले हित कोण साधू शकतो याचा निर्णय यापुढे जनतेने दिला पाहिजे व ' मला पुढारी म्हणा ' असे म्हटल्याने पुढारीपण येत नसते ही गोष्ट पुढारी होवू इच्छिणाऱ्यांनीही ओळखली पाहिजे.



## ४१

# खडतर परिस्थितीशी झगडूनच समाजोन्नती शक्य

तारीख ३१ मे १९३१ मु. वडनेर, ता. चांदवड येथे झालेल्या सभेत डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी नाशिक जिल्ह्यातील युवकास पुढीलप्रमाणे संदेश दिला. ते म्हणाले,

नाशिक जिल्ह्यातील युवक संघाच्या आजपर्यंतच्या कार्याबद्दल मला समाधान वाटते. जिल्ह्यातील जागृतीचे कार्य मोठ्या हिंमतीने केले आहे. प्रत्येक गावी खडतर परिस्थितीशी झगडून समाजोन्नतीच्या जलशाच्या द्वारे केलेले प्रयत्न फारच अपूर्व असे आहेत. गावोगाव निर्भय तरुणांचे संघ स्थापून, लाठी, व्यायामादिक शारीरिक खेळ शिकणे, वर्तमानपत्रे वाचून अज्ञानी लोकास परिस्थितीची ओळख करून देणे वगैरे प्रकारच्या कामगिरीला आणखी व्यापक असे स्वरुप द्या, म्हणजे आपल्या लढ्याला यश मिळविणे कठीण जाणार नाही.



जनता : ८ जून १९३१.

# ४२

# अस्पृश्यता जगातील सर्व गुलामगिरीपेक्षा भयंकर व भीषण आहे

डॉ. बाबासाहेब आंबेडकर व त्यांचे सेक्रेटरी श्री. शिवतरकर हे दि. २८ जून १९३१ रोजी अहमदाबादेस गेले होते. अस्पृश्यवर्गीय विद्यार्थ्यांकरता तेथे स्थापन झालेल्या विद्यार्थीगृहाची पाहाणी करणे व त्यासंबंधी इतर व्यवस्था लावणे हा त्यांचा तेथे जाण्याचा हेतू होता. डॉ. आंबेडकरसाहेब येणार ही बातमी जरी अहमदाबादच्या अस्पृश्य जनतेला अगदी आयत्यावेळी समजली तरी त्यांनी त्या तेवढ्या अल्पवेळात आपल्या सन्माननीय पुढाऱ्यांच्या स्वागताची जंगी तयारी केली. हजारो अस्पृश्य मंडळी डॉ. आंबेडकरांच्या दर्शनार्थ अहमदाबादला व अहमदाबादच्या स्टेशनवर जमा झाली. येथील अस्पृश्यवर्गीय युवक मंडळाने (Youth league) व अस्पृश्यांच्या निरनिराळया सरासरी तीस संस्थांनी आपआपली स्वयंसेवक पथके आणून नीट व्यवस्था ठेविली होती. पण अस्पृश्य समाजाची ही स्वयंस्फूर्तीजन्य व स्वावलंबी तयारी पाहून एक प्रकारचे कौतुक व धन्यता मानून घेण्याऐवजी तेथील गुजरात प्रॉव्हिंशियल काँग्रेस कमिटीतील काही हिंदू सभासदांच्या पोटात मत्सराचा व द्वेशाचा वायगोळा उठला ! आपले ध्येय काय? आपल्या पुढाऱ्याने कसल्या व्रताची दीक्षा आपणास दिली आहे वगैरे गोष्टींचा विचार न करता हे काँग्रेसवाले हातात काळी निशाणी घेऊन व तोंडाने कसले तरी घाणेरडे व काँग्रेसला काळिमा फासणारे शब्द उच्चारीत डॉ. आंबेडकरांवर 'शेम चा' वर्षाव करण्याकरिता गेले, या उन्मत्त व अविचारी गुंडांनी अस्पृश्यांना चीड येईल व त्यांचा अपमान होईल असले चाळे करून गोंधळ घालण्याचा प्रयत्न केला. यांची मुस्कटदाबी करण्याला अस्पृश्य स्वयंसेवकांना व जनतेला मुळीच उशीर लागला नसता. पण डॉ. आंबेडकर येण्याची वेळ जवळ आल्यामुळे त्यांच्या समक्ष हा गोंधळ नको म्हणून त्यांनी आपली शांतता व शिस्त ढळू दिली नाही. तरी या काँग्रेसवाल्यांनी लोटालोटी करण्याचा प्रयत्न करून थोडा फार गोंधळ माजविलाच ! नुकतेच मौलाना शौकतअली येथे येऊन गेले तेव्हा त्यांचा धिक्कार करण्याचे धाडस या भ्याडांना झाले नाही. कारण अस्पृश्यांप्रमाणे मुसलमान हे शांतता धरणार नाहीत, वेळ आली तर आपल्यापेक्षाही सवाई गुंड बनून ते आपली टाळकी शेकतील याची पूर्ण खात्री त्यांना असल्यामुळे ते बड्या भाईची कुचेष्टा करण्यास धजले नाहीत. अस्पृश्य हे काय?

---

जनता : ६ जुलै १९३१.

आपल्या पायाखालचे जीव,त्यांना आपण केव्हाच चिरडून टाकू अशी घमेंड यांना वाटत होती म्हणून ते त्यांच्या आवडत्या पुढाऱ्यांचा, काही प्रसंग व कारण नसता अपमान व अपराध करण्यास प्रवृत्त झाले. अस्पृश्य स्वयंसेवकांनी चित्तक्षोभ होऊ दिला नाही व त्यांचे हे चाळे कायद्याबाहेर जाऊ लागले असे पाहून सरकारी शिपायांनी या गोंधळयांना हुसकावून लावले. म्हणून स्पृश्य व अस्पृश्य यांची मारामारी होण्याचा प्रसंग टळला. पण या एकंदर प्रकरणात नामुष्की कोणाची झाली? सरकारचे शिपाई गुंडगिरी करतात व गांधी-आयर्विन तह मोडतात असे म्हणणाऱ्या कॉंग्रेस पुढाऱ्यांची या कॉंग्रेसवाल्यांच्या गुंडगिरीने नामुष्की नाही का झाली?

डॉ. आंबेडकरांच्या जाहीर सन्मानाचा व जाहीर भाषणाचा तेथील तरूण मंडळाने आखून ठेवलेला कार्यक्रम बिघडविण्याचा यांचा हेतू सुद्धा सिद्धिला गेला नाहीच; उलट यांच्या विघ्नसंतोषीपणाला आळा घालण्याकरता अपेक्षेपेक्षाही प्रचंड जनसमुदाय त्यांच्या सन्मानार्थ व त्यांचे भाषण ऐकण्यास जमला होता. कॉंग्रेसच्या व गांधीजींच्या राजकारणाची छाननी करून त्यांचा व आपला काय, कोठे व का मतभेद होतो याचे थोडक्यात व मुद्देसूद विवेचन डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी केले. अस्पृश्य तरुणांना उद्देशून ते म्हणाले,

आपला संग्राम सर्व प्रकारच्या गुलामगिरीविरूद्ध आहे. अस्पृश्यतेची प्रचलित गुलामगिरी जगातील इतर सर्व गुलामगिरीपेक्षा भयंकर व भीषण असून एकट्या हिंदू समाजाच्या अगर धर्माच्या मुखावरीलच तो काळाकुट्ट कलंक नसून अखिल मानव धर्माचे व माणुसकीचे ते लांच्छन आहे. आपण हिंदू समाजाचे अभिन्न असे घटक आहो व म्हणून हिंदूंच्या प्रत्येक धार्मिक संस्थेस व मंदिरात प्रवेश करण्याचा आपला जन्मसिद्ध हक्क आहे. तुमची आजची एकंदर तयारी व धिटाई पाहून मला समाधान वाटले. पण माझ्या पुढील भेटीच्या वेळी याहीपेक्षा तुमची अधिक तयारी झालेली व अस्पृश्यता निवारणाचे तुमचे अंगीकृत कार्य अधिक परिणामकारी झालेले पाहण्याची मी अपेक्षा करतो. डॉ. आंबेडकरांचे हे जाहीर भाषण अहमदाबादच्या प्रेमाभाई हॉलमध्ये झाले.



## ४३

# अस्पृश्य स्त्रियांनी सर्वांगीण सुधारणेसाठी झटावे

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे अखिल अस्पृश्य वर्गाचे प्रतिनिधी म्हणून विलायतेला भरणाऱ्या दुसऱ्या राऊंड टेबल परिषदेला शनिवार ता. १५ रोजी जाणार होते. त्याप्रित्यर्थ त्यांना अखिल अस्पृश्य मानलेल्या वर्गाकडून शुक्रवार ता. १४ ऑगस्ट १९३१ रोजी कोटामधील सर कावसजी जहांगीर हॉलमध्ये डॉ. पी. जी. सोळंकी यांच्या अध्यक्षतेखाली प्रेमाचा निरोप देण्याचा समारंभ साजरा करण्यात आला होता. शुक्रवारी रात्रौ आठ वाजता प्रथम भगिनीवर्गातर्फे त्यांना निरोप देण्यात आला. अस्पृश्य मानलेल्या असंख्य भगिनीवर्गाच्या समुदायाने कावसजी हॉल फुलून गेला होता.

याप्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना भगिनीवर्गातर्फे तसेच पुरूषवर्गातर्फे निरोप देण्यात आला.

( भगिनीवर्गाला उद्देशून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी दिलेले प्रस्तुत भाषण आहे. पुरूषवर्गाला उद्देशून दिलेले भाषण त्यानंतर स्वतंत्र दिले आहे.––संपादक )

डॉ. आंबेडकरांची प्रकृती विशेष सुधारलेली नव्हती. तरी पण त्यांनी याप्रसंगी येऊन भगिनीवर्गाला निरोपादाखल उपदेश केला. त्यांनी आपल्या भाषणात मुख्यतः भगिनीवर्गास आपल्या स्वावलंबी लढ्याची जाणीव करून देताना ते म्हणाले,

आजपासून आपणास आपल्या उन्नतीसाठी, आपल्या स्वातंत्र्यासाठी विशेष जोमाच्या संघटनेने कार्याला लागले पाहिजे. आपल्या गळयाभोवती स्पृश्य हिंदूंनी व सरकारने गुलामगिरीचा पाश घातला आहे तो ताडकन तोडून आपले स्वातंत्र्य मिळविले पाहिजे. आमच्या स्त्रियांनी याकरिता आपल्या राहणीमध्ये व इतर व्यावहारिक गोष्टींमध्ये पुष्कळच सुधारणा घडवून आणल्या पाहिजेत. अंगावरील कथल पितळेच्या दागिन्यांचा अगदी प्रथम त्याग करून टाकला पाहिजे. नेसण्यासवरण्यात स्पृश्य समाजाप्रमाणे जो प्रघात पडत आहे तोच कायम ठेवून आम्ही स्वावलंबनाने वाटेल ती क्रांती घडवून आणू हे इतर समाजाच्या नजरेस आणून दिले पाहिजे. तसेच पुरुषवर्गाच्या सहकार्याने आपले कार्य मोठ्या प्रमाणावर चालेल असे सहाय्य तुम्ही करावयास नेहमी तयार झाले पाहिजे. पुरूषवर्गाला त्यांच्या खऱ्या कर्तव्याची जाणीव करून द्यावयाची मोठी जबाबदारी तुमच्या शिरावर आहे. पुरूषवर्गाला व्यसनापासून व इतर विघातक कृत्यापासून अलिप्त ठेवण्याचे प्रयत्न तुम्ही करावयास पाहिजे. भावी पिढीला आजच्या गुलामगिरीचा मागमूसही दिसणार नाही अशी अलौकिक स्वार्थत्यागाची कामे अगदी निर्भयपणे तुम्ही करावयास सज्ज झालात की, माझ्या कार्याची जबाबदारी आपोआपच पार पाडल्याचे पुण्य तुमच्या पदरी पडेल.

● ● ●

---

जनता : १७ ऑगस्ट १९३१.

## ४४

# लढा बिकट वाटला तरी पार पाडण्याची जबाबदारी आपलेपणाच्या नात्याने स्वीकारा

दिनांक १४ ऑगस्ट १९३१ रोजी भगिनीवर्गाच्या सभेनंतर १० वाजेपर्यंत पगारे बंधू चांदोरीकर यांच्या सामाजिक जलशाचा कार्यक्रम पार पाडण्यात आला. डॉक्टर साहेबांनी जलशेवाल्यांचे अभिनंदन करून आभार मानले व त्यांना एक रौप्य पदक आपल्या हस्ते अर्पण केले.

पुरूषवर्गाचा निरोप घेताना डॉ. आंबेडकरांनी फारच परिणामकारक भाषण केले. त्यांचे अंतःकरण पिळवटून सोडणारे भाषण ऐकून सर्वांची मने भावी लढ्यासाठी उत्सुक झालेली दिसत होती. अध्यक्ष डॉ. सोळंकी यांनी विलायतेला जात असलेल्या डॉ. आंबेडकरांच्या कामगिरीची सर्वांना जाणीव करून दिल्यावर डॉक्टर साहेब बोलावयास उठले. ते म्हणाले,

आपणास आजपर्यंत मिळालेल्या यशाचे वाटेकरी डॉ. सोळंकीही आहेत हे मला विसरून चालणार नाही. आपला लढा बिकट आहे व आपल्या कार्यात यश मिळविणे कठीण काम आहे. या परिषदेमध्ये अखिल हिंदुस्थानातून प्रत्येक पक्षाचे, पंथाचे, जातीचे मिळून जवळ जवळ १२५ प्रतिनिधी आहेत. या प्रतिनिधीत आपल्या समाजातर्फे अवघे दोनच प्रतिनिधी निवडले जावेत ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. आम्ही दोघे एके बाजूला व इतर प्रतिनिधी एके बाजूला अशा परिस्थितीत येत्या राऊंड टेबल परिषदेत कितपत यश मिळेल हे आजच मला सांगता येत नाही. प्रयत्नांची पराकाष्ठा करणे हे मी माझे कर्तव्य समजतो. तुमचे माझ्यावरील इतके अलौकिक प्रेम पाहून मला प्रत्येक कार्य करण्याची उमेद वाटते ; आणि या उमेदीच्या बळावर मी माझ्या कार्याचा पायाच बांधला आहे ; आणि आपल्या स्वातंत्र्याचा लढा लढण्यात जितके यश मिळविता येईल तितके मिळवीन. मी परत येईपर्यंत तुम्ही मात्र आपली संघटना अधिक व्यापक करून माझ्या मागे डॉ. सोळंकी यांच्या नेतृत्वाखाली आपले कार्य करीत रहा.

दुसरी महत्त्वाची गोष्ट सांगायची म्हणजे माझी म. गांधींबरोबर जी मुलाखत झाली त्यात मला पूर्णपणे निराशा दिसून आली. आपल्या राजकीय हक्कासंबंधी म. गांधी आजच्या परिस्थितीत काहीच करू शकत नाही व त्यांना आमच्यासाठी जितके आपलेपणाच्या भावनेने काम करावयाचे आहे तितके करता येणे अशक्य आहे. गांधींच्या मुलाखतीची सविस्तर हकिगत तुम्हाला जनता पत्राच्या

---

जनता : १७ ऑगस्ट १९३१.

माहितीवरून कळेलच. अशा आणीबाणीच्या प्रसंगी आपण आपले बळ अधिक वाढवा व आपला लढा नेटाने पुढे चालवा. येत्या सिंहस्थामध्ये नाशिक क्षेत्री जो सत्याग्रह होणार आहे तेथे जाऊन पैशाने व मनुष्यबळाने सहाय्य करा. मंदीर प्रवेशाच्या सत्याग्रहाने नाशिक जिल्ह्याने मोठीच कामगिरी बजाविली आहे ; आणि म्हणून आपण त्यांच्या हाकेला ' ओ ' देऊन तो लढा कितीही बिकट वाटला तरी पार पाडण्याची जबाबदारी आपलेपणाच्या नात्याने स्वीकारा. नाशिक जिल्ह्याप्रमाणे पुणे जिल्हाही मागासलेला नाही असे मला आता वाटू लागले आहे. दोन महिन्यापूर्वी ' पुणे जिल्हा बहिष्कृत परिषद ' भरली होती. तिच्या एकंदर कार्यावरून लवकरच त्या जिल्ह्यात मोठी जोमाने चळवळ सुरू होईल. ही परिषद यशस्वी करून पुणे जिल्हा कोणत्याही जबाबदारीच्या कार्याला तयार आहे असे माझे मित्र श्री. रेवजीबुवा डोळस यांनी माझ्या नजरेस आणून दिले. त्यांनी आपल्या सहकारी मित्रांच्या सहाय्याने ही चळवळ आपल्या जिल्ह्यात अशीच उज्वल स्वरूपात चालू ठेवावी. समता सैनिक दलाच्या आजच्या शिस्तीचा मला अभिमान वाटतो. तरीपण ही शिस्त आणि कर्तव्यनिष्ठा त्यांनी कायम ठेवून आपले कार्य यशस्वी करण्याचा संकल्प व्यापक स्वरूपात करावा. आपली शिस्त व संघटना कायम ठेवून आपले जबाबदारीचे कार्य आपण माझ्या गैरहजेरीत उत्तमप्रकारे पार पाडाल अशी आशा बाळगतो. त्यांनी यानंतर आपले भाषण संपविले.



# ४५

# माझ्या लोकांच्या हितसंबंधांचा प्रतिनिधी मीच आहे

गेला गुरुवार म्हणजे ता. ८ ऑक्टोबर १९३१ हा दिवस राऊंड टेबल कॉन्फरन्सच्या इतिहासात विशेष महत्त्वाचा होता. अल्पसंख्यांकांच्या प्रश्नाची वाटाघाट करण्याकरिता जी एक खाजगी कमिटी म. गांधींच्या अध्यक्षतेखाली नेमली गेली होती व आठ दिवस वाटाघाट होऊनही जिच्यात या प्रश्नाचा निकाल लागला नाही त्या कमिटीतील काही सभासदांची त्या दिवशी भाषणे झाली. अल्पसंख्यांकांच्या प्रश्नाचा समाधानकारक निर्णय होऊ शकला नाही व पंजाबातील हिंदू, मुसलमान व शीख यांच्या मागण्यांची तोंडमिळवणी न झाल्यामुळे या कमिटीला हा प्रश्न सोडविण्याच्या बाबतीत अपयश आले, याबद्दल सर्वांनी खेद व्यक्त केला. काँग्रेसच्या वतीने म. गांधीजींनी अस्पृश्यांच्या बाबतीत जे पक्षपातीपणाचे व अन्यायाचे धोरण स्वीकारले होते त्याला स्पष्टपणे विरोध करणे डॉ. आंबेडकरांना या प्रसंगी प्राप्तच होते. पण म. गांधींना डॉ. आंबेडकरांनी विरोध केला ; एवढ्याच एका गोष्टीचा बागुलबुवा करून व्यक्तिशः त्यांच्याविषयी आपल्या वाचकांची मने करवितील तितकी कलुषित करणे हा येथील काँग्रेस हिंदुराष्ट्रीय पत्रकारांचा व देशभक्तांचा धर्मच होऊन बसलेला आहे. डॉ. आंबेडकरांनी विरोध का केला व तसा तो त्यांनी का करू नये याचा निर्विकार चित्ताने विचार करण्याचे औदार्य या देशभक्तांच्या वाट्याला आलेले दिसत नाही. महात्मा गांधीजींची योजना मग ती सुसंगत असो वा विसंगत असो तिला विरोध करणे म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वराला विरोध करण्याइतके भयावह व पापमूलक आहे. सरकारच्या चिथावणीशिवाय असे कोणी करणारच नाही अशा चुकीच्या व भ्रामक कल्पना या राष्ट्रीय व देशभक्त वर्तमानपत्रकारांनी आपल्या उराशी बाळगून ठेविल्या असून त्यांचा प्रसार रोज नियमितपणे ते आपल्या वाचकात करून राहिलेले आहेत. " डॉ. आंबेडकर हे अस्पृश्यांचे प्रतिनिधी अगर पुढारी नाहीत. त्यांना केवळ सरकारने निवडून दिलेले आहे. अस्पृश्यांचे खरे लोकमान्य पुढारी दुसरेच आहेत व ते काँग्रेसच्या संग्रही आहेत. काँग्रेस व मी हेच काय ते अस्पृश्यादी सर्व अल्पसंख्यांक समाजाचे प्रतिनिधी आहेत. " अशा आशयाचे तुणतुणे म. गांधींनी आधीपासूनच वाजविण्यास सुरवात केली होती. गुरुवारच्या भर सभेतही याच मुद्यांवर त्यांनी भर दिला. त्यामुळे त्यांच्या

---

जनता : १२ ऑक्टोबर १९३१.

या विधानाचा फोलपणा स्पष्टपणे उघडकीस आणणे भागच होते. मुसलमानांच्या वतीने सर महंमद शफीने गांधीजींच्या या विधानाचा इन्कार केला व डॉ. आंबेडकरांनाही गांधीजींच्या विधानाला खोडून काढावे लागले, पण म्हणतात ना गुपचूपपणे चिमटा घेणाराचा हात दिसत नाही पण ओरडणाराचे तोंड तेवढे दिसते ! तसाच प्रकार येथेही झालेला आहे. महात्मा गांधी हे सत्पुरुष ; शिवाय ते अस्पृश्योद्धारक ; त्यांचा प्रत्येक शब्द वेदतुल्यच समजला गेला पाहिजे. त्यांनी खरी खोटी काही विधाने केली व बरे वाईट कसेही धोरण स्वीकारले तरी ते मान्य केलेच पाहिजे अशी ज्यांची विचारसरणी आहे त्यांना डॉ. आंबेडकरांनी खालील दिलेले भाषण कर्णकटू लागावे यात आश्चर्य वाटण्यासारखे तरी काय आहे ? येथील लहान मोठ्या मराठी राष्ट्रीय पत्रांनी महात्मा गांधीजींची वगैरे तारेने आलेली भाषणे प्रसिद्ध केली पण डॉ. आंबेडकरांचे भाषण न देता त्याचा नुसता लोकमत कलुषित करण्याइतका सारांश देऊन आपली सूडबुद्धि भागवून घेतली. आठ तारखेला डॉ. आंबेडकरांचे जे भाषण प्रसिद्ध झाले आहे त्याचा मराठी सारांश येणेप्रमाणे आहे. डॉ. आंबेडकर म्हणाले,

" आपल्या प्रयत्नाला यश आले नाही " या भावनेने जरी काल रात्रीच्या निष्फळ वाटाघाटीनंतर कमिटीतील प्रतिनिधींनी परस्परांचा निरोप घेतला होता तरी आज त्यासंबंधी बोलताना वादग्रस्त मुद्यांचे अगर आहे त्या मतभेदात भर घालणाऱ्या धोरणांचे भाषण कोणी करू नये असा सर्वसाधारण व आपापसात करार ठरलेला होता. पण गांधीजींचे आताचे भाषण ऐकता त्यांच्या हातून या कराराचा भंग झाल्याचे पाहून मला वाईट वाटते. गांधीजींनी भाषणाला आरंभ करतानाच कमिटीचे कार्य का यशस्वी झाले नाही याबद्दल स्वतःचे मत व्यक्त करताना वादग्रस्त मुद्दे उत्पन्न केले. कमिटीचे कार्य का अयशस्वी झाले याचा खुलासा करणारे पुरावे मजजवळही बरेच आहेत, पण त्यांचा उल्लेख आज येथे करणे अप्रासंगिक आहे म्हणून मी तसे करू इच्छित नाही.

कमिटीची बैठक बेमुदत तहकूब करण्यात यावी की काय या समयोचित विषयापुरतेच बोलावयाचे सोडून कमिटीतील सभासद हे त्या त्या समाजाचे प्रतिनिधी आहेत की नाहीत हा वादग्रस्त व अप्रासंगिक मुद्दा गांधीजींनी या प्रसंगी अगदी निष्कारण उकरून काढून भलत्याच वादाला त्यांनी चालना दिलेली आहे. सरकारने आम्हाला येथे नेमून पाठविले आहे ही गोष्ट आपल्याला कोणालाच नाकबूल करता येणार नाही ; पण माझ्याविषयीच जर बोलावयाचे असेल तर गांधीजींना मी आव्हानपूर्वक सांगू इच्छितो की आपला प्रतिनिधी कोण असावा हे निवडण्याची जरी अस्पृश्य समाजाला संधी दिली तरी त्यांनी निवडून

दिलेल्या प्रतिनिधीतही माझे स्थान जरुर असेल म्हणून गांधीजींनी उत्पन्न केलेल्या या वादग्रस्त मुद्याला उत्तर देताना मी आज त्यांना इतकेच सांगू इच्छितो की माझी नेमणूक इतर सर्वांप्रमाणे जरी सरकारने केली असली तरी मी माझ्या लोकांच्या हितसंबंधाचा पूर्णतः व खराखुरा प्रतिनिधी आहे ही वस्तुस्थिती त्यांनी दृष्टिआड न करणेच चांगले.

गांधीजी असे नेहमी प्रतिपादन करीत आहेत की काँग्रेस अस्पृश्यांकरता झटत आहे आणि मी अगर माझे सहकारी अस्पृश्य प्रतिनिधी यांच्यापेक्षाही काँग्रेसकडे अस्पृश्य वर्गाचे प्रतिनिधीत्व अधिक प्रमाणात येऊ शकते ! या बाबतीत मी इतकेच म्हणू शकतो की बेजबाबदार लोकांकडून जे अनेक बनावट हक्क पुढे करण्यात येतात त्यापैकीच हा एक बनावट हक्क असून ज्यांच्या नावाने हा हक्क पुढे मांडण्यात येतो त्या लोकांनी अस्पृश्य समाजाने त्याचा अनेकवार इन्कार केला असूनही तो वारंवार पुढे करण्यात यावा एवढाच यात विशेष खोडसाळपणा आहे.

काँग्रेसविषयी अस्पृश्य समाजाला सामान्यतः वाटणारा अविश्वास व्यक्त करणारा एक टेलिग्राम मला कुगन (ॲलमोरा) येथील अस्पृश्य समाज संघाच्या अध्यक्षाकडून नुकताच आलेला आहे. हे ठिकाण मी अद्याप पाहिले नाही व ज्यांनी टेलिग्राम पाठविला त्यांचीही माझी ओळख नाही. पण त्यांनी असे कळविले आहे की, काँग्रेसमधील काही व्यक्ती अस्पृश्य समाजाविषयी सहानुभूती बाळगणाऱ्या असल्या तरी बहुजन अस्पृश्य समाज काँग्रेसमध्ये नाही ही गोष्ट मात्र निश्चित आहे.

पण याही मुद्याची चर्चा करण्याचा हा प्रसंग नव्हे. आताच्या प्रश्नापुरतेच बोलावयाचे म्हणजे मॉयनॉरिटी कमिटीची बैठक बेमुदत तहकूब करण्यात यावी व फेडरल स्ट्रक्चर कमिटीचे कार्य पुढे चालवावे या गांधीजींच्या ठरावाला सर. म. शफीप्रमाणेच माझाही पूर्णपणे विरोध आहे. हा महत्त्वाचा प्रश्न मध्येच टाकून दुसऱ्या प्रश्नांना हात घालावा ही योजना मला पसंत नाही. एक तर पुन्हा प्रयत्न करून अल्पसंख्यांकांची ही भानगड आपापसात आपणच मिटवून टाकावी व काहीतरी तडजोड घडवून आणावी ; पण हे जर अशक्य वाटत असेल तर ब्रिटिश सरकारने ही भानगड मिटविणारी काही तरी योजना मुक्रर करून मग पुढच्या कार्याला लागावे. पण दुसऱ्या तिऱ्हाईत राष्ट्रातील लोकांपुढे हा प्रश्न निकालार्थ सोपवू नये ; कारण या बाबतीत ब्रिटिश सरकार इतकी जबाबदारी अपरिचित अशा तिऱ्हाईत लोकांना वाटणे शक्य नाही.

इंग्रज लोकांच्या हातून सत्ता काढून ती हिंदी लोकांच्या, ब्रिटिश नोकरशाहीच्या ऐवजी वरिष्ठ वर्गातील हिंदी स्वराज्यवाल्यांच्या हाती देऊ पाहणाऱ्या राजकीय चळवळीत अस्पृश्य समाजाने आतापर्यंत भाग घेतलेला नाही ही गोष्टही यावेळेस

मी सर्वांच्या निदर्शनास आणू इच्छितो. इंग्रज राज्यकर्त्यांविरूद्ध अस्पृश्य समाजाच्या काही विशिष्ट तक्रारी आहेत ; पण तेवढ्यासाठी राजकीय सत्तेची अदलाबदल झाली पाहिजे अशी ओरड अस्पृश्य लोकांनी केलेली नाही. केवळ राजकीय सत्तेच्या अदलाबदलीकरता ते फारसे उत्सुक नाहीत. पण जे लोक या गोष्टीकरता चळवळ करून राहिलेले आहेत त्या चळवळीला थोपवून धरणे जर सरकारला शक्य नसेल व त्यामुळे राजकीय सत्तेची जर विभागणी करणे भागच असेल तर ती सत्ता मुसलमान अगर हिंदू समाजातील काही थोडक्या लोकांच्या अगर विशिष्ट कंपूच्या आहारी पडणार नाही तर त्या सत्तेची योग्य व आवश्यक अशा प्रमाणात सर्वसामान्य जनतेत व पददलित जातीत विभागणी होईल याबद्दलची खबरदारी घेणे व तेवढ्यासाठी काही संरक्षक अटींची (Safeguards) आधी तरतूद होणे अत्यावश्यक आहे. यादृष्टीने विचार करता या प्रश्नाचा आधी निकाल लावल्याशिवाय व भावी राज्यघटनेत आम्ही कोठे आहो हे निश्चित समजल्याशिवाय ती राज्यघटना तयार करण्यात आम्ही अंतःकरणपूर्वक कसा भाग घेऊ शकणार ?



४६

# देशाच्या ऐक्यासाठी संघटना आवश्यक

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपली विलायतेमधील कामगिरी तात्पुरती संपवून परत येणार ही आनंदाची बातमी खालील पत्रकाद्वारे देण्यात आली.

शुक्रवार ता. २९ जानेवारी १९३२ रोजी सकाळी ६ वाजता (स्टॅ. टा.) बॅलार्ड पियर बंदरावर सर्वांनी हजर राहावे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जाहीर स्वागत समारंभामध्ये ज्या ज्या व्यक्तींना-संस्थांना भाग घ्यावयाचा आहे त्यांनी ' डॉ. आंबेडकर स्वागत कमिटीकडे ' गुरुवारी संध्याकाळी ६ वाजेपर्यंत आपली नावे नोंदवून पास घ्यावेत. नाव नोंदविण्याची फी, संस्था, मंडळे अगर पंच यांना प्रत्येकी पाच रुपये व स्वतंत्र व्यक्तीला प्रत्येकी एक रुपया पडेल. डॉ. बाबासाहेब आंबेडकर बोटीमधून उतरल्यानंतर सुमारे आठ वाजता बॅलार्ड पियर स्टेशनवरील हॉलमध्ये सर्वांच्या तर्फे स्वागत समारंभ साजरा करण्यात येईल. प्रत्येकानी आपापले हारतुरे यावेळी डॉक्टरसाहेबांना अर्पण करावेत.

दुपारी ३ ते ६ वाजेपर्यंत परळ येथील डॉक्टरसाहेबांच्या लायब्ररी हॉलमध्ये निरनिराळया प्रांतातून आलेल्या पुढाऱ्यांचा विचारविनिमय होईल.

रात्रौ ७ ते १० वाजेपर्यंत राऊंड टेबल परिषदेसंबंधी डॉ. आंबेडकरांचे जाहीर भाषण होईल. याशिवाय इतर पुढाऱ्यांची भाषणे होतील.

शनिवारी ता. ३० रोजी सकाळी ११ ते दुपारी १ वाजेपर्यंत मुंबईतील प्रमुख पुढाऱ्यांबरोबर विचारविनिमय. नंतर दुपारी २-१५ च्या पंजाब मेलने राऊंड टेबल परिषदेच्या वर्किंग कमिटीच्या कार्यासाठी दिल्लीला जातील.

स्वागत कमिटीच्या विनंतीप्रमाणे ज्या ज्या व्यक्तीने स्वागत समारंभाचे पास विकत घेतले असतील त्यांचा स्वागत कमिटीत समावेश करण्यात येईल.

आपला नम्र,

सीताराम नामदेव शिवतरकर,

सेक्रेटरी, डॉ. आंबेडकर स्वागत कमिटी, मुंबई.

त्यानुसार अस्पृश्य समाज त्यांच्या जंगी स्वागताच्या तयारीतच होता. अखिल हिंदुस्थानातील अस्पृश्य बांधवांच्या भावी राज्यघटनेविषयी राऊंड टेबल

---

जनता : २३ आणि ३० जानेवारी १९३२.

परिषदेमध्ये डॉ. आंबेडकरांनी जी अमोलिक कामगिरी केली त्याबद्दल अस्पृश्य समाज त्यांच्याविषयी धन्यवाद गातच होता ; परंतु प्रत्यक्ष दर्शन व भेटीशिवाय त्यांच्या धडाडीच्या कार्याविषयी आपल्या अंतःकरणातील जाणीव व्यक्त होणार नाही असे प्रत्येकाला वाटत होते. ता. २९ जानेवारी १९३२ रोजी एस. एस. मुलतान बोटीने मुंबईस येतो अशा आशयाची तार येथे येताच अस्पृश्य समाजात आनंदाचे वातावरण दुमदुमून गेले. २९ तारखेची प्रत्येकजण मोठ्या आतुरतेने वाट पहात होता आणि शेवटी तो त्यांच्या आगमनाचा दिवस गेल्या शुक्रवारी उगवला.

डॉ. आंबेडकर सकाळी सहा वाजता बॅलार्ड पियरवरील मोल स्टेशनवर विलायतच्या बोटीने उतरणार होते तरी अस्पृश्य बंधुभगिनींचा असंख्य जमाव पहाटे साडेचार-पाच वाजल्यापासून मोल स्टेशनावर जमू लागला होता. प्रत्येकाच्या मुखावर आनंदाच्या, एकप्रकारच्या समाधानाच्या आणि संतोषाच्या भावना स्पष्टपणे दिसत होत्या. ' डॉ. आंबेडकर की जय ' च्या जयघोषणेने अंतःकरणातील प्रेमाचा—डॉ. आंबेडकरांविषयीच्या भक्तीच्या भावनेचा—असा उमाळा मुखातून आनंदातिशयाने उमटत होता. डॉ. आंबेडकरांचा जयजयकार असो, अशी भगिनीवर्गानी केलेली जयघोषणा मधूनमधून उमटत होती. डॉ. आंबेडकरांचे दर्शन कधी व कसे होते याची आतुरता त्यांना लागून राहिली होती. एकदाचे सहा वाजले. डॉ. आंबेडकर आता आपणास दिसणार, भेटणार ह्या उत्सुकतेने सर्वांचे डोळे मुलतान बोटीकडे लागले होते. इतक्यात डॉ. आंबेडकरांनी बोटीच्या डेकवर येऊन ओझरते दर्शन दिले आणि त्यांच्या ज़यजयकाराने ते सारे वातावरण अगदी गजबजून गेले.

डॉ आंबेडकरांचे स्वागत मोल स्टेशनवरील एका भव्य हॉलमध्ये करण्याचे आगाऊच ठरले होते. तो हॉल असाधारणपणे सुशोभित करून एक उच्च आसन मुद्दाम उभारले होते. डॉ. आंबेडकर येणार त्याच बोटीने मौ. शौकत अलीही येणार होते आणि त्यांचेही स्वागत करण्याकरता मुसलमान बंधू व खिलाफत स्वयंसेवकांनी तयारी केली होती. याच हॉलची अर्धी बाजू मुसलमान बंधुंना दिलेली होती. एका बाजूला मुसलमान समाज व दुसऱ्या बाजूला अस्पृश्य समाज अशी त्या हॉलची विभागणी केलेली होती. डॉ. आंबेडकरांच्या स्वागतासाठी जसे अस्पृश्य लोक आतुर झालेले होते तसेच मौ. शौकत अलीच्या स्वागतासाठी मुसलमान बंधूही आतुर झाले होते. उभयतांच्या स्वागताची वेळ सात वाजताची ठरली होती. तोपर्यंत बोटीवर त्यांच्या सामोरे अस्पृश्य व मुसलमान समाजातील पुढारी गेले होते. स्वागताच्या पूर्वी बोटीच्या अगदी वरच्या डेकवर डॉ. आंबेडकर व श्री. देवराव नाईक, भाई प्रधान, डॉ. प्रधान, श्री. असईकर, कद्रेकर, गुप्ते, प्रधान, खांडके, शिवतरकर, रणखांबे वगैरे

मंडळीबरोबर राऊंड टेबल परिषदेसंबंधी थोडासा विचारविनिमय झाला. नंतर डॉ. आंबेडकर यांनी बोटीवरील आपले काही मामुली काम केल्यावर ते व मौ. शौकत अली स्वागतासाठी तयार केलेल्या हॉलमध्ये आले. त्यावेळी त्यांच्या जयजयकाराने तेथले वातावरण पुन्हा दुमदुमून गेले. डॉ. आंबेडकर व मौ. शौकत अली यांचे उभयपक्षाकडून स्वागत झाले असे म्हणावयास काहीच हरकत नाही. तशीच विलायतेमधील राऊंड टेबल परिषदेच्या कार्यात मुसलमानांनी डॉ. आंबेडकर यांना जी एक प्रकारची मदत केली होती त्यामुळे मौ. शौकत अलीचेही स्वागत त्यांनी केले आणि मुसलमान समाजानेही डॉ. आंबेडकरांचे स्वागत केले. हा अस्पृश्य (हिंदू) व मुसलमानांचा संयुक्त स्वागताचा समारंभ मोठा अपूर्व असा होता असे म्हणावयास मुळीच हरकत नाही.

आपल्या स्वागताला उत्तर देताना मौ. शौकत अली यांनी, डॉ. आंबेडकर हे माझे धाकटे भाऊ आहेत आणि हिंदी स्वराज्यात प्रत्येक धर्माच्या, जातीच्या व पंथाच्या व्यक्तीने आपण एकमेकाचे भाऊ-भाऊ आहोत अशी जिवाभावाची जाणीव करून घेतल्याशिवाय आपणास खरे स्वराज्य मिळणार नाही. मनुष्याला आपल्या कार्यात हिम्मत अगोदर पाहिजे आणि त्या दृष्टिने पाहाता डॉ. आंबेडकरांनी राऊंड टेबल परिषदेमध्ये दाखविलेली अस्पृश्य समाजाविषयीची हिम्मत खरोखर कौतुकास्पद आहे. मुसलमान समाज आपल्या हिंमतीने हिंदवी स्वराज्याला मदत करीत आहे व यासाठी सर्वांनी एकमेकांशी सहकार्य हे केलेच पाहिजे, असे उद्‌गार काढले.

मौ. शौकत अलींच्या भाषणानंतर डॉ. आंबेडकर बोलावयास उठले. तेव्हा त्यांच्या जयघोषाच्या व स्वागतपर टाळयांच्या गजराचा सारखा वर्षाव होत होता. तसेच त्यांच्या गळयात सारखे पुष्पहार पडत होते. कित्येक वेळा पुष्पहारांमध्ये डॉक्टर आंबेडकर साहेब दडपून गेलेले दिसत होते. काही वेळाने हा गगनभेदी जयघोष एकदाचा थांबला व डॉ. आंबेडकरांनी बोलावयास सुरवात केली. प्रथमतः त्यांनी आपल्या स्वागताबद्दल सर्वांचे अंतःकरणपूर्वक आभार मानले आणि ते म्हणाले,

आज हा येथील जमाव एका दृष्टिने अद्‌भूत असा आहे. आजपर्यंत हिंदूंच्या व मुसलमानांच्या स्वागताच्या अशा सभा बहुधा निरनिराळया होत असत. आणि यामुळे निरनिराळया समाजातील एकप्रकारची भिन्नता दृष्टोत्पत्तीस येण्याचा संभव येत असे. आज येथे आपण एक प्रकारच्या हिंदी ह्या भावनेने जमलो आहोत. राऊंड टेबल परिषदेसंबंधी येथे काही बोलावयाचे नाही. तरी पण मुसलमान प्रतिनिधींनी मला राऊंड टेबल परिषदेमध्ये अगदी आपलेपणाच्या भावनेने मदत केलेली आहे. त्यांची मदत न मिळती तर मला कित्येक वेळा सगळया प्रतिनिधींशी झगडणे अशक्य झाले असते. राऊंड टेबल मधील इतर

हिंदू प्रतिनिधीमध्ये अस्पृश्यांबाबत खरे व स्पष्ट बोलावयाचे जे धैर्य नव्हते, ते मला मुसलमान प्रतिनिधींमध्ये दिसून आले. त्यांच्या सहकार्याविषयी मला केव्हाही आदरच बाळगला पाहिजे. हिंदुस्थानच्या ऐक्यासाठी आपण सर्वांनी संघटनेच्या बळावर आपल्या कार्याची रूपरेषा आखली पाहिजे.

हा स्वागताचा समारंभ होण्यापूर्वी चर्मकार समाजातील मि. पी. बाळू, राजभोज, काजरोळकर, पवार वगैरे मंडळी डॉ. आंबेडकरांना बोटीवर जाऊन भेटली. त्यांनी डॉ. आंबेडकरांना हारतुरे घालून त्यांचा सन्मान केला. मि. पी. बाळू त्यांचे स्वागत करताना म्हणाले की, डॉक्टर साहेब, आपण आपल्या अस्पृश्य समाजाचे खरे हितचिंतक पुढारी आहात. आपल्या राऊंड टेबल परिषदेमधील धडाडीच्या व अपूर्व कामगिरीबद्दल आम्हाला धन्यता वाटत आहे. डॉ. आंबेडकरांना ह्या स्वागताबद्दल एक प्रकारचा आनंद झाला. त्यांनी त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानले. याशिवाय शेठ शंकरराव परशा, रा. ब. सी. कें. बोले, शेठ मनियार वगैरे इतर समाजातील पुढाऱ्यांनीही डॉक्टरसाहेबांचे स्वागत केले. तसेच अस्पृश्य समाजातील डॉ. सोळंकी, एन. टी. जाधव, श्री. वनमाळी, श्री. संभाजी गायकवाड, गुडेकर, चांदोरकर, श्री. शिवराम जाधव, श्री. नेवरीकर, दिवाकर पगारे बंधु, जाधव, श्री. गणपतबुवा, श्री. वराळे, पुण्याचे सुभेदार घाडगे, नाशिकचे श्री. रणखांबे, गायकवाड, काळे, रोहम, बापूसाहेब दाणी, श्री. पतीतपावनदास वगैरे मंडळी हजर होती.

बॅलर्ड पियरच्या सकाळच्या स्वागत समारंभामध्ये समता सैनिक दलाने विशेष कामगिरी केली आहे. दलाचे सर्वाधिकारी श्री. वडवळकर व सेक्रेटरी आणि उपाध्यक्ष श्री. साळवे व लोटेकर यांनी या कामी सैनिक दलासह बरीच मेहनत घेतली होती. डॉ. आंबेडकरांनी मौ. शौकत अलींबरोबर मिरवणुकीने जाण्याचा कार्यक्रम जरी आयत्यावेळी ठरला होता तरी हा मिरवणुकीचा कार्यक्रम उत्तम प्रकारे पार पडला. उभय पुढाऱ्यांचे व मिरवणुकीचे फोटो घेण्यासाठी मोल स्टेशनवर फोटोग्राफर्सची बरीच गर्दी जमली होती. ही अस्पृश्य व मुसलमान समाजाची संयुक्त मिरवणूक बॅलार्ड पियरवरून, जी. पी. ओ. मार्गाने मार्केट, अब्दुल रहिमान स्ट्रीट, पायधुणी मार्गाने भायखळा रोड येथील खिलापत ऑफीसपर्यंत आली. खिलापत ऑफिसात डॉ. आंबेडकरांचे सन्मानाने स्वागत केल्यावर डॉ. आंबेडकर शौकत अलींचा निरोप घेऊन परळला निघाले. परळपर्यंत त्यांची मोटारीतून मिरवणूक काढण्यात आली. डॉ. आंबेडकर परळ येथील आपल्या ऑफिसात सुमारे १०.३० वाजता येऊन पोहचले.

परळ येथे अगोदरच इतर अस्पृश्य समाजातील मंडळी त्यांच्या स्वागतासाठी जमलेली होती. त्यांच्या स्वागताचा स्वीकार केल्यानंतर सायंकाळी सात वाजेपर्यंत त्यांनी निरनिराळ्या संस्थांच्या प्रतिनिधींच्या व पुढाऱ्यांच्या भेटी घेतल्या.

• • •

# ४७

# स्वाभिमानाचा व स्वातंत्र्याचा दीप कधीही विझता कामा नये

मुंबई व मुंबई इलाख्यातील ११४ संस्थांच्या वतीने ठरल्याप्रमाणे शुक्रवार दि. २९ जानेवारी १९३२ रोजी संध्याकाळी सात वाजता दामोदर हॉल, मुंबई येथे डॉ. पी. जी. सोळंकी यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना मानपत्र देण्याचा समारंभ साजरा करण्यात आला. प्रथमतः लहान मुलींनी त्यांच्या स्वागताची सुस्वर गाणी म्हटली. स्वागत समारंभाला हजारो स्त्रीपुरुषाचा समुदाय जमला होता. नंतर अध्यक्ष डॉ. सोळंकी यांच्या सूचनेवरून श्री. एन. टी. जाधव यांनी मानपत्र वाचून दाखविले. या मानपत्रावर मुंबई व मुंबई इलाख्यातील मिळून ११४ संस्थांच्या सह्या आहेत. ते मानपत्र* खालीलप्रमाणे आहे.

" Dr. B. R. Ambedkar,

M.A., Ph.D., D.Sc., Bar-at-Law., M.L.C.

Delegate, Indian, Round Table Conference.

Dear Sir,

We the undermentioned Institutions, feel this an occasion of honour and privilege to accord you, our accredited leader, a hearty welcome on behalf of the Depressed Classes of India on your to these shores offer an, arduous fight for the recognition of our legitimate rights and status at the second Round Table Conference, you have indeed proved to the hilt our claim, for equality of status and treatment, and but for the valiant fight you had put on our behalf, we are afraid, our claims would have been ignored. You have done what all is human possible in safeguarding our rights and we are sure, as a result of your endevours at London, to stand, in the near future on an equal footing with all other major communities in India.

Allow us to take this opportunity of putting on record that the choice of Government would not have fallen on a better head than yours to represent us at the Round Table Conference. Your work coupled with that of Rao Bahadur Shrinivasan, has been of immense value to our cause by many of your powerful speeches in London and elsewhere, you have proved to the world that Depressed Classes are a vast minority and that without, separate representation their interest would never be safe ;

---

जनता : ३० जानेवारी १९३२.

* सदरहू मानपत्रावर तारीख दर्शविली नाही. परंतु ११४ संस्थांकडून मानपत्र आणि राऊंड टेबल कान्फरन्सचा उल्लेख या बाबी लक्षात घेता ते वरील कार्यक्रमाप्रसंगी दिले असावे.

— संपादक

and the credit goes to you of having proved beyond doubt that many of the so-called Congress leaders, professing sympathy for us are ' slippery customers. ' It is now for you, Sir, to augment your work at the R.T.C. by continuing to espouse our cause in your own inimitable way in the Franchise Committee which to start work before long. It would be in the fitness of thing to urge upon you not to be content with any thing less than equality of status and treatment for your brothren, and we fully trust that you will do your, utmost for securing these objects in the Franchise Committee as well and in all other work connected with the building up of the constitution for this country.

Oppressed, tyranised and exploited as we are by one and all from ages long, we do feel that your advent on the horizon of public life was for us a day to be written in Golden ink. The new life and spirit which you enthused in us at Mahad, Nasik and other places to achieve our ordinary human rights have awoke us to our rights and claims and have made us give a burial to our inferiority complex. The sense of responsibility and the present out look of our community which is now out to assert its rights all over the country it will not be and exaggration to say, is but the fruit of your efforts and guidance, we know the tremendous sacrifice you are making for a community for whom there are but few friends.

It is needless for us to repeat that all our interests, political or otherwise, are safe in your hands and we look to you and to you alone, as our trusted leader, who would lead us and to political power in this country which alone, we are convinced would bring salvation to our oppressed community, we remain.

Your's truly

The Members of

(1) Social Equality Army (Bombay Presidency)
(2) Friends Union, Pelisle Road
(3) Somvanshiya, Abalvriddha Seva Mandal
(4) Bahishkrit Seva Mandal
(5) Maharashtra, Balveer Shikshan Prasarak Mandal
(6) Bahishkrit Hitchintak Seva M./Mandal
(7) South Indian Adidravid Mahajan Sabha
(8) Mahila Mandal Bombay
(9) Mahar Samaj Seva Sangh
(10) Satara District Yuvak Sangh
(11) Nagar District Bahishkrit Seva Sangh
(12) Yuvak Sangh Samajik Jalsa
(13) Tramway Company Workshop Depressed Classes Association.
(14) Navrang Cigarette Company D. Classes
(15) Bahishkrit Mahila Seva Mandal
(16) Bara Chawl Seva Sangh
(17) Ratnagiri District Social Equality League

(18) Gujrat D. C. Association
(19) Poona District Bhaishakrit Association
(20) Poona District Dalit Sangh
(21) Satara Disrict Social Equality Army
(22) Bahishkrit Depressed Classes CC. Society
(23) Bahishkrit Depressed Classes Navyuvak Sangh
(24) Pevalaty Co-operative Mandal
(25) Dhobitalao Somvanshiya Mandal
(26) Dhobitalao Somvanshiya Mahila Mandal
(27) " F " Ward Bahishkrit Seva Mandal Bombay
(28) Tata Mills Chawls, Mahar Punch
(29) Kokan Prantik Chamber Parishad
(30) Foras Road Cement Chawls Punch
(31) Mazagaon Khadda Punch
(32) Joona Dhor Chawl Punch
(33) Batatyachi Chawls Punch
(34) Foras Road D. C. Tenaments of Block Nos. 1-3
(35) Navi Dhar Chawl Punch
(36) Somvanshiya Nirashrit Shikshan Vardhak Samaj
(37) Solapur District Mahar Seva Sangh
(38) Satara District Vite Taluk Punch
(39) Bahishkrit Co-op. Society
(40) D. C. Tenant of B. D. D. Block No. 7
(41) Maharashtriaya Puratan Mahar Unnati Sangh
(42) Satara District D. C. Society
(43) Gulabvadi Punch Mandali
*(44) Bhandara Samaj Sangh
(45) Bhartiya Tarun Yuvak Sangh Bahishkrit
(46) Shree Somvanshiya Mandali
(47) Naigaon Chawl Nawa Saha Kumfor Punch
(48) Bahishkrit Hitvardhak Samaj
(49) Pimparee Sayyad Nasik Taluka Jalsa, Kampoo
(50) Rohidas Dnyandev Samaj
(51) Charmakar Maheela Mandal
(52) Charmakar Sudharak Mandal
(53) Youngmen's Mahar Association Vinchoor
(54) Naigaon Social Equality League
(55) Bahishkrit Bhajan Samaj Vadala
(56) Chandanvadi Maheela, Mandal
(57) Chandanvadi D. C. Association
(58) Solapur District Tal. Karmale Hitvardhak Samaj
(59) Satara District Balveer Sainik Dal
(60) Thana District D. C. Association
(61) Bandra Katwadi Varoode Mandal
(62) Nasik Yuvak Sangh
(63) Naigaon B. D. D. Block Tenants Association

*Bhandari - शब्द असावा– संपादक.

(64) B & C I. Railway D. C. League
(65) Nasik District Madhyavarti Mandal
(66) Bhartiya Samaj Seva Mandal
(67) Madhyavarti Samata Sainik Dal
(68) Revangaon D. C. League
(69) Atpadee D. C. Society
(70) Kulaba District D. C. Association
(71) Tramway Co-operative Society Chawal Tenants Association
(72) Social Equality League
(73) Jangira Bahishkrit Praja Chirol Mandal
(74) Dadar Mahila Mandal
(75) Navyuvak Mandal Ahmedabad
(76) Dharwar District D. C. League
(77) Belgaon District D. C. League
(78) Karwar District D. C. League
(79) Meghwal Sudharak Samaj
(80) Gujarath Dalit Sudharak Mandal
(81) Satara District Tarun Seva Mandal
(82) Rohidas Tarun Mandal Thana
(83) Somvanshiya Sanmargadarshale Sangh, Kalyan
(84) Thana District Charmakar Aikechhu Mandal, Manikpur
(85) Kamathipura 13 Lane Bhajan Samaj
(86) The Berar, Asprishya Samaj Sudharak Seva Mandal Berar
(87) The Supa Pargana, Kshatriya Yuvak Sangh
(88) Satara District Vandar Manar Sangh
(89) B. P. T. Bahishkrit Labourers Navyuvak
(90) Karnatak Machignar Society
(91) Karnatak D. C. Youth League
(92) D. C. Association Hubali
(93) Chitra Bazar, Bori Chawl D. C. League
(94) Rohe Taluka Mahar Sangh
(95) Kamathipura Stable Street Mahar Association
(96) Agripada Mcpl. Chawl D. C. Tenants Association
(97) Bandra Chani D. C. League Bhaogra
(98) Bandra Palee Bahishkrit Samaj
(99) Mahar Military Indian Officer Association
(100) Mahim Killa D. C. Association
(101) Reteecha Dhakka Punch Mandal
(102) B. I. T. Poibabadi Chawl D. C. League
(103) Panvel Pensioner Mahar Punch

(104) Crawn Cigartte Co's D. C. Labour Mandal

(105) Nana Chawk Mahar Sangh

(106) All India Untouchability League Poona

(107) Maharashtra Seva Sangh Poona

(108) Dakshin Maharashtra, Satya Prasarak Mandal Kolhapur

(109) Matang Dnyanodaya Samaj Bombay

(110) Asprishyonnati Mandal Nasik Road

(111) Temple Entry Satyagraha Mandal Nasik

(112) Bahishkrit Hitchintak Seva Sangh Nasik Road

(113) Shri Shahu Chhatrapati Boarding Nasik

(114) Asprishya Taroon Samata Samaj Chirabazar "[1]

मानपत्राला उत्तर देताना डॉ. आंबेडकर म्हणाले,

आज मला जे मानपत्र दिले आहे, त्यातील गौरवाला मी कितपत पात्र आहे, याबद्दल मला शंका वाटते. एखाद्या शेजाऱ्याला किंवा जवळच्या माणसाला त्याचे जितके दोष दिसतात तितके ते दूरच्या मंडळीस दिसणे अशक्य असते. मी राऊंड टेबल परिषदेमध्ये जी कामगिरी केली किंवा त्या कामगिरीचे यश माझ्या पदरी बाळगण्याचा प्रयत्न या मानपत्रात गौरवयुक्त शब्दांनी केलेला आहे. परंतु माझी मनोदेवता मला सांगते की, राऊंड टेबल परिषदेच्या कामगिरीच्या यशाचा मी धनी नव्हे. त्या यशाचे सर्वस्वी धनी इथे जमलेले माझे असंख्य बंधुभगिनीच आहेत. आपण सर्वांनी ही एक गोष्ट पूर्णपणे लक्षात ठेवली पाहिजे की, कोणत्याही समाजाचा किंवा पक्षाचा पुढारी कोणत्याही यशाचा सर्वस्वी धनी कधीच होऊ शकत नाही. नुसते पुढारीपण असून चालत नसते. तर ज्या कार्याकरिता आपण पुढे झालो आहोत ते आपले माणुसकीच्या हक्काचे पवित्र कार्य खडतर स्वार्थत्यागाने व शिस्तीच्या मार्गाने केले पाहिजे. राऊंड टेबल परिषदेच्या कार्यासाठी मी तुमच्या वतीने प्रतिनिधी नेमला गेलो खरा, परंतु तुम्हीच तुमच्या कार्याची कळकळ जाणून माझ्या प्रयत्नांना एकमताने व एकजुटीने पाठिंबा दिला नसता तर मला काहीच करता आले नसते. राऊंड टेबल परिषदेच्या निमित्ताने का होईना अखिल हिंदुस्थानातील अस्पृश्य वर्गात जागृतीचा वणवा पेटला गेला आहे आणि ही जागृतीची ज्योत उज्ज्वल स्वरूपात अशी ब्रिटिश लोकांना– तेथील राजकारणधुरंधर व्यक्तींना दिसली नसती, तर मला राऊंड टेबल परिषदेमध्ये काहीच करता आले नसते. तुमच्या अंतःकरणात स्वाभिमानाचा व स्वातंत्र्याचा जो दीप तेवत आहे तो अधिक उज्ज्वल करण्याचा प्रयत्न करावयास पाहिजे. तो पुन्हा कधीही विझला जाता कामा नये, याची तुम्ही प्रत्येकाने प्रथम खबरदारी घेतली पाहिजे.

---

[1] डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना समर्पित मानपत्र : संपादक शंकरराव हातोले. पृ. २९-३३.

सहा कोटी अस्पृश्य जनतेने आपणास राजकीय हक्क पाहिजेत याविषयी जी घोषणा केली आहे ती खरोखरच अलौकिक आहे. पुढाऱ्याच्या मागे असलेली जनता निर्भयतेने कंबर बांधील तर जगात कोणत्याही कार्याला यश मिळालेच पाहिजे. माझ्या सहा कोटी अस्पृश्य बंधुंनी हिंमत धरली तर हिंदुस्थानातील लोकांना स्वराज्य मिळवावयास कितीसा अवधी लागणार आहे ! तुमच्या अंतःकरणातील माणुसकीचा ओलावा सुकू देऊ नका. काही वर्षापूर्वी जी गोष्ट आपल्या पूर्वजांना अशक्य वाटत होती ती आज दहा वर्षात शक्य होऊ पाहात आहे. निदान गेल्या दोन वर्षात झालेली जागृती केव्हाही अपूर्व स्वरूपाचीच ठरेल. या माझ्या कार्यात काही दिवसापूर्वी माझ्या चांभार बंधुंचा माझ्यावर विश्वास नव्हता आणि ही गोष्ट माझ्या मनाला सारखी सलत होती. परंतु आज मी ज्या बोटीने हिंदुस्थानात आलो त्या बोटीवर तुम्हा इतर समाजातील पुढाऱ्यांप्रमाणे माझे स्वागत करण्यास अचानकपणे मि. पी. बाळू, श्री. राजभोज, काजरोळकर, पवार वगैरे चांभार समाजातील मंडळी आलेली पाहून माझे अंतःकरण आनंदातिशयाने भरून आले. माझ्या महार समाजातील मंडळींना पाहून मला जितका आनंद झाला त्याहीपेक्षा अधिक या मंडळींच्या प्रेमाच्या भेटीने झाला. मी मनुष्य आहे. मनुष्याच्या हातून चुका घडणे शक्य आहे. या गोष्टी अनुसरून माझ्या हातून आपले कार्य करीत असता पक्षपात झाला असेल आणि त्याचे कारण इतकेच की, आपला अस्पृश्य मानलेला समाज इतका पददलित आहे की त्यांच्या कार्याची व्यापकता फार आहे. अशा परिस्थीतीत मी एकट्याने सर्वांचे समाधान कसे करू शकणार ? आपले समाजकार्य खरे म्हटले म्हणजे आकाशाला गवसणी घालण्यासारखे आहे. असो, तरीपण त्यांच्या स्वागताने माझे कल्पनेबाहेर समाधान झालेले आहे. आपल्या सार्वजनिक कार्यात त्यांच्या राजकीय हक्काविषयी मी त्यांना पूर्णपणे हमी देऊ शकतो.

माझा जरी महार जातीत जन्म झाला असला तरी मी सर्वस्वी महार लोकांसाठीच प्रयत्न करीन असे कधीच होणार नाही. उलट माझ्या समाजाला काहीच मिळाले नाही तरी चालेल. परंतु इतरांसाठी मी वाटेल ते करू शकेन. मात्र त्यांचे मला माझ्या कार्यात जिवाभावाचे सहकार्य पाहिजे. आपल्या कार्यात आपल्या समाजातील निरनिराळया जातींची एकी झाल्यावर पुढील गोष्टी एकमेकांच्या संमतीने व गुण्या गोंविंदाने सोडविणे मला अशक्य असे वाटत नाही. म. गांधींच्या बोलण्याने ज्यांचे समाधान होत नाही त्यांचे माझ्या बोलण्याने काय समाधान होणार आहे ! तरीपण प्रयत्न हा केलाच पाहिजे. आपली एकी महारापासून तो भंगी समाजापर्यंत सर्व समाजात झालीच पाहिजे आणि या सर्व समाजांची उन्नती करणे हे माझे मी उच्च असे ध्येय समजतो आणि याबाबतीत सर्वांनी एकमेकांविषयी आपल्या अंतःकरणात पूर्ण विश्वास ठेवावयास पाहिजे.

माझ्या गैरहजेरीत येथे वर्तमानपत्रामध्ये माझ्याविषयी पुष्कळच गहजब करण्यात आला होता. मी राष्ट्रद्रोही ठरविण्याचा येथील राष्ट्रीय बाण्याच्या पत्रकारांनी शक्य तितका प्रयत्न केलेला असताही माझ्या बंधुभगिनींनी जो माझ्यावर निढळ विश्वास टाकून आपले कार्य उलट जोमाने पुढे करण्याचा आटोकाट प्रयत्न केला त्याबद्दल मला खरोखरच धन्यता वाटत आहे. मी म. गांधींना राऊंड टेबल परिषदेमध्ये विरोध केला म्हणून मी राष्ट्रद्रोही ठरलो असेन. परंतु या आरोपाची मला मुळीच भिती वाटत नाही. उलट माझ्या बांधवांच्या गुलामगिरीतून सुटका करण्याच्या उच्च वृत्तीच्या कार्यात, महात्मा म्हणविणाऱ्या व्यक्तीकडून प्राणाच्या पणाने विरोध व्हावा हीच गोष्ट जगाच्या दृष्टीने किती अन्याय्य वृत्तीची आहे ही विचारी माणसे आपोआपच ठरवू शकतील. माझी मनोदेवता मला सांगते की, मी चांगल्या रस्त्याने चाललो आहे. तोपर्यंत मला लोकांच्या स्वार्थी आरोपांची मुळीच पर्वा वाटत नाही. मी राष्ट्रद्रोही आहे, देशद्रोही आहे असे आज जे लोक म्हणत आहेत ते भविष्यकाळात याच्या उलट माझ्या कामगिरीविषयी बोलल्याशिवाय राहणार नाहीत. आजचे वादळी वातावरण पुढे काही दिवसांनी शांत झाल्यावर व राऊंड टेबल परिषदेमधील सर्व कार्याचा नीट शांतपणे विचार केल्यावर त्यांचे माझ्याबद्दलचे मत खात्रीने बदलेल. येथे राष्ट्रीय पत्रात येणाऱ्या बातम्यात व तेथील राऊंड टेबल परिषदेमधील कामकाजात किती तफावत होती हेही त्यांना कळून चुकेल आणि माझी खात्री आहे की, हिंदुंची पुढील पिढी ' मी राष्ट्राची चांगली कामगिरी केली ' असेच म्हणेल.

माझी व म. गांधींची विलायतेला जाण्यापूर्वी पहिलीच भेट व मुलाखत झाली होती व ती तुम्हा सर्वांना ठाऊक आहेच. राऊंड टेबल परिषदेच्या कार्यक्रमात म. गांधींची व माझी तीनदा चांगली चार चार, पाच पाच तास मुलाखत झालेली आहे. परंतु त्यांनी अगदी शेवटी मुसलमान व शीख समाजाशिवाय इतर कुठल्याही समाजाला स्वतंत्र मतदार संघ मी देऊ शकत नाही असे स्पष्टपणे उत्तर दिले. अल्पसंख्यांक कमिटीतील मुसलमान प्रतिनिधी व माझी ताटातूट व्हावी, मुसलमानांनी मला आपले सहाय्य देऊ नये याविषयीची भेदनीती म. गांधींनी कशी आरंभिली होती याचे प्रत्यक्ष कागदोपत्री अस्सल पुरावे माझ्याजवळ आहेत. यावरूनच म. गांधी हे महात्मा पदाला माझ्या दृष्टीने तरी कितपत पात्र आहेत याबद्दल शंका वाटते. म. गांधींच्या प्रयत्नांना मुसलमानांनी वाटाण्याच्या अक्षता दाखविताच ते चिडले व त्यांनी मार्केटमधून एक कुराण विकत घेतले आणि ते एच. एच. आगाखान ज्या हॉटेलमध्ये राहात होते तेथे गेले. त्यांनी त्यांच्यापुढे कुराण पुढे केले आणि ते म्हणाले की, कुराणात हिंदू-हिंदूत दुही

माजवावी असे कुठे काही लिहिले आहे का दाखवा. यावेळी मि. आगाखान इतकेच म्हणाले की, अस्पृश्य समाज हा आमच्या समाजाहून अगदी पददलित आहे. आम्ही ज्याअर्थी, आमच्या संरक्षणाच्या हक्कासाठी भांडत आहोत त्याअर्थी, त्यांच्या संरक्षणाच्या न्याय्य हक्काच्या मागणीला आम्ही विरोध तरी कसा करावा ? या उत्तराने म. गांधीजी मागल्या पाऊली आपल्या निवासस्थानी परतले.

आपण माझी म. गांधींप्रमाणे निष्कारण स्तुती करून आपण मला देवपदाला चढवू नका. देवपदाला चढवून इतरांनी आंधळेपणाने असल्या देवपदाला चढलेल्या देवमाणसाच्या मागे लागलेले निदान मला तरी स्वतःच्या कमकुवतपणाचे लक्षण दिसते. तुम्ही तुमची संघटना करा व शिस्तीच्या, हिमतीच्या मार्गाने आपली सर्वांगीण उन्नती करून घ्या.

डॉ. आंबेडकर यांचे भाषण होताच त्यांनी नाशिक मंदिर प्रवेश सत्याग्रहींच्या लढ्यात शिक्षा भोगून सुटून आलेल्या सत्याग्रही वीरांचा त्यांच्या गळयात पुष्पहार घालून सन्मान केला. तसेच सातारा जिल्ह्यातील अस्पृश्य समाजातील चित्रकलेचे विद्यार्थी श्री. सावंत यांना जे. जे. आर्ट स्कूलच्या चित्रकलेच्या प्रदर्शनात चित्रकलेमध्ये उत्तम प्रकारचे सर्टिफिकेट व भावनगरच्या महाराजांनी ठेवलेले २०० रुपयांचे बक्षिस मिळाल्याबद्दल जाहीर अभिनंदन करण्यात आले. त्याला याप्रसंगी नगर जिल्ह्यातर्फे एक सुवर्ण पदक व पुष्पहार अर्पण करण्यात आला.

रात्रौ मध्यरात्रीपर्यंत डॉ. आंबेडकर व इतर प्रांतीय पुढाऱ्यांचा विचारविनिमय झाला.



## ४८

# स्वावलंबनासाठी वर्तमानपत्राची गरज

दुसऱ्या राऊंड टेबल परिषदेने ठरविल्याप्रमाणे ब्रिटिश पार्लमेंटने निवडलेल्या मतदान चौकशी कमिटीच्या कामकाजास या महिन्याच्या पहिल्या आठवड्यात दिल्ली येथे लॉर्ड लोथियन यांच्या अध्यक्षतेखाली सुरवात झाली. प्रथम दिल्ली येथे मतदान कमिटीच्या कामाची सर्वसाधारणरित्या एक ठराविक रुपरेषा आखण्यात आली व त्या रुपरेषेच्या आधारे हिंदुस्थानातील प्रत्येक प्रांतात व त्या त्या प्रांतातील खेडोपाडी सुद्धा जाऊन चौकशी व साक्षी घेण्याचे ठरले. त्या मतदान कमिटीत अस्पृश्य वर्ग व इतर मागासलेल्या समाजाच्या वतीने डॉ. बी. आर. आंबेडकर यांची योजना झालेली आहे. बहुजन अशा पददलित आणि मागासलेल्या समाजाच्या समानतेच्या हक्कासाठी या कमिटीच्या वतीने डॉ. आंबेडकर यांनी काम करण्याचे आपले धोरण स्वीकारले आहे. दिल्लीहून मतदान कमिटीचा दौरा लखनौ येथे झाला. येथील शहरातील सर्व परिस्थिती स्थानिक मतदान कमिटीच्या सहकार्याने आजमावल्यावर आजुबाजूच्या काही खेड्यापाड्यातून कमिटीचे सभासद चौकशीकरिता गेले.

मतदान कमिटीच्या दौऱ्यावर असताना लखनौ येथे तेथील पददलित व मागासलेल्या समाजातर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा जाहीर सन्मान करण्यात आला. या सन्मान समारंभी भाषण करताना डॉक्टरसाहेब म्हणाले,

अखिल बहिष्कृत समाजाच्या सर्वांगीण उन्नतीसाठी बहिष्कृत समाज सेवा संघाचे एखादे मध्यवर्ती मंडळ निर्माण करावयास पाहिजे आणि शिवाय आपल्या स्वावलंबनाच्या चळवळीचा विस्तृत व सर्व ठिकाणी प्रसार होण्याकरिता निदान प्रत्येक प्रांतात आपले एक तरी वर्तमानपत्र पाहिजे आणि माझी माझ्या सर्व बंधुभगिनींना इतकीच अत्यंत आग्रहाची विनंती आहे की, आपल्या समाजातील प्रत्येक व्यक्तीने आपले राजकीय हक्क मिळविण्यासाठी शक्य तितके जोमाचे प्रयत्न केले पाहिजे. नाही तर भावी राज्यात आपली फारच शोचनीय अवस्था होईल ही गोष्ट नीट लक्षात ठेवा.



---

जनता : १३ फेब्रुवारी, १९३२.

भाषणाची तारीख दर्शविलेली नाही– संपादक.

# ४९

# भेदनीतीचा प्रयोग मी माझ्यावर होऊ दिला नाही

मुंबईच्या अस्पृश्य जनतेला मद्रासच्या अस्पृश्य जनतेने डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे तारीख २८ फेब्रुवारी १९३२ च्या जाहीर सभेत जे अपूर्व व अतूल उत्साहाने स्वागत केले त्याबद्दल कदाचित नवल वाटणार नाही. कारण डॉ. आंबेडकरांविषयी आपला विश्वास मुंबईच्या अस्पृश्य जनतेने अनेकवार व्यक्त केला आहे. असे असले तरी परवा मद्रास येथे डॉ. आंबेडकरांचे जे प्रचंड स्वागत झाले तसले स्वागतप्रसंग मद्रास सारख्या शहरातही क्वचितच पाहावयास मिळतात. या दिवशीच्या सभेत अस्पृश्य समाजाचेच कमीत कमी दहा हजारावर लोक जमले होते. हजारो लोकांना जागा न मिळाल्यामुळे परत जावे लागले. अस्पृश्य समाजातील लोकांशिवाय ब्राह्मणेतर स्पृश्य हिंदूंचा व ख्रिश्चन मुसलमानादिकांचाही समुदाय फार जमला होता.

शहरातील अस्पृश्य समाजापैकी सर्व जातींचे प्रमुख व कायदेकौन्सिलातील सर्व अस्पृश्य प्रतिनिधी तर हजर होतेच पण ' जस्टिस ' व मुसलमान पक्षातील प्रमुख पुढारीही स्वागतार्थ आले होते.

' डिप्रेस्ड क्लासेस सर्व्हिस आर्मि ' (दलित समाज सेवा सैन्य) संस्थेचे अध्यक्ष श्रीयुत सुंदरराव नायडू यांनी अध्यक्षस्थान भूषविले होते.

' पददलित जनतेचा निर्भय व खरा प्रतिनिधी ' या यथार्थ शब्दांनी डॉ. आंबेडकरसाहेबांची जमलेल्या जनतेला अध्यक्षांनी ओळख करून दिली व डॉ. आंबेडकरांनी अस्पृश्य जनतेच्या एकंदर मनोरचनेत केवढी अपूर्व व विलक्षण क्रांती घडवून आणली आहे व त्यांच्यातील माणुसकीला व आत्मसन्मानाला कसे जागविले आहे याचे थोडक्यात व मुद्देसूद वर्णन केले.

अध्यक्षांच्या या प्रास्ताविक भाषणानंतर दलित समाज सेवा सैन्य, मद्रास प्रांतिक डिप्रेस्ड क्लासेस फेडरेशन, दी प्रेसिडेन्सी आदि द्रवीड महाजन सभा, आदि आंध्र महासभा, अरूंधत्येय महासभा, केरळ डिप्रेस्ड क्लासेस असोसिएशन, लेबर युनियन व आणखी अनेक संस्थांमार्फत डॉ. आंबेडकरांना मानपत्रे व हारतुरे अर्पण करण्याचा समारंभ झाला.

या वरील सर्व संस्थांचे व जमलेल्या जनसमूहाचे आभार मानण्याकरता डॉ. आंबेडकर जेव्हा उभे राहिले तेव्हा स्वागतादर्शक टाळयांचा प्रचंड

---

जनता : ५ मार्च १९३२.

कडकडाट झाला. ते आपल्या भाषणात म्हणाले,

मद्रासच्या अस्पृश्य जनतेने व इतर मंडळींनी व्यक्त केलेल्या आपलेपणाबद्दल मी सर्वांचे आभार मानतो. आतापर्यंत अस्पृश्य समाजात आपल्या राजकीय हक्काबाबत एकवाक्यता होती व तिचा विलक्षण प्रभाव इतर समाजावर पडू शकला. रावबहादूर एम. सी. राजांनी एकाएकी व तसे काही कारण नसता या एकतेचा भंग केल्यामुळे आपला आधीच बिकट असलेला मार्ग अवघड झाला आहे. डॉ. मुंजेंच्या भेदनीतीला रावबहादूर राजा हे फार लवकर व अकल्पितपणे बळी पडले. रावबहादूर राजांनी जर थोडासा अधिक दम धरला असता व त्यांनी आधी जाहीर केल्याप्रमाणे नागपूरला सभा भरवून अस्पृश्य जनतेचे लोकमत अजमावून जर डॉ. मुंजेंबरोबर करारनामा केला असता तर आपल्या समाजाकरता रा. ब. राजांना अधिक सवलती व अधिक लाभ संपादन करता आला असता. आज त्यांनी पांढरपेशा वर्गातील काही पुढाऱ्यांच्या व्यक्तिगत व शाब्दिक शाबासकीपेक्षा अधिक काही मिळविले नाही. डॉ. मुंजेंबरोबर माझीही वाटाघाटी अनेक वेळा झालेली आहे. त्यांच्याशी मी जरी ' पॅक्ट ' केलेला नाही तरी त्यांचा माझा काही खाजगी वैरभाव नाही. पण मी जाणतो आणि डॉ. मुंजेही ओळखून आहेत की ते अस्पृश्यतेपुढे लाचार आहेत. भेद पाडणे ही सोपी गोष्ट त्यांना करता आली. कारण ती त्यांच्या हातची होती. पण स्पृश्य जनतेच्या मनोवृत्तीत बदल करणे त्यांच्या आटोक्याबाहेरचे आहे. हे मी जाणले व म्हणून त्यांच्या व्यक्तिगत भेदनीतीचा प्रयोग मी माझ्यावर होऊ दिला नाही. पण रावबहादूर राजांवर त्यांना सहज छाप टाकता आली. इतक्या सुलभपणे रावबहादूर राजांनी त्यांच्या आहारी जावयाला नको होते.

मी व्यक्तिशः संयुक्त मतदार संघ, सार्वत्रिक मतदानाचा हक्क व अस्पृश्यांकरता राखीव जागा असाव्यात या मताचा पुरस्कार आधीच केला होता. पण माझे हे मत दिसायला जरी ' राष्ट्रीय ' व व्यापक असले तरी अस्पृश्य जनतेला यापासून बिलकूल फायदा होणार नाही असे आपल्याच अनेक संस्थांनी मला बजावून सांगितले. मी नागपूरला संयुक्त मतदार संघाचा पुरस्कार करताच माझ्यावर रावबहादूर राजांनी केवढा गहजब उडविला होता हे आपल्यापैकी पुष्कळांच्या आजही चांगले ध्यानात असेल. अगदी परवापर्यंत स्वतंत्र मतदार संघाचा मी पुरस्कार करावा असा ससेमिरा माझ्यामागे रावबहादूर राजांचा व इतर प्रमुख पुढाऱ्यांचा एकसारखा लागलेला होता. अशा परिस्थितीत मी माझी व्यक्तिगत आवड निवड बाजूला ठेवून अस्पृश्यांना जे पाहिजे त्याचा पुरस्कार केला यात वाईट काय केले ? शिवाय राऊंड टेबल परिषदेमध्ये कोणत्या परिस्थितीत आम्ही सापडलो होतो व तेथे अल्पसंख्यांकांचा जो एक करार झाला त्याला अस्पृश्यांच्या

वतीने पाठिंबा देणे हे कसे युक्त व आवश्यक होते ही गोष्टही रावबहादूर राजांना अगदी पुरेपूर माहीत आहे, व या कराराबद्दलची आपली संमती व संतोष व्यक्त करून मला परवापर्यंत त्यांनी याही बाबतीत पूर्ण पाठिंबा दिला होता. पण तेच आता या करारनाम्यालाही नावे ठेवीत आहेत. यात आता अपराध कोणाचा याचा निर्णय आपण जनतेनेच दिला पाहिजे व पुढाऱ्यांनी तो मानला पाहिजे.

अस्पृश्य समाज संघटित होईल व राजसत्तेची सूत्रे हाती धरील तेव्हाच त्यांची अस्पृश्यता नष्ट होईल. होता होईल तो आपल्या रक्तामासाच्या व आपल्या सुख-दुःखांची स्वानुभवाने जाणीव असणाऱ्या व्यक्तीवरच विश्वास ठेवा. इतरांच्या अघळपघळ आश्वासनांना व सुंदर सुंदर तत्त्वांना भुलून जाऊ नका. राजसत्ता हाती येण्यासाठी एकजुटीने, स्वावलंबनपूर्वक व स्वतःवर व स्वतःच्या संघ शक्तीवर विश्वास ठेवून तुम्ही जर कार्य कराल तर आज जे तुम्हाला तुच्छ लेखतात व वाटेल तसे झुलवितात ते तुमच्या पायावर उद्या लोटांगण घालू लागतील व तुमची सदिच्छा व मैत्री संपादण्याकरता तुम्ही इच्छाल ते न मागता देतील.

स्वामी सहजानंद यांनी अध्यक्षांचे व पाहुण्यांचे आभार मानल्यानंतर रात्री आठ वाजता सभेचा कार्यक्रम संपला.



## ५०

# कोणाच्याही शिकवणुकीने आपसात बेकी होऊ देऊ नये

भारतीय राऊंड टेबल परिषदेच्या मतदान कमिटीची स्पेशल गाडी रविवार ता. ६ मार्च १९३२ रोजी सोलापूरास पाच वाजता आली. याच गाडीने डॉ. बाबासाहेब आंबेडकर येणार असल्यामुळे शहरवासी सर्व बहिष्कृत लोक मिरवणुकीच्या धर्तीने दोन वाजल्यापासूनच स्टेशनवर जमले होते. लोकांच्या गर्दीमुळे रेल्वे अधिकाऱ्यांनी अस्पृश्यांपैकी ५० निवडक माणसे व काही स्पृश्य मंडळीना प्लॅटफार्मवर जाण्याची परवानगी दिली होती. त्याप्रमाणे मे. पापासाहेब, बेंच मॅजिस्ट्रेट, धर्माजी खरटमल म्यु. कौन्सिलर, मोहनदास बाबरे म्यु. कौन्सिलर, रा. जिनाप्पा मेदाळे, तोरणे मास्तर, रा. ब. डॉ. मुळे, डॉ. वैशमपायन एम. एल. सी. व श्री. प्रधान वकील एम. ए., एलएल. बी. वगैरे स्पृश्य व अस्पृश्य मंडळीनी डॉ. आंबेडकरांना प्लॅटफार्मवर भेट दिली. हारतुरे घालण्यात आल्यावर स्टेशनबाहेर जमलेल्या असंख्य जनसमूहाच्या आग्रहास्तव ते बाहेर आले. त्यांच्या जयजयकाराने तेथील वातावरण काही वेळ दुमदुमून गेले होते.

मे. पापासाहेब बेलपवार यांनी डॉ. आंबेडकर यांच्या विलायतेमधील व हिंदुस्थानातील कामगिरीचा गौरवाने उल्लेख केला आणि डॉ. आंबेडकरांच्या प्रयत्नाशिवाय खरा अस्पृश्योद्धार होणारच नाही असे सांगितले. रा. ब. डॉ. मुळे यांचेही गौरवपर भाषण झाले. त्यानंतर डॉ. आंबेडकर उत्तरादाखल म्हणाले,

सोलापूरच्या महार, मांग, ढोर, चांभार, भंगी वगैरे मंडळींनी आपापसात एकी केली पाहिजे आणि कोणाच्याही शिकवणीने आपसात बेंकी होऊ देऊ नये. आपल्यातल्या बेकीचा फायदा वरिष्ठ म्हणविणारे लोक घेतात हे विसरु नका. वेळेच्या अभावी डॉ. आंबेडकरांना जमलेल्या मंडळीचा थोडक्यात निरोप घेणे भाग पडले.



---

जनता : १२ मार्च १९३२.

५१

# अस्पृश्य समाजाच्या हाती राजकीय सूत्रे हवीतच

कामठी येथे आयोजित अखिल भारतीय दलित वर्ग काँग्रेस परिषदेचे महत्त्व दर्शविणारे पत्रक स्वागताध्यक्ष, हरदास एल. एन. यांनी काढले होते. ते येणेप्रमाणे––

As you are aware, the second session of the All-India Depressed Classes Congress will be held on the 24th and 25th of April next at Kamptee.

The importance of this session is immense. The session will concern itself with the two following issues.—

1. The Minorities pact presented to the Round Table Conference and to which the representatives of Depressed Classes were a party.

2. The foundation of a new Central Organization to work and speak in the name of the Depressed Classes of India.

The Minorities pact embodies the political rights of the depressed classes under the new constitution. It was not accepted by the representative of the Majority community at the Round Table Conference. The depressed classes however had given the Minorities pact their full support. Of late however certain Associations presuming to speak on the name of the depressed classes of India have been won-over by the Hindu Maha Sabha and have therefore repudiated the Minorities pact. It is therefore absolutely essential that the representatives of the depressed classes should meet and apply their best mind to the provision contained in the Minorities pact and give their considered opinion on the same. The delegates who represented the depressed classes at the Round Table Conference, Dr. B. R. Ambedkar and Rao Bahadur R. Srinivasan will attend the session and explain the circumstances and the provisions regarding the Minorities pact.

---

जनता : ९ एप्रिल आणि १४ मे १९३२.

It is also proposed to invite Rao Bahadur M. C. Rajaha and Mr. G. A. Gavai to attend the session so that they may also have an opportunity of being heard before any resolution regarding the Minorities pact, is passed.

The second purpose for which this session is called, is equally important. There is no necessity to dilate upon it, for as you know what attempts are being made to misrepresent the public opinion of the depressed classes in matters political. It is not possible to put a stop to these machination unless a Central Organization is brought into being and made principal organ of the depressed classes.

The necessity of holding this session has been emphasized by the tactics adopted by the so-called All-India Depressed Classes Association. It was published in the newspapers that a meeting of the working committee of this Association was held at Delhi on the 21st and 22nd of February last to consider the question of Joint or Seperate electorates and the number of seats proposed for the depressed classes under the new constitution and as no decision was arrived at, it was agreed by the Working Committee of this Association that the conference of the leading members of the depressed classes should be held at Nagpur to consider the question. It was hoped that a Leaders Conference would be called before any definite step was taken, but for reasons known to themselves, the All-India Depressed Classes Association has abandoned the idea of calling such a conference. Under these circumstances it has been mere necessity to mobilize the public opinion of the depressed classes so that not only such tactics may be defeated before they do the mischief they are intended to cause and secondly to allow public opinions of their own on these vital issues.

I therefore hope that in view of the importance of this session, you will make it convenient to attend the same.

Yours faithfully,
**Hardas L. N.**
President, Reception Committee.

त्यानुसार कामठी येथे दिनांक ७ आणि ८ मे १९३२* ला अखिल भारतीय दलित कॉंग्रेसच्या अधिवेशनाचे आयोजन करण्यात आले होते. त्याकरिता लोकांचा उत्साह अतिशयच दांडगा होता. डॉ. आंबेडकर हे शुक्रवार ता. ६ मे १९३२ रोजी मुंबई येथून नागपूर मेलने निघणार हे नागपूरला आगाऊच जाहीर झाले होते. त्याचप्रमाणे कॉंग्रेसचे अध्यक्ष रावसाहेब मुनुस्वामी पिल्ले व मद्रासकडील प्रतिनिधी हेही शनिवारी सकाळी येण्याचे जाहीर झाले होते. त्याप्रमाणे शुक्रवारी ५-४५ च्या नागपूर मेलने डॉ. आंबेडकर व मुंबईतील इतर प्रतिनिधी निघाले. त्यांना बोरीबंदरवर निरोप देण्यात आला होता. नागपूर मेल झपाझप आपला मार्ग आक्रमित मोठमोठ्या स्टेशनवर थांबत असे. बोरीबंदर सोडल्यापासून मेल कल्याण येथे थांबते. कल्याणच्या प्लॅटफार्मवर गाडी येताच ' डॉ. आंबेडकर की जय ' म्हणून जयनाद उमटताच स्टेशनभर चोहोकडे खळबळ व गडबड सुरू झाली. लोकांनी डॉ. आंबेडकरांना हारतुरे अर्पण केले व त्यांच्या कार्यास यश चिंतिले. अगदी हा व असलाच प्रकार कसारा, इगतपुरी, देवळाली, नाशिक, मनमाड, चाळीसगाव, मुर्तिजापूर, अकोला, बडनेरा, धामणगाव वगैरे स्टेशनवर झाला. ह्याच गाडीला आसामचे गव्हर्नर असल्यामुळे बऱ्याच ठिकाणी लोकांना प्लॅटफार्मवर सोडण्यात आले नाही. तरीपण लोकांनी दर एक स्टेशनचे वातावरण डॉ. आंबेडकरांच्या जयजयकारानी अगदी निनादून सोडले. दिनांक ७ मे १९३२ रोजी नागपूर मेल बरोबर ९ वाजता नागपूर स्टेशनवर पोहचताच, ' डॉ. आंबेडकर की जय ' ' बाबासाहेब आंबेडकर की जय ' च्या गगनभेदी गर्जना चोहोकडे घुमू लागल्या. जवळ जवळ ५,००० लोक प्लॅटफार्मवर डॉ. साहेबांच्या स्वागतास आतुरतेने वाट पाहात बसले होते. डॉ. आंबेडकर डब्यातून उतरताच व श्री. तुळशीराम साखरे, एम.एल.सी. ह्यांनी त्यांचे स्वागत करताच नागपूर येथील समता सैनिक दलाच्या बँडचे सुस्वर नाद वातावरणात विलीन होऊ लागले. लोकांच्या गर्दीपुढे, सिटी मॅजिस्ट्रेट, पोलीस सुपरिन्टेंडेंट व इतर पोलीस ऑफिसर्सना बंदोबस्त करता करता नाकीनऊ आले. स्टेशनबाहेर पडताच समता सैनिक दलाच्या १,००० व्हालंटियर्सनी पाहुणे मंडळीस ' गार्ड ऑफ ऑनर ' दिला. स्टेशन कंपौंडमध्ये लोकांचा नुसता तोबा उडून गेला होता. दहा ते पंधरा हजारांचा प्रचंड लोकसमुदाय बाहेर ' डॉ. आंबेडकर की जय ' म्हणून सारख्या घोषणा देत होता. आज नागपूर येथील सर्व गिरण्या, कामगार लोक डॉ. आंबेडकरांच्या स्वागतास आल्यामुळे बंद होत्या. एका गिरणीत हिंदू व काही मुसलमान कामगार फक्त गेले होते.

* परिषदेची तारीख बदलविणारे पत्रक मिळाले नाही.– संपादक

ह्या कंपौंडमध्ये लोकांना डॉ. साहेबांचे दर्शन व्हावे म्हणून लहानसे आसन तयार करण्यात आले होते. गार्ड ऑफ ऑनरची सलामी होताच डॉ. आंबेडकर लोकांच्या जयजयकारात येथे येऊन बसताच अगोदरच आलेले कॉंग्रेसचे अध्यक्ष व रावबहादूर श्रीनिवासन तेथे येऊन बसले. लोकांकडून ह्या तिन्ही पाहुण्यांचा हारतुऱ्यांनी सन्मान झाला. अध्यक्ष व डॉ. आंबेडकर ह्यांची मिरवणूक काढण्यात येणार असल्याचे सांगताच लोकात आणखीच उत्साह वाढला. नानाप्रकारच्या फुलांनी श्रृंगारिलेल्या मोटरमध्ये डॉ. आंबेडकर, मुनुस्वामी पिल्ले व रा. ब. श्रीनिवासन ह्यांना बसविण्यात आले होते. इतर पाहुण्यांकरिता आणखी मोटारी देखील मिरवणुकीत होत्या. बरोबर ९.४५ ला मिरवणूक सुरू झाली. १०,०००-१५,००० चा प्रचंड जनसमुदाय ' डॉ. आंबेडकर की जय ' करीत बरोबर चालत होता. वरून ऊन्ह जरी जोराने तापत होते तरी लोक त्याला दाद देत नव्हते. इंदोरा, गड्डीगुदामला मिरवणूक येताच जवळ जवळ ५०० स्त्रिया डॉ. आंबेडकरांना पुष्पहार घालण्याकरिता सामोऱ्या आल्या. काही वेळ मिरवणूक थांबविण्यात आली. डॉक्टरसाहेबांनी त्यांचा प्रेमाने निरोप घेतल्यावर मिरवणूक पुढे गेली. मांडवापर्यंत मिरवणूक येताच श्री. साखरे यांनी कॉंग्रेसचे अधिवेशन संध्याकाळी ५ वाजता सुरू होईल म्हणून सांगितले व लोकांना आपले जेवणखाण आटोपण्यास विनंती केली. स्टेशनवरून निघालेली मिरवणूक इंदोऱ्यापर्यंत आली व तेथे ती लोकांना उन्हाचा त्रास होऊ नये म्हणून संपविण्यात आली. पाहुण्यांच्या मोटारी मग तशाच कामठी येथे जाण्यास निघाल्या. नागपूरपासून कामठी गाव अवघे १० मैल आहे. येथे गावच्या वेशीजवळ येताच पुन्हा कामठी येथील लोकांतर्फे स्वागत होऊन कॉंग्रेसच्या मांडवापर्यंत मिरवणूक काढण्यात आली. ह्याही मिरवणुकीत सहा सात हजार स्त्रीपुरूष मंडळी होती. समोर बँड वाजत होता ; व डॉ. आंबेडकरांचा जयघोष चालू होता.

पंजाब, संयुक्त प्रांत, बंगाल, बिहार, ओरिसा, मुंबई वगैरे ठिकाणचे प्रतिनिधी शुक्रवारीच कामठीस येऊन पोहचले होते.

कॉंग्रेसचा मांडव फारच मोठा असून त्यात १५,००० पर्यंत लोकसमुदाय बसण्याची व्यवस्था करण्यात आली असून तो लतापताकांनी सुशोभित केला होता. अध्यक्ष व इतर पुढाऱ्यांकरिता चांगला सुंदरसा प्लॅटफार्म तयार करण्यात आला असून त्यावर कोचेस, खुर्च्या वगैरे ठेवण्यात आलेल्या होत्या. आलेल्या प्रतिनिधींकरीता प्रशस्त बंगले भाड्याने घेण्यात आले होते. कॉंग्रेसच्या मांडवात जाण्याकरिता एक मुख्य व इतर तीन दरवाजे ठेवण्यात आलेले होते. जवळच

प्रतिनिधीचे टिकीट घेण्याचे ऑफिस उघडण्यात आले असून बाजूलाच पण जरा दूर दुकानदारांची सोय करण्यात आलेली होती. अध्यक्षास थोडासा उशीर झाल्यामुळे बरोबर ६ वाजता काँग्रेसच्या बैठकीस सुरवात झाली. प्लॅटफार्मवर दर एक प्रांतातील प्रमुख पुढाऱ्यांची बसण्याची सोय केलेली होती. ह्या प्रमुख लोकात बंगालचे श्रीयुत मलिक, दुसीया, विश्वास, यु. पी. चे स्वामी अच्छुतानंद, रामसहाय, बलदेव प्रसाद, जयस्वाल, शामलाल, बक्तावरलाल, पंजाबचे मि. हंसराज, हरीराम, जालंदरचे गुरूहंतासिंग, बिहारचे श्री. श्रीधर रासमल, पुण्याचे सुभेदार घाडगे, नाशिकचे पतितपावनदास, मद्रासचे श्री. कॅनन व रा. ब. श्रीनिवासन, मुंबईचे डॉ. आंबेडकर, शिवतरकर, खोलवडीकर, वनमाळी वगैरे पुढारी लोक प्रामुख्याने दिसत होते. बरोबर ६ वाजता स्वागत कमिटीचे अध्यक्ष श्री. हरदास हे भाषण करावयास उभे राहिले. स्वागताध्यक्षांचे भाषण होऊन अध्यक्षांचे भाषण झाले. नंतर ठिकठिकाणाहून आलेल्या ५०-६० तारा व तेवढीच पत्रे स्वागत कमिटीचे सेक्रेटरी ह्यांनी वाचून दाखविली त्यात फक्त एक तार खेरीज करून बाकी सर्व तारा स्वतंत्र मतदार संघाला पाठिंबा देणाऱ्या, राजा-मुंजे कराराचा निषेध करणाऱ्या व रावबहादूर श्रीनिवासन व डॉ. आंबेडकर यांच्यावर विश्वास व्यक्त करणाऱ्या होत्या. या सर्व पत्रव्यवहाराचा व तारांचा या ठिकाणी तरजुमा देणे किंवा उल्लेख करणे स्थलाभावामुळे अशक्य आहे. तथापि काहींचा उल्लेख करणे अवश्य आहे. त्यापैकी मुंबई इलाख्यातील मुक्काम मदग, जिल्हा धारवाड येथून रा. निलाप्पा एलाप्पा बेलोडी, म्युनिसीपल स्कूल मेंबर व बसाप्पा नागप्पा घोडके, जनरल मर्चंट यांनी स्वागताध्यक्ष यांना खालील पत्रक लिहिले होते.

''सप्रेम नमस्कार, वि. वि. आपल्या काँग्रेस बद्दलची नोटीस जनता पत्रातून पाहिली. काही अडचणीमुळे आम्हास सभेस हजर राहाता येत नाही. आमच्याकडील सर्व अस्पृश्य लोकांचा डॉ. आंबेडकरांच्या स्वतंत्र मतदार संघाच्या मागणीला पूर्ण पाठिंबा असून तेच आमच्या अस्पृश्य समाजाचे खरे पुढारी आहेत. डॉ. मुंजे व रा. ब. राजा यांच्या पॅक्टला आमच्या कर्नाटकी जनतेचा पाठिंबा नाही. रावबहादूर राजा व गवई यांनी आयत्यावेळी स्वतंत्र मतदार संघाला विरोध करून जो अवसानघातकीपणा केला याच्याबद्दल इकडील सर्व जनतेला त्यांचा निषेध करणे भाग पडले आहे. आमचे हे पत्र सभेत वाचून दाखविण्याची मेहेरबानी करावी.''

मुंबईहून रोहिदास ज्ञानोदय समाज या संस्थेने रा. वनमाळी यास आपले प्रतिनिधी म्हणून पाठविले होते व त्यांच्याबरोबर जो संदेश पाठविला होता, त्यात स्वतंत्र मतदार संघच अस्पृश्यांना पाहिजे असे म्हटले आहे.

रा. वनमाळी व रा. निलप्पा एलाप्पा बेलोडी हे जातीने चांभार आहेत व रा. बसाप्पा नागाप्पा घोडके हे जातीने ढोर आहेत. ही गोष्ट ध्यानात ठेवली म्हणजे काँग्रेसच्या लोकांकडून जी फुटाळकीवजा विधाने केली जातात की, डॉ. आंबेडकरांच्यावर फक्त महार जातीचाच विश्वास आहे तसेच स्वतंत्र मतदार संघ फक्त महार लोकांनाच पाहिजे व चांभार, ढोर स्वतंत्र मतदार संघाचे विरोधी आहेत ते किती फोलकट आहेत हे सहज दिसून येण्यासारखे आहे. उल्लेख करण्यासारखे दुसरे पत्र म्हणजे, आसाम प्रांतातील अस्पृश्यांचे पुढारी बाबू सोनाधरदास सेनापती यांनी रा. ब. एम. सी. राजा यांना डॉ. आंबेडकरांच्या मार्फत पाठविलेले होय.

परिषदेला कलकत्त्याहून अखिल भारतीय बौद्ध महासभा या संस्थेचे जनरल सेक्रेटरी यांचेही एक पत्र आले होते. त्यात परिषदेचे अभिष्ट चिंतून सर्व अस्पृश्य वर्गांनी बुद्ध धर्माची दीक्षा घ्यावी असे सूचित केले होते.

नंतर विषय नियामक कमिटीची निवड करण्याचा प्रश्न विचारात घेण्यात आला. रात्री बरोबर ११ वाजता विषय नियामक कमिटीच्या बैठकीस सुरूवात होऊन कमिटीचे काम रात्री ३ वाजता संपले. विषय नियामक कमिटीत ज्या ज्या लोकांचे जे काही प्रश्न होते त्या सर्वांस डॉ. आंबेडकरांनी स्पष्ट उत्तरे देऊन सर्वांचे चांगले व पूर्णपणे समाधान केले.

## दुसऱ्या दिवसाचा कार्यक्रम

दुसऱ्या दिवशी सकाळी ९ वाजता काँग्रेसच्या अधिवेशनास पुन्हा सुरुवात झाली. लोकसमुदाय पहिल्या दिवसाइतकाच होता. सुरवातीस अध्यक्षांनी काँग्रेसचे यश चिंतणाऱ्या आणखी तारा आल्याचा उल्लेख केला. नंतर काँग्रेसच्या खुल्या अधिवेशनात खालील ठराव मांडण्यात आले.–

## काँग्रेसमधील ठराव

**ठराव १ ला.**––ही काँग्रेस सार्वभौम बादशहाठायींची आपली राजनिष्ठा व्यक्त करते.

**ठराव २ रा.**––ही काँग्रेस खुनाच्या चळवळीचा व कायदेभंगाच्या चळवळीचा निषेध करते व ह्या चळवळीला आळा घालण्याचा प्रयत्न सरकारने करावा, अशी सरकारास सूचना करते.

**ठराव ३ रा.**––बंगाल प्रांतातील मिदनापूर जिल्ह्याचे मॅजिस्ट्रेट मि. डगलस, आय. सी. एस. यांचा अमानुषपणे खून करण्यात आला. त्याचा ही कॉंग्रेस निषेध करते व रा. डगलस यांच्या कुटुंबाबद्दल आपली सहानुभूती व्यक्त करते.

ठरावे १, २, ३ हे अध्यक्षांनी अध्यक्षपदावरून मांडले ते सर्वानुमते पास झाले.

**ठराव ४ था.**––नवीन राज्यघटनेत अस्पृश्यांचे हितसंबंध पूर्णपणे रक्षण करण्याची व्यवस्था करू, अशा प्रकारचे अभिवचन दिल्याबद्दल ही कॉंग्रेस सेक्रेटरी ऑफ स्टेट यांना धन्यवाद देते. परंतु सरकारशी सहकारिता करणाऱ्या पक्षाकडे दुर्लक्ष करून सरकारशी असहकार करणाऱ्या पक्षाची मनधरणी करण्याचा सरकारी धोरणाचा जो कल दिसून येतो, त्याबद्दल ही कॉंग्रेस आपली दिलगिरी व्यक्त करते.

ठराव मांडणार– मि. विश्वास (बंगाल)

अनुमोदन––मि. बलदेवप्रसाद (संयुक्त प्रांत)

ठराव सर्वानुमते पास झाला.

**ठराव ५ वा.**––(अ) राऊंड टेबल कॉन्फरन्समधील अल्पसंख्यांकांच्या करारनाम्यास ही कॉंग्रेस आपली संमती देते.

(ब) ही कॉंग्रेस सार्वभौम सरकार यास असे कळवू इच्छिते की, अल्पसंख्यांकांच्या करारनाम्यात जे काही हक्क अस्पृश्यांचे म्हणून दर्शविले गेले आहेत ते कमाल हक्क नसून किमान हक्क आहेत. व त्यात कोणत्याही प्रकारची छाटाछाट किंवा फेरबदल करण्यास ही कॉंग्रेस कबूल नाही व तशी छाटाछाट किंवा फेरबदल करण्यात आल्यास त्यासंबंधी अस्पृश्य वर्गाच्या हल्लीच्या राजकीय धोरणात फेरबदल करणाचा अधिकार ही कॉंग्रेस राखून ठेवीत आहे.

(क) ही कॉंग्रेस सार्वभौम सरकारास असे जाहीर करू इच्छिते की, अल्पसंख्यांकांच्या करारनाम्यात वीस वर्षानंतर अस्पृश्य वर्ग स्वतंत्र मतदार संघाच्या ऐवजी एकत्रित मतदार संघ मान्य करील, असे जे कलम आहे त्याच्या पूर्ततेसाठी शिरोगणती मतदान पद्धत ही एकच शर्त नसून अल्पसंख्यांकांच्या करारनाम्यात जेवढ्या प्रतिनिधींच्या जागा मागण्यात आल्या आहेत तेवढ्या त्यांना मिळणे ही महत्त्वाची शर्त आहे.

(ड) अस्पृश्य वर्गाचे प्रतिनिधी कमी व्हावेत म्हणून अस्पृश्यांची लोकसंख्या कमी दाखविण्याचा हिंदू लोकांचा जो उपक्रम चालू झाला आहे, त्याचा ही कॉंग्रेस निषेध करते व त्यांनी दिलेली लोकसंख्या खरे मानणे हे धोक्याचे आहे, असे सार्वभौम सरकारास जाहीर करते.

(इ) ही काँग्रेस असे स्पष्टपणे जाहीर करू इच्छिते.की स्वतंत्र प्रतिनिधीत्वाचा हक्क हा अस्पृश्य वर्गांचा त्यांच्या आत्मसंरक्षणाकरता असलेला नैसर्गिक हक्क आहे. तो तत्कालिक स्वरूपाचा नाही. आणि म्हणून लोथियन कमिटीपुढे साक्ष देताना अस्पृश्यांना स्वतंत्र प्रतिनिधीत्वाचा हक्क फक्त काही कालपावेतो पाहिजे, असे विधान रा. ब. राजा यांनी केले त्या विधानाचा ही काँग्रेस साफ इन्कार करते.

मांडणार–मि. एम. बी. मलिक (बंगाल)

मांडणार–मि. एन. सी. धुसिया (बंगाल)

अनुमोदन–मि. रामसहायी (यू. पी.)

अनुमोदन–मि. साखरे (सी. पी.)

अनुमोदन–मि. हंसराज (पंजाब)

अनुमोदन–मि. गाडेकर (मुंबई)

अनुमोदन–मि. कानन (मद्रास)

पुष्टी–महात्मा कालिचरण नंदागवळी (सी. पी.)

पुष्टी–मि. ओगले (वऱ्हाड)

पुष्टी–स्वामी अच्छुतानंद (यू. पी.)

पुष्टी–श्रीमती अंजनिबाई (सी. पी.)

मि. खांडेकर (सी. पी.), मि. जाटव (दिल्ली) हे दोन विरुद्ध बाकी सर्वांनुमते पास.

**ठराव ६ वा.**––राजा–मुंजे करार हा अस्पृश्य वर्गाच्या राजकीय हितसंबंधास विघातक असल्यामुळे ही काँग्रेस त्याचा इन्कार करते व तो अस्पृश्य वर्गास बंधनकारक नाही असे जाहीर करते.

मांडणार–पि. धी. मलिक (बंगाल)

अनुमोदन–स्वामी अच्छुतानंद (सं. प्रांत),

पुष्टी–बलदेवप्रसाद (सं. प्रांत), बिहाडे (म. प्रांत)

मि. खांडेकर (म. प्रांत) व जाटव (दिल्ली) हे दोन विरुद्ध बाकी सर्वांनुमते पास.

**ठराव ७ वा.**––राऊंड टेबल कॉन्फरन्समध्ये अस्पृश्य वर्गाला फारच थोडे प्रतिनिधी देण्यात आले, त्याबद्दल ही काँग्रेस आपली दिलगिरी प्रदर्शित करते व राऊंड टेबल कॉन्फरन्सच्या पुढील अधिवेशनात अस्पृश्य वर्गास भरपूर प्रतिनिधी देण्यात यावेत अशी सरकारशी आग्रहाची मागणी करते.

मांडणार–दुलोरलाल (म. प्रांत)

अनुमोदन–सुभेदार घाटगे (मुंबई)

पुष्टी–पाटील (सं. प्रांत)

ठराव सर्वानुमते पास.

**ठराव ८ वा.**––डॉ. आंबेडकर व रा. ब. श्रीनिवासन यांनी राऊंड टेबल कॉन्फरन्समध्ये जी कामगिरी केली तिच्याबद्दल ही काँग्रेस त्यास धन्यवाद देते व त्यांच्यावर अस्पृश्य वर्गाचा पूर्ण विश्वास आहे, असे जाहीर करते.

ठराव अध्यक्षांनी अध्यक्षपदावरुन मांडला व तो सर्वानुमते पास झाला.

**ठराव ९ वा.**––पंजाबच्या कायदेकौन्सिलात अस्पृश्य वर्गाचा एकही प्रतिनिधी देण्यात आलेला नाही, याबद्दल ही काँग्रेस आपली दिलगिरी व्यक्त करते व येत्या वेळी त्यांचा प्रतिनिधी घेण्याची तजवीज करावी, अशी सरकारास आग्रहाची विनंती करते.

मांडणार–हंसराज (पंजाब)

अनुमोदन–कानन (मद्रास)

पुष्टी–गुसावीलाल (म. प्रांत)

ठराव सर्वानुमते पास.

**ठराव १० वा.**––मूलभूत हक्कांचा तक्ता जो तयार करण्यात येत आहे, त्यात खालील मूलभूत हक्कांचा समावेश करण्यात यावा—

(अ) स्थानिक स्वराज संस्थातून अस्पृश्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात स्वतंत्र मतदार संघामार्फत त्यांचे प्रतिनिधी घेणे.

(ब) मध्यवर्ती सरकारने अस्पृश्यात उच्चप्रतिच्या शिक्षणाचा प्रसार करण्याकरिता काही रक्कम निदान काही मुदतीपर्यंत खर्च करण्याची जबाबदारी घेणे.

मांडणार–शामलाल (म. प्रांत)

अनुमोदन–वनमाळी (मुंबई)

पुष्टी–बाररसे (सं. प्रांत)

पुष्टी–मेढे (मुंबई)

ठराव सर्वानुमते पास.

**ठराव ११ वा.**––'' ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस फेडरेशन '' या नावाची सर्व अस्पृश्य वर्गाची मध्यवर्ती संस्था स्थापन करण्यास ह्या काँग्रेसची पूर्ण संमती आहे व या मध्यवर्ती संस्थेचे काम चालविण्याकरिता नेमलेल्या तात्पुरत्या कमिटीस आपली संमती देते.

**ठराव १२ वा.**--ही काँग्रेस नाशिक सत्याग्रहीचे अभिनंदन करते.

ठराव ११ व १२ हे अध्यक्षांनी अध्यक्षपदावरून मांडले व ते सर्वानुमते पास झाले.

काँग्रेसपुढील ठरावावर श्री. मलिक, रामसहाय, नंदागवळी व साखरे ह्यांची अतिशय परिणामकारक भाषणे झाली. सर्व ठराव पास झाल्यावर डॉ. आंबेडकरांनी निदान दोन शब्द तरी बोलावेत म्हणून लोकांचा आग्रह सुरू झाला. लोकांच्या या आग्रहास्तव डॉ. आंबेडकर जवळ जवळ १-३० वाजता बोलावयास उभे राहिले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

अस्पृश्य समाजाच्या हाती राजकीय सूत्रे येणे फारच आवश्यक आहे. याकरिता सर्व लोकांनी संघटित होऊन आपला राजकीय दर्जा संपादन केला पाहिजे. जोपर्यंत ह्या देशाच्या राजकीय नियंत्रणावर अस्पृश्य लोकांचा ताबा चालू शकत नाही तोपर्यंत त्यांची अस्पृश्यता जाणार नाही. नंतर रा. बं. श्रीनिवासन ह्यांनीही दोन शब्द सांगितले.

शेवटी काँग्रसचे पुढील अधिवेशन बंगाल प्रांतात भरविण्याचे आमंत्रण श्री. मलिक ह्यांनी दिले. अध्यक्षांचे समारोपाचे लहानसे भाषण झाले व स्वागत कमिटीच्या उत्कृष्ट व्यवस्थेबद्दल आभार मानण्यात आल्यावर बरोबर २-३० वाजता काँग्रेसचे अधिवेशन ' डॉ. आंबेडकर की जय ' ह्या घोषात संपले.



# ५२

# स्वतःच्या पायावर उभे राहिल्याशिवाय अस्पृश्यांना तरणोपाय नाही

मे १९३२ मध्ये सोलापूर अस्पृश्य जनतेने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना थाटाच्या समारंभात मानपत्र दिले. हा मानपत्र समारंभ मे. पापया बाबाजी बेलपवार, ऑ. बेंच मॅजिस्ट्रेट यांच्या अध्यक्षतेखाली पार पडला. या समारंभास महार, मांग, चांभार, भंगी वगैरे सर्व जातींच्या लोकांनी भाग घेतला होता. या समारंभ सभेस मे. धर्माजी नरसू खरटमल म्यु. कौन्सिलर, मोहनदास अन्याबा बाबरे, म्यु. कौन्सिलर, विश्राम जीना, भंगी, पंढरी सखाराम बंदसोडे, सिद्राम, बाबूराव जाधव, दत्तू तात्या सर्वगोड, म्यु. कौन्सिलर, नामदेव बुधाजी बंदसोडे, वगैरे निरनिराळया जातींचे पुढारी प्रामुख्याने हजर होते.

अस्पृश्यांनी आता यापुढे स्वतःच्या पायावर उभे राहून आपली सर्वांगीण उन्नती करून घेतली पाहिजे. हिंदू समाजाच्या सोवळया सहकार्याने अस्पृश्यता कदापिही नष्ट होणार नाही उलट आपल्या अंगी स्वावलंबनाचे वारे खेळू लागले आहे ते मात्र कमकुवतपणामुळे नष्ट होईल, अशा आशयाचा स्फूर्तिदायक उपदेश डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी मानपत्रास उत्तर देताना केला.



---

जनता : २५ जून १९३२.

भाषणाची तारीख दर्शविलेली नाही– संपादक.

# ५३
# देवदर्शनाशिवाय कोणी मरत नाही

मु. निपाणी, तालुका चिकोडी, जिल्हा बेळगाव या गावी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना मानपत्र व थैली अर्पण करण्याच्या समारंभाची तयारी होती. त्याप्रित्यर्थ ता. २३ मे १९३२ रोजी तीन वाजण्याचे सुमारास कोल्हापूराहून निपाणीस जात असता क. कागल, ज. कागल येथील अस्पृश्य समाजाने महार-वाड्यातील तक्क्याचे इमारतीत त्यांना पान सुपारीचा समारंभ अगोदर ठरविला होता. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे मोटारीतून साडे तीन वाजण्याचे सुमारास येत असता त्यांचे स्वागतार्थ कागल जहागिरीतील अस्पृश्य समाज चार पाच हजारावर जमला होता. सदर समाज गाव सोडून तीन चार फर्लांग अंतरावर उभा राहिला होता. डॉ. साहेबांची मोटार येताच अस्पृश्य समाजाने मोठमोठ्याने जयजयकार करीत व बँडचे वाद्य वाजवित लाठीवाले स्वयंसेवक मोटारचे मागचे बाजूने जयजयकार करीत होते व मोटारीचे सभोवार हाताची साखळी करून बंदोबस्ताने जयघोषात चालले होते. या खेरीज प्रेक्षक मंडळी सुमारे चार पाच हजारावर जमली होती. अशा बंदोबस्ताने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची मिरवणूक चालली होती. मिरवणूक समारंभाचे ठिकाणी येताच स्त्रिया व पुरुषांचा जयघोष मोठमोठ्याने होत होता. मोटारीतून उतरून सिंहासनावर विराजमान होताच मि. भीमराव संताजी कांबळे मास्तर यांनी वेळेच्या अभावामुळे गौरवपर दोन शब्द सांगितल्यावर पुष्पहार अर्पण करण्यात आला.

ठरल्यानुसार तारीख २३ मे १९३२ रोजी कर्नाटकात बहिष्कृत वर्गातील निरनिराळ्या संस्थांच्या मार्फत डॉ. बी. आर. आंबेडकर यांना दि. ब. लठ्ठे, एम.ए., एलएल. बी. यांच्या अध्यक्षतेखाली मानपत्र समारंभ मोठ्या थाटाने पार पडला. या समारंभास बेळगाव, धारवाड, कोल्हापूर आणि सांगली इत्यादी जिल्ह्यातून सुमारे ७-८ हजार जनसमुदाय जमा झाला होता. बँडच्या सुस्वर नादात कोल्हापूर वेशीपासून सभामंडपापर्यंत मिरवणूक आल्यानंतर मानपत्राच्या कार्यास आरंभ झाला. उच्चासनावर मे. बागडे वकील पुणे, भाऊराव पाटील सातारा, दत्तोबा पोवार कोल्हापूर, गणेशाचार्य वकील कोल्हापूर, मलगौडा पाटील बेनाडीकर व इतर बरीच मंडळी विराजमान झाली होती.

आरंभी स्वागतपर पद्ये म्हटल्यावर मे. मारुतीराव राव यांनी अध्यक्षांची सूचना आणली व तिला रावसाहेब पापाणा, बेळगाव यांनी अनुमोदन दिल्यावर दि. ब. लठ्ठे यांनी टाळयांच्या प्रचंड कडकडाटात

---

जनता : २५ जून १९३२.

अध्यक्षस्थान स्वीकारले. यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी उत्तरादाखल भाषण केले. ते म्हणाले,

दि. ब. लठ्ठेसाहेब व सद्‌गृहस्थहो !

आपण या ठिकाणी मला आणण्याचा योगायोग जुळवून आणिला याबद्दल मी आपला आभारी आहे.

आज हिंदुस्थान देशामध्ये देशद्रोही, देश विघातक, हिंदू धर्म विघातक व हिंदू-हिंदूत दुफळी पाडणारा असे अत्यंत मोठ्या प्रमाणावर जर कोणास म्हणण्यात येत असेल, देशात अत्यंत मोठा शत्रू असे जर कोणास म्हणण्यात येत असेल तर ते मलाच होय. परंतु हे वादळी वातावरण शांत झाल्यानंतर राऊंड टेबल परिषदेच्या कार्याची जर आजचे माझे टीकाकार काळजीपूर्वक छाननी करतील तर त्यांना हीच गोष्ट कबूल करावी लागेल, ती ही की डॉ. आंबेडकर यांनी राष्ट्रासाठी काहीतरी केले आहे. जर ही गोष्ट हल्लीचे दूषित वातावरण बदलल्यानंतरही त्यांनी कबूल केली नाही तरी त्यांना मी कवडीचीही किंमत देणार नाही. माझ्या कार्यावर माझ्या दलित समाजाचा विश्वास आहे. हीच गोष्ट मी अत्यंत मोठी समजतो आणि ज्या समाजात माझा जन्म झाला आहे व ज्यांच्यात मी वावरत आहे आणि ज्यांच्यात मी मरणार आहे त्यांच्यासाठीच मी कार्य करीत राहणार आहे. माझ्या टीकाकारांची मला पर्वा नाही. मी देशाचे कार्य करीत नाही असा माझ्यावर आरोप आहे. आज शंभर वर्षांपासून सुधारक, दुर्धारक, जहाल, मवाळ लोकांचे राष्ट्राचे नावावर आपल्या जातीच्या लोकांचे पोट भरण्याचे कार्य चालले आहे. त्या लोकांनी माझ्या समाजासाठी काही केले नाही. मग माझ्यापासूनच त्यांनी राष्ट्रकार्याची अपेक्षा का करावी ? मला माझ्या समाजाची सेवा केली पाहिजे.

महाड, नाशिक आणि इतर ठिकाणच्या सत्याग्रहावरून माझी अशी खात्री झाली आहे की, हिंदू लोकांची अंतःकरणे दगड विटांच्या भिंतीप्रमाणे निर्जीव आहेत. त्यांना माणसाला माणूस म्हणण्याची, इतरांना बरोबरीचा हक्क देण्याची चाड नाही. दगडाच्या भिंतीवर डोके आपटून आपला कपाळमोक्ष केला तर शेवटी रक्तच येणार परंतु त्या भिंतीच्या ठिकाणची कठोरता नाहीशी होणार नाही. त्याचप्रमाणे हिंदू लोकांच्या अंतःकरणाची कठोरता नाहीशी होणार नाही. तेव्हा याबाबतीत माझे पूर्णपणे मतपरिवर्तन झाले आहे. आजपर्यंत आपल्याला हिंदुंच्या देवाचे दर्शन झाले नाही म्हणून आपण मेलो नाही किंवा आजपर्यंत हिंदुंच्या देवळात जाणारी गाढवे, कुत्री, मांजरे वगैरे जनावरे ' माणसे ' झाली नाहीत. ते आम्हास शिवून घेत नाहीत तर आम्हीही त्यांना शिवून घेणार नाही.

यापुढे आम्ही सरकारी अंमलदारांचे तंबू मारणारे व झाडलोट करणारे राहणार नाही. इतरांप्रमाणे आम्ही राजकीय सत्ता हाती घेणार आणि आपले सामाजिक स्वातंत्र्य प्रस्थापित करणार. यापुढे आम्ही कोणाचेही गुलाम राहणार नाही असा आमचा कृतनिश्चय आहे. यानंतर डॉ. आंबेडकर यांनी भाषण संपविले. हा गोड समारंभ ७-८ हजार लोक समुदायाच्या टाळयांच्या गजरात बरखास्त झाला.

● ● ●

# ५४

# आजचा आमचा लढा राजकीय सत्तेकरिता आहे

मुंबईच्या वडाळा, समस्त मंडळीच्या आग्रही विनंतीवरून डॉ. बाबासाहेब आंबेडकर वडाळा येथे सोमवार दिनांक ५ सप्टेंबर १९३२ रोजी रात्रौ ९ वाजता भरलेल्या सभेमध्ये हजर राहिले. सभा वाय. एम. सी. ए. च्या भव्य पटांगणात घेतली होती. पावसाची जरी मेहरनजर झाली होती तरी स्त्रीपुरूषांचा समुदाय ३,००० जमला होता. बरोबर नऊ वाजता बाबासाहेब सभेच्या जागी हजर झाले. फाटकापाशी तानाजी बालवीरांनी त्यांना सलामी दिली. या सभेची! सर्व व्यवस्था वडाळा येथील गेंदाजी गायकवाड यांच्या स्काऊटनी केली.

पहिल्या प्रथम बालवीरांचे गायन झाल्यावर श्री. मोगल मारुती गायकवाड यांनी स्थानिक मंडळींच्यातर्फे बाबासाहेबांना चार शब्द सांगण्यास विनंती केली.

डॉ. आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

मला गणेशोत्सवाच्या कार्यक्रमात भाग घ्यावयाचा आहे असे कळल्यावर थोडीशी खंत वाटली होती व मी गणपतीच्या मूर्तीबद्दल काही बोलणार होतो. मला येथे कोठेही गणपतीची मूर्ती दिसली नाही म्हणून मी त्याबद्दल आता काही बोलत नाही. या हिंदू धर्माने आपले जितके अकल्याण केले आहे तितके अकल्याण कोणत्याच साथीच्या रोगांनेसुद्धा केले नाही. मी तुम्हाला सांगत नाही की, तुम्ही या हिंदू धर्माला चिकटून राहा. आज ज्या हिंदूधर्मात आम्ही २,००० वर्षे राहिलो, ज्यांची उभारणी केली व ज्यांचे रक्षण करण्याकरिता आमची सबंध आयुष्ये गेली त्याच हिंदू धर्मात आमची किंमत काडीमोल आहे. काही दिवसांपूर्वी मला काशीच्या ब्राह्मणांची पत्रे आली आहेत की, आम्ही तुमच्यास्तव काशी विश्वेश्वराची देवालये उघडी करितो, परंतु आम्हाला दगडाच्या देवालयांची मुळीच जरूरी नाही. आम्ही हा जो संग्राम चालविलेला आहे तो केवळ देवळे खुली व्हावीत म्हणून नव्हे किंवा! शेवाळ साठलेल्या तळ्याचे पाणी पिण्याकरिता नव्हे. आम्हाला ब्राह्मणांच्या घरात जावयाचे नाही. आम्हाला सहभोजन नको. आम्हा अस्पृश्यांना ब्राह्मणांच्या मुली नकोत, आमच्या समाजात का काही मुलीच नाही म्हणून आम्ही ब्राह्मणांच्या मुलींची अपेक्षा करावी, की आमच्या बायांना संतती होत नाही की, त्यांच्या पोटच्या पोरांना इंद्रिये नसतात. तसे काही नाही. तर आजचा आमचा हा लढा फक्त राजकीय सत्तेकरिता आहे. हिंदूजवळ

---

जनता : १० सप्टेंबर १९३२.

जर आम्ही चिकटून राहिलो तर आम्हाला नरकात खितपत पडावे लागते व यामुळे माझ्या सारख्यालासुद्धा या हिंदू धर्माचा अगदी वीट आला आहे. एवढेच नव्हे तर धर्मांतरसुद्धा करावेसे वाटते. परंतु मी तसे का करीत नाही. मी या नरकातच का राहतो म्हणाल तर मला तुम्हाला सर्वांना सोडून जाववतच नाही. मी कोठेही गेलो तरी मी माझ्या स्वतःच्या हिंमतीवर राहू शकेन. परंतु मी तुमच्यामध्येच का राहतो याचे कारण मला तुम्हाला सोडून जाववत नाही एवढेच आहे आणि दुसरे मी जे काम हाती घेतलेले आहे ते मला शेवटास न्यावयाचे आहे. मी तुम्हाला इतकेच सांगतो की, तुम्ही या धर्माच्या भानगडीत पडू नका. मागे २,००० वर्षे हिंदुंनी राज्यकारभार केला त्यानंतर आता १५० वर्षे इंग्रजांनी चालविला, परंतु आता यापुढे जे स्वराज्य मिळणार आहे त्यात एकटे हिंदूच राज्यकारभार चालविणार नसून तोच राज्यकारभार तुम्हा अस्पृश्यांच्या व हिंदुंच्या संमतीने चालणार आहे.

प्रत्येक समाजामध्ये काहीना काहीतरी सामर्थ्य असते. काहींच्या हातात आर्थिक सामर्थ्य असते. पारशी समाज पाहा. तो या ठिकाणी बसलेल्या लोकांपेक्षा काही जास्त नाही. परंतु त्याच्यात आर्थिक सामर्थ्य आहे. आपल्या समाजातील माणसे तर त्यांच्याकडे मजुरीची कामे करितात. ब्राह्मण समाजामध्ये जरी आर्थिक सामर्थ्य नाही कारण सर्वच ब्राह्मण काही श्रीमंत आहेत तसे नाही, परंतु त्यांच्या हातात धार्मिक सत्ता आहे. समाजाच्या हाती राजकीय सत्ता असणे फार इष्ट आहे व अशा प्रकारची राजकीय सत्ता आपल्यासाठी मिळविण्याकरिताच मी राऊंड टेबल परिषदेला गेलो होतो व त्या जाण्याचा फायदाही आपणास मिळाला आहे. ते मी थोडक्यात सांगतो.

मी राऊंड टेबल परिषदेला जाऊन अस्पृश्यांकरिता १० जागा मिळविल्या. माझ्याविरूद्ध जे टीका करतात ते म्हणतात की, डॉ. आंबेडकरांनी राऊंड टेबल परिषदेस जाऊन काय मिळविले ? परंतु तीच माणसे जर आता ह्या ठिकाणी हजर असती तर मी त्यांची पक्की खात्रीच करून दिली असती की, जे काही मी मिळविलेले आहे ते दुसऱ्या इतर कोणत्याच समाजास मिळालेले नाही. एखाद्या कोंबड्यापुढे जर आपण मोती टाकले तर त्यास त्या मोत्याची काही एक किंमत न कळता ते मोती त्याला जोंधळयाच्या एका दाण्यापेक्षा हलके वाटले असते.

या दहा जागा मिळाल्यामुळे आपल्या समाजाच्या हाती बरीच सत्ता आलेली आहे. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे आता जे स्वराज्य मिळणार आहे ते स्वराज्य तुम्ही निवडून दिलेले प्रतिनिधी चालवितील. ते स्वराज्य तुमच्या संमतीने, तुमच्या सल्ल्याने, तुमच्या मतानेच चालेल. त्याची सर्वस्वी जबाबदारी तुमच्यावरच आहे. आपणास आता जे काही मिळाले आहे ते माझ्या मताप्रमाणे अगदी पुरेसेच आहे. आपल्याकरिता १० जागा अगदी राखीव आहेत.

त्याशिवाय, अहमदाबादसारख्या ठिकाणी जेथे ८० किंवा ९० टक्के मजुराची वस्ती आहे तीतून २-३ जागा अस्पृश्यांना मिळतील. शिवाय मुंबईसारख्या ठिकाणी जेथे अस्पृश्यांची वस्ती आहे तेथून १-२ जागा आपल्याला मिळविता येतील. शिवाय नाशिक जिल्हा, पुणे तेथून स्वतंत्र मतदार संघाच्या योगाने आपण निवडून दिलेले शेकडा ९० टक्के आपल्या मुठीत राहतील.

मुंबई कौन्सिलमध्ये एकंदर २०० जागा आहेत त्यापैकी ९७ हिंदूंकरिता, ६३ मुसलमानांकरिता व १० अस्पृश्यांकरिता व असे असल्याकारणाने कोणत्याही एकाच बाजूस जास्त सत्ता मिळणे अशक्य आहे. कारण कौन्सिलमध्ये जे काम चालणार ते बहुमतानेच चालणार आहे म्हणून कोणत्याही एका पक्षाचे बहुमत होण्यास कमीतकमी ११५ तरी मते एका बाजूला पाहिजेत. म्हणून नुसत्या हिंदुंच्या ९७ लोकांना काही बहुमत करिता येणे शक्य नाही. त्याचप्रमाणे मुसलमानांनाही ६३ मतांवर राज्यसत्ता गाजविता येणार नाही. बहुमत होण्याला त्यांना दोघांनाही अस्पृश्यांची मते मिळाली पाहिजेत. आपल्या हातात अशा रीतीने फार मोठी सत्ता मिळाली आहे. कारण ज्या बाजूला आपण आपली मते देऊ त्या बाजूचे पारडे खालीच जाईल व विरूद्ध पारडे वरतीच लटकत राहील. इतकी सत्ता जरी आपल्या हाती आलेली आहे तरी पण मला एक भयंकर शंका उत्पन्न झाली आहे व ती म्हणजे तुम्हामध्ये मतदानाची अक्कल कोठपर्यंत आहे ? आज आपणास ज्या १० जागा मिळाल्या आहेत त्या जागांवर आपल्यापैकी जे लोक जातील त्यांना वाटेल ते कार्य साधता येईल. त्यांना इकडूनची मुंबई तिकडे करिता येईल, पण त्या जागांचा योग्य उपयोग मात्र झाला पाहिजे. सर्व अस्पृश्यांचा उद्धार या अवघ्या १० माणसांना करता येईल. इतके दिवस एखादे साधे कार्य करावयाचे म्हणजे कलेक्टराकडे किंवा मामलेदाराकडे पुष्कळशा खेपा घालाव्या लागत होत्या व अशाच दुसऱ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांची दाढी धरावी लागत होती. एवढेच कशाला परंतु एखादे काम जरी करावयाचे असल्यास एखाद्या ७ रुपये मिळविणाऱ्या यत्किंचित शिपुर्ड्याला माझ्यासारख्या इसमास सुद्धा हवालदार साहेब म्हणून हाक मारावी लागत होती. पण आता यापुढे आपणावर असा प्रसंग कधीच यावयाचा नाही. तर आता ह्यापुढे सर्व गोष्टी कायद्याने होतील. आपणापैकी काही अस्पृश्यच कलेक्टर होतील. शेकडा २० मामलेदार, शेकडा २० कुळकर्णी व शेकडा २० शिपाई आपले अस्पृश्य होतील व असे करण्याकरिता आता आपणास कोणाचीही दाढी धरावी लागणार नाही, परंतु हे सर्व आपल्या लोकांचे शील काय प्रकारचे बनेल यावर अवलंबून राहील. कारण आपणातील काही जण दोन पैशाच्या फुटाण्याला किंवा एक दमडीच्या पोह्याला भुलून आपली मते बदलतात हे आमच्या अनुभवाला आले आहे. ज्या पुढाऱ्यांनी गेल्या मार्च महिन्यात अस्पृश्यांच्या सभा भरवून आणि

अध्यक्ष होऊन अस्पृश्यांकरिता स्वतंत्र मतदार संघ मागितला त्याच अध्यक्षांनी विरूद्ध पार्टीच्या लालुचीला भुलून आपली मते बदलून टाकली व मतदार कमिटीपुढे अस्पृश्यांकरिता संयुक्त मतदार संघ मागितला. अशातऱ्हेने जर पुढारी आपणाला विकून घेऊ लागला तर आपल्या हाती आलेली सत्ता काय उपयोगाची ? काही दिवसांपूर्वी माझ्याबरोबर काम करणारा सातारा जिल्ह्यातील एक घोलप नावाचा कालचा पोरगा असे म्हणतो की, शिवतरकर मास्तर चांभार असून त्यांना साहेबांनी जवळ धरले म्हणून माझ्याशी असहकार्य केले. परंतु हा साताऱ्याचा महार ज्याला शिवतरकर चांभार म्हणून त्याची घाण येते, तोच देवरुखकरासारख्या चांभाराच्या आश्रयाखाली वर्तमानपत्रे काढून मला शिव्या देतो. महार समाजाची वाटेल तशी नालस्ती करून देवरूखकरांनी आमच्या समाजाची अब्रु चव्हाट्यावर आणिली आहे, त्याच देवरूखकरांच्या आश्रयाखाली काम करावयास या लांबनाक्या महारास काहीसुद्धा कशी लाज वाटत नाही ? इतर समाजातील माणसे नेहमी शिव्या देतात तर आपणापैकीच एका महाराने शिव्या दिल्या तर त्याबद्दल मला काहीच वाटत नाही. परंतु मला इतकीच शंका येते की, तुम्ही आपल्याला मिळालेल्या हक्काचा योग्य उपयोग कराल की नाही ! मी जी एवढी चळवळ चालविली आहे ती काही तरी तत्त्वाला धरून चालविली आहे. आपल्या पुढाऱ्यांची ही अशी नीतिमत्ता पाहून मला खेद होतो. मला तुम्हाला एवढीच विनंती करावयाची आहे की, तुम्ही स्वाभिमानी व्हा. आपला पुढारी कोण हे ठरवा व तो सांगेल त्याप्रमाणे वागा. आपली मते निष्कारण विकू नका. नाहीतर कोणी येऊन एक दोन रुपये देऊन तो तुमची मते घेईल. मतदानाबद्दलसुद्धा आपणास पुष्कळशा सवलती मिळाल्या आहेत. इतक्या सवलती दुसऱ्या कोणत्याच समाजाला दिल्या नाहीत. इतर समाजातील इसमांना मत देण्याचा अधिकार प्राप्त होण्याकरिता कमीतकमी मराठी चौथी इयत्तेपर्यंत त्याचे शिक्षण पाहिजे, परंतु अशी स्थिती तुमची नाही. तुम्हाला फक्त आपली सही मात्र करता आली पाहिजे. तुम्हाला नुसत्या ' रामापांड्या ' एवढी सही करता आली की तुमचा मत देण्याचा अधिकार प्राप्त झाला. ही सवलत इतर दुसऱ्या कोणत्याच समाजाला मिळालेली नाही. फक्त अस्पृश्यांना आहे. म्हणून म्हणतो तुम्ही प्रत्येकाने रात्रीच्या शाळेत जाऊन सही पुरते तरी शिक्षण घेणे आता फार जरूरीचे झाले आहे व असे केल्याने तुमची नावे रजिस्टर होतील.

● ● ●



सध्याच्या युगात ज्या देशामधील बहुजनसमाज निरक्षर आहे अशा देशाचा जीवनकलहात टिकाव लागावयाचा नाही हे सांगावयास नकोच.

-- डॉ. बाबासाहेब आंबेडकर

# अस्पृश्य समाजास शिक्षण प्रसाराची निकड

शनिवार, ता. १० सप्टेंबर १९३२ रोजी रात्री महार बालवीर संस्थेमार्फत परळ मुंबई येथील दामोदर हॉलमध्ये सभा झाली. त्यावेळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले, त्याचा गोषवारा :—

दामोदर हॉल आबालवृद्ध स्त्री-पुरुषांनी अगदी फुलून गेला होता. आत प्रवेश न मिळाल्यामुळे शेकडो लोक मोठ्या उत्सुकतेने बाबासाहेबांचे अमूल्य बोल कानी पडावे म्हणून धडपड करीत होते. आमच्या बातमीदारास सभेस यावयास थोडा उशीर झाल्यामुळे मोठ्या मुश्किलीने त्यास आत जाता आले. टाळयांच्या प्रचंड कडकडाटात बाबासाहेब बोलावयास उभे राहिले. परंतु हाच प्रचंड ध्वनी त्यांच्या मुखातून शब्दध्वनी उमटताच निमिषार्धात स्तब्ध झाला व सभा निश्चल होऊन बाबासाहेबांचे बोल श्रवण करू लागली. प्रारंभी मंडळाच्या बहुविध कार्याबद्दल समाधान व्यक्त करून त्यांच्या शैक्षणिक कामगिरीची त्यांनी विशेष प्रशंसा केली. मंडळाने सादर केलेल्या हिशोबाच्या तक्त्यासंबंधी बोलताना त्यांनी सांगितले की, मंडळाने माझ्या स्वतःच्या गौरवाकरिता पुष्पहारानिमित्त जी रक्कम खर्ची घातली आहे ती अधिक उपयुक्त कामाकडे खर्च करावयास पाहिजे होती व त्या खर्चाचे ओझे मंडळाच्या आर्थिक शक्तीकडे पाहिले असता असहनीय आहे. म्हणून ते ओझे मंडळावर पडू नये व त्यास कार्यविस्तार करण्यास मदत व्हावी यासाठी त्यांनी याप्रसंगी मंडळास अल्पशी मदत म्हणून २५ रुपयांची देणगी जाहीर केली. ते पुढे म्हणाले की,

आज अस्पृश्य समाजास अत्यंत निकडीचे असे कोणते कार्य असेल तर ते शिक्षण प्रसार हे होय. समाजातील प्रत्येक व्यक्तीने तसेच हरएक संस्थेने शिक्षणाच्या बाबतीत आपल्या तरुण पिढीचे पाऊल पुढे कसे पडेल ह्या प्रश्नाकडे आपले लक्ष पुरविले पाहिजे व त्या अनुरोधाने आपल्या कार्याची दिशा ठरविली पाहिजे. आपण स्वतः देखील हेच कार्य अंगिकारले असून त्यादृष्टीने कार्य चालू ठेविले आहे आणि ह्याचे प्रत्यंतर म्हणजे सध्या अस्तित्वात असलेली ३ बोर्डिंगे. महाराष्ट्रातील मुलांकरिता ठाणे येथील बोर्डिंग, कर्नाटकातील शिशुवर्गाकरिता धारवाड येथील बोर्डींग व गुजरातमधील बालकांकरिता अहमदाबाद येथे स्थापलेले होस्टेल ही ती तीन बोर्डिंगे होत. या तीनही ठिकाणी मिळून आज जवळ जवळ १०० मुलांची सोय झाली आहे.

---

जनता : १७ सप्टेंबर १९३२.

पुढे बाबासाहेबांनी जमलेल्या मंडळीस नीट पटावे म्हणून आजच्या परिस्थितीचे एक शब्दचित्र रेखाटले. त्यांनी सांगितले की, या देशातील उच्चनीचता दृढमूल होण्यास समाजातील जातीव्यवस्था हे तर कारण आहेच पण तीस चिरस्थायित्व जातीतील गुणवैशिष्ट्यामुळे आले आहे. काही ठराविक जातीचे श्रेष्ठत्व इतर जातीतील ज्ञानाभावामुळे कायम राहिले. सरकार दरबारातील मोठमोठ्या नोकऱ्या, मामलतदारी किंवा पोलीस अधिकारी वगैरेसारख्या लोकांवर सत्ता गाजविणाऱ्या जागा या सर्वांत अस्पृश्य समाजास अद्यापपावेतो संपूर्ण गज्जाव असे. यामुळे प्रत्यक्ष व्यवहारात या समाजाची अवहेलना तर होतेच पण या समाजाकडे इतर जातींचा पाहण्याचा दृष्टिकोनही अगदी भिन्न प्रकारचा असतो. हा आकुंचित दृष्टिकोन बदलून आपल्या समाजाबाबत इतरांच्या मनात वावरत असलेली असमानतेची भावना नष्ट करावयाची असेल तर त्यास रामबाण उपाय म्हटला म्हणजे या अंमलदारीच्या जागा संपादन करणे हा होय. प्रत्यक्ष उदाहरण द्यावयाचे म्हणजे आज डे. कलेक्टरचे काम करीत असलेल्या एका अस्पृश्य तरुणाचे होय. ते ज्या ज्या जिल्ह्यात जातात तेथील अस्पृश्य समाजास आपल्यावर खरेखुरे कृपाछत्र आहे असे तर वाटतेच पण शिवाय अस्पृश्यांना तुच्छतेने लेखण्याची जी इतर समाजाची भावना ती कमी व्हावयास लागते. असे अनेक अधिकारी झाल्यास आजची परिस्थिती पालटल्याशिवाय राहणार नाही. परंतु आपण ही गोष्ट कधीही विसरता कामा नये की, जर आताच सांगितलेल्या गृहस्थाने उच्च शिक्षण संपादन करून आपली लायकी प्रस्थापित केली नसती तर हा थोडासा फरक देखील आपल्याला लाभला नसता. हाडाची काडे करून त्यांनी शिक्षण संपादन केले नसते तर ही परिस्थिती प्राप्त झाली असती काय ? तेव्हा आपला व्यक्तीविषयक लौकिक वाढविणे व त्याबरोबरच आपल्या समाजाची योग्यता वाढविणे हे केवळ शिक्षणावर अवलंबून आहे. आज कायद्याने जरी आपण आपल्या समाजाकरिता सरकारी नोकरीत आपले प्रमाण ठरवून घेतले तरी योग्य ते शिक्षण घेऊन अंगी लायकी प्राप्त करून घेतल्याशिवाय आपल्या मागण्या निष्फळ होतील. यात आपले माप आपल्याच दौर्बल्यामुळे पुरेपुर पदरात पडणार नाही. गोलमेज परिषदेपुढे, अन्य कोणत्याही ठिकाणी म्हणा प्रत्येक प्रसंगी मला अस्पृश्य समाजाकरिता कायदे कौन्सिलात राखीव जागा मागताना नेहमी हाच मोठा प्रश्न पडत असे. पण अस्पृश्यांच्या वाढत्या महत्त्वाकांक्षा व दिवसेंदिवस वृद्धिंगत होणारी ज्ञानलालसा ह्यावर माझा पूर्ण विश्वास असल्यामुळे मला धीर येत असे. गेल्या काळाशी तुलना केली असता आज अस्पृश्य समाजास उपलब्ध असलेली ज्ञानार्जनाची साधने व परिस्थितीत पडलेला फरक ही पाहिली असता आपल्याला एक प्रकारची उमेद येते असे त्यांनी सांगितले. याचवेळी आपल्या स्वतःच्या आयुष्यातील मनोरंजक पण बोधप्रद असा एक अनुभव त्यांनी निवेदन केला. आपण जेव्हा इंग्रजीचा अभ्यास करण्यास मुंबईत आलो

त्यावेळची आपली परिस्थिती त्यांनी कथन केली. ८ फूट रूंदीची व १० फूट लांबीची मुंबईतील गलिच्छ वस्तीतील आपली जागा, त्यात वास्तव्य करणारी ८-१० जिवंत माणसे, खोलीच्या एका बाजूला मोरी, जवळच चूल व कोपऱ्यात व डोकीवरील माळ्यावर रचलेली लाकडे, धुराच्या कडेलोटात इतक्या माणसांचा अनेक तऱ्हेचा व्यवसाय, विद्यार्थ्यांच्या व्यासंगप्रिय संगतीचा अभाव, अशा कष्टमय परिस्थितीत अभ्यासक्रम आटोपून निरनिराळ्या परीक्षा कशा द्याव्या लागल्या याचे बाबासाहेबांनी हृदयंगम वर्णन केले. आजच्या विद्यार्थीवर्गास नाना प्रकारच्या शिष्यवृत्त्या, राहण्यास वसतीगृहे व विद्यार्थ्यांचा सहवास लाभत असल्यामुळे त्यांचा अभ्यासक्रम अधिक सुकर झाला आहे. तेव्हा या संधीचा व साधनांचा पूर्ण उपयोग करून घेऊन समाजाची योग्यता वाढविणे हे प्रत्येक तरुणाचे कर्तव्य आहे. शेवटी त्यांनी विद्यार्थ्यांस अत्यंत कळकळीचा असा उपदेश केला. विद्यार्थी दशेत ज्ञानार्जन चालू असता त्यांनी आपल्यापुढे निरंतर '' ज्ञानार्जन '' हे एकच ध्येय ठेवावे. विद्यार्थीदशा परत प्राप्त होणार नाही. ह्या अवधीत प्रयत्नांची परमावधी करून ज्ञान संपादन करावे. समाजसेवेत पुढील आयुष्यात विपुल काळ आहे. विद्यार्थीदशेत व्याख्यान देऊन समाजाचे होणारे तात्कालिक हित हे पूर्ण ज्ञान संपादन झाल्यानंतर जी अनेक प्रकारे अधिकार प्राप्तीने सेवा करिता येऊन समाजाचे जे हित साधता येईल त्या हिता-पेक्षा शतपटीने हिणकस आहे. या तत्त्वांची पूर्ण जाणीव ठेवून शिक्षण प्राप्ती हेच आपले सध्याचे ध्येय ठेवावे असे त्यांनी विद्यार्थ्यांस मोठ्या कळकळीने सांगितले. नंतर मंडळाने आपल्याला आज जी सुसंधी प्राप्त करून दिली त्याबद्दल त्यांनी मंडळाचे आभार मानिले व मंडळाच्या कामात यश चिंतून आपले भाषण संपविले. नंतर रा. डी. व्ही. प्रधान यांचे भाषण झाले. त्यांनी मंडळाच्या कार्यकर्त्यांच्या उत्साहाबद्दल आनंद व्यक्त करून लोकशिक्षणाचे काम वर्तमानपत्रे कशी करितात ते विशद करून व अस्पृश्य समाजाचे मुखपत्र म्हणून आज काम करीत असलेले ' जनता-पत्र ' सर्व अस्पृश्य जनतेने कसे मनोभावाने वाचले पाहिजे हे सांगून त्याचा प्रसार म्हणजेच लोक शिक्षणाचा प्रसार होय, असे बजाविले व याकरिता ' जनते ' च्या वर्गणीदारांची संख्या वाढणे किती अवश्य आहे हे सांगितले. मंडळाच्या चिटणीसांनी नंतर बाबासाहेबांचे, इतर निमंत्रित पाहुणे मंडळीचे व जमलेल्या इतर सर्व मंडळीचे मंडळातर्फे आभार मानिले व बालिकांच्या सुस्वर गायनात बाबासाहेबांना पुष्पहार अर्पण करण्यात आला व नंतर सभा बरखास्त झाली.



## मतदानात समानता

सरकारी योजनेप्रमाणे मागासलेले वर्ग (डिप्रेस्ड क्लासेस) हा हिंदू जातीचा एक भाग राहून त्यांना हिंदू मतदारसंघात समानतेच्या भूमिकेवरून मते देता येतील. शिवाय पहिली वीस वर्षे हिंदू जातीचा एक भाग राहूनही मागासलेल्या वर्गांना स्वतंत्र मतदारसंघामुळे आपल्या हक्कांचे व हितसंबंधाचे संरक्षण करता येईल. यास्तव सध्याचे स्थितीत त्या वर्गांना स्वतंत्र मतदारसंघ असणे आवश्यक आहे. ज्या ठिकाणी मागासलेल्या वर्गांना असे स्वतंत्र मतदारसंघ देण्यात येतील त्या ठिकाणी सर्वसाधारण हिंदू मतदारसंघातर्फे मत देण्याचा त्यांचा हक्क हिरावून घेण्यात येणार नाही, तर उलट हिंदू जातीतील त्यांचे स्थान अचल राहावे म्हणून त्यांना मतदानाचा हा दुबार हक्क देण्यात येत आहे. शिवाय आम्ही सर्व मागासलेल्या वर्गांचा समावेश सर्वसामान्य म्हणजे प्रायः हिंदू मतदारसंघातही केल्यामुळे त्यांचा असा परिणाम होणार आहे की, स्पृश्य हिंदू उमेदवाराला अस्पृश्य मतदारापुढे मतयाचना करावी लागेल व अस्पृश्य उमेदवाराला स्पृश्य मतदारांपुढे तशीच याचना करावी लागेल. अशारीतीने हिंदू समाजातील ऐक्य कायम राहील.

मागासलेल्या वर्गांना विभक्त मतदारसंघ देताना असाही एक विचार केला की, जबाबदार राज्यपद्धतीच्या प्रारंभकाली आपल्या गाऱ्हाण्यांना वाचा फोडण्यासाठी व विशिष्ट ध्येयाच्यां विरुद्ध होणाऱ्या निर्णयांना तोंड देण्यासाठी त्यांचे म्हणून स्वतंत्र उमेदवार नऊपैकी सात प्रांतात निवडून येणे अगत्याचे आहे. त्यामुळे त्यांच्यावर दुसऱ्याच्या ओंजळीने पाणी पिण्याचा प्रसंग येणार नाही. सध्याच्या काळी राखीव जागा ठेवून त्यासाठी प्रतिनिधी निवडण्याच्या प्रश्नाचा आम्ही विचार केला नाही. मुसलमानांना दिलेल्या जातवार स्वतंत्र मतदारसंघापेक्षा अस्पृश्यांना जो स्वतंत्र मतदारसंघ देण्यात आला आहे त्यामुळे त्यांचा असा फायदा होणार आहे की, मुसलमानाला सर्वसाधारण मतदारसंघातर्फे मत देता येणार नाही किंवा त्याला उमेदवार म्हणूनही उभे राहता येणार नाही. उलट कोणत्याही पात्र अशा अस्पृश्याला सर्वसामान्य मतदारसंघातर्फे मत देता येईल व उमेदवार म्हणूनही उभे राहता येईल. मुसलमानांना स्वतंत्र मतदारसंघामुळे ज्या जागा मिळाल्या आहेत त्या वाढण्याची काही आशा नाही. परंतु त्यांना बहुतेक सर्व प्रांतातून लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षा जास्त प्रतिनिधीत्व मिळालेले आहे. परंतु अस्पृश्यांच्या बाबतीत मात्र आम्ही जाणूनबुजूनच त्यांना लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षा कमी प्रतिनिधीत्व दिले आहे. असे करण्यात (म्हणजे विभक्त मतदारसंघ देण्यात) आमचा असा उद्देश आहे की, केवळ अस्पृश्यांतर्फे निवडलेले असे थोडेतरी त्यांचे प्रतिनिधी कायदेमंडळात निवडून यावे.

आपला संकेत तर मला असा दिसतो की, सरकारी योजनेमुळे निकृष्ट अवस्थेला पोचलेल्या अस्पृश्यांना आपल्यातर्फे बोलणारे आपले म्हणून प्रतिनिधी निवडण्याचा जो फायदा मिळणार आहे तो फायदा त्यांना मिळूच नये व त्याचसाठी प्रायोपवेशनासारखे भयंकर दिव्य आचरण्यास आपण तयार झाला आहा. आपले हे प्रायोपवेशन अस्पृश्यांना संयुक्त मतदारसंघ मिळावा यासाठी दिसत नाही कारण तो त्यांना देण्यात आलाच आहे. तसेच हिंदू समाजात ऐक्य राहावे म्हणून आपला हा निश्चय आहे असे म्हणावे तर तेही खोटेच. कारण सरकारी योजनेत त्याचीही तरतूद करण्यात आलीच आहे. या सर्व गोष्टींचा विचार करता, मला तर असे वाटते की, वस्तुस्थिती लक्षात न घेता आपण हे दिव्य आचरण्याचे ठरविले आहे. बरे, जातवारीच्या निर्णयाचा विचार न करता सर्व हिंदी लोकांनी हातपाय गाळून आम्हाला जेव्हा विनंती केली, तेव्हाच मनातून नसतानाही ब्रिटिश सरकारने अल्पसंख्यांकांचा प्रश्न हाती घेण्याचे आम्ही ठरविले. आता त्या निकालात एका अटीशिवाय फेरबदल होणे शक्य नाही व ती अट म्हणजे ही की, जातींनी मिळून एकमताने एक योजना केली तर ती सरकार मान्य करील.

सर सॅम्युअल होअर यांच्या पत्रासह सर्व पत्रव्यवहार प्रसिद्ध व्हावा अशी तुमची इच्छा आहे. याप्रमाणे तो प्रसिद्ध करण्यास माझीही संमती आहे. शेवटी आपल्याला माझी एवढीच विनंती की, सरकारी निर्णयाचा आपण पुनःएकवार साकल्येकरून विचार करून आपण जी भयंकर गोष्ट करण्यास सिद्ध झाला आहात तिची उपयुक्तता ठरवावी.

आपला,

(सही) जे. रॅम्से मॅक्डोनाल्ड ''[1]

### '' म. गांधींची प्रायोपवेशनाची प्रतिज्ञा

महात्मा गांधी यांनी मि. रॅम्से मॅकडोनाल्ड यांच्या वरील पत्राला ता. ९ सप्टेंबर १९३२ रोजी येरवडा तुरूंगातून पुढील आशयाचे पत्र पाठविले.

'' प्रिय मित्र,

आपण जे स्पष्ट व सविस्तर पत्र पाठविले त्याबद्दल मी आपला आभारी आहे. वाईट वाटते की, आपण माझ्या मनातही नसलेला अर्थ केला आहे. मागासलेल्या वर्गाच्या हिताचा बळी घेण्यास मी निघालो आहे हा जो आपण माझ्यावर आरोप करता त्याला सरळ उत्तर म्हणजे माझे हे दिव्य व्रतच होय. मला तर असा निश्चय करणे धर्म्य वाटते. अस्पृश्यांना दुबार मतदानाचा हक्क मिळाला एवढ्याच गोष्टीने हिंदू समाजात पडणारी दुफळी टळू शकत नाही. अस्पृश्यांना विभक्त मतदारसंघ दिल्यामुळे त्यांचा फायदा तर होणार नाहीच परंतु त्यामुळे हिंदू समाजात विष टोचल्याप्रमाणे मात्र झाले आहे. मला एवढेच म्हणावयाचे आहे की, जिव्हाळयाच्या व धर्ममूलक प्रश्नाचा निर्णय आपल्याला योग्य लावता येणे शक्यच नाही.

---

[1] तत्रैव : पृ. २३-२५.

अस्पृश्यांना वाजवीपेक्षा जास्त प्रतिनिधित्व देण्याच्याविरूद्ध मी जाणार नाही. ज्या गोष्टीचे शल्य मला बोचते ती गोष्ट म्हणजे हिंदू समाजापासून अस्पृश्यांना कायद्याने तोडून काढण्यात येत आहे. या सरकारी योजनेमुळे आजपर्यंत अस्पृश्योद्धाराची चळवळ ज्या महापुरुषांनी मोठ्या स्वार्थत्यागाने केली त्यांच्या प्रयत्नांवर पूर्ण विरजण पडणार आहे. त्यासाठीच प्रायोपवेशनाचे दिव्य अंगीकारण्यास मी तयार झालो आहे. माझ्या या व्रतासाठी मी अस्पृश्यांचाच तेवढा प्रश्न घेतला आहे. याचा अर्थ मात्र असा नव्हे की, आपल्या निर्णयातील इतर गोष्टी मला मान्य आहेत. माझ्या मते या निर्णयातील इतर बाबीही तितक्याच सदोष व आक्षेपार्ह आहेत.

आपला स्नेहांकित

(सही) एम्. के. गांधी ''[1]

'' गांधीजींनी आत्महत्त्येची जी प्रतिज्ञा केली आहे त्याविषयी आपल्याला काय वाटते असे वर्तमानपत्राच्या बातमीदारांनी डॉ. आंबेडकरांना विचारले असता ते म्हणाले :—

अन्नत्याग करून मी आत्महत्या करतो अशी गांधीजीने जी धमकी दिलेली आहे ती सरळ अगर प्रामाणिक युद्धाचा प्रकार नसून केवळ राजकारणातील हुलकावणीचा तो एक डाव आहे. आपल्या प्रतिस्पर्ध्याशी विचारविनिमय करण्याचा अगर त्यांचे मन वळविण्याचा हा सरळ मार्ग नव्हे अगर ही प्रामाणिक तऱ्हाही नाही. आणि त्यामुळे गांधीजींच्या या हुलकावणीचे मला महत्त्वही वाटत नाही व त्याचा माझ्या मनावर गांधीजीला इष्ट अगर अनुकूल असा परिणामही त्यामुळे होऊ शकत नाही.

माझा निर्णय आहे तो कायम आहे. हिंदूंच्या स्वार्थाकरता आपला प्राण पणास लावून गांधीजीला जर अस्पृश्य समाजाविरुद्ध संग्रामच करावयाचा असेल तर अस्पृश्य समाजालाही आपल्या हक्कांच्या प्राप्तीसाठी व संरक्षणासाठी आपल्या प्राणांचे बलिदान देण्यास सज्ज होणे भाग पडेल.

### गांधीजीने आपले म्हणणे स्पष्ट मांडावे

गांधीजींच्या आग्रहाचा आपण काहीच का विचार करणार नाही असे विचारले असता डॉ. आंबेडकर म्हणाले, की गांधीजींनी कशा करता आपला प्राण पणाला लावला आहे याचा स्पष्ट खुलासा त्यांनी जो पत्रव्यवहार प्रसिद्ध केला आहे त्यावरुन होत नाही. अस्पृश्यांकडून ते कशाची अपेक्षा करतात व अस्पृश्य समाजास हिंदुंच्या वतीने प्रत्यक्ष असे कोणते हक्क देण्यास ते तयार आहेत व त्यांच्या त्या देणगीला मान्यता देण्यास ज्या ' हिंदू धर्मा ' करता ते आपला प्राण ईरेस घालून राहिले आहेत तो हिंदू समाज कितपत तयार आहे याचा स्पष्ट व खात्रीलायक खुलासा होईपर्यंत मलाही या बाबतीत काही निश्चित सांगता येण्यासारखे नाही.'' [2]

---

[1] तत्रैव : पृ. २५-२६.

[2] जनता : १७ सप्टेंबर १९३२.

'' गांधीजींनी मुंबई सरकारला १५-९-३२ रोजी पत्र लिहून, आपण प्राणांतिक उपवास का करीत आहोत, ही भूमिका स्पष्ट केली. ते पत्र प्रसिद्धीसाठी वर्तमानपत्रांना २१ सप्टेंबरला देण्यात आले. माझा उपास फक्त अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांबाबत आहे आणि अस्पृश्यांच्या जीवनमरणाचा प्रश्न सर्वस्वी धार्मिक स्वरूपाचा असल्यामुळे आणि त्या प्रश्नावर मी आतापर्यंत माझे लक्ष केंद्रित केले आहे आणि तो प्रश्न धसास लावणे हे माझे परमपवित्र कर्तव्यकर्म असल्यामुळे मी हा उपास करीत आहे, असा गांधींजींनी या पत्रात खुलासा केला.

"My fast has a narrow application. The Depressed Classes question being predominently a religious matter, I regard it as specially my own by reason of life-long concentration on it. It is a sacred personal trust which I may not shirk".[1]

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी, गांधीजींनी घेतलेल्या आमरण उपोषणाच्या विरूद्ध आपली भूमिका स्पष्ट करणारे पत्रक प्रसिद्ध केले.

'' **बाबासाहेब आंबेडकरांचे जाहीर पत्रक**

सर्वपक्षीय पुढाऱ्यांच्या परिषदेच्या दिवशी म्हणजेच सोमवार दिनांक १९ सप्टेंबर १९३२ रोजी बाबासाहेब आंबेडकरांनी म. गांधींच्या आमरण उपोषणाच्या निमित्ताने आपली न्याय्य भूमिका विशद करणारे आणि गांधीजींचा उपवास, अस्पृश्यांचे हक्क व हितसंबंध यांच्याविरोधी कसा आहे हे दर्शविणारे पत्रक जाहीरपणे प्रसिद्ध केले. मूळ इंग्रजी पत्रकाचा हा मराठी अनुवाद---

ब्रिटिश सरकारने आपखुषीने अगर लोकमताच्या दडपणामुळे नाईलाजाने अस्पृश्य समाजाला दिलेला स्वतंत्र मतदार संघाचा हक्क जाहीरपणे जर रद्द केला नाही तर मी अन्नत्याग करुन प्राण देईन, ही गांधीजींची प्रतिज्ञा ऐकून मला खरोखरच विलक्षण आश्चर्य वाटले. महात्मा गांधींनी केलेल्या या आत्महत्त्येच्या संकल्पामुळे त्यांनी मला कसल्या विपरित व बिकट परिस्थितीत आणून सोडले आहे व माझ्यावर केवढ्या मोठ्या अरिष्टकारी जबाबदारीची घोरपड टाकली आहे याची कल्पना कोणालाही सहज होण्यासारखी आहे.

ज्ञातिविषयक निर्णयाचा प्रश्न इतर प्रश्नांच्या मानाने क्षुल्लक आहे असे गोलमेज परिषदेत गांधीजी प्रतिपादन करीत होते. मग त्यांच्या मते ' क्षुल्लक ' असलेल्या या प्रश्नासाठी त्यांनी आपला एवढा मोठा प्राण पणास का लावला हे मला समजत नाही ! त्यांच्यासारख्यांच्या दृष्टीने पाहता असले जातिविशिष्ट प्रश्न म्हणजे हिंदुस्थानच्या राज्यघटनात्मकरूपी पुस्तकाला जोडण्यात येणारे ते केवळ परिशिष्ट समजले पाहिजे ! जातिविशिष्ट प्रश्न हा काही त्या पुस्तकाचा मुख्य अगर महत्त्वाचा भाग समजला जात नाही. हिंदुस्थानला पूर्ण राजकीय स्वातंत्र्य मिळाले पाहिजे या मुद्यावर गांधीजींनी राऊंड टेबल परिषदेत केवढा तरी जोर दिला होता व या गोष्टीचा केवढा मोठा आग्रह धरला होता ! अशा या

[1] डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, पृ. २६.

राजकीय स्वातंत्र्यासारख्या मोठ्या प्रश्नासाठी गांधीजींनी जर आपला प्राण पणास लावला असता तरं ते रास्त तरी दिसले असते. पण राजकीय स्वातंत्र्यासारखे खुद्द त्यांच्याच मते मोठमोठ्या महत्त्वाचे असलेले अनेक प्रश्न तसेच टाकून अस्पृश्यांच्या मतदानाचा एक क्षुल्लक प्रश्न त्यातून मुद्दाम त्यांनी वेचून घ्यावा व त्याचे निमित्त करून आपला प्राण पणास लावावा ही गांधीजींची कृती म्हणजे तापदायी आश्चर्याचा एक उद्वेगजनक व खेदजनक नमुना आहे. स्वतंत्र मतदारसंघ एकट्या अस्पृश्य समाजालाच मिळाला आहे असे नाही. इंडियन खिश्चन, अँग्लो इंडियन यांना त्याचप्रमाणे मुसलमान, शीख यांनाही स्वतंत्र मतदारसंघ देण्यात आले आहेत. एवढेच नव्हे तर जमीनदार वर्ग, मजूर वर्ग व व्यापारी वर्ग यांच्याकरिताही खास अगर स्वतंत्र मतदारसंघाची योजना करण्यात आली आहे. अगदी आरंभी फक्त मुसलमान व शीख सोडून बाकी सर्वांच्या स्वतत्र मतदारसंघास गांधीजींनी हरकत घेतली होती व विरोध केला होता. आता केवळ मुसलमानास अगर शीखांसच नव्हे तर अस्पृश्यांबरोबर जमीनदार, व्यापारी, अँग्लो इंडियन, खिश्चन वगैरे वर्गासही स्वतंत्र मतदारसंघ देण्यात आले आहेत. गांधीजींना जर आता विरोधच करावयाचा होता तर त्यांनी तो निदान या सर्वांच्या स्वतंत्र मतदारसंघांना करावयास पाहिजे होता. पण त्या सर्वांना त्यांनी सोडले व एकट्या अस्पृश्य समाजाला मिळालेल्या या सवलतीचे निमित्त करून त्या योजनेविरूद्ध मात्र आपला प्राण पणास लावण्याचा संकल्प त्यांनी कायम केला.

अस्पृश्य समाजाला काही काळ स्वतंत्र मतदारसंघ दिल्याने मोठे अनर्थ कोसळतील अशाप्रकारची गांधीजींनी आपली जी भीतिप्रद समजूत करून घेतली आहे ती निव्वळ काल्पनिक आहे. मुसलमानांना व शीखांना स्वतंत्र मतदारसंघ दिल्याने जर राष्ट्राचे तुकडे उडतात असे गांधीजींना वाटत नाही व त्या बाबतीत जर ते कबूल होतात तर अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ मिळाल्याने हिंदू समाजाची शकले होतील असे सांगून या योजनेला प्राण जाईपर्यंत विरोध करणे गांधीजींना न्यायाचे अगर सुसंगतपणाचे कसे वाटले ? अस्पृश्य वर्गाखेरीज इतर समाजांना व वर्गांना स्वतंत्र मतदारसंघ मिळाले असता त्याविरूद्ध गांधीजींची सद्सद्विवेक बुद्धी उठावणी करीत नाही, पण एकट्या अस्पृश्यांना मिळालेल्या या सवलतीमुळे मात्र त्यांचीही सद्बुद्धी खडबडून जागी होते व प्राण इरेस घालून त्याविरूद्ध बंड पुकारते या न्यायनिष्ठुरपणाला काय म्हणावे ?

येऊ घातलेल्या स्वराज्याच्या अमदानीत बहुसंख्यांक वर्गाच्या जुलूमापासून अल्पसंख्यांक समाजाचे संरक्षण होण्यासाठी राजकीय हक्कांच्या खास सवलती जर कोणत्या एखाद्या समाजाला सर्वांच्या आधी व सर्वांच्या अधिक प्रमाणात मिळणे अत्यावश्यक असेल तर तो अस्पृश्य समाज होय. ही गोष्ट विचारी माणसाला पटलेली आहे अशी मला खात्री वाटते. अस्पृश्य समाज हाच एक असा वर्ग आहे की, सभोवार चाललेल्या जीवनकलहाच्या तीव्र झगड्यात टिकाव धरून जगण्यास त्याच्यापाशी बिलकूल त्राण नाही. ज्या धर्माचा त्याने आश्रय घेतला आहे व ज्या

धर्मबंधनांनी त्याला सर्वतोपरी जखडून टाकण्यात आलेले आहे त्या धर्मामुळे त्याचा सन्मान होण्याऐवजी उलट महारोग्याच्या किळसवाण्या अवस्थेला या धर्माने अस्पृश्य समाजाला आणून बसविले आहे. या धर्माने त्याची माणुसकीच कलंकित व खच्ची करून टाकलेली आहे. रोजच्या साध्या व्यवहारात सन्मानपूर्वक भाग घेण्याची योग्यताही या धर्माने अस्पृश्य समाजातील व्यक्तीच्या ठायी राहू दिलेली नाही. आर्थिकदृष्ट्या पाहताही अस्पृश्य समाज हा सर्वतोपरी परावलंबी असा एक वर्ग आहे. रोज लागणाऱ्या भाकरीच्या तुकड्यासाठी देखील उच्चवर्णीय हिंदूंवर त्याला अवलंबून राहावे लागते. स्वाभिमानपूर्वक अगर स्वतंत्ररित्या जगण्याचा अगर आपले पोट भरण्याचा एकही मार्ग अस्पृश्य समाजाला खुला नाही. या गुलामगिरीतून मुक्त होण्याची त्याला कधीही संधी मिळू नये म्हणून स्वावलंबनाचे व आत्मोन्नतीचे त्याचे सर्व मार्ग रोखून धरण्याचे खास प्रयत्न बुद्धिपुरःसरपणे करण्यात येत आहेत. स्पृश्य हिंदुंचे आपापसात कितीही जातीभेद असले तरी अस्पृश्यांनी वर डोके काढण्याचा थोडा जरी प्रयत्न केला तरी त्यांना दडपून टाकण्यास व त्यांच्यावर नाना तऱ्हेने जोरजुलूम करण्यास तेवढ्यापुरते तरी सारे स्पृश्य हिंदू निर्दयपणे एक होतात असा प्रत्येक खेड्यातील नेहमीचा प्रत्यक्ष अनुभव व जीवनक्रम आहे असे म्हटल्यास त्यात मुळीच अतिशयोक्ती नाही.

अशा परिस्थितीत सर्व विचारी व न्यायी माणसांनी तर उलट असे प्रयत्न केले पाहिजेत की ज्यामुळे या सर्वतोपरी नाडलेल्या व स्पृश्य हिंदुंच्या जुलूमाखाली सर्वस्वी दडपून गेलेल्या अस्पृश्य समाजास आत्मरक्षणासाठी व या तीव्र जीवनकलहाच्या झगड्यात त्याला तग धरता यावा म्हणून आधारादाखल राजकीय सत्तेचा थोडा फार हिस्सा निश्चितपणे त्याच्या पदरी पडेल.

माझी तर अशी अपेक्षा होती की, अस्पृश्य समाजाचा कोणताही खरा हितचिंतक त्या समाजाच्या हाती राजकीय सत्तेचा शक्य तितका अधिक हिस्सा पडावा म्हणून जीवापाड झटेल. पण गांधीजींची विचारसरणी पाहावी तो ती उलटी व विलक्षण दिसते आणि म्हणून मला त्यांच्या या चमत्कारिक विचारसरणीचा काहीच उलगडा होऊ शकत नाही. अस्पृश्य समाजाच्या हाती राजकीय सत्तेची सूत्रे शक्य तितक्या अधिक प्रमाणात आणण्यासाठी गांधीजी झटत तर नाहीच, पण उलट ब्रिटिश सरकारच्या ज्ञातिविषयक निर्णयामुळे जो अल्पसा का होईना पण राज्यसत्तेचा हिस्सा निश्चितपणे अस्पृश्य समाजाच्या हाती भावी राज्यघटनेत येऊ पाहत आहे, तो देखील अस्पृश्य समाजाच्या हातून हिरावून घेण्यासाठी आपला प्राण पणास लावून गांधीजींनी विरोध चालविलेला आहे। अस्पृश्य समाजाच्या पदरी राजसत्तेचा यत्किंचितही हिस्सा पडू नये व राजकीयदृष्ट्या त्यांचे अस्तित्व दृष्टिआड करावे एवढ्यासाठी गांधीजींनी

चालविलेली ही काही पहिलीच धडपड नव्हे. अल्पसंख्यांकांचा करारनामा (मायनॉरिटी पॅक्ट) अस्तित्वात येण्याच्या आधीपासूनच अस्पृश्यांना राजकीय सत्ता यत्किंचितही मिळू नये म्हणून मुसलमानांना हाती धरून गांधीजींनी खटपट करून पाहिली. अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांच्या मागणीला विरोध करण्यासाठी तुम्ही मला हातभार लावा म्हणजे मी तुमच्या चौदाच्या चौदा मागण्या मान्य करतो अशी खलबते गांधीजींनी मुसलमानांबरोबर केली! पण मुसलमान प्रतिनिधींच्या चांगुलपणामुळे गांधीजींचा तो प्रयत्न फसला. असल्या कृष्ण कारस्थानास पाठिंबा देण्याचे मुसलमानांनी नाकारले. मुसलमान जर गांधीजींना वश झाले असते तर अस्पृश्यांचा दुहेरी कोंडमारा झाला असता. गांधीजींच्या व मुसलमानांच्या विरोधी कात्रीत अस्पृश्य समाज सापडला असता, पण मुसलमान प्रतिनिधींनी गांधीजींची साथ करण्याचे नाकारल्यामुळे अस्पृश्य समाजावरील हे दुर्धर अरिष्ट टळले.

ज्ञातिविषयक निर्णयाला गांधीजींचा विरोध का असावा याचाच मुळी मला उलगडा होत नाही. गांधीजी म्हणतात की, या निर्णयामुळे अस्पृश्य समाज हिंदू समाजापासून विभक्त पडतो ! पण डॉ. मुंजे तर काही असे म्हणत नाहीत ! आणि डॉ. मुंजे म्हणजे कट्टे हिंदू व मोठे लष्करी बाण्याचे हिंदू हितसंरक्षक समजले जातात ! विलायतेहून आल्यानंतर डॉ. मुंजेंनी जी व्याख्याने दिली त्या सर्वांतून त्यांनी असा ध्वनी काढला आहे की, ब्रिटिश सरकारने दिलेल्या ज्ञातिविषयक निर्णयामुळे अस्पृश्य समाज हा हिंदू समाजापासून मुळीच अलिप्त झालेला नाही. उलट डॉ. मुंजे तर अशी बढाई मारीत आहेत की, ब्रिटिश सरकारने दिलेला हा निर्णय त्यांच्यासारख्यांच्या प्रयत्नाचे फल आहे व अस्पृश्य समाजाला राजकीयदृष्ट्या हिंदू समाजापासून अलिप्त करण्याचा डॉ. आंबेडकरांचा जो प्रयत्न होता तो ब्रिटिश सरकारने दिलेल्या या निर्णयामुळे फसला ! या निर्णयामुळे अस्पृश्य समाज हा हिंदू समाजापासून विभक्त होत नाही. या घटनेचे श्रेय डॉ. मुंजे म्हणतात त्याप्रमाणे त्यांच्या स्वतःकडे जरी जात नसले तरी ते जे म्हणतात हे काही खोटे नाही. ब्रिटिश सरकारने दिलेल्या या निर्णयामुळे डॉ. मुंजे म्हणतात त्याप्रमाणे मलाही वाटते की, अस्पृश्य समाज हिंदू समाजापासून राजकीयदृष्ट्याही विभक्त पडला जात नाही. असे असता या निर्णयामुळे अस्पृश्य समाज हिंदू समाजापासून अलिप्त पडतो ही गांधीजींची भीती निराधार व खोटी आहे. जी भीती डॉ. मुंजेसारख्या कट्टर हिंदू सभावाल्यांच्या दृष्टीला दिसत नाही ती भीती गांधीजीसारख्या राष्ट्रीय समजण्यात येणाऱ्या पुढाऱ्यांच्या दृष्टीला भासमान व्हावी व हिंदुंच्या हिताचे रक्षण करण्यासाठी या मुद्यावर त्यांनी आपला प्राण पणास लावण्यास उद्युक्त व्हावे हे खरोखरीच मोठे चमत्कारीक गूढच समजले पाहिजे ! डॉ. मुंजेसारख्यांना देखील ज्या निर्णयात वेगळेपणाचे भूत दिसत नाही त्या निर्णयात ते असल्याचा गांधीजींनी तर मग नुसता संशयही घ्यावयाला नको आहे.

ब्रिटिश सरकारच्यावतीने मुख्य प्रधान रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी जो निर्णय दिला आहे व त्यात अस्पृश्यांच्याबाबतीत जी योजना मुक्रर केली आहे ती माझ्या मते हिंदूंना संतुष्ट राखण्याजोगी आहे, इतकेच नव्हे तर रावबहादूर राजा, गवई, पी. बाळू वगैरे अस्पृश्य समाजात संयुक्त मतदार संघाचा पुरस्कार करणारे जे लोक आहेत त्यांनाही या निर्णयाला नाके मुरडण्याचे मुळीच कारण नाही. असे असता रावबहादूरांनी असेंब्लीतील आपल्या भाषणातून या सरकारी निर्णयाविरूद्ध जो गिल्ला माजविला व जी कुरकूर केली तीही एक पाहण्या-ऐकण्यासारखीच गंमत होती ! परवापर्यंत स्वतंत्र मतदार संघाचे अनन्य उपासक व उच्चवर्णीय हिंदुंच्या जातिभेदजनक जुलूमाचे कट्टे दुष्मन असलेल्या या रावबहादूरांच्या हृदयात संयुक्त मतदार संघाविषयी व उच्चवर्णीय हिंदूसंबंधी आता नव्याने उद्भवलेले एवढे अलोट प्रेम पाहून कोणाला बरे गंमत वाटणार नाही ? रावबहादूर राजांच्या ठायी उद्भवलेल्या या आकस्मिक प्रेमाच्या मुळाशी, राऊंड टेबल परिषदेत स्थान न मिळाल्यामुळे गमावलेल्या प्रसिद्धीच्या प्राप्तीची स्वाभाविक हाव कितपत आहे व या त्यांच्या नव्या प्रेमात प्रामाणिक हृदयपरिवर्तनाचा अंश कितीसा आहे याची छाननी मी तूर्त करू इच्छित नाही.

सरकारने दिलेल्या निर्णयाविरूद्ध रावबहादूर राजाने सध्या जी कुरकूर चालविलेली आहे तिच्यात त्यांनी पुढील दोन मुद्यांवर भर दिलेला आहे. अस्पृश्यांना त्यांच्या संख्येपेक्षा कमी प्रमाणात जागा मिळाल्या हा या निर्णयाविरूद्ध त्यांचा पहिला आक्षेप आहे आणि या निर्णयामुळे अस्पृश्य समाज हिंदूंपासून विभक्त झाला हा त्यांच्या शोकाचा दुसरा मुद्दा आहे. लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षा कमी जागा या निर्णयामुळे अस्पृश्य समाजाच्या पदरात पडल्या ही रावबहादूरांची तक्रार मलाही मान्य आहे. पण ह्या ज्या कमी जागा मिळाल्या त्याची जबाबदारी गोलमेज परिषदेला गेलेल्या आम्हा दोघा प्रतिनिधींवर आहे व आम्ही अस्पृश्य समाजाच्या हिताचा घात केला अशा प्रकारचे आरोप रावबहादूर राजांसारख्यांनी आमच्यावर करण्यापूर्वी आपण स्वतः सेन्ट्रल कमिटीवर असता काय दिग्विजय लावला याचा तरी थोडा विचार त्यांनी करावयाला पाहिजे होता. त्या कमिटीच्या रिपोर्टमध्ये मद्रासच्या वाटणीला १५० पैकी फक्त १०, मुंबईला ११४ पैकी फक्त ८, बंगाल मध्ये २०० पैकी ८ च, यु. पी. मधील अस्पृश्यांच्या वाट्याला १८२ पैकी ८, पंजाबमध्ये १५० पैकी फक्त ६, बिहार आणि ओरिसामध्ये १५० पैकी ६ च, मध्यप्रांत व वऱ्हाड मध्ये १२५ पैकी फक्त ८ व आसाममध्ये अस्पृश्य व इतर मागासलेल्या रानटी जातीकरिता म्हणून ७५ पैकी निव्वळ ९ अशी वाटणी केलेली आहे. ही विभागणी अस्पृश्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणानुसार पाहता किती तरी

भयंकर अपुरी आहे आणि रावबहादूर राजा याच कमिटीचे एक सभासद होते ! सरकारने दिलेल्या जातिविषयक निर्णयात अस्पृश्यांना कमी जागा मिळाल्या याबद्दलच्या दोषांचे खापर आमच्या माथी फोडण्यापूर्वी आपण स्वतः सेंट्रल कमिटीचे सभासद असताही वरील भयानक काट आपण बिनबोभाट कशी करू दिली व त्यावेळेस आकाशपाताळ एक का करून सोडले नाही याचा रावबहादूर राजापाशी समाधानकारक असा काय खुलासा आहे ? अस्पृश्यांना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात जागा मिळणे हा अस्पृश्य समाजाचा जन्मसिद्ध हक्क आहे व तो त्याला आत्मरक्षणासाठी पूर्णतः मिळणे ही अगदी आवश्यक व न बदलणारी अशी घटना आहे असे जर रावबहादूरांना वाटत होते तर मग तसे झालेच पाहिजे असा आग्रह धरून तो शेवटास नेण्याची सेन्ट्रल कमिटीचा सभासद म्हणून त्यांना जी संधी लाभली होती तिचा लाभ त्यांनी का करून घेतला नाही ?

सरकारने दिलेल्या निर्णयामुळे अस्पृश्य समाजाचा हिंदू समाजापासून तुकडा पाडण्यात आला या रावबहादूर राजाच्या तक्रारीत माझ्या मते काही अर्थ नाही. (डॉ. मुंजेना देखील तसे वाटत नाही). स्वतंत्र मतदारसंघाविरूद्ध रावबहादूर राजासारख्यांची सद्सद्विवेकबुद्धी जर हरकत घेत असेल तर स्वतंत्र मतदारसंघात उमेदवार राहण्याची अगर मत देण्याची जबरदस्ती या निर्णयामुळे त्यांच्यावर केली जात नाही. संयुक्त अगर सार्वत्रिक मतदारसंघात उमेदवार म्हणून निवडणुकीसाठी उभे राहण्याचा व मत देण्याचा असे दोनही हक्क या निर्णयाने त्यांच्यासारख्यांना देऊन ठेवले आहेत व त्याचा अनुभव घेण्याची त्यांना पूर्ण मुभा आहे. हिंदुंच्या दृष्टिकोनात आमुलाग्र बदल झाला आहे व अस्पृश्यांच्या बाबतीत या अवघ्या सहा सात महिन्यात (ते डॉ. मुंजेंना मिळाल्यापासून) स्पृश्य हिंदुंचे विलक्षण मतपरिवर्तन घडून आले असे रावबहादूर राजा अगदी आक्रोशपूर्वक व वेशीवर उभे राहून सर्वांना सांगत सुटले आहेत. या त्यांच्या नव्या सांगण्यावर ज्या अस्पृश्य लोकांचा विश्वास बसत नाही व जे स्वतंत्र मतदार संघाची मागणी करतात अशा लोकांची खात्री पटण्यासाठी तरी रावबहादूर राजासारख्यांनी संयुक्त मतदारसंघात उभे राहून निवडून येण्याची व स्वतंत्र मतदारसंघाची अस्पृश्यांना आवश्यकता नाही असे त्यायोगे सिद्ध करून दाखविण्याची ही संधी मुळीच दवडू नये. अस्पृश्य समाजाविषयी आम्हाला प्रेम व सहानुभूती वाटते असे म्हणणाऱ्या हिंदूंना देखील रावबहादूर राजासारख्यांना निवडून देऊन आपल्या म्हणण्याची सत्यता पटवून देण्याची संधी या निर्णयातील व्यवस्थेमुळे प्राप्त झालेली आहे.

सरकारने दिलेला हा निर्णय इतर बाबतीत जरी अपुरा असला तरी ज्यांना स्वतंत्र मतदार संघ पाहिजे त्यांचे व ज्यांना संयुक्त मतदार संघ पाहिजे त्यांचे असे दोघांचेही त्यात समाधान करण्याची व्यवस्था झालेली आहे आणि या दृष्टीने पाहता व अस्पृश्य समाजापुरतेच बोलावयाचे झाल्यास हा निर्णय म्हणजे तडजोडीच्या स्वरुपाचा (Compromise) आहे व दोन्ही पक्षाने त्याला मान्यता देणे इष्ट आहे.

गांधीजीविषयी म्हणाल तर त्यांना पाहिजे तरी काय हेच स्पष्टपणे समजत नाही. असे मानण्यात येते की, गांधीजी जरी स्वतंत्र मतदार संघाच्या विरूद्ध असले तरी ते संयुक्त मतदारसंघ व राखीव जागा देण्याच्या विरूद्ध नाहीत, पण ही मोठी भूल आहे. आज त्यांचे मत काय बदलले असेल ते असो. पण लंडनमध्ये असताना अस्पृश्यांना हिंदूंपेक्षा राजकीय असे वेगळे अगर स्वतंत्र अस्तित्व देणारी कोणतीच योजना आपल्याला पसंत नसल्याने त्यांनी अगदी स्पष्टपणे जाहीर केलेले होते. अस्पृश्यांच्या स्वतंत्र मतदारसंघासच नव्हे तर संयुक्त संघातील राखीव जागेच्या योजनेसही आपला प्राणांतिक विरोध असल्याचे त्यांनी लंडनला जाहीरपणे बोलून दाखविले होते. सार्वत्रिक मताचा अधिकार व सर्वसाधारण निवडणुकीत ते मत देण्याचा हक्क यापलिकडे अस्पृश्यांच्या खास हितरक्षणार्थ त्यांना कोणतीही कायदेशीर सवलत देण्यास गांधीजी तयार नव्हते. अशातऱ्हेचे धोरण त्यांनी तेथे असताना आरंभी स्वीकारले होते. पुढे माझ्याशी वाटाघाट करताना माझ्या समजुतीसाठी एक योजना त्यांनी शेवटी सादर केली. त्यांची ही योजना निरूपयोगी तर होतीच होती पण तिलासुद्धा कायद्याचे स्वरूप अगर पाठिंबा देण्यास त्यांची तयारी नव्हती.

गांधीजींच्या या योजनेप्रमाणे अस्पृश्य वर्गातील उमेदवाराने निवडणुकीसाठी उभे राहावे. उच्चवर्गातील दुसरेही उमेदवार अर्थात त्याच जागेकरता उमेदवार म्हणून उभे राहतील. पुढे निवडणूक होऊन तिच्यात अस्पृश्य उमेदवार निवडून आला नाही म्हणजे त्याने वाटल्यास या निवडणुकीच्या निकालाविरूद्ध अर्ज करावा. या अर्जाप्रमाणे, ' केवळ अस्पृश्य वर्गीय म्हणून हा उमेदवार निवडून आला नाही ' असा जर त्याला न्यायाधिशाकडून निकाल मिळाला तर गांधीजी म्हणाले की, निवडून आलेल्यापैकी एखाद्या उच्चवर्णीय हिंदूने आपल्या जागेचा राजीनामा द्यावा अशी मी व्यवस्था करीन. मग पुन्हा या पराभूत अस्पृश्य उमेदवाराने अगर वाटल्यास दुसऱ्याने निवडणुकीला पुन्हा उभे रहावे ; व पुन्हा तो पडल्यास त्याने वाटल्यास प्रथम केला होता तसाच अर्ज वगैरे करून व तसाच निर्णय मिळवून पुन्हा निवडणुकीची ही शर्यत खेळावी. याप्रमाणे गांधीजींची

ही योजना म्हणजे पुन्हा पडा व पुन्हा उभे राहा, अशा प्रकारचा एक पोरकट खेळच होता ! गांधीजींची ही योजना मी आज प्रकट क़रण्याचे कारण इतकेच की, संयुक्त संघ व राखीव जागा अस्पृश्यांनी स्वीकारल्यास गांधीजींच्या सद्सद्विवेक-बुद्धीचे समाधान होईल असे जे पुष्कळांना वाटते ते कसे निराधार आहे हे सर्वांच्या ध्यानी यावे. गांधीजींनी आता एखादी नवी योजना तयार केली असल्यास ती त्यांनी आधी सादर करावी असा मी जो आग्रह धरला आहे तो एवढ्याचसाठी होय. गांधीजींचे जुने म्हणणे व जुनी योजना काय आहे ते सारे मला माहीत आहे व त्याला काय उत्तर द्यावयाचे तेही मी देऊन ठेविले आहे. त्या जुन्या गोष्टीचा काथ्याकूट करीत बसण्यात अर्थ नसल्यामुळे गांधीजींनी आपले नवे म्हणणे असल्यास ते सादर करावे असा माझा आग्रह आहे.

गांधीजी अगर कॉंग्रेस यांना जे योग्य व न्यायाचे दिसेल तेच अस्पृश्य समाजाच्या बाबतीत घडेल या नुसत्या शाब्दिक आश्वासनाचा मला स्वीकार करता येणे शक्य नाही हे मी प्रथमतःच सांगून ठेवतो. माझ्या अस्पृश्य बांधवांच्या हितसंरक्षणासारखा महत्त्वाचा व जिव्हाळ्याचा प्रश्न नुसत्या शाब्दिक आश्वासनावर व कागदी करारनाम्यावर विसंबून ठेवण्यास मी तयार होणे शक्य नाही. गांधीजी महात्मा असले तरी ते काही अमर नाहीत, अगर सर्वव्यापी नाहीत व कॉंग्रेसही वरच्या वर्गाच्या वैभवासाठी, गोरगरीब वर्गांना पायदळी व आपल्या हुकमतीखाली ठेवू पाहणारी अशी एक अरिष्टकारी संस्था नाही असे जरी मानले तरी तिचे मोठेपण व वजन कायम टिकणारे आहे असेही मुळीच नाही. अस्पृश्यता नष्ट करावी व अस्पृश्य जनतेला हिंदू समाजात आत्मसात करून घ्यावे म्हणून प्रयत्न करणारे उदंड महात्मे या भूमीत आतापर्यंत जन्मून गेले, पण त्यापैकी कोणालाही यश आले नाही. अनेक महात्मे अवतरले व अनेक निमाले पण अस्पृश्य मात्र अस्पृश्यच राहिले.

हिंदू सुधारकांच्या सुधारणेची गती सरड्याच्या धावेप्रमाणे कशी मर्यादित आहे व त्यांचा विश्वास कसा अवसानघातकीपणाचा आहे याचा प्रत्यक्ष अनुभव महाड व नाशिकला जे प्रकार घडले त्यावरून मला आलेला आहे. असे असल्यामुळे अस्पृश्यांचे जे निःपक्षपाती व विचारी हितचिंतक आहेत ते हिंदूतील अशा या अवसानघातकी सुधारकांच्या हाती अस्पृश्यांचे भवितव्य निर्धास्तपणे सोपवा असा सल्ला कधीही देणार नाहीत. आपल्या जातभाईंचे मन दुखवू नये अगर त्यांचा रोष होऊ नये म्हणून जे सुधारक ऐन आणीबाणीच्या वेळी आपल्या तत्त्वाशी बेईमान होतात त्यांचा अस्पृश्यांना मुळीच उपयोग नाही.

अशी वस्तुस्थिती असल्यामुळे माझ्या लोकांच्या हितार्थ कायदेशीर संरक्षण बंधनाचा आग्रह धरणे मला भागच आहे. जातिविषयक निर्णय बदलला जावा असा गांधीजींचा जर आग्रह असेल तर त्यांनी दुसरी योजना सादर केली पाहिजे व आज जे काही अस्पृश्यांना मिळाले आहे त्यापेक्षा आपल्या या योजनेत अस्पृश्यांचे अधिक हित आहे व ते हित अंमलात येण्यासाठी लागणारी सर्व कायदेशीर तरतूद त्या योजनेत आहे असे त्यांनी सिद्ध करून दाखविले पाहिजे. मला आशा वाटते की, गांधीजींनी जो निर्वाणीचा मार्ग धरला आहे तो ते सोडून देतील. स्वतंत्र मतदारसंघाची मागणी करण्यात हिंदू समाजाचे अहित करावे असा आमचा बिलकूल हेतू नाही. आमचे भवितव्य आमच्या हाती असावे. स्पृश्य हिंदुंच्या खुषीवर अगर त्यांच्या गोड लहरीवर आमचे भवितव्य पूर्वीप्रमाणे सर्वस्वी अवलंबून असू नये या एकाच हेतूने प्रेरित होऊन आम्ही ही मागणी केलेली आहे. चुका अगर पाप करण्याचा देखील आम्हाला अधिकार आहे असे इंग्रज राज्यकर्त्यांना उद्देशून गांधीजी म्हणतात. आम्हालाही तो अधिकार आहे व असला पाहिजे एवढेच आम्ही गांधीजींना सांगू इच्छितो आणि आमचा अधिकार हिरावून घेण्याचा ते प्रयत्न करणार नाहीत अशी आम्ही अपेक्षा करतो.

अन्नत्याग करून प्राण समर्पण करण्याची आपली दुर्धर प्रतिज्ञा त्यांनी दुसऱ्या एखाद्या थोर कार्यासाठी राखून ठेवावयाची होती. हिंदू व मुसलमान अगर स्पृश्य व अस्पृश्य या वर्गामधील दंगे धोपे अगर रक्तपात थांबविण्यासाठी गांधीजी जर अशी घोर प्रतिज्ञा करते तर तिचे स्वाभाविकत्व व महत्त्व मी समजू शकलो असतो. या आजच्या प्रतिज्ञेमुळे अस्पृश्य समाजाचे हित होईल अगर त्यांच्या दुःखाचा भार कमी होईल असे मुळीच नाही. गांधीजींना या परिणामाची जाणीव असो वा नसो पण त्यांच्या कृत्याचे पर्यवसान शेवटी अत्याचारात होईल. सर्व देशभर अस्पृश्य जनतेचा त्यांच्या हिंदू अनुयायांकडून व चाहत्यांकडून अनन्वित छळ होईल, पण या जबरदस्तीने ते हिंदू समाजाला चिकटून न राहता उलट चिडून दूर मात्र जातील. तुम्हाला हिंदू समाज पाहिजे की राजसत्तेचा हिस्सा पाहिजे असा जर प्रश्न गांधीजींनी अस्पृश्यांना विचारला तर मला खात्री आहे की, हिंदू समाजापेक्षा राजकीय सत्तेचेच आम्हाला अधिक महत्त्व वाटते असे त्यांना बिनचूक सांगण्यास व अशातऱ्हेने आत्महत्त्येच्या प्रतिज्ञेपासून त्यांना वाचविण्यास अस्पृश्य जनता एकदम तयार होईल. या सर्व गोष्टींचा या अशा परिणामाच्या दृष्टीने गांधीजी जर शांतपणे विचार करतील तर अशा उपायांनी आपला होणारा हा जयजयकार अगर आपल्या प्रतिज्ञेची होणारी ही विजयशाली पूर्तता संपादन करण्याच्या अगर प्राप्त करून घेण्याच्या किंमतीची अथवा लायकीची आहे असे गांधीजींनासुद्धा वाटेल की नाही याबद्दल मला शंका वाटते.

विचार करण्याजोगी याहीपेक्षा चिंतेची गोष्ट म्हटली म्हणजे गांधीजी आपल्या या कृत्यामुळे हिंदू जनतेतील अनिवार व मुर्दाड अशा विकारांना मोकाट सोडून राहिले आहेत. स्पृश्य व अस्पृश्य यामधील द्वेषबुद्धीची त्यांच्या या कृत्यामुळे खच्ची न होता उलट वृद्धि होणार आहे. उभय समाजातील परकेपणाचे अंतर भरून निघण्याऐवजी या प्रकारामुळे ते अधिक वाढणार आहे. कारण गोलमेज परिषदेत अस्पृश्यांच्या वतीने गांधीजींच्या धोरणास मी विरोध करताच माझ्याविरूद्ध या देशात सर्वत्र एकच गिल्ला करण्यात आला. ' राष्ट्रीय ' म्हणविल्या जाणाऱ्या सर्व उच्चवर्णीय हिंदू पत्रकारांनी व देशभक्तांनी मला ' राष्ट्रद्रोही ' वगैरे अनेक शिव्या देण्याचा व माझ्याविषयी करता येईल तितका गैरसमज उत्पन्न करण्याचा जणू काय विडाच उचलला होता. माझ्याविरूद्ध सर्व अस्पृश्य समाज आहे असे जगाला भासविण्यासाठी स्पृश्यवर्गीय हिंदू सुधारकांनीसुद्धा नाना तऱ्हेच्या खोट्या संस्था निर्माण केल्या व कधी न भरलेल्या सभांचेही मोठमोठे बनावट रिपोर्ट तयार करून ' राष्ट्रीय ' पत्रातून त्यांना प्रसिद्धी देण्याची चढाओढ चालविली. माझ्या वतीने येणाऱ्या तारा व पत्रव्यवहार दडपून टाकण्याचा व त्यांना प्रसिद्धी न देण्याचा सर्व ' राष्ट्रीय ' पत्रांनी जणू काय कटच केला होता.

अस्पृश्य वर्गातील काही लोकांना ' सिल्व्हर बुलेट ' (द्रव्या) चे आमिष दाखवून माझ्याविरूद्ध ओरड करण्यास उभे करण्यात आले. काही ठिकाणी स्पृश्य व अस्पृश्य समाजात झटापटी होऊन थोडेफार रक्तपातही झाले, हे सर्व अनिष्ट व अनर्थकारी प्रकार पूर्वीपेक्षाही मोठ्या प्रमाणात घडावे अशी गांधीजींची इच्छा नसल्यास त्यांनी कृपा करून या सर्व गोष्टींचा शांतपणे फेरविचार करावा व भावी अनर्थ परंपरा टाळावी. असे घडावे हे गांधीजींना पाहिजे असेल असे मला वाटत नाही. पण जर त्यांनी आपली ही प्राणघातकी प्रतिज्ञा मागे घेतली नाही तर आपल्या या कृतीचे भयंकर परिणाम घडू नयेत अशी त्यांची कितीही इच्छा असली तरी तिचा काही उपयोग होणार नाही. दिवस मावळल्यावर रात्र यावी हे जितके स्वयंसिद्ध आहे तितकेच गांधीजींच्या या प्रतिज्ञेचे पर्यवसान शेवटी अत्याचारात व सर्व प्रकारच्या अनर्थात व्हावे हे स्वाभाविक आहे. शेवटी सर्व जनतेच्या निदर्शनास एक गोष्ट मी प्रामुख्याने आणू इच्छितो आणि ती ही की, या बाबतीत कोणाशीच चर्चा करण्याचे मला कारण नाही असे म्हणण्याचा जरी मला पूर्ण हक्क असला तरी केवळ गांधीजींसाठी म्हणून या प्रश्नाच्या बाबतीत त्यांच्या कोणत्याही नव्या योजनेचा विचार करण्यास मी तयार आहे आणि मला आशा वाटते की, गांधीजींचा प्राण व माझ्या लोकांचे हक्क या दोहोंपैकी कोणत्या तरी फक्त एकाच गोष्टीची निवड करण्याचा दुर्धर व नाजूक प्रसंग गांधीजी माझ्यावर येऊ देणार नाहीत. कारण तसाच प्रसंग आल्यास मी कोणत्या गोष्टीची निवड करीन हे

न सांगताही समजण्यासारखे आहे. काही झाले तरी स्पृश्य हिंदुंच्या हवाली माझ्या लोकांचे भवितव्य सोपविण्यात मी कदापिही कबूल होणार नाही. ''[१]

'' अस्पृश्यांना स्वतंत्र मतदार संघ मिळाल्यास मी माझा प्राण पणास लावीन ही आपली घोषणा ता. २० सप्टेंबर १९३२ पासून प्रत्यक्ष अंमलात आणण्याचे महात्माजींनी ठरविल्यामुळे अखिल हिंदुस्थानातील हिंदू पुढाऱ्यांची तातडीची परिषद ता. १९ सप्टेंबर १९३२ रोजी भरविण्याचे ठरले. म. गांधींसारख्या हिंदुस्थानातील सर्वश्रेष्ठ मानिलेल्या पुढाऱ्याचा प्राण पणास लागलेला पाहताच बनारसहून पंडित मालवीयजी मुंबईस आले. राजेंद्रप्रसाद, सी. राघवाचार्य, पंडित कुंझरु, डॉ. मुंजे, टी. प्रकाशम, डॉ. चौथिराम, स्वामी सत्यानंद, मि. अणे वगैरे निरनिराळया प्रांतांचे प्रतिनिधी हजर राहिले. अस्पृश्य समाजापैकी रा. ब. एम. सी. राजा, गवई, मि. शिवराज, मि. जगन्नाथम, मि. धर्मलिंगम, मि. मंडल वगैरे परप्रांताची मंडळी आली होती. मुंबई प्रांतातर्फे सर चुनिलाल, डॉ. आंबेडकर, डॉ. सोळंकी, हिराचंद वालचंद, सर सेटलवाड, सर माडगावकर, सर पुरूषोत्तमदास, श्री. देवधर, मि. नटराजन, रा. ब. वैद्य, डॉ. देशमुख, दळवी, सुभेदार, शेट बिर्ला, मि. करंदीकर, सावरकर, शिवतरकर, पी. बाळू, निकाळजे वगैरे मंडळी हजर होती. भगिनीवर्गातर्फे मिसेस कमला नेहरू, पेरनी कॅप्टन, मोशोन कॅप्टन, सौ. अवंतिकाबाई गोखले, मिसेस अन्नपूर्णाबाई देशमुख, रतनबेन मेहता, मिस नटराजन वगैरे हजर होत्या.

सभेचे ठिकाण '' इंडियन मर्चन्टस् हॉल '' हे ठरविले होते. ह्या परिषदेवर म. गांधींच्या जीविताचे भवितव्य अवलंबून असल्यामुळे परिषदेमधील एकंदर वातावरण फारच गंभीर स्वरुपाचे दिसत होते. ह्या परिषदेची सारी भिस्त डॉ. आंबेडकर यांच्याच धोरणावर अवलंबून होती. डॉ. आंबेडकर परिषदेला नक्की हजर राहणार असे कळताच परिषदेच्या चालकांना व परिषदेला हजर असलेल्या पुढारी मंडळींना एक प्रकारचे समाधान वाटले. परिषदेचा नक्की कार्यक्रम प्रथम काहीच ठरविलेला नव्हता.

प्रत्येक पक्षातील पुढाऱ्यांमध्ये एकप्रकारची खळबळ उडालेली दिसत होती. कोण काय बोलतो आणि परिषदेच्या हेतूला अनुसरुन कोणत्या प्रकारची तडजोड होणे शक्य आहे इकडे सर्वांचे लक्ष वेधून राहिलेले होते. परिषदेच्या कार्यक्रमाला उपयोगी पडण्यासाठीचें डॉ. आंबेडकर यांनी स्पष्ट आणि निर्भीड म्हणणे सर्व वर्तमानपत्रांना जाहीरनाम्याच्या द्वारे कळविले होते. डॉक्टरांचे ' स्टेटमेंट ' वाचून जमलेल्या पुढाऱ्यांना पुढील कामकाजाची रुपरेषा आखण्यास व विचार करण्यास सुलभ झाले होते.

---

[१] जनता : २४ सप्टेंबर १९३२.

परिषदेची सुरवात होण्यापूर्वी श्री. हिराचंद वालचंद यांनी एकंदर कार्याची अंधुक रुपरेषा सांगून पंडित मालवीयजींना अध्यक्षस्थान स्वीकारण्यास विनंती केली. पंडितजींच्या चेहऱ्यावर एकप्रकारची गंभीर छटा पसरली होती. ह्या परिषदेचे कार्य जितके महत्त्वाचे होते तितकेच ते गंभीर स्वरुपाचे होते. पंडितजींनी भाषणास सुरवात केली आणि सर्व पुढाऱ्यांना ह्या बिकट परिस्थितीतून सुलभ असा तडजोडीचा मार्ग शोधून काढण्याची आवश्यकता सांगितली. म. गांधींचे प्राण वाचविणे हे एक ध्येय पुढे ठेवून काही तरी उभयपक्षास मान्य होणारी योजना निर्माण होईल, अशा आशयाचे विचार प्रगट करण्याविषयी विनंती केली.

पंडितजींच्या विनंतीवरून प्रथम डॉ. आंबेडकर बोलावयास उठले. त्यांनी आपले प्रामाणिकपणाचे मत कोणत्याही भीडेस बळी न पडता परिषदेपुढे मांडले. त्यांनी आपली बाजू परिषदेपुढे मांडताना सांगितले की,

'' ह्या परिषदेच्या कार्यक्रमावरुन पाहता ही परिषद भरविण्याचे प्रयोजन आहे, असे मला वाटत नाही. आमच्या मागण्यांना म. गांधींचा विरोध असून त्याकरिता त्यांनी आपले प्राण पणास लाविले आहे. म. गांधीजींचे मौल्यवान प्राण वाचविले जावे असे प्रत्येकाला वाटणे साहजिकच आहे, परंतु आपले प्राण पणास लाविण्यापूर्वी गांधीजींनी दुसरी एखादी स्पष्ट योजना प्रथम जनतेपुढे मांडावयास पाहिजे होती. आजच्या परिस्थितीचा एकंदर विचार करता मला असे स्पष्टपणे वाटते की, गांधीजींच्या नवीन योजनेशिवाय कोणत्याही प्रकारचे तडजोडीचे मार्ग फोल आहेत आणि अगदी उघडपणे सांगायचे म्हणजे यापुढे ठरवावयाचे असे काहीच राहिलेले नाही. या परिषदेने कितीही काथ्याकूट केला तरी म. गांधींचे खरे म्हणणे काय आहे हे प्रथम अगदी स्पष्टपणे कळल्याशिवाय मला तरी काहीच नवीन मार्ग दिसत नाही आणि मी तुम्हा सर्वांना बजावून सांगतो की, या परिषदेच्या चालकांच्या किंवा येथील कोणाही पुढाऱ्यांच्या योजनेला मी बिलकूल बांधलेला नाही, फक्त म. गांधींचे म्हणणेच मी विचारात घेणार आहे. त्यांची योजना मला कळल्याशिवाय मी तरी उत्तर काय देणार ? त्यांचे म्हणणे काय आहे हे अगोदर आणा म्हणजे मी पुढे विचार करीन. तसेच त्यांचे जे काही म्हणणे असेल ते तुम्हांपैकी, स्पृश्य पुढाऱ्यांनी त्यांचे प्रतिनिधी म्हणून मजपुढे आणिले तरच मी त्याचा विचार करीन. कोणाही अस्पृश्य पुढाऱ्यांच्या वतीने आलेल्या त्यांच्या योजनेचा मी केव्हाही स्वीकार करणार नाही, हे प्रथम बजावून सांगत आहे. म. गांधींचे प्राण वाचविण्यासाठी मी माझ्या बांधवांच्या न्याय्य हक्काला हरताळ फासण्यास कारणीभूत होणार नाही. ''

डॉ. आंबेडकरांचे भाषण फारच जोरदार व परिणामकारक असे झाले. त्यांच्या भाषणानंतर रा. ब. राजांचे भाषण झाले. त्यांनीही म. गांधीजींच्या नवीन

योजनेशिवाय आपणास स्पष्ट असे मत प्रदर्शित करता येत नाही असेच सांगितले. मि. पी. बाळू यांच्या अंगी खरेच स्वाभिमानाची इतकी उणीव असेल असे आम्हाला कधीच वाटले नव्हते. स्पृश्य जनतेपुढे नम्रता प्रगट करण्याची सीमा सोडून झालेले त्यांचे भाषण फोल होते. त्यांना आपण ओव्हर बाऊन्डरी मारली की काय असे वाटले असावे. मद्रासचे शिवराज, मि. नटराजन, मि. दळवी, मि. मंडल, मि. करंदीकर, डॉ. मुंजे, सौ. गोखले, पंडित कुंझरु वगैरे पुढाऱ्यांची भाषणे झाली. मुंबईतील पुढाऱ्यांचे एक शिष्टमंडळ पुण्यास म. गांधीजींची भेट घेण्यास व त्यांचे म्हणणे हिंदू पुढाऱ्यांच्या परिषदेस कळविण्यासाठी गेले होते. त्यांच्या आगमनानंतर म. गांधीजींच्या मिळणाऱ्या निरोपानुसार पुढील कार्यक्रम आखण्याचे ठरवून परिषदेची बैठक दुसऱ्या दिवसापर्यंत तहकूब ठेवण्यात आली.

सोमवारी पहिल्या दिवसाची बैठक संपल्यानंतर रात्री पुण्यास गेलेले शिष्टमंडळ आले. या शिष्टमंडळाची व तेजबहादूर सप्रू, बॅ. जयकर, सी. राघवाचार्य, मि. बिर्ला वगैरे मंडळीबरोबर रात्री १२ वाजेपर्यंत बिर्ला हॉलमध्ये विचारविनिमय झाला. या खाजगी बैठकीत म. गांधीजींच्या नवीन योजनेची चर्चा झाली.''[१]

'' मंगळवार २० सप्टेंबर १९३२ ला दुपारी बाराचे ठोके पडल्यावर गांधीजींनी उपवास सुरु केला, तेव्हा त्यांनी तेथेच वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधींना मुलाखत देऊन आपण प्राणांतिक उपास का करणार आहोत, याबद्दल खुलासा केला. तो ' टाइम्स ऑफ इंडियाच्या ' २१ सप्टेंबरच्या अंकात प्रसिध्द झाला होता. आपला प्राणांतिक उपास मानवी धर्माच्या संरक्षणार्थ (A fight for humanity ) असे त्यांचे म्हणणे होते, माझा उपास अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ नसावेत म्हणून आहे. अस्पृश्यांना घटनात्मक राखीव जागा द्याव्यात याविरुध्द नाही. ( My fast is only against separate electorates and not against statutory reservation of seats ) ''[२]

'' वाटाघाटी करण्यासाठी सर तेजबहादूर सप्रू, बॅ. जयकर, पंडित मालवीय, मथुरादास वसनजी यांची स्पृश्य वर्गाचे प्रतिनिधी म्हणून समिती नेमण्यात आली होती. या दिवशी बॅ. जयकरांकडून डॉ. आंबेडकर यांना सकाळी दहा वाजता बिर्ला हाऊसमध्ये आगाऊ बोलविण्यात आले. त्याप्रमाणे डॉ. आंबेडकर, डॉ. सोळंकीबरोबर गेले. बिर्ला हाऊसमध्ये बॅ. जयकर, तेजबहादूर सप्रू व पंडित मदनमोहन मालवीय यांच्याबरोबर म. गांधीजींच्या नवीन योजनेवर चर्चा झाली व ह्या नवीन योजनेच्या आधारावर केवळ तडजोड म्हणून एक तात्पुरती योजना ठरविण्याचे ठरले.

[१] जनता : २४ सप्टेंबर १९३२.

[२] भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड ५ वा., पृ. ४२.

दुपारी बरोबर बारा वाजता दुसऱ्या दिवसाच्या कामकाजाला सुरवात झाली. परंतु आज विशेष चर्चा न करता एक लहानशी कमिटी नेमून तडजोडीने निर्माण होणारा निर्णय तयार करावयाचा असे आगाऊच ठरले होते. प्रथम पुण्यास गेलेल्या शिष्टमंडळाच्या प्रतिनिधींपैकी सर चुनिलाल मेथा यांनी म. गांधीजींच्या नवीन तडजोडी विषयीचा निर्णय परिषदेपुढे मांडिला. आज बैठकीला सर तेजबहादूर सप्रू, जयकर वगैरे मंडळी हजर होती. अध्यक्ष पंडित मालवीय यांनी सभेला सुरुवात करण्यापूर्वी सभेचे काम शक्य तितक्या आटोपशीर-रितीने पार पाडण्यासाठी व निष्कारण अधिक चर्चा न करता पुढील जबाबदारीच्या कामासाठी एक लहानशी कमिटी नेमून परिषद पुन्हा तहकूब करणे किती आवश्यक आहे हे सर्वांना पटवून दिले. नंतर सर चुनिलाल यांनी म. गांधीजींचे म्हणणे पुढीलप्रमाणे परिषदेपुढे मांडले,—

(१) म. गांधी अस्पृश्यांना स्वतंत्र मतदार संघ देण्याच्या निर्णयाविरुध्द आहेत.

(२) तसेच संयुक्त मतदार संघ व राखीव जागा या योजनेला सर्वस्वी क़बूल नाहीत. तरीपण मुंबईस भरलेल्या अखिल हिंदुंच्या परिषदेत राखीव जागासंबंधी एक ठराविक निर्णय तयार केल्यास त्याला माझी हरकत नाही, पण त्याला मान्यता आहेच असे म्हणता येणार नाही. एखादा पॅक्ट ठरलाच तर मग मी कदाचित माझी अनुमती देईन. मध्यंतरी सर चुनीलाल यांनी राखीव जागाविषयी समाधानकारक खुलासा न केल्यामुळे सर सेटलवाड यांना स्पष्ट खुलासा करणे भाग पडले होते.

महात्मा गांधीजींच्या योजनेनंतर डॉ. आंबेडकर हे बोलावयास उठले. त्यांचे आजचे भाषण फारच तडफदार व हृदयस्पर्शी असे झाले. ते म्हणाले,

आजच्या बिकट परिस्थितीच्या वाटाघाटीत माझी सर्वांच्यापेक्षा फारच चमत्कारिक स्थिती आहे. शांततेच्या ह्या सर्व तडजोडीत दुर्दैवाने केवळ माझ्या लोकांच्या न्याय्य हक्कांच्या संरक्षणासाठी मला खलनायकाची भूमिका घेण्याची पाळी येत आहे. माझ्या न्याय्य व लोकहिताच्या कामगिरीमध्ये मला कितीही त्रास झाला, इतकेच नाही तर जवळच असलेल्या एखाद्या रस्त्यावरील कंदिलाच्या खांबावर मला कोणी तात्काळ फाशी दिली तरी मी त्याची मुळीच पर्वा बाळगणार नाही. आजचा प्रश्न नुसता भावनांना वश होऊन सोडविण्याचा नसून गुलामगिरीत खितपत असलेल्या असंख्य समाजबांधवांच्या न्याय्य हक्कांसाठी सनदशीर मार्गाने सोडवावयाचा प्रश्न आहे. येथे नुसता सद्सद्विवेक बुध्दीचा विचार करून भागणार नाही ; आणि म. गांधींची योजना विचारात घेता तिचा विचार क़रण्यासाठी थोडासा कालावधी लागेल. तरी महात्मा गांधींना परिषदेने ठराव करून १०-१२ दिवस उपोषण करण्याचे थांबविण्यास सांगणे. परंतु अध्यक्ष पंडित मालवीयजींनी ती गोष्ट अगदीच अशक्य असल्याचे सांगितले.

याप्रमाणे आपण सर्वस्वी स्वतंत्र मतदार संघ सोडण्यास तयार नाही असे डॉ. आंबेडकर यांनी सांगितले. कोणत्या ना कोणत्या स्वरूपात तरी स्वतंत्र मतदार संघ असल्याखेरीज तडजोड होत नाही हे त्यावेळी सर्वांना कळून चुकले आणि म्हणून सायमन कमिशनचे सभासद मेजर ॲट्‌ले यांनी सायमन कमिशनच्या रिपोर्टास जोडलेल्या मतपत्रिकेत मुसलमान लोकांचा स्वतंत्र मतदारसंघ टाळण्याकरिता प्रायमरी निवडणुकीची जी योजना केली होती ती मान्य करण्यात आली. यानंतर स्वतंत्र मतदारसंघ सोडून दिल्याबद्दल अस्पृश्य वर्गाच्या होणाऱ्या नुकसान भरपाईकरिता आपल्याला कम्यूनल अवार्डपेक्षा जादा सवलती मिळाल्या तरच आपण तडजोड करू असे डॉ. आंबेडकर यांनी कमिटीच्या सभासदांना सांगितले व कमिटीने आपण त्यांचा विचार करू असे अभिवचन दिले.

चर्चा त्वरित करण्यासाठी मालवीयजींनी एक लहानशी कमिटी नेमण्याविषयी सुचविले व तिची नावे त्यांनी परिषदेला कळविली. या कमिटीत सर तेजबहादूर सप्रू, बॅ. जयकर, पंडित मालवीय, मथुरादास वसनजी व डॉ. आंबेडकर यांचा समावेश करण्यात आला.

डॉ. आंबेडकरांनी आपली सर्व योजना लिहून आणावी व रात्री नऊ वाजता पुन्हा कमिटीची बैठक बिर्ला हॉलमध्ये भरावी असे ठरले. त्याचप्रमाणे जर डॉ. आंबेडकर यांची योजना पसंत पडली तर बुधवारी सकाळी डॉ. आंबेडकर व कमिटीचे सभासद यांनी पुण्यास जाऊन म. गांधींपुढे ती मांडावी. मध्यंतरी कमिटीच्या सभासदांनी डॉ. आंबेडकर यास प्रथमतः पुण्यास आपल्याबरोबर न नेता आपणच अगोदर जाऊन महात्माजींबरोबर वाटाघाट करावी व महात्माजींनी इच्छा प्रदर्शित केल्यास डॉ. आंबेडकर यांना मागाहून बोलावून घेऊ अशाप्रकारचा महत्त्वाचा फेरबदल दोन प्रहरी ठरलेल्या कार्यक्रमात केला.

कमिटीने रात्री विचारविनियम केल्यावर डॉ. आंबेडकर यांनी एक नवीन योजना तयार केली. ते व डॉ. सोळंकी रात्री १० वाजता बिर्ला हाऊसमध्ये गेले आणि आपली योजना समितीच्या लोकांपुढे सादर केली. तिला कमिटीने मान्यता दिली. ती योजना पुढीलप्रमाणे,––

## डॉ. आंबेडकर यांची नवीन योजना

### भाग पहिला

महात्मा गांधींचा निश्चित निर्णय कळल्यावर डॉ. आंबेडकर यांनी सर तेजबहादूर सप्रू, जयकर व पंडित मालवीयजी यांच्या संमतीने नवीन योजना तयार केली. या योजनेत मुख्यत्त्वेकरून प्राथमिक निवडणूक, नंतर संयुक्त मतदार संघातून राखीव जागांच्या धर्तीवर निवडणूक, हे स्वतंत्र मतदार संघाला

सौम्य असे नाव दिलेले आहे. या योजनेत अस्पृश्यांना पुढीलप्रमाणे राखीव जागा ठेविण्यात येतील.––

**कायदे कौन्सिलातील जागा**

| प्रांत (१) | नवीन जागा (२) | एकंदर जागा (३) | अवार्डप्रमाणे (४) |
|---|---|---|---|
| मद्रास . . . . . . | ३० | २१५ | १८ |
| मुंबई . . . . . . | १६ | २०० | १० |
| बंगाल . . . . . . | ५० | २५० | १० |
| पंजाब . . . . . . | १० | १७५ | ९ |
| संयुक्त प्रांत . . . . . . | ४० | २२८ | १२ |
| बिहार, ओरिसा . . . . . . | २० | १७५ | ७ |
| मध्य प्रांत . . . . . . | २० | ११२ | १० |
| आसाम . . . . . . | ११ | १०८ | ४ |

नवीन योजनेप्रमाणे अस्पृश्य समाजाला एकंदर १९७ जागा मिळावयाच्या आहेत. निवडणुकीच्या बाबतीत पहिल्या दहा वर्षापर्यंत अस्पृश्य मतदार संघातर्फे, अस्पृश्य उमेदवारांची प्राथमिक निवडणूक होईल. या प्राथमिक निवडणुकीमध्ये जे पहिले दोन उमेदवार निवडून येतील त्यांनीच सार्वत्रिक निवडणुकीमध्ये उभे राहावयाचे. दहा वर्षांनी ही प्राथमिक निवडणुकीची पद्धत रद्द करण्यात येईल ; आणि याऐवजी सर्रास संयुक्त मतदारसंघ व राखीव जागा ह्या पद्धतीच्या निवडणुकीचा विचार होईल.

ही योजना आणखी २० वर्षे पुढे अंमलात ठेवून अस्पृश्यांच्या मतानुसार त्यापुढील प्रतिनिधीत्व कोणत्या अटीवर व धोरणावर असावे हे ठरविण्यात येईल. अस्पृश्य वर्गाच्या बाबतीत वयात आलेल्या प्रत्येक इसमास मत देण्याचा हक्क राहील.

प्रांतिक व मध्यवर्ती कायदेमंडळातील प्रतिनिधी लोकसंख्येच्या प्रमाणात घेण्यात यावे.

**भाग दुसरा**

सर्व प्रांतातील अस्पृश्य वर्गाला म्युनिसीपालिट्या, लोकल बोर्डे, पंचायती, स्कूल बोर्डे व इतर स्थानिक संस्थातून लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधीत्व मिळावे.

स्थानिक, मध्यवर्ती व वरिष्ठ कचेऱ्यातून लोकसंख्येच्या प्रमाणात व त्यासाठी ठेवण्यात आलेल्या शिक्षणाच्या दर्जाप्रमाणे अस्पृश्य वर्गातील उमेदवारांना नोकऱ्या मिळाव्या.

बहिष्कृत वर्गात योग्य शिक्षण प्रसार होण्यासाठी प्रत्येक प्रांतातून शिक्षणाची जी सरकारी ग्रॅन्ट दिली जाते त्यातून अस्पृश्यांच्या लोकसंख्येच्या मानाने त्या रकमेतील योग्य वाटणी देण्यात यावी.

कॅनडा (Constitution of Canada) वसाहतीमध्ये ज्याप्रमाणे व्यवस्था केलेली आहे त्या व्यवस्थेप्रमाणे शिक्षण, नोकऱ्या व आरोग्य वगैरे प्रश्नांच्या बाबतीत अस्पृश्य वर्गाला न्याय न मिळाल्यास त्यांना गव्हर्नरकडे व व्हाइसरॉयकडे अर्ज करून न्याय्य हक्क मिळविण्याचा नवीन राज्यघटनेत अधिकार ठेवण्यात येईल.

## महात्मा गांधींबरोबर मुलाखत

त्याप्रमाणे डॉ. आंबेडकर व डॉ. सोळंकी हे जेव्हा रात्री आपली वरील योजना घेऊन बिर्ला हाऊसमध्ये गेले तेव्हा '' तुम्ही दिलेली ही योजना आम्ही आताच्या आता पुण्यास घेऊन जातो व महात्माजींना दाखवितो व महात्माजींना जरूर वाटून तुम्हास बोलवावे अशी जर त्यांनी इच्छा दर्शविली तर तुम्हास मागाहून बोलावू.'' असे सांगून कमिटीची मंडळी लागोलाग रात्रीच्या शेवटच्या गाडीने पुण्यास गेली. म. गांधी व मुंबईहून गेलेले सभासद यांच्या बुधवारी सकाळी गाठीभेटी झाल्या व त्यात महात्माजींनी डॉ. आंबेडकरांशी प्रत्यक्ष वाटाघाट करण्याची इच्छा दर्शविली आणि त्याप्रमाणे बिर्ला हाऊसमधून डॉ. आंबेडकर यांना दामोदर हॉलमध्ये बुधवारी १.३० वाजता टेलिफोनहून ' तुम्हास म. गांधी पुण्यास तातडीने बोलावित आहेत ' असा संदेश सांगण्यात आला. त्यास उत्तर म्हणून, ' आपण गुरुवारी सकाळी पुण्यास येऊ ' असे उत्तर डॉ. आंबेडकर यांनी पाठविले. त्याबरोबरच इतर कोणाही अस्पृश्य पुढाऱ्यांशी आपण वाटाघाट करणार नाही, फक्त म. गांधींशी करु असेही त्यांनी स्पष्ट कळविले. ठरल्याप्रमाणे बुधवारी रात्री बाराच्या गाडीने डॉ. आंबेडकर व डॉ. सोळंकी म. गांधींशी वाटाघाट करण्याकरिता पुण्यास गेले.

डॉ. आंबेडकर यांनी हिंदुस्थानातील सर्व प्रांतीय अस्पृश्य पुढाऱ्यांना तारा करून तातडीने बोलाविले. त्याप्रमाणे मद्रासचे प्रसिद्ध पुढारी रा. ब. श्रीनिवासन हे काल रोजी मुंबईस येऊन तसेच मद्रास मेलने पुण्यास गेले. त्यांच्याबरोबर श्री. शिवतरकरही गेले आहेत. ''[१]

'' पुणे कराराच्या वाटाघाटी चालू असता बाबासाहेबांच्या भूमिकेमुळे सर्व देशभर त्यांच्याबद्दल कलुषित वातावरण उत्पन्न झाले. त्यांना धमकीची पत्रे

---

[१] जनता : १ ऑक्टोबर १९३२.

येऊ लागली. त्यापैकी एक पत्र गुजराथीत होते. ते १-१०-३२ च्या जनता पत्रात (पा. ३) छापले होते, ते असे :—

## डॉ. आंबेडकर यांना खुनाच्या धमकीचे पत्र

डॉ. आंबेडकर,

जो तमे दिवस ४ मां महातमा गांधीनी मागणी मंजूर करशो नही तो तमारी जान लोवामां आवशे. माटे जो तमारूं जीवन तमोने वहालुं होय तो महातमा गांधीजीनी मागणी मंजूर करीने ते ओने उपवास मांथर जलदी छोडावो. आ चेतवणी छेल्ली छे हवे जुदी तकरार छोडी देशो नही तो तमारी खून करवामां आवशे.

ली. हरिभाई के. भट

B. P. E. E. ना एक मेंबर अने वर्कर

पुण्यातील काही स्पृश्य वर्गीय तरुणांनी बाबासाहेबांना ठार करण्याचा गुप्त कट केला होता. त्याचा वृत्तांत २४-९-३२ च्या जनतेत (पा. ८) दिलेला होता तो असा :—

## डॉ. आंबेडकरांवरील प्राणसंकट

## पुणेरी विद्यार्थ्यांची गुप्त सभा. खुनाची धमकी

पुणे , ता. २३-९-३२, रात्रीचे आठ.

(जनतेच्या खास प्रतिनिधीने पाठविलेली बातमी)

दोन दिवस झाले, सारखी वाटाघाट चाललेली आहे. डॉ. आंबेडकरांना दबविण्यासाठी नानातऱ्हेचे प्रयोग सुरू आहेत. गव्हर्नरवर गोळी घालणाऱ्या गोगटे पंथाच्या काही पुणेरी विद्यार्थ्यांची गुप्त कारस्थाने चालल्याची बातमी प्रसिद्ध झाली आहे. डॉ. आंबेडकराला नाहीसे केले म्हणजे सर्व भानगडी मिटतील व गांधीजींचाही जीव वाचेल, अशा अर्थाचे संकेत चालले आहेत. डॉ. आंबेङकरांच्या कानावर ही बातमी घातली तेव्हा ते क्षणभर हसले. ' अशा भ्याड मृत्यूला मी घाबरत नाही ' असा त्यांच्या त्या निर्भय हास्याचा अर्थ होता. येथील अस्पृश्य समाजास मात्र डॉ. आंबेडकर साहेबांच्या सुरक्षेबद्दल मोठी काळजी वाटत असून त्यांनी ती दक्षता ठेवलेली आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या एका केसास जरी

धक्का पोहचला तरी भयंकर अनर्थ ओढवल्याशिवाय राहणार नाही. हजारो अस्पृश्य तरुण त्यांच्या रक्ताच्या एका थेंबाकरिता बलिदान करण्यास सज्ज होतील. गांधीजींच्या या दुर्दैवी प्रतिज्ञेचा शेवट अशा काही भयंकर परिणामात होऊ नये, असेच सर्वांना वाटत आहे.''

''गुरुवार ता. २२ सप्टेंबर १९३२ रोजी सकाळी नऊ वाजता नॅशनल हॉटेलमध्ये सर तेजबहादूर सप्रू व बॅ. जयकर हे उभयता डॉ. आंबेडकर यांना भेटावयास आले व नऊ वाजल्यापासून १२.३० वाजेपर्यंत उभयतः चर्चा झाली. त्यात प्रथमतः असे सांगण्यात आले की, डॉ. आंबेडकर यांनी सादर केलेल्या योजनेत स्वतंत्र मतदारसंघ गाळण्यात आला असला तथापि त्यांनी योजिलेली प्रायमरी इलेक्शनची कल्पना म. गांधींना सर्वस्वी मान्य नाही. कारण तिला स्वतंत्र मतदारसंघाची घाण येते असे महात्माजींचे मत आहे असे सांगण्यात आले. याशिवाय स्वतंत्र मतदारसंघापुरती उभयपक्षात तडजोड झाली तर मुख्यमंत्री मि. रॅम्से मॅकडोनाल्ड यांना तार करून स्वतंत्र मतदारसंघाची योजना ताबडतोब रद्द करण्यास सांगावी व अस्पृश्यांच्या वतीने केलेल्या मागण्यांचा विचार पुढे केव्हा तरी करू, कारण विचारविनिमय करण्यास कालावधी लागणार आहे व तोपर्यंत महात्माजींचा उपवास चालू राहिल्यास त्यांच्या जीवितास धोका पोचण्याचा संभव आहे असेही सांगण्यात आले. त्यावेळी डॉ. आंबेडकर यांनी स्पष्ट सांगितले की, आपल्या संगळया मागण्यांचा विचार ताबडतोब होऊन त्यातून आपल्याला काय मिळते हे कळल्याखेरीज अस्पृश्य वर्गाला प्राप्त झालेला स्वतंत्र मतदारसंघाचा हक्क सोडण्यास आपण केव्हाही तयार होणार नाही. हातचे सोडून पळत्याच्या पाठी लागावयास आपली कबूली नाही. त्याचप्रमाणे महात्मा गांधींनी किमानपक्षी प्रायमरी इलेक्शनची योजना मान्य केल्याशिवाय आपण तडजोडीस तयार होणार नाही असेही त्यांनी स्पष्ट सांगितले. या पहिल्या वाटाघाटीत तडजोडीच्या आशेची चिन्हे फारशी दिसत नव्हती. इतके झाल्यानंतर डॉ. सप्रू व बॅ. जयकर हे निघून गेले व तुमचे म्हणणे कमिटीच्या सभासदांस आपण कळवितो व सर्वांच्या अनुमतीने तुमची व महात्माजींची मुलाखत व्हावी असे जर ठरले तर आम्ही तुम्हाला कळवू असे सांगून ते गेले. प्रथमतः चार वाजता म. गांधीजींची मुलाखत घ्यावयाची असे ठरले ; परंतु कमिटीच्या सभासदांशी वाटाघाट केल्यामुळे महात्माजीस थकवा आला आहे व त्यांना विश्रांती मिळावी म्हणून अंमळ उशीरा या असा निरोप येरवड्याच्या

तुरुंगातून आला. त्याप्रमाणे मंडळी एक तास उशिराने म्हणजे पाच वाजता येरवड्याच्या तुरुंगात गेली. महात्मा गांधी एका आंब्याच्या झाडाखाली उघड्या जागेत एका खाटेवर पडले होते. सभोवती त्यांच्या शिष्यवर्गापैकी महादेव देसाई, सरोजिनी नायडू, वल्लभभाई पटेल, राजगोपालाचारी, बिर्ला, सर चुनिलाल मेथा वगैरे मंडळी बसली होती. प्रथमतः सर तेजबहादूर सप्रू यांनी महात्मा गांधींना नॅशनल हॉटेलमध्ये घडलेला वृत्तांत सांगितला व डॉ. आंबेडकर हे स्वतः जे सांगावयाचे ते सांगतील असे सूतोवाच केले. त्यानंतर डॉ. आंबेडकर यांनी जवळ जवळ १.३० तास भाषण केले व आपली नवी योजना व कॅम्युनल अवार्ड या दोहोंच्या गुणदोषाचे विवेचन केले. या वादविवादातून एक मोठी आश्चर्याची गोष्ट बाहेर आली. ती ही की, म. गांधींनी प्राथमिक निवडणुकीची घटना अमान्य असण्याऐवजी सर्वस्वी मान्य होती हे त्यावेळी त्यांनी स्पष्ट करून सांगितले ; इतकेच नव्हे तर स्वतंत्र मतदार संघात जेवढे चांगले होते तेवढे घेतले याबद्दल मी तुमचे अभिनंदन करतो असेही ते म्हणाले व थोडक्याच जागांना लागू करण्याऐवजी तुम्हाला कौन्सिलात मिळणाऱ्या सर्व जागांना सर्रास लागू करा अशी त्यांनी शिफारस केली. त्यानंतर पहिल्या दिवशीची वाटाघाट संपली.

महात्माजींच्या प्राथमिक निवडणुकीच्या तत्त्वाला मिळालेल्या संमतीमुळे दुपारी पसरलेले निराशेचे वातावरण नाहीसे होऊन समेटाची आशा दिसू लागली.

शुक्रवारी सकाळी नऊ वाजता पुण्याच्या शेठ शिवलाल मोतिलाल यांच्या बंगल्यावर बाकी राहिलेल्या डॉ. आंबेडकर यांच्या मागणीची वाटाघाट करण्याचे ठरले. वाटाघाटीत वादाचे प्रश्न असे चार होते, ते असे :- (१) प्राथमिक निवडणुकीमध्ये पॅनेल किती लोकांचे असावे. (२) मध्यवर्ती कायदेमंडळात अस्पृश्य .वर्गाचे प्रतिनिधी किती असावेत. (३) प्रांतिक कायदेमंडळातील अस्पृश्यांना किती जागा देण्यात याव्या. (४) राखीव जागेची सवलत किती दिवस राहावी व ती काढावयाची झाल्यास कोणत्या अटीवर काढावयाची वगैरे प्रश्न होते.

## शुक्रवार २३ सप्टेंबर १९३२

वरील प्रश्नांचा विचार करण्याकरिता पुणे येथील राजा बहादूर शिवलाल मोतीलाल यांच्या बंगल्यावरती शुक्रवारी सकाळी नऊ वाजता कमिटीची बैठक भरविण्यात आली. प्रथमतः प्राथमिक निवडणुकीत उभे राहिलेल्या किती माणसांना अखेर निवडणुकीत उभे राहण्याचा अधिकार असावा या विषयावर चर्चा झाली. कमिटीतील हिंदू सभासदांचा प्राथमिक निवडणुकीत उभे राहिलेल्या

उमेदवारापैकी सहा सात जणांना तरी निदान अखेर निवडणुकीत उभे राहण्याचा अधिकार असावा असा आग्रह होता. डॉ. आंबेडकर यांचा आग्रह तीनपेक्षा जास्त नसावा असा होता. अखेर बऱ्याच वादविवादानंतर उभयपक्षांनी चार ही संख्या मान्य केली व हा प्रश्न मिटविण्यात आला. त्यानंतर मध्यवर्ती मंडळात अस्पृश्यांचे किती प्रतिनिधी असावेत हा प्रश्न विचारात घेण्यात आला. प्रथमतः लोकसंख्येचे प्रमाण म्हणजे सगळया लोकसंख्येचे प्रमाण किंवा फक्त हिंदू लोकसंख्येचे प्रमाण या प्रश्नाची चर्चा झाली. त्यात अस्पृश्य वर्गाला प्रतिनिधी वाटताना हिंदुंच्या लोकसंख्येशी त्यांच्या लोकसंख्येचे जे प्रमाण पडेल त्याप्रमाणे प्रतिनिधींची वाटणी करण्यात यावी असा आग्रह कमिटीच्या हिंदू सभासदांचा होता. आम्हाला सर्व लोकसंख्येशी आमच्या लोकसंख्येचे जे प्रमाण पडेल त्या प्रमाणात प्रतिनिधी मिळाले पाहिजेत असा आग्रह डॉ. आंबेडकर यांचा होता. राजा-मुंजे करारात लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधी देण्याचे कबूल केले होते. त्याप्रमाणे तुम्ही आता वचन पाळले पाहिजे व अल्पसंख्यांकांच्या करारापेक्षा राजा-मुंजे करारात लोकसंख्येच्या प्रमाणान्वये जादा प्रतिनिधी मिळतात अशी भूलथाप लोकांना देऊन आमच्यातील काही लोकांना संयुक्त मतदार संघास तुम्ही अनुकूल करुन घेतले. अर्थात तुम्ही दिलेले वचन पाळणे हे तुमचे कर्तव्यकर्म आहे वगैरे मुद्दे डॉ. आंबेडकरांनी मांडले. त्यात एक आश्चर्याची गोष्ट निष्पन्न झाली ती अशी--डॉ. आंबेडकरांनी जेव्हा वरील मुद्दा मांडला तेव्हा त्यांना असे सांगण्यात आले की, राजा-मुंजे करारात लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधी देऊ असे जे ठरले होते त्यांत लोकसंख्येचे प्रमाण म्हणजे हिंदुंच्या लोकसंख्येशी प्रमाण, सर्वसाधारण लोकसंख्येशी नव्हे. सभेत डॉ.मुंजे नव्हते व मि. राजा यांना येऊ दिले नव्हते. तेव्हा कराराचा अर्थ या दोघांनी काय घेतला होता हे आपल्यास निश्चितपणे सांगता येत नाही तथापि मि. राजा यांनी वारंवार जी कोष्टके प्रसिद्ध केली आहेत त्यावरुन त्यांचा तरी समज अखिल लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधी मिळावयाचे असा होता असे आपणास वाटते असे डॉ. आंबेडकरांनी सांगितले. त्याला उत्तर म्हणून असे सांगण्यात आले की, नुकतीच रा. ब. राजा यांच्याबरोबर ह्या प्रश्नांसंबंधी चर्चा करण्यात आली होती व त्यात डॉ. मुंजे यांच्याशी जो करार केला त्यातील लोकसंख्येचे प्रमाण हे हिंदुंच्या लोकसंख्येचे प्रमाण अशी आपली समजूत आहे असे त्यांनी सांगितल्याचे कमिटीत जाहीर करण्यात आले. रा. ब. राजा व त्यांच्या पार्टीचे लोक हे किती पराधीन व परवश झाले होते हे एका गोष्टीवरुन सहज कळून येण्यासारखे आहे. हिंदुंशी संगनमत करण्याकरिता अस्पृश्यांचे राजकीय हक्क बुडाले तरी

बुडोत या एकाच धोरणाने ते लोक प्रेरित झाल्याचे दिसते. कारण रा. ब. राजा यांनी लोकसंख्येच्या प्रमाणाच्या बाबतीत जी नवीन मखलाशी केली ती शुद्ध लबाडीची होती याबद्दल काही शंका नव्हती व ती लबाडी सिद्ध करण्यास डॉ. आंबेडकर यांना फार वेळ लागला नाही. शेवटी सर्वसाधारण जागांपैकी १८ टक्के जागा अस्पृश्यांना मध्यवर्ती कायदे कौन्सिलात राखून ठेवाव्यात असे ठरले व हा प्रश्न मिटविण्यात आला. त्यानंतर अस्पृश्यांचा संयुक्त मतदार संघ व राखीव जागा किती काळपावेतो राहावयाच्या व त्या कोणत्या अटीवरती नष्ट व्हावयाच्या हा प्रश्न चर्चेत घेण्यात आला. या प्रश्नावर अनपेक्षित असे रण माजले. हिंदू पुढाऱ्यांचे असे मत होते की, ही सवलत दहा वर्षांनी आपोआप नाहीशी व्हावी. डॉ. आंबेडकरांचे म्हणणे असे होते की, ती निदान १५ वर्षे तरी अस्तित्वात राहावी व त्यानंतर ती काढावयाची झाल्यास अस्पृश्य वर्गाच्या मतदार लोकांची मते घेऊन त्यांनी ती आपणास नको असा बहुमताने निर्णय दिला तरच ती काढण्यात यावी नाहीतर ती तशीच चालू ठेवण्यात यावी. दोन प्रहरी दोन वाजल्यापासून ती रात्री साडेनऊ वाजेपर्यंत मोठ्या कडाक्याचा व खडाजंगी असा वाद झाला व शेवटी कोणताच पक्ष माघार घेण्यास तयार झाला नसल्यामुळे तडजोड अगदी फिस्कटण्याच्या बेतात आली. शेवटी या प्रश्नासंबंधाने महात्माजींपुढे उभयपक्षाने आपापली बाजू मांडावी व ते काय म्हणतील ते पाहावे असे ठरले व त्याप्रमाणे रात्री ९.३० वाजता सर्व मंडळी येरवड्याच्या तुरुंगामध्ये महात्माजीस भेटावयास गेली. प्रथमतः डॉ. आंबेडकरांनी आपली बाजू मांडली व नंतर हिंदूंची बाजू पंडित मदनमोहन मालवीय यांनी मांडली. आश्चर्याची गोष्ट ही की, उभयपक्षाचे म्हणणे ऐकून घेतल्यानंतर महात्माजींनी आपले मत डॉ. आंबेडकर यांच्यातर्फेने दिले. हा निर्णय ऐकल्यानंतर वादाचा एक मोठाच प्रश्न मिटून गेला व मंडळी रात्री ११.३० वाजता जेलमधून परत शिवलाल मोतीलाल यांच्या बंगल्यावर आली आणि उरलेल्या प्रश्नाचा विचार दुसऱ्या दिवशी सकाळी करु असे ठरवून सभेचे काम रात्री सुमारे १२.३० वाजता तहकूब करण्यात आले.

## शनिवार २४ सप्टेंबर १९३२

ठरल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी सकाळी ८.३० वाजता पुन्हा सभेच्या कामास सुरवात झाली. वादाचा मोठा असा काही प्रश्न उरला नसल्यामुळे लवकरच समेट होऊन करारनामा तयार करण्यात येईल असे सर्वांनाच वाटले होते. परंतु अगदी सुरवातीलाच वादाला अतिशय तीव्र स्वरुप आले. इतके की सारे प्रकरण

पुन्हा चिघळले. हिंदू लोकांचा हट्ट असा होता की, सुरुवातीपासून पहिल्या पाच वर्षानंतर अस्पृश्य लोकांचा स्वयंनिर्णय (Referendum) घेण्यात यावा व त्यांनी जर ही सवलत काढून टाकण्याच्या विरूद्ध निर्णय दिला तर आणखी पाच वर्षे ती सवलत चालू ठेवून पुढे ती आपोआपच पाच वर्षांनी किंवा दहा वर्षांनी नष्ट करण्यात यावी. डॉ. आंबेडकरांचे म्हणणे असे होते की फार तर पहिल्या दहा वर्षानंतर स्वयंनिर्णय घ्यावा. पाच वर्षानंतर स्वयंनिर्णय घेण्याच्या मुद्यास त्यांनी कबूली देण्याचे नाकारले. तसेच काही काळाने ही सवलत आपोआप अस्पृश्य लोकांच्या स्वयंनिर्णयाशिवाय जावी या तत्त्वास त्यांनी जोराचा विरोध केला. केव्हाही काढावयाची झाल्यास अस्पृश्य लोकांचा स्वयंनिर्णय घेतल्याशिवाय ती केव्हाही काढली जाऊ नये. येथे देखील सर्वांची मति कुंठली व समेट होऊ शकत नाही असे सर्वांस वाटले. पुन्हा एकदा महात्माजींची भेट घेऊन आपले म्हणणे त्यांच्यापुढे मांडून त्यांचे मत काय आहे हे जाणण्याची आपली इच्छा आहे असे डॉ. आंबेडकरांनी दर्शविले. त्याप्रमाणे डॉ. आंबेडकर, राजगोपालाचारी व मि. बिर्ला असे तिघेजण साडे अकरा वाजता येरवड्याच्या तुरुंगात महात्माजीस भेटण्यास गेले. डॉ. आंबेडकरांनी आपले म्हणणे महात्माजींपुढे मांडल्यानंतर महात्माजींनी सांगितले की, अस्पृश्यांना दिलेल्या राजकीय सवलती त्यांच्या स्वयं-निर्णयाशिवाय काढल्या जाऊ नयेत या तुमच्या मागणीस माझी पूर्ण संमती आहे. फक्त पहिला स्वयंनिर्णय पाच वर्षांनी घ्या एवढेच आपले सांगणे आहे. माझा जीव तुमच्या हाती आहे. सर्वच बाबतीत तुमचे म्हणणे मी मान्य केले आहे. एवढ्या एका बाबतीत माझे म्हणणे तुम्ही ऐकणार नाही का ? असे ते म्हणाले. त्यानंतर डॉ. आंबेडकर वगैरे मंडळी शिवलाल मोतीलाल यांच्या बंगल्यावर आली व घडलेली हकीकत त्यांनी कमिटीच्या सभासदांना सांगितली. डॉ. आंबेडकरांनी शेवटी असे सांगितले की, महात्माजींचे म्हणणे ऐकून त्यावर आपण पूर्ण विचार केला आहे. विचारांती दहा वर्षाच्या अगोदर स्वयंनिर्णय घेण्यास आपली तयारी नाही असे सांगितले. पुन्हा तडजोडीच्या कार्यात अडचण उत्पन्न होऊन वादाला वाढ लागली. शेवटी तास दीड तास पुन्हा वाद झाल्यानंतर शेवटी असे ठरले की, दिलेल्या सवलती केव्हा जावयाच्या यास कोणत्याच प्रकारची मुदत घालण्यात येऊ नये. उभय पक्षांच्या संमतीने निराळी योजना ठरेतोपर्यंत दिलेल्या सवलती निर्वेधपणे चालू राहाव्यात असे ठरले व ही योजना उभय पक्षास मान्य झाल्याने हा वाद संपला. त्यानंतर प्रांतिक कायदे कौन्सिलात अस्पृश्यांना किती जागा द्यावयाच्या एवढाच वाद शिल्लक राहिला होता. डॉ. आंबेडकरांनी आपल्या नवीन योजनेत १९७ जागा मागितल्या होत्या. हिंदू लोकांतर्फे १२३ जागा द्याव्या असे म्हणणे होते. शेवटी देवाण-घेवाण होऊन १४८ जागांवर उभयपक्षांची तडजोड झाली. त्यानंतर

डॉ. आंबेडकर यांनी आपल्या योजनेच्या दुसऱ्या भागात केलेल्या मागण्यांचा विचार करण्यात आला. ज्या ठराविक भाषेत त्या लिहिल्या आहेत त्या ठराविक भाषेत आपल्याला आज संमती देता येत नाही. तथापि त्या मागण्यातील जे मूलभूत तत्त्व आहे त्या मूलभूत तत्त्वाला आपली कबुली आहे व ती कबुली दर्शविणारा एक मसुदा तयार करुन आपण तो करारनाम्यात समाविष्ट करण्यास आपण तयार आहोत असे हिंदू पुढाऱ्यांतर्फे सांगण्यात आले. तूर्त एवढ्यानेच आपण समाधान मानून घेण्यास तयार आहोत असे डॉ. आंबेडकरांनी सांगितल्यामुळे हाही प्रश्न लवकरच निकालात निघाला. एवढे सगळे होता होता दुपारी दोन वाजले. त्यानंतर मंडळी करारनाम्याचा मसुदा करावयास बसली. सुमारे चार वाजता मसुदा तयार झाला. त्यानंतर करारनाम्यावर सह्या कोणी कराव्या याची वाटाघाट झाली. रा. ब. राजा व त्यांच्या पक्षाच्या मंडळींनी करारावर सह्या करू नयेत असा आग्रह मद्रासहून आलेल्या अस्पृश्यांच्या सर्व पुढाऱ्यांनी धरला व त्यांनी जर सह्या केल्या तर आपण सह्या करणार नाहीच नाही पण डॉ. आंबेडकर यांना सुद्धा आपण सही करू देणार नाही असा हेका धरला. त्याप्रमाणे डॉ. आंबेडकर व त्यांच्या पक्षातील पुढाऱ्यांच्या सह्या होऊन करारनामा तयार झाला. तो झाल्यानंतर इतर स्पृश्य हिंदू पुढाऱ्यांनी डॉ. आंबेडकरांना विनंती केली की रा. ब. राजा वगैरे मंडळींना सही करू देण्यास तुम्ही काही तरी खटपट करा. शेवटी भवति न भवति होता असे ठरले की, त्यांनी सर्वांच्या सह्या झाल्यानंतर अस्पृश्य वर्गातील व्यक्ती म्हणून सही करावी. अस्पृश्य वर्गातील एका पक्षातील पुढारी म्हणून प्रमुख ठिकाणी त्यांनी सह्या करू नयेत. त्याप्रमाणे राजा-गवई वगैरे मंडळीस टेलिफोन करून सर्व्हन्टस ऑफ इंडिया सोसायटीच्या बिल्डिंगमधून बोलविण्यात आले व सर्वांच्या सह्या झाल्यानंतर शेवटी सह्या करण्याची त्यांना परवानगी देण्यात आली. आश्चर्याची गोष्ट ही की, सर्वांच्या मागून आले असताना देखील व अगदी वरती जागा नसताना देखील जयकर व सप्रू यांच्यामध्ये आपली सही घुसडून देण्याचा रा. ब. राजानी लघळपणा केलाच. सह्या होऊन करारनामा तयार झाल्यानंतर पंडित मदनमोहन मालवीय व डॉ. आंबेडकर या दोघांच्या सहीने मुख्य प्रधानाला करार झाल्याची तार करण्यात आली व करारातील ठळक गोष्टींचा उल्लेख करणारी एक तार त्याच्यासोबत पाठविण्यात आली. डॉ. आंबेडकर व रा. ब. श्रीनिवासन यांनीही आपल्या सहीच्या तारा प्रधान सेक्रेटरी ऑफ स्टेट, व्हाइसरॉय यांना करुन करार आपणास संमत असल्याची बातमी दिली. त्यानंतर कराराची एक अस्सल नकल घेऊन डॉ. आंबेडकर, सर तेजबहादूर सप्रू, जयकर व सर चुनिलाल मेथा यांनी मुंबई सरकारचे होम सेक्रेटरी मि. क्ली यांना संध्याकाळी सात वाजता दिली व ती सरकारी रीत्यानुरुप प्रधानांना पाठवून द्या अशी विनंती

करण्यात आली. तेथून सर्व मंडळी येरवडा जेलमध्ये महात्मा गांधींना भेटावयास गेली. भेटीत महात्मा गांधींनी करारासंबंधी आपले समाधान व्यक्त केले व तडजोड केल्याबद्दल डॉ. आंबेडकर व इतर पुढाऱ्यांचे आभार मानले.

## नवीन करारातील कलमे

(१) अस्पृश्यांना सर्वसाधारण मतदारसंघात सर्व प्रांतात मिळून लोकसंख्येच्या प्रमाणात १४८ राखीव जागा पुढीलप्रमाणे द्याव्या :-

| प्रांत (१) | अस्पृश्यांना जागा (२) | कायदे-मंडळातील हिंदुंच्या जागा (३) |
|---|---|---|
| बंगाल . . . . . . | ३० | ८० |
| मुंबई सिंधसह . . . . . . | १५ | १०८ |
| बिहार व ओरिसा . . . . . . | १८ | ११४ |
| मद्रास . . . . . . | ३० | १५३ |
| पंजाब . . . . . . | ८ | ४३ |
| मध्य प्रांत व वऱ्हाड . . . . . . | २० | ८८ |
| आसाम . . . . . . | ७ | ५७ |
| संयुक्त प्रांत . . . . . . | २० | १४४ |
| | १४८ | ७८७ |

अशा तऱ्हेने या समेटान्वये अस्पृश्यांना हिंदुंच्या एकंदर ७८७ जागापैकी १४८ जागा देण्यात येणार आहेत.

(२) या सर्व राखीव जागाकरिता अस्पृश्यांचे जे प्रतिनिधी निवडावयाचे त्यांची प्राथमिक निवड, प्रथम केवळ अस्पृश्यवर्गीय मतदारांनी प्रत्येक जागेकरिता ४ उमेदवार याप्रमाणे निवडलेल्या उमेदवारांतून केली जावी व तद्नंतर या चारांच्या पॅनेलमधून एक प्रतिनिधी स्पृश्यास्पृश्य सर्व मतदारांनी निवडून द्यावा. प्राथमिक निवडणुकीत प्रत्येक अस्पृश्यवर्गीय मतदारास मत देण्याचा अधिकार आहे.

(३) मध्यवर्ती कायदेमंडळात अस्पृश्यांचे प्रतिनिधी सर्वसाधारण मतदारसंघात राखीव जागासाठी पॅनेलच्या निवडणुकीने निवडले जावे.

(४) मध्यवर्ती कायदेमंडळात ब्रिटिश हिंदुस्थानातील अस्पृश्यांना हिंदुंच्या जागापैकी १८ टक्के जागा द्याव्या.

(५) अस्पृश्य उमेदवारांच्या पॅनेलची ही पद्धती फक्त १० वर्षेच अंमलात राहावी. पण तत्पूर्वी सर्व जातींनी एकमताने ती रद्द करावयाचे ठरविल्यास तसे करण्यास हरकत नाही.

(६) राखीव जागांचे तत्त्व सर्व जातीत एकवाक्यता होऊन रद्द होईपर्यंत अंमलात रहावे.

(७) प्रांतिक व मध्यवर्ती कायदेमंडळांचा अस्पृश्यांचा मताधिकार लोथिअन कमिटीच्या रिपोर्टातील शिफारसीप्रमाणे असावा.

(८) स्थानिक संस्थांनात निवडणूक किंवा सरकारी नोकऱ्यात नेमणुका या बाबतीत अस्पृश्यांवर कोणतीही नालायकी अस्पृश्यतेच्या मुद्यावर असू नये व त्यांना योग्य प्रमाणात जागा द्याव्या.

(९) अस्पृश्यांच्या शिक्षणासाठी योग्य प्रमाणात प्रांतिक सरकारच्या बजेटात तरतूद करावी.'' [१]

'' या करारावर २४ सप्टेंबरला २३ पुढाऱ्यांच्या सह्या झाल्या आणि २५ तारखेला १८ जणांनी सह्या केल्या.

पुणे करारावर ज्यांनी सह्या केल्या त्यांची नावे.––

(1) Madan Mohan Malaviya
(2) Tej Bahadur Sapru
(3) M. R. Jayakar
(4) B. R. Ambedkar
(5) Shrinivasan
(6) M. C. Rajah
(7) C. V. Mehta
(8) C. Rajagopalachari
(9) Rajendra Prasad
(10) G. D. Birla
(11) Rameshwar Das Birla
(12) B. S. Kamat
(13) G. K. Deodhar
(14) A. V. Thakkar
(15) R. R. Bakhale
(16) P. G. Solanki
(17) P. Baloo
(18) Govind Malaviya
(19) Devdas Gandhi
(20) Biswas
(21) P. N. Rajbhoj
(22) Gavai G. A.
(23) Shankarlal Bankar

The following signatures were added in Bombay at the final sitting of the Hindu Conference on September 25 :-

(1) Lallubhai Samaldas
(2) Hansa Mehta
(3) K. Natrajan
(4) Kamakoti Natrajan
(5) Purushottamdas Thakurdas
(6) Mathradas Vassanji
(7) Walchand Hirachand
(8) H. N. Kunzru
(9) K. G. Limaye
(10) P. Kodandrao
(11) N. V. Gadgil
(12) Manu Subhedar
(13) Avntikabai Gokhale
(14) K. J. Chitalia
(15) Radhakant Malaviya
(16) A. R. Bhatt
(17) Colam
(18) Pradhan

---

[१] तत्रैव.

मुख्य प्रधानांची मावशी ससेक्स परगण्यातील आर. डिगले या गावी वारली होती. तिच्या प्रेतयात्रेस मॅक्डोनाल्ड साहेब २४ ला निघाले होते. पण हिंदुस्थानातून आलेल्या तारा पाहून त्यांनी आपले जाणे रहित केले आणि पुणे कराराचा विचारविनिमय मंत्रिमंडळाबरोबर दोन दिवस करून त्यांनी मंत्रिमंडळाची संमती परत तारेने व्हाईसरॉय, वगैरेंना २६ तारखेस कळविली. तारीख २६ सप्टेंबरला हिंदुस्थान सरकारचे गृह चिटणीस (होम मेंबर) मि. हेग यांनी मध्यवर्ती कायदेमंडळात भाषण करून सरकारने हा करार मान्य केल्याचे जाहीर केले.

सरकारने कराराला आपली संमती दिल्याचे पत्र इन्स्पेक्टर जनरल कर्नल डॉयल यांना पाठविले व ते त्यांनी गांधीजी आणि इतर पुढारी यांना मंगळवारी २७ तारखेला तिसऱ्या प्रहरी सव्वा चार वाजता दाखविले. गांधीजींनी आपला उपास सोडावा, असे सर्वांना वाटले. या सरकारी संमतीला अस्पृश्यांच्या पुढाऱ्यांनी आपला पाठिंबा व्यक्त केला पाहिजे, असे गांधीजी म्हणाले. हे सर्व पुढारी मुंबईला गेलेले होते आणि त्यांची पुन्हा सभा भरवावी लागेल व त्यात एक दोन दिवस जातील. या कराराला त्यांनी अगोदरच संमती दिलेली आहे व त्यावर सह्या केलेल्या आहेत. तेव्हा पुनः त्याबद्दल हा प्रश्न विचारात घेण्याची जरूरी नाही, असा पक्ष पंडित हृदयनाथ कुंझरू यांनी गांधीजींच्यापुढे मांडला व त्याला श्री. राजगोपालाचारींनी पाठिंबा दिला. मग गांधीजी उपास सोडायला तयार झाले. कर्नल डॉयल म्हणाले ' कस्तुरबा गांधींच्या हातून फळांचा रस प्या व उपास सोडा ' गांधीजींनी संमती दिली. गांधीजींच्या सभोवती पाण्याचा सडा शिंपडण्यात आला. रवीन्द्रनाथ टागोर यांनी आपल्या गीतांजलीतील एक भक्तीगीत म्हटले. भगवद्‌गीतेतील श्लोक काहींनी म्हटले. तेथे जमलेल्या सुमारे २०० लोकांनी ' वैष्णव जन तो तेणे कहिये ' हा गांधीजींचा आवडता संत नरसी मेहतांचा अभंग म्हटला व कस्तुरबांनी संत्र्याच्या रसाचा प्याला गांधीजींना दिला. ते रस प्याले व त्यांनी उपास सोडला.'' [१]



[१] डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड ५ वा, पृ. ५६, ५७, ६१.

## ५७

# पुणे करारनामा बंधनकारक समजून स्पृश्य बंधुंनी कृती करावी

पुण्याला म. गांधी व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यामधे तडजोड होऊन एक नवीन करारनामा तयार करण्यात आला. हा सर्व हिंदू पुढारी मंडळींना पसंत पडताच गेल्या शनिवारी करारनाम्यावर अस्पृश्य व स्पृश्य हिंदू पुढाऱ्यांच्या सह्या झाल्या. हा करारनामा पास झाल्यानंतर मुंबईत पुन्हा सर्व हिंदू पुढारी जमले व रविवार तारीख २५ सप्टेंबर १९३२ रोजी कोर्टातील इंडियन मर्चन्टस् असोसिएशनच्या हॉलमध्ये मुंबई नागरिक इमर्जन्सी कौन्सिल तर्फे पंडित मदनमोहन मालवीय यांच्या अध्यक्षतेखाली दुपारी सभा भरून कराराला सर्वानुमते संमती देण्यात आली.

प्रथमतः परिषदेचे अध्यक्ष पंडित मदनमोहन मालवीय यांनी भाषण केले. त्यांनी आपल्या भाषणात तडजोडीला ज्या ज्या पुढाऱ्यांचे जिवाभावाचे सहाय्य झाले त्या त्या मंडळीचे त्यांनी अंतःकरणपूर्वक आभार मानले. तथापि, अस्पृश्य वर्गाचे पुढारी डॉ. आंबेडकर यांचे आभार प्रामुख्याने मानणे अगदी योग्य आहे. त्यांच्या सहकार्याशिवाय ही तडजोड होणे कठीण होते. करारनाम्यातील कलमांचा विचार करता स्पृश्य हिंदूंवर ती प्रत्यक्ष कृतीत पार पाडून दाखविण्याची मोठी जबाबदारी आहे.

## पंचवीस लाखांचा फंड

अस्पृश्यता निवारण्यासाठी मुख्यतः पैशाची अत्यंत जरूरी आहे. सर्व देशभर जागृतीचे कार्य करण्यासाठी पैशाशिवाय सर्व प्रयत्न व्यर्थ ठरतील. या कार्याकरिता आपण एक लहानशी कमिटी नेमून या कमिटीतर्फे निदान २५ लाख रूपये फंड उभारण्यात आला पाहिजे आणि पुढील तीन-चार महिन्यात प्रत्यक्ष कार्य करून आपल्या हिंदू धर्माचे तेज वाढविणे, आपल्या दलित बांधवांना समानतेचे सर्व हक्क देणे आणि आपली अंतःकरणे शुद्ध करून उच्चनीचतेचा भाव समूळ नाहीसा करणे इत्यादि गोष्टी तात्काळ झाल्या पाहिजेत. आपल्या समाजातून अस्पृश्यता समूळ नाहीशी करण्यासाठी महात्माजींनी आपला प्राण पणास लाविला होता ही गोष्ट सर्वांनी पूर्णपणे लक्षात ठेवावयास पाहिजे.

---

जनता : १ ऑक्टोबर १९३२.

पंडितजींचे हृदयस्पर्शी भाषण झाल्यावर पुण्याला झालेल्या करारनाम्यास संमती देणारा मुख्य ठराव शेठ मथुरादास वसनजी खिमजी यांनी पुढे मांडिला. ठराव मांडताना ते म्हणाले की, पुण्याला झालेल्या करारनाम्याला ब्रिटिश सरकारने आता आपली संमती द्यावयास कोणतीच हरकत नाही. तरी सरकारने म. गांधी यांच्या बिकट अवस्थेतील प्रकृतीचा विचार करून तात्काळ मान्यता असल्याचा विद्युत संदेश पाठवून द्यावा.

ठरावाला अनुमोदन देण्याकरिता सर तेजबहादूर सप्रू हें बोलावयाला उठले. ते म्हणाले की, या करारनाम्याचे सारे कार्य पंडित मालवीयजींच्या अध्यक्षतेखाली झाले आहे ही गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. पंडितजींनी आपला कट्टर धर्मनिष्ठपणा बाजूला ठेवून बदलत्या काळानुसार वागण्याचे जे मनोधैर्य दाखविले ते कितीतरी पटीने अलौकिक आहे आणि आपण सर्वांनी आजच्या परिस्थितीत असेच धडाडीचे धोरण स्वीकारल्याशिवाय गत्यंतर नाही. तसेच ह्या तडजोडीच्या यशस्वीतेचे बरेच श्रेय डॉ. आंबेडकर यांना दिले पाहिजे. त्यांनी आपल्या समाजाच्या न्याय्य हक्कासाठी झगडण्यात जे धैर्य व जो करारीपणा दाखवला तो अभिनंदनीय असाच होता. त्यांच्या धैर्याकडे पाहता ते अस्पृश्यांचेच नव्हे तर हिंदुस्थानचे भावी खरे निधड्या छातीचे पुढारी होतील यात तिळमात्र शंका वाटत नाही. ब्रिटिश सरकारच्या कम्यूनल अवार्डपेक्षा ह्या नवीन कराराने अस्पृश्य वर्गाचे अधिकच हित झाले. तरी आपण सर्वांनी यापुढे सहकार्याने वागून अंगिकारलेल्या कार्यामध्ये यश मिळविण्याचा कसून प्रयत्न केला पाहिजे.

डॉ. आंबेडकर भाषण करावयास उभे राहाताच टाळयांचा कडकडाट झाला. ते म्हणाले की,

थोड्याच दिवसापूर्वी माझी बिकट परिस्थिती व आजचा आनंदाचा समय याचा विचार केल्यास हे सारे स्वप्नवत असे दृश्य दिसले. एकीकडे मला म. गांधींचे प्राण वाचवावयाचे होते तर दुसरीकडे मला माझ्या समाजबंधुंच्या न्याय्य हक्कांचे संरक्षण जिवापाड करावयाचे होते. हा दुहेरी पेच यशस्वीरीतीने सुटला जाईल अशी मला बिलकूल शंका वाटत नव्हती. परंतु एकंदर भयानक व जबाबदारीची परिस्थिती जाणून सर्व हिंदू पुढाऱ्यांनी जे सारासार विचारसरणीचे व सहकार्याचे धोरण स्वीकारले त्यामुळे ह्या बिकट प्रश्नातून समाधानकारकरित्या बाहेर पडण्याचा मार्ग दिसू शकला आणि यामुळे मला खरोखर अत्यानंद होत आहे. या लढ्याच्या वाटाघाटीतून पार पडण्यास मुख्यतः म. गांधीच कारणीभूत झालेले आहेत. मला मोठे आश्चर्य वाटते की, माझ्या सर्व मागण्यांना म. गांधींनी मान्यता देऊन उलट माझेच अभिनंदन केले. म. गांधींनी ही जी एकप्रकारची तडजोड मान्य केली ती दुसऱ्याच राऊंड टेबल परिषदेच्या प्रसंगी मान्य केली असती

तर आजचे बिकट व भयानक असे वातावरण कधीच उत्पन्न झाले नसते. असो. ह्या यशस्वी करारनाम्याला मान्यता देण्यात मला आनंद होतो. माझ्या स्पृश्य बंधुंनी हा करारनामा बंधनकारक समजून त्याप्रमाणे प्रत्यक्ष कृतीत कार्य करून दाखविल्यास मला व माझ्या समाजाला अत्यानंद होणार आहे. या करारनाम्याच्या यशाचे श्रेय म. गांधींशिवाय सर तेजबहादूर सप्रू, पंडित मालवीय व सी. राजगोपालाचारी यांना दिल्याशिवाय मला राहावत नाही.

डॉ. आंबेडकर यांच्या भाषणानंतर रा. ब. राजा व मि. के. नटराजन यांची भाषणे झाल्यावर श्री. सी. राजगोपालाचारी यांचे आभार प्रदर्शनार्थ भाषण झाले. पुढील विधायक कामकाजाकरिता जी कमिटी नेमावयाची तिच्याबद्दल सर्वस्वी अधिकार अध्यक्षांना असावा अशी सूचना शेठ मथुरादास वसनजी यांनी केली व तिला सभेने मान्यता दिल्यावर परिषद बरखास्त करण्यात आली.



## ५८

# देवालयात गेल्याने तुमचा उद्धार होणार नाही

पुण्याच्या तहनाम्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण ऐकण्यास मुंबई येथील अखिल अस्पृश्य समाज अत्यंत आतुर झाला होता आणि अशी संधी केव्हा प्राप्त होईल म्हणून तो मोठ्या उत्सुकतेने वाट पाहात होता व वरळी येथील रा. सावंत वगैरे काही तरूण मंडळीनी बुधवार, तारीख २८ सप्टेंबर १९३२ रोजी रात्रौ एक जाहीर सभा बोलावून ही संधी आणून दिली. सुमारे १० वाजता बाबासाहेब, सभेचे नियोजित अध्यक्ष श्री. देवराव नाईक व इतर मंडळी सभेत वरळी, बी. डी. डी. चाळीजवळील मैदानात दाखल झाली व लागलीच सभेच्या कामास सुरवात झाली. योग्य प्रकारे अध्यक्षांची निवड झाल्यावर अध्यक्ष श्री. देवराव नाईक यांचे प्रास्ताविक भाषण झाले. त्यांनी सांगितले की,

म. गांधींच्या घोर प्रतिज्ञेमुळे सबंध हिंदुस्थान देश हादरून गेला होता व त्यांच्या प्रतिज्ञेचे स्वरूप इतके भयंकर होते की, अस्पृश्यांचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी म. गांधींच्या म्हणण्यास रूकार दिल्याशिवाय त्यांचे जीवित सुरक्षित नव्हते आणि तशी संमती देणे म्हणजे इतक्या परिश्रमाने अस्पृश्यांना जे काही स्वसंरक्षणार्थ मिळाले होते त्याच्यावर तिलांजली सोडणे होय आणि अनुमती न देणे म्हणजे महात्माजींचे प्राण गमविण्याची जबाबदारी घेणे होय. अशा विलक्षण परिस्थितीत अस्पृश्य समाज व विशेषतः स्वतः डॉ. बाबासाहेब हे सापडले होते. पण अस्पृश्यांच्या सुदैवाने ते या भयंकर दिव्यातून सुखरूप तावून, सुलाखून या दोन्ही गोष्टी साधून बाहेर पडले आणि हा सुयोग एक प्रकारे पददलित वर्गाच्या उज्वल भविष्यकालाचे शुभ चिन्हच होय. आज अस्पृश्य वर्गास इतिहासात पूर्वी कधीही न मिळालेले असे हक्क प्राप्त झाले आहेत ही गोष्ट खरी. पण आज हिंदू समाजात वावरत असलेली अस्पृश्यता नष्ट झाली म्हणजे त्या हक्काचे सार्थक झाले अशी भ्रामक कल्पना मनात न बाळगता, सर्व अस्पृश्य समाज, हिंदू समाजातील विषमतेस मूठमाती देऊन पूर्ण समानतेच्या भक्कम पायावर स्थिर झाल्याशिवाय स्वस्थ बसणार नाही अशी ग्वाही अखिल हिंदू समाजास त्याने आजच्या आज द्यावी. अध्यक्षांनी आपले भाषण संपविण्यापूर्वी एक प्रतिज्ञा केली की, 'आजपासून चार महिन्याच्या आत जनता पत्राचे पाच हजार वर्गणीदार झाल्याशिवाय आपण संपादकाची जागा स्वीकारणार नाही.'

---

जनता : ८ ऑक्टोबर १९३२.

नंतर बाबासाहेब बोलावयास उठले. जवळजवळ पंधरा हजारांचा तो प्रचंड जनसमूह टाळयांच्या कडकडाटात एकदम मग्न झाला. डॉ. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

आठ दिवसांपूर्वी अस्पृश्य समाजावर कोणत्या प्रकारचे संकट आले होते त्याचा खुलासा अध्यक्षांनी आपल्या भाषणात केलाच आहे. त्या संकटातून अस्पृश्य समाज बाहेर पडला इतकेच नव्हे तर या संकटामुळे शक्तिहीन न होता तो आज अधिकच बलवत्तर झाला आहे.

राऊंड टेबल कॉन्फरन्सच्या पहिल्या अधिवेशनाच्या वेळी आपण अस्पृश्यांकरिता काही खास मागण्या केल्या होत्या त्या सर्वांस विदितच आहेत. दुसऱ्या अधिवेशनात ज्या वेळेस अस्पृश्यांच्या मागण्यांचा प्रश्न निघाला त्या वेळेस सर्व हिंदू प्रतिनिधींनी व खुद्द म. गांधींनी देखील त्या मागण्यास कसून विरोध केला व अस्पृश्यांस संरक्षणासाठी काही सवलती मिळतील असा रंग दिसेना. पददलितांसारख्या सर्व बाजूने नडलेल्या, आर्थिकदृष्ट्या पंगू झालेल्या, धार्मिकदृष्ट्या कमकुवत बनलेल्या, सामाजिकदृष्ट्या कसपटाप्रमाणे लेखल्या गेलेल्या व राजकीयदृष्ट्या निर्माल्यवत् बनलेल्या अशा समाजास काही सवलती देण्यास जर हिंदू समाज तयार होत नाही तर भावी स्वराज्यात म्हणजे ज्या राज्यात राजकीय सत्तेचा बहुतांश वाटा हिंदुंच्या हातात जाणार त्या राज्यात त्या दुर्बल अस्पृश्य समाजाची काय गत होणार, ही मला मोठी शंका उत्पन्न झाली व मी सर्वांस स्पष्ट बजाविले की, जर भावी स्वराज्यात अस्पृश्य वर्गास जरूर असलेल्या सवलती मिळत नसतील, तर त्या स्वराज्यास अस्पृश्य समाज आपली संमती कदापि देणार नाही. दुसऱ्या अधिवेशनात अस्पृश्यांकरिता मी मागण्या सादर केल्या व त्या मुख्य प्रधानांजवळ रूजू केल्या. तरीपण मुख्य प्रधानांचा जो निवाडा जाहीर झाला त्यात मी मागितलेला स्वतंत्र मतदार संघ काही जागांकरिता आपल्यास देण्यात आला होता. आपल्या मागणीप्रमाणे जरी सर्व जागा आपल्यास मिळाल्या नव्हत्या तरी त्यात समाधान मानण्यास जागा होती व आता आपण पुढील कार्यास लागावे, अशा विचारात मी होतो. संकटाला तोंड देऊन अस्पृश्य समाजाकरिता थोडेबहुत कार्य आपल्या हातून झाले, याबद्दल मला थोडासा संतोष वाटत होता व जीव खाली पडला होता. फार कशाला वन्य पशूंच्या तावडीतून सुटून एखाद्या निवाऱ्याच्या ठिकाणी ज्याप्रमाणे एखादे हरीण स्वस्थचित्त होते त्याचप्रमाणे माझी मनःस्थिती झाली होती. इतक्यात म. गांधींची घोर प्रतिज्ञा कानी आली. अस्पृश्यांच्या सुदैवाने यावेळी मात्र अस्पृश्यांच्या मागण्यास महात्माजींचा विरोध न होता त्यांचा मला पुष्कळ वेळी उपयोग झाला. महात्माजींनी पुष्कळच मिळते घेतले व हिन्दू पुढाऱ्यांशी जो आपला तहनामा झाला त्यात अस्पृश्यांचा फायदाही झाला. पंजाब प्रांतात

अस्पृश्यांना एकही जागा मिळाली नव्हती. तेथे त्यास ८ जागा मिळाल्या. शिवाय इतर प्रांतातील अधिक जागा मिळाल्या त्या वेगळयाच. दुसरा फायदा मध्यवर्ती कायदे कौन्सिलात अस्पृश्यांच्या जागेचे प्रमाण शेकडा १८ ठरविण्यात आले, हा होय. या प्रश्नासंबंधाने मुख्य प्रधानांच्या निवाड्यात काही नामनिर्देश नव्हता. मुख्य प्रधानांच्या निवाड्यात अस्पृश्यास अत्यंत हानिकारक व धोक्याचे असे एक किल्मिष राहिले होते आणि त्या सर्व सवलती २० वर्षानंतर आपोआप नाहीशा व्हावयाच्या होत्या, हे होय. २० वर्षात काही इकडील दुनिया तिकडे होणार नव्हती व या अल्पावधित हजारो वर्षे चालत आलेले अन्याय नष्ट झाले नसते. तेव्हा सर्वसाधारण हिन्दू समाजाचा दृष्टिकोन बदलल्याशिवाय अस्पृश्यांस मिळालेल्या विशेष सवलती काढून घेणे म्हणजेच वाढीस लागलेल्या झाडाची अकाली खच्ची करणे होय. नवीन तहनाम्याप्रमाणे ही परिस्थिती बदललेली आहे. आता असे ठरले आहे की, हिंदू समाज व अस्पृश्य यांच्या परस्पर संमतीनेच या सवलती दूर होतील. हिंदू समाजाने आपल्या प्रत्यक्ष कृतीने अस्पृश्यांचा विश्वास संपादन केला तर या सवलती अस्पृश्य आपणहून सोडतील. नाही तर ही व्यवस्था चालू राहील. हे सर्व ठीक झाले. पण मिळालेल्या फायद्याचा तुम्ही जर योग्य तऱ्हेने उपयोग करून घेणार नाही तर आंधळयापुढे रत्न ठेवण्यासारखी तुमची स्थिती होईल. जे मिळाले आहे त्याचा तुम्ही योग्य उपयोग केला पाहिजे. तुम्हास किती सत्ता मिळाली आहे याची योग्य कल्पना येण्याकरिता स्वराज्यातील भावी मुंबई कायदे कौन्सिलाचे चित्र तुम्ही आपल्या डोळयासमोर आणा. २०० जागांपैकी कोणत्याही पक्षाकडे निदान ११५ जागा असल्याशिवाय त्यास राज्यकारभार चालविता येणार नाही. या प्रांतात सर्वात अधिक जागा हिंदूंच्या वाट्यास आल्या आहेत ; आणि त्या जवळ जवळ १०० आहेत. या शंभरांना तुमच्या १५ शिवाय राज्यकारभार हाकता येईल का ? मुसलमान वगैरे इतर लहान गटासंबंधी तर बोलावयासच नको. तेव्हा तुमच्या हातात अलौकिक शक्ती आली आहे तिचा उपयोग तुम्ही आपली आर्थिक उन्नती करून घेण्याकरिता केला पाहिजे. दुसरी एक महत्त्वाची व मननीय सूचना तुम्हास द्यावयाची आहे. आज जिकडे तिकडे तुमच्याकरिता देवालयाचे दरवाजे उघडण्याचा प्रयत्न चालू आहे. हा प्रयत्न करणाऱ्यांच्या शुद्ध हेतूबद्दल मला शंका नाही परंतु देवालयात जाण्यास मिळाले म्हणजे तुमचा उद्धार होत नाही, हे तुम्ही विसरता कामा नये. देवालयातील मूर्तीभोवती खेळणाऱ्या आध्यात्मिक भावनेपेक्षा पोटाची खळगी कशी भरतील याची विवंचना तुम्हाला अगोदर बाळगिली पाहिजे. खाण्यास पुरेसे अन्न नाही, अंगभर वस्त्र नाही, शिक्षण घेण्याची सोय नाही, द्रव्याच्या अभावी

औषध पाणी घेता येत नाही अशा दैन्यावस्थेत सापडलेला आपला समाज आहे. ही परिस्थिती पालटून आयुष्यातील आवश्यक असलेल्या सुखसोयी उपभोगण्यास मिळतील या ध्येयाने तुम्ही आपला पुढील कार्यक्रम आखला पाहिजे. मिळालेल्या राजकीय सत्तेचा उपयोग तुम्ही या दिशेने केला पाहिजे. देवालयात जाण्याचे मार्ग मोकळे झाले, केवळ अस्पृश्यता दूर झाली, म्हणून मिळालेले हक्क गमावणे उचित होणार नाही. आपली आजची दैन्यावस्था ही दैवदुर्विलासाचे फळ आहे, ह्या खुळचट व आत्मवंचक कल्पनेला अजिबात फाटा द्या आणि माझी अशी पक्की खात्री आहे की, या भोळसर कल्पनांना झुगारून देऊन आपल्यातील प्रत्येक इसम राजकारणाकडे नजर ठेऊन राजकीय सत्तेचा योग्य उपयोग करून घेईल तर आपल्या समाजाची दुःखे दूर झाल्याशिवाय राहणार नाहीत. एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट मात्र ही की, तुम्ही जे पुढारी निवडाल व ज्यांच्यावर तुम्ही विश्वास ठेवाल ते तुमचे खरे मार्गदर्शक होतील. तुमचे हित व ज्यांचे हित एक असेल व जे स्वार्थी नसतील असेच पुढारी तुम्ही निवडा. दुसऱ्या पक्षाच्या ओंजळीने पाणी पिणारे किंवा त्यांची भाडोत्री कामे करणारे लोक तुमची केवळ फाटाफूट करतील व दिशाभूल करतील. ते तुम्हास दगा दिल्याशिवाय राहणार नाहीत. तरी या नामधारी पुढाऱ्यांपासून तुम्ही दूर रहा. यापुढे आपल्याला पुष्कळ कामे करावयाची आहेत. आज स्थिर अशा आपल्याजवळ संस्था नाहीत. सर्व चळवळीचे केंद्रस्थान म्हणून एखादी स्वतंत्र जागा नाही किंवा हरएक काम करण्याकरिता माणसे नाहीत. या अडचणी दूर करण्याकरता २ लाख रुपयांचा निधी उभारण्याचा मी संकल्प केला आहे. वयात आलेल्या प्रत्येक स्त्री-पुरुषाने या फंडात भर घातली पाहिजे आणि मला खात्री आहे की, तुम्ही मनात आणाल तर एकट्या मुंबईमध्ये तुम्ही हा फंड उभारू शकाल. या कामास लौकरच सुरूवात होणार आहे व तुम्ही सर्वांनी एकदिलाने कंबर कसून या कामास हातभार लावला पाहिजे. तसेच तुम्ही जनता पत्राचा खप वाढविला पाहिजे. ते आपले मुखपत्र आहे. त्या पत्राद्वारे जनतेत स्फूर्ती उत्पन्न होणार आहे. तेव्हा ते पत्र स्वावलंबी करणे तुमचे कर्तव्य आहे.

याप्रकारे बाबासाहेबांचे सुमारे एक तास भाषण झाले. त्यांच्या भाषणातील प्रत्येक शब्द जमलेली मंडळी रत्नाप्रमाणे झेलीत होती. नंतर अध्यक्षांचे, बाबासाहेबांचे व इतर मंडळीचे आभार मानण्यात आले व सुमारे बारा वाजता सभा बरखास्त झाली.

● ● ●

# ५९

# भोळसट कल्पनांमुळे इहलोकातील खडतर आयुष्यक्रम कष्टमय झाला आहे

बेलासीस रोड इंप्रुव्हमेंट ट्रस्टच्या चाळीजवळील मैदान रविवार ता. ८* ऑक्टोबर १९३२ रोजी रात्रौ १०-३० वाजता स्त्री-पुरुषांनी भरून गेले होते. सोशल सर्व्हिस लीगचे एक प्रमुख कार्यकर्ते श्री. बापुसाहेब सहस्त्रबुद्धे यांनी त्या दिवसाच्या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारले होते. आपल्यास अध्यक्षपदाचा मान दिल्याबद्दल सभेच्या चालकांचे मनःपूर्वक आभार मानताना ते म्हणाले की, डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे आपल्या विशाल विद्वत्तेने, अचल मनोधैर्याने व अद्वितीय पराक्रमाने जगन्मान्य झाले आहेत. त्यांच्या व्याख्यानाचे प्रसंगी आपल्यासारख्या साध्या समाजसेवकास अध्यक्षपदाचा मान देणे म्हणजे आपल्यावर ते एक संकट लादणे होय, पण दगडास देव करण्याची हिंदू लोकास सवयच आहे. तेव्हा तुम्ही तरी त्यास कसे अपवाद ठरणार ! आणखी थोडे समयोचित असे भाषण करून त्यांनी सभेच्या कार्यास सुरवात केली. या सभेतील मुख्य ठराव म्हणजे पुण्याच्या तहनाम्यास पाठिंबा देणे, तो श्री. सी. ना. शिवतरकर यास सभेपुढे मांडावयास सांगितला. रा. शिवतरकर हे पुण्याच्या तहनाम्यावर सही करणाऱ्यापैकी एक आहेत. डॉ. आंबेडकरांचा व हिंदू पुढाऱ्यांचा खल चालू असताना ते पुण्यास स्वतः हजर होते. त्यामुळे त्यांनी तहनाम्यातील कलमांवर चांगले भाषण केले. रा. चव्हाण व इतर वक्त्यांनी या ठरावास दुजोरा दिल्यानंतर तो टाळयांच्या गजरात पास झाला.

नंतर दुसरा ठराव रा. ब. बोले यांचे बिलास पाठिंबा देण्याकरिता होता. तो रा. वनमाळी यांनी मांडला. मुंबईच्या म्युनिसीपल कॉर्पोरेशनच्या स्कूल कमिटीवर अस्पृश्यांचा खास प्रतिनिधी असणे कसे अवश्य आहे हे व्यवस्थितरीतीने त्यांनी विषद केले. या ठरावासही योग्यरीतीने दुजोरा मिळाल्यावर तो पास झाला. नंतर अध्यक्षांनी डॉ. बाबासाहेबांस भाषण करण्याची विनंती केली. त्यांचे भाषण ऐकण्यास श्रोतृवृंद आधीच अतिशय उत्सुक. त्यात वरील दोन ठराव मांडण्यात जास्त वेळ गेल्यामुळे ऐकणाऱ्यांची उत्कंठा क्षणोक्षणी वाढत गेली होती. त्यांच्या भाषणात नाटकी आविर्भावास वाव नाही पण उच्चारलेल्या प्रत्येक शब्दात चित्ताकर्षकता भरपूर व विचार प्रकर्षतेस अगडबंब शब्दांचा लेपही नाही, पण प्रत्येक विचार मालिका इतक्या सरळ व साध्या शब्दांत गुंफित केलेली

---

जनता : शनिवार, १५ ऑक्टोबर १९३२.

* तारीख ९ ऑक्टोबर १९३२ असावी–संपादक.

असते की, ती अजाण बालकांनी किंवा अज्ञ खेडवळानेही ती ग्रहण करावी. इतके असूनही प्रत्येक शब्द व मुद्दे एखाद्या कुशल कायदेपंडिताप्रमाणेच मांडले जातात. खुनाकरिता फासावर लटकवल्या जाणाऱ्या आरोपीची केस रंगविताना कुशाग्रबुद्धीचा वकील ज्याप्रमाणे आपली बाजू ज्युरीस समजावून देण्याकरिता मांडीत असतो, त्याचप्रमाणे ते कोणताही विषय श्रोत्यांस समजावून देतात. ज्ञानाभिलाषी पठीक विद्यार्थ्यास सहज विषय विशद करून देण्याची त्यांची हातोटी अज्ञ श्रोत्यांसही कोणताही विषय समजावून देताना सहज प्रतिबिंबित होते. शनिवारी रात्री झालेले त्यांचे भाषण असेच संस्मरणीय झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

मरणोत्तर मोक्षप्राप्तीकरिता तळमळणारी वृत्ती किवा काल्पनिक स्वर्गीय नंदनवनाकडे खिळलेली दृष्टी ही आजच्या परिस्थितीत आत्मघातकी आहे. इहलोकातील खडतर आयुष्यक्रम त्या भोळसट कल्पनांमुळे, कष्टमय झाला आहे. स्वपराक्रमाने पोषक अन्न मिळविणे, ज्ञानार्जनाची साधने अंकित करणे व इतर प्रकारे जीवितक्रम सुखकर करणे या जिव्हाळयाच्या प्रश्नांकडे बहुजन समाज पराङमुख झाल्यामुळे सर्व देशाची उन्नती स्थगित झाली आहे हे रोजच्या आयुष्यक्रमातील अनुभवावरून स्पष्ट होते. गळयातील तुळसीमाला तुम्हास मारवाड्याच्या कैचीतून मुक्त करण्यास उपयोगी पडत नाही किंवा तुम्ही रामनामाचा जप करता म्हणून घरवाला भाड्याची सूट देत नाही अगर वाणी आपले पैसे कमी करत नाही. तुम्ही पंढरीचे वक्तशीर वारकरी आहा म्हणून तुमचा मालक तुम्हास पगारात वाढ देत नाही. समाजातील अत्यंत मोठा भाग या मूढ कल्पनात गढून गेल्यामुळे काही आपमतलबी माणसांचा कावा साधतो व ते तुम्हाला सर्वथैव नाडून आपला डाव साधतात. तेव्हा तुम्ही यापुढे तरी अत्यंत सावधगिरीने वागले पाहिजे. आज तुम्हाला थोडीबहुत राजकीय सत्ता प्राप्त होत आहे. त्या सत्तेविषयी जर तुम्ही उदास राहाल, आपली आजची स्थिती बदलण्याकरिता योग्य उपाययोजना न कराल तर तुमचे हाल झाल्याशिवाय राहणार नाहीत. ' येरे माझ्या मागल्या आणि ताक कण्या चांगल्या ' ही एक मराठीत म्हण आहे. त्याप्रमाणे जर तुम्ही वागाल तर तुमची कधीच ऊर्जितावस्था होणार नाही. या प्रकाराची उदासीनता व मनाची प्रवृत्ती ही तुमच्या ऊर्जितावस्थेत अत्यंत विघातक आहे आणि मला मोठी शंका येते ती हीच की, आज आपल्यात जागृती होत आहे ती क्षणिक ठरून जर विराम पावली तर काय ? ज्या गुलामगिरीस नेस्तनाबूत करण्यास आज आपण सज्ज झालो आहो तिचा पगडा परत तुमच्यावर बसणार नाही ना ? आजपर्यंत वैष्णवपंथी संतजनांनी तुम्हास समानतेच्या पायरीवर आणण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांची शिकवणूक सर्वस्वी

पारमार्थिक स्वरूपाची असल्यामुळे व ते स्वतः ऐहिक सुखांपासून अलिप्त राहिल्यामुळे ते आपला सामुदायिक दर्जा वाढवू शकले नाहीत. त्यांच्या शिकवणुकीने तुमच्या गुलामगिरीत काडीचाही फरक पडला नाही. हिंदुस्थानातील बहुजन समाज राजकारणापासून अलग राहिल्यामुळे आज देशास दुर्दशा प्राप्त झाली आहे. तरी त्या चुकीची पुनरावृत्ती आपण न करता अत्यंत जागरूकतेने पुढील कार्यक्रम आखला पाहिजे. शिक्षण व अस्पृश्यांची उन्नती याचा अत्यंत निकट संबंध आहे. मुंबई शहरात त्यांची संख्या दोन लाखाजवळ आहे. मुंबईतील प्राथमिक शिक्षणाची व्यवस्था म्युनिसीपल कॉर्पोरेशनची स्कूल कमिटी पाहात असते. त्या कमिटीचा ३०-३२ लाखाचा दरवर्षी खर्च होत असतो. हा खर्च होत असताना दोन लाख अस्पृश्य वर्गातील लोकांची काय व्यवस्था होत आहे ? निरनिराळया शाळांकरिता शिक्षकांच्या ज्या नेमणुका होतात त्यात अस्पृश्य शिक्षकांची सोय होत असते की नाही इत्यादी अस्पृश्यांच्या हिताचे अनेक प्रश्न आहेत. त्यांची वासलात कशी लागते हे दक्षतेने पाहण्याकरिता कमिटीवर अस्पृश्यांचा एक तरी प्रतिनिधी असला पाहिजे. या साध्या मागणीस इतरांनी का विरोध करावा हे समजणे कठीण आहे. हल्ली कायदे कौन्सिलात चर्चेकरिता पुढे आलेल्या ग्रामपंचायत बिलानुसार पंचायतीस लहानसहान फौजदारी व दिवाणी खटल्यात न्यायदानाचा अधिकार देण्यात येणार आहे. पंचायतीतील सभासद लोकमताने निवडले जाणार. अशा निवडून आलेल्या लोकांच्या निःपक्षपातीपणाबद्दल शंका आहे. प्रत्येक गावात अस्पृश्य हा अल्पसंख्यांक वर्ग असून तो अगदी परावलंबी असल्याकारणाने या ग्रामपंचायतीच्या घटनेत अस्पृश्यांस स्वसंरक्षणार्थ योजना असल्याशिवाय या गरीब समाजाची धडगत नाही. वरळी येथील सभेत जाहीर केल्याप्रमाणे संघटित कार्य करण्यासाठी एक मध्यवर्ती संस्था स्थापावयाची आहे. अशा संस्थेच्या अभावी आज अस्पृश्य वर्गातील लोकांच्या अनेकविध गाऱ्हाण्यांची दाद लागत नाही. कोठे अस्पृश्यांस मराठ्यांनी मारले, कोठे त्यांच्या मुलास त्रास दिला, कोठे त्यांची वतने बंद केली अशा एक ना अनेक तक्रारी आहेत. एके गावी अशाच काही कारणांवरून मामलेदाराकडून महारांचा जबाब घेण्यात आला. खालील अधिकाऱ्यांनी खोटी तक्रार केली होती की, महार सरकारी कामे करीत नाहीत. महारांनी सरकारी काम करण्याचे कधीच नाकारले नव्हते व त्याप्रमाणे मामलेदाराजवळ त्यांनी जबाब दिला. मामलेदारांनी उलट जबाब लिहून घेतला व महारांची वतने जप्त करण्याची शिफारस केली. वरिष्ठ अधिकाऱ्यांचीही तीच गोष्ट. कोणीही महारांचे म्हणणे कबूल केले नाही व शेवटी वतने काही वर्षांकरिता जप्त झाली व त्यात महारांचे हजारो रुपयांचे नुकसान झाले. या तक्रारी कानी आल्याबरोबर

एखादा वकील तिकडे पाठवावयास पाहिजे, अधिक चौकशी करावयास पाहिजे, पण पैशाच्या अभावी हे घडणे दुरापास्त आहे. या कामाकरिता फंड जमवून योग्य तजवीज केल्याशिवाय गत्यंतर नाही. मात्र सरकारी अंमलदारांस याबाबतीत असे स्पष्ट बजावल्याशिवाय राहवत नाही की, अशी परिस्थिती चालू राहिल्यास त्याचा परिणाम चांगला होणार नाही.

अशाप्रकारे त्यांचे भाषण झाल्यावर अध्यक्षांनी मे. मणियार साहेब सभेस आले होते त्यांना दोन शब्द बोलण्यास विनंती केली. मे. मणियार साहेबांनी पुण्याच्या तहनाम्यासंबंधी आपला आनंद व्यक्त करून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या कामगिरीची अत्यंत प्रशंसा केली. नंतर अध्यक्षांचे आभार मानण्यात आले व सभा बरखास्त झाली.



## ६०

# पुढारलेल्या लोकांनी स्पृश्यास्पृश्यता काढून टाकली पाहिजे

महार समाज सेवासंघ (राजापूर ते गोवा हद्द) यांच्या विद्यमाने दि. २२ ऑक्टोबर १९३२ रोजी संध्याकाळी ७ वाजता सावंतवाडी येथील तुरूंगानजिकच्या महारवाड्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या स्वागतार्थ व अभिनंदनार्थ अस्पृश्यांची जंगी जाहीर सभा भरविण्यात आली होती. त्यादिवशी तर पाऊस मी म्हणत होता. त्याच्या दर ५/५ मिनिटांनी सरीवर सरी येत होत्या. संघाच्या मंडळीनी फार मेहनत घेऊन स्टेज तयार केले होते. सभेस सुमारे हजार बाराशे स्पृश्य व अदमासे दोन हजार अस्पृश्य हजर होते. अध्यक्षांची सूचना शिवराम नारायण वालावलकर यांनी आणली व तिला अनुमोदन गणपत जाधव यांनी दिल्यानंतर अध्यक्षस्थानी बाबासाहेब घोरपडे यांची योजना झाली. अध्यक्ष स्थानापन्न झाल्यानंतर त्यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची ओळख करून डॉ. साहेबांस चार शब्द बोलण्यास विनंती केली. बाबासाहेब बोलावयास उभे राहिले. टाळयांचा गगनभेदी कडकडाट झाला. आकाश काळवंडलेलेच होते. बाबासाहेबांनी सहज आकाशाकडे पाहिले व पावसाला उद्देशून ते बोलले,

" मेघराजा फक्त दहाच मिनिटे कृपा कर. " त्यानंतर डॉ. साहेबांनी लहानसेच पण अत्यंत मार्मिक व चटकदार भाषण केले. आपल्या भाषणात डॉ. साहेबांनी अस्पृश्य बांधवांना आपल्या पायावरच अवलंबून आपल्या उन्नतीच्या मार्गास लावण्याविषयी चार कळकळीचे शब्द सांगितले व नंतर त्यांनी मूठभर पुढारलेल्या लोकांनी मागासलेल्या बहुसंख्यांक लोकांवर व अस्पृश्यांवर कसा जुलूम चालविला आहे, हे सांगून त्यांना ही स्थिती नष्ट करण्याबद्दल चार उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या. केवळ स्वार्थाच्या व आत्मसंरक्षणाच्या दृष्टीने तरी पुढारलेल्या लोकांनी स्पृश्यास्पृश्यता काढून टाकली पाहिजे व सर्वांना समानतेच्या हक्काने वागविले पाहिजे. तसे न झाल्यास हिंदू समाज आपल्या हाताने आपल्या नाकावर दगड मारून घेईल अशा आशयाचे भाषण केले. अशाप्रकारे नेमकी दहा मिनिटे त्यांनी भाषण केले. आणि ते खाली बसले व सभेतून उठून जाण्याची अध्यक्षांपाशी विदा मागून मोटारीत पाय ठेवला, आणि लगेच धो धो पाऊस सुरू झाला. तो पुढे पाच मिनिटे सुरूच होता.



---

जनता : ५ नोव्हेंबर १९३२.

—पावसासंबंधी आलेला संदर्भ श्री. बी. एस. जाधव, त्रिंबककर यांच्या ' निसर्गावर ताबा ' या शिर्षकाखाली दिनांक १ मे १९५४ च्या जनतेत प्रकाशित आठवणीतून पडवे प्रकरण व अंदाजे वीस वर्षापूर्वीची घटना या बाबी लक्षात घेऊन घेतला आहे.—संपादक.

# ६१

# वंशपरंपरेची कामे सोडून शिक्षणाची कास धरा

शुक्रवार, तारीख २८ ऑक्टोबर १९३२ रोजी मुंबईच्या अपोलो बंदर येथे सर कावसजी जहांगीर हॉलमध्ये अस्पृश्य वर्गाचे पुढारी डॉ. पी. जी. सोळंकी यांच्या अध्यक्षतेखाली अखिल भारतीय अस्पृश्य वर्गाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना मुंबईतील ऋषी समाजातर्फे मानपत्र देण्याकरिता जाहीर सभा भरली होती. सभेच्या ठिकाणी व्यवस्था ठेवण्याकरिता समता सैनिक दलाचे स्वयंसेवक हजर होते.

डॉ. आंबेडकरांनी मानपत्राचा स्वीकार केल्यावर ते म्हणाले,

मी फार दिलगीर आहे की, हे मानपत्र फक्त मला एकट्यालाच देण्यात येत आहे. अस्पृश्य वर्गाचे जे काही काम होत आहे ते सगळे माझ्या एकट्याकडून होत आहे हे म्हणणे अगदी खोटे आहे. या कामात जितके तुम्ही मला श्रेय देता त्यापेक्षा जास्त श्रेय डॉ. सोळंकी व माझ्याबरोबर काम करणारे लोक यांना दिले पाहिजे. डॉ. सोळंकी माझ्याबरोबर काम करितात. मी गेल्या तीन वर्षात कौन्सिलमध्ये काहीच काम केले नाही. पण डॉ. सोळंकीसाहेबांनी कौन्सिलात अस्पृश्य वर्गाची फार बहुमोल सेवा केली आहे. पुण्याला हिंदू पुढाऱ्यांच्या बरोबर जी आमची वाटाघाट झाली त्यावेळी डॉ. सोळंकी यांनी मला फार फार मदत केली. त्यांनी त्यांना देण्यात यावयाच्या मानपत्राचा स्वीकार न करिता मलाच मानपत्र दिले पाहिजे असे जे या सभेच्या चालकास सांगितले हा त्यांच्या मनाचा थोरपणा होय. शेवटी मला आपणाला हेच सांगावयाचे आहे की, पुणे करारात आपला जो फायदा झाला आहे त्याचा उपयोग आपले लोक कसा करून घेतील हे समजत नाही. संसारामध्ये मनुष्याला जी सुख-दुःखे भोगावी लागतात ती ईश्वरी इच्छेनेच होतात, आपले दारिद्र्य हे आपणासाठीच आहे असे लोक मानतात. त्यासाठी सगळयांनाच मला हे सांगावयाचे आहे की, ही अशी स्वतःला नीच समजण्याची भावना सोडून द्या. लक्षात ठेवा की, राजकारणात जो मोठा बदल झाला आहे त्याची उच्च वर्णाचे हिंदू लोक काही किंमत करीत नाहीत. ते लोक या देशाचे राज्यकर्ते झालेले आहेत. त्याकरिता आपणाला पुन्हा हिंदू लोकांच्या गुलामगिरीत राहण्याचा प्रसंग येणार नाही, कारण आता यापुढे जे कायदे व्हावयाचे ते अस्पृश्य वर्गाच्या संमतीनेच होतील. ही एक सामाजिक क्रांती आहे. मी आपणास सांगतो की, अस्पृश्य वर्गाला जे हक्क मिळाले आहेत ते लुबाडून घेण्याचे प्रयत्न उच्च वर्णाचे हिंदू करतील. समतेच्या पायावर

---

जनता : ५ नोव्हेंबर १९३२.

गांधींबरोबर झालेला तह हिंदू लोकांना आवडत नाही हे मी ओळखून आहे. फक्त गांधींनी उपवासास सुरुवात केली म्हणून त्यांना वाचविण्याकरिता हा तह हिंदूंना करावा लागला. तरीपण आपल्या हाती आलेली सत्ता हिसकावून घेण्याचा ते प्रयत्न करतील अशी मला शंका आहे. तेव्हा आपल्या हाती आलेली सत्ता तुम्ही गमावणार नाही अशी मला आशा आहे.

दुसरी एक महत्त्वाची पण अगत्याची सूचना मी आपणाला देतो की, सहभोजन व मंदीर प्रवेश यांच्या मी विरुद्ध नाही. पण या प्रकाराने आपणास राजकीय हक्क मिळणार नाहीत. आपणाला संसार चालविण्याची आवश्यकता आहे. भाकर, अंगावर कपडा, राहावयास चांगली जागा आपणास पाहिजे. ज्याप्रमाणे उच्च वर्गाचे हिंदू लोक आपल्या मुलांना शिक्षण देतात, त्याचप्रमाणे आपल्या मुलांना शिक्षण देण्याची फार जरूरी आहे व त्यांच्याप्रमाणे आपणही सर्व प्रकारच्या सरकारी नोकरीत शिरण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हे जर आपण केले तरच आपला उद्धार होईल.

शेवटी ऋषी मंडळींना मी एक प्रेमाची सूचना देतो की, आपल्या अस्पृश्य वर्गात ज्या काही जाती आहेत त्या नाहीशा करण्याचे आपण प्रयत्न केले पाहिजेत. अस्पृश्य वर्गात सामाजिक सुधारणा करण्याचे पुष्कळ प्रयत्न केले पाहिजेत. ज्याप्रमाणे कोणत्याही घराचा पाया मजबूत असला तरच ती इमारत जास्त दिवस टिकते त्याप्रमाणे ऋषीसमाज अस्पृश्य वर्गाचा पाया आहे. म्हणून त्यांचे सामाजिक कार्य अस्पृश्य वर्गाला आदर्श रुप पाहिजे. ऋषीसमाज जर जाहीर करील की आम्ही कोणत्याही जातीपेक्षा नीच नाही व उच्चही मानीत नाही तर अस्पृश्य वर्गात सुधारणा फार झपाट्याने सुरू होईल. दुसरी गोष्ट उच्च वर्णाच्या लोकांनी आपली भावना अशी करून दिलेली आहे की, भंग्याचे काम वंशपरंपरा करणे हे आपले काम आहे व अशी मनोवृत्ती आपली झाली आहे, परंतु मी आपणाला स्पष्ट सांगतो की, आपली ही अशी मनोवृत्ती होण्याचे कारण आपली आर्थिक स्थिती होय. हल्ली भंग्याचे काम करणारांनी हे काम वंशपरंपरा करण्याचे धोरण सोडून दिले पाहिजे व त्यांना उत्तम शिक्षण दिले पाहिजे.

आपल्या परिस्थितीत जर काही फेरफार करावयाचे असतील तर अस्पृश्यता समूळ नाहीशी झाली पाहिजे तरच होईल, तरी आपण उच्च वर्णाच्या हिंदू लोकांच्या नादी न लागता आपला उद्धार करावयास लागले पाहिजे. असो. आपण आज मला जे मानपत्र दिले त्याबद्दल मी आपले आभार मानून माझे भाषण संपवितो.

• • •

६२

# आपल्यातील भेद मोडणेच इष्ट

शुक्रवार ता. ४ नोव्हेंबर १९३२ रोजी रात्रौ ९ वाजता बालपाखाडी येथे गुजराती मेघवाळ व इतर सर्व अस्पृश्यांची जंगी जाहीर सभा भरविण्यात आली होती व त्या ठिकाणी '' गांधी-आंबेडकर करार अजरामर होवो, '' '' डॉ. आंबेडकर हेच आम्हा अखिल अस्पृश्यांचे खरे पुढारी आहेत, '' '' डॉ. आंबेडकर यांना अस्पृश्यांचा उद्धार करण्यास परमेश्वर उदंड आयुष्य देवो. '' अशा म्हणी व्यासपीठावर सर्व बाजूस लावण्यात आल्या होत्या. डॉ. बाबासाहेब आंबेडकर बरोबर नऊ वाजता डॉ. सोळंकी, शिवतरकर, गोविंद चव्हाण, सुभेदार सवादकर, फणसे, चित्रे बंधू व इतर पुढाऱ्यांबरोबर येऊन सभास्थानी हजर झाले. ते आल्याबरोबर '' डॉ. आंबेडकर झिंदाबाद '' चा ध्वनी सर्वत्र घुमू लागला. डॉ. आंबेडकर यांचा जयजयकार एकसारखा पाच मिनिटे झाल्यावर श्रीयुत भाणजी राठोड यांनी, डॉ. सोळंकी साहेबांनी अध्यक्षस्थान स्वीकारावे अशी सूचना आणली. तीस शिवराम चौहाण यांनी अनुमोदन दिल्यावर डॉ. सोळंकी साहेब प्रचंड टाळयांच्या गजरात अध्यक्षस्थानी विराजमान झाले. नंतर लक्ष्मण डी. सोळंकी डिप्रेस्ड क्लास वेलफेअर कमिटीचे प्रमुख यांनी मानपत्र वाचून दाखविले व रौप्य करंडकातून अध्यक्षांच्या हस्ते अर्पण केले. मानपत्रास उत्तर देताना डॉ. आंबेडकरसाहेब म्हणाले,

बंधु भगिनींनो !

तुम्ही मला जे मानपत्र दिले त्याचे महत्त्व मी सर्व ठिकाणी मला मिळालेल्या मानपत्रापेक्षा जास्त आहे असे समजतो व त्याबद्दल मी तुमचा फार आभारी आहे. आपण या चाळीमध्ये राहणारे लोक म्युनिसीपालिटीत काम करणारे आहात. याठिकाणी पुष्कळ वेळा खादी भक्त काँग्रेसचे अभिमानी म्हणविणारांनी येवून तुम्हाला उपदेश केलेला आहे. काँग्रेस हीच तुमचा उद्धार करील. तिला मदत करा. पण तेच खादीभक्त म्युनिसीपालिटीच्या कार्पोरेशनमध्ये आहेत. त्याठिकाणी त्यांनी तुमच्याकरिता काय केले आहे याचा विचार करा. पाच रुपये भरणारास मताचा अधिकार असावा असे ज्या ज्या वेळी ठराव आले ते सर्व ठराव गरीब गुरीबांचे कैवारी म्हणवून घेणारे पण श्रीमंतांच्या हिताकरिता प्राणापलिकडे जपणारे लोक म्हणजे हे खादीभक्त काँग्रेसवादी यांनी फेटाळून लाविले आहेत. तुमच्या राहण्याच्या खोल्यांची स्थिती सुधारण्याची किंवा तुम्हास मिळत असलेला अपुरा पगार वाढविण्याची या लोकांनी केव्हाही खटपट केली नाही. तुम्ही जर आपले काम चार दिवस बंद पाडले तर

जनता : १२ नोव्हेंबर १९३२.

या शहरात घाण साचून त्यामुळे रोगाचा फैलाव होईल, पण अशा परोपकारी कामाचा मोबदला काय ? तर आपलेच हे हिंदू लोक आपणाला गुलामगिरीत ठेवीत आहेत. आपणाला स्वतंत्र मतदार संघ मिळाला म्हणून माझे मित्र म. गांधी यांनी उपोषणाला आरंभ केला. त्याचाच परिणाम हा आहे की, हे लोक गांधींसाठी देवळे उघडी करावयास लागले आहेत. पण ही चळवळ अळवावरच्या पाण्यासारखी आहे. ती ओसरून जाईल म्हणून या लोकांवर तुम्ही भरवसा ठेवू नका. आपणाला सामाजिक दर्जा समानतेच्या पायावर मिळावावयाचा आहे. आपली आर्थिक गुलामगिरी नाहीशी केली पाहिजे याकरिता आपण आपल्या पायावर उभे राहून संघटना केली पाहिजे. आपले शील विकून पोट भरणारे लोक तुम्हाला निरनिराळ्या वेळी थापा देतील. त्यापासून सावध रहा व आपल्या मनाला पटेल तेच करा. शेवटी आपणाला हेच सांगावयाचे की हिंदू लोकांना जातीभेद मोडावयास ज्याप्रमाणे आपण सांगतो त्याप्रमाणे आपणही आपल्यातील भेद मोडण्याची पराकाष्ठा केली पाहिजे. असो. आपण गला मानपत्र देऊन माझा जो गौरव केलात त्याबद्दल मी पुन्हा आपले आभार मानून आपली रजा घेतो.



# ६३

# ऐक्याने वागल्यास भावी राजकारण आपली गुलामगिरी नाहिशी करील

शुक्रवार, ता. ४ नोव्हेंबर १९३२ रोजी रात्रौ श्री. गजोबा दुधवले यांनी मराठी भाषा बोलणाऱ्या अस्पृश्य लोकांची सभा बालपाखाडी येथे, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना तिसऱ्या राऊन्ड टेबल कॉन्फरन्सला जातात म्हणून प्रेमाचा निरोप देण्याकरिता भरविली होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे गुजराती बंधुंच्या सभेला गेले होते म्हणूनच ते येईपर्यंत रामचंद्र अडांगळे यांचा राऊन्ड टेबल कॉन्फरन्सवरील जलसा लोकांच्या मनोरंजनार्थ चालू होता. गुजराती बंधूंच्या सभेहून बरोबर ११ वाजता डॉ. आंबेडकर साहेब, सोळंकी, शिवतरकर, चित्रे, फणसे, झकेरिया, मणियार, उपशाम, रेवजी डोळस, मडके बुवा, गायकवाड, वगैरे अस्पृश्य पुढाऱ्यांसह आले. आल्यावर थोडा वेळ जलशातील गाणी ऐकल्यावर ते खुश झाले. नंतर नियोजित अध्यक्ष डॉ. सोळंकी साहेब म्हणाले, बंधुभगिनींनो, आपण डॉ. आंबेडकर साहेबांच्या तोंडचे शब्द ऐकण्यास उत्सुक झाला आहात हे आपल्या चर्येवरून समजते म्हणून मी भाषण न करता डॉ. आंबेडकर साहेबांस आपणास जाते वेळचा संदेश सांगण्यास विनंती करतो. नंतर डॉ. आंबेडकर साहेब हे प्रचंड टाळ्यांच्या गजरात भाषण करण्यास उठले. ते म्हणाले,

बंधुभगिनींनो,

आपणाला जे राजकीय हक्क आता मिळालेले आहेत ते कशाच्या जोरावर मिळाले तर आपल्या संघशक्तीच्या जोरावर मिळाले आहेत. राऊन्ड टेबल कान्फरन्समध्ये जेव्हा माझा व म. गांधी यांचा तीव्र मतभेद झाला तेव्हा म. गांधींची समजूत त्यांच्याभोवती लांगूलचालन करणाऱ्या लोकांनी अशी करून दिली होती की, डॉ. आंबेडकर म्हणजे महार जातीतील एक पोर आहे. त्यांच्या पाठीशी त्यांच्या ऑफिसातील चार-दोन माणसांशिवाय कोणी नाही. पण म. गांधी राऊन्ड टेबल कान्फरन्सहून मुंबईला आले त्यावेळी बेलार्ड पियर बंदरावर अस्पृश्य वर्गातील २० हजार बंधुभगिनींनी त्यांचे काळे बावटे दाखवून स्वागत केले तेव्हा त्यांचे डोळे उघडले आणि म्हणू लागले की, विलायतेमध्ये व येथे माझी माझ्याच अनुयायांनी दिशाभूल करून मला फसविले. डॉ. आंबेडकर यांच्या पाठीशी अस्पृश्यांचा प्रचंड लोकसमुदाय आहे अशी माझी खात्री करून दिली असती तर मी त्यांच्या मागण्यांना विरोध केला नसता. माझ्या मित्रांनी व

---

जनता : १९ नोव्हेंबर १९३२.

अनुयायांनी अस्पृश्यातील गारगोट्या व नदीतील दगड यांना शेंदूर फासून त्यांना जाणून बुजून पुढारी केले व माझी फसवणूक केली. अस्पृश्यांच्या खऱ्या पुढाऱ्यांची मला ओळखसुद्धा होऊ दिली नाही. असो. म्हणून मी जाताना आपणाला प्रेमाचे दोन शब्द सांगतो ते लक्षात ठेवा. ते हे की, तुम्ही आपली एकी कायम ठेवा, दुभंग होऊ देवू नका. जातीभेद, वर्गभेद, जिल्हाभेद हे वाढवू नका. माझ्या पश्चात डॉ.सोळंकी साहेब व माझ्या ऑफिसात माझ्याबरोबर काम करणारी माझी सहायकारी मंडळी यांच्या सहाय्याने वागा. इतरांच्या भुलथापा ऐकून सैरावैरा धावत सुटू नका. माझ्याबरोबर काम करणाऱ्या मंडळीच्या विरूद्ध लोकमत कलुषित करण्याचा प्रयत्न काही बुद्रुकांनी चालू ठेवला आहे हे मला माहीत आहे. तरीपण तुम्ही आपली मने विकारवश होऊ देऊ नका व मी येईपर्यंत ऐक्याने वागा. ऐक्याने वागल्यास आपले भावी राजकारण आपली गुलामगिरी नाहीशी करण्यास इष्ट फलदायी होईल. तसेच मी काढलेल्या विनंती पत्राप्रमाणे आपण सर्वांनी बोर्डींग फंडास शक्य ती मदत करावी. यानंतर हारतुरे झाल्यावर डॉ. आंबेडकरांच्या जयजयकारात सभा आटोपली.



# ६४
# दैवावर भरवसा ठेवून वागू नका, जे करावयाचे ते मनगटाच्या जोरावर करा

शनिवार, ता. १८ फेब्रुवारी १९३३ रोजी कसारा मुक्कामी ठाणे जिल्हा परिषद डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. डॉ. आंबेडकर साहेब हे मुंबईहून मोटारीने रात्री ८ वाजता कसारा मुक्कामी आले. त्यांच्याबरोबर श्रीयुत शिवतरकर, दिवाकर पगारे व गणपतबुवा जाधव उर्फ मडकेबुवा आले होते. कसारा येथे बाबासाहेबांचे स्वागत करण्याकरिता कल्याण येथील समता सैनिक दलाचे व्हॉलंटीयर व आसपासच्या खेड्यातून आलेले प्रतिनिधी हजर होते. नासिकहून मेसर्स भाऊराव गायकवाड, के. बी. जाधव व लिंबाजीराव भालेराव व रोकडे उपस्थित होते. डॉ. आंबेडकर यांची मोटारीतून मिरवणूक काढण्यात आली होती. मिरवणूक सभा मंडपात आल्यावर परिषदेच्या कामास सुरवात करण्यात आली. आरंभी परिषदेचे स्वागताध्यक्ष शंकरनाथ बर्वे यांनी आलेल्या सर्व मंडळीचे स्वागत केल्यावर डॉ. आंबेडकरसाहेब यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावे अशी सूचना मांडली. तीस रा. रोकडे यांनी अनुमोदन दिल्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे टाळयांच्या प्रचंड गजरात अध्यक्षस्थानी स्थानापन्न झाले.

डॉ. आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

ठाणे जिल्ह्यात यापूर्वी मला येता आले नाही. त्यामुळे माझा आपल्याशी फारसा परिचय झालेला नाही. तो महंत शंकरदास बुवा यांनी घडवून आणला याबद्दल मी त्यांचा व ठाणे जिल्ह्यातील सर्व प्रतिनिधींचा हा योग जुळवून आणल्याबद्दल फार आभारी आहे. मी याप्रसंगी फार थोडेच परंतु महत्त्वाच्या प्रश्नावर सूचनात्मक बोलणार आहे. ते तुम्ही लक्षपूर्वक ऐकाल अशी आशा आहे. आज तुम्ही जे काही मिळविले आहे त्याचा विचार कराल तर प्रकार निराळाच दिसेल. महात्मा गांधी व सनातनी लोक यांच्याशी अस्पृश्यता नष्ट करण्याचे बाबतीत गेले आठ-दहा दिवस मी वाटाघाट करीत आहे. महात्मा गांधींनी अस्पृश्यता निवारण करण्याकरिता मंदिरे खुली करण्याची व अस्पृश्यता धुवून काढण्याची चळवळ चालविली आहे. मंदीर प्रवेशाबाबत मी एक जाहीर पत्रक प्रसिद्ध केले आहे. त्यात मी स्पष्ट सांगितले आहे की, आमची अस्पृश्यता नष्ट करण्याकरिता मंदीर प्रवेशाची जरूरच आहे असे नाही.

---

जनता : २५ फेब्रुवारी १९३३.

आम्हाला हिंदू धर्मात समानता पाहिजे व चातुर्वर्ण्य नष्ट झाले पाहिजे तरच हिंदू धर्म आम्हास मानीत आहे असे आम्ही समजू व तरच हिंदू धर्म आम्हास मान्य आहे. हा महात्मा गांधी व माझ्यामध्ये मतभेद आहे. सनातनी चातुर्वर्ण्य काढण्यास तयार नाहीत, देवळे उघडण्यास तयार नाहीत. त्याबरोबर दुसरी बाजू अशी आहे की, या लोकांची सावली घेण्यास ते अद्याप तयार नाहीत. त्यांच्याबरोबर समानतेने वागणे व त्यांची हुकूमत चालवून घेणे त्यांना भाग पडेल. आपल्या उर्जितावस्थेस नुकतीच कोठे सुरुवात झालेली आहे. पूर्वी आपले लोक पोलीसमध्ये नसत पण आज अस्पृश्य माणसे पोलीसमध्ये नोकरीस आहेत. मॅट्रीक झालेली अस्पृश्यांची मुले पोलीस ट्रेनिंगमध्ये शिकत आहेत. त्यांच्या हुकूमतीखाली इतर स्पृश्य लोक नोकऱ्या करू लागतील, याकरता आपल्यात अधिकारी वर्ग अधिकाधिक तयार झाला पाहिजे व सर्व समाजाचा दर्जा वाढला पाहिजे. तरच आपल्यावर कोठे अन्याय घडणार नाही. आज कोणी एकादा डेप्युटी कलेक्टर, कोणी मामलेदार, पोलीस इन्स्पेक्टर झालेले विरळ विरळ दिसत आहेत व पुढे ही संख्या जास्त वाढणार आहे. अशारीतीने आपले लोक अधिकारी झाल्यावर वरच्या वर्गाच्या लोकांचा आपल्यावरचा जुलूम कमी होईल. पण हे सर्व साधावयाचे म्हणजे तुम्ही अत्यंत जागृत राहिलेच पाहिजे. अशी एक म्हण आहे की '' हिरा पडा है बाट मे कोई अंधा निकाल जाय '' आंधळयाला हिऱ्यांची जाणीव नसते. तेव्हा ही आलेली संधी तुम्ही फुकट घालवू नका. या देशाच्या राजकारणात कधीही घडलेली नाही अशी गोष्ट घडून येत आहे. या देशात खालच्याने दळावे व वरच्याने भाकरी खावी. वरच्याची चैन तर खालच्याची दैना अशी परिस्थिती आहे. इंग्रजी राज्य आले तरी त्यांनी क्रांती घडवून आणली नाही व आपली स्थिती बदलली नाही, ते परके लोक होते. त्यांना आपला राज्यकारभार चालविण्याकरिता या उच्चवर्णीयांची मदत घ्यावी लागत असे. म्हणून त्यांच्या अनुमतीने ते राज्यकारभार चालवीत आणि म्हणूनच आगची परिस्थिती काही बदलली नाही. पण यापुढे नवीन राज्यघटनेत आपलीही सत्ता चालेल. वरचा आणि खालचा असा भेद राहाणार नाही.

आपण कायदे घडवून आणू. आपणाला कायदे कौन्सिलमध्ये स्वतंत्र प्रतिनिधी मिळाले आहेत. त्यांचे अधिष्ठान कौन्सिलमध्ये होईल आणि मग त्यांच्या सल्ल्याप्रमाणे सर्व देशाचा राज्यकारभार चालेल. गावात महाराला चावडीत घेत नाही. पण तोच महार लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्ये जाईल तेव्हा गावच्या लोकांना अस्पृश्य लोकांबरोबर समानतेने वागणे भागच पडेल.

परंतु मला मोठा संशय वाटतो की, या मिळालेल्या शक्तीचा तुम्ही योग्य उपयोग कराल किंवा नाही. तुम्ही या गोष्टीची नीट जाणीव ठेवा व तुमच्या हाती आलेल्या शक्तीचा विचार करा. तुमच्यामध्ये अंतरपालट होईल असे करू नका व ऐक्य वाढवा. दुही मोडून टाका. पण मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे की, आपल्यामध्ये दुहीचे व्यसन वाढत आहे. सर्वत्र झगडे चालले आहेत. यामुळे कार्यांचा नाश होत आहे. याचे प्रत्यक्ष उदाहरण नाशिक जिल्हा व कोकण होय. हे दोन भाग एकमेकाला लागून आहेत. कोकण व नाशिक येथे मोठमोठे सत्याग्रह झाले. ते झाले नसते तर आपल्याला जी राजकीय सत्ता प्राप्त झाली ती झाली नसती. नाशिक सत्याग्रहाने तर इतकी प्रचंड खळबळ उडवून दिली की, मी इंग्लडमध्ये असताना तेथे लंडन टाइम्समध्ये त्याची खबर रोज येत असे. ती वाचून इंग्रज लोक देखील आश्चर्य प्रगट करीत असत. इतकी नाशिक जिल्ह्यातील लोकांनी एकीच्या बळावर कामगिरी बजावली होती. पण मला सांगण्यास फार वाईट वाटते की, तोच नाशिक जिल्हा आज मागे पाय घेत आहे. तेथील लोकांनी जणू काय सार्वजनिक कामाचा संन्यास घेतला आहे. आणि हे कशामुळे होत आहे असे विचाराल तर ते केवळ व्यक्तीद्वेषामुळे. याचे एकच उदाहरण इगतपुरी येथे घडलेले देता येईल. त्या ठिकाणी एकदा अस्पृश्यांची सभा भरली होती, तेथे अध्यक्ष कोणी व्हावे यावरच वाद झाला. शेवटी एका खांबाला अध्यक्ष करून सभा पार पाडावी लागली. अध्यक्ष कोणी व्हावे, सेक्रेटरी कोणी व्हावे, खजिनदार कोणी व्हावे याबद्दलच एकमेकांचा द्वेष करू लागले आहेत. हीच परिस्थिती जर कायम राहिली तर आपण जो हा एवढा खटाटोप करून अधिकार मिळविले ते सर्व फुकट जातील. समजा उद्या नाशिकला एक प्रतिनिधी मिळाला तर जो स्वार्थत्यागपूर्वक काम करतो त्यालाच तुम्ही निवडून द्या. शहाणा कोण व वेडा कोण याचा विचार करा. पण मानाला हपापलेल्या मूर्खांच्या नादी लागू नका. कोणाच्याही हातून दिवा लागो. पण आपआपसातील दुही मोडा आणि तुमच्या अडचणी नाहीशा करण्याचे ज्ञान प्राप्त करून घ्या. सभातून ठराव पास होतात तिकडे दुर्लक्ष करू नका. अडचणी नाहीशा करण्याचे उपाय शोधून काढा. नारू झाला म्हणून बडबड न करता तो बरा करण्याचे प्रयत्न करा. परिस्थितीचे ज्ञान करून घ्या. ती परिस्थिती तुमच्या घरी येऊन कोणी सांगणार नाही. त्याकरिता ' जनता ' वर्तमान पत्र घेत जा. दुसरी गोष्ट तुम्हाला बजावतो की ' पुणे करार झाला ' तो हिंदूंना मनापासून नापसंत आहे. खरे पाहिले तर हिंदू धर्माचे आपण रक्षण करू शकू. पण हिंदू लोक असे आहेत की ' पुणे कराराचा ' फायदा आपल्या पदरी पडू न देता हिंदू व मुसलमान उद्या कौन्सिलमध्ये एक होऊन आपणाला

खड्यासारखे एका बाजूला निवडून काढतील. आपले भांडण सत्तेच्या वाटणी बद्दल होईल आणि त्या भांडणात आमचा हिस्सा आम्हाला मिळाला पाहिजे. महाभारतात कौरवपांडव युद्ध झाले पण त्यात भिष्माचार्याला पांडवांची खरी बाजू माहीत असून तो कौरवांचे अन्न खात असल्यामुळे त्यांच्याच बाजूला राहणे भाग पडले. अर्थात 'अर्थस्य पुरुषो दासः' अशी स्थिती तुमची होऊ देऊ नका. लोकांचे डाव ओळखा व त्याप्रमाणे वर्तन ठेवा. जी गोष्ट वाईट होते ती ईश्वर करतो. ईश्वरानेच आपणाला अस्पृश्यांच्या जन्माला घातले आहे. ही देवाची इच्छा आहे. ही भावना काढून टाका. तुम्ही सध्या ईश्वरासंबंधी विचारच करू नका. आपले वाईट झाले ते इतर लोकांनी आपला स्वार्थ साधला व आपले नुकसान केले म्हणून, गेल्या जन्मातील पातकामुळे नव्हे. महाराला जमीन नाही याचे कारण त्या इतर लोकांनी घेतल्या म्हणून. अस्पृश्यांना नोकऱ्या नाहीत. याचे कारण इतर लोकांनी लुबाडल्या म्हणून. हे जे बरेवाईट होते ते सुधारणे आपल्या शक्तीबाहेरचे नाही. याला रेल्वेचेच उदाहरण घेऊ. रेल्वेचा कारभार व्हाइसरॉयच्या कायदे कौन्सिलामार्फत चालतो. रेल्वेतून कामगार कमी करावयाचे असले तर पहिली गदा अस्पृश्य वर्गाच्या कामगारावर येते. इतर वर्गाच्या कामगारांवर येत नाही. याचे कारण इतर वर्गाच्या कामगारांचे जातीचे व धर्माचे प्रतिनिधी त्यांच्या कौन्सिलमध्ये असतात. ते त्यांच्यावतीने तिथे भांडतात. आपल्या वर्गाचे प्रतिनिधी तेथे नाहीत. आपला एक प्रतिनिधी आहे पण तो बिचारा आपल्या वर्गासंबंधी तेथे काही बोलतच नाही. पण यापुढे शेकडा १८ प्रतिनिधी व्हाईसरॉयच्या कायदे कौन्सिलमध्ये आपल्या वर्गातर्फे निवडले जाणार आहेत. त्यावेळी आपण सर्वांनी सावध राहून कायदे कौन्सिलमध्ये योग्य काम करणारीच माणसे निवडून पाठविली पाहिजेत. शेवटची गोष्ट तुम्हास सांगतो की, 'दैवावर भरवसा ठेवून वागू नका.' जे काय करावयाचे असेल ते आपल्या मनगटाच्या जोरावर करा. आपण माझे भाषण इतका वेळ शांतपणे ऐकून घेतलेत व हा सभेचा योगायोग जुळवून आणलात याबद्दल मी सर्वांचे आभार मानून आपली रजा घेतो.



# ६५

# कोकणस्थ-देशस्थ हा भेद मला मान्य नाही

रविवार ता. १९ फेब्रुवारी १९३३ रोजी श्री. देवराव नाईक यांचे अध्यक्षतेखाली दांडारोड वांद्रे, मुंबई येथे अस्पृश्यांची एक जाहीर सभा झाली. सभेचा उद्देश डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे जाहीर स्वागत करून त्यांचा सन्मान करण्याचा होता व त्याप्रमाणे त्यांच्या कार्यास मान्यता दर्शविण्याकरिता त्यांना पुष्पगुच्छ ठेवण्याचे रौप्यपात्र अर्पण करण्यात आले. सभेस वांद्रे येथे राहणारा स्त्री-पुरूष समाज हजर होता. डॉ. बाबासाहेबांचे या सभेतील सर्व भाषण अंतर्मुख दृष्टी ठेवून झाले. त्यामुळे अलिकडे समाजातील ज्या काही व्यक्ती तरुणास हाती धरून समाजकार्य बिघडवीत आहेत त्यांचा नामनिर्देश करणे भाग पडले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

ठाणे येथील बोर्डिंग व समता सैनिक दल या संबंधी ही मंडळी गैरसमज उत्पन्न करून समाजात दुहीचे बीज पेरण्याचे दुष्ट काम करीत आहेत. ही मंडळी म्हणजे दुसरी तिसरी कोणी नसून आपल्याच समाजातील आहेत. ती वयोवृद्ध असून मी व आपण सर्वजण त्यांना अद्याप मान देत असू. पण आज त्यांनी आपला अनुभव व आपली बुध्दी गहाण ठेविली आहेत. रा. संभाजी गायकवाड, रा. गोविंद रामजी आड्रेकर व रा. शिवराम गोपाळ जाधव यांनी या मंडळींचे पुढारीपण पत्करिले आहे. यांची बुध्दी वाढत्या वयाप्रमाणे वृद्धिंगत होण्याच्या ऐवजी ती कमी होऊ लागली आहे. आश्चर्य हे की काही तरूण मंडळीही त्यांच्या नादी लागून आपल्या शक्तीचा, वेळाचा व वक्तृत्वाचा दुरूपयोग करीत आहेत. ही तरूण मंडळी तरी विचाराने वागून आपली सर्व शक्ती समाजात एकी वाढविण्याकरिता खर्च करतील अशी मला आशा आहे. ह्या लोकांचे आजचे कार्य म्हणजे माझ्या गैरहजेरीचा फायदा घेऊन सार्वजनिक कार्याचा नाश करणे एवढेच आहे.

त्यांचे आक्षेप माझ्या ऐकिवात आले ते, थोडक्यात असे आहेत.

१. ठाणे येथील बोर्डिंगमध्ये कोकणस्थ मुलांना प्रवेश मिळत नाही.
२. या बोर्डिंगवर रा. शिवराम गोपाळ जाधवाची सुपरिन्टेडेंन्ट म्हणून नेमणूक करावी.
३. सुभेदार सवादकर यांना सेना दलाचे सर्वाधिकारी का नेमले ?
४. आपल्या चळवळीत इतर जातींचा प्रवेश का ?

---

जनता : २५ फेब्रुवारी १९३३.

कोणीही समंजस माणसास पटेल की हे आक्षेप इतके क्षुद्र आहेत की त्यांचा एखाद्या सार्वजनिक सभेत उल्लेख करावा लागणे ही दुर्दैवाची गोष्ट आहे. परंतु बारीक सारीक प्रश्नासही काही वेळी महत्त्व येते. पहिला आक्षेप म्हणजे केवळ थोतांड आहे. त्यात सत्याचा लवलेश नाही. मला कोकणस्थांशी प्रतारणा करण्याचे काहीच कारण नाही. मी स्वतः कोकण प्रांतातील असलो तरी माझे-जवळ कोकणस्थ-देशस्थ हा भेदभाव नाही. एवढी मात्र गोष्ट खरी की, शिक्षण प्रसाराच्या दृष्टीने पाहता कोकणस्थ महार पाठीमागे आहेत व ते या प्रश्नाकडे लक्ष देतील तेवढे थोडेच आहे. दुसऱ्या आक्षेपाबद्दल इतकेच सांगावयाचे की ज्याने त्याने आपली योग्यता ओळखावी. रा. जाधवांनी आपली उपयुक्तता पटविली असती तर त्यांना दूर करण्याचे कारण पडले नसते. विद्यार्थ्यांचे वसतीगृह म्हणजे अडत्यामार्फत चालविण्याचे दुकान नव्हे. सुपरिन्टेडेंन्टने आपल्या आदर्शपूर्ण आचरणाने विद्यार्थ्यांस शिस्त घालून दिली पाहिजे. त्यांना केवळ शासन करणे हे काही त्यांचे एकच कार्य नव्हे. या अवश्य गोष्टी जाधवांच्या हातून घडत नाहीत हे दिसून आल्यानंतर संस्थेच्या हिताच्या दृष्टीने त्यांना दूर केल्याशिवाय मार्ग कोणता ? आणि या बोर्डिंगकरता सरकारी ग्रँट मिळते तेव्हा संस्था व्यवस्थेशीर चालविली नाही तर सरकारला जाब द्यावा लागेल. यापुढे ठाणे व महाड येथील वसतिगृहे एका कमिटीमार्फत चालणार आहेत व त्या कमिटीचे सुभेदार सवादकर चेअरमन आहेत. तिसरा आरोप दला संबंधाचा. हे दल एकसुत्री झाल्याशिवाय सध्यातरी त्यास शिस्त येणार नाही. चवथा आक्षेप आपल्या चळवळीत ब्राह्मण, कायस्थ, भंडारी वगैरे जातीतील गृहस्थ का असावेत अशा प्रकारचा आहे. मी तुम्हाला या प्रश्नाला सरळ साधे थोडक्यात उत्तर देतो म्हणजे ते तुम्हाला सहज पटेल. तुम्ही आजारी पडलात म्हणजे डॉक्टरकडे जाता. त्या वेळेस तो महार नसला तर त्यास तुम्ही टाळता काय ! नाही. मग ही शंका तुमचे मनात का? आजच्या प्रसंगी मला कटू शब्द उच्चारावे लागले याबद्दल मला अत्यंत वाईट वाटते; परंतु कटू कर्तव्य म्हणून तसे करणे मला जरूर पडले. असले प्रसंग न येऊ देणे हे तुमच्या हातात आहे. इतके बोलून बाबासाहेबांनी आपले भाषण संपविले. नंतर अध्यक्षांनी समारोपादाखल एवढेच सांगितले की इतःपर जर कोणी वावदूक गैरसमज पसरवीत आहे असे तुम्हास आढळून आले तर तुम्ही त्यास हात धरून तडक डॉ. बाबासाहेबांकडे घेऊन जा. म्हणजे तुमचा त्याने केलेला गैरसमज दूर होईल. सुभेदार सवादकर, श्री उपशाम, डी.व्ही. प्रधान, कमलाकांत चित्रे, शिवतरकर मास्तर वगैरे मंडळी सभेस हजर होती. आलेल्या मंडळीस पुष्पहार अर्पण करण्यात आले व सभा बरखास्त झाली.

• • •

# ६६

# लोकांच्या धर्मभोळेपणाचा फायदा घेणाऱ्यांपासून सावध रहा

शनिवार तारीख ४ मार्च १९३३ रोजी रात्रौ साडे नऊ वाजता मुंबई सँडहर्स्ट रोड (वाडीबंदर) नजीक जी. आय. पी. रेल्वेच्या चाळीजवळील पटांगणात मुद्दाम उभारलेल्या मंडपात श्री. आर. डी. कवळी, बी. ए., एलएल. बी. यांच्या अध्यक्षतेखाली अस्पृश्य वर्गाची जाहीर सभा होऊन ह्या सभेत अखिल अस्पृश्य वर्गाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना मानपत्र अर्पण करण्यात आले. सदर प्रसंगी स्त्री-पुरुष समाज पुष्कळ जमलेला होता. श्री. शिवतरकर, श्री. नाईक, सहस्त्रबुद्धे, दिवाकर पगारे, शा. उपशाम, कमलाकांत चित्रे, मेषराम इत्यादी मंडळीही सभेला हजर होती.

प्रथम रा. पुंजाजी जाधव यांनी अध्यक्षाची सूचना आणिली व तिला रा. करडक यांनी अनुमोदन दिले. अध्यक्ष रीतसर स्थानापन्न झाल्यावर रा. दिवाकर पगारे यांनी मानपत्र वाचून दाखविले. त्या मानपत्रावर ८५ दीर्घायुरारोग्य चिंतणाऱ्यांची नावे होती. मानपत्र पुढीलप्रमाणे आहे.—

**' जातिभेदविध्वंसक, समाजक्रांतिकारक, हितमार्गदर्शक मूकनायक**

**डॉ. भीमराव रामजी आंबेडकर**

एम्. ए ; पीएच.डी., डी.एस्सी., बार-ॲट-लॉ.

एम. एल. सी., जे. पी., मुंबई.

परमप्रिय डॉ. बाबासाहेब ! आपले चरणसेवेशी, मुंबई, सॅण्डहर्स्ट रोड, वाडीबंदर नजीक जी. आय. पी. रेल्वे चाळीमधील नाशिक जिल्ह्यातील ' अस्पृश्य ' मानण्यात येणाऱ्या आपल्या सर्व आज्ञाधारक व नम्र अनुयायांचा सप्रेम जोहार सादर असो !

आपला प्रत्येक क्षण बहुमोलाचा आहे तरी पण आम्हा गरिबांच्या उत्कट इच्छेनुरूप आज येथे येण्याची आपण कृपा केलीत, त्यामुळे आम्हाला फार धन्यता वाटली. आम्ही आपले अत्यंत आभारी आहोत.

---

जनता : ११ मार्च १९३३.

आपण अत्यंत गुणशाली आहात तसेच अमूप धैर्यशालीही आहात. आपल्या अतुल बुद्धिमत्तेची आणि अप्रतिम शौर्यवृत्तीची कसोटी पाहणारे आणि साक्ष पटविणारे अनेक लहान-मोठे प्रसंग आपल्या आतापर्यंतच्या आयुष्यक्रमात येऊन गेले आहेत. आपली यशप्रद विद्यार्थीदशा, महाड व नाशिक सत्याग्रहप्रसंगीचे आपले स्फूर्तिदायी नेतृत्व, राऊंड टेबल परिषदेतील आपली समाजहितप्रद कामगिरी व पूना कराराच्या वेळी प्रगट झालेला आपला प्रबल आत्मविश्वास हे आपल्या विशाल बुद्धिमत्तेची व अचाट धैर्यवृत्तीची साक्ष पटविणाऱ्या आपल्या आयुष्यातील विविध प्रसंगांपैकी अगदी ठळक असे काही थोडे प्रसंग आहेत. यशस्वी विद्यार्थी, कुशल मुत्सद्दी व धैर्यवान पुढारी अशी आपली कीर्ती या प्रसंगांमुळे दिगंत पसरून अजरामर झालेली आहे. जसजसा काळ लोटेल तसतसा आपला हा कीर्तिदीप अधिकाधिक प्रज्वलित होणार हे निश्चित आहे.

महाराज, आपण आमचा मार्ग प्रकाशित केला आहे. आमच्या हृदयात अभिनव चैतन्याची दिव्य ज्योत आपण पेटविली आहे. युगानुयुगांच्या अज्ञानांधकाराला भेदून प्रकाश दाखविणारी व पूर्वी कधी कोणी आम्हाला न दिलेली नवी ज्ञानदृष्टी आपण आम्हाला प्राप्त करून दिली आहे. . केवळ जगाच्या दृष्टीनेच नव्हे तर खुद्द आमच्या दृष्टीनेही आमची किंमत आपण वाढविली आहे. आमचा स्वाभिमान आपण जागविला आहे. आम्हाला आत्मसन्मानाचे महत्त्व आपण पटवून दिले आहे.

आपणच आमचे अनन्य पुढारी, आमचे अचूक मार्गदर्शक, आमचे सन्मित्र, आमचे सर्वस्व आहात. आमचा देव आणि आमचा धर्म, आमचे राजकारण आणि आमचे समाजकारण आपल्या शब्दात आणि आपल्या धोरणात सामावलेले आहे.

सन्माननीय महाराज, आम्ही गरीब असलो तरी आमचे आपल्या ठायीचे प्रेम, आमची आपल्याविषयीची निष्ठा व आमचा आपल्यावरील विश्वास ही समर्थ व अढळ आहेत. त्यांच्या जोरावर आपण सांगाल तो मार्ग-मग तो कितीही बिकट असो-चालून जाण्याचा आम्ही अंतःकरणपूर्वक व जिवापाड प्रयत्न करू, असे आपल्याला आश्वासन देण्याची या प्रसंगी आम्ही परवानगी घेतो. आणि आमच्या निष्ठेचे, कृतज्ञतेचे व आम्हा सर्वांच्या वतीने आपणास जाहीरपणे दिलेल्या आजच्या या आश्वासनाचे आणि आजच्या या भाग्यशाली दिवसाचे एक अल्पसे स्मारक व एक लहानसा पुरावा म्हणून फुल नाही फुलाची पाकळी या न्यायाने हे मानपत्र आपल्या चरणी आम्ही आज सादर करीत आहोत. त्याचा स्वीकार करून आम्हाला कृतार्थ करावे, [१]

नंतर अध्यक्षांच्या हस्ते डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना मानपत्र अर्पण करण्यात आले. त्या प्रमाणेच एक चांदीची कपबशी व हारतुरे देऊन डॉ. बाबासाहेबांचा

[१] डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना समर्पित मानपत्र : संपादक शंकरराव हातोले, पृ. १२-१३

सन्मान करण्यात आला. एवढे झाल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर उत्तरादाखल भाषण करण्यास उभे राहिले. प्रथम झालेल्या गौरवाबद्दल आभार प्रदर्शन करून ते म्हणाले,

या मानपत्रात माझ्या संबंधाने गौरवपर जे काही लिहिले आहे ते कितपत खरे आहे, हे सांगणे कठीण आहे. परन्तु एवढे मात्र खरे की त्यात स्तुतिपर अलंकारयुक्त भाषेने तुम्ही तुमच्याच सारख्या एका माणसास गुणातीत ईश्वर बनविले आहे. हे जर खरे मानले तर या तुमच्या भावना स्वहितनाशक आहेत, असेच मी समजतो व आज मूले कुठारः म्हणूनच प्रथम दोन शब्द सांगणे प्राप्त आहे. दुसऱ्याला ईश्वर बनवायचे व आपल्या उद्धाराचा भार त्याच्यावर टाकावयाचा ही भावना तुम्हास कर्तव्यपराङ्मुख करणारी आहे. या भावनेला जर का चिकटून बसलात तर तुम्ही प्रवाहाबरोबर वाहणारे लाकडाचे ओंडके बनून तुमच्या अंगी वास करीत असलेली शक्ती निकामी ठरेल व या नवयुगात प्राप्त झालेली राजकीय सत्ता निरर्थक ठरेल. आजपर्यंत तुम्ही या नादान भावनेस तुमच्या मनात घर करू दिल्यामुळे तिने तुमच्या वर्गाचा समूळ नाश केला आहे. मी याच्याही पुढे जाऊन असे सांगतो की असल्या नादान भावनेने तुमचाच काय पण सर्व हिंदू समाजाचा नाश केला आहे. आपल्या या हिंदुस्थान देशाच्या हीनत्वाला काही कारण असेल तर हे देवपण होय.

इतर देशातील लोक समाजात काही बखेडा माजल्यास किंवा समाज संकटात सापडल्यास एकोपा करून व सर्व सामर्थ्य एकवटून आपला स्वतःचा उद्धार करून घेतात. परन्तु आपल्या धर्माने आमची अशी समजूत करून दिली आहे की, माणूस काही करू शकत नाही. समाजावर मोठे संकट आल्यास किंवा समाजाची प्रगती खुंटल्यास देव आपल्यामध्ये अवतार घेतो व आपले संकट निवारण करतो, सार्वत्रिक रीतीने संकटास तोंड न देता ईश्वराच्या अवताराची वाट पाहात बसतात.

आमचा हिंदू धर्म पुरातन आहे, ग्रीक, रोमन इत्यादि पुरातन व प्रसिद्ध राष्ट्रे लयाला गेली, परन्तु आमचा हिंदू समाज अद्याप जिवंत आहे अशी हिंदू लोक शेखी मिरवितात. परन्तु नुसत्या जगण्यात कवडीची किंमत नाही. मनुष्य इज्जतीने जगतो की नाही याला महत्त्व आहे. या दृष्टीने पाहिल्यास हिंदू समाजाने जिवंत राहून काय दिग्विजय लावला आहे ? दुसऱ्याचे लाजिरवाणे दास्य पत्करण्यापलिकडे त्याने काय केले आहे ? असल्या जगण्यात काही अर्थ नाही. मर्दुमकी गाजवून दोन दिवस जगणे हे दुसऱ्याचे गुलाम होऊन १०० वर्षे जगण्यापेक्षा कितीतरी श्रेष्ठपणाचे लक्षण होय. दोघांच्या झुंजीत एकजण पलायन करूनही जिवंत राहतो व जगतो, तर

दुसरा प्रतिपक्षाचा पाडाव करून जगतो. पळून जाऊन व दुसऱ्याचे वर्चस्व स्वीकारून जीव जगविणारा मनुष्य काय मिळवितो ? दुसऱ्याचा गुलाम बनतो, स्वत्व विसरून जातो व गुलामांचा तांडा अधिक वृद्धिंगत करतो आणि नामर्दपणाचा फैलाव करतो. यापेक्षा मरणे काय वाईट ? आता हिंदू समाज दुसऱ्यांचा दास किंवा गुलाम होऊनच का राहिला याचा विचार केल्यास, तो आपल्या उद्धारासाठी ' ईश्वराची वाट ' पाहात बसला हेच त्याला कारण आहे, अशी माझी दृढ समजूत आहे.

या जगात ईश्वर असो किंवा नसो त्याचा विचार करण्याची तुम्हास काही जरूरी नाही. एवढी गोष्ट मात्र खरी आहे की जगात ज्या हरघडी घडामोडी होतात त्या माणसेच करीत असतात. काही थोडे सुशिक्षित व स्वार्थपरायण लोक दुसऱ्या असंख्य लोकांना अज्ञानांधकारात ठेवून त्यांना ईश्वराविषयीच्या खोट्या कल्पनांच्या पाठीमागे लावून व त्यांच्या धर्मभोळेपणाचा फायदा घेऊन आपले स्वतःचे हित साधीत असतात. कारण या क्लृप्तीने तुमची संघशक्ती नष्ट होऊन तुम्ही मेंढरासारखे पोकळ भावनांच्या पाठीमागे लागता व तुम्हाला सर्वतोपरी लुबाडण्याचा त्यांचा मार्ग निष्कंटक होतो. आज आपण दीनावस्थेस पोहोचलो आहोत. त्या स्थितीतून बाहेर पडून तुमचा उद्धार करून घ्यावयाचा असेल तर तुम्ही या कल्पनांना अजिबात फाटा दिला पाहिजे. तुम्ही सर्वांनी-स्त्रीपुरूषांनी-खात्री बाळगली पाहिजे की तुमचा उद्धार करण्यास दुसरा कोणीही येणार नाही, किंवा तो मीही करणार नाही. जर मनात आणाल तर तुमचा उद्धार तुम्हीच करून घेण्यास समर्थ व्हाल. मला सांगण्यात आनंद वाटतो की आपल्या वर्गात चळवळीचा वारा चोहीकडे पसरला आहे, पण ही जागृती जरी झाली असली तरी सुद्धा मला तुम्हाला एक महत्त्वाची गोष्ट सांगावयाची आहे ती ही की यापुढे तुमचे सर्व भवितव्य राजकारणात आहे, दुसऱ्या कशातही नाही. पंढरपूर, त्र्यंबकेश्वर, काशी, हरिद्वार वगैरे यात्रा करून किंवा शनीमाहात्म्य, शिवलीलामृत, गुरुचरित्र इत्यादि पोथ्यांची पारायणे करून किंवा एकादशी, सोमवार वगैरे उपवास धरून तुमचा उद्धार होणार नाही. तुमचे वाडवडील हजारो वर्षे या गोष्टी करीत आले तरीही तुमच्या शोचनीय स्थितीत एक तसूभर तरी फरक पडला आहे काय ? पूर्वीच्या फाटक्या चिंध्या तुमचे अंगावर, अर्ध्याकच्च्या भाकरीचेच तुकडे अद्याप तुमच्या पोटास, गुराढोरापेक्षाही गलिच्छ अशी आजतागायत तुमची राहणी व कोंबड्याप्रमाणे रोगराईस बळी पडण्याची पूर्वीचीच तुमची निर्बलता, या दुःसह परिस्थितीत अद्याप का बदल झाला नाही ? एकच औषध घेऊन रोग बरा होत नाही तर आपल्याला औषधात फेरबदल करावयास नको का ? वैद्य बदलावयास नको का ? तुमच्या आजपर्यंतच्या वाऱ्या तुमच्या कामी आल्या नाहीत, किंवा तुमचे उपवास जन्माची उपासमारी टाळण्यास समर्थ झाले नाहीत.

तुमची स्थिती पालटण्यास, तुमचा उद्धार करून घेण्यास आता तुम्हाला एकच उपाय आहे आणि तो म्हणजे राजकारण-कायदे करण्याची शक्ती ! तुम्हास पोटभर खाण्यास मिळत नाही, तुम्हाला लहानशा खोलीत गर्दी करून राहावे लागते, तुम्हाला द्रव्यार्जन करण्याचे साधन मिळत नाही व तुम्हाला बेकार राहावे लागते, याचे कारण काय ? देव का दैव ? या दोन्ही गोष्टी कारण नाहीत. तुम्हाला अन्न, वस्त्र, वसतिस्थान व शिक्षण देणे हे देशातील कायदे करणाऱ्या सत्तेचे काम आहे व या सत्तेचा कारभार तुमच्या सामर्थ्याने यापुढे चालणार आहे. या कायदे करणाऱ्या शक्तीत तुमचा समावेश झालेला आहे. संसार सुखाचा करून घेण्याकरिता त्या प्रकारचे कायदे तुम्ही करून घेतले पाहिजेत. समजा आज या रेल्वेच्या चाळीत तुम्हास प्रत्येक कुटुंबास एकच खोली मिळते परंतु कायदा होईल तर तो तुम्हास २-२ खोल्या सुद्धा मिळवून देईल.

तुमच्या मुलास शिक्षण देण्यास तुमच्याजवळ पैसा नाही परंतु कायदा होईल तर तुमच्या मुलांच्या शिक्षणाची सर्व सोय लागेल. तुमच्यात पुष्कळसे लोक बेकार आहेत. सर्व लोकास काम देणे किंवा काम नसेल त्या वेळेस त्यांना पोसणे हे सरकारचे कर्तव्य आहे. असा कायदा होईल तर बेकारीत उपाशी मरण्याची पाळी तुमच्यावर येणार नाही.

श्रीमंत लोक आजारी पडले तर पैसे खर्च करून औषधोपचार करतात व बरे होतात. परंतु गरिबांची आजारपणात कायद्यानेच सोय होईल. सारांश, सध्या सर्व सुखाचे आगर कायदा आहे. म्हणून आपण सर्वांनी कायदा करण्याची शक्ती पूर्णपणे हस्तगत करून घेतली पाहिजे. म्हणून ' जप, तप, पूजा-अर्चा करणे ' इकडील आपले लक्ष काढून राजकारणाची कास धरणे हाच तुमच्या उद्धाराचा मार्ग आहे. हीच गोष्ट आज प्रामुख्याने मला तुम्हाला सांगावयाची होती आणि ती तुम्हास स्पष्टपणे सांगितली आहे.

थोड्या दिवसापूर्वी काँग्रेसचे व वरिष्ठ वर्गाचे लोक असे म्हणत असत की आम्हाला हवे तसे स्वराज्य दिल्याशिवाय आम्ही ते चालविण्यास मदत करणार नाही. परंतु आज ते निराळीच भाषा वापरू लागले आहेत.

कालच कायदेभंग करून तुरुंगात शिक्षा भोगत असलेले काँग्रेसचे एक पुढारी सरकारची माफी मागून बाहेर आले आहेत व ते म्हणू लागले आहेत की, '' म. गांधींची कायदेभंगाची चळवळ चुकीची आहे. मी यापुढे कायदेभंग करणार नाही. '' त्यापूर्वी महात्मा गांधींचे पट्टशिष्य श्री. राजगोपालाचारी यांनी जाहीर केले आहे की नवीन सुधारणा मिळाल्यावर काँग्रेस शक्यतर त्यांचा स्वीकार करील. केसरीचे रा. केळकर यांचे म्हणणे आहे की नवीन मिळणाऱ्या सुधारणा अपुऱ्या असल्या तरी सुद्धा त्या मान्य करण्यास आम्ही कबूल आहोत.

सारांश, हे लोक आज आपली पूर्वीची भाषा बदलीत आहेत. हे जे मतपरिवर्तन झाले आहे ते का झाले आहे ? या प्रश्नाचे उत्तर अगदी साधे आहे. आता बहिष्कार पुकारणाऱ्या लोकांना असे वाटू लागले आहे की जर या पुढेही कॉंग्रेसच्या लोकांनी बहिष्कार तसाच चालू ठेवला तर येणारी सत्ता इतर समाजातील लोक बळकावून बसतील. म्हणून त्यांच्या दृष्टीने नको असलेली सुधारणाही ते स्वीकारण्यास तयार झाले आहेत. सारांश, जे लोक बहिष्काराची घोषणा करीत होते ते देखील स्वहित साधण्यास दक्ष आहेत.

यापुढे हिंदुस्थानात जो लढा चालू राहणार आहे तो ब्रिटिश लोक व हिंदुस्थानातील लोक यांच्यात चालू राहणार नसून हिंदुस्थानातीलच पुढारलेले लोक व मागासलेले लोक यांच्यात चालणार आहे. तुम्ही कदाचित असे म्हणाल की मागासलेला वर्ग बहुसंख्यांक आहे म्हणून त्यास पुढारलेल्या वर्गापासून भीती बाळगण्याचे कारण नाही. परंतु तुम्ही लक्षात ठेवले पाहिजे की एखादा समाज बहुजन समाज आहे. एवढ्यावरच भागणार नाही तर तो जागृत, सुशिक्षित, स्वाभिमानी असेल तरच त्याचे सामर्थ्य वाढेल. नाहीतर गिरणीच्या मालकाने किंवा एखाद्या श्रीमंत सावकाराने तुम्हास लाचलुचपत दाखविली व त्यासाठी तुम्ही आपली मते त्यांना विकली तर तुमच्या समाजाचे वैशिष्ट्य नष्ट झाल्याशिवाय राहणार नाही. आपल्या वर्गातील माणसांशिवाय भाडोत्री माणसे तुमच्या समाजाचे कवडीचेही कल्याण करू शकणार नाहीत. आपल्या समाजाला काही तरी वैशिष्ट्य आहे, ही भावना नेहमी जागृत ठेवली पाहिजे. तसेच आपसातील मतभेद दूर करून आपण आपले संघटन वाढविले पाहिजे व परिस्थितीचे ज्ञान करुन घेतले पाहिजे. यासाठी आपल्या समाजातील प्रत्येक माणसाने जनता पत्राचे वर्गणीदार होऊन परिस्थितीचे ज्ञान करून घेणे अत्यंत आवश्यक आहे. कारण परिस्थितीचे बरोबर ज्ञान झाल्याशिवाय तुमचा फायदा तुम्हास करून घेता येणार नाही. शेवटी व्हॉलिंटिअर समता सैनिक दल बद्दल मला काही सूचना करावयाच्या आहेत. व्हॉलिंटिअर म्हणजे आमचा ज्ञानवान व जाणता माणूस आहे, हे मी समजतो. नुसते खाकी रंगाचे कपडे अंगावर घातले म्हणजे लगेच व्हॉलिंटिअर होतो असे मी समजत नाही. आपल्या समाजाला सज्ञान करणे हे व्हॉलिंटिअर लोकांचे मुख्य कर्तव्य आहे. अज्ञान समाजाला ' जनता पत्र ' वाचून दाखवून त्यात काय लिहिले आहे हे समजावून देणे हे त्यांचे कर्तव्य आहे व ते आपले कर्तव्य बजावतील, अशी मला आशा आहे. आपणा सर्वांचे पुन्हा आभार मानून मी आपली रजा घेतो.

● ● ●

## ६७

# स्वतःची लायकी विद्यार्थी दशेतच वाढवा

रविवार ता. २ माहे एप्रिल १९३३ रोजी सकाळी दहा वाजता मुंबईहून दलित पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर, बार-ॲट लॉ, हे अखिल भारतीय बहिष्कृत शिक्षण प्रसारक मंडळाच्या ठाणे येथील-मुंबई ठाणे रोडवरील नामदार 'आगाखान' यांचे प्रशस्त बंगल्यात असलेल्या दलित-विद्यार्थी आश्रमाची तपासणी करण्यानिमित्त निमंत्रण देण्यात आल्यावरून मुद्दाम आले होते. त्यांना 'आश्रमात' आणण्याकरिता आश्रमाचे सुपरिन्टेडेंट श्रीयुत चांदोरकर आणि ठाणे सामाजिक समता सेवा संघाचे खजिनदार श्रीयुत मारुतीराव साबाजी गायकवाड असे दोघेजण पुढे स्टेशनवर उतरून घेण्यासाठी गेले होते.

डॉ. बाबासाहेबांचे बरोबर त्यांचे जनरल सेक्रेटरी श्रीयुत शिवतरकर आणि डॉ. बाबासाहेबांचे मुंबईतील सहकारी कार्यकर्ते म्हणजे बापूसाहेब सहस्त्रबुद्धे, कमलाकान्त चित्रे, जाधव, गायकवाड, मडके बुवा वगैरे पुढारी मंडळी देखील आलेली होती. डॉ. बाबासाहेब यांचे आगमनाचे किती तरी वेळ अगोदर ठाणे शहरातील अस्पृश्योद्धारक स्पृश्य सभ्य नागरीक जमले होते त्यात ठळकपणे दिसणारे गृहस्थ म्हणजे श्रीयुत एम. एस. रांगणेकरसाहेब, एल. रॉड्रिक्ससाहेब, आर. एल. रेडेसाहेब, नाखवा, गटनेसाहेब, केसकरसाहेब, कोतवालसाहेब, माधवराव काळदाते, पद्मनाभशास्त्री पालये वगैरे हितचिंतक दिसत असून दलित समाजातील सर्व लहान थोर स्त्री-पुरुष समुदाय स्थानिक गिरण्या, कारखाने वगैरे चालू असताना देखील ठिकठिकाणाहून बाबासाहेबांच्या आगमनाच्या बातमीने जमलेला होता.

डॉ. बाबासाहेब मोटारमधून उतरून बोर्डींगचे इमारतीचे पायरीवर येताच त्यांचा जयजयकार झाला. सामाजिक समता सेवा संघ, आश्रमीय विद्यार्थी वर्ग आणि अखिल भारतीय दलित सेवक संघ (ठाणे शाखा) यांचे अध्यक्ष आणि कार्यकर्ते यांचे तर्फे त्यांचे स्वागत करण्यात आल्यावर श्रीयुत एम. एस. रांगणेकर यांनी डॉ. बाबासाहेबांना नियोजित जागी बसविल्यावर श्रीयुत गणपत गोविंद रोकडे यांनी डॉ. बाबासाहेब यांनी जमलेल्या समुदायाच्या मिश्र सम्मेलनाचे अध्यक्षस्थान स्वीकारून विद्यार्थ्यांना उपदेशवर दोन शब्द सांगण्याची विनंती केली आणि श्रीयुत मारुतीराव साबाजी गायकवाड यांनी त्या सुचनेला अनुमोदन दिल्यावर

---

जनता : २२ एप्रिल १९३३.

डॉ. बाबासाहेबानी त्यांचेपुढील मेजावर असलेली या सम्मेलन सभेची कार्यक्रम पत्रिका वाचून पाहून टाळयांच्या कडकडाटात अध्यक्षस्थान स्वीकारून आपल्या भाषणास सुरुवात केली. ते म्हणाले,

हा विद्यार्थी आश्रम पूर्वी आम्ही पनवेल येथे प्रथम स्थापन केला होता. तेथे स्पृश्य समाजापैकी कोणीही आश्रमाला जागा दिली नाही आणि म्हणून एका ' ज्यू ' गृहस्थाच्या घरात त्याची स्थापना करावी लागली. त्याने देखील पुढे आमची अडवणूक करून घरभाडे चढविण्याचे धोरण ठेविल्याकारणाने तेथून आश्रम ठाण्यास आणावा लागला आणि येथे देखील नामदार आगाखान यांचा हा बंगला त्यांना समक्ष लिहून आमचे ताब्यात मिळेपर्यंत आश्रमाला जागा मिळण्याचे बाबतीत आम्हाला पुष्कळच त्रास झाला. आणि आता ही जागा मिळाल्यानंतर हा प्रश्न साधारणतः सुटला आहे. माझ्या विद्यार्थी बांधवांना मला इतकेच सांगावयाचे आहे की तुम्हाला ही जी व्यवस्था म्हणजे ना. आगाखान यांचा बंगला, सरकारी ग्रॅन्ट आणि सुपरिन्टेडेंट चांदोरकर आणि त्यांना मदत देणारे दुसरे सहकारी यांची रात्रंदिवस मदत अशा सोई तुम्हाला मिळाल्या आहेत. यापैकी आमच्या लहानपणी आम्हाला काहीच नव्हते. इतक्या सवलती असताना सुद्धा तुमच्याकडून त्यांचा योग्य उपयोग झाला नाही आणि तुम्ही एखाद्या मार्कानेही नापास झालात तर तुम्ही नालायक हा शिक्का संस्थेवर बसवाल आणि सरकार ग्रॅन्ट काढून घेईल. नवीन हक्क, मोठ्या नोकऱ्या वगैरे मिळावयाच्या तर त्याला स्वतःची लायकी लागत असते. ती लायकी वाढविण्याचे मुख्य काम विद्यार्थी दशेत तुम्ही करीत असताना तुम्ही इतर कोणत्याही चळवळीत पडणे चुकीचे होईल हा दुसरा मुद्दा मला तुम्हापुढे मांडावयाचा आहे आणि तिसरा मुद्दा स्वावलंबन. येथे तुम्हाला पैशाची मदत व्हावी म्हणून गावातील धनिक लोकांना आम्ही मदतीला बोलावू, पण मुख्य मुद्दा तुम्ही तुमचे भाईबन्द, तुमची जात, यांनी स्वतःच्या पायावर उभे राहून काय होईल ते होवो ! आम्ही पुढे आल्याशिवाय राहणार नाही असा निश्चय करून रोजच्या व्यवहारात तो निश्चय तुम्ही अंमलात आणला पाहिजे तरच काही तरी यश मिळेल आणि या सर्व गोष्टी तुम्ही सर्व जण चांगल्या ध्यानात धराल आणि यशस्वी व्हाल, अशी आशा करून मी माझे भाषण आणखी न लांबविता येथेच पुरे करतो.



## ६८

# नकली व स्वयंमान्य पुढाऱ्यांपासून सावध

तारीख ८ एप्रिल १९३३ रोजी रात्रौ क्लार्क रोड, बी. आय. टी. चाळ, मुंबई येथे मे. सुभेदार वि. गं. सवादकर यांचे अध्यक्षतेखाली तेथील चार चाळीत राहणाऱ्या बहिष्कृत समाजातर्फे दलितोद्धारक डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांस मानपत्र देण्याचा समारंभ मोठ्या उत्साहाने पार पडला. स्त्री-पुरुष समाजाची इतकी गर्दी होती की, चाळीतील कंपाऊंडमधील मैदान चिक्कार भरून जाऊन कंपाऊंड बाहेरही लोकांची गर्दी झाली होती. प्रथम रा. धोत्रे यांनी अध्यक्षांची सूचना आणिली व तिला रा. तांबेशास्त्री यांनी अनुमोदन दिल्यावर अध्यक्ष मे. सवादकर हे स्थानापन्न झाले. त्यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणात आपणास अध्यक्षस्थान दिल्याबद्दल लोकांचे आभार मानून सांगितले की, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या समाजास सामाजिक व राजकीय हक्क मिळवून दिले आहेत त्याबद्दल त्यांना मानपत्र देणे योग्य आहे. परंतु मानपत्र देऊनच आपण त्यांच्या ऋणातून मुक्त होऊ शकत नाही. तर त्यांनी आरंभिलेले कार्य व्यवस्थेशीर रीतीने चालविणे हे आपले कर्तव्य आहे. विघ्नसंतोषी माणसे सर्व समाजात असतात तशी ती आपल्या समाजातही आहेत. तेव्हा अशा लोकांपासून आपण सावध राहिले पाहिजे. (टाळ्या) तसेच तालुका व जिल्हा संघ काढून आपण आपली संघटना केली पाहिजे इत्यादी.

अध्यक्षांच्या भाषणानंतर रा. आबाजी आनंदराव खरात यांनी मानपत्र वाचून दाखविले व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांस अध्यक्षांच्या हस्ते ते सोनेरी फ्रेमीतून अर्पण करण्यात आले. मानपत्राबरोबरच एक रौप्यपात्रही अर्पण करण्यात आले. हारतुरे अर्पण केल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर भाषण करावयास उभे राहले. ते म्हणाले,

सभाधिपति, प्रिय भगिनी व बंधुजनहो,

आज ह्या ठिकाणच्या रहिवाश्यांनी हा जो मानपत्राचा प्रसंग घडवून आणिला त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. मी गेल्या जानेवारी महिन्यात (१९३२) विलायतेहून मुंबईस आल्यापासून मला मानपत्रे देण्याची एक मोठी साथच पसरली आहे. ही साथ बंद करावी, निदान तिला आळा घालावा असे माझ्या मनात आले होते. परंतु लोकांच्या उत्साहापुढे माझा नाईलाज आहे. आजचे मानपत्रसुद्धा त्याच मनःस्थितीत मी स्वीकारीत आहे.

---

जनता : १५ एप्रिल १९३३.

या मानपत्राबद्दल मला असे सांगावयाचे आहे की, आतापर्यंत जी मानपत्रे मला दिली गेली त्यापेक्षा आजच्या मानपत्रात वैशिष्ट्य आहे. या मानपत्राचा गाजावाजा विशेष झाला. अगोदर जी मानपत्रे दिली गेली ती दिली जाणार अशाबद्दल वर्तमानपत्री मुळीच गाजावाजा झाला नव्हता. परंतु या मानपत्राच्या अंतरस्थ भानगडी '' लोकमान्य '' व '' प्रभात '' पत्रात प्रसिद्ध झाल्या होत्या, म्हणून हे मानपत्र और परिस्थितीत दिले जात आहे असे मला वाटते. आता आम्ही इकडे येत असताना सांगण्यात आले की, रस्त्यावर ' सवादकर बायकॉट ' अशी पाटी लाविली आहे. (सभेत शेम शेमचा आवाज) तरी ती टाळण्याकरता आपण दुसऱ्या रस्त्याने जावे. परंतु मी सांगितले की, आपण पाटीच पाहून जाऊ. आम्ही ती आता पाहिली आहे. पाटी लावणारांना धीर न झाल्यामुळे त्यांनी माझा बायकॉट केला नाही ! या चार चाळीत पुढाऱ्यांचे गोंठे पेव आहे हे मी जाणून आहे. मुंबईत पुढारी शोधावयाचे झाल्यास त्यांनी या चौकात यावे. या पुढाऱ्यांनी आतापर्यंत काहीना काही खुसपट काढून चळवळीस अडथळा केला आहे. एकावेळी हे पुढारी असे म्हणत होते की, डॉ. आंबेडकर महाराला सोडून चांभारांना जवळ करतात व महार जातीचा घात करतात. परंतु असे म्हणणारेच हे लोक देवरूखकरासारख्या सबंध महार जातीला शिव्या देणाऱ्या चांभारांबरोबर संगनमत करतात व अर्ध्या हळकुंडाने पिवळे होतात.

एकदा रा. शिवतरकर मास्तर यांनी आपल्या घरी सहभोजन करविले. त्या सहभोजनास मी स्वतः व काही महार पुढारी हजर होते. सहभोजनाला अनुसरून पुढे देवरूखकराने हँडबील काढले की, ' शिवतरकर महाराबरोबर जेवले सबब त्यांच्यावर बहिष्कार घालावा, कारण रा. शिवतरकरांनी महारा-समवेत भोजन केले. ' सबंध महार जातीची त्यावेळेस देवरूखकराने अवहेलना केली होती. अशा प्रकारे अनेक वेळा ज्या माणसाने महार जातीची अबरु लुटली त्याशी हे लोक कसे संगनमत करू शकतात ! या पुढाऱ्याचे दुसरे म्हणणे असे की, डॉ. आंबेडकर हे कोकणस्थ असून देशस्थांचा परामर्ष घेतात व कोकणस्थांचा घेत नाहीत. देशस्थ व कोकणस्थ वाद इतका माजविला होता की, थोड्याच दिवसात आपापसात मारामारीचा प्रसंग आला असता. परंतु त्याच लोकांनी देशस्थांशी संगनमत करून ११९ पुढाऱ्यांची सभा भरविली. मग सुभेदार सवादकरालाच का खड्यासारखे वगळले ? ते समजत नाही, ते तर हाडामासाचे कोकणस्थच आहेत ना ? सांगावयाचे हे की, या वादाला काही मूळ किंवा तत्त्व नाही. तत्त्वदृष्ट्या विरोध असला तर चालेल. परंतु तत्त्वाशिवाय

विरोध असेल तर त्यात काही तरी आपमतलबीपणा असला पाहिजे यात शंका नाही. सर्व पुढाऱ्यांची एकी का करीत नाही असा एक प्रश्न आहे. पण जेथे व्यक्तीविशिष्ट भांडण आहे तेथे कोण काय करणार ? तत्त्वाचा प्रश्न असेल तर गोष्ट निराळी. म. गांधींनी मंदीर प्रवेशाबद्दल माझे मत विचारले असता मी सांगितले की, मंदीर प्रवेश मिळून जातीभेद मोडत असेल तर तो मला पाहिजे आहे. तसे होत नसेल तर मंदीर प्रवेशाची आम्हास जरूर नाही. या वादात तत्त्व आहे. या पुढाऱ्यांच्या भांडणात असे काहीच नाही. असे जरी असले तरी मला आनंद होतो की, कोणीही तुमच्यात फाटाफूट करण्याचा प्रयत्न केला तरी तुम्ही त्याला फसत नाही. स्वतःचे स्वातंत्र्य असण्यासाठी माणसाला नोकरी तरी पाहिजे किंवा वडिलोपार्जित इस्टेट तरी पाहिजे. तसे नसेल तर चोरी करून, भीक मागून किंवा दुसऱ्यांची हाजी हाजी करून पोट भरावे लागते. आपल्यात पुष्कळ लोक बेकार आहेत व इतर समाजाजवळ पुष्कळ पैसे आहेत. पुढच्या निवडणुकीच्या वेळेस असा प्रसंग येणार आहे की, इतर लोक पैसे देऊन आपल्या लोकांची मते विकत घेण्याचा प्रयत्न करतील व आपल्यातील बेकार व स्वाभिमानशून्य असे काही पुढारी त्यांना मदतही करतील. तरी या गोष्टीपासून तुम्ही सावध असले पाहिजे. या बाबतीत आपल्या नकली व स्वयंमान्य पुढाऱ्यांपासून तुम्ही सावध रहा.

डॉ. आंबेडकरांचे काम अडवण्यासाठी वरीष्ठ समाजाचे पुष्कळ लोक टपलेले असतात. असे लोक आपल्यातील लाचलुचपतीला चटावलेल्या लोकांना जवळ करणारच. माझा असा अनुभव आहे की, मी हिंदुस्थानात नसल्यावर या लोकांचे फावते.

मी या महिन्याच्या २२ तारखेला विलायतेस जाणार आहे. म्हणून मी गेल्यावर हे लोक तुमच्यात दुफळी करतील. तुम्ही कोणाच्याही नादी न लागता एकीने वागाल अशी मला आशा आहे. आजचा प्रसंग आणून दिल्याबद्दल पुन्हा सर्वांचे आभार मानून मी माझे भाषण संपवितो.



६९

# तुम्हालाच तुमची जबाबदारी ओळखणे प्राप्त आहे

पूर्वी ठरल्याप्रमाणे नगर जिल्ह्यातर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकर व डॉ. सोळंकी साहेब यांस मानपत्रे अर्पण करावयाचा आणि प्रो. राव यांचा सन्मान करावयाचा समारंभ तारीख १२ व १३ एप्रिल १९३३ रोजी मुंबई दामोदर हॉलच्या पाठीमागील पटांगणात मुद्दाम उभारलेल्या भव्य मंडपात निर्विघ्नपणे पार पडला.

पहिल्या दिवशी डॉ. सोळंकीसाहेब यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांस मानपत्र अर्पण करण्यात आले.

प्रथम, रा. आर. एच. आडांगळे यांनी अध्यक्षाची सूचना आणिली व तिला रा. सू. ता. रुपवते यांनी अनुमोदन दिल्यावर डॉ. सोळंकीसाहेब यांनी अध्यक्षस्थान मंडीत केले. डॉ. सोळंकीसाहेब आपल्या प्रास्ताविक भाषणात म्हणाले, डॉ. आंबेडकरांचा सन्मान करणे म्हणजे तुमचा आमचाच सन्मान करण्यासारखे आहे. यानंतर रा. रोहम यांनी मानपत्र वाचून दाखविल्यावर ते सुंदर रौप्य करंडकातून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना अर्पण करण्यात आले. डॉ. बाबासाहेबांनी त्याचा स्वीकार केल्यावर ते बोलावयास उभे राहिले. ते म्हणाले,

हा आजचा समारंभ नगर जिल्ह्यातील मंडळीकडून साजरा करण्यात येत आहे. त्यांच्याकरिता कोणतीही स्पेशल कामगिरी मी केली नसताना फक्त माझ्यावरील त्यांच्या प्रेमामुळेच हा समारंभ घडून येत आहे, याबद्दल या मंडळीचे मी आभार मानतो. नगर जिल्हा इतर जिल्ह्यापेक्षा थोडा मागासलेला आहे. या जिल्ह्यातील सामाजिक परिस्थिती अडचणीची आहे हे मी जाणून आहे. या जिल्ह्यातील महार लोकांनी ख्रिश्चन धर्माचा स्वीकार केल्यामुळे दोन पंथ झाले आहेत. असे असता या जिल्ह्याकडे विशेष लक्ष पुरविणे मला शक्य झाले नाही, याबद्दल वाईट वाटते. मला नवीन असे काही सांगण्यासारखे राहिलेले नाही. तरी पण या खुर्चीवर बसल्यापासून माझ्या मनात खेदाचे प्रकार घुटमळू लागले आहेत. जमलेल्या लोकांना असे वाटत असेल की आपण पुढारी झालो असतो तर किती चांगले झाले असते ! डॉ. आंबेडकरांचे नाव बऱ्या-वाईट प्रकारे वर्तमानपत्रातून वाचावयास मिळते, तसे आपले झाले असते. माझी स्वतःची अशी प्रबळ इच्छा आहे की, माझ्या स्थानी दुसरा कोणी येईल तर मी स्वतःला भाग्यवान समजेन. माझ्या गळयात हार घालणाऱ्याला आनंद झाला

---

जनता : २२ एप्रिल १९३३.

असेल, परंतु त्याच्या उलट माझी स्थिती झाली आहे. तुम्ही माझी जी स्तुती केली आहे त्यामुळे माझी जबाबदारी वाढली आहे. तुम्ही माझ्यापासून काही तरी कार्याची अपेक्षा करीत असता. मला पुष्कळ वेळा वाटते की समाजाची जबाबदारी न घेता मी एकटा राहिलो असतो तर दैववान झालो असतो. माझे सर्व आयुष्य विद्यार्थी दशेत जावे अशी माझी इच्छा होती. म्हणून जिभेला टाचा मारूनसुध्दा मी अनेक पुस्तके खरेदी केली. एखादी प्रोफेसरची नोकरी पत्करून पुस्तके वाचण्यात सुखाने काळ काढावा अशी माझी पहिली इच्छा होती. परंतु सुदैवाने म्हणा किंवा दुर्दैवाने म्हणा मला अस्पृश्यांच्या चळवळीत पडावे लागले. आता मात्र यातून पाय काढण्याची मला भीती वाटते. अस्पृश्य समाजाची जबाबदारी साधी सोपी नाही. निव्वळ स्तुतीने किंवा सभेने फायदा होईल, असे मला वाटत नाही. तसे असते तर यापूर्वीच सर्व काही झाले असते. रोज मजकडे २५-३० पत्रे येतात. ती वाचणाऱ्याला पाझर फुटल्याशिवाय राहणार नाही. त्या कामात नित्य लक्ष घालणारी माणसे पाहिजे. तुमच्यात जी थोडी बहुत माणसे आहेत ती माझ्या दुर्गुणामुळे म्हणा किंवा तुमच्या दुर्दैवामुळे म्हणा माझ्याबरोबर काम करण्यास तयार नाहीत. नुसता कार्य करणाऱ्या माणसांचा अभाव आहे एवढेच नसून पैशाचीही टंचाई आहे. मजकडे जो येतो तो हात हालवीत येतो. न पैसा, न माणूस, न बुध्दिमता असे असताना या समाजाचे काम करणे मोठे कठीण आहे. डॉ. सोळंकीनी मला या कामातून मुक्त करावे. इतर समाजातील लोक चतुर्थाश्रमात वयाची ५० वर्षे उलटल्यानंतर समाजकार्यास आरंभ करतात. परंतु मला वयाच्या २५ व्या वर्षीच समाजकार्य सुरू करावे लागले. आता आपल्या समाजाला राजकीय सत्ता मिळालेली आहे. याउपर माझी समाजाला विशेष आवश्यकता आहे, असे वाटत नाही. शिकलेली माणसे तयार होत आहेत, अजून जरी आयुष्याची काही वर्षे माझ्या स्वाधीन होतील तर मला माझे व्यक्तिगत हित साधता येईल. तुम्ही स्वतःचे पायावर काम करा. ज्यांना माझे व डॉ. सोळंकींचे वैषम्य वाटत असेल त्यांनी आम्हास सुचवावे. आम्ही एका पायावर तयार आहोत. प्रत्यक्ष सर्व प्रकारची जबाबदारी यापुढे मी घेऊ इच्छित नाही. सार्वजनिक कार्याची साधनसामग्री तुम्ही तयार केली पाहिजे. काँग्रेसने आपल्या चळवळीसाठी आतापर्यंत २ कोटी रूपयांपेक्षाही जास्त खर्च केला असेल. मुसलमानांनी आपल्या चळवळीसाठी तितकाच किंवा त्यापेक्षाही जास्त खर्च केला असेल. आपल्या लोकांनी आपल्या चळवळीसाठी किती खर्च केला ? फार तर दोन-तीन हजार रुपये ! असला सवंग सौदा मला लाभला आहे. यापुढे मात्र तुम्हाला तुमची जबाबदारी ओळखणे प्राप्त आहे. माझे बरेच दिवसांचे हृद्गत स्पष्ट शब्दात सांगितले. ते ऐकून घेतल्याबद्दल मी आपणां सर्वांचे आभार मानून आपली रजा घेतो.

## दिवस दुसरा

### '' डॉ. सोळंकींचे मानपत्रापेक्षा अन्य तऱ्हेने उतराई होणे जरूर ''

ता. १३ एप्रिल १९३३ रोजी रात्रौ डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. सोळंकीसाहेब यांना मानपत्र व प्रो. राव यांचा सन्मान करण्याचा समारंभ झाला. प्रथम रा. ग. सुं. दारोळे यांनी अध्यक्षाची सूचना आणली व तिला रा. तिगोटे यांनी अनुमोदन दिल्यावर अध्यक्ष डॉ. बाबासाहेब यांनी टाळ्यांच्या प्रचंड गजरात अध्यक्षस्थान स्वीकारले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या प्रास्ताविक भाषणात म्हणाले की,

आजच्या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्यास मला अतिशय आनंद होत आहे. सदर प्रसंगी आपणास तीन कार्ये पार पाडावयाची आहेत. (१) डॉ. सोळंकीसाहेबांना मानपत्र अर्पण करावयाचे आहे. (२) म्युनिसीपल स्कूल कमेटीचे चेअरमन प्रो. राव यांनी अस्पृश्य वर्गाची अभिनंदनीय कामगिरी केली त्याबद्दल त्यांचा सन्मान करावयाचा आहे व (३) नगर जिल्ह्याच्या शिक्षणाप्रित्यर्थ बोर्डिंग उघडण्याच्या कार्याचा विचार करावयाचा आहे. डॉ. सोळंकीसाहेबांनी अस्पृश्य वर्गासंबंधी केलेली कामगिरी तुमच्या आमच्या परिचयाची आहे. ती विषद करून सांगण्याची जरूरी नाही. लोकोपवादाची पर्वा न करता आपल्या लोकांच्या हितासाठी त्यांनी आपली सर्व शक्ती खर्च केली आहे. मला स्वतःला कबूल करणे भाग आहे की, त्यांनी कायदे कौन्सिलमध्ये किंवा मुंबई म्यु. मध्ये माझ्या शतपटीने कामगिरी केली आहे. मला माझ्या इतर कामामुळे कौन्सिलमध्ये फारसे हजर राहाता येत नाही. कामगिरीचे सर्व श्रेय त्यांच्या चिकाटीला व कार्यकारीपणाला आहे.

श्रीमंत लोक नेहमीच राजकारण व समाजकारण करीत असतात. ज्यांचा बँकेत पुष्कळ पैसा आहे, अशी माणसे सार्वजनिक कार्यात असतात. दर महिन्याला चेक फाडून उदरनिर्वाह चालवितात व आयुष्यातील फावला वेळ मनोरंजनार्थ समाजकार्यात खर्च करतात. स्वतःचा चरितार्थ चालवून समाजकार्य करणे ही गोष्ट साधी सोपी नाही. त्यांची वैद्यकीची परीक्षा पास झाली असूनही स्वतःचा दवाखाना नाही, २४ तास सार्वजनिक कार्यात गुंतलेले असतात. हा त्यांचा समाजावर उपकार आहे.

इंग्लंडात मजुरांचे राजकारण करणारांना चांगले वेतन मिळत असे. १९१० साली पार्लमेंटच्या सभासदांना पगार देण्यात येत नव्हता. त्यावेळी त्यांना ४०० पौंड मजुरांच्या संस्थांतून मिळत असत. इकडे काहीच नाही. असे असताना डॉ. सोळंकींनी समाजकार्य चालू केले आहे.

त्यांचे मानपत्रापेक्षा अन्य तऱ्हेने उतराई होणे जरूर आहे. त्यांच्या ठायीचे प्रेम व्यक्त करण्याकरिता आपण त्यांना मानपत्र देत आहोत.

● ● ●

## ७०

# जातीभेद नष्ट केल्याशिवाय उन्नतीचा मार्ग असंभव

कोकण पंचमहाल (राजापूर ते गोवाहद्द) महार समाज सेवा संघ,मुंबई यांचे विद्यमाने रविवार ता. १६ एप्रिल १९३३ रोजी रात्रौ माझगाव बोगद्याची वाडी, सिमेंट चाळ येथे एक मोठा सहभोजन समारंभ अतिशय उत्साहाने पार पडला. सदर सहभोजन प्रसंगी अस्पृश्य वर्गाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर तसेच मे. सुभेदार सवादकर, नामदेव बुवा येरलेकर, डोळस, दुधवडे, रामभाऊ सोनवणे, उपशाम, बनसोडे, रा. ग. भातनकर, सु. अ. ल. शिरावले, शि. गो. हाटे, गो. ग. वरघरकर व मे. कवळी बी. ए., एलएल. बी. इत्यादी मंडळी हजर होती.

प्रथम रा. शि. ना. बालावलकर यांनी आजच्या सहभोजनाचा उद्देश सांगताना सांगितले की, महार समाजात बेले महार, पान महार अशा प्रकारचे जे भेद आमच्या कोकणात आहेत ते नाहीसे झाले पाहिजेत. याबद्दल डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना दोन शब्द सांगण्यास त्यांनी विनंती केली. श्री. नामदेव बुवा येरलेकर म्हणाले की, अगदी पूर्वी काही आपसातील भांडणामुळे हे भेद पडले असावेत. आपण सर्व एकाच ईश्वराची लेकरे आहोत. तेव्हा हे भेद मोडणे अत्यंत जरूर आहे. या म्हणण्यास रा. ग. धु. जाधव, क. का. पोइपकर, ल. सो. अस्वेकर यांनी अनुमोदन दिले.

नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर टाळयांच्या प्रचंड गजरात बोलावयास उभे राहिले, ते म्हणाले,

प्रिय बंधु भगिनींनो,

आज मला अतिशय महत्त्वाची कामे होती. दोन-चार दिवसांनीच मी विलायतेस जाणार असल्यामुळे माझ्यामागे अतिशय निकडीची कामे आहेत. परंतु आजच्या समारंभाला माझ्या दृष्टीने अतिशय महत्त्व असल्यामुळे मी मुद्दाम या सहभोजनाला आलो आहे. जातीभेद काढून टाकल्याशिवाय आपल्या उन्नतीचा मार्ग मोकळा होणार नाही. महार समाज हा मुसलमान समाजाप्रमाणे जातीभेद न मानणारा समाज आहे. ही महार समाजाबद्दल अतिशय चांगली गोष्ट आहे. कोणत्याही प्रांतातील महार एकत्र जेवू शकतात. मी मुंबई इलाख्यात सर्वत्र फिरलो आहे. त्यावेळेस महारात भेद नसल्याचे मला दिसून आले आहे. फक्त कोकणात काही ठिकाणी महारात बेले व पान असे भेद आहेत. ते तेथे

---

जनता : २२ एप्रिल १९३३.

का झाले हे माहीत नाही. यापुढे हे दोन भेद महार समाजात का चालू ठेवावे हेही कोणी सांगू शकत नाही. असे जर आहे तर बेले व पान महार यांच्यात भोजन व विवाह का होऊ नयेत ? पूर्वापार वडिलांची चाल हे कोणी कारण सांगू शकतील. परंतु पूर्वापार चालत आलेल्या वडिलांच्या चालीच चालवावयाच्या असतील तर आपणास त्यांच्यासारखेच खितपत पडावे लागेल याचा विचार करा. परिस्थिती अगदी निराळी होती. त्यांना पूर्ण अज्ञानात ठेवण्यात आले होते. त्यांची परिस्थिती पूर्ण गुलामीची होती. त्यांना राजकीय, धार्मिक सामर्थ्य नव्हते, त्यांची आर्थिक परिस्थिती वाईट होती. वडिलांच्या चुकांमुळेच आज आपणास दुःख भोगावे लागत आहे. हे दुःख नाहीसे होऊन आपल्या मुलाबाळास सुख लाभावे असे आपणास वाटत असल्यास आपण वडिलांनी केलेल्या चुका दुरूस्त केल्या पाहिजेत. या बाबतीत जुन्या लोकांपेक्षा तरुणांवर जास्त जबाबदारी आहे. ती जबाबदारी ते पार पाडतील अशी माझी खात्री आहे. या आपसातील भेदामुळे आतापर्यंत रत्नागिरी जिल्ह्यात बोर्डिंग निघू शकले नाही. तोच अनुभव सार्वजनिक चळवळीतही येत आहे. समजा एका गावात बेले महार व पान महार अशा दोन्ही पोटभेदाचे लोक असले तर एकाने मृतमांस खाण्याचे सोडून दिले तर दुसरा ते खातो आणि त्यामुळे होते काय की, दोघांवरही गावच्या लोकांचे वर्चस्व वाढते. परंतु त्यांच्यात भेद नसेल तर असा दुष्परिणाम होणार नाही. आपली प्रगती करून घेण्यासाठी आपण जातीभेद मोडला पाहिजे.

आपल्यातील ही भेदाची घाण काढून टाकली तरच आपणास दुसऱ्याला तशीच घाण काढून टाकण्यास सांगता येईल.

मला आनंद वाटतो की, अशाप्रकारचे जोराचे प्रयत्न आपल्या लोकात सुरू झाले आहेत व थोड्याच दिवसात आपल्यातले हे भेद नाहीसे होतील अशी माझी खात्री आहे. आजच्या प्रसंगाबद्दल मी सर्वांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतो.



७१

# कूपमंडूकपणाची वृत्ती सोडून सार्वजनिक कामाला पैसा द्या !

तारीख २२ एप्रिल १९३३ रोजी रावबहादूर एस. के. बोले, एम. एल. सी., जे. पी. मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली जी. आय. पी. रेल्वे पोर्टर चाळ, कुर्ला येथे रात्री साडेनऊ वाजता कुर्ला येथील अस्पृश्य समाजातर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांस एक मानपत्र व ८० रुपयांची थैली अर्पण करण्यात आली. प्रथम ठरले होते की, डॉ. बाबासाहेब आल्यावर त्यांची कुर्ला स्टेशनपासून डॉ. आंबेडकर रोड, जुम्मा मसजिद रोड, शिवाजी रोड या रस्त्यांवरून मिरवणूक काढण्यात येईल व त्या दृष्टीने तेथील अस्पृश्य जनतेने मोठ्या उत्साहाने एकंदर तयारीही ठेविली होती. परंतु वेळेच्या अभावी सदर कार्यक्रम एकाएकी बंद करावा लागला, त्यामुळे लोकांची अतिशय निराशा झाली. तरीही मुख्य कार्यक्रम अत्यंत उत्साहाने पार पडला. अध्यक्ष रावबहादूर बोले हे रीतसर स्थानापन्न झाल्यावर रा. कर्डक यांनी मानपत्र वाचून दाखविले व अध्यक्षांच्या हस्ते मानपत्र व ८० रुपयांची थैली डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांस अर्पण करण्यात आली. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा हारतुरे घालून गौरव केल्यावर ते बोलावयास उभे राहिले, ते म्हणाले,

जमलेल्या समुदायाकडे पाहून मला पाचसात वर्षापूर्वी घडलेल्या एका प्रसंगाची आठवण होते. कुर्ल्यात येण्याची ही माझी दुसरी वेळ होय.

पाचसात वर्षांपूर्वी मी अध्यक्ष व्हावे असे आमंत्रण येथील लोकांनी मला दिले होते. ते दिवस पावसाचे असूनही मी ठरलेल्या वेळी आलो होतो. परंतु आश्चर्य हे की, सभेच्या ठिकाणी कोणीच नव्हते. मला त्याचे अत्यंत मोठे आश्चर्य वाटले. प्रत्येक ठिकाणी माझ्या सभेला असंख्य लोक जमत असून येथे असे का झाले याची चौकशी केल्यावर मला समजले की, त्या सभेचे हँडबिल फक्त नाशिक जिल्ह्याच्या लोकांनीच काढले होते. त्यावर नगर, सातारा इत्यादी जिल्ह्यांच्या लोकांची नावे नव्हती म्हणून असे झाले. ज्या वेळेस या समारंभाचे आमंत्रण देण्यास येथील लोक आले त्यावेळेस मी त्यांना सांगितले की सर्व लोकांतर्फे कार्यक्रम होत असेल तर मी येतो, त्यांनी ते कबूल केले व त्याचप्रमाणे घडवून आणिले, त्याबद्दल मी त्यांचे अभिनंदन करितो. सर्वांनी जुटीने वागणे अत्यंत जरूर आहे. एकाचे दुःख ते सर्वांचे दुःख अशी वृत्ती सर्वांनी ठेविली पाहिजे. आपल्यापुरते पाहण्याची व कूपमंडूकपणाची वृत्ती सोडून द्या.

---

जनता : २९ एप्रिल १९३३.

तुम्हा सर्व एक झाल्याबद्दल मला आनंद होत आहे. मानपत्र अर्पण करून तुम्ही जो माझा गौरव केला आहे त्याबद्दल मी तुमचा आभारी आहे.

थैलीत दिलेले हे पैसे मी माझ्या प्रपंचाला लावणार नाही. यापूर्वी पुष्कळ पैसे मला मिळालेले आहेत. परंतु त्यापैकी एक पैही मी माझ्यासाठी घेतली नाही. हे सर्व पैसे मी सार्वजनिक कामाला लाविले आहे व तुम्ही आज दिलेले पैसेही मी सार्वजनिक कार्याला देणार आहे. या ठिकाणी जमलेले लोक पाचसहा हजार तरी होतील. एवढ्या लोकसमुदायाकडून फक्त ८० रुपयेच सार्वजनिक कार्याला मिळतात, ही लाजिरवाणी गोष्ट आहे. आता त्याबद्दल काही करता येणार नाही. परंतु पुढे केव्हा तरी याची भरपाई होईल, अशी मला आशा आहे. सार्वजनिक काम पैशाशिवाय होत नाही. काम करणाऱ्याला वेतन देणे जरूर आहे. काही माणसे सार्वजनिक काम फुकट करतात. परंतु सर्वच लोक फुकट काम करणे शक्य नाही. आपल्या ' जनता ' पत्रामध्ये ५-६ माणसे लिहिण्याचे काम करतात. इतर ठिकाणी अशा कामाबद्दल दरमहा १००-२०० रु. द्यावे लागतात. परंतु पाच-सात वर्षांपासून हे लोक मोबदला न घेता अग्रलेख वगैरे लिहिण्याचे काम करतात. तीच गोष्ट ' भारत भूषण ' प्रेसची. या छापखान्यात व्यवस्थापक वगैरे जी मंडळी आहेत त्यांना कमीत कमी पगार दिला जातो. हे लोक स्वार्थत्याग करणारे आहेत म्हणून ठीक आहे. परंतु नेहमीच असे चालणे शक्य नाही. म्हणून तुम्ही पैसे दिले पाहिजेत.



# या देशात इंग्रज सरकार काहीच करीत नाही

पूर्वी जाहीर झाल्याप्रमाणे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना पुणे जिल्हा, नाशिक जिल्हा व इतर ठिकाणचे लोक या सर्वांतर्फे मानपत्रे व थैल्या अर्पण करण्याचा संयुक्त समारंभ बादशाही थाटात पार पडला. तारीख २३ एप्रिल १९३३ रोजी रात्रौ ९ वाजता मुंबईच्या दामोदर हॉल मागील भव्य पटांगणात शृंगारून तयार केलेल्या मंडपात कोच, खुर्च्या वगैरे मांडून स्टेज तयार करण्यात आले होते. पाहाणारास एखाद्या राजाचा दरबारच भरला आहे असे वाटत होते. सदर समारंभास बरीच बाहेर गावची मंडळीही हजर होती. एकंदर जनसमुदाय ८-१० हजार असेल. स्टेजवर उंचावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर, अध्यक्ष रावबहादूर बोले व डॉ. सोळंकी साहेब बसले होते. त्यांच्या भोवती कोचावर श्री. सहस्त्रबुद्धे, देवराव नाईक, भांई प्रधान, डॉ. प्रधान, सौ. सरलाबाई प्रधान, प्रो. कंगले, सौ. गीताबाई कंगले, असवेकर, कवळी, खांडके, भाई चित्रे, कमलाकांत चित्रे, रणखांबे, भाऊराव गायकवाड, दाणी, काळे, जाधव इत्यादि मंडळी विराजमान झाली होती. सदर समारंभाची व्यवस्था ठेवण्यासाठी माहीम चाळ, नायगाव, रेतीचा धक्का, डिलाईल रोड, सैतान चौकी, फत्तरबंदर, करीरोड, वाडिया हॉस्पिटल, सँडहर्स्ट रोड, कोळी वाडा, क्लार्क रोड, आर्थर रोड, वडाळा, शिव, माटूंगा इत्यादि ठिकाणचे ५०० च्या वर समता सैनिक दलाचे लाठीबंद सैनिक सर्व समारंभाच्या भोवती कोट करून जय्यत तयार होते. प्रथम रा. दिवाकर नेवजी पगारे यांनी अध्यक्षाची सूचना आणिली व तिला रा. शंकरराव लिंबाजी ओझरकर यांनी अनुमोदन दिल्यावर नियोजित अध्यक्ष रावबहादूर एस. के. बोले, एम. एल. सी., जे. पी., मुंबई यांनी अध्यक्षस्थान सुशोभित केले. त्यांनी आपले प्रास्ताविक भाषण केले. भाषणात ते म्हणाले की, जमलेल्या समाजावरून तुमच्यात किती जागृती झाली आहे ते दिसून येते. तुम्हाला गाढ झोपेतून जागृत करण्याचे श्रेय डॉ. आंबेडकरांना आहे.

डॉ. आंबेडकर आपल्या समाजात जन्मास आल्याबद्दल आपला समाज भाग्यवान आहे. सर्व जगाचे पुढारी होण्यास ते लायक आहेत. त्यांची लायब्ररी पाहिली असता त्यांचे वाचन किती दांडगे आहे त्याची थोडीशी कल्पना येईल. राऊंड टेबल परिषदेमध्ये राज्यघटनेसंबंधी पुस्तके स्वखर्चाने विकत घेऊन त्यांनी राजकारणाचा अभ्यास केला आहे. काही लोक म्हणतात त्यांची जातिविषयक

---

जनता : २९ एप्रिल १९३३.

दृष्टी आहे पण ते चूक आहे. सायमन कमिशनला रिपोर्ट सादर करताना हे दिसून आले आहे. त्यावेळी राष्ट्रीय विचारांच्या पुष्कळ लोकांनीही त्यांची स्तुती केली. डॉ. आंबेडकरांचा स्वभाव फारच निगर्वी आहे. जे. पी. पदवी सरकार त्यांना देऊ लागले त्यावेळेस ते ती घेईनात. डॉ. आंबेडकर फार निस्पृही आहेत. याची साक्ष त्यांची राऊंड टेबल मधील भाषणे देतील. त्यांच्यासारखा मुंबई कौन्सिलात स्पष्टवक्ता सापडणार नाही. आपल्या समाजाच्या हितासाठी ते कोणाचीही पर्वा करीत नाहीत. त्यांना तिन्ही राऊंड टेबल परिषदांना व आताच्या जॉईंट पार्लमेंटरी कमिटीलाही प्रयत्न न करता बोलाविले यावरून त्यांची लायकी दिसून येते. आताही ते आपली कामगिरी योग्यतऱ्हेने बजावतील याबद्दल शंका नाही.

नंतर रा. पी. एल. लोखंडे यांनी नाशिक जिल्ह्यातर्फेचे मानपत्र वाचून दाखविले व रौप्य करंडकातून अध्यक्षांच्या हस्ते ते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यास अर्पण करण्यात आले. ५०१ रुपयांची थैलीही नाशिक जिल्ह्यातर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांस अर्पण करण्यात आली. त्यानंतर रा. हरिभाऊ हनुमंत रोकडे यांनी पुणे जिल्ह्यातर्फे मानपत्र वाचून दाखविले व अध्यक्षांच्या हस्ते सोनेरी फ्रेमीतून एक अशा सोनेरी अक्षरांनी लिहिलेल्या मानपत्राच्या दोन प्रती डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांस अर्पण करण्यात आल्या.

पुणे जिल्ह्यातर्फे थैली अर्पण करताना रा. शांताराम अनाजी उपशाम हे म्हणाले की, यापूर्वी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या कार्यास मदत म्हणून ३५० रुपयांची टाईप रायटींग मशीन पुणे जिल्ह्यातर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांस अर्पण करण्यात आली आहे व आज ही २०० रुपयांची थैली डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांस अर्पण करण्यात येत आहे असे म्हणून त्यांनी ती अध्यक्षांच्या हस्ते डॉ. बाबासाहेब आंबेडकरांस अर्पण केली. नंतर नायगाव चाळीतील रहिवाशांतर्फेची ९१ रुपयांची थैली अर्पण करण्यास रा. विठ्ठल तानाजी साकरे उभे राहिले. ते म्हणाले, वेळेच्या अभावी आम्हाला जास्त कार्यक्रम करता आला नाही. आमच्या या अल्पशा थैलीचा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी स्वीकार करावा अशी विनंती आहे, असे म्हणून त्यांनी ९१ रुपयांची थैली अध्यक्षांच्या हस्ते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांस अर्पण केली. त्यानंतर ट्राम कंपनीची चाळ चवथा माळा (परळ) येथील पंच मंडळीतर्फे डॉ. आंबेडकरांस ५० रुपयांची थैली रा. चांगू बहेरू गाडे यांनी अर्पण केली व भोर संस्थानच्या काही मंडळींनी १७ रुपयांची देगणी दिली.

नंतर समता सैनिक दलातर्फे हार अर्पण करण्यास रा. साळवी हे उभे राहिले. हार अर्पण करताना ते म्हणाले की, समता सैनिक दलाच्या सैनिकांचा पलटणीत प्रवेश होईल असा प्रयत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर करतील अशी मला

आशा आहे. त्यानंतर वांद्रे, डिलाईल रोड वगैरे ठिकाणचे मंडळीतर्फे अनेक हार डॉ. बाबासाहेब आंबेडकरांस अर्पण करण्यात आले.

यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले. ते म्हणाले,

अध्यक्ष महाराज, प्रिय बंधु आणि भगिनींनो,

आज या समारंभाला आपण सर्वजण या ठिकाणी एकत्रित झालात ही माझ्या दृष्टिने फार समाधानकारक गोष्ट आहे. कारण, जर पूर्वी इच्छिल्याप्रमाणे दरेक जिल्ह्याच्या लोकांनी निरनिराळे कार्यक्रम केले असते तर मला त्यांना हजर राहणे अशक्य झाले असते. शिवाय, आज जमला इतका लोकसमुदाय एकत्रित होण्याचा प्रसंगही लाभला नसता. दुसरी गोष्ट उद्या बंदरावर सर्वांनी येऊन निरोप देण्याचा जो अतिप्रसंग होणार होता तो उद्या होण्याचे काही कारण नाही. याच ठिकाणी मी तुमचा व तुम्ही माझा निरोप घेऊ या. बंदरावर येऊन तुम्ही जो गोंगाट व जयध्वनी करता त्यामुळे मी स्वतः गांगरतो. तसेच माझ्याबरोबर बोटीने जाणाऱ्या प्रतिनिधींच्या मनाला संकोचही वाटत असेल. पुष्कळ लोकांना निरोप देताना कधी कधी चार माणसेही हजर नसतात परंतु भी मात्र याला अपवाद आहे. कारण माझ्यावेळी किडा-मुंगीलाही जागा होणार नाही इतकी माणसे बंदरावर येतात. ही अनर्थाची गोष्ट आहे. ग़रीब लोकांनी आपला रोजमुरा बुडवून बंदरावर मला पोहोचविण्यास हजर राहावे ही गोष्ट मला उचित व पसंत वाटत नाही. तेव्हा तुम्ही उद्या कोणीही बंदरावर येऊ नये. येथेच एकमेकांना जे काही सांगावयाचे असेल ते सांगता येईल. ज्या जिल्ह्यांतर्फे ही मानपत्रे देण्यात आली त्यांच्या संस्थाचालकांचे मी आभार मानतो.

गेल्या आठवड्यात नगर जिल्ह्यातील मानपत्राचे वेळी मी केलेल्या भाषणाचा असा व इतक्या लवकर परिणाम होईल, असे मला वाटत नव्हते. परंतु तुम्हाला समाजकार्याची पूर्ण जाणीव झाली असल्यामुळे समाजकार्य उत्तम तऱ्हेने चालावे यासाठी एकी करून तुम्ही थोड्या अवधीत ज्या आज थैल्या अर्पण केल्या आहेत त्याबद्दल मी तुमचे आभार मानतो.

मला काल व आज मिळालेल्या निधीचा विनियोग मी समाज कार्याकडेच करणार आहे. त्यासाठी मी एक योजना ठरविली आहे. माझ्या मनातून समाजातील लोकांना चांगल्याप्रकारचे ज्ञान प्राप्त होईल, अशा प्रकारची व्यवस्था करण्याचे पुष्कळ दिवसापासून होते. मुलांनी शाळेत जाऊन चांगले शिक्षण घेतले पाहिजे. त्याप्रमाणे वयात आलेल्या स्त्री-पुरुषांनाही नवीन, चांगले सुधारणेला कारणीभूत होईल असे ज्ञान प्राप्त होणे जरूर आहे. त्यासाठी कमीत कमी चार आणे किंमतीची उपयुक्त व चांगल्या माहितीने भरलेली अशी पुस्तके

प्रसिद्ध करण्याकरिता एक संस्था स्थापन करावी, असा माझा हेतू आहे व त्यासाठी काल व आज मिळालेले पैसे मी देणार आहे.

राउंड टेबल परिषदेसंबंधी यावेळेस विशेष काही सांगण्याची जरूर आहे, असे मला वाटत नाही. कारण ती परिषद आता जुनी झाली आहे. या शिळया बाबीविषयी दोन शब्द सांगण्याबद्दल मला अनुकंपा वाटते. राउंड टेबल परिषदेच्या तीन वाऱ्या झाल्याच आहेत व आता ही शेवटची वारी आहे. त्यासंबंधी विशेष वाच्यता करण्याची माझी इच्छा नाही. एक गोष्ट खरी की, गेल्या चार वर्षात अस्पृश्यांच्या कार्याचे मोठे लोढणे माझ्या गळयात होते. ते जर नसते तर माझे राजकारण काही निराळया प्रकारचे झाले असते. मी त्यावेळेस दोन पेचात सापडलो होतो. एक, इंग्रजांबरोबर वाद करावा तर गांधींकडून काही फायदा होणार नाही व दुसरा गांधींना साहाय्य करावे तर इंग्रजांकडून काही लाभ होणार नाही म्हणून व्यापक स्वरूपाच्या राष्ट्रकार्याकडे मी कानाडोळा केला होता. माझी मनोदेवता आता मला सांगू लागली आहे की, कोणत्याही प्रकारचे स्वराज्य आले तरी आता अस्पृश्यांचा फायदाच होणार आहे. या बाबतीत ज्या काही उणिवा राहिल्या आहेत त्याही भरून काढण्याचा मी प्रयत्न करणार आहे. परंतु अस्पृश्यांच्या कार्यावर भर देण्याची आता मला जरूर दिसत नाही.

अस्पृश्यांना नुसती राजकीय सत्ता मिळून उपयोग नाही. ती मिळून जर सत्ता इंग्रज सरकारच्या हातीच राहाणार असली तर १५-२० किंवा २५ प्रतिनिधी जरी आम्हाला मिळाले तरी त्यांचा काही उपयोग नाही. पंगतीला वसण्याचा हक्क मिळविल्यानंतर आपल्यापुढे जे पात्र येणार आहे त्यावर भरपूर अन्न वाढले जाईल याचीही खबरदारी घेतली पाहिजे. तेव्हा अशातऱ्हेने इंग्रज सरकारपासून या देशाला विशेष हक्क मिळविण्यासाठी मी आता भांडणार आहे. जे लोक परदेशात जातात व परत येतात त्यांना एक गोष्ट समजते की आपल्या देशात फार दारिद्र्य आहे. येथे आजारी माणसे, गरीब लोक याची काही व्यवस्था नाही. या दृष्टीने इंग्लंड देशात कितीतरी व्यवस्था आहे. तेथे ज्यांना ऐपत नाही अशा लोकांना सरकार मार्फत डॉक्टरची मदत दिली जाते. एखादा माणूस बेकार झाला तर सरकार त्याला नोकरी मिळवून देते किंवा नोकरी मिळेपर्यंत बेकारीचे वेतन देते.

साठ वर्षांपेक्षा जास्त वयाच्या माणसाची कोणत्याही प्रकारची व्यवस्था नसल्यास सरकार त्याला म्हातारपणाचे पेन्शन देते. गरीब लोकांना घरभाडे जास्त पडू नये इकडेही तिकडचे सरकार लक्ष पुरविते. या बाबतीत सरकार

घर मालकाला ग्रँट देऊन ' त्याजजवळून भाडे जास्त घेणार नाही ' अशी अट लिहून घेते.

तिकडे सर्वत्र प्राथमिक शिक्षण सक्तीचे आहे व ते फुकट देण्यात येते. एवढेच नव्हे तर दुय्यम व कॉलेजचे शिक्षणही तिकडे फुकटच देण्यात येते. तेच इंग्रज सरकार या देशात काही करीत नाही.

मुंबईत लवकरच एक प्रसंग ओढविण्याचा संभव आहे. येथील गिरणीचे मालक कामगारांना अडवून त्यांचे पगार कमी करीत आहेत व त्यामुळे संप होऊन गिरण्या बंद होत आहेत. परंतु येथचे सरकार इकडे लक्ष पुरवित नाही. इंग्लंड, जर्मनी वगैरे देशात अशी परिस्थिती उत्पन्न झाली असती तर तेथचे सरकार असे थंड बसले नसते.

शांतता ठेवण्यापलीकडे आपले कर्तव्य नाही, असे येथले सरकार समजत असेल तर त्यामुळे येथल्या प्रजेला सुख, स्वास्थ्य मिळणे शक्य नाही. राष्ट्राकरिताच नव्हे तर तुमच्यासाठीसुद्धा व्यापक स्वरुपाची सत्ता येथल्या लोकांच्या हाती येणे जरूर आहे. म्हणून इंग्रज सरकारच्या हातून सत्ता काढून घेण्याचा प्रयत्न मी करणार आहे. आता मला दिल्या गेलेल्या एका मानपत्रात असा उल्लेख आहे की, ' सुदाम्याच्या पोह्याप्रमाणे आमच्या अल्पशा थैलीचा स्वीकार करावा. '

त्याबद्दल मला सांगावयाचे आहे की, सुदाम्याच्या पोह्यांनी काही होणार नाही. स्वर्गात तुम्हाला चांगली स्थिती प्राप्त होण्यासाठी माझे प्रयत्न नाहीत व ते माझे कामही नाही. या लोकीचेच तुमचे क्लेश कमी व्हावेत व तुम्हाला सुख प्राप्त व्हावे, असे माझे प्रयत्न आहेत व त्यासाठी कलदार पैसा पाहिजे आहे. तो मी तुमच्या जवळून घेणार आहे व तुम्ही तो मला दिला पाहिजे.



# बुद्धीचा उपयोग
## भाकर, शिक्षण व राज्यसत्ता मिळविण्यासाठी हवा

[ सोपारे (वसई) येथे दिलेले भाषण. ]

अध्यक्ष महाराज, प्रिय बंधुंनो व भगिनींनो,

श्री. वनमाळी यांनी म्हटल्याप्रमाणे सदर परिषद मागेच व्हावयाची होती, परंतु मला तिसऱ्या राऊंड टेबल कॉन्फरन्सचे आमंत्रण आल्यामुळे सभेस हजर राहता आले नसते व त्यामुळे मंडळींची निराशा झाली असती. असो. आजचा प्रसंग ज्या चेवली चांभार मंडळींनी घडवून आणून या भागातील अस्पृश्य वर्गापुढे बोलण्याची मला संधी प्राप्त करून दिल्याबद्दल मी त्यांचे अभिनंदन करतो. पहिल्या राऊंड टेबल परिषदेसाठी मी लंडनला गेलो असताना माझी केविलवाणी स्थिती झाली होती. त्यावेळी हिंदू-मुसलमान सभासदात बेबनाव उत्पन्न झाल्यामुळे अस्पृश्यांची बाजू मांडणे फार त्रासाचे झाले. शेवटपर्यंत आमच्यात एकमत न होऊ शकल्याने पहिले वर्ष फुकट गेले असे आम्हा सर्वांनाच वाटले. शिवाय त्यावेळी काँग्रेस व तिचे सर्वाधिकारी म. गांधी परिषदेपासून अलिप्त होते. दुसऱ्या राऊंड टेबल कॉन्फरन्ससाठी महात्मा गांधी व काँग्रेसचे इतर प्रतिनिधी हजर राहून त्यांनी भाग घेतल्यामुळेच महत्त्व आले. दुसऱ्या परिषदेत काहीतरी भरीव कार्य होईल अशी सर्व हिंदी सभासदांनी आशा व्यक्त केली होती, परंतु अखेर ती फोलच ठरली. त्यावेळी राऊंड टेबल कॉन्फरन्सच्या सर्व हिंदी सभासदात इतकी दुही माजली की कोणताच प्रश्न धसाला लावता आला नाही. त्यावेळी असे होण्याचे कारण एकटे म. गांधी हेच होत. एकीकडे मुसलमान व एकीकडे स्पृश्य हिंदू व मधे अल्पसंख्यांक अस्पृश्य वगैरे जातींचे प्रतिनिधी अशी चमत्कारिक परिस्थिती निर्माण झाल्यामुळे मी भांबावून गेलो होतो. अस्पृश्यांविषयी म. गांधी काही स्वतंत्र योजना करतील याची मला आशा नव्हती. कारण मी दुसऱ्या परिषदेला जाण्यापूर्वी त्यांच्या माझ्यात झालेल्या मुलाखतीवरून मला हे समजलेच होते, परंतु अस्पृश्य वर्गासाठी मी जी योजना पुढे मांडीन तिला महात्माजी विरोध मात्र करणार नाहीत, अशी मला पूर्ण आशा होती. परंतु सगळेच उलट घडले, '' इतरांनी पसंत केलेल्या अस्पृश्यांच्या योजनेला मी विरोध करणार नाही '' असे ज्या महात्माजींनी हिंदुस्थानात कबूल केले होते, नव्हे जवळ जवळ मला वचन

---

जनता : २९ एप्रिल १९३३.

भाषणाची तारीख नमूद नाही.–संपादक.

दिले होते तेच महात्माजी शीख व मुसलमानांना कोऱ्या कागदावर सही करून देण्यास तयार झाले व अस्पृश्यांना सुईच्या अग्रावर राहील इतका हक्कसुद्धा देण्यास आपण तयार नाही, असे म्हणाले. महात्मा गांधींच्या या प्रतिज्ञेमुळे आपल्या समाजाच्या हितासाठी मला अल्पसंख्यांकांच्या गोटात शिरावे लागले. महात्माजींचे म्हणणे असे होते की, '' अस्पृश्य व स्पृश्य वर्गाचा मीच प्रतिनिधी असून त्यांचे हिताहित कशात आहे, हे मला चांगले समजते. डॉ. आंबेडकर यांच्यामागे अस्पृश्य समाज मुळीच नसून त्यांनी तयार केलेली योजना व मते ही त्यांची स्वतःची आहेत. त्यांचा अस्पृश्य वर्गाशी मुळीच संबंध नाही. '' त्यांच्या या बोलण्यास त्यावेळी हिंदुस्थानात मोठा आधार मिळत होता. काँग्रेस व हिंदू महासभा यांच्या कार्यकर्त्यांकडून अस्पृश्यात फूट पाडण्याचे सारखे प्रयत्न चालू होते व त्याप्रमाणे चांभार समाजातील काही पोटजाती त्यावेळी माझ्या विरुद्ध गेल्या. त्यावेळी खोट्या सभा, खोट्या तारा वगैरेंचा नुसता वर्षाव चालू होता. त्याचवेळी इतर चांभार जातींकडून होत असलेला विरोध ही चूक आहे, हे श्री. वनमाळी व चांदोरकर यांच्या लक्षात आले. मला विरोध करण्यात चांभार समाजाचे हित नाही, हे पूर्णपणे ओळखून माझ्या मागण्यास पाठिंबा देणाऱ्या ज्या अनेक तारा आल्या त्यात चेवली चांभार समाजातर्फे श्री. वनमाळी, चांदोरकर यांचीही एक तार होती, हे मी कधीच विसरणार नाही.

दुसऱ्या राऊंड टेबल कॉन्फरन्सनंतर अल्पसंख्यांकांचा निर्णय सरकारकडून लवकरच प्रसिद्ध करण्यात आला. त्यात अस्पृश्यांना स्वतंत्र मतदार संघ देऊन स्वराज्यात अस्पृश्यांचे स्वातंत्र्य मान्य करण्यात आले होते. सरकारी निर्णय प्रसिद्ध झाल्यावर प्रतिज्ञेप्रमाणे म. गांधींना प्राणान्त प्रायोपवेशन सुरू करावे लागले व त्यातच पूना-करार जन्माला आला. त्या कराराने आपणाला जे राजकीय महत्त्व व हक्क प्राप्त झाले आहेत त्यांचे पालन करणे हे आता तुमच्या हाती आहे. आपल्या जातीचे पुढारी सांगतील तसे ऐकणे व वागणे हा हिंदू धर्मियांचा गुण आहे, त्याप्रमाणे तुम्ही आपल्या जातीच्या पुढाऱ्यांवर विश्वास ठेवा. मला असे वाटत नाही की, हिंदू लोक व त्यांचे पुढारी व तरुण मंडळी तुमच्यासाठी काहीतरी करतील. तुम्हाला देवळात घेऊन जातील, तुम्हाला आपल्या तळया-विहिरीचे पाणी पाजतील ही आशा फोल आहे. जे लोक सनातन्यांची मर्जी सांभाळून अस्पृश्यता निवारण करीत आहेत त्यांनी हिंदुस्थानच्या भूगोल व नकाशाकडे अजून दृष्टी लावली नाही. ते थोडे निरीक्षण करतील तर

त्यांना कळून येईल की त्यांची दृष्टी अटकेवर की विंध्यांद्रीवर आहे ! मला हिंदू समाज व धर्म यांची पर्वा नाही. मला एवढेच पाहावयाचे आहे की माझा ज्या अस्पृश्य समाजाशी लागाबांधा आहे त्यांचे हित साधणे व तेच मी सध्या करीत आहे. तुम्हाला माझे इतकेच सांगणे आहे की, धर्म व सामाजिक बाबी दूर ठेवा आणि भाकर, शिक्षण व राज्यसत्ता मिळविण्याकडे आपल्या बुद्धीचा व्यय करा, येथे आताच सार्वजनिक विहिरी, शाळा वगैरेवर पाट्या लावण्याची याचना करणारा ठराव आणला होता. याचना करण्याचे वास्तविक कारणच नाही. म्युनिसीपालिटी व लोकल बोर्डात जर तुमचे खरे व भरपूर प्रतिनिधी असतील तर ते भांडून असे करणे भाग पाडतील. यासाठी असले प्रतिनिधी तयार करण्याकडे व निवडून देण्याकडे लक्ष ठेवा. म. गांधी देवळे उघडण्याचे उपाय शोधण्यात गुंतले आहेत. हिंदू लोक देवळे उघडोत अगर सात कुलपात बंद करोत मला त्याची पर्वा नाही. हिंदू तरुण जर्मन राजकारणाचा अभ्यास करतील तर त्यांना दिसून येईल की नाझी पक्ष कम्युनिस्टांविरुद्ध लढत आहे. एकाच राष्ट्रातील लोक न्यायासाठी एकमेकांचे रक्त सांडीत आहेत. १८६३ साली अमेरिकेत निग्रो लोकांना गुलामगिरीतून मुक्त करण्यासाठी उत्तर व दक्षिणेकडील गोरे आपसात लढले, हे हिंदी तरुणांना कळत नाही. अस्पृश्यता निवारणासाठी चार हिंदू तरुणांनी चार सनातन्यांची डोकी सडकून काढली असती, तरुणांचे शिंपीभर रक्त सांडले असते तर काय बिघडले असते ? परंतु येथे खरे अस्पृश्यतानिवारण कोणाला करावयाचे नाही. असो. हिंदू धर्म व समाज यांचे काहीही होवो, अस्पृश्यता निवारण केले जावो, अगर तसेच पूर्ववत राहो, तुम्ही त्याकडे आपले लक्ष गुंतवू नका. आपसातील महार-चांभार भेद नाहीसे करून एकी व संघटन वाढवून मिळालेले राजकीय हक्क जपण्याकडे आपले तन-मन-धन खर्ची घाला. इतके सागून मी आपली रजा घेतो.



७४

# हिंदू समाजाने आपली शक्ती सामाजिक सुधारणेसाठी प्रामाणिकपणे खर्च करावी

डॉ. आंबेडकर अस्पृश्यांचे खरे प्रतिनिधी नाहीत, अशी ओरड करणाऱ्या हिंदू सभावाल्यांना त्यांच्या सहकार्याशिवाय विधायक अशी काहीच कामगिरी करता येणे शक्य नसल्यामुळे या महिन्याच्या पहिल्या आठवड्यात विलायतेला 'व्हाईट पेपर' बद्दल विचारविनिमय करून या 'व्हाईट पेपर' च्या योजनांचा फोलपणा ब्रिटिश जनतेच्या निदर्शनास आणण्यासाठी एक प्रचारक मंडळ नेमण्याकरिता हिंदू पुढाऱ्यांची सभा घेण्यात आली होती. या सभेत डॉ. गौर, डॉ.आंबेडकर, डॉ.मुंजे, सच्चिदानंदसिंह व पं. नानकचंद वगैरे मंडळींची भाषणे झाली. सर्वांची भाषणे निमूटपणे ऐकून घेतल्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर भाषण करावयास उभे राहिले.

डॉ. आंबेडकरसाहेब भाषण करावयास उभे राहताच आता हे काय बोलतात इकडे सर्व पुढाऱ्यांचे आतुरतेने लक्ष वेधले होते. डॉ. मुंजे तर डॉक्टरसाहेबांना आपल्या पक्षात सामील करून घेण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होतेच. डॉक्टर-साहेबांनी केलेल्या भाषणाचा मतितार्थ असा.––

हिंदुस्थानात आज अस्तित्वात असलेल्या अस्पृश्य वर्गाला स्वतःच्या सर्वांगीण उन्नतीसाठी स्वतंत्र मतदार संघाची मागणी करण्यास सर्वस्वी हिंदू समाजच कारणीभूत आहे. आजची हिंदू समाजातील एकंदर परिस्थिती सूक्ष्म रीतीने अवलोकन केल्यास अस्पृश्य समाजाला आपले स्वातंत्र्य संयुक्त मतदार संघातून कधीही मिळविता येणे शक्य नाही आणि ही परिस्थिती उघड्या डोळ्यांनी पाहिल्यावर ज्याचा स्वाभिमान जागृत झालेला आहे, ज्याला स्वावलंबनाचे महत्त्व कळले आहे अशा कोणाही मनुष्याला स्वतंत्र मतदारसंघाची मागणी करणे केवळ नाइलाजास्तव भाग पडले. हिंदू पुढाऱ्यांनी अस्पृश्य समाजाला स्वतःच्या स्वार्थाशिवाय आपल्या विश्वासात कधी घेतले नाही. मुसलमानांच्या राजकीय हक्कांचा प्रश्न उपस्थित होताच स्पृश्य हिंदूंचे धाबे दणाणले व त्यांना अस्पृश्यांविषयी वरपांगी पान्हा फुटला इतकेच. तेव्हा माझी माझ्या हिंदू पुढाऱ्यांना इतकीच विनंती आहे की, हिन्दू समाजाने कृतीने अस्पृश्य समाजाचा विश्वास संपादन करावा व मुसलमानांबरोबर व्यर्थ भांडण्यात आपल्या वेळेचा व शक्तीचा व्यय करू नये. ही सारी शक्ती आपल्या समाजाच्या सामाजिक सुधारणेकडे प्रामाणिकपणाने खर्च करावी. अशारीतीने जर

---

जनता : १५ जुलै १९३३.

भाषणाचे स्थळ आणि तारीख दर्शविलेली नाही.–संपादक.

हिंदू समाज आपला पुढील कार्यक्रम आखील तरच अस्पृश्य समाजाला हिंदू समाजाशी सहकार्य करून कार्य करण्याची उमेद प्राप्त होईल.

डॉ. आंबेडकर यांच्या भाषणानंतर डॉ. मुंजे यांचे भाषण झाले. त्यांनी डॉक्टरसाहेबांच्या भाषणाची संधी साधून डॉक्टरांना हिंदू महासभेचे अध्यक्ष होण्याची विनंती केली, परंतु डॉक्टर असल्या आमिषाला निष्कारण बळी पडणारे नाहीत ही गोष्ट डॉ. मुंजे यांनी पक्की लक्षात ठेवावी. म. गांधींशी सुध्दा कोणताही करार करताना डॉक्टरसाहेबांनी स्वतःच्या लौकिकाला व मानापमानाला महत्त्व दिलेले नाही. आपल्या समाजाच्या सर्वांगीण हिताला जे पोषक होईल तेच कार्य डॉक्टरसाहेब आजपर्यंत करीत आले आहेत, ही एकच गोष्ट हिंदू महासभावाल्यांनी लक्षात ठेवावी.



# ७५

# गुलाम म्हणून अपमान किती दिवस सहन करणार ?

शनिवार तारीख २९ सप्टेंबर १९३४ रोजी रात्रौ, मुंबईतील परळ पोयबावडी वरील कामगार मैदानावर पुणे कराराची स्मृती जागृत ठेवण्याकरता एक प्रचंड जाहीर सभा भरली होती. अस्पृश्य गणलेल्या समाजातील दहा हजारावर लोक या सभेत हजर होते. त्यावेळी अध्यक्ष या नात्याने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे मननीय व समाजात नवचैतन्य उत्पन्न करणारे असे भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

जवळ जवळ गेली दोन हजार वर्षे अस्पृश्य समाज हा देशातील समाजाचा अभिन्न असा एक घटक म्हणून कधीच समजला गेला नाही. एखादे राजकीय अगर सामाजिक कार्य उपस्थित झाल्यास त्या कार्यासंबंधी विचार करण्याची संधी अस्पृश्य समाजास कधीच मिळाली नव्हती. महाराष्ट्रातील राजकीय घडामोडींकडे लक्ष दिल्यास ब्राह्मण, कायस्थ, मराठे इत्यादी जातींकडे या गोष्टींचा विचार करण्याचा जणू मक्ताच दिला होता असे दिसते.

या कार्यात महाराची कामगिरी वर्दी देण्यापलिकडे म्हणजे जासूदगिरी-पेक्षा अधिक वरच्या दर्जाची कधीच नव्हती. इतर जातींना आमंत्रणे पोचती केल्यावर फार तर त्यांनी दरवाज्याबाहेर बसून अंतर्गृहात चाललेल्या गोष्टींचा कानोसा घ्यावा. आत काय विचार चालू आहे त्याची गंधवार्ताही त्यास नव्हती.

अस्पृश्य समाज जिवंत प्राण्यांचा बनलेला असून त्यांना इतर मानवजातीप्रमाणेच गरजा आहेत. मनुष्यमात्राला ज्याप्रमाणे सुखदुःखाच्या भावना आहेत त्याचप्रमाणे या समाजालाही भावना आहेत, ही कल्पनाही स्पृश्य समाजास कधी शिवली नाही व त्यामुळे अस्पृश्य समाजास देशातील सामाजिक काय किंवा राजकीय काय, कोणत्याच प्रकारच्या उलाढालीत वाव मिळाला नाही. पृथ्वीवरील कोणत्याच देशात न आढळणारी अशी विपरीत पध्दती हिंदुस्थानदेशात मात्र कित्येक शतके दृढमूल झाली होती. या कालात समाजशास्त्र्यांनी, राज्यकर्त्यांनी किंवा तत्त्वज्ञान्यांनी या समाजघातकी विचारसरणीस आळा घालून विचारास नवीन वळण लावण्याचा कधीच प्रयत्न केला नाही. याचा अनिष्ट परिणाम अस्पृश्य जनतेवर होऊन त्यांचे जीवन कष्टमय, स्वाभिमानशून्य व निष्प्रभ तर झालेच पण त्याची कडूफळे सर्व देशाला

---

जनता : २० ऑक्टोबर १९३४.

विशेषतः हिंदू समाजाला चाखावी लागली आहेत. आतामात्र मनु पालटला आहे. १९३० साली गोलमेज परिषदेला अस्पृश्य समाजाच्या प्रतिनिधीस हजर राहण्यास हिंदुस्थानच्या राज्यकर्त्यांकडून निमंत्रण आले. तो प्रसंग या बदललेल्या कालाचा प्रारंभ होय, असे मी समजतो. पूर्वकालीन हिंदू समाजाच्या अमदानीत जे घडले नाही, मोगल बादशाहीत जे घडू शकले नाही, मराठ्यांच्या हिंदवी स्वराज्यात जे घडले नाही ते विसाव्या शतकात घडून आले.

हिंदुस्थानच्या भावी राज्यव्यवस्थेसंबंधी भिन्न भिन्न समाजांशी विचारविनिमय करीत असताना अस्पृश्य समाज दूर ठेवणे म्हणजे तो विचारविनिमय अपुरा ठेवणे होय. तसेच या विचारविनिमयातून निघणारे निर्णय, अस्पृश्य समाजाची मते आजमावून त्यात त्यांच्या आकांक्षा समाविष्ट केल्याशिवाय ते निर्णय अपुरे राहतील असे राज्यकर्त्यांना वाटले. इतकेच नव्हे तर त्या निर्णयावर उभारलेल्या राज्यव्यवस्थेस खऱ्या लोकशाहीचे स्वरूप येणार नाही, ही जाणीव ब्रिटिश राज्यकर्त्यांस झाली; आणि त्यामुळे त्यांनी अस्पृश्यांच्या प्रतिनिधीस राऊंड टेबल कॉन्फरन्सला आमंत्रण केले. या आमंत्रणाच्या द्वारे अस्पृश्यांच्या प्रतिनिधीस इतिहासास माहीत नसलेल्या समानतेचा, उच्च मानल्या जाणाऱ्या इतर समाजाच्या तोलाचा मान मिळाला. सर्व देशाच्या हितसंबंधात अस्पृश्य समाजाचे हितसंबंध निगडित झाले असून त्यांच्या हक्कांचे रक्षण केल्याशिवाय देशाची प्रगती होणार नाही ही जाणीव या प्रसंगाने सर्व समाजास करून दिली व अस्पृश्यांच्या प्रतिनिधीस इतरांबरोबर देशाचे भवितव्य ठरविण्याची संधी मिळाली आणि याच पालटलेल्या मनुचा भरभक्कम पाया तयार करावा म्हणून तुमच्या प्रतिनिधींनी आपल्या भविष्यकाळातील उज्ज्वल इतिहासास आरंभ केला. हा आरंभ करणे मात्र त्यांना सोपे गेले नाही. त्यांना आपल्या समाजाचे हक्क प्रस्थापित करण्याकरिता इतरांशी अभूतपूर्व झगडा करणे प्राप्त झाले.

दुसऱ्या राऊंड टेबल कॉन्फरन्सपूर्वी जातीजातीतील तंट्याने सर्वजण हताश झाले होते आणि आम्ही सर्व महात्मा गांधींच्या आगमनाची वाट पाहात होतो. पक्षातीत गणलेले महात्मा गांधी हा तंटा सोडवितील असे सर्वांना वाटत होते. मी स्वतः न्याय्य हक्क कबूल केले जाऊन त्यांना पुढील राज्यकारभारात रीतसर वाव मिळेल अशी अपेक्षा करीत होतो. कोणाला एक एक पत्रावळ मिळेल, तर कोणाला दोन दोन पत्रावळी मिळतील. माझ्या समाजाच्या वाट्यास निदान एक द्रोण तरी येईल, अशी माझी समजूत होती पण ती आशा फोल ठरली.

'' मुसलमानांना मी हवे ते देईन, ख्रिश्चन समाजास मी जरूर ते देईन, युरोपियन किंवा अँग्लो इंडियनांचे हक्क मी मान्य करीन, शिखांस मी त्यांच्या मागण्या बहाल करीन, पण अस्पृश्य समाजाचे हक्क मी काडीइतकेही मान्य करणार नाही. '' असा रोखठोक जबाब मला महात्मा गांधीकडून मिळाला व मी विस्मित झालो. महात्मा गांधींच्या या कृतीस मला इतिहासात उदाहरण मिळत नाही पण महाभारतातील एका प्रमुख प्रसंगाची स्मृती झाल्याशिवाय राहात नाही. कौरव-पांडवांचे भांडण विकोपास न जाता सलोख्याने मिटावे व रक्तपात टाळावा या उद्देशाने श्रीकृष्णाने दुर्योधनाजवळ भारतीय युद्धापूर्वी शिष्टाई केली होती, हे आपणा सर्वांना माहीत आहे. त्यावेळी दुर्योधनाने ' पाच पांडवांना अर्धे राज्य काय पण पाच गावे देखील देण्यास आपण तयार नाही, इतकेच नव्हे तर सुईच्या अग्राएवढी देखील जमीन देण्यास मी तयार नाही ' असे स्पष्ट सांगितले. त्याचप्रकारचा जबाब मला मिळाला. यानंतरचा इतिहास आपणास विदितच आहे.

अस्पृश्य समाजाचे न्याय्य हक्क ब्रिटिश सरकारने मान्य करून त्या हक्कांच्या आधारे जातीय निर्णयात त्यांना स्थान दिले. हा निर्णय जाहीर होताच केलेल्या पापाचे क्षालन करण्याकरिता म्हणा अगर मनाची जळजळ शांत करण्याकरिता म्हणा किंवा त्यांच्या समजुतीने झालेल्या अन्यायाचे परिमार्जन करण्याकरिता म्हणा, महात्मा गांधींनी प्राणान्तिक उपवास केला व त्या उपवासाचा शेवट पुणे करारात झाला हे सर्वश्रुतच आहे. आणि त्याच कराराची स्मृती जागृत ठेवण्याकरिता आज आपण येथे जमलो आहोत.

या कराराच्या भवितव्याबद्दल काही जणांनी आज निराधार भीती दर्शविली व जातीय निर्णयावर अनेक बाजूंनी आघात होत असल्यामुळे सरकारने तो मागे घेतल्यास पुणे करारास बाध येईल किंवा काय अशी शंका प्रदर्शित केली. मी तुम्हाला निक्षून सांगतो की, ही शंका किंवा भीती अगदी निराधार आहे. तुम्हाला पुणे कराराबद्दल धास्ती बाळगण्याचे काहीच कारण नाही. राष्ट्रीय सभेने असे जाहीर केले आहे की व्हाईट पेपरचा इन्कार करून तो नष्ट केल्यास जातीय निर्णय देखील आपोआप नष्ट होतो. या वादात आपणाला शिरण्याचे कारण नाही. तुम्हाला भीती वाटत आहे ती ही की अशा रीतीने जातीय निर्णय नष्ट झाल्यास पुणे करार देखील नष्ट होईल. तार्किकदृष्ट्या किंवा कायद्याच्या दृष्टीने या प्रकाराची भीती बाळगण्याचे काहीच कारण नाही. ते कसे हे पहा. ब्रिटिश सरकारच्या जातीय निर्णयात कलम पाच मध्ये स्पष्टपणे असे

नमूद केले आहे की, ' जातीजातीत वाद सलोख्याने न मिटल्यामुळे हा जातीय निर्णय सरकारास देणे भाग पडले. म्हणजे हा वाद आपसात मिटला असता तर सरकारला निर्णय देणे जरूर पडले नसते आणि यदाकदाचित हिंदुस्थानात कोणत्याही जातीत यापुढे आपसात समजुतीने तडजोड झाल्यास ती सरकार जरूर मान्य करील. ' पुणे करार या प्रकारची तडजोड आहे व ती तडजोड सरकारने पूर्णांशाने मान्य केली आहे. जातीय निर्णयात फक्त प्रान्तिक कौन्सिलातील जागांची वाटणी समाविष्ट आहे. त्यात वरिष्ठ कायदे कौन्सिलातील जागांचा उल्लेख नाही. पुणे करारात या दोनही कौन्सिलातील जागांची वाटणी झाली आहे आणि सरकारतर्फे ज्या वेळेस पुणे करारास मान्यता मिळाली त्या वेळेस सरकारने कम्युनल अवॉर्ड (जातवार निवाडा) मधील प्रान्तिक कौन्सिलातील जागांची वाटणी बदलून पुणे करारातील प्रान्तिक जागांची वाटणी ग्राह्य धरली व वरिष्ठ कायदे कौन्सिलासंबंधी पुणे करारात समाविष्ट केलेले प्रमाण मान्य केले व त्याच तत्त्वानुसार पुढे व्हाईट पेपरमध्ये पुणे करारातील वरिष्ठ कौन्सिलातील जागांचे प्रमाण ठरविले. म्हणजे पुणे करारात झालेल्या हिंदू व अस्पृश्यांमध्ये तडजोडीचे तत्त्व सरकारच्या कम्युनल अवॉर्डच्या पाचव्या कलमानुसार मान्य केले व त्यावर आपले शिक्कामोर्तब मारले. या करारात कोणत्याही प्रकारचा बदल करणे झाल्यास तो सरकारला करता येणार नाही किंवा एकट्या हिंदूस करता येणार नाही. तो बदल हिंदू व अस्पृश्य यांनाच आपसातील परस्पर चर्चेने करण्याचा अधिकार आहे. अन्य कोणत्याही मार्गाने फरक होऊ शकत नाही आणि म्हणून तुम्हास याबाबतीत निःशंक राहाण्यास प्रत्यवाय नाही.

आता हिंदुंकडून कदाचित असे सांगण्यात येईल की ज्या वेळेस दोन पक्षात करार होतो त्यावेळेस कोणताही पक्ष संकटात असता कामा नये. महात्मा गांधींनी आपले प्राण पणास लावले व त्यामुळे अशी परिस्थिती उत्पन्न झाली की त्यांचे प्राण वाचविण्याची जबाबदारी माझ्यावर पडली, त्यावेळी सर्व हिंदू समाज माझ्यावर संतप्त झाला होता. मी नमते घेऊन त्वरेने कसातरी करार घडवून आणावा म्हणून चोहो बाजूने मला पेचात धरले होते. देशातील कित्येक तरुण माझा जीव घेण्यास सज्ज झाले होते. बंगाल्यातील अत्याचारी तरुणांकडून मला धमकीची पत्रे येत होती. कोणत्याही प्रकारे महात्मा गांधींच्या जीवितास अपाय झाल्यास मला त्याबद्दल जबाबदार धरून माझे प्राण धोक्यात तर येतीलच पण असहाय अशा सर्व अस्पृश्य समाजावर हिंदू समाजाकडून सूड घेतल्या जाईल,

हे भीषण चित्र माझ्या डोळयांपुढे होते. अशा मनःस्थितीत प्रतिपक्षाजवळ वाटाघाट करून मला करारावर सही करावी लागली. असे असता आपले प्राण संकटात होते, म्हणून करार मान्य करणे आपल्याला भाग पडले, असे म्हणण्याचा कुणालाही हक्क पोचत असेल तर कायद्याच्या दृष्टीने तो मला पोचत आहे, यात शंका नाही.

परंतु पुणे करारातील सर्व बाबी माझ्या मताप्रमाणे जरी घडून आल्या नसल्या तरी या प्रकारचा हक्क बजावण्यास मी तयार नाही. मी पुणे कराराच्या बाबतीत इमानी राहाणार आहे. अशा प्रकारे पुणे करार अभेद्य राखण्यास अस्पृश्य समाज तयार असला तरी सर्व हिंदू समाज तसेच वर्तन ठेवील असे म्हणवत नाही. आणि हिंदू समाजातील कित्येक जबाबदार पुढारी व संस्था यांच्या अलिकडच्या चळवळी पाहिल्या व उद्‌गार ऐकले तर हिंदू समाज पुणे करारास इमानी राहील किंवा नाही याची मला जबरदस्त शंका वाटते आणि याकरिता आपण जागरूक राहून आपल्याला मिळालेल्या हक्कांचे संरक्षण केले पाहिजे.

आजच्या काही वक्त्यांनी पुणे करारास गांधी-आंबेडकर या नावाने संबोधिले. पण ते चुकीचे आहे. या करारावर महात्मा गांधी यांची सही नाही. महात्मा गांधी हे हिंदुंचे पुढारी गणले जात नाहीत. हिंदू समाजाचे खरे पुढारी पं. मदन मोहन मालवीय हे आहेत आणि त्यांच्याच नेतृत्वाखाली अखिल भारतीय हिंदू समाजाचे पुढारी म्हणून त्या वेळच्या सर्व वाटाघाटी चालू होत्या आणि या नात्यानेच करारावर पहिली सही पं. मदन मोहन मालवीय यांची आहे. आपल्या सर्वमान्य पुढाऱ्याच्या शब्दांची हिंदू समाजाला चाड नसेल तर त्या समाजासारखा कृतघ्न व निर्लज्ज दुसरा समाज नाही, असे म्हणावे लागेल, पण मला आशा आहे की, हिंदू पुढारी आपल्या शब्दास जागतील.

अस्पृश्य समाजास आपल्या शब्दांची चाड आहे. हेच जाहीर करण्याकरिता तुम्ही आज येथे जमला आहात, असे मी समजतो. परंतु याच वेळी मी तुम्हास हे सांगू इच्छितो की गेल्या वर्षापासून पुणे करार दिन पाळण्याची जी तुम्ही प्रथा पाडली आहे ती एक केवळ प्रथा म्हणूनच तुम्ही समजता कामा नये. एक दिवस एके ठिकाणी जमून इतर वार्षिक उत्सवाप्रमाणे हा उत्सव साजरा करण्याचा, ५-२ वक्त्यांची भाषणे करावयाची व आपण कृत-कृत्य झालो म्हणून समजावयाचे इतक्या साध्या किंवा इतक्या हीन दर्जाचा हा दिन नव्हे. पुणे करार हा अस्पृश्यांच्या इतिहासात एक चिरस्मरणीय असा प्रसंग आहे. या कराराच्या द्वारे आपल्या समाजाने बेदरकार हिंदू समाजास आपले राजकीय अस्तित्व कबूल करण्यास भाग पाडले आहे. याकरिता तो आपला राजकीय दिन म्हणून आपण पाळला पाहिजे. पुणे करारान्वये आपल्या समाजास मिळालेले अधिकार आपण योग्य रीतीने उपयोगात आणतो की नाही, हे पाहाण्याकरिता आपण या दिवशी जमले पाहिजे.

मुंबई प्रांताकरिता तुम्हास १५ जागा अडविण्याकरिता उभे राहणारे उमेदवार आपल्या समाजाचे खरे प्रतिनिधी आहेत किंवा नाहीत हे पाहून आपण त्यांची निवड करावयास हवी. या १५ प्रतिनिधींपैकी जर ५ भांडवलदारांच्या हाती गेले, ५ हिंदू समाजाचे हस्तक बनले तर राहिलेल्या पाचांचा काय उपयोग आहे ? याकरिता या १५ प्रतिनिधींच्या बाबतीत तुम्ही दक्ष राहिले पाहिजे, तरच मिळालेल्या हक्कांची सांगता होईल व अस्पृश्य समाजाचे पाऊल पुढे पडेल.

पुढील काळात प्रत्येकाने कर्तबगार बनण्याचा प्रयत्न केला पाहिजे. बापाच्या नावावर खपण्याची हाव सोडून मी स्वतः काहीतरी करून दाखवीन अशी महत्त्वाकांक्षा मनात स्मरण केली पाहिजे. याबाबतीत मला एक साधा दृष्टांत द्यावासा वाटतो. एका सुभेदाराच्या मुलाची गोष्ट माझ्या पाहण्यात आहे. या गृहस्थाचा नेहमी असा अट्टाहास असे की लोकांनी आपल्यास, बापाप्रमाणेच सुभेदार म्हणावे. याकरता आपल्या खोलीच्या दारावरील नावाच्या पाटीवर देखील सुभेदार ही पदवी तो लावीत असे. सुभेदार म्हणून जर कोणी बोलविले तरच आपण तेथे जावयाचे असे त्याचे वर्तन असे. अर्थातच मिलिटरीमधील ही मानाची पदवी त्याच्या बापाची असून ती या मुलाने कमविलेली नाही हे जाणून लोक सुभेदार ही पदवी त्यास बहाल करण्यास तयार झाले नाहीत. या इसमाने कोणत्याही प्रकारे आपली लायकी वाढविण्याचा प्रयत्न केला नाही व आपल्या मूर्खपणाचे केवळ प्रदर्शन करून तो लोकांच्या उपहासास मात्र पात्र झाला. करिता भूतकालीन मोठेपणाचा वृथा अभिमान बाळगणे हे व्यर्थ आहे. अंगी मोठेपणा आणण्यास मनुष्याने स्वतःच झटले पाहिजे. बापाचे मोठेपण मुलाच्या कामी येणार नाही. आणि ही योग्यता अंगी आणण्याकरिता शिक्षण संपादन करण्यासारखा दुसरा उपाय नाही.

आपल्यातील शिक्षणाच्या अभावी उच्च दर्जाच्या नोकऱ्या तुम्हास कशा संपादन करता येतील? सरकारने एक नुकतेच पत्रक काढून मुसलमान समाजाकरिता निरनिराळया खात्यात जागा राखून ठेवल्याचे जाहीर केले आहे. त्या जागा भरण्याकरिता लायक माणसांची निवड करण्यास मुसलमान समाजात वाव आहे. अस्पृश्य समाजाकरता अशा प्रकारची व्यवस्था करण्याची सरकारची तयारी असली तरी त्या जागा भरण्याकरिता लायक माणसे आपल्या समाजात कशी मिळणार ? तुमच्या समाजाकरिता नोकऱ्या राखावयास पाहिजे, पण तुमची लोकसंख्या जरी मोठी असली तरी त्यात सुशिक्षित माणसांचा अभाव असल्याकारणाने तशी व्यवस्था करता येणे शक्य नाही, असा सरकारने जबाब दिल्यास आपण काय सांगणार ? तरी उच्च दर्जाच्या नोकऱ्या मिळवून समाजात आपली प्रतिष्ठा वाढवावयाची असेल तर आपल्या मुलास योग्य ते शिक्षण देणे हे प्रत्येक व्यक्तिचे काम आहे.

शाळेतील या शिक्षणाबरोबरच देशातील चाललेल्या हालचालीचे शिक्षण घेणे तितकेच महत्त्वाचे आहे. सध्याचा काळ म्हणजे आपल्या समाजाचा संक्रमणाचा काळ आहे. पूर्वीच्या मनूतून नव्या मनूमध्ये अस्पृश्य समाज प्रवेश करीत आहे. अशा महत्त्वाच्या काळात आपण डोळयात तेल घालून जागले पाहिजे. निरनिराळ्या ठिकाणी काय चालले आहे, आपल्या उन्नतीच्या मार्गात किंवा आपण आखलेल्या प्रगतीच्या मार्गात कोण आड येत आहे, आपल्या समाजातल्या प्रतिपक्षाच्या हालचाली काय आहेत, नाशिकाला काय चालले आहे, नागपुरात काय घडत आहे किंवा कोकणात काय प्रकार चालला आहे, याचे यथार्थ ज्ञान होऊन आपणा सर्वांत एक संवेदना उत्पन्न झाली पाहिजे व त्याप्रमाणे उपाययोजना आपण केली पाहिजे आणि हे घडणे आपल्या समाजाचे एक जोरकस व स्वतंत्र वृत्तीचे व स्वावलंबी वर्तमानपत्र असल्याशिवाय होणार नाही. या कार्याकडे तुमच्यापैकी प्रत्येकाने आपले लक्ष पुरवून आपले वर्तमान-पत्र जिवंत ठेवणे हे पवित्र कर्तव्य आहे, असे समजले पाहिजे. आणि या शैक्षणिक कार्यात आपण एक गोष्ट नेहमी लक्षात ठेवली पाहिजे की त्यात परावलंबनाचा लवलेशही असता कामा नये.

अस्पृश्य समाजातील मुलांमुलींस शिष्यवृत्त्या देण्याबद्दल हल्ली जिकडे तिकडे घोषणा चालू आहे. परंतु मला मोठी भीती वाटते की, स्पृश्य वर्गाकडून येणाऱ्या पैशाच्या प्रवाहाने गुलामवृत्ती बळावल्याशिवाय राहणार नाही. शिष्यवृत्ती स्वीकारणारी कच्च्या दिलाची मुले शिष्यवृत्ती देणाऱ्या वर्गाचे दास बनल्याशिवाय राहणार नाहीत. मनुष्यप्राणी पैशाचा दास बनतो. महाभारतातील गोष्ट घ्या. भीष्माचार्यासारख्या सत्यनिष्ठ पुरूषास माहीत होते की कौरवांचा पक्ष न्यायाचा नाही. पांडवांच्या मागण्या सर्वस्वी न्याय्य आहेत तरी देखील पांडवांच्या वनवासात कौरवांच्या पदरी राहून त्यांचे अन्न खाल्ल्यामुळे भीष्मास कौरवांचा पक्ष सोडता येईना व ते पांडवांचा नाश करण्यास सज्ज झाले.

लॉर्ड लोथिअनच्या अध्यक्षतेखाली फ्रॅंचाइज कमिटीवर काम करीत असता आम्ही पंजाबात गेलो होतो. अस्पृश्य समाजातर्फे साक्षी देण्याकरिता काही सुशिक्षित गृहस्थ पंजाबात आहेत का अशी चौकशी करता कॉलेजात शिक्षण घेत असलेली काही मुलें मला आढळली. ती मुले आर्य समाजाने चालविलेल्या वसतिगृहात राहत असून त्या समाजाच्या खर्चाने त्यांचे शिक्षण चालू होते. त्या मुलांनी मला सांगितले की आर्य समाजाकडून आपल्यास असे स्पष्ट बजावण्यात आले होते की, समाज सांगेल त्याचप्रमाणे त्यांनी साक्ष न दिल्यास वसतिगृहातून त्यांची हकालपट्टी होईल व शिक्षणाकरिता त्यास मिळणारी मदत एकदम बंद

करण्यात येईल. या धमकीने अर्थातच ते हतबुध्द झाले व त्यांचे खरे हृद्गत कमिटीच्या दप्तरात मला नमूद करून घेता आले नाही. तेव्हा ज्या लोकांपासून आपणास आपले हिरावले हक्क परत मिळवावयाचे आहेत त्यांच्या मदतीची अपेक्षा करणे धोक्याचे आहे, हे तुम्हास कळून येईल.

शेवटी एक महत्त्वाची गोष्ट तुम्हास मला सांगावयाची आहे. महात्मा गांधींपाशी अस्पृश्यता निवारणाबद्दल ज्यावेळेस माझे बोलणे झाले त्यावेळेस त्यांनी मला सांगितले की अस्पृश्यता हिंदू समाजात कित्येक शतके घट्ट मूळ धरून बसल्यामुळे एकदम नष्ट होणे शक्य नाही व याकरिता तुम्ही हिंदू समाजास अवसर द्या. कित्येक शतकांची चाल एकाएकी नाहीशी होणे शक्य नाही. ही गोष्ट अगदी खरी आहे. ती नाहीशी करण्याकरिता अव्याहत प्रयत्न चालू ठेवला पाहिजे हेही मला कबूल आहे. पण ती चाल नष्ट करणे म्हणजे काय हे आपण पाहिले पाहिजे. महात्मा गांधींनी मंदीर प्रवेशाची चळवळ हाती घेतली त्यावेळेस ते असे म्हणाले की, अस्पृश्यांचा मंदिरात शिरकाव करून घेणे हे ध्येय ठेवून हिंदू धर्मातील अत्यंत पवित्र अशा ठिकाणी त्यांचा रिघाव करून घेतल्यास, अस्पृश्यता नष्ट होईल व आज विहिरी, तळी, शाळा इत्यादि स्थळांसारखी देवालयापेक्षा कमी दर्जाची जी स्थळे आहेत ती अस्पृश्यांस मग आपोआप मोकळी होतील. या त्यांच्या विचारसरणीचा मतितार्थ असा की, अस्पृश्यतेच्या वर्मावर घाव घालावयाचा व त्यायोगे अस्पृश्यतेची मगरमिठी सैल करावयाची. त्यांच्या दृष्टीने मंदीर प्रवेश ही पहिली व शेवटची पायरी होय. मला ही विचारसरणी संमत नाही. माझे असे ठाम मत आहे की, अस्पृश्यता ही चातुर्वर्ण्य कल्पनेवर उभारलेली इमारत आहे. हिंदू समाजातील जातीभेद हे त्याचे प्रतिबिंब आहे. हिंदू समाजास ग्रासून टाकणाऱ्या या कल्पनेस मूठमाती देऊन समाजातील प्रत्येक व्यक्तीस आपल्या बुद्धीचा विकास करण्याची संधी दिल्याशिवाय किंवा जातीभेदाच्या कल्पनेस मुळातच विरोध केल्याशिवाय हिंदू समाजाची सर्वांगीण सुधारणा होणार नाही. अस्पृश्यतेचे मूळ वरपांगी दिसणाऱ्या हिंदू समाज रचनेच्या पृष्ठभागावरच पसरलेले नसून ते जातीभेदाच्या कल्पनेत खोल गेले असून तेथे दृढ झालेले आहे. आणि अस्पृश्यता समूळ नष्ट करावयाची असेल तर जातीभेदांचे हे मूळ आज सुधारकांनी उखडून काढले पाहिजे. आता हे कार्य अवघड आहे व ते पार पाडण्यास अवधी लागेल हे न समजण्याइतके बुद्धिमांद्य माझ्या ठिकाणी नाही. मी इतकेच म्हणतो की, हे ध्येय मानून किंवा हे तत्त्व मान्य करून तुम्हास जे जरूर वाटतील ते प्रयत्न करा. तपशीलाबद्दल माझे विशेष म्हणणे नाही. तो निरनिराळ्या ठिकाणी, निरनिराळ्या काळी व निरनिराळ्या समाजात भिन्न भिन्न असू शकेल, पण खेदाची गोष्ट ही की ते तत्त्वच मुळी हिंदू समाजास मान्य नाही. नाईलाज आहे.

हिंदू धर्मातील अगदी निकृष्ट स्थितीत असलेल्या समाजाने आपल्यावर कोणता जुलूम होतो हे जाणून त्यातून मुक्त होण्याकरिता आपल्यास काय हवे आहे हे स्वयंनिर्णयाच्या न्यायाने ठरविण्याचा अधिकार अस्पृश्य समाजासच असला पाहिजे ; पण हिंदू समाज ही साधी गोष्टही मान्य करण्यास तयार नाही. अस्पृश्य समाजास आजपर्यंत गुलामगिरीत ठेवून त्यांनी भविष्यकाळी कोणत्या स्थितीत राहावे हे ठरविण्याचा अधिकार हिंदू समाज आपल्या हातात ठेवू पाहात आहे. राजकीय क्षेत्रात डोमिनिअन स्टेटस म्हणजे वसाहतींचे स्वराज्य हे ध्येय ठेवून राजकीय अधिकार हप्त्याहप्त्याने हिंदुस्थानातील लोक घेत आहेत. तद्वतच अस्पृश्य समाज आज आपले एक ध्येय ठरवून ते हप्त्याहप्त्याने घेण्यास आपण तयार आहो असे सांगत आहे. ब्रिटिश सरकारने हिंदुस्थानास डोमिनिअन स्टेटस देऊन त्यास आपल्या बरोबरीच्या नात्याने वागविण्याचे आपले ध्येय आहे असे कबूल केले आहे ; पण हिंदू समाज मनाचा एवढा दिलदारपणाही दाखविण्यास तयार नाही. इतकेच नव्हे तर अस्पृश्य समाजास आपला म्हणण्याची देखील त्यांची तयारी नाही.

महात्मा गांधींच्या प्राणान्तिक उपासानंतर वरिष्ठ कायदे कौन्सिलात एका हिंदुने मंदीर प्रवेशाचे बिल आणले होते. हिंदू समाजास अस्पृश्यांबद्दल प्रेमाचा पाझर फुटला आहे असा म. गांधींच्या उपवासानंतर जिकडे तिकडे बोलबाला झाला होता. मंदीर प्रवेशाचे बिल बिनाविरोध पास होईल अशी बढाईही मारण्यात येत होती. या बिलापासून आपली उन्नती जवळ येईल अशी आशा बाळगण्याजोगे त्या बिलात काहीच नसल्यामुळे त्या बिलाच्या भवितव्यतेबद्दल अर्थातच अस्पृश्य समाज बेफिकीर होता. हिंदुंच्या देवालयाबद्दल हे बिल असल्यामुळे अस्पृश्य समाजास त्यात लुडबूड करण्याचे काहीच कारण नव्हते व त्यामुळेच हे बिल कायदेमंडळासमोर असताना ते गाडले गेल्यानंतरही त्या बिलाची विचारपूस त्यांनी केली नाही. बिल पास झाले असते तर अस्पृश्य समाजास आनंदाच्या उकळया फुटल्या नसत्या आणि ते मागे घेतले गेले म्हणून त्यांना खिन्नता वाटली नाही. तुमच्या मंदिराबद्दल तुम्ही पाहून घ्या. देवालयासारखी धार्मिक ठिकाणे अस्पृश्यांस खुली करून त्यांचे प्रेम संपादन करून अगर ती बंद करून त्यात प्रवेश करण्याचा अस्पृश्यांस मज्जाव करणे हे हिंदू समाजाचे काम आहे. आमचे नव्हे. पण इतका शहाणपणा दाखविला तर तो हिंदू धर्म कसला ! शेवटी व्हायचे तेच झाले ! बिलास पुरेशी मते न पडून ते नापास झाले असे नाही तर सर्व हिंदू समाजाने त्यास असा कडक विरोध केला की बिलाचे जनकच ते वादविवादाकरिताही पुढे आणण्यास धजले नाहीत. ते बिल काखेत मारून रंगा आयरना मागे पळ काढावा लागला. आपण हिंदू समाजास आपले हृद्गत खुले करण्यास पूर्ण मुभा दिली व आपण तटस्थ वृत्ती धारण केली.

आता मात्र आपण या बिलाच्या मृत्यूवरून बोध घेतला पाहिजे. हिंदू समाजाचे मनोगत आपणास कळले आहे. तो अस्पृश्य समाजास आपला म्हणावयास तयार नाही हे आपल्याला स्पष्टपणे कळले आहे. अशारितीने हिंदुंनी तुम्हाला लाथाडल्यावर तुम्ही हिंदुंचा कासोटा किती दिवस धरून चालणार ? अस्पृश्यांस हिंदू समाजशरीराचा एक अभिन्न अवयव म्हणून समजण्यास आज कोणी तयार नाही. पायातील वहाणेचा जरूर तितका उपयोग करून घेऊन मनुष्य तीस घराच्या बाहेर ठेवतो व जरूर नसल्यास ती फेकून देतो. आज हिंदू लोक तुमची पायातील वहाणेपेक्षा अधिक किंमत समजत नाही. तुम्हाला गुलाम म्हणूनच वागवावयाचा त्यांचा कृतनिश्चय आहे. असे असता हा अपमान तुम्ही किती दिवस सहन करणार ? तुम्ही दुसऱ्यांचे गुलाम म्हणून किती दिवस राहणार ? आजची परिस्थिती तुमच्या स्वाभिमानास पोषक आहे का ? स्वाभिमानरहित गुलाम आपली स्वतःची किंवा देशाची कधीतरी उन्नती करू शकला आहे काय ? या प्रश्नाचा तुम्ही नीट विचार करा. आपल्यास हिंदू म्हणवून घेऊन दुसऱ्यांचे गुलामच तुम्ही राहू इच्छिता काय ? या प्रश्नांचा विचार करता हिंदू म्हणवून घेण्यास माझी तरी मनोदेवता सांगत नाही.

मी आज दोन वर्षे या प्रश्नाचा खोल विचार करीत आहे आणि माझी पूर्ण खात्री झाली आहे की, माझा स्वाभिमान जागृत ठेवावयाचा असेल, मला समतेच्या वातावरणात वागावयाचे असेल तर मला हिंदू म्हणवून घेता येणार नाही. मी हिंदू नाही तर मी स्वतःला काय म्हणवून घेईन. ख्रिश्चन म्हणेन किंवा मुसलमान म्हणेन किंवा बुद्धधर्मीय म्हणेन हे मी आज सांगत नाही. आतापर्यंत हिंदू राहिलो, तुमच्याबरोबर राहिलो केवळ तुमच्याच करिता, तुमच्या अशिक्षिततेमुळे तुम्हास सोडून जाणे म्हणजे तुम्हास आंधळे करणे, हे जाणूनच मी आजपर्यंत तुमचे बरोबर राहिलो. परंतु लवकरच आपण या गोष्टीची शहानिशा करू व जे काय करावयाचे ते सर्वजण एकदम करू. कड्यावरून उडी टाकणे झाल्यास सर्वजण एकदम उडी टाकू. सध्या तुम्ही आपल्या मनाशी हिंदुंचे आपल्याशी कोणत्या प्रकारचे वर्तन आहे याची खूणगाठ बांधून ठेवा.

शेवटी आपण आज या ठिकाणी माझे हृद्‌गत बोलून दाखविण्यास संधी दिली याबद्दल आपणा सर्वांचे आभार मानून मी आपणा सर्वांची रजा घेतो.



# ७६

# पैशाचा विनियोग
# गरीब विद्यार्थ्यांच्या शिक्षणावर करणे हिताचे

मोटार ड्रायव्हर अस्पृश्य सेवक संघाचा प्रथम वार्षिकोत्सव शनिवार ता. ३०* सप्टेंबर १९३४ रोजी मुंबईतील परळ दामोदर हॉलमध्ये डॉ. पी. जी. सोळंकीसाहेब यांच्या अध्यक्षतेखाली यशस्वीरीतीने पार पडला. यावेळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर, रा. ब. बोले वगैरे मंडळी प्रामुख्याने हजर होती. स्वागतपर पद व अध्यक्षांची निवड झाल्यावर संघाचे अध्यक्ष श्री. मारुतीराव घमरे यांनी रिपोर्ट वाचन करून संस्थेविषयी छोटेसे भाषण केले. यानंतर रा. ब. बोले यांचे भाषण झाले. यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना भाषण करण्यास अध्यक्षांनी विनंती केली. या विनंतीवरून ते बोलावयास उभे राहिले.

त्यांनी आपल्या भाषणात संघाच्या कार्याविषयी संतोष व्यक्त केला. संघाच्या आवश्यकतेबद्दल विस्तृत असे भाषण करताना ड्रायव्हर लोकांना कळकळीचा उपदेश केला. आपणास कराव्या लागणाऱ्या पैशाचा विनियोग अनाठायी करण्यापेक्षा स्वतःच्या कुटुंबाच्या पोषणाकडे, समाजाकडे व विशेषतः गरीब विद्यार्थ्यांच्या शिक्षणाकडे करणे खरे हिताचे ठरेल. तसेच अनीती किंवा दुर्व्यसनाचा फैलाव न होण्याकडे सर्वांनी विशेष लक्ष पुरवावे. आपल्याला संघटनेशिवाय समाजहितासारखे बिकट कार्य पार पाडणे शक्य नसते. वाडवडिलांच्या नावलौकिकावर विकून घेऊन त्यांच्या नावाच्या बळावर आपण स्वतःला विकून घेण्यात काय अर्थ आहे. तरी माझ्या बांधवांनी उद्योगधंद्यामध्ये मिळणाऱ्या पैशाचा सदुपयोग करण्याकडे विशेष लक्ष पुरवावे अशी आशा प्रदर्शित करतो. डॉ. बाबासाहेबांचे भाषण झाल्यावर इतर वक्त्यांची भाषणे झाली. अध्यक्ष डॉ. सोळंकीसाहेबांचे फार मननीय व परिणामकारक असे भाषण झाले.

यानंतर कलेमध्ये अपूर्व कौशल्य दाखविल्याबद्दल गंगाराम रघुनाथ व समाजकार्य करून वेळोवेळी ऋणी केल्याबद्दल श्री. साबाजी मिरके यांना अनुक्रमे रौप्य पदके व पुष्पहार डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्याद्वारे अर्पण करण्यात आले. या समारंभात सर्वश्री बापूसाहेब सहस्त्रबुद्धे, शिवतरकर, उपशाम, भातनकर वगैरे मंडळींची प्रसंगानुसार भाषणे झाली. शेवटी आभार प्रदर्शन, निवडक निमंत्रित मंडळींना अल्पहार झाल्यावर हा समारंभ संपविण्यात आला.



---

जनता : २० आक्टोबर १९३४.

* तारीख २९ सप्टेंबर १९३४ असावी.–संपादक.

## ७७

# अस्पृश्य हिंदू म्हणून जन्माला आलो, पण हिंदू म्हणून मी मरणार नाही

' शनिवार ता. १२ ऑक्टोबर १९३५ ला डॉ. बाबासाहेब आंबेडकर नाशिकला गेले, तेव्हा सकाळी ११ वाजता त्यांना स्टेशनपासून गावात मोठ्या थाटाने मिरवत नेण्यात आले. विदगाव, नाशिक रोड वगैरे ठिकाणी त्यांना मेजवानी दिल्या. नाशिक रोड येथे त्यांच्या नावे एक वाचनालय सुरू केले होते, त्याच्यासाठी एक पत्र्याची शेड बांधली होती. तिचे उद्‌घाटन बाबासाहेबांच्या हस्ते झाले. त्यावेळी भाषण करताना त्यांनी जनतेला उपदेश केला की,

तुम्ही स्वावलंबी व्हा. स्वतःच्या पायावर उभे राहून आपल्या प्रगतीचे कार्य करा. माझे बरे वाईट झाले तर माझ्यामागे चळवळ चालविण्यास लोक तयार झाले पाहिजेत. रात्रौ नऊ वाजता रविवार पेठ, हिरालाल गल्ली येथे सहभोजन झाले. त्यात देशपांडे हे एकच काँग्रेसमन होते. रविवारी ता. १३ ऑक्टोबरला बाबासाहेब नाशिकहून विंचूरला गेले. मार्गावरील गावातून त्यांना अनेक ठिकाणी हारतुरे देण्यात आले. विंचूर येथे स्पृश्य वर्गातर्फेही त्यांना चहापार्टी देण्यात आली. सकाळी ते येवले म्युनिसीपालिटीचे मानपत्र स्वीकारण्यास गेले. मानपत्राला उत्तर देताना ते म्हणाले की, आमच्या चळवळीमुळे स्पृश्य वर्गीयांच्या दृष्टिकोनात वदल घडेल व ते आमच्याशी आपुलकीने वागण्यास तयार होतील, असे दिसत नाही ! तेव्हा आम्ही हिंदूंमधून दूर राहून स्वावलंबनाने आमच्या प्रगतीसाठी झगडत राहू.

दिनांक १३ ऑक्टोबर १९३५ ला येवले (नाशिक) येथे मुंबई इलाखा दलित वर्गीय परिषद भरली. परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. अमृतराव रणखांबे होते. परिषदेची सुरवात रात्रौ १० वाजता झाली. परिषदेला सुमारे दहा हजार जनसमुदाय होता. स्वागताध्यक्षांचे भाषण झाल्यानंतर परिषदेचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी अस्पृश्यांनी धर्मांतर करावे, अशी घोषणा करणारे भाषण केले. ' [१]

---

१. डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड ६ वा, पृष्ठ ८४, ८५.

' येवले येथे ता. १३ ऑक्टोबर १९३५ रोजी भरलेल्या मुंबई इलाखा परिषदेपुढे अध्यक्षस्थानावरून भाषण करताना डॉ. आंबेडकर यांनी सवर्ण हिंदुंच्या जाचातून मुक्तता करून घेण्यासाठी अस्पृश्यांना धर्मांतराचा जो निर्वाणीचा मार्ग सुचविला तो पाहून प्रत्येक हिंदू अंतःकरण हालून गेल्याशिवाय खचित राहिले नसेल. केवळ अध्यक्षीय भाषणातच ह्या मार्गाचा पुरस्कार झालेला नाही, तर सदर परिषदेनेही, हिंदू धर्मातील अस्पृश्य गणलेल्या वर्गाने हिंदू धर्माचा त्याग करून ज्या धर्मात समानतेचे हक्क मिळतील त्या धर्मात प्रवेश करण्याविषयीचाही ठराव मंजूर करून घेऊन आपल्या अध्यक्षांचा सल्ला अनुसरण्याचे जाहीर केले. हिंदू धर्मातील ज्या अन्यायामुळे डॉ. आंबेडकरांसारख्या व्यक्तीलादेखील धर्मांतर करण्यास उद्युक्त होण्याची प्रवृत्ती झाली, त्या अन्यायाच्या व हे अन्याय होण्यास कारणीभूत होत असलेल्या सनातनी म्हणविणाऱ्या लोकांच्या माणुसकीला मुकलेल्या खुनशी वृत्तीचाही त्याचवेळी विचार होणे अवश्य आहे. डॉ. आंबेडकरांच्या ह्या कृत्याचे पातक त्यांच्यापेक्षा ह्या सनातन्यांच्या शिरावर आहे हे मुळीच विसरून चालणार नाही. डॉ. आंबेडकरांनी आपल्या भाषणात अस्पृश्यांचा हिंदूधर्मात किती अमानुषपणे छळ होत आहे ; आणि ह्या छळातून मुक्तता करून घेण्याचे आतापर्यंत त्यांचे प्रयत्न सवर्ण हिंदूंच्या असहिष्णू वृत्तीमुळे कसे फशी पाडले गेले आहेत, याचा समग्र पाढा आपला उपर्युक्त निर्णय जाहीर करण्यापूर्वी स्पष्टपणे वाचून दाखविला आहे. सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक, राजकीय या प्रत्येक बाबतीत दलित वर्गाची कुचंबणा होत आहे. हिंदू धर्माच्या दडपणाखाली मनुष्यत्वाचे साधे हक्क सुद्धा संपादन करणे अशक्य झाले आहे, त्यासाठी आजपर्यंत केलेला पराकोटीचा स्वार्थत्याग व्यर्थच ठरला आहे. गेल्या पाच वर्षात नाशिकच्या काळया रामाच्या देवळात प्रवेश मिळवून त्या योगाने हिंदू समाजात आपला समान हक्क व दर्जा मान्य करून घेण्यासाठी त्यांनी केलेले प्रयत्न, तसेच सत्याग्रहाचा उपाय उच्चवर्णीय हिंदुंची मने वळविण्यास निरुपयोगी ठरला. या साऱ्या गोष्टींचा निर्देश करून डॉ. आंबेडकर पुढे म्हणतात,

साधे मूलभूत हक्क आम्हाला लाभू देण्यासाठी ' स्पृश्य ' म्हणून गणल्या गेलेल्या हिंदू लोकांची मनधरणी करण्याच्या निरर्थक प्रयत्नात जे काही थोडेसे द्रव्यसाधन आम्ही जमा केले होते तेही खर्ची घालून बसलो. त्यांच्याकडून झालेली कल्पनातीत मानखंडनाही आम्ही सहन केली, पण हा सारा स्वार्थत्याग निष्फळच ठरला. निमूटपणे व धिम्मेपणे आजपर्यंत आम्ही जे जे हाल सहन केले, त्याचा यत्किंचितही परिणाम ह्या हिंदू लोकांच्या अंतःकरणावर झालेला दिसून आला नाही. आम्ही दुसऱ्या धर्माचे अनुयायी असतो आणि त्यावेळीही आताचेच आमचे उदरनिर्वाहाचे उद्योगधंदे आम्ही पत्करीत असतो तर ह्या हिंदू लोकांना आम्हाला आताप्रमाणे अपमानकारक रीतीने जगविण्याचा किंचितही धीर करवला असता का ?

हिंदू धर्मात जन्म घेतल्याचा आम्हाला लागलेला हा डागच आमच्या प्रगतीच्या आड येत आहे, आमच्या साऱ्या मानहानीचे, सवर्ण हिंदुंच्या आमच्या बाबतीत तुच्छतापर वर्तनाचे तेच एक कारण आहे. असे जर आहे, तर त्या धर्माच्या नावाचा केवळ शिक्का घेऊन बसण्यात काय अर्थ आहे ? ज्याप्रमाणे आम्हाला मनुष्याच्या मोलाने राहता येण्यात सुद्धा मज्जाव केला जात आहे, त्या हिंदू धर्माच्या कलशाचा एक भाग होऊन आम्ही का म्हणून आयुष्य घालवावे ? अशा स्थितीत राहाण्यापेक्षा या धर्मातून बाहेर पडून दुसऱ्या एखाद्या धर्माचा, ज्यामध्ये आपल्याला आज ही मानखंडना सहन करण्याचा प्रसंग येणार नाही, हलक्या नीच दर्जाने वावरण्याची सवय होणार नाही, त्या धर्माचा अंगीकार करणे उचितच नाही का ?

अस्पृश्यांनी हिंदू धर्माचा त्याग केल्यानंतर कोणता धर्म स्वीकारावयाचा हे प्रत्येकाच्या मर्जीवर अवलंबून आहे. फक्त समानतेचे हक्क मिळतील असाच धर्म त्यांनी स्वीकारावा.

दुर्दैवाने अस्पृश्य हिंदू असा डाग घेऊन मी जन्माला आलो, पण ती गोष्ट माझ्या स्वाधीन नव्हती. तथापि, हा नीच दर्जा झुगारून देऊन ही स्थिती सुधारणे मला शक्य आहे आणि ते मी करणारच याबद्दल मुळीच संशय नको. मी तुम्हाला स्पष्टपणे सांगतो की, हिंदू म्हणवून घेत मी मरणार नाही.

हिंदू धर्मात आपला समान दर्जा प्रस्थापित करण्यासाठी सत्याग्रहाच्या मार्गाने जाऊन काही मिळणार नाही. त्या मार्गाची आता आवश्यकताही नाही, आपला समाज आता हिंदूधर्मापासून विलग व स्वतंत्र असा मानला पाहिजे, अर्थातच नागरिकत्वाच्या व राजकीय हक्कासाठी आपला झगडा पुढे चालू ठेवणे आवश्यकच आहे आणि याकरिता आपले आपसातले मतभेद, अंतस्थ कलह विसरून जाऊन एकजुटीने संघटीतपणे आपले ध्येय गाठण्याचा प्रयत्न करणे हेच आपले आजचे कार्य होय.

नव्या घटनेत दलित वर्गाने आपले हक्क जोराने पुढे मांडण्यासाठी खरे कळकळीचे प्रतिनिधी निवडणे जरुर आहे. हिंदू धर्माच्या शृंखलांनी जखडून न राहता स्वतंत्रपणे आपले कर्तव्य ठरविण्याची आपली मनापासून इच्छा आहे, हे दलित वर्गाने जगाला स्पष्ट दाखवून द्यावे. एवढीच माझी त्यांना विनंती आहे. '[१]

---

[१] विविध वृत्त : २० ऑक्टोबर १९३५.

या भाषणाला पाठिंबा देण्याचा ठराव बाबासाहेबांनी मांडला आणि तो मंजूर करण्यात आला. तो ठराव स्वतः बाबासाहेबांनी लिहून आणलेला होता.[1]

येवला परिषदेचा ठराव.––

'' अस्पृश्य मानलेले वर्ग व स्पृश्य मानलेले वर्ग यामध्ये समता व संघटना घडवून आणण्याच्या हेतूने तितके सामर्थ्य नसताही माणसांची व द्रव्याची अपरिमित हानी सोसून मुंबई इलाख्यातील अस्पृश्य वर्गांनी महाड येथे चवदार तळयावर व नाशिक येथे काळाराम मंदिरावर सत्याग्रह केला. काळाराम मंदिराचा सत्याग्रह तर गेली सहा वर्षे सतत चालविण्यात आला. परंतु स्पृश्य मानलेल्या हिंदुंचे किंचितही मतपरिवर्तन झाल्याचे दिसत नाही. इतकेच नव्हे तर स्पृश्य व अस्पृश्य या उभयतांतील होऊ घातलेल्या संघटनेला व तद्जन्य उत्पन्न होणाऱ्या हिंदू समाजाच्या सामर्थ्याला कवडीचीही किंमत देत नाहीत असे त्यांनी आपल्या वर्तनाने सिद्ध केले आहे. म्हणून अस्पृश्य वर्गाची ही परिषद असा ठराव पसार करीत आहे की, हिंदुंची मनधरणी करण्याच्या त्यांचा प्रयत्नांचा काहीही उपयोग होत नसल्याने त्याबाबतीत अस्पृश्य वर्गाने आपले सामर्थ्य आता विनाकारण मुळीच खर्च करू नये व सत्याग्रहाची मोहीम यापुढे बंद करावी. आणि स्पृश्य मानलेल्या वर्गापासून आपला समाज स्वतंत्र करावा व हिंदुस्थानातील अन्य समाजामध्ये आपल्या समाजाला मानाचे व समतेचे स्थान मिळविण्याकरिता अस्पृश्य वर्गाने एकनिष्ठेने प्रयत्न करावा असे या परिषदेचे मत आहे. ''[2]

' डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे मुद्देसूद भाषण आणि त्याला अनुसरून मांडलेल्या ठरावामुळे प्रेक्षकातील तरूण पिढीला फार आनंद झाला. वृद्ध लोक व स्त्रिया हे धर्मभोळे, त्यांना या घोषणेने चमत्कारिक वाटले. तरीही साहेबांचे पोटतिडिकीने केलेले जळजळीत भाषण ऐकूण त्यांनीही ठरावाला संमती दिली. हिंदू लोक अस्पृश्यांना खालच्या पायरीवरचे हिंदू म्हणून छळतात. ते परधर्मात गेले तर या छळातून मुक्त होतील व स्वतःच्या हिंमतीवर उपजीविका करतील, शिक्षण घेऊन ते स्वतःची प्रगती घडवून आणतील. या मुद्यांवर साहेबांचे भाषण एक तासभर झाले. सारे लोक मंत्रमुग्ध होऊन भाषण ऐकत होते. ठराव टाळयांच्या प्रचंड गजरात मंजूर झाला.

---

[1] डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड ६ वा, पृ. ८५.
[2] जनता : १५ फेब्रुवारी १९३६.

डॉ. साहेब व त्यांचे सहकारी येवल्याहून परतले व नाशिकमध्ये त्यांचा मुक्काम असताना मंगळवार दि. १५-१०-३५ ला आणि १६-१०-३५ ला भंगी (मेघवाल) लोकांनी त्यांना चहा पार्टी व भोजन पार्टी दिली. डॉ. साहेब व त्यांचे सहकारी आपल्या बरोबर जेवतात हे पाहून त्यांना मनस्वी आनंद व उत्साह वाटला.



[१] डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड ६ वा, पृ. ८५, ८६.

## ७८

# जो धर्म माणसांना माणुसकीने वागवित नाही त्याला धर्म कसे म्हणावे ?

निर्भीडकारांच्या आयुष्यातील तो अत्यंत भाग्याचा दिवस म्हणजे रविवार ता. ८ डिसेंबर १९३५ हा होय. त्या दिवशी रात्री मुंबईच्या फोरस रोड जवळील जुनी ढोर चाळ, जयरामभाई स्ट्रीटवर एक अत्यंत महत्त्वाची सभा होणार असून त्या सभेत धर्मांतराच्या घोषणेचे जनक डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे धर्मांतराच्या विषयावर मुंबईतील पहिलेच महत्त्वाचे भाषण होणार असे जाहीर झाले होते. या भाषणामुळे त्या सभेला एक प्रकारची अपूर्वता आली होती हे न सांगताही चाणाक्ष वाचकांना समजण्यासारखे आहे. त्या सभेला हजर राहून आमचे विचार दहा हजार श्रोतृ समाजासमोर मांडण्याची संधी आम्हास लाभली हे आम्ही आमचे परम भाग्यच समजतो. या निर्भीडकारांच्या आयुष्यात जे काही थोडे फार भाग्याचे दिवस उगवले त्यात आम्ही गेल्या रविवारला अग्रपूजेचा मान देत आहोत, कारण ही सभा जशी महत्त्वाची होती, तशीच सुधारक स्पृश्य समाजातर्फे अस्पृश्यांच्या धर्मांतराबाबत घोषणा करण्याची आम्हास लाभलेली सुसंधीही महद्‌भाग्याचीच होती.

गेल्या रविवारी रात्रीची सभा श्री. सोमवंशीय गुरूदत्त प्रासादिक भजन समाजाच्या विद्यमाने बत्तिसाव्या वार्षिक दत्तजयंत्युत्सवानिमित्त भरविण्यात आली होती. हा उत्सव गेली बत्तीस वर्षे अत्यंत थाटामाटाने साजरा होत असून त्या उत्सवास हजारो अस्पृश्य बंधु-भगिनींची चिकार गर्दी लोटत असते. या उत्सवाचे पुण्यात्मे संस्थापक, कै. माधवनाथ मोरे हे असून त्यांच्या हल्लीच्या व्यवस्थापक मंडळात श्री. बाळाजी सुडकाजी मोरे, शंकरराव आडेजाधव, माधवराव पारधे, गंगारामपंत मुकादम आणि रेवजीबुवा डोळस ही प्रमुख पुढारी मंडळी आहेत. या व्यवस्थापक मंडळाने यंदाचाही उत्सव अत्यंत थाटामाटाने साजरा केला हे त्यास अत्यंत भूषणावह होय. त्यांच्या उज्वल धर्मबुद्धिबद्दल त्यास व त्यांच्या शेकडो सहकाऱ्यांस आम्ही स्पृश्य हिंदू समाजातर्फे मनःपूर्वक धन्यवाद देतो.

यंदाचा दत्तजयंती उत्सव एकंदर चार दिवस साजरा झाला. पहिल्या दिवशी म्हणजे शनिवार ता. ७ रोजी श्रीयुत किसन देवीदास बोवा (कामाठीपुरा १३ वी गल्ली), रामजी रावजी बोरकर (ताडवाडी), रामजी धोंडूजी भालेराव (औचित्यवाडा), रामचंद्र सदूजी रणदिवे (बटाट्याची चाळ) या सुप्रसिद्ध धर्मभक्तांच्या व्यवस्थेखाली भजनकारांची संगीत भजने झाली.

---

निर्भीड : १५ डिसेंबर १९३५.

दुसऱ्या दिवशी आम्ही ज्या सभेचे वर्णन करण्यासाठी हा लेख लिहित आहोत ती जंगी जाहीर सभा झाली. तिसऱ्या दिवशी पालखीची मिरवणूक व भोजन समारंभ हे कार्यक्रम जाहीर झालेले होते. या उत्सवाप्रित्यर्थ हजारो रुपये खर्च होत असून अस्पृश्य समाज आनंदाची मौज लुटीत असतो. अशा उत्सवातील एका अत्यंत महत्त्वाच्या सभेस हजर राहून भाषण करण्याचा योग आम्हास लाभला हे आमचे भाग्यच नव्हे काय ? हा यंदाचा उत्सव अखेरचाच ठरल्यास आम्हास लाभलेला योग अधिकच भाग्याचा ठरतो यात शंका नाही.

आम्ही सदर सभेस हजर राहाण्यासाठी गेल्या रविवारी रात्री नऊ वाजण्याच्या सुमारास सभास्थानी दाखल झालो. एका लहानशा देवीच्या देवळापुढे सभास्थान श्रृंगारण्यात आले असून समोरील जंगीच्या जंगी रस्ता सभेसाठी नियोजित करण्यात आला होता. देवीच्या घुमटावर कापडाचा एक बोर्ड लावण्यात आला असून त्यावर बत्तीसावा दत्तजयंत्युत्सव-मॅनेजर-रेवजीबोवा डोळस असे मोठ्या अक्षरात लिहिले होते. देवळाच्या समोरील रस्ता ध्वजा, पताका, बावटे आणि कागदांच्या फुलांची छते वगैरेंनी श्रृंगारण्यात आला होता. रस्त्यावर श्रोतृ समाजाची बसण्याची व्यवस्था करण्यात आली असून डाव्या हाताला स्त्री समाज बसलेला दिसत होता. देवळापुढे एक जंगी व्यासपीठ मांडण्यात आले असून त्यावर सतरंजी व गालीचे पसरण्यात आले होते व व्यासपीठाच्या मध्यभागी एक चौरस मेज ठेवण्यात आले असून दोन मखमलीच्या दरबारी खुर्च्या ठेवलेल्या होत्या. व्यासपीठावर इतर पाहुणे मंडळींसाठी हिरव्या मखमलीची कोचे मांडण्यात आली होती. व्यासपीठाच्या आजूबाजूस आणखीही कोचे, खुर्च्या व बाके भरपूर मांडलेली होती. आम्ही गेलो त्यावेळी सभास्थानी पाच हजारावर श्रोतृ समाज जमलेला दिसला. श्रोतृ समाजात अस्पृश्यांचाच भरणा विशेष असला तरी पन्नास पाऊणशे मुसलमान, दहा पाच ख्रिस्ती व एक वयोवृद्ध पारशी गृहस्थ असे परधर्मीय लोक मधून मधून तुरळक बसलेले दृष्टीस पडत होते. आम्हाला मोठ्या प्रेमाने एका सद्‌गृहस्थाने व्यासपीठावरील कोचावर नेऊन बसविले. आमच्या शेजारी श्री. अडांगळे व वडवलकर बसले असल्यामुळे एकंदर गप्पागोष्टीस विशेष मजा आली. हे अस्पृश्य बंधु हल्ली आमचे परममित्र झालेले आहेत. डॉ. आंबेडकरास व त्यांच्या सहकारी मित्रमंडळीस आणण्यासाठी श्री. रेवजी बोवा गेले होते, म्हणून मध्यंतरीच्या रिकाम्या वेळेत काही मनोरंजक कार्यक्रम करण्यात आले. आम्ही गेलो त्यावेळी एका गोड आवाजाच्या मुलाचे सुस्वर गायन चालू होते. त्या गायनानंतर श्री. फाळके यांनी पोवाडा गाऊन दाखविला. त्यानंतर जलशाचाही लहानसा कार्यक्रम झाला. अशा प्रकारे जरी निरनिराळे कार्यक्रम चालू होते तरी सर्व

श्रोतृ समाजाचे लक्ष डॉ. आंबेडकरांच्या वाटेकडे लागले होते. श्रोत्यांची संख्या वाढता वाढता दहा वाजण्याच्या सुमारास ती दहा हजारांवर गेली. शेवटी सव्वा दहाच्या सुमारास सभास्थानाजवळ दोन भव्य मोटारी पों पों करीत येऊन थडकल्या. या मोटारीतून आपल्या मित्रमंडळीसमवेत डॉ. आंबेडकर आले. आंबेडकर आले असे समजताच टाळयांच्या प्रचंड कडकडाटाने वातावरण दुमदुमून गेले. श्रोतृ समाजाने डॉ. आंबेडकरांचे जे प्रचंड स्वागत केले ते एखाद्या किरीटकुंडलधारी सार्वभौमालाही हेवा वाटण्याजोगे होते. त्यांच्या नावाचा जयघोष चालू असतानाच डॉ. आंबेडकर व्यासपीठावर मांडलेल्या दरबारी खुर्चीवर जाऊन बसले. त्यांच्या शेजारी सभेचे नियोजित अध्यक्ष श्री. देवराव नाईक तसल्याच एका जाड खुर्चीवर जाऊन बसले. त्यांच्याबरोबर आलेली प्रि. दोंदे, श्री. सुरबा टिपणीस, बापूसाहेब सहस्त्रबुद्धे इत्यादी त्यांच्या आजुबाजूच्या कोचावर अधिष्ठित झाली. अस्पृश्य समाजाचे दुसरे एक थोर आणि सन्मान्य पुढारी डॉ. सोळंकी यांस आणण्यासाठी मोटार गेली असल्याने ते येऊन दाखल होईपर्यंत सभास्थानी जलशाचा कार्यक्रम पुढे चालू ठेवण्यात आला. थोड्या वेळाने डॉ. सोळंकीची स्वारी सभास्थानी दाखल झाली. व्यवस्थापक मंडळाने त्यांचेही थाटाने स्वागत केले. लोकांनीही टाळयांचा गजर करून आपली संमती दिली. डॉ. सोळंकी, डॉ. आंबेडकरां-शेजारील खुर्चीवर विराजमान झाल्यावर श्री. रेवजी बोवांनी सभेच्या कामास सुरवात केली. अध्यक्षांच्या सूचनेला अनुमोदन दिल्यानंतर श्री. देवराव नाईक यांनी प्रारंभीचे लहानसे भाषण केले. त्यानंतर श्री. सुरबा टिपणीस यांचे भाषण झाले.

यानंतर अध्यक्षांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांस भाषण करण्याविषयी नम्रतापूर्वक विनंती केली. डॉ. आंबेडकर हातात एक लहानशी काठी घेऊन टेबलाच्या पुढे येऊन उभे राहिले. टाळयांचा प्रचंड गजर दुमदुमला ! बाबासाहेबांनी डोक्याला काही एक घातलेले नव्हते व पोषाख अगदी साधा केला होता. पायात लाँग क्लॉथचा लेंगा व अंगात सोलापुरी चेकचा कोट असा त्यांचा साधासुधा थाट होता. अत्यंत गंभीर वाणीने डॉ. आंबेडकर म्हणाले,

सभापती महाशय आणि बंधुभगिनींनो,

मला प्रारंभी एक दोन गोष्टींचा खुलासा केला पाहिजे. गेल्या सालच्या उत्सवाला मी आलो नव्हतो. या सालीही असल्या दत्तजयंतीसारख्या उत्सवात भाषण करणे योग्य नव्हे, पण रेवजी बुवांनी हा शेवटचाच उत्सव होईल असे आश्वासन दिले असल्यामुळे मी आलो आहे. या ठिकाणी धर्मांतरासारख्या विषयावर बोलणेही बरे नव्हे. पण मला काही तरी दोन शब्द बोलणे आता भागच

आहे. मी धर्मांतराविषयी माझी मते निश्चित केलेली आहेत. मी धर्मांतर करणारच आहे ; पण थोडा थांबलो आहे तो तुमचा बेत कळावा म्हणून ! तुम्ही सर्वच्या सर्व सात कोटी लोक धर्मांतर कराल तरच मला हवे आहे. एकाही माणसाने मागे राहाता कामा नये. थोडे थोडे फुटून परधर्मांत जाल तर तुमचे नुकसान होईल. सात कोटींनी गटाने धर्मांतर केले पाहिजे. दहा हजार मुसलमान झाले, चार हजार खिस्ती झाले तर असल्या फाटाफुटीने अकल्याण होईल. तुम्ही काही थोडे लोक माझ्याबरोबर परधर्मांत आलात तर मला तुमचे हित करता येणार नाही. तुम्ही सर्व आलात तर मला तुमचे काही हित करता येईल. सर्वांचा एकच निश्चय व्हावयाचा म्हणजे त्याला वेळ हा लागणारच ! तेवढा वेळ मी थांबायला तयार आहे. पण ही वेळ मी तुम्हा अस्पृश्यांना दिलेली आहे, स्पृश्यांना नाही ! सारे मला विचारायला येतात, तुम्हाला विचारायला कोणी येत नसेल. मला बोलावे लागते. पण त्याचा अर्थ माझा धर्मांतराचा निश्चय बदलणार आहे असा नव्हे. माझा निश्चय पक्का झाला आहे. पण मला तुमचा बेत काय तो कळला पाहिजे. हिंदू धर्म हा धर्म नाही. हा रोग आहे, महारोग आहे ! (आम्ही बसलो होतो त्या बाजूला वळून) हा रोग हिंदूंना झाला आहे, आम्हाला नव्हे ! त्याचा संसर्ग आम्हाला बाधतो आहे. एखाद्यास जर सांसर्गिक रोग झाला तर ज्याप्रमाणे त्याला क्वारंटाईनमध्ये ठेवण्यात येते त्याप्रमाणे हिंदुंपासून आम्हाला अलिप्त राहिले पाहिजे. रोग हिंदुंना झाला आहे, आम्हाला नाही. आम्ही अस्पृश्यांनी काय पाप केले आहे ? काही नाही. पापे केली आहेत ती स्पृश्यांनी ; त्यांची फळे मात्र आम्हाला भोगावी लागतात म्हणून आम्हाला दूर गेले पाहिजे. हिंदुंना जर रोगापासून आपला बचाव करून घ्यावयाचा असेल तर त्यांनीही आमच्या मागून यावे. अस्पृश्यता नष्ट करण्याकरिता खटपट करा असे म्हणतात, पण ते शक्य नाही. हिंदू धर्म हा मुळी धर्मच राहिलेला नाही. तो धर्म आहे असे कोणीही मला सिद्ध करून द्यावे. हिंदू धर्म हे एक विष आहे. विषाचे अमृत होणे शक्य नाही. ज्या धर्मातील लोक अस्पृश्य समाजातील माणसांना माणुसकीने वागवीत नाहीत त्याला धर्म कसे म्हणावे ? विषाचे अमृत करण्याची काही युक्ती कोणाला माहीत असेल तर ती मला त्याने सांगावी. विषाचे अमृत होणेच शक्य नाही. पदार्थ खारट झाला तर तो अळणी करता येईल, आंबट झाला तर तो गोड करता येईल, पण विषाचे अमृत करणे अशक्य आहे. मी स्वतः स्वयंपाक करण्यास शिकलो आहे. मला कोणाही भगिनीइतका चांगला स्वयंपाक करता येतो. तुम्हाला कदाचित माहीत नसेल पण काही धंदा न मिळाल्यास बावर्ची

तरी होता यावे, म्हणून मी स्वयंपाक करण्याचे काम शिकलो आहे. एखादा पदार्थ खारट झाला तर त्यातले मीठ कसे काढावे हे ज्या भगिनींना माहीत नसेल त्यांना मी त्याची युक्ती सांगून ठेवतो. खारट पदार्थ शिजत असताना त्यात एक कागदाचा तुकडा टाकून ठेवावा म्हणजे तो पदार्थ अळणी होतो (टाळ्या). सांगण्याचे तात्पर्य इतकेच की सर्व काही बदलता येईल पण विषाचे अमृत होणार नाही. मला परवाच गुजरातीतून एक पत्र आले आहे. त्यातील हकीगत सांगितली तर हिंदू धर्म हे विष आहे याविषयीची तुमच्या मनाला खात्री पटेल. गुजरातेत एका गावाला एक जैन विद्यार्थ्यांचे बोर्डिंग आहे. तेथे वीस-एक मुले शिकत असून त्यांच्यावर एक वृद्ध जैन सुपरिटेंडेंट नेमण्यात आलेला आहे. त्या बोर्डिंगाच्या आवारात एक अस्पृश्य जातीचे जोडपे काम करीत असे. त्यांना तीन चार वर्षाचे एक मूल होते. ते पाठीवर बांधून कामाच्या वेळी बोर्डिंगाकडे घेऊन जात. एके दिवशी त्या मुलाला आवारात खेळत ठेवून त्याचे आई-बाप कोठे तरी बाहेर कामावर गेले. इकडे मूल खेळता खेळता बोंर्डिंगाच्या दारासमोरील पाण्याच्या लहानशा हौदाजवळ गेले. हा हौद चार पाच फूट खोल आणि दोन अडीच फूट रुंद एवढाच होता. दुर्दैवाने ते मूल हौदावर चढले आणि त्याची झेप जाऊन ते पाण्यात पडले. ही गोष्ट बोर्डिंगातल्या वीस मुलांनी व त्यांच्या वृद्ध शिक्षकाने पाहिली पण त्यांनी काही त्या मुलाला हौदाबाहेर काढले नाही. त्या मुलांनी ही बातमी मुलाच्या आई-बापास कळविली. बऱ्याच वेळाने आई-बाप आले व त्या मुलाला त्यांनी बाहेर काढले. नंतर आई-बापाने त्याला इस्पितळात नेले. डॉक्टरने मुलाला तपासले व सांगितले की हे मूल दोन तासापूर्वीच मेलेले आहे. आता प्रश्न असा आहे की, त्या वीस जैन मुलांनी आणि त्यांच्या वृद्ध शिक्षकाने त्या मुलाला हौदाबाहेर का काढले नाही ? त्याचे उत्तर हेच आहे की, ते मूल अस्पृश्य जातीत जन्माला आलेले होते म्हणून, असा हा हिंदू धर्म आहे. त्याच्यापासून माणुसकीच्या अपेक्षा करणे व्यर्थ आहे. अस्पृश्यांना हिंदू समाजाकडून कधीही न्याय मिळणार नाही. हिंदू धर्म हा रक्तपीतीचा रोग आहे. त्याच्यापासून अस्पृश्यांना आपला बचाव करून घ्यावयाचा असेल तर त्यांना धर्मांतर एवढाच उपाय आहे. नुकतीच नाशिक जिल्ह्यातील नादूर या गावी घडलेली हकीगत तुम्ही वाचलीच असेल. दोघा महारणी बायाजवळ दोन गवताच्या पेंढ्या आढळल्या. धर्मांतराच्या घोषणेमुळे चिडलेल्या मराठ्यांनी त्या बायांवर मराठ्यांच्या शेतातून गवत कापून आणल्याचा आरोप ठेवला. त्या बायांनी पुष्कळ प्रकारे विनवून सांगितले, पण मराठ्यांनी त्यांचे म्हणणे ऐकले नाही. शेवटी त्यांचा छळ करण्यात आला, पण एवढ्यानेही त्या मराठ्यांचे समाधान झाले नाही. त्यांनी महारांच्या शेतात आपली गुरे-ढोरे सोडून दिली व महारांच्या उभ्या पिकाची नासाडी केली. अस्पृश्यांना स्पृश्य समाजाकडून अशीच वागणूक मिळत असते.

म्हणून म्हणतो की हिंदू धर्म हा नरक आहे. तुम्ही धर्मांतराबाबत कोणता निश्चय ठरविता हे पाहण्यासाठी मी थांबलो आहे. मला तुमच्या पुढारीपणाची जरूरी नाही. कसलीही इतर अपेक्षा नाही. माझी उन्नती करून घेणे माझ्या हातात आहे. माझ्याबरोबर धर्मांतर करावयाचे असेल तर सर्व मिळून या. येथे एक दोन महिन्यात प्रथम मुंबई इलाख्यातील महार लोकांची परिषद भरणार आहे. त्यांचा निश्चय ठरला म्हणजे इतर जातींच्या परिषदा भरविण्यात येतील. आणि शेवटी हिंदुस्थानातील सर्व अस्पृश्यांची परिषद भरुन निर्णय करून घ्यावा लागेल. याला वेळ लागणारच. योग्य तितका वेळ मी तुम्हाला देत आहे. तेवढ्यात काय तो आपला निश्चय करा. धर्मांतर करावयाचे म्हणजे काय करावयाचे ते आजच सांगण्यात अर्थ नाही. ज्यात तुम्ही राहाता ते मकान कायमचेच सोडावयाचे असा एकदा तुमच्या सर्वांच्या मनाचा निश्चय झाला म्हणजे मग कोणत्या मार्गाने जावयाचे ते सांगू. तुम्ही हिंदू धर्मात राहाता कारण तुम्ही निर्बुद्ध आहात . तुम्हाला लाज नाही, शरम नाही, म्हणूनच तुम्हाला माणुसकीची जाणीव झालेली नाही. याचमुळे तुम्ही या धर्मात राहिला आहात. इतके बोलून मी भाषण संपवितो.

असे म्हणून डॉ. आंबेडकरांनी आपले भाषण एकाएकी संपविले आणि ते गंभीरपणे आपल्या जागेवर जाऊन बसले. भाषण संपविण्याच्या वेळी त्यांचा चेहरा अत्यंत गंभीर व संतापाने लाल झालेला दिसत होता. ते इतके भावनावश झाले होते की, त्यांच्या तोंडून पुढील शब्द निघणेच शक्य नव्हते. त्यांनी एकाएकी भाषण संपविले खरे, पण श्रोत्यांच्या मनावर त्याचा परिणाम मात्र भयंकर झाला. त्यांची बोलण्याची पद्धत सरळ, साधी व सडेतोड होती. ते तिखट भाषेत श्रोत्यांची अंतःकरणे कापीत पुढे गेले. एका विशिष्ट पण मध्यम आवाजात त्यांनी सर्व भाषण केले. आवाजात चढउतार नाही की, अलंकारिक भाषेचा नटवेपणा नाही, त्यांची वाक्येही लहान व सुटसुटीत होती. हे भाषण झाल्यानंतर जास्त काही एक न बोलता सभा बरखास्त केली. अध्यक्षांनी समारोप न करण्यात एकप्रकारे डॉ. आंबेडकरांविषयीचा अत्यादर व्यक्त केला इतकेच नव्हे तर त्यांनी विशेष प्रकारचा मुत्सद्दीपणाही दाखविला. अध्यक्षांनी समारोप न केल्याने श्रोत्यांच्या मनावर झालेला परिणाम टिकण्यास अत्यंत मदत झाली. शेवटी फक्त हारतुरे समर्पणाचा समारंभ झाला. डॉ. आंबेडकर, डॉ. सोळंकी, श्री. देवराव नाईक यास व सर्व पुढारी मंडळीस पन्नासावर पुष्पहार अर्पण करण्यात आले. हा समारंभ आटोपल्यावर लोकांनी डॉ. आंबेडकरांच्या नावाचा जयजयकार केला व सभेचे काम संपले. इकडे डॉ. आंबेडकर वगैरे पुढारी मंडळी गर्दीतून मार्ग काढीत मोटारीकडे रवाना झाली.

●●●

# ७९

# धर्मांतराने सर्व अल्पसंख्यांकांचे कल्याण होईल

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी येवला येथील अस्पृश्यवर्गीय परिषदेत धर्मांतराची घोषणा केल्यापासून हिंदुस्थानात मोठी खळबळ उडून गेली व या घोषणेमुळे स्पृश्य हिंदूसमाज हादरून गेला आणि या त्यांच्या धर्मांतराच्या घोषणेस हिंदू अस्पृश्य बांधवांकडून दिवसेंदिवस वाढता पाठिंबा मिळू लागला आहे. या घोषणेस महाराष्ट्रातर्फे पाठिंबा देण्याकरिता गेल्या जानेवारी महिन्याच्या ता. ११ व १२ जानेवारी १९३६ रोजी पुणे येथे अहिल्याश्रमाच्या भव्य पटांगणात उभारलेल्या मंडपात अखिल महाराष्ट्रीय अस्पृश्य तरुण परिषद भरविण्यात आली. या परिषदेचे अध्यक्षस्थान मद्रासचे सुप्रसिद्ध पुढारी रा. सा. प्रो. शिवराज, बी. ए., बी. एल. यांना देण्यात आले होते. परिषदेच्या पूर्वी अध्यक्षांची प्रचंड मिरवणूक पुणे कॅम्प विभागातून काढल्यानंतर सायंकाळी ५-३० वाजता अधिवेशनास सुरवात झाली. परिषदेस दहा हजार स्त्रीपुरुष समुदाय हजर होता. यात काही थोडे स्पृश्य हिंदू, मुसलमान व शीख मंडळीही दिसत होती. हजर असलेल्या मंडळीत सर गोविंदराव माडगावकर, रा. सा. त्रिभुवन शेठ किराड, श्री. भाऊराव पाटील, श्री. शांताराम पोतनीस, मि. आश्रफ अल्ली, मीर मुनशी, भालदार, श्री. आर. बी. भागवत, डॉ. वि. म. उर्फ अण्णासाहेब नवले, सरदार दरबारसिंग, सुभेदार घाटगे, सुभेदार धुत्रे, महाडचे श्री. सुरेंद्रनाथ टिपणीस, श्री. अ. वि. चित्रे, श्री. सीताराम लांडगे, अमृतसरचे सरदार गुरूमुखसिंग, स. तुळशीसिंग, स. दिवाणसिंग, स. नारायणसिंग, स. इंद्रसिंग, स. तेजसिंग, स. सुभेरसिंग, वे. आग्रवाल, मि. एस. एस. जगताप, मि. जे. टी. आल्हार, मि. ससाने, श्री. तात्याबा शिंदे वगैरे. याशिवाय बाहेरगावचे बरेच प्रतिनिधी हजर होते.

अस्पृश्यांचे मुख्य पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे कार्यक्रमाच्या ठिकाणी थोडे उशिरा पोहचले. त्यामुळे सुरवातीला लोकांची निराशा झालेली दिसत होती, त्यामुळे मंडपाच्या मुख्य भागी अध्यक्षांच्या खुर्चीजवळच एका खुर्चीवर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा पुष्पहारमंडित फोटो ठेवण्यात आला होता.

---

जनता : ८ व १५ फेब्रुवारी १९३६.

महाराष्ट्र अस्पृश्य तरूण परिषदेत डॉ. सोळंकी यांचे भाषण झाल्यानंतर अस्पृश्य वर्गाचे लोकप्रिय पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे बोलावयास उभे राहिले. त्यावेळी सुमारे पाच मिनिटे एकसारखा टाळयांचा कडकडाट चालू होता. शिंगे व तुताऱ्या वाजत होत्या व आंबेडकरांच्या जयजयकाराने तेथील सबंध वातावरण दुमदुमून गेले होते. डॉ. आंबेडकर यांना पाहाण्यासाठी लोक एकसारखे पुढे घुसत होते. त्यावेळी स्वयंसेवकांना बंदोबस्त ठेवणे मुष्किलीचे झाले. अखेरीस पाच मिनिटेपर्यंत डॉक्टरसाहेबांना पाहून झाल्यानंतर प्रत्येकाचे समाधान झाले व मग आपोआप सर्वत्र शांतता झाली. त्या शांत वातावरणात डॉक्टरसाहेबांनी गंभीर आवाजात आपल्या भाषणास सुरवात केली. ते म्हणाले,

सभापती, माझे बांधव व भगिनींनो,

आज या ठिकाणी कोणाही वक्त्याने भाषण करण्यापूर्वी आपली जात सांगावी असा दंडक अध्यक्षांनी घातला आहे. तेव्हा माझ्या या काळया रंगाच्या दोऱ्यावरून (घड्याळाची काळी फीत दाखवून) आपणास माझी जात समजून आली असेलच (हंशा). आजच्या या परिषदेपुढे माझे निराळे भाषण करण्याचे काही प्रयोजन आहे, असे मला वाटत नाही. ज्यावेळी ही परिषद होण्याचे ठरले त्यावेळी येथील तरुणांनी या परिषदेचे अध्यक्षस्थान स्वीकारावे असे मी सुचविले होते. परंतु मी स्वतःची गणना तरुणात करीत नसल्यामुळे ते अध्यक्षपद नाकारले. तरीपण आज एका कारणाकरिता तरी मला बोलणे भाग आहे आणि ते कारण म्हणजे आपले आजचे अध्यक्ष प्रो. शिवराज यांचे आभार मानणे हे होय. प्रो. शिवराज यांच्यामागे त्यांच्या कॉलेजची अनेक कामे असताही ते स्वतःची अडचण सोसून या ठिकाणी आले व आपली ही परिषद त्यांनी यशस्वीरीतीने पार पाडली याबद्दल त्यांचे आभार मानणे हे माझे कर्तव्य आहे (टाळया). जातीभेद आहे तसा या देशात प्रांतभेदही जबरदस्त आहे. आपल्या उन्नतीकरिता या देशातील सर्व प्रांतांच्या अस्पृश्यांचे संघटन होणे जरूर आहे. परंतु प्रांताप्रांतातील भाषाभेद अस्पृश्यांच्या एकीकरणाला घातक आहेत. त्या दृष्टीने पाहता आज मुंबई इलाख्यातील व महाराष्ट्रातील अस्पृश्य समाजाने मद्रदेशीय अस्पृश्य पुढाऱ्यास हे अध्यक्षस्थान दिले ही आनंदाची व संघटनेच्यादृष्टीने उत्तेजनपर अशीच गोष्ट घडली आहे (टाळया). यापुढेही आमच्यातील तरुण व वृद्ध सर्वच अशी संघटना वाढवून या देशातील सर्व अस्पृश्य समाजात प्रेम व सहकार दृढ करतील अशी मला आशा आहे.

सध्या अस्पृश्यांची म्हणजे आपली ही जी चळवळ चालू आहे तिला ' एका गारुड्याचा तमाशा ' किंवा ' One man show ' म्हणून संबोधले जाते. कोणत्याही समाजात केवळ एका माणसाने केलेली चळवळ

यशाच्या कळसापर्यंत जात नाही. तेव्हा आपली ही चळवळ यशस्वी व्हावयाची असेल, तर एकाच डोंबाऱ्याने हा खेळ खेळून भागणार नाही. त्यास अनेक सवंगड्यांची जरूरी आहे. हा खेळ खेळता खेळता एक गारुडी मरून पडला, तर त्याच्या जागी त्याचे ढोलके घेऊन बडवण्यास उभा राहाणारा दुसरा गारुडी तयार असला पाहिजे. आतापर्यंत या बाबतीत मी जरा साशंक होतो, परंतु आजची ही सभा पाहून माझ्या मनातील त्यासंबंधीची शंका दूर झाली आहे (टाळया). माझ्यानंतर माझे कार्य चालविण्यास अनेक कार्यकर्ते या पुण्याच्या अस्पृश्य तरुणांतूनच बाहेर येतील. याबद्दल मी त्यांना धन्यवाद देत आहे (टाळया).

आता यापेक्षा याप्रसंगी विशेष काही भाषण करावे असे मला वाटत नव्हते. तथापि, ज्या मुख्य विषयाची चर्चा या ठिकाणी झाली, त्यासंबंधी मी जर काहीच बोललो नाही तर आपली फार निराशा होईल हे मी जाणतो आणि म्हणून मी जाहीर केलेल्या धर्मांतराच्या प्रश्नावर थोडे बोलतो.

मी धर्मांतर करण्याचे जाहीर केल्यापासून माझ्याकडे अनेक लोक येऊन त्याविषयी ऊहापोह करतात. त्या टीकाकार मंडळीत दोन प्रकारचे वर्ग आहेत. एका प्रकारच्या लोकांचे म्हणणे असे की, मी अस्पृश्यांच्या हिताच्या दृष्टीने ज्या काही अटी असतील त्या स्पृश्य हिंदुंच्यापुढे मांडाव्या आणि त्या अटी जर स्पृश्य हिंदुंकडून पूर्ण झाल्या नाहीत तर मग धर्मांतरास सिद्ध व्हावे.

दुसऱ्या एका प्रकारच्या लोकांचे म्हणणे असे की, अस्पृश्यांच्या धर्मांतराने विशेष फायदा होणार नाही. तेव्हा त्यांनी धर्मांतर करु नये.

धर्मांतराने फायदा होईल किंवा नाही, फायदा झाल्यास तो किती प्रमाणात होईल याविषयी वादविवाद किंवा चर्चा करण्याचे हे ठिकाण नाही व तितका आता वेळही नाही. तेव्हा येशू ख्रिस्ताने ज्यू लोकांना आपल्या नव्या धर्माबद्दल सांगताना ज्याप्रमाणे म्हटले की, 'Be unto me, Little children and I will save you from Sin' (' लहान लेकरे आपल्या आईबापांवर विश्वास टाकतात त्याप्रमाणे तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवा व मी सांगतो तो धर्म पाळा'). याच येशू ख्रिस्ताप्रमाणे मी आज तुम्हास एवढे सांगू शकतो की, ' मजवर तुमचा विश्वास असेल तर या धर्मांतरामुळे तुमचा फायदाच होईल ' (प्रचंड टाळया). एवढेच सांगून मी येथून जावे असे नाही. तर याबाबत मी बरोबर संशयनिवृत्ती करून देईल, पण आज तेवढा वेळ नसल्यामुळे येशू ख्रिस्ताने ज्यू लोकांना त्या काळी दिलेले उत्तर मी आज तुम्हास देऊन थांबत आहे.

जे लोक मला असे सांगतात की, तुम्ही हिंदू धर्मात राहून स्वाभिमानाने जीवन कंठण्यास अवश्य अशा आपल्या अटी स्पृश्य हिंदुपुढे मांडा व त्या अटी

स्पृश्य हिंदू पाळतात किंवा नाही ते पहा. त्या लोकांना मला एवढेच सांगावयाचे आहे की, मी ज्या अटी मांडीन त्या स्पृश्य हिंदूंना केव्हाही पूर्ण करता येणार नाहीत अशी माझी वालंबाल खात्री झाली आहे. माझी अट रुपयांची नाही, अगर भाकरीचीही नाही तर माझी अट त्यापेक्षाही फार मोठी आहे. ती अट कोणती आहे हे ज्यांना ऐकावयाचे असेल किंवा पार पाडण्याची ज्यांची तयारी असेल त्यांनी माझ्याकडे यावे, पण माझी याबाबत पक्की खात्री आहे की, ती अट पाळणे स्पृश्य हिंदुंना किमपी शक्य नाही (टाळया).

जगातील प्रत्येक समाजाचे भवितव्य त्या त्या समाजातील सुशिक्षित लोकांवर अवलंबून असते. आजपर्यंत तुमच्यात चळवळ झाली नाही याचे कारण तुमच्यात कोणी शिकलेले लोकच नव्हते. शिक्षणामुळे माणसाला व समाजाला डोळसपणा प्राप्त होतो आणि त्यादृष्टीने पाहता सबंध हिंदुंमध्ये जर कोणी खरा डोळस समाज असेल तर तो ब्राह्मण समाज हा एकटाच डोळस आहे. हे नाकबूल करता येणार नाही. ब्राह्मणेतर मराठा व तत्सम समाज हे तितके डोळस नाहीत. या बाबतीत ब्राह्मणांची जबाबदारी फार मोठी आहे. परंतु ब्राह्मण जातीची वृत्ती कशी आहे याची तुम्हास बरोबर ओळख झालेली नाही. ब्राह्मणांपुढे तुम्ही कोणताही प्रश्न टाका व त्यावर सर्व समाजाच्या कल्याणाच्या दृष्टीने काही तोड सुचवा. ही तोड जर ब्राह्मणाच्या वर्चस्वास धक्का देणारी नसेल तर ते झटकन मान्य करतील, पण तुम्ही सुचविलेल्या तोडीमुळे जरा का त्यांच्या ब्राह्मणी वर्चस्वाला थोडातरी धक्का लागण्याचा संभव असेल तर राष्ट्राचा कितीही मोठा फायदा होत असेल तरी ती तोड ब्राह्मण समाज कधी हाती घेणार नाही. तेव्हा तो समाज आपल्या अटी पार पाडण्याची जबाबदारी घेईल, अशी आशा करण्यात काहीच अर्थ नाही.

कोणतीही गोष्ट काही तरी दिल्याखेरीज मिळत नसते. त्याप्रमाणे स्पृश्य अगर ब्राह्मण समाजाने तुमच्याकरिता काही तरी करण्यापूर्वी त्यांना तुम्ही काही तरी दिले पाहिजे. पण ते काय द्यावे लागणार आहे हे तुमच्या लक्षात आले काय ? ते लक्षात येण्यासाठी निवापसुत्तात भगवान बुद्धानी सांगितलेली गोष्ट मी सांगतो. श्रावस्तीमध्ये अनाथ पिंडिकाच्या आश्रमात राहत असता भिक्षुंना उद्देशून भगवान बुद्ध म्हणाला की, भिक्खुहो, राजा आपल्या राखीव जंगलात हरिण, गवे, ससे वगैरे प्राणी पाळून ठेवतो, त्यांची योग्यप्रकारे जोपासना करतो, त्यांना ममतेने वाढवितो. पण हे सर्व कशाकरिता ? त्या प्राण्यांना ठार करण्याकरिता. आपली मृगयेची भूक भागविण्यासाठी राजा त्या गरीब दुबळया प्राण्यांची जोपासना करीत असतो. त्याचप्रमाणे आज स्पृश्य हिंदू अगर

ब्राह्मण तुम्हास काही जादा सवलती देऊ करून आपल्याच धर्मात ठेवू पाहात आहेत ते तुमच्या कल्याणासाठी नसून तुम्हास कायमचे त्यांच्या गुलामगिरीत जखडून ठेवण्याकरिताच आहे. (शेम शेम).

मं. गांधींनी ९ लाखांचा फंड गोळा केला, तो काही तुमच्या खऱ्या हितासाठी नसून तुम्ही त्यांच्या कॉंग्रेसला सोडून जाऊ नये, कॉंग्रेसचे वजन कायम राहावे म्हणून. त्यांनी टाकलेले दयेचे तुकडे चघळून स्पृश्यांच्या दारात कायमचे गुलाम म्हणून आपण पडून राहावे म्हणून स्पृश्य हिंदुंचे हे सर्व उद्योग आहेत. माझे त्या सर्वांना असे सांगणे आहे की, आता ' स्पृश्य हिंदुंनी माझ्यापुढे प्रत्यक्ष परमेश्वर आणून उभा केला तरी मी हिंदु धर्मातून जाणार ! ' (प्रचंड टाळया, जयजयकार व शिंग तुताऱ्यांचे आवाज) आता यापुढे स्पृश्य हिंदुंनी अस्पृश्य समाजाकरिता काहीही कार्य केले नाही तरी मी जाणार व काहीही केले तरीही मी जाणार ! (टाळया)

आता हे धर्मांतर आपणापैकी कोणीही एकट्या दुकट्याने करावयाचे नसून सबंध अस्पृश्य समाजाने, एकदम सर्वांनी मिळून करावयाचे आहे. आम्ही धर्मांतर केल्याने आमच्यापुढे स्वर्गच अवतरणार आहे किंवा अमृताचा पाऊस पडणार आहे, असे मी मुळीच म्हणणार नाही. आम्ही मुसलमान, खिस्ती किंवा शीख झालो तरी तेथेही आमच्या भवितव्याकरिता झगडा करावा लागणार आहे, हे आम्ही ओळखतो. उद्या आपण मुसलमान झाल्याबरोबर सर्वच नबाब होणार नाही, शीख झाल्याबरोबर सरदार होणार नाही किंवा खिस्ती झाल्याबरोबर पोप होणार नाही, (हंशा) कोठेही आपण गेलो तरी आपणास लढा हा करावा लागणारच आहे. तेव्हा तो लढा लढविण्यासाठी आपण आपली संघशक्ती वाढविली पाहिजे. वैयक्तिक फायद्याकरिता आपणास चोरट्या व्यवहाराने धर्मांतर करावयाचे नसून हातावर शिरकमले घेऊन जेथे जाऊ तेथे लढावयाचे, या निश्चयाने धर्मांतर करावयाचे आहे. उद्या मुसलमान अगर खिस्ती झाल्यावर ते लोक जर आम्हास महार खिस्ती म्हणून निराळया चर्चमध्ये जाण्यास सांगू लागले, तर आम्ही तसल्या चर्चला आग लावू. मी काही साधाभोळा नाही. जेथे जाईल तेथे काट्यासारखा बोचत राहीन ! (हंशा व प्रचंड टाळया) म्हणून माझे तुम्हास पुन्हा पुन्हा सांगणे आहे की, धर्मांतर करावयाचे हे नक्की असेल, तर एकटे दुकटे कोठे जाऊन फसू नका. आजच कोणीही खिस्ती किंवा मुसलमान होऊ नका. मी ओळखून आहे की, आमच्या या घोषणेमुळे पुष्कळांना मोठमोठ्या आशा लागल्या आहेत. आता मला माझ्या महार बंधुंना एवढेच सांगावयाचे आहे की, बाबांनो, तुम्ही अस्पृश्यांतील जातिभेद यापुढे तरी शिल्लक ठेवू नका (टाळया). महारास ब्राह्मण समाजाचे वर्चस्व सहन होत नाही, त्याचप्रमाणे अस्पृश्यांमधील अल्पसंख्यांक मांग, भंगी वगैरे

समाजाला महारांचे वर्चस्व नको आहे आणि त्यांची ही मागणी अगदी रास्त आहे. मला स्वतःला महार जातीचा विशेष अभिमान वाटत नाही. मी केवळ त्या जातीत जन्मलो आणि माझ्या शिक्षणाचा व ज्ञानाचा फायदा आपल्या अज्ञ बांधवांना द्यावा म्हणून त्या जातीत प्रथम कार्याला सुरवात केली.

महाराष्ट्रात तरी अस्पृश्य समाजात महारांची संख्या अधिक आहे. तेव्हा अल्पसंख्यांकांची जशी नेहमीच कुचंबणा होते, तशी आपल्या मांग व भंगी बंधुंची होत आहे, हे त्यांनी ध्यानी आणून अस्पृश्यांतील हा उच्च-नीच भाव एकदम नष्ट करावा. मांग व भंगी या समाजाला माझे असे आश्वासन आहे की, ज्यावेळी महार तुम्हास समानतेने वागविणार नाहीत त्यावेळी मी तुमचा आहे. तुमच्या-वतीने तुमचे भांडण मी महारांशी भांडेन (टाळ्या).

धर्मांतराची जी अनेक कारणे आहेत त्यात हिंदू धर्मातील जातीभेद हे एक मुख्य आहे. स्पृश्य हिंदू आम्हाला नेहमी हिणवतात की, प्रथम अस्पृश्यात जातीभेद आहेत ते मोडा व मग आम्हाला जातीभेद मोडावयास सांगा पण त्यांना मला एवढेच सांगावयाचे आहे की, जोपर्यंत आम्ही तुमच्या धर्मात आहोत, तोपर्यंत आम्हास आमच्यातील जातीभेद मोडता येणार नाही. तुमच्या हिंदू धर्माच्या व जातिभेदाच्या पोलादी चौकटीत राहून आम्हास ती सुधारणा करता येणार नाही आणि म्हणूनच धर्मांतरानंतर जात्युच्छेदनाचा प्रश्न सोपा होईल अशी माझी समजूत आहे. आता जर एखाद्या महारास मांगाची मुलगी कर म्हटले तर तो लगेच स्पृश्य तसे करीत नाहीत म्हणून तिकडे बोट दाखवील, पण आपण सर्वच अस्पृश्य स्पृश्यांच्या या भेदभावाच्या भोवऱ्यातून बाहेर पडून गेल्यावर त्यास तसे करता येणार नाही.

धर्मांतराने खुद्द महारापेक्षा अल्पसंख्यांक अशा भंगी व मांग समाजाचे जास्त कल्याण होईल. ते सर्व महारांच्या एकाच पातळीवर येतील आणि म्हणून मांग अगर भंगी जातींनी या धर्मांतराच्या प्रश्नास जास्त जोराचा पाठिंबा देणे त्यांच्याच फायद्याचे आहे. जातीभेद नष्ट करणे हे स्वराज्य संपादनापेक्षाही जास्त पवित्र कर्तव्य आहे. सबंध हिंदुस्थानातील जातीभेद जेव्हा कधी नष्ट व्हायचा असेल तो होवो, पण अस्पृश्य समाजातील जातिभेद मला नष्ट करता आल्यास मी स्वतःला भाग्यवान पुरुष समजेन (प्रचंड टाळ्या).

तुम्ही आजपर्यंत मजविषयी जो विश्वास प्रगट केलात, त्याबद्दल मी मानव असल्यामुळे मला आनंद होत आहे, पण त्याबरोबरच माझ्या शिरावरील जबाबदारीचा बोजा वाढत चालल्याची जाणीवही मला होत आहे. तुम्हा सात कोटी लोकांची जबाबदारी माझ्यावर आहे. त्या माझ्या हातून जर का थोडीही चूक झाली, तर केवढ्या मोठ्या समाजाच्या नुकसानीस मी कारणीभूत होईल याचा मला रात्रंदिवस विचार करावा लागत आहे. माझ्या या धर्मांतराच्या घोषणेला

कोणी ' खूळ ' किंवा ' भूत ' असेही म्हणतात. परंतु यात माझा वैयक्तिक असा काडीचाही स्वार्थ नसून उलट नुकसानच आहे. आज मी अशा स्थितीत आहे की, कोणतीही व्यावहारिक अगर लौकिकाची गोष्ट मला सहज साध्य करून घेता येणार आहे. माझी ही गर्वोक्ती नसून तो आत्मविश्वासाचा पडसाद आहे (टाळ्या). व्यक्तिच्या हिताच्या दृष्टीने माझा या धर्मांतरात तोटाच आहे. महारात मी शिकलेला बॅरिस्टर म्हणून आज मला जो मान आहे, तो मी खिस्ती किंवा मुसलमान झाल्याने शिल्लक राहणार नाही, कारण त्या समाजात माझ्यासारखे शिकलेले कित्येक पडले आहेत. त्यातच मी एक जसा होईल. तेव्हा माझा त्यात वैयक्तिक फायदा नाही. उलट तो तोटाच आहे. पण ज्यांनी विश्वासाने जबाबदारी टाकली आहे, त्यांना नरकात पिचत ठेवून मला माझा मोठेपणा कायम ठेवावयाचा नाही. तर त्यांच्या उद्धाराकरिता मी माझ्या स्वार्थावर पाणी सोडण्यास तयार आहे (टाळ्या).

आपल्या चळवळीच्या मुळाशी काही तरी खात्रीने आधार आहे यात शंका नाही. नाही तर परस्परविरुद्ध अशा दोन्ही पक्षांकडून ' एक कोट रुपिया देयेगे ' अशी भाषा आली नसती. आपल्या या चळवळीच्या मुळाशी अधिष्ठान खात्रीने आहे.

आजची वेळ मोठी आणीबाणीची आहे. इंग्रजीत ज्याला Now or Never म्हणतात तशी ही वेळ आली आहे. तेव्हा गाफील राहू नका. काळ आणि वेळ यांची गाठ पडली, तरच कार्यभाग होत असतो. तशी ही वेळ आहे. तेव्हा या घडीला आपला निर्धार कायम करा.

आजच्या आज चुटकीसरसे धर्मांतर होऊन सर्व अस्पृश्य समाज दुसऱ्या धर्मात जाईल असे समजण्याइतका मी काही खुळा नाही. तेव्हा मला जे थांबा, कळ काढा असे म्हणतात, त्यांना एवढेच सांगणे आहे की, दहा वीस वर्षांनी जे होणार आहे त्याचीच सुरवात आजच आम्हास केली पाहिजे. कालांतराने आपोआप होईल असे म्हणून स्वस्थ बसण्यात अर्थ नाही. आपोआप काहीच होत नसते. दहा वीस वर्षांनी जी फळे दृष्टीस पडणार आहेत, त्यांचे बी तरी आज लावलेच पाहिजे. ते न लावले तर झाड नाही, आणि फळ तर नाहीच नाही. तेव्हा आपणास जे ' ठैरो ! ' म्हणून सांगतील ते आपले दोस्त नसून दुष्मन आहेत असे समजा व आपल्या निर्धाराप्रमाणे संघटनेच्या कार्याला लागा. (प्रचंड टाळया)

## ८०

# सर्वांनी दृढनिश्चयाने आणि संघटितपणे कूच करावयाचे आहे

मंगळवार ता. ११ फेब्रुवारी १९३६ रोजी अहमदनगर मुक्कामी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण झाले. सभा डॉ. बाबासाहेबांच्या स्वागतार्थ बोलाविली होती. सभेस ५००० वर जनसमूह जमला होता. शहरातील काही प्रमुख मंडळीही हजर होती. आरंभी स्थानिक अस्पृश्य पुढाऱ्यांची भाषणे झाली. त्यात सर्वांनी डॉ. बाबासाहेबांच्या पुढारीपणावरील आपला पूर्ण विश्वास प्रगट करून त्यांची धर्मांतराची घोषणा आपल्याला सर्वतोपरी मान्य असल्याचे जाहीर केले.

बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

धर्मांतराच्या प्रश्नाबद्दल बोलण्यास आज मी आलो नव्हतो. कारण जाहीर केल्याप्रमाणे अस्पृश्यांच्या एका युवक संघाचे उद्‌घाटन करावयाचे एवढेच माझे काम होते. परंतु आज आपण इतके लोक येथे मोठ्या उत्कंठेने जमला आहात. तुम्हा सर्वांची निराशा करणे शक्य नाही. प्रथमतः मी निक्षून सांगतो की, धर्म बदलणे ही बाब थट्टेची नाही किंवा तो तमाशा नाही. ढोलके बडवून नुसता गाजावाजा करण्यासारखी ती गोष्ट नाही. धर्मांतर हा अत्यंत गंभीर स्वरूपाचा विषय आहे. तुम्हाला कदाचित कल्पना नसेल पण चार महिन्यापूर्वी धर्मांतराची भाषा मी जाहीररीतीने बोलल्यापासून मला त्या गोष्टीचा एकसारखा सांगोपांग विचार करावा लागत आहे व तिचे मनन करावे लागत आहे आणि मला सांगायला अभिमान वाटतो की, मी जो निश्चय जाहीर केला आहे त्याबद्दल पश्चात्ताप करण्याचे मला बिलकूल कारण वाटत नाही. तुम्ही देखील या प्रश्नाचा अत्यंत खोल विचार करावयास पाहिजे. रोज पाच मिनिटे तरी तुम्ही त्याचे मनन करा. आता साहजिक असा प्रश्न उभा राहतो की हा निश्चय कृतीत आणण्यास विलंब का ? तुम्हाला मी एक लहानसा दृष्टान्त देतो. त्यावरून आपल्याला कळेल की, हा प्रश्न किती धिमेपणाने सोडविणे प्राप्त आहे. सेनापतीला ज्यावेळेस सैन्याचा तळ हलवून कूच करण्याचा हुकूम द्यावयाचा असतो त्यावेळेस धडधाकट व जवान शिपायांचाच विचार करून भागत नाही तर अपंग, जखमी किंवा आजारी शिपायांची देखील त्यास काळजी वाहून सर्वांना बरोबर नेणे त्यास जरूर असते. कृतनिश्चयाने

---

जनता : २२ फेब्रुवारी १९३६

पुढे पाऊल टाकण्याची वेळ येईल त्या वेळेस आपल्यातील अज्ञ, अशिक्षित किंवा भेकड माणसे पाठीमागे रेंगाळता कामा नयेत. म्हणून सर्वांनी दृढ निश्चयाने एकाच वेळी कूच करावयास लागावयाचे आहे.

आता आजच्या मुख्य कार्यासंबंधी बोलावयाचे म्हणजे तुम्ही तरुणांनी सेवा धर्माचे ध्येय पुढे ठेऊन ही जी संस्था काढली आहे त्या तुमच्या अनुकरणीय कार्याबद्दल मी तुमचे मनःपूर्वक अभिनंदन करतो. तुमच्यामध्ये असे पुष्कळ लोक आहेत की दुसऱ्यांनी हातभार लावल्याशिवाय त्यांची प्रगती होणार नाही. या कार्यात तुम्ही एक गोष्ट कधीही विसरता कामा नये आणि ती ही, ' शील आणि शिक्षण ही जवळ असल्याशिवाय मनुष्याला या जगात काहीच साध्य करून घेता येणार नाही. ' दुसरी गोष्ट तुम्ही लक्षात ठेवली पाहिजे ती ही की, आज तुम्ही स्वातंत्र्य व स्वावलंबन मिळविण्याकरिता लढा चालविला आहे त्यात तुम्हास यशस्वी व्हावयाचे असेल तर तुम्ही बाहेरच्या माणसाच्या मदतीची अपेक्षा न करता परावलंबी जिण्यापासून अगदी अलिप्त राहिले पाहिजे. हे तुम्ही जर करणार नाही तर, ध्यानात ठेवा, तुम्ही परत गुलामगिरीच्या गर्तेत पडाल. ज्या स्पृश्य हिंदुंनी आजपर्यंत तुम्हाला दास्यत्वात खितपत ठेवले ते तुम्हाला आमिष दाखवून मदत करण्याकरिता एका पायावर तयार देखील होतील, पण जर तुम्ही या मोहाला बळी पडलात तर त्यांच्या पायातील तुम्ही घुंगरू बनाल व तुमच्या नशिबाची गुलामगिरी टळणार नाही. महाभारतातील गोष्टी तुम्ही ऐकल्या असतीलच. त्यातील एक कथा या प्रसंगी अत्यंत बोधप्रद होईल. मी ती शेकडो वेळा वाचली आहे. तुम्ही देखील ती वाचली असेल. कदाचित यापुढे तुम्हाला ती वाचावयास मिळणार नाही. कौरव-पांडवांच्या युद्धात तुम्हाला माहीत आहे की, भीष्म व द्रोण हे कौरवांच्या बाजूने लढले ; आणि न्याय व सत्य ही पांडवांच्या बाजूला आहेत याची त्यांना पूर्ण जाणीव असताही त्यांना कौरवांचा पक्ष सोडता येईना. आणि ते का तर त्यांनी कौरवांचे नमक खाल्ले होते. म्हणून तुम्ही कोणाचेही ओशाळे होऊ नका.

शेवटी तुम्हाला एकच गोष्ट सांगावयाची आहे. निरनिराळया अनेक संस्था काढू नका. माझा असा अनुभव आहे की, निरनिराळया संस्था केवळ आपसात दुही माजविण्यास कारणीभूत होतात आणि शेवटी सर्वच विलयाला जातात. सबंध जिल्ह्याची मिळून एकच संघटित संस्था असू द्या व तिच्यामार्फत आपला योग्य मार्ग चोखाळून आपली सुधारणा घडवून आणा.

●●●

८१

# तुम्हाला गुलामाप्रमाणे राहावयाचे आहे की स्वतंत्र माणसाप्रमाणे जगावयाचे आहे ?

कुलाबा जिल्हा उत्तर भाग व ठाणे जिल्हा दक्षिण भाग अस्पृश्यांची संयुक्त परिषदेची पूर्वतयारी करण्याकरिता श्री. गणपत महादेव जाधव उर्फ मडकेबुवा हे मुद्दाम १५-२० दिवस परिषदेच्या भागात प्रचाराकरता खेड्याखेड्यातून हिंडत होते. तसेच परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. रामकृष्ण गंगाराम भातनकर, (कुलाबा जिल्हा लोकल बोर्डाचे सभासद) यांनी पूर्वतयारी मोठ्या उत्साहाने व कसोशीने केली आणि या दोघांच्या श्रमाचे फळ त्यांना मिळाले व परिषदेचे अधिवेशन फेब्रुवारी ता. २९ व मार्च ता. १, १९३६ या दोन दिवशी अगदी यशस्वीरीतीने पार पडले.

परिषदेचे नियोजित अध्यक्ष अखिल हिंदुस्थानातील अस्पृश्य वर्गाचे एकमेव पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे परिषदेचे अध्यक्षपद स्वीकारणार असल्यामुळे परिषदेच्या अधिवेशनास फारच महत्त्व आले होते. डॉ. बाबासाहेब हे शनिवार,* ता. २८ फेब्रुवारी १९३६ रोजी मुंबईहून आपल्या सहकाऱ्यांबरोबर स्पेशल मोटारने सुमारे ४.३० वाजता निघाले. त्यांच्या समवेत मे. सुभेदार विश्राम गंगाराम सवादकर, वयोवृद्ध श्री. संभाजी तुकाराम गायकवाड, सी. ना. शिवतरकर, वनमाळी मास्तर, प्रि. मो. वा. दोंदे, बी. ए., कमलाकांत चित्रे, आर. डी. कवळी, बी.ए., एलएल.बी. वकील, रेवजी बुवा डोळस, दिवाकर पगारे, धुंडिराम गायकवाड, मडकेबुवा जाधव वगैरे मंडळी होती.

पनवेलनजीक तळोजे येथील मंडळींनी मुद्दाम मंडप उभारून डॉ. बाबासाहेबांचे स्वागत करण्याकरिता व्यवस्था केली होती. स्वागताध्यक्ष श्री. रामकृष्णराव भातनकर हे तेथे सामोरे आले होते. स्थानिक मंडळींनी डॉ. बाबासाहेबांस हारतुरे अर्पण केल्यावर मोटार पुढे चालू लागली. पनवेल गावात शिरल्यावर मुसलमान व्यायाम शाळा व अंजुमन इस्लाम या संस्थेतर्फे हार अर्पण करण्यात आले. नंतर सिद्दिकबुड्डा शेट या मुसलमान गृहस्थांनी बाबासाहेबांस पुष्पहार अर्पण केले. नंतर चांभार समाजातील श्री. महादेव लक्ष्मण व महादेव मारुती या गृहस्थांनी त्यांचा सन्मान केला. अशारीतीने प्रेमादराने दिलेल्या पुष्पहाराचा स्वीकार करीत संध्याकाळी सात वाजण्याच्या सुमारास डॉ. बाबासाहेब पनवेल

जनता : ७ मार्च १९३६.

* हा दिवस शुक्रवार असावयास हवा-संपादक.

येथील सुभेदार वाड्यात दाखल झाले. या ठिकाणी त्यांच्या सोईकरिता एक खास मंडप उभारण्यात आला होता. या मंडपात डॉ. बाबासाहेबांचे आगमन झाल्याबरोबर महिलांनी वात्सल्यपूर्ण भावाने त्यांचे स्वागत केले. सौ. लक्ष्मीबाई अर्जुन शिरावले यांनी महिलांतर्फे त्यास कुंकुम तिलक व अक्षता लावून त्यांच्यावरून आरती ओवाळली. हा सुमंगल विधी पाहून प्रेक्षकांच्या हृदयात आनंदलहरी उचंबळू लागल्या व युवकांचा उत्साह द्विगुणित झाला व त्यांच्या मुखातून बाबासाहेबांच्या जयघोषाची वचने स्फूर्तीने बाहेर पडली. नंतर पाहुणे मंडळींचे चहापाणी झाल्यावर ठिकठिकाणहून आलेले प्रतिनिधी व इतर कार्यकर्ते यांच्या भेटी सुरू झाल्या. प्रत्येक ठिकाणची मंडळी आपली दुःखे निवेदन करीत होती. त्यात प्रामुख्याने भोर संस्थानातील सुधागड तालुक्यातील लोक होते.

एका गावच्या महारवाड्यावर स्पृश्य हिंदूंच्या अनेकविध कारवायांमुळे सध्या चालू असलेल्या छळासंबंधी माहिती गोळा करावी व तेथील लोकांना मार्गदर्शन व्हावे म्हणून श्री. बी. टी. तांबे यांची डॉ. बाबासाहेबांनी खास रवानगी केली होती. श्री. तांबे हे एक उत्साही व शिपायी बाण्याचे कार्यकर्ते आहेत. त्यांच्या येण्याने लोकांच्या मनातील भीती नाहीशी होऊन ते संकटास तोंड देण्यास तयार झाले. या गावच्या काही लोकांना बरोबर घेऊन बाबासाहेबांचा सल्ला घेण्याकरता ते पनवेल येथे आले होते.

शनिवारी विषयनियामक कमिटीची बैठक होऊन दुसऱ्या दिवसाच्या अधिवेशनाकरिता नऊ ठराव मुक्रर करण्यात आले. गावोगावची मंडळी शुक्रवार पासून येत होती व शनिवारी रात्री लोकसमुदाय सुमारे २,००० वर जमला होता. पनवेल व नजीकच्या प्रदेशात अस्पृश्य लोकसंख्या अगदी थोडी आहे. गावात एखाद दुसरे घर. या मानाने दोन हजार ही संख्या फार मोठीच होय. या लोकसमुदायाचे मनोरंजन करण्याकरिता पोवाडे व जलसा यांची योजना करण्यात आली होती. श्री. घेगडे यांचा नाशिक सत्याग्रहावरील हृदयस्पर्शी पोवाडा श्री. द्वारकाकांत शेजवळ यांनी आपल्या सुस्वर स्फूर्तीदायक आवाजात गायिला. लोकशिक्षण हेच ध्येय पुढे ठेऊन ज्या काही जलसा मंडळींनी आपली समाज सेवा अव्याहत व परिश्रमपूर्वक चालविली आहे असे दोन फड मुंबईहून मुद्दाम बोलावून आणले होते. ते म्हणजे दलितोद्धारक सुस्वर जलसा व नाशिक जिल्हा युवक संघ जलसा. या दोन मंडळींनी रात्रभर आपली कामगिरी आळीपाळीने चालू ठेवली होती.

दुसरे दिवशी सकाळी ९-३० वाजता जमलेल्या मंडळींची मिरवणूक काढण्यात आली. आरंभी श्री. वसंतराव भातनकर यांनी लोकांना शिस्तीचे महत्त्व समजावून दिले व मिरवणूक शांततेने पार पाडण्याची विनंती केली.

नंतर तीन-तीन माणसांची एक अशारीतीने रांगा लावण्यात आल्या. मुंबईचे श्री. अर्जुनराव साळवी यांनी सर्व लोकास शिस्तीने उभे केले व नंतर मिरवणुकीस सुरवात झाली. अग्रभागी पनवेल हनुमान व्यायाम शाळेचा स्काऊटचा बँड व मध्यभागी स्थानिक वाद्ये वाजत होती.

मिरवणूक कायस्थ आळी, ब्राह्मण आळी, बाजार वगैरे गावातील प्रमुख वस्तीतील रस्त्यावरून सभेच्या ठिकाणी सुमारे ११-३० वाजता हजर झाली. वाटेत मिरवणूक एकसारखी वाढत जात होती. ' आंबेडकर जिंदाबाद ', ' हिंदू समाजाचा धिक्कार असो ' ' भट्टशाही नष्ट होवो ' ' आंबेडकर कौन है ? दलितोंका राजा है ' ' डॉ. बाबासाहेब आंबेडकरकी जय ' वगैरे जयघोष रस्त्यात एकसारखे चालू होते. मिरवणुकीच्या अग्रभागी श्री. संभाजी गायकवाड, श्री. कमलाकांत चित्रे, दादासाहेब पगारे, वनमाळी मास्तर, भिकाजी धोंडेराव, वसंत भातनकर, गोविंद बिवकर, भीमराव करडक, रूपाजी पगारे वगैरे मंडळी होती. श्री. साळवी व त्यांचे इतर तरुण मित्र फिरते राहून मिरवणुकीचे व्यवस्थित स्वरूप कायम ठेवीत होते. पनवेलसारख्या लहानशा शहरात ही मिरवणूक म्हणजे एक अद्‌भुत गोष्ट होती. काही कालापूर्वी गटाराच्या बाजूने थबकत थबकत व भीतभीत पावले टाकीत चाललेला महार आज बिनदिक्कत छातीठोकपणे आपल्या परमप्रिय पुढाऱ्याचा व आपल्या वर्गाचा जयघोष करीत राजरस्त्यातून मिरवताना पाहून लोकांच्या हृदयात धडकी उत्पन्न झाल्याशिवाय राहिली नाही. महाराच्या सावलीस उभे न राहणारे लोक व गाडी घोडे या जमावास पाहून वाटेत थबकत होते व गटाराजवळ उभे राहून ' महारास ' रस्ता देत होते. हे दृश्य पाहून कालगतीचे चक्र फिरले असून हजारो वर्षे गांजून गेलेल्या हतभागी दलित वर्गाच्या भाग्यशाली कालाचा अरुणोदय झाला आहे, असे तुमच्या प्रतिनिधीस वाटल्यास त्यात नवल ते काय ?

सभामंडप गावानजीकच्या आंबराईत गाडेश्वरी नदीच्या काठावर उभारला होता. मिरवणुकीनंतर सर्व लोकसमुदायास शिस्तवार बसविण्यात आले. सभा सुरू होण्यापूर्वी सभामंडप चिक्कार भरून गेला होता. गावातील ४०-४५ स्पृश्य हिंदू गृहस्थ हजर होते. थोड्याच वेळात डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या मित्रमंडळीसह सभास्थानी हजर झाले. श्री. अनंतराव चित्रे महाडहून व गोविंदराव वरघरकर मुद्दाम परिषदेकरिता यावेळी हजर झाले. बाबासाहेबांना सर्व मंडळींनी उत्थापन देऊन त्यांच्या जयजयकारात त्यांचे स्वागत केले. लागलीच मुलींचे कर्णमधुर स्वागतपर गायन झाले आणि स्वागताध्यक्षांनी आपल्या भाषणास सुरवात केली.

हे भाषण आटोपल्याबरोबर नियोजित अध्यक्ष डॉ. बाबासाहेब यांस पुष्पहार अर्पण करण्यात आले.

डॉ. बाबासाहेब बोलण्यास उभे राहिल्याबरोबर टाळयांचा कडकडाट सुरू झाला. नंतर परिषदेचे अध्यक्षस्थान दिल्याबद्दल आभार व्यक्त करून त्यांनी आपल्या भाषणास आरंभ केला. ते म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुजनहो,

हा भाग मुंबईच्या नजीक असूनही मला सभेकरिता म्हणून इकडे येता आले नाही याबद्दल मला खेद वाटतो. अनेक व्यवसायामुळे मी आपली भेट घेऊ शकलो नाही. हजारो ठिकाणाहून लोकजागृतीच्या कामाकरिता मला आमंत्रणे येतात, परंतु सर्वांचे समाधान करणे मला एकट्याला अशक्य आहे. मी काही शतमुखी रावण नाही किंवा अंगास राख फासून संन्यासी झालेला नाही. तुमच्याप्रमाणेच मला स्वतःला पोटाचा उद्योग करावा लागतो. तुमच्या सारखाच परिस्थितीशी झगडणारा मी माणूस आहे.

आजचा प्रसंग जरी महत्त्वाचा असला तरी फार पाल्हाळीक भाषण करून आपल्याला मी तिष्ठत बसविणार नाही. मी फक्त थोड्या मुद्यांविषयी बोलणार आहे. विशेषतः तुमचे कर्तव्य काय आहे व तुमचा वाटाड्या म्हणून माझे काय कर्तव्य आहे हे मी आज सांगणार आहे.

सद्‌गृहस्थहो, तुम्ही आज हजारो वर्षे या देशात वास्तव्य करीत आहा. तसेच तुमचे शेजारी म्हणून इतर लोकही येथे नांदत आहेत. तुमच्या स्थितीचे अवलोकन करून तुमच्या शेजाऱ्यांची स्थिती तुम्ही नीट ध्यानात आणा. तुमच्या दोघांच्या परिस्थितींची तुलना करा. तुम्हाला पहिली गोष्ट दिसून येईल ती ही की, तुम्ही इतर समाजापेक्षा दरिद्री आहात. इतर समाजांना नानाप्रकारचे उद्योग करून भाकरी मिळविण्याचे मार्ग मोकळे असल्यामुळे, त्यांची स्थिती तुमच्यापेक्षा अधिक चांगली आहे. सभेला जावयाचे म्हणून तुम्ही आज आपली नेहमीची लक्तरे बाजूला ठेवून जरा बऱ्यापैकी कपडे अंगात घालून आलेले दिसता. तुम्ही सभेकरिता नीटनेटके आलात याबद्दल मला संतोष वाटतो , पण तुमची खरी स्थिती काय आहे याची तुमच्याच हाडामासाच्या मला पूर्ण जाणीव आहे. आठवड्यातून तीन दिवस पोटभर अन्न मिळण्याची तुम्हाला मारामार. अंगावर एखादा फाटका सदरा व एक लंगोटी. ती लंगोटी देखील लवकर बदलता येत नाही. अशी तुमची कंगाल स्थिती. त्याच्या उलट पांढरपेशा वर्गाची काय स्थिती आहे ? तुमच्या मानाने ते शतपट सुखी आहेत. त्यांच्या घरावर कौले, तर तुमच्या झोपडीवर पुरेसे बांबू किंवा झावळयाही टाकावयास तुम्हाला मिळत नाहीत. त्यांच्या घरात पितळेची भांडी

तर तुमच्या घरात मातीची मडकी, अशी तुमची दैनावस्था ! याचे पहिले कारण त्यांना जी उपजीविकेची साधने खुली आहेत ती तुम्हाला खुली नाहीत. तुम्हाला आज डेप्युटी कलेक्टर, मामलेदार किंवा पोलीस ऑफिसर वगैरे बड्या पगाराच्या जागा मिळत नाहीत. का ? तर तुमच्यामध्ये सुशिक्षित तरुण नाहीत म्हणून. असे जरी गृहीत धरले तरी या अंमलदारांपेक्षा कमी दर्जाच्या अनेक नोकऱ्या आहेत. त्या देखील तुम्हास मिळत नाहीत. तेथेही तुम्हास मज्जाव आहे. साधी पोलिसाची नोकरी घ्या. ती तुम्हास का मिळत नाही ? ह्या जागेची जबाबदारी पार पाडण्यास काही फार शिक्षण लागत नाही. २-३ इयत्ता शिकणाऱ्या स्पृश्य समाजातील कोणाही माणसास ती नोकरी मिळू शकते , पण तुम्हास ती जागा मिळत नाही. तुमच्यात प्रामाणिकपणाचा किंवा सचोटीचा अभाव आहे असे म्हणावे तर आज लाखो रुपयांचा वसूल महाराकडून केला जात आहे. या वसुलाची ने-आण महारच आज कित्येक वर्षे करीत आले आहेत. पण महाराने या वसुलात अफरातफर करून दगलबाजी केली आहे, असे कोणाच्याही ऐकिवात आले का ? याच्याउलट मामलेदारी सारख्या वरिष्ठ दर्जाच्या नोकऱ्या करणाऱ्या स्पृश्य समाजातील लोकांकडून अनेक दगलबाज्या झाल्या आहेत. त्याचे दाखले दाखविता येतील. हे झाले नोकऱ्यासंबंधी. इतर लहानसहान धंदे घ्या. तुम्ही दुधाचा, दह्याचा किंवा लोणी विकण्याचा धंदा करू म्हणाल तर तुमचे दूध कोणी घेणार नाही व तुमच्या हातच्या लोण्याने गिऱ्हाईकांचा धर्म बुडेल. तुम्ही भाजी विकण्याचा धंदा करावयास जा. तरी तीच गत. तुम्हाला डोके वर करावयास म्हणून कोठेच जागा नाही. अशी तुमची आज शोचनीय परिस्थिती आहे. तुम्ही या स्थितीचा कधी विचार केला आहे का ? असा मी तुम्हास प्रश्न विचारतो. इतर लोक आपल्या मुलाबाळांची नीट निगा राखून त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था करतात व त्यामुळे ते आपली स्थिती सुधारू शकतात. तुम्हाला तसे का करता येत नाही. तुमचा सर्व बाजूनी कोंडमारा होतो. या प्रश्नांचा तुम्ही आज विचार करावयास पाहिजे. तुमच्या आड येणाऱ्या ज्या गोष्टी आहेत त्या कशा दूर करता येतील हे तुम्ही पाहिले पाहिजे. तुम्हास मला असे विचारावेसे वाटते की, तुम्हास आपली स्थिती सुधारावयाची आहे की नाही ? आजपर्यंत तुम्ही या चिखलात लोळत पडला तसेच तुम्हास राहावयाचे आहे का ? ज्या ठिकाणी पायातील जोड्याइतकी तुमची किंमत नाही त्याच ठिकाणी तुम्हास कुजत राहावयाचे आहे का ? थोडक्यात सांगावयाचे म्हणजे तुम्हाला गुलामाप्रमाणे राहावयाचे आहे की स्वतंत्र माणसाप्रमाणे जगावयाचे आहे ? याचा आज तुम्हाला विचार करावयाचा आहे. तुमच्या मार्गात येणाऱ्या अडचणी कशा दूर करता येतील हे तुम्हास पाहावयाचे आहे.

प्रामुख्याने आज तुमच्यापुढे तीन अडचणी आहेत. पहिली, तुमचे दारिद्र्य. दुसरी, तुमची असहाय्यता. तिसरी, तुमचे मनोदौर्बल्य. मनाचा कमकुवतपणा. तुम्ही सर्वजण दारिद्र्याने गांजून गेला आहा आणि त्यामुळे परावलंबी बनला आहात. स्वतंत्रवृत्तीने तुम्हास काहीच करता येत नाही. तुम्ही साध्या माणुसकीकरिता झगडावयास लागला तर स्पृश्य लोकांकडून तुम्हाला जोराचा विरोध होतो आणि तुमचे जीवित सर्वस्वी त्यांवरच अवलंबून असल्यामुळे तुमच्या लढ्यापासून परावृत्त करण्याकरता ते तुम्हास हरएक प्रकारे नाडतात. त्यांनी भाकरीचा तुकडा दिला तर तुम्हास पोटास अन्न मिळणार. म्हणून हे परावलंबी जिणे नाहीसे करण्याच्या उद्योगास तुम्हास लागले पाहिजे.

दुसरी गोष्ट म्हणजे तुमची असहाय्य स्थिती. तुम्हास कोणाचे सहाय्य नाही. मित्र म्हणून तुमच्या पाठीमागे उभे राहण्यास आज कोणीच तयार नाही. तुमच्यात व गावकऱ्यात तंटा उपस्थित झाल्यास तुमच्या मदतीस कोणीच धावून येत नाही. या देशात हिंदू समाजाशिवाय मुसलमान, ख्रिस्ती व शीख असे समाज आहेत, पण मुसलमान किंवा खिस्ती तुमच्या मदतीस धाऊन येत नाहीत. ते का धावून येत नाहीत याचा तुम्ही नीट विचार करा. ज्या धर्मात आपण जन्मास आलो , ज्या धर्माची तत्त्वे आपण पाळतो व ज्या धर्माला आपण आपला म्हणून म्हणतो तोच आपल्याला आज गांजीत आहे. त्याची गांजणूक आपण असहाय्य स्थितीत किती दिवस सहन करणार ? तुम्हाला मी विचारतो की, कोणाचीही मदत न घेता तुम्ही हिंदुंच्या लढ्यात कधी तरी यशस्वी होऊ शकाल का ? ज्यांच्यावर तुम्ही जगता ते तुम्हाला कधीतरी माणुसकीचे हक्क देतील अशी आशा बाळगण्याचे तुम्हास कारण नाही. मी तुम्हास खात्रीपूर्वक असे सांगतो की हिंदुंपासून तुमचा कधीही फायदा होणार नाही. मुलाच्या प्रत्यक्ष बापाने त्यास विहिरीत ढकलून दिल्यावर त्यास हात देऊन बाहेर काढणारा मनुष्य त्या मुलाचा मित्र की जीव घेण्यास प्रवृत्त झालेला बाप त्याचा मित्र ? तेव्हा अशा प्रकारे हात देणारा मित्र तुम्हास शोधून काढावयाचा आहे.

आज मुसलमानांच्या वाटेस हिंदू का जात नाहीत ? ते त्यांच्या धर्माचा द्वेष करतात, निंदा करतात पण गावातील दोन मुसलमानांच्या घरातील पोरास हात लावण्याची हिंदुंची ताकद नाही. याचे कारण काय ? या मुसलमानाच्या पोरास जर हात लावला तर हिंदुंना माहीत आहे की, हिंदुस्थानातील सर्व मुसलमान समाज त्याचे मदतीस धावत येईल व हिंदुंचा समाचार घेईल. पण हिंदु लोक तुम्हास गांजतात याचे कारण हेच की, तुमच्या मदतीस आज कोणीच धावून येत नाही.

पुष्कळ लोक तुम्हाला सांगतात की, तुम्ही स्वतःच्या पायावर उभे रहा, परंतु ज्याचे दोनही पाय कापले आहेत तो उभा कसा राहणार ? तुम्ही कोणाचा तरी हात धरूनच उभे राहिले पाहिजे आणि तेव्हाच तुम्ही सामर्थ्यवान बनाल. तुमच्या आजच्या असहाय्य परिस्थितीत जो तुम्हाला हात देईल तोच तुमचा खरा मित्र व वाली आणि म्हणून मी म्हणतो की, या करताच तुम्हाला धर्म बदलणे प्राप्त आहे. माणसाला धर्म प्रिय नाही. माणसाला माणुसकी प्रिय आहे.

कातकऱ्यासारखी अत्यंत मागासलेली जात ; पण तिलादेखील हिंदू धर्मात माणुसकी आहे. त्यांना स्पृश्यांच्या घरात जाता येते , पण तुम्हाला मात्र दारात देखील मज्जाव. तुमच्या हातचे दूध देखील घ्यावयास कोणी तयार नाही. नोकऱ्या करून किंवा इतर धंदे करून आपली उन्नती करून घेण्याच्या जेवढ्या म्हणून वाटा आहेत त्या सर्व तुम्हाला बंद आहेत. मुसलमान किंवा खिस्ती या धर्मातील लोक ज्या नोकऱ्या करतात त्या तुम्ही करू म्हटल्यास तुम्हास मात्र हिंदुंचा विरोध , म्हणून तुम्हाला मी पुन्हा सांगतो की, या हिंदू धर्मात राहून तुम्हाला आपली उन्नती करून घेणे शक्य नाही. तुम्ही हिंदू आहात म्हणूनच तुमची ही कुचंबणूक. तुम्ही मुसलमान असता, खिस्ती असता किंवा शीख असता तर या सर्व वाटा तुम्हास खुल्या असत्या व तुम्ही काही अंशी आपली आर्थिक सुधारणा करू शकला असता, पण जोपर्यंत तुम्ही हिंदू आहात तोपर्यंत जाचणुकीची ही पकड व त्यांचे वर्चस्वही कधीच दूर होणार नाहीत आणि यामुळे तुम्ही जिवंत नरकात खितपत पडला आहात. म्हणून तुम्ही या परिस्थितीचा नीट विचार करा. तुम्ही या आत्मघातकी धर्माला किती दिवस कवटाळून बसणार ? मेल्यानंतर तुम्हाला स्वर्ग पाहिजे की जिवंतपणी स्वर्गीय सुख तुम्हाला हवे ? मला तर याच जन्मी मोक्ष म्हणजे माणुसकी पाहिजे. दुसऱ्या जन्माशी किंवा काल्पनिक स्वर्गाशी मला काही कर्तव्य नाही. तिसरी गोष्ट अशी की, या हिंदू धर्माच्या खुळचट शिकवणुकीने तुमची मने मारली गेली आहेत. ज्याप्रमाणे सर्प पाहिल्याबरोबर एखादा मनुष्य गर्भगळीत होतो आणि त्याच्या नाड्या आखडतात, त्याचप्रमाणे तुमची आज स्थिती आहे. तुम्हाला असे वाटते की. आपण अगदी नीच आहो. हलके आहो. तुम्हाला हिंदू धर्म अतिशूद्र मानतो आणि तुम्ही आपल्या स्वतःला शूद्र मानता. त्यामुळे रस्त्याने चालताना देखील तुम्ही स्पृश्यांजवळून न जाता बाजूस होता. याचे कारण तुमचे मन मेलेले आहे. तुमचा स्वाभिमान निजलेला आहे. तुम्हाला आपण माणूस आहो असे वाटत नाही. त्यामुळे आपल्यावर जुलूम करणाऱ्या हिंदुंबरोबर झगडा करणे हा विचार तुम्हाला शिवत नाही. तुम्हाला मी निक्षून सांगतो की, तुम्ही जोपर्यंत हिंदू धर्माच्या चौकटीत आहात, जोपर्यंत तुमच्या हातापायात या बेड्या आहेत, जोपर्यंत तुमच्या मनावर या धर्मातील शिकवणुकीचा पगडा आहे, तोपर्यंत तुम्ही अगदी कुचकामीच राहणार.

तुम्ही सर्वजन शेतकरी आहात. झाडे कोणत्या परिस्थितीत फोफावतात हे तुम्ही चांगले जाणता. तुम्हाला माहीत आहे की, एका झाडाच्या सावलीखाली दुसरे झाड जगत नाही व जगले तर खुरटे झाल्याशिवाय राहत नाही. आंब्याचे कलम लावावयाचे झाले तर एकएका कलमामध्ये १५-२० फुटांचे अंतर ठेवावे लागते. तरच त्या कलमांचा चांगला मोहोर फुटून गोड फळे येतात. याचे कारण काय ? मोठ्या झाडाच्या छायेखाली लहान झाडाला पुरेसा उजेड मिळत नाही. त्यावर सूर्याचा पूर्ण प्रकाश पडत नाही. इतर पोषक द्रव्येही त्यास पुरेशी मिळत नाहीत. या लहान झाडाप्रमाणेच तुमची गत झालेली आहे. तुम्ही हिंदू लोकांच्या छायेखाली राहिल्यामुळे तुमची वाढ झाली नाही. तुम्ही खुरट्या झाडाप्रमाणे झाला आहात. सद्‌गृहस्थहो, इतके दिवस तुम्ही झोपलेले होता. इतर लोकांनी या जगात काय लुटालूट केली याचा आता आपण विचार केला पाहिजे.

मी सांगितलेल्या तीन अडचणी दूर करण्याचा तुम्ही जर मनापासून प्रयत्न केलात तर तुमची उन्नती झाल्याशिवाय राहणार नाही. आता पहिली अडचण म्हणजे तुमचे ' दारिद्र्य. ' हे दारिद्र्य घालविणे तुमच्या हाती नाही. पण, आपण दोघांनीही ते दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. या बाबतीत तुमच्यापेक्षा माझ्यावर अधिक जबाबदारी आहे. मी व माझे इतर सहकारी यांचेवर ती जबाबदारी आहे. आर्थिक स्थिती सुधारण्याकरता राजकीय हक्क आपल्याला मिळविले पाहिजेत. आज तुम्हाला कायदेमंडळात १५ जागा मिळाल्या आहेत. त्या जागांवर जाणाऱ्या प्रतिनिधींवर हरएक प्रकारे तुमची आर्थिक परिस्थिती सुधारण्याची जबाबदारी आहे. तुम्ही मात्र आपल्या स्थितीची पूर्ण जाणीव देऊन या तुमच्या म्होरक्यांना आपले कर्तव्य पार पाडण्यास भाग पाडले पाहिजे.

दुसरी व तिसरी अडचण म्हणजे तुमची ' असहाय्यता ' व तुमच्या ' मनाचा कमकुवतपणा '. हा दूर करणे मात्र सर्वस्वी तुमच्या हातात आहे. मी माझे कर्तव्य म्हणून ती अडचण कशी दूर करता येईल ते सांगेन. त्याप्रमाणे वागणे न वागणे हे तुमच्या हातात आहे. माझ्या मताप्रमाणे या दोनही अडचणी तुम्ही हिंदू धर्म सोडल्याने दूर होणाऱ्या आहेत. मी तुम्हाला सांगितले आहे की, तुमची असहाय्यता दूर करण्याकरिता तुम्ही दुसऱ्या धर्मातील समाजास मित्र करावयास पाहिजे. तसेच तुमचे मनोदौर्बल्य नाहिसे करण्याकरिता तुम्हाला दुसऱ्या धर्माच्या शिकवणुकीची कास धरल्याशिवाय गत्यंतर नाही. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे या दोनही अडचणींवर तोडगा म्हणजे ' धर्मांतर '. ते करण्यास तुम्ही आता तयार झाले पाहिजे. केव्हा धर्मांतर करावयाचे, कोणत्या धर्मात जावयाचे हे मी योग्य वेळी सांगेन. माझे म्हणणे तुम्हाला योग्य वाटत असेल तर माझ्या

मागे या. नसेल तर खुशाल याच धर्मात राहा व खितपत पडा. ज्याअर्थी मी तुमच्या जातीत जन्माला आलो आहे त्याअर्थी माझे कर्तव्य म्हणून हे मी तुम्हाला सांगत आहे. तुमच्या बऱ्यावाईटाची जबाबदारी जर तुम्ही माझेवर टाकीत असाल तर मी सांगेन तसे वागण्यास तुम्ही तयार झाले पाहिजे व मी जिकडे जाईन तिकडे माझ्यामागे आले पाहिजे.

शेवटी तुम्हास माझे असे सांगणे आहे की, हा प्रसंग फार आणीबाणीचा आहे. आपण काय करावयाचे हे आज निश्चित केले पाहिजे. ५-१० वर्षांची मुदत तुम्हा सर्वास दिली आहे. त्याचे कारण एवढेच की, हा प्रश्न फार मोठा आहे, म्हणून त्याची वासलात लागणे सोपे नाही. तुमच्यापैकी निम्मे अर्धेच लोक जर धर्मांतर करावयास तयार झाले तर आपला फायदा होणार नाही. सर्व जणांनीच ते केले पाहिजे आणि त्या करताच ही ५-१० वर्षाची मुदत दिली आहे. या अवधीत तुमच्या मनावर बसलेला हा हिंदू धर्माचा पगडा दूर केला पाहिजे. एक गोष्ट ध्यानात ठेवा. ज्या वेळेस मला वाटेल की, तुम्ही धर्मांतर करावयास तयार नाही त्या वेळेस असे समजा की, तुमची व माझी फारकत झाली. मी मात्र या कुचकामी व निरुपयोगी धर्मातून जाणार हे खास.



# ८२

# चळवळीचा फायदा सर्वच अस्पृश्यांना झाला

शनिवार, तारीख २९ फेब्रुवारी १९३६ रोजी रात्रौ साडे नऊ वाजता श्री. राघोबा वनमाळी यांचे अध्यक्षतेखाली पनवेल तालुक्यातील चांभारांची एक सभा पनवेल येथे भरून तीत खालील ठराव पास करण्यात आले.–

**ठराव १ ला.**––बादशहा पंचम जॉर्ज यांचे निधनाबद्दल दुःख व नवे बादशाहा आठवे एडवर्ड यांचे अभिनंदन

**ठराव २ रा.**––डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचेवर पूर्ण विश्वास.

**ठराव ३ रा.**––मु. येवले, जिल्हा नाशिक येथील धर्मांतराचे ठरावास पाठिंबा.

या सभेस श्री. शिवतरकर, गवरूजी उरणकर, महादेव कल्याणकर, मारुती मोहोकर, महादेव महाडीक वगैरे वक्त्यांची भाषणे झाली. शेवटी अध्यक्षांनी डॉ. आंबेडकर व त्यांचे धर्मांतराचे धोरण या बाबतीत समारोपादाखल परिणामकारक असे भाषण केल्यावर सभा बरखास्त झाली.

## पानसुपारी समारंभ

रविवार, तारीख १ मार्च १९३६ रोजी अस्पृश्य परिषदेचे काम आटोपल्यावर पनवेल येथील चांभार लोकांनी डॉ. आंबेडकरांना पानसुपारी आमंत्रण दिले. त्यावेळी त्यांना वेळ नव्हता तरी ते त्यांनी आनंदाने स्वीकारले. सदर प्रसंगी श्री. वनमाळी यांनी ग्रामस्थ लोकांच्या आग्रहावरून त्यांचेतर्फे छोटेसे भाषण केले. त्यात त्यांनी सांगितले की,

'' डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी येथील चांभार लोकांच्या आमंत्रणास मान देऊन आपल्या पुण्य दर्शनाचा लाभ त्यास दिला याबद्दल त्यांना फार आनंद होऊन ते आपले फार आभारी आहेत. या ठिकाणच्या चांभार महारात कोणत्याही प्रकारचा मतभेद नसून येथील चांभारांनी डॉक्टरांना येताना पुष्पहार घालून त्यांचे स्वागत केले. तसेच तेथे निघालेल्या मिरवणुकीच्या वेळी त्यांच्या फोटोस हार घालून त्यांच्यावरील आपले प्रेम व्यक्त केले. परिषदेच्या खुल्या अधिवेशनात स्त्री-पुरुषांनी खुल्या दिलाने भाग घेऊन धर्मांतराच्या ठरावास पाठिंबाही दिला आहे. शिवाय काल रात्री येथे एक स्वतंत्र सभा भरवून त्यांच्यावरील विश्वास

---

जनता : ७ मार्च १९३६.

जाहीर करून धर्मांतराबाबत स्वतंत्र ठराव करण्यात आला. आता आपणास आमची हीच विनंती आहे की, जसे आपण आपल्या समाजाच्या उन्नतीप्रित्यर्थ झटता तसे आमच्याकडेही विशेष लक्ष असू द्या. आमच्यातले काही लोक आपणास विरोध करतात. त्यांच्यावर आमचा विश्वास नाही. आपणच आमचे खरे पुढारी आहात.'' अशा आशयाचे श्री. वनमाळी यांचे भाषण झाल्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी भाषण केले. त्यात ते म्हणाले,

आपण मला या ठिकाणी बोलावून माझा जो गौरव केला त्याबद्दल मी आपले प्रथम आभार मानतो. मला आता काही बोलावयाचे नव्हते, पण रा. वनमाळी यांच्या भाषणात जो थोडा ध्वनी निघाला त्यावरून आपणास माझ्याबद्दल थोडी शंका आल्याचे मला वाटते , परंतु मी आपणास असे सांगतो की, माझी चळवळ अमुक एका वर्गाची किंवा अमुक एका जातीच्या उन्नतीकरता आहे असे नसून ती सर्व अस्पृश्यांच्या उन्नतीकरता आहे. दुर्दैवाची किंवा सुदैवाची गोष्ट ही की, ती चळवळ एकट्या महार समाजाने चालविली आहे. इतर जातींनी जर ती हाती घेतली तर मी महार जातीस सांगेन की, तुम्ही स्वस्थ बसा. आतापर्यंत जी चळवळ झाली तिचा फायदा एकट्या महार जातीला न होता चांभारांना व मांगानाही झाला आहे. शाळा खात्यात सुपरवायझर नेमा म्हणून आम्ही मुंबई म्युनिसीपालिटीस सांगितले. म्युनिसीपालिटीने सुपरवायझर नेमले ते चांभार व सध्या ते गृहस्थ हे माझ्या शेजारी बसले आहेत (मे. शिवतरकरांकडे बोट दाखवून). पोलीस ट्रेनिंग कॉलेजात अस्पृश्य लोक घ्यावे असे सरकारास सांगितले तेव्हा सरकारने घेतले त्यातही महार नसून चांभार व मांगच आहेत. या उदाहरणावरून माझी चळवळ महारांच्याच हिताची कशी हे मला समजत नाही. आता चालू चळवळीबद्दल थोडा खुलासा करतो. अस्पृश्यातील सर्व जातींनी धर्मांतर करावे अशी माझी इच्छा आहे, परंतु इतर जातींनी माझे न ऐकता त्या जर स्वस्थ बसल्या तर माझा नाईलाज आहे , परंतु ज्या जाती मागे राहातील त्यांची स्थिती फार केविलवाणी होईल हेही मी तुम्हास सांगून ठेवतो. कारण मग अस्पृश्यता निवारण्याचा लढा तुम्हास लढावा लागेल व ते फार कठीण काम होईल. कारण महारांची लोकसंख्या ८० टक्के आहे. हे इतके बहुसंख्य लोक तुमच्यातून निघून गेल्यावर बाकीचे लोक काय करू शकतील ? आजच इतक्या चळवळी करूनसुद्धा काही दाद लागत नाही तर पुढे काय लागणार ? तेव्हा तुम्ही बहुजन समाजाबरोबर धर्मांतर करण्यातच तुमचे हित आहे. महार जातीकडून तुमच्याबाबतीत काही अन्याय झाला तर मला सांगा, मी त्याचा योग्य परामर्श घेईन.

●●●

## ८३

# मत विकणे हा गुन्हा तर आहेच शिवाय तो आत्मघातही आहे

ठाणे जिल्हा अस्पृश्य परिषदेचे पहिले अधिवेशन अखिल अस्पृश्य समाजाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली ठाणे जिल्ह्यातील पालघर नजीकच्या वेढी या गावी ता. २९ मार्च १९३६ रोजी होणार असल्यामुळे या परिषदेसाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे श्री. कमलाकांत चित्रे, संभाजीराव गायकवाड, श्री. वाघ, श्री. मडकेबुवा जाधव, श्री. गायकवाड, श्री. अनंतराव चित्रे, श्री. शांताराम पोतनीस, श्री. चांगदेव मोहिते, श्री. बापुसाहेब सहस्त्रबुद्धे, श्री. रामचंद्र मोरे, श्री. केणी, जे. पी. वनमाळी मास्तर यांचेसह सकाळी वेढी गावास जाण्यास मुंबईहून निघाले. वसई स्टेशनवर चांभार समाजाने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे स्वागत करून पुष्पहार अर्पण करून त्यांचा जयजयकार केला. दुपारी ११ वाजता वेढी गावानजीकच्या सपाला गावाच्या स्टेशनवर उतरले. सपाला स्टेशनवर परिषदेसाठी मुंबईहून आलेल्या सर्व मंडळींचे ठाणे जिल्ह्यातील अस्पृश्य समाजाने मोठ्या आदराने स्वागत करून डॉ. आंबेडकरांचे नावाने जयघोष केला.

सपाला स्टेशनपासून वेढी हे गाव अदमासे ३/४ मैल दूर आहे. तेथे मुंबईहून परिषदेस आलेल्या मंडळीस नेण्यासाठी मोटार लॉरीची व टांग्यांची १-२ दिवसापूर्वीच आगाऊ तजवीज ठाणे जिल्ह्यातील अस्पृश्य समाजाने करून ठेवून भाड्याचा बयाणाही वाहनवाल्यास आगाऊच देऊन ठेवला होता. परंतु ता. २८ मार्च १९३६ रोजी रात्री म्हणजे परिषदेच्या आदले दिवशी सपाला येथील वाहनवाले लोकांची बैठक स्पृश्य लोकांच्या चिथावणीवरून होऊन त्यांनी डॉ. आंबेडकर व त्यांच्या बरोबरच्या माणसांना आपले वाहनातून बसवून नेऊ नये म्हणून ठराव करून ठेविले. सपाला स्टेशनबाहेर डॉ. आंबेडकर व परिषदेकरिता आलेल्या मंडळीसह वाहनात बसण्यास आले. परंतु मोटारवाल्याने आपली मोटार नादुरुस्त असल्याचे सांगितले. दुसरी मोटार तर स्टेशनबाहेर नव्हतीच. तेव्हा सर्व मंडळी टांग्यात बसू लागली, परंतु टांगेवाल्यांनी अस्पृश्य मंडळींना आमच्या टांग्यात बसवून आम्ही नेणार नाही, आजपर्यंत आम्ही कधीही अस्पृश्य माणसांना आमच्या टांग्यात बसविले नाही व तुमचे भाडे न करण्याचा आमचा संप आहे असे स्पष्ट सांगितले. टांगेवाल्यांची ही संपाची भाषा ऐकून सर्व मंडळी पायानेच वेढी गावी जाण्याचा विचार करू लागली. इतक्यात संपात सामील असलेला एक मुसलमान टांगेवाला संपातून फुटून निघाला व आपण भाडे

जनता : ४ एप्रिल १९३६.

करण्यास तयार आहोत असे त्याने सांगितले. संपातून एक टांगेवाला फुटल्यावर दुसरे ३ भंडारी जातीचे टांगेवालेही संपातून बाहेर पडून भाडे करण्यास तयार झाले. अशारीतीने चार टांग्यातून डॉ. बाबासाहेब आंबेडकर व थोडीशी मंडळी वेढीस रवाना झाली. आपण अस्पृश्य म्हणून आज आपणाशी या टांगेवाल्यांनी अशी वागणूक केली हे पाहून हिंदू धर्मातल्या आपल्या स्थितीबद्दल अस्पृश्य मंडळींना खेद वाटल्याखेरीज राहिला नाही.

शेवटी १२ वाजता सर्व मंडळी वेढी येथील परिषदेच्या मंडपापाशी आली. परिषदेकरता प्रशस्त मंडप उभारला होता. मंडपावर ताल वृक्षाच्या झावळ्या पसरल्या होत्या. मंडप सर्व बाजूंनी शृंगारला होता. परिषदेच्या मंडपात बाबासाहेब आंबेडकर येताच त्यांचे नावाचा जयघोष झाला. परिषदेसाठी ठाणे जिल्ह्यातील वसई येथील श्री. विष्णूपंत दांडेकर वकील, बोर्डीचे श्री. मुकुंदराव आनंदराव सावे, वेढी येथील नथोबा त्रिंबकराव म्हात्रे, विरारचे एच. जी. वर्तक, श्री. खंडुभाई शहा, देवमास्तर व वेढी गावची इतर स्पृश्य मंडळी हजर होती व अस्पृश्य समुदाय ३-४ हजारावर हजर होता.

परिषदेच्या प्रारंभी ईशस्तवन झाले. त्यानंतर परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. शिवराम गोपाळ जाधव यांचे स्वागतपर भाषण झाले. त्यांचे भाषण झाल्यावर परिषदेचे नियोजित अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले. ते म्हणाले—

स्वागताध्यक्ष, प्रिय भगिनींनो व बंधुजनहो,

आजच्या या सभेला एक प्रकारचे अपूर्व स्वरूप प्राप्त झाले आहे असे म्हणण्यास हरकत नाही. ज्या दिवसापासून मी सार्वजनिक कार्यात भाग घेऊ लागलो तेव्हापासून या भागात परिषद झाली नव्हती. १६ वर्षापूर्वी या भागातील टेंभुर्णी गावी परिषद झाली, त्यानंतर आज परिषद भरत आहे. या जिल्ह्यातील लोक आज इतके वर्षांनी येथे एकत्र जमत आहेत, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. ही परिषद घडवून आणण्यासाठी या जिल्ह्याचे पुढारी श्री. शिवराम गोपाळ जाधव यांनी फार परिश्रम घेतले, कष्ट व मेहनत केली याबद्दल मी श्री. जाधव यांचे प्रथम अभिनंदन करून आभार मानतो.

सद्‌गृहस्थहो, पाल्हाळीक भाषण करून तुमचा वेळ मी घेणार नाही, परंतु मी दोन मुद्यांसंबंधी सांगतो. पहिला मुद्दा धर्मांतराचा. यासंबंधी काही लोक म्हणतात की, तुम्ही धर्मांतर करून काय साधणार आहात ? त्याचे उत्तर अनेक तऱ्हेने देता येईल, पण मी साध्या शब्दात त्याचे उत्तर देतो. धर्मांतराचा प्रश्न अत्यंत गहन व तत्त्वज्ञानाचा आहे. त्याची तुमच्या मनाला व बुद्धीला पटेल अशारीतीने चर्चा करणे जरूर आहे.

तुम्ही आज अपंग स्थितीत आहात. तुम्ही अशिक्षित व दरिद्री आहात व तुम्हास कोणत्याही प्रकारचे सामर्थ्य नाही, या गोष्टीस पुरावा नको. ज्या खेडेगावात तुम्ही राहता, त्यात तुमची वस्ती व इतर लोकांची वस्ती याची तुलना केली तर तुम्हास समजेल की तुमची स्थिती निकृष्ट आहे. पशुपक्षी व जनावरे निसर्गाने दिलेल्या गोष्टीवर समाधान मानून राहतात. निसर्गाने पृथ्वीवर ज्या वस्तू उत्पन्न केलेल्या आहेत त्यावर त्यांचे जीवन अवलंबून असते, पण मनुष्याची वासना व महत्त्वाकांक्षा आपणास निसर्गाकडून मिळाले, त्यापेक्षाही काही जास्त मिळावे अशी असते. अशी इच्छा सर्व मानवी समाजाची असते की, आपली वाढ व्हावी. त्याप्रमाणेच आपलीही इच्छा आहे की, आपलीही सर्वांगीण उन्नती व वाढ व्हावी. तुम्ही ज्या दारिद्र्यात आहात ती परिस्थिती बदलवून, तुम्हास पुढे जावयाचे आहे. तुम्ही आपले पायावर उभे राहू शकाल काय ? याचा विचार करा. मी जो आज तुमच्या स्थितीचा अभ्यास केला आहे, त्यावरून माझी अशी खात्री झाली आहे की, तुम्हास कोणाचे तरी सहाय्य घेतले पाहिजे. आज तुमच्यात फारसे शिक्षित लोक नाहीत. त्याकरिता तुम्हास शिक्षण घेतले पाहिजे व तेही उच्च दर्जाचे शिक्षण घेतले पाहिजे. एक काळ असा होता की चार पुस्तके शिकलेला स्पृश्य माणूस मामलेदार होत असे, पण आज तो काळ बदलला आहे. आज उच्च शिक्षण घेतल्याखेरीज कोणासही सरकारी नोकऱ्या मिळू शकत नाहीत. तुम्हास आज अन्न खाण्यास नाही, ते तुम्ही लोक आपल्या मुलांना बी.ए., एम.ए. कसे करू शकाल ? तुमच्यामध्ये असा कोणीही माणूस नाही की तो आपल्या ऐपतीवर मुलास सुशिक्षित करील. याकरिता जो समाज तुम्हास शिक्षणाचे बाबतीत तुमच्याकडून कोणतीही अपेक्षा न करिता जर तुमचा स्वाभिमान सांभाळून मदत देईल तर अशा समाजाशी तुम्ही सहकार्य करून स्पृश्य हिंदुंच्या स्पर्धेत अग्रेसरत्व मिळविले पाहिजे.

आज आपले पुष्कळ लोक काबाडकष्ट करून पोट भरतात. त्यांनी जर काबाडकष्ट केले, रोजगार धंदा केला तरच त्यांना पोटभर अन्न व अंगभर वस्त्र कसेतरी मिळू शकते. आपणास आज जो रोजगार धंदा मिळतो तो स्पृश्य लोकांकडून मोठ्या मिनतवारीने मिळतो. तुम्हास स्वतंत्र धंदा नाही, स्वतंत्र शेती नाही, स्वतंत्र व्यापार नाही व त्याची साधनेही नाहीत व स्वतंत्र साधने उत्पन्न करण्याची तुम्हास ऐपत नाही व ऐपत असली तर संधी नाही. सरकारने कायदा करून आपणास सरकारच्या ताब्यातील सार्वजनिक पाणवठ्यावर पाणी भरण्याचा हक्क दिला आहे पण आपणास असा अनुभव आहे की, स्पृश्य लोक त्या पाणवठ्यावर आपणास मुळीच पाणी भरू देत नाहीत. जर आपण त्या पाणवठ्यावर पाणी भरले तर स्पृश्य लोक तुमच्यावर बहिष्कार टाकतात. त्यावेळी तुमचे अत्यंत हाल होतात. त्या हालाच्या, छळणुकीच्या व संकटाच्या वेळी,

त्याच गावचे मुसलमानही तुम्हास बहिष्कारातून, संकटातून आणि छळणुकीतून तुमची सोडवणूक करण्यास मदतीला येत नाहीत. त्यावेळी धीराने आपण संकटे सोशीत राहतो. त्या संकटग्रस्तप्रसंगी आपली स्थिती असहाय होते. अशावेळी आपण ज्या स्थितीत असतो त्यावेळी आपणास काही करता येत नाही. त्याकरिता आपणास आजच्या स्थितीत दुसऱ्याचे सहाय्य घेणे जरूर आहे.

आज ज्या त्या हिंदू समाजातील जाती आपस्वार्थी बनून आपआपल्या जातीस मदत करीत आहेत; पण ह्या हिंदू स्पृश्य जाती आपल्या अस्पृश्य समाजाला मदत करीत नाहीत. कारण त्या स्पृश्य हिंदू जातीचे लोकांचे व आपले लागेबांधे नाहीत. त्याकरिता आपणास जे मदत करतील व आपल्या असहाय स्थितीत संरक्षण करतील, त्यांचे बरोबर ऋणानुबंध जोडून घेतला पाहिजे. आज आपण हिंदू समाजाचे सर्व देव धर्म पाळीत आहोत, तरीही पण आपली हिंदुधर्मीय स्पृश्यांकडून उपेक्षा झालेली आहे. हिंदुधर्मीय आपणाकरिता काहीही करू शकत नाहीत. नुकताच महात्मा गांधींनी हरिजनात लेख लिहिला आहे. त्यांच्याकडे अस्पृश्य वर्गाच्या काही विद्यार्थ्यांनी आपणास विद्यार्जनाच्या बाबतीतल्या अडचणीतून काढण्यासाठी अर्ज केले होते व स्कॉलरशिपांची मागणी केलेली होती. त्या अर्जास महात्माजींनी उत्तर दिले आहे की, जर सवलती मिळविण्यासाठीच तुम्हास हिंदू धर्मात राहावयाचे असेल, तर तुम्ही हिंदू धर्म सोडून गेला तरी चालेल. महात्माजीसारख्यांची ही भावना झाली. मग इतर सामान्य लोकांची कशा प्रकारची असू शकेल ?

यावरून व अनेक गोष्टीवरून हिंदू धर्माच्या लोकांकडे आशा ठेवून राहणे चूक होईल. तुम्हास तुमची उन्नती व प्रगती करून घेणे असेल तर तुम्हास सहृदय व सामर्थ्यवान, शीलसंपन्न, निस्वार्थी अशा समाजाशी लागाबांधा जोडला पाहिजे आणि असा लागाबांधा दुसरे समाजाशी जोडून घेणे याचाच अर्थ धर्मांतर.

मुसलमान, खिस्ती व शीख हे आपणासाठी कोट्यावधी रुपये खर्च करण्यास तयार आहेत. तर त्यांच्याउलट हिंदुधर्मीयांची प्रवृत्ती कशी आहे ते पहा. महात्मा गांधींनी स्वराज्य संपादनासाठी ज्यावेळी हिंदू समाजाकडे मदतीची याचना केली त्यावेळी त्यांना कोट सवा कोट, रुपये मिळू शकले, पण त्यांनी ज्यावेळी अस्पृश्यांच्यासाठी हिंदू समाजाकडे पैशाची मागणी केली त्यावेळी त्यांना अखिल हिंदुस्थानात, मोठ्या मिनतवारीने आठ लाख रुपये मिळाले. त्यापैकी चार लाख रुपये दोन वर्षांत खर्चून टाकले गेले व राहिलेले चार लाखही या वर्षा सहा महिन्यात कसे तरी खर्च होणार असे समजते. यावरून हिंदू समाज स्वराज्याकरिता किती स्वार्थत्याग करण्यास तयार आहे व अस्पृश्योद्धारासाठी किती स्वार्थत्याग करण्यास तयार आहे हे स्पष्टपणे दिसून येते.

मुसलमानांच्या एका सभेने एक कोटी रुपये जमवावेत व आपल्याकरिता खर्च करावेत असा विचार केला, तर शीख समाजाने लाखो रुपये जमवून तुमचे उन्नतीसाठी खर्च करण्याचा निर्धार केलेला आहे. याच्याउलट हिंदू समाज स्वस्थ डोळे झाकून बसला आहे. डोळयावर बळेच कातडे ओढून बसलेल्या या हिंदू समाजाकडून तुम्हास मदत तर नाहीच पण तो समाज तुमच्या प्रगतीच्या मार्गात अडथळे उत्पन्न करीत आहे. त्यामुळे तुमचा त्यांचेकडून उद्धार होणार नाही. आजच्या प्रगतीच्या काळात आपण आपला मार्ग हिंदू धर्माचे लोकांपासून अलग स्वतंत्रपणे चोखाळला पाहिजे. स्वाभिमानाला व सन्मानाला धक्का न देता, जे आपल्या प्रगतीला समतेने मदत करतील अशा समाजाशी आपण सहकार्य केले पाहिजे.

पूर्वजांचा धर्म उराशी कवटाळून बसण्यात काय अर्थ आहे ? खोट्या अभिमानाचा आपण त्याग केला पाहिजे. हिंदू धर्मात चातुर्वर्ण्याची घातक प्रथा आहे व ती मोडण्याची चिन्हेही दिसत नाहीत. या चातुर्वर्ण्याने व वर्णाश्रमधर्माने आपले अत्यंत नुकसान केलेले आहे. वर्णाश्रमधर्म व्यवस्थेमुळे, ब्राह्मणाशिवाय इतर कोणीही विद्या संपादन करू नये, क्षत्रियांशिवाय कोणी शस्त्र धारण करू नये. अशा वर्णव्यवस्थेमुळे आपले पूर्वजास अज्ञानी व निर्बल करण्यात आले होते. या वर्णाश्रमधर्माने आपणास ज्ञान, सत्ता, शस्त्र व संपत्ती याचा उपयोग घेऊ दिलेला नाही. या वर्णाश्रमधर्माने आपल्या पूर्वजांची प्रतिकारशक्ती नाहीशी केली, त्याचे प्रगतीपर मार्गावर पाऊलच पडू दिले नाही. आज आपली तशी स्थिती नाही. हल्ली सर्वांस शिक्षणाचा मार्ग खुला आहे. शस्त्रधारणाची वाट मोकळी आहे. प्रगतीचा मार्ग खुला आहे. अशा स्थितीत, पूर्वजांच्या धर्माला आजही तुम्ही कवटाळून बसलात, तर तुमची कधीच उन्नती होणार नाही. तुम्ही ज्ञान व शक्ती संपादन करून व खोट्या रूढीची बंधने तोडून, धडाडीने स्वोन्नतीचा मार्ग चोखाळा, हे मी तुम्हास निक्षून सांगत आहे. याचा खोलबुद्धीने व शांत-चित्ताने विचार करा व प्रगतीच्या मार्गावर पाऊले टाकून उज्ज्वलतेचा रस्ता धरा.

आता राजकारणासंबंधी दुसरा प्रश्न आहे. एका वर्षानंतर मुंबई इलाख्यात व हिंदुस्थानात नवी राज्यघटना निर्माण होणार आहे. त्या राज्यघटनेसंबंधी तुमचे कर्तव्य काय आहे, हे दाखवून देण्याची माझी इच्छा आहे. आजपर्यंत तुमची अशी दृष्टी असे की, आपणास ज्या अडचणी येतील त्या नाहीशा होण्यासाठी सरकारी अधिकाऱ्याकडे अर्ज करावयाचे. या अर्जापासून तुमची संकटे दूर होतील, अशी तुमची कल्पनाही होती. कलेक्टर हा राजा आहे, अशी तुमची भावना. कलेक्टर हा एका दृष्टीने राजा होता. कारण आजकाल नोकरशाहीची सत्ता आहे, पण ही परिस्थिती पुढल्या वर्षापासून पालटली जाणार आहे. एक वर्षानंतर राजकारणात, नोकरशाहीस स्वतंत्र स्थान व सत्ता राहणार नाही. नवीन

राज्यघटनेप्रमाणे सर्व अधिकार कायदेमंडळाकडे जातील व कायदेमंडळाच्या हुकमतीखाली कलेक्टरांना व मामलेदारांना मान वाकवून वागावे लागेल. म्हणजे कायदेमंडळ हे पुढे महत्त्वाचे स्थान होणार. त्या कायदेमंडळात आपल्याला महत्त्व प्राप्त झालेले आहे. राजकारणाचे भवितव्य कायदेमंडळावर अवलंबून आहे. याकरिता कायदेमंडळावर चांगली माणसे गेली पाहिजेत. शेठ, सावकार, पैसेवाले कायदेमंडळावर डोळे ठेवून आहेत. या लोकांकडून गरीब जनतेचे मुळीच कल्याण होणार नाही. याकरिता, गोरगरिबांमध्ये मिळून मिसळून काम करणाऱ्या, गोरगरिबांच्या आकांक्षांची जाणीव असलेल्या निस्वार्थी, निर्भीड, लायक व मतदारांशी इमानीपणानी वागणाऱ्या गोरगरिबांच्या प्रतिनिधींची आपणास निवड केली पाहिजे. आपल्या खराखुऱ्या हितचिंतकांना जर आपण कायदेमंडळावर निवडून दिले, तरच आपले पाऊल पुढे पडेल व आपले हितवर्धन होईल.

कायदेमंडळावर निवडून देण्यासाठी आपणास मताचा अधिकार आहे. हा अधिकार फार महत्त्वाचा व मोठा आहे. तेव्हा आपली मतदानाची बहुमोल शक्ती भलत्याच ठिकाणी वाया जाता उपयोगी नाही. आपले खरे कळकळीचे व इमानी हितचिंतक कोण आहेत हे मी आपणास वेळेवर सांगेन, त्यांनाच तुम्ही मतदान करा.

सध्या आपल्या देशात सधन लोक मते विकत घेतात, पण मते ही विकण्याची वस्तू नाही. ती आपले संरक्षणाची साधनशक्ती आहे. मते विकणे हा गुन्हा तर आहेच शिवाय तो आत्मघातही आहे. मते विकून नालायकांची खोगीरभरती कायदेमंडळावर केल्याने देशाचे अपरिमित नुकसान होऊन राष्ट्र अधोगतीस जाते. स्वतः नालायक व अपात्र असून पैशाचे जोरावर कायदेमंडळावर जाऊ इच्छिणारे काही लोक तुम्हास द्रव्याचे आमिष दाखवतील, दारिद्र्यामुळे तुम्हास मते विकावी की काय असा मोह उत्पन्न होईल. अशा कोणत्याही मोहास तुम्ही बिलकूल बळी पडू नका. मोहास बळी पडलात तर तुम्ही आपल्या पायावर पर्यायाने समाजाच्या पायावर धोंडा पाडून घ्याल ही धोक्याची सूचना मी आज सर्वांना देत आहे. मते विकत मागणाऱ्या माणसाला समाजाचा पाठिंबा नसतो म्हणून तर तो द्रव्याच्या बळावर आपली लायकी प्रस्थापित करण्याचा अट्टाहास करतो. अशा नालायक माणसाकडून समाजहिताची अगर राष्ट्रहिताची कार्ये होत नाहीत. पैसेवाला जर कायदेमंडळात सभासद म्हणून गेला, तर तो द्रव्यवाल्या लोकांचेच हितसंरक्षण करील व तो आपल्यासारख्या गोरगरिबांच्या हिताच्या आड येईल. म्हणून मत विकण्याचे पाप तुम्ही करू नका व तसे तुम्ही करणार नाही अशी माझी खात्री आहे. पैसेवाल्यांच्या कसल्याही प्रकारच्या आमिषाला व भुलभुलावणीला, गोडीगुलाबीच्या मायावी भाषणाला आणि पैशाला तुम्ही बळी पडू नका व आपली दिशाभूल करून घेऊ नका.

आपणाला मिळालेल्या मतदानाच्या अधिकाराचा जर आपण चांगल्या तऱ्हेने उपयोग केला तर आपण चांगलीच माणसे कायदेमंडळावर निवडून आणू व त्यापेक्षा जास्त आपली उन्नती आपण करू शकू. आपणास कोणाची निवड कायदेमंडळावर करावयाची त्याबद्दल मी वेळेवर सांगेन.

शेवटी ही परिषद यशस्वी करण्यासाठी तुम्ही लांबलांबून येथे येण्याचे जे कष्ट घेतलेत व माझेवर जो लोभ दाखविलात त्याबद्दल मी तुमचे व या परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. शिवराम गोपाळ जाधव यांचे आभार मानून आपले भाषण पुरे करतो.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाल्यावर खालील ठराव मांडण्यात आले. पहिले दोन ठराव अध्यक्षांनी मांडले.––

**ठराव १ ला.**––मरहूम बादशहा पंचम जॉर्ज यांच्या शोचनीय निधनाबद्दल या परिषदेस अत्यंत दु:ख वाटत आहे.

**ठराव २ रा.**––बादशहा आठवे एडवर्ड यांना ही परिषद दीर्घायुरोग्य चिंतीत आहे.

**ठराव ३ रा.**––येवले मुक्कामी आपल्या अस्पृश्य समाजाने जी धर्मांतराची घोषणा केलेली आहे त्या घोषणेस या परिषदेचा पूर्ण पाठिंबा आहे. ठराव मांडणार लक्ष्मण जानबा गायकवाड. अनुमोदन देणार गंगाराम माधव जाधव, श्री. चांगदेव मोहिते, श्री. वनमाळी, श्री. मडकेबुवा जाधव.

**ठराव ४ था.**––या जिल्ह्यातील सार्वजनिक तलाव, विहिरी वगैरे पाणवठ्याचा समानतेने उपभोग घेण्याबद्दल ठाणे डिस्ट्रीक्ट लोकल बोर्डाने आपल्या ताब्यातील पाणवठ्यावर सर्वांनी पाणी भरावे अशा पाट्या लावल्या आहेत. तरी पण बहुसंख्य स्पृश्य समाजाकडून अस्पृश्यांना त्या पाणवठ्यावर पाणी भरण्यास मज्जाव होत आहे या बाबतीत सरकारने लक्ष घालूनं अस्पृश्यांना या पाणवठ्यावरून पाणी भरण्याचे वेळी स्पृश्य समाजाकडून येणारा अडथळा दूर होईल अशी तजवीज करावी. ठराव मांडणार चांगदेव मोहिते. अनुमोदन देणार जनार्दन पद्माजी लोखंडे.

**ठराव ५ वा.**––अस्पृश्य व रानटी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या जातीतील लोकांना सरकार केवळ त्यांची जात लक्षात घेऊन जेलमध्ये मलमूत्र काढण्याचे काम करावयास भाग पाडते. या व अशाच अनेक प्रकारच्या अन्यायमूलक परंपरेचा पुरस्कार करणाऱ्या सरकारबद्दल ही परिषद आपला संताप व्यक्त करीत आहे व हा अन्याय ताबडतोब दूर करावा अशी सरकारकडे विनंती करीत आहे. ठराव मांडणार श्री. मोरे, अनुमोदन देणार आढाव व जाधव.

**ठराव ६ वा.**---अखिल अस्पृश्य समाजाचे मुखपत्र ' जनता ' आहे. या आपल्या वर्तमानपत्राचे प्रत्येक गावच्या अस्पृश्य समाजाने वर्गणीदार व्हावे, तसेच कार्यप्रसंगी जनता पत्रास आर्थिक मदत देऊन पत्राच्या उत्कर्षासाठी व वाढ होण्यासाठी सर्व अस्पृश्य समाजाने सदैव खटपट करावी, अशी या परिषदेची सर्वांना आग्रहाची विनंती आहे. ठराव मांडणार धोंडीराम गायकवाड. अनुमोदन देणार सदाशिवराव साळवी.

**ठराव ७ वा.**---जर या भागातील अस्पृश्य समाज लग्नप्रसंगी काही जुन्या रूढींचे अवलंबन करीत असेल तर त्यांनी यापुढे त्या रूढींचा त्याग करावा व लग्नप्रसंगी शिक्षणासारख्या समाजहित वर्धनाचे कार्यास मदत करावी. ठराव मांडणार श्री. लक्ष्मण मानोजी गायकवाड. अनुमोदन देणार गोपाळ महादेव जाधव.

**ठराव ८ वा.**---येत्या मे महिन्यात मुंबई येथे अखिल महार समाजाची परिषद भरणार आहे. त्या परिषदेत या भागातील सर्व महार बंधूंनी भाग घ्यावा अशी या परिषदेची विनंती आहे. ठराव मांडणार दिवाकर पगारे. अनुमोदन देणार संभाजी बाबा गायकवाड.

**ठराव ९ वा.**---ही परिषद यशस्वी करण्याकरिता ज्यांनी ज्यांनी मेहनत केली त्या सर्वांचे ही परिषद आभार मानते. ठराव मांडणार गायकवाड, अनुमोदन देणार जाधव.

वरील सर्व ठरावांवर जोरदार उद्‌बोधक भाषणे झाली व सर्व ठराव टाळयांच्या कडकडाटात एकमताने पास झाले. त्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी पुन्हा दोन कळकळीचे शब्द सांगितल्यावर आभार प्रदर्शनानंतर प्रचंड जयघोषात या परिषदेचे कार्य अत्यंत यशस्वी रीतीने पार पडले. परिषदेहून मंडळी परत येताना वसई स्टेशनवर नाशिकच्या महीपतराव विठूजी निळे, दामूजी नामदेव निळे, वाघूजी करडक मिस्त्री, पुलाजी उमाजी पाटारे, नानासाहेब गणोजी बोराडे, श्रावण भैरवराव वगैरे मंडळींनी बाबासाहेब आंबेडकर व परिषदेहून आलेल्या मंडळीचा मोठा गौरवपर सत्कार करून त्यांना फलाहार दिला.



# ८४

# आपण सात कोटी अस्पृश्य एकाचवेळी धर्मांतर करू

वर्धा येथे १ मे १९३६ रोजी सकाळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर आले, तेव्हा तेथील अस्पृश्य समाजाने मोठ्या उत्साहाने त्यांचे स्वागत केले. सेठ जमनालाल बजाज व महात्मा गांधी यांनी सेठ वालचंद हिराचंद यांच्यासह त्यांची भेट घेतली. त्याचप्रमाणे त्यांनी नालवाडीस भेट दिली. निर्भय तरुण संघाने त्यांच्या वर्धा येथील मुक्कामात चांगला बंदोबस्त ठेवला होता. म. गांधीच्या भेटीसाठी ते शेगाव* येथे गेले होते. दुपारी ११.३० वाजता अस्पृश्य समाजाचे कार्यकर्ते पुरुषोत्तम खापर्डे, शंकरराव सोनवणे, गोमाजी टेंभरे यांनी भेट घेऊन धर्मांतराबद्दल चर्चा केली.

या चर्चेत डॉ. आंबेडकरांनी स्पष्ट सांगितले की,

'' मुसलमानी अथवा ख्रिस्ती धर्माचा पुरस्कार करण्यास मी अजूनही कोणास सांगितले नाही. जे कोणी स्वतःच्या जबाबदारीवर मुसलमानी किंवा इतर धर्माचा पुरस्कार करीत असतील ते स्वतः फसतील याचा जबाबदार मी नाही. मी धर्मांतरांची घोषणा केली खरी. परंतु अमुकच धर्म स्वीकारा असे अजून स्पष्ट सांगितले नाही. तोपर्यंत सर्वांनी धर्मांतराचा प्रचार करीत असावे. पण कोणत्याही विशिष्ट धर्माची तरफदारी करू नये. जेव्हा मी सांगेन, तेव्हाच आपण सर्व ७ कोटी अस्पृश्य एकदम धर्मांतर करू. ''

त्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी इतर अस्पृश्य पुढाऱ्यांशी खाजगीत चर्चा केली.



---

विदर्भातील दलित चळवळीचा इतिहास : हि. ल. कोसारे. पृ : २९६.

* वर्धा जिल्ह्यातील सेवाग्रामसाठी हा उल्लेख असावा––संपादक.

## ८५

# राजकीय सत्तेचा वापर न्याय्य व उदार बुद्धीने करावा लागेल

या महिन्याच्या पहिल्या आठवड्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकर नागपूर-वऱ्हाडकडे दौऱ्यावर गेले होते. रविवारी ता. ३ मे १९३६ रोजी दुपारी नागपूर स्टेशनवर त्यांच्या स्वागताकरता हजारो अस्पृश्यांचा जमाव जमला होता. मि. एस. समिउल्लाखान आणि रावसाहेब आर. डब्ल्यू. फुले हे नागपूर म्युनिसीपालिटीतर्फे स्वागतार्थ स्टेशनवर आले होते. बिडी कामगार युनियनचे लोकही आले होते. संध्याकाळी टाऊन हॉलमध्ये त्यांना नागपूर म्युनिसीपालिटीतर्फे मानपत्र अर्पण करण्यात आले. मानपत्राचा आशय पुढीलप्रमाणे होता--

सार्वजनिक कार्याच्या निरनिराळ्या क्षेत्रात आपण काम केले आहे. अस्पृश्य वर्गाच्या उद्धारार्थ आपण राजकीय व सामाजिक कार्यात अत्यंत उत्साहाने व धैर्याने अविश्रांत श्रम घेतले आहेत. नाशिक व महाड येथे सत्याग्रह करून हिंदू समाजाला त्यांच्या चिरकालीन निद्रेतून आपणच जागृत केलेत. अस्पृश्य वर्गाच्या स्वाभिमानाची ज्योत प्रज्वलित करून त्यांना समाजातील त्यांच्या न्याय्य हक्काची जाणीव करून दिलीत. दलित वर्गाच्या हक्कासाठी आणि समाजात योग्य दर्जा मिळविण्यासाठी चळवळ करण्याचे सर्व श्रेय आपणासच आहे. याबाबतीत ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस फेडरेशन ही आपल्या परिश्रमाची स्पष्ट साक्ष होय.

राजकीय बाबतीतही आपण उच्च स्थान पटकाविले आहे. सायमन कमिशनबरोबर सहकार्य करण्यासाठी मुंबई लेजिस्लेटिव्ह कौन्सिलने नेमलेल्या कमिटीचे सभासद या नात्याने आपण लिहिलेल्या भिन्न मतपत्रिकेवरून आपली कुशाग्रबुद्धी दृष्टोत्पत्तीस येते. इतकेच नव्हे तर आपल्या देशाच्या हितसंबंधाचे संरक्षण करण्याविषयीची चिंताही स्पष्ट दिसून येते. गोलमेज परिषदेमध्ये दलित वर्गातर्फे आपण केलेले जोरदार समर्थन आणि ' पुणे करारा ' च्या बाबतीतील आपले कार्य या दोन गोष्टी इतक्या जगजाहीर आहेत की त्यांचा उल्लेख करण्याचीही आवश्यकता नाही.

मानपत्राला उत्तर देताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

म्युनिसीपालिटीकडून मानपत्र घेण्याचा माझ्या सार्वजनिक आयुष्यात हा दुसरा प्रसंग आहे. मला पुष्कळशा म्युनिसीपालिट्यांनी मानपत्रे देण्याची इच्छा

जनता : २३ मे, १९३६.

दर्शविली. परंतु मानपत्रे न घेण्याचे माझे धोरण आहे. मी असा कृतघ्न का ? असे कोणाला वाटेल, पण यात कृतघ्नपणाचा भाग नाही. राष्ट्रीय वृत्तपत्रे व संस्था यांच्या दृष्टीने मी मोठा मनुष्य नाही. लोकांनी माझा गौरव केला किंवा न केला तरी माझे काम पवित्र आहे, असे मला नेहमी वाटत आले आहे. अशाप्रकारची जी मानपत्रे देण्यात येतात त्यात सुधारणेच्या वडेजावाखाली आपण जी खोटी विधाने नेहमी करतो, कनव्हेन्शनल लाइज ऑफ सिव्हिलायझेशन त्याचाच बराचसा भाग असतो. मानपत्र न घेण्याच्या माझ्या धोरणाला मी पहिला अपवाद वसई म्युनिसीपालिटीच्या बाबतीत केला. कारण काही मित्रांच्या मुर्वतीसाठी मला ते स्वीकारावे लागले. नागपूर म्यु. च्या बाबतीत मी दुसरा अपवाद केला, याबद्दल मला दुःख होत नाही. म्युनिसीपालिटीच्या सभासदांनी मानपत्राचा खर्च स्वतः देण्याचे कबूल केले आहे. त्यावरून या मानपत्रात कळकळीचा भाग आहे, असे मी समजतो.

आजच्या प्रसंगाचा राजकीय व्यासपीठ म्हणून उपयोग करण्याबद्दल आपण मला क्षमा करा. मजविषयी लोकात निरनिराळे गैरसमज पसरविले जात आहेत. मजवर जितकी टीका केली जाते, तितकी इतरांवर क्वचितच केली जात असेल. मजवर टीका करणाऱ्यांचा मुख्य रोख असा आहे की, अल्पसंख्यांकांचा म्हणून जो करार प्रसिद्ध आहे त्याबाबतचा मुख्य गुन्हेगार मी आहे, अशी त्यांची समजूत आहे. वर्तुळ परिषदेत जे धोरण मी ठेवले होते, त्याबद्दल मला यत्किंचितही खेद वाटत नाही. वर्तुळ परिषदेत मी जे कामकाज केले ते वाचण्याची आपण जर तकलीफ घेतली, तर निरनिराळे प्रश्न सोडविण्याबाबत ज्या सूचना मी केल्या, त्या पुष्कळशा राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या सूचनांपेक्षा श्रेष्ठ दर्जाच्या होत्या, हे आपल्या लक्षात येईल. खुद्द म. गांधी माझ्या म्हणण्यात सत्यता आहे, याचा पुरावा देतील.

अल्पसंख्यांकांनी वर्तुळ परिषदेत जे धोरण ठेवले होते, ते न्याय्य होते. इतकेच नव्हे तर उदारपणाचे होते, असे मी म्हणतो. आयर्लंडमध्ये अल्स्टरवाल्यांनी होमरूलच्या चळवळीत काय उत्तर दिले, ते मी आपल्या नजरेस आणू इच्छितो. अल्स्टरमध्ये अल्पसंख्यांक प्रॉटेस्टंट होते व दक्षिण आयर्लंडमध्ये बहुसंख्य रोमन कॅथोलिक होते. दक्षिण आयर्लंडचे प्रतिनिधी श्री. रेडमंड यांनी अल्स्टरवाल्यांना ' तुम्ही मागाल त्या सवलती देतो, पण इंग्लंडला मिळू नका, होमरूलला पाठिंबा द्या ' असे सांगितले. ' तेव्हा जळो तुमचे होमरूल ; आम्ही कॅथोलिकांच्या राज्यात राहाणार नाही ' असे कार्सनने सांगितले. वर्तुळ परिषदेत हिंदुस्थानच्या अल्पसंख्यांकांनी ' रक्षणबंधने मिळोत किंवा न मिळोत

आम्ही हिंदुंच्या राज्यात राहणार नाही ' असे कोठे तरीं म्हटले का ? नाही. डोमिनियन स्टेटस किंवा होमरूल यांच्या मार्गात आम्ही कोणतेच अडथळे पसरले नाहीत. आम्ही फक्त आम्हाला संरक्षण द्या, एवढेच म्हटले. आमच्यात व इतर देशातील अल्पसंख्यांकांत हा महत्त्वाचा भेद आहे.

आता संरक्षणाबद्दल म्हणाल, तर रोमच्या साम्राज्यातही पॅट्रिशियन्स व प्लेबियन्स असे दोन भाग होते व त्यांच्या निवडणुकी स्वतंत्र मतदार संघातूनच होत असत. स्वतंत्र मतदारसंघात कोणतेही पाप नाही, त्यात कोणतेच कृष्ण कारस्थान नाही. माझे बहुसंख्य हिंदुंना एवढेच सांगणे आहे की, आता तुम्ही बहुसंख्य असल्यामुळे जी सत्ता तुमचे हाती येणार आहे तिचा न्याय्य व उदारबुद्धीने उपयोग करा. हिंदुस्थानच्या राजकीय प्रगतीची जर वाढ खुंटली, तर त्याची जबाबदारी तुमच्यावर राहील. आपल्याला मिळालेले हक्क अल्पसंख्यांकांचे फायद्याचे दृष्टीने तुम्ही ज्या मानाने उपयोगात आणाल त्या मानाने आपली जबाबदारी योग्य रीतीने पार पाडली की नाही, याचा निर्णय होईल. आपण दिलेल्या मानपत्राबद्दल पुन्हा एकवार आपले आभार मानून, मी आपले भाषण संपवितो.

त्यानंतर रावसाहेब फुले, उपाध्यक्ष, यांनी डॉ. आंबेडकर यांचे व पाहुण्यांचे आभार मानताना, अल्पसंख्यांकांच्या मागण्याबद्दल हिंदुंची तक्रार नाही ; फक्त त्यांनी स्पृश्यांशी जे धोरण स्वीकारावयाचे ते राष्ट्रीयत्वाला पोषक व जातीद्वेषाला नामशेष करील, असे असावे व त्यामुळे हिंदी राष्ट्राचे जातीय तुकडे होतील, असे वर्तन ठेऊ नये, डॉ. आंबेडकरांचे वर्तुळ परिषदेतील धोरण राष्ट्रीयत्वाला पोषक होते, हे मला कबूल आहे, सर्व अल्पसंख्यांकांनी जर राष्ट्रीयतेला पोषक असे धोरण स्वीकारले, तर हिंदू समाजाला जरी कितीही स्वार्थत्याग करावा लागला तरी त्याबद्दल कोणी तक्रार करणार नाही, असे सांगितले. त्यानंतर समारंभ खलास झाला.



# ८६

# शेकडो वर्षे थांबून सुद्धा जे कार्य झाले नसते ते या दहा वर्षाच्या अल्पावधीत झाले आहे

दिनांक ३ मे १९३६ रोजी नागपूर म्युनिसीपालिटीच्या मानपत्र समारंभानंतर संध्याकाळी नागपूरच्या अस्पृश्य बांधवांची जाहीर सभा कस्तुरचंद पार्कमध्ये झाली. यावेळी हजारो अस्पृश्य बंधुभगिनी हजर होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जयजयकाराने नागपूर शहर हादरून गेले होते. डॉक्टर साहेबांवर नथीतून तीर मारणारे टीकाकार व पुढारी नागपुरातून कुठे निघून गेले होते, त्यांचा पत्ता नव्हता. डॉक्टरसाहेबांच्या प्रेमामुळे, त्यांच्यावरील पूर्ण विश्वासामुळे सर्वस्वाला विसरून कार्य करण्याला सज्ज झालेला हजारो अस्पृश्य बांधवांचा जमाव, डॉक्टरसाहेबांचे भाषण ऐकावयास उत्सुक झाला होता. डॉक्टर साहेब भाषण करावयास व्यासपीठावर चढले, तोच टाळयांचा कडकडाट व त्यांच्या नावाचा जयजयकार निदान पाच मिनिटे सारखा चालला होता.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या भाषणात प्रथम गेल्या दहा वर्षांत अस्पृश्य समाजात संघटनेच्या चळवळीमुळे घडलेल्या स्थित्यंतराचे सिंहावलोकन केले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

या दहा वर्षाच्या अल्पावधीत शेकडो वर्षे थांबून सुद्धा जे कार्य आपल्या हातून झाले नसते, ते झालेले आहे. हे सर्व कार्य केवळ आपल्या स्वाभिमानाच्या आणि स्वावलंबनाच्या चळवळीनेच जणू काय दैवी कार्य घडले आहे. आपल्याकडे कॉंग्रेस संस्थेसारखा पैसा नाही. आपणास सार्वजनिकरीत्या कार्य करण्यास कॉंग्रेस सारख्या संस्थेप्रमाणे इतरांचे पाठबळ नाही. इतक्या अडचणीतून आपण आपल्या स्वाभिमानजनक चळवळीला आज दहा वर्षांत प्रचंड व्यापाचे स्वरूप आणून दिले आहे, हे सारे तुमच्या प्रेमामुळे, कार्याच्या आतुरतेच्या आचेमुळे घडले आहे. गेल्या १० वर्षांत हा जो दैवी चमत्कार घडला व ज्यामुळे सर्व समाजाला, कॉंग्रेसलासुद्धा अस्पृश्यांचा वचक वाटत आहे, त्याचे कारण आपण दाखविलेली एकी होय. थोडे फार लोक सोडून दिले, तर आपण दाखविलेल्या एकीमुळे इतर समाजाचे दृष्टीने आपले राजकीय महत्त्वं वाढले आहे व धर्मांतराची घोषणा आपण केल्यापासून तर मुसलमान, शीख व ख्रिश्चन यांच्या तोंडाला पाणी सुटले असून ते आपल्या दाढीला हात लावू लागले आहेत. आपण जी आजपर्यंत एकी

---

जनता : २३ मे, १९३६.

दाखविली तशीच ती कायम ठेवली पाहिजे. म्हणजे हिंदू धर्मातून अलग व्हावयाचे जे आपले ध्येय ते आपण गाठू शकू.

नुकतेच स्पृश्य हिंदुंनी जोधपूर व गुजरात येथील अस्पृश्यांवर अनन्वित अत्याचार केले आहेत ही अत्याचारांची गुलामगिरी नष्ट करावयाची असल्यास धर्मांतर केल्याशिवाय आंपल्याला इलाज नाही, हिंदुंना इंग्रज डोमिनियन स्टेटस देत असताही जर इंग्रजांच्या राज्यात राहावयाचे नाही, तर आम्ही तरी हिंदुंच्या राज्यात का राहावें ? एका झाडाखाली दुसरे झाड वाढत नाही. त्याला सूर्याचा स्वतंत्र प्रकाश मिळाल्याशिवाय ते वाढीला लागणार नाही ; हिंदू धर्माच्या या जीर्ण वृक्षाखाली आमची वाढ होणार नाही, म्हणून आम्ही धर्मांतर करणारच.

सदर सभेतही मुसलमानांचा बराच भरणा दिसत होता व काही मुसलमान सभेच्या बाजूस नमाज पडत होते. त्याचप्रमाणे अस्पृश्य पुढाऱ्यांना डॉ. आंबेडकर यांच्या कार्यक्रमासाठी ज्या ज्या मोटारी लागल्या त्या परधर्मीयांनी, ख्रिस्ती पाद्र्यांनी व मुसलमान पुढाऱ्यांनी मोठ्या आनंदाने दिल्या, असे कळते. या सभेला एकही प्रमुख हिंदू पुढारी किंवा धर्मांतरविरोधी अस्पृश्य कार्यकर्ता हजर नव्हता.



# ८७

# ज्या धर्मात समता, प्रेम व आपुलकी नाही तो धर्म, धर्म नव्हे

सोमवार, ता. ४ मे १९३६ हा दिवस अमरावतीकर अस्पृश्य बांधवांना सुवर्णमय दिवस वाटला. या दिवशी अस्पृश्य समाजाचे सर्वश्रेष्ठ पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर येणार हे ऐकून रेस्ट हाऊस पासून ते नेकोलेट पार्कपर्यंत सर्व रस्ता रंगीत लतापताकांनी सुशोभित केला होता. ऊनतहानेची पर्वा न करता हजारो अस्पृश्य बंधुभगिनी स्टेशनवर डॉक्टरसाहेबांच्या स्वागतार्थ हजर होत्या. डॉ. बाबासाहेबांची स्टेशनपासून रेस्ट हाऊसपर्यंत बँडच्या सुस्वर वाद्यात व त्यांच्या नावाच्या जयजयकारात मिरवणूक काढण्यात आली. सायंकाळी सहा सात वाजता नागपूर कॅम्प म्युनिसीपालिटीचे सेक्रेटरी श्री. मेश्राम यांच्या अध्यक्षतेखाली जाहीर सभा झाली. प्रथम स्वागतपर पदे म्हणण्यात आली. नंतर स्वागताध्यक्ष श्री. एस. जी. नाईक, एम. एल. सी. यांच्या हस्ते अमरावती जिल्ह्यातील निरनिराळ्या संस्थेतर्फे जवळ जवळ ७५ हारतुरे डॉक्टर बाबासाहेबांना अर्पण करण्यात आले. स्वागताध्यक्षांच्या विनंतीप्रमाणे डॉ. आंबेडकरसाहेब भाषण करावयास उभे राहिले तेव्हा टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. डॉ. बाबासाहेबांची प्रवासात प्रकृती बिघडली होती व त्यांचा घसा धरला होता. तरीपण त्यांनी त्याच स्थितीत भाषण केले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

मी अमरावतीस आज सात-आठ वर्षांनी येत आहे. मागे येथे अंबादेवीच्या सत्याग्रहाकरिता आलो होतो. त्यावेळी माझ्या अस्पृश्य बांधवांची सत्याग्रह करण्याची काहीच तयारी नव्हती. सत्याग्रहाने तुरूंगवासात जाण्यास फक्त सहा माणसे तयार झाली होती. परंतु ती परिस्थिती आज पालटलेली पाहून मला आनंद होत आहे. येथे येण्यापूर्वी मला महात्माजींनी भेट घेण्यास वर्ध्यास बोलाविले होते. तेथे मी गेलो असताना श्री. जमनालाल बजाज यांनी जे आपल्या मालकीचे श्री. लक्ष्मीनारायणाचे देऊळ अस्पृश्यांकरिता खुले केले आहे ते मला पाहाण्याकरिता नेले होते. मी देवळात प्रवेश केला व देवळाच्या बाहेर येतो तर ती माझी अस्पृश्यता जशीच्या तशीच. कारण त्या देवळाकरिता लागणारे पाणी व फुले ही सुद्धा आम्हाला मिळू शकत नाहीत, तर मग आमची देवळात जाऊन

---

जनता : १६ मे १९३६.

अस्पृश्यता कशी निघू शकेल ? असो. आम्हाला पूर्वी देवळावर सत्याग्रह करण्यात जितका आनंद वाटत होता तितकाच आता तिरस्कार वाटत आहे. जेव्हा म. गांधीजींनी स्वराज्याचा प्रश्न हाती घेतला तेव्हाच आम्ही त्यांना अस्पृश्यतेच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करू नका असे बजाविले. परंतु अस्पृश्यतेचा प्रश्न हा स्वराज्यातले एक अंग आहे, असे सांगून ते स्वस्थ राहिले. आम्ही धर्मांतराची घोषणा केल्याबरोबर हिंदू लोकांना इतका बाऊ वाटण्याचे कारण काय हेच आम्हाला समजत नाही. हिंदू धर्म जर आम्हाला हिंदू म्हणवून घेण्यास तयार नाही तर आम्ही देखील स्वतःला हिंदू म्हणवून का घ्यावे ? ज्या धर्मात समता, प्रेम व आपुलकीची भावना नाही त्या धर्माला मी धर्म म्हणावयास तयार नाही. दोन हजार वर्षांपूर्वी आमचे पूर्वज अज्ञानी होते. त्यांना कोणत्याही प्रकारची विद्या संपादन करण्याची व शस्त्र हाती धरण्याची परवानगी नव्हती. म्हणून त्यांना कोणतेही नवीन कार्य करण्याचे धैर्य नव्हते. अज्ञानाने त्यांची मने मारून दुबळी केली होती. चार वर्णाच्या चौकटीत हिंदू धर्माला बसवून ठेविला आहे. या वर्णव्यवस्थेमुळे आम्हाला आमची लायकी ब्राह्मणापेक्षाही श्रेष्ठ असली तरी गुलामगिरीची कामे आम्हाकडे देण्यात आली. या गुलामगिरीमुळेच आपले पूर्वज स्वतःचा अभिमान साफ विसरून गेले. पण आज परिस्थितीत पालट झाला आहे. त्या स्थितीनुसार आम्हाला हिंदू धर्माच्या अनुदारपणाच्या चौकटीत राहता येत नाही. म्हणून ही धर्मांतराची घोषणा करणे भाग पडले आहे.

यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना हारतुरे अर्पण करून त्यांचे आभार मानण्यात आले व सभा त्यांच्या जयघोषात बरखास्त झाली.



## ८८

# आपल्या मातीमोल आयुष्याला सोन्याचे दिवस प्राप्त होण्यासाठीच धर्मांतराची आवश्यकता आहे

कल्याण येथे तारीख १७ मे १९३६ रविवार रोजी धर्मांतराच्या जाहीर घोषणेस पाठिंबा देण्याकरिता ठाणे जिल्ह्यातील पूर्व व दक्षिण भागातील अस्पृश्य मानलेल्या समाजाची जंगी जाहीर परिषद डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली यशस्वीरीतीने पार पडली. परिषदेचे नियोजित अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे मुंबईहून येणार असल्याची बातमी आगाऊ हस्तपत्रकांच्याद्वारे प्रसिद्ध झाल्यामुळे मोठ्या उत्सुकतेने कल्याण स्टेशनवर त्यांचे हार्दिक स्वागत करण्याकरिता सुमारे शे-दीडशे खेड्यातून आलेला तीन चार हजार अस्पृश्य समुदाय स्टेशनबाहेर गाडीची चातकाप्रमाणे वाट पाहात उभा होता. दुपारी ३ वाजता कल्याण स्टेशनवर डॉक्टरसाहेब उतरताच येथील प्रमुख कार्यकर्त्या मंडळींतर्फे स्टेशनवर पुष्पहार अर्पण करून त्यांचे स्वागत करण्यात आले.

स्टेशनच्या बाहेर येताच ' डॉ. आंबेडकर की जय ' ' आंबेडकर जिंदाबाद, थोडे दिनमें भीमराज ' इत्यादी गगनभेदी घोषणांनी तेथील सर्व वातावरण दुमदुमून गेले होते. डॉ. साहेबांचे, दर्शनोत्सुक असलेल्या समाजास दर्शन झाल्यावर सर्वांची अंतःकरणे आनंदित होऊन जिकडे तिकडे नवचैतन्य उत्पन्न झाले होते. नंतर चार हजार लोकांच्या समवेत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची शहराच्या प्रमुख भागातून जंगी मिरवणूक काढण्यात आली. मिरवणुकीच्या दोन्ही बाजूंनी स्वयंसेवकांची पथके शिस्तीने डॉ. बाबासाहेबांचा जयघोष करीत चालली होती. मिरवणुकीच्या पुढे बँड, वाजंत्री इत्यादि वाद्ये वाजत होती. मधून-मधून लाठीकाठीचे खेळ निरनिराळया तालमी करीत होत्या. त्यावेळचा तो देखावा पाहाणाऱ्यास मूक जनतेच्या निस्सीम प्रेमाला आणि स्वाभिमानाला पाहून कोणालाही धन्यताच वाटली असेल.

या परिषदेमध्ये डॉ. साहेबांनी भाषण करताना ' धर्मांतर ' घोषणेसंबंधी खुलासा केला. ते आपल्या भाषणात म्हणाले,

आज आपण मुख्यतः धर्मांतरासंबंधी मी काय सांगणार आहे हे ऐकण्याकरता आला आहात. त्याबद्दल मला खुलासेवार सांगणे प्राप्त आहे. काही लोक धर्मांतरासंबंधी असा प्रश्न करतात की आम्ही धर्मांतर का करावे ? परंतु याला माझा उलट प्रश्न असा आहे की, आम्ही धर्मांतर का करू नये ? मी धर्मांतर

जनता : २३ मे, १९३६.

का करावे याची कारणे माझ्या आयुष्यामध्ये घडलेल्या अनेक प्रसंगावरून तुम्हाला सहज समजू शकतील. माझ्याप्रमाणेच आपल्याही आयुष्यामध्ये अशाप्रकारचे प्रसंग उद्‌भवले असतील. ज्या कारणांमुळे मला धर्मांतर करावे असे वाटते ती कारणे सिद्ध करून देण्याकरिता माझ्या आयुष्यामध्ये ज्या काही चार-पाच गोष्टींचा माझ्या मनावर कायमचा ठसा उमटला आहे, त्यापैकी मी आपणाला आजच्या प्रसंगी दोन-तीन गोष्टी सांगणार आहे.

माझा जन्म महू, इंदोर येथे माझे वडील पलटणीत असताना झाला. त्यावेळी माझे वडील पलटणीत सुभेदार होते. आम्ही पलटणीतच राहात असल्यामुळे आम्हाला बाहेरच्या जगाचा संपर्क झाला नव्हता. त्यामुळे अस्पृश्यतेसंबंधी कोणत्याही प्रकारची कल्पना मला नव्हती. परंतु जेव्हा माझ्या वडिलांनी पेन्शन घेतले तेव्हा आम्ही सर्वजण साताऱ्यास येऊन राह्यलो. माझी आई मी अवघ्या पाच वर्षांचा असताना निवर्तली. सातारा जिल्ह्यात गोरेगावी दुष्काळ पडला होता. म्हणून दुष्काळी कामे सरकारने काढली. यावेळी एक पाण्याचा तलाव सुरू करण्यात आला होता. या तलावाचे काम करणाऱ्या मजूरांना पगार वाटण्याच्या कामावर माझ्या वडिलांची नेमणूक झाली. ते गोरेगावी गेले व आम्हा चार मुलांना साताऱ्यास ठेविले. जवळ जवळ चार पाच वर्षे आम्ही भातावर काढली. आम्ही साताऱ्यास आल्यापासून आम्हाला खऱ्या अस्पृश्यतेची जाणीव होऊ लागली. प्रथम आमचे केस कापण्यास आम्हाला न्हावी मिळेना. आमची मोठी पंचाईत झाली. मग माझी वडील बहीण ती अजून जिवंत आहे. ती आम्हा चार मुलांच्या हजामती ओट्यावर बसून करीत असे. साताऱ्यास इतके न्हावी असूनही ते आमची का हजामत करीत नाहीत हे मला प्रथमच कळले. दुसरा एक प्रसंग असा घडला की, आमचे वडील गोरेगाव येथे असताना ते आम्हाला पत्र पाठवीत असत. त्यांनी आम्हाला एकदा ' गोरेगावला या ' असे पत्र पाठविले होते. गोरेगावला आम्ही आगगाडीत बसून जाणार म्हणून मला फार आनंद झाला होता. तोपर्यंत मी आगगाडी पाहिली नव्हती. वडिलांनी पाठविलेल्या पैशाचे आम्ही चांगले कपडे केले व मी, माझा भाऊ आणि बहिणीच्या मुली इतके जण वडिलांना भेटावयास निघालो. त्यापूर्वी त्यांना पत्र लिहिले होते. परंतु ते पत्र नोकराच्या हलगर्जीपणामुळे त्यांना मिळाले नाही आणि त्यामुळे आम्ही गोरेगावी केव्हा येणार हे त्यांना कळले नाही. आम्ही मात्र वडील आम्हाला नेण्याकरिता नोकर वगैरे पाठवितील या आनंदात होतो. परंतु या बाबतीत आमची निराशा झाली. आम्ही आगगाडीतून उतरताच नोकराची वाट पाहिली. माझा पोशाख ब्राह्मणासारखा दिसत होता. गाडी येऊन निघून गेली. आम्ही अर्धा-पाऊण तास स्टेशनवर वाट पाहात राहिलो. स्टेशनवर आम्हाशिवाय कुणीच राहिले नाही. तशात आम्ही

सर्व जण मुले पाहून स्टेशन मास्तर आमच्याजवळ येऊन आम्हास कुठे जायचे, तुम्ही कोण वगैरे विचारू लागला. आम्ही ' महार ' असे म्हणताच स्टेशन मास्तरला धक्का बसल्यासारखा झाला. तो दचकून पाच-सहा कदम मागे हटून गेला. तरीपण आमच्या पोशाखावरून आम्ही कोणीतरी सुखवस्तू महाराची मुले आहोत, हे त्यांनी जाणले व आम्हाला गाडी करून देण्याचे ठरविले. परंतु संध्याकाळी सहा-सात वाजेपर्यंत एकही गाडीवान आम्हाला–आम्ही महाराची मुले म्हणून–घेऊन जायला तयार होईना. शेवटी एक गाडीवान तयार झाला. परंतु त्याने अशी अट घातली की आपण काही गाडी चालविणार नाही. मी पलटणीत दिवस काढल्यामुळे मला गाडी हाकणे कठीण वाटले नाही. आम्ही कबूली देताच गाडीवान गाडी घेऊन आला व आम्ही गोरेगावच्या मार्गाला लागलो. गावच्या बाहेर बरेच दूर गेल्यावर आम्हाला एक नाला लागला. ' येथेच तुम्ही भाकरी खाऊन घ्या. पुढे तुम्हाला पाणी प्यायला मिळणार नाही ' असे गाडीवानाने सांगितले. आम्ही खाली उतरलो. भाकरी खाल्ल्या. नाल्याचे पाणी इतके अस्वच्छ होते की त्यात बऱ्याच प्रमाणात शेणाचे मिश्रण होते. गाडीवान तेवढ्यात कुठे तरी भाकरी खाऊन आला. पुन्हा आमची गाडी चालू झाली. रात्र बरीच झाली तेव्हा गाडीवान हळूच गाडीत येऊन बसला. रस्त्यावर दिवा नाही, माणूस तर कोणी दिसेना. आम्हाला रडू कोसळले. अशारीतीने आम्ही रात्री बारा वाजेपर्यंत वेळ काढली. मनात तर्क-कुतर्क चालू होतेच. आपण काही गोरेगावास जात नाही, असे वाटले. इतक्यात एका टोल नाक्यावर आमची गाडी येताच आम्ही गाडीतून उड्याच घेतल्या, भाकरी खाण्याकरिता टोल नाक्यावरील मनुष्यास विचारले. मला पर्शियन भाषा चांगली येत असल्यामुळे त्या मनुष्याशी बोलण्यास अडचण पडली नाही. परंतु त्याने मला उर्मटपणाने उत्तर देऊन पाण्यासाठी समोरचा डोंगर दाखविला. शेवटी कशीतरी ती रात्र टोल नाक्यावर काढली. सकाळी पुन्हा गाडी चालू केली व शेवटी दुपारी अर्धमेल्या अवस्थेत गोरेगावी येऊन पोहोचलो.

माझ्या आयुष्यातील तिसरा प्रसंग म्हटला म्हणजे बडोदे सरकारची नोकरी. बडोदे सरकारची स्कॉलरशिप मिळाल्यावर मी विलायतेला जाऊन उच्च शिक्षण घेतले. तेथून परत आल्यावर स्कॉलरशिपच्या अटीप्रमाणे मला बडोदे संस्थानात नोकरी करणे भाग होते. परंतु बडोद्यात मला राहावयास एकही घर मिळेना. हिंदू किंवा मुसलमान कोणीच राहावयास जागा देईना. शेवटी एका पारशी धर्मशाळेत पार्शी म्हणून राहण्याचे ठरविले. विलायतेहून परत आल्यावर मी दिसायला रुबाबदार व गोरा दिसत होतो. शेवटी मी एदलजी सोराबजी असे पार्शी नाव धारण करून राहिलो. परंतु रोजी दोन रुपये घेऊन राहावयास जागा देण्याचे धर्मशाळेच्या रखवालदाराने कबूल केले. यापूर्वीच श्रीमंत महाराज सरकारने बडोद्यास एक शिकलेले महाराचे पोर आणले आहे, ही कुणकुण

लोकांना कळली होती. माझे पार्शी म्हणून धर्मशाळेत गुप्तपणे राहाणे वगैरे गोष्टी लोकांना शंका येण्यास कारणीभूत होऊन माझ्या गुप्तपणाचा स्फोट झाला. धर्मशाळेत राहाणारा मीच तो महार हे तेथील पार्शी लोकांना कळले. दुसरे दिवशी मी जेवण वगैरे करून ऑफिसला जाण्याकरिता निघालो असताना पंधरा-वीस पार्शी हातात काठ्या घेऊन मला ठार करण्याकरिता तेथे आले. त्यांनी प्रथम ' तू कोण आहेस ? ' असे विचारले, मी फक्त ' हिंदू ' आहे, असे उत्तर दिले. परंतु त्यांचे या उत्तराने समाधान झाले नाही. त्यांनी हमरी-तुमरीवर येऊन जागा ताबडतोब सोडण्यास सांगितले. त्यावेळी माझ्या मनोधैर्याचे मला विलक्षण पाठबळ मिळाले. मी त्यांच्याजवळ निर्भयपणे आठ तासांची मुदत मागितली व ती त्यांनी दिली. मी सबंध दिवस राहावयास जागा मिळविण्याचा कसून प्रयत्न केला. परंतु मला कुठेच जागा मिळेना. कित्येक मित्रांकडे गेलो. त्यांनी निरनिराळी कारणे सांगून मला वाटेला लावले, मी शेवटी इतका कंटाळलो की आता पुढे काय करावे हेच मला कळेना. मी एका ठिकाणी खाली बसलो. माझे मन उद्विग्न बनले व डोळयातून सारखा अश्रूप्रवाह वाहू लागला. (यावेळी डॉ. बाबासाहेबांच्या डोळयातून नकळत अश्रू वाहू लागले. अस्पृश्यतेच्या भडाग्नीने त्यांचे अंतःकरण होरपळून गेलेले दिसत होते.) शेवटी अगदीच नाइलाज झाल्यावर मला बडोद्याची नोकरी सोडून रात्रीच्याच गाडीने मुंबईस यावे लागले. माझ्यावरील प्रसंगाप्रमाणे तुमच्यावरही असले अनेक प्रसंग येऊन गेले असतील. म्हणून म्हणतो की, ज्या समाजात माणुसकी नाही, थारा नाही त्या समाजात निष्कारण मानहानी भोगीत जीवन कंठण्यात काय अर्थ ! जो असल्या निर्दय धर्मात राहिल तो गुलाम आहे. ज्याला माणुसकी पाहिजे तो या सैतानी धर्मात राहणार नाही.

माझे वाडवडील या हिंदू धर्मात राहिले परंतु त्यांना हिंदू धर्माच्या नियमाप्रमाणे शिक्षण घेता आले नाही. त्यांना शस्त्र हातात धरण्याची धर्माने परवानगी दिली नव्हती. मुबलक संपत्ती मिळविणे धर्माच्या नियमाप्रमाणे त्यांना अशक्य होते. यामुळे आमच्या वाडवडिलांना या तिन्ही गोष्टी संपादन करता आल्या नाहीत. मला उच्च शिक्षण घेताना संस्कृत भाषा शिकावयाची होती. परंतु ती गोष्ट मला धर्म बंधनामुळे त्यावेळी शक्य झाली नाही. परंतु आता विद्या शिकणे, संपत्ती मिळविणे व शस्त्र हाती धरणे शक्य झाले आहे. अशा परिस्थितीत ज्या धर्माने तुमच्या पूर्वजांना गुलामगिरीत खितपत ठेवले, कोणत्याही परिस्थितीचा उपयोग करू न देता तुम्हाला अज्ञानात व दारिद्र्यात राहावयास भाग पाडले त्या हिंदू धर्माची तुम्ही का पर्वा बाळगता ? वाडवडिलांप्रमाणेच त्या हतबल, स्वाभिमानशून्य परिस्थितीचीच पाऊलवाट तुम्हाला आक्रमण करावयाची असल्यास तुम्हाला कुणी विचारणार नाही. तुमची कोणीही पर्वा बाळगणार नाही. धर्मांतराच्या प्रश्नाचे

आज महत्त्व आहे ते याचमुळे. हिंदूधर्मात राहिल्याने तुम्हाला गुलामापेक्षा श्रेष्ठ दर्जा प्राप्त होणार नाही. मी जरी अस्पृश्य राहिलो तरी हिंदू समाजातील एखादी व्यक्ती जे करू शकेल ते मला सहज करता येईल. माझ्या हिताहिताचा प्रश्न हिंदू धर्मात राहिल्याने किंवा न राहिल्याने सुटणार नाही, मी आजच्या परिस्थितीत हायकोर्टाचा जज् होऊ शकेन, कायदे कौन्सिलमध्ये मिनिस्टरचीसुद्धा जागा मिळवू शकेन, परंतु केवळ तुमच्या माणुसकीकरीता मला धर्मांतर करणे अगदी आवश्यक झाले आहे. आपल्या मातीमोल आयुष्याला सोन्याचे दिवस प्राप्त होण्यासाठीच मला धर्मांतराची आवश्यकता भासत आहे. तुमची स्थिती सुधारण्यासाठी माझ्या सहकारी मित्रांकडून अवश्य सहाय्य मिळेल, अशी मला खात्री वाटते. तुम्हाला कर्तबगार बनविण्यासाठी मला धर्मांतर करावयाचे आहे. माझ्या हिताच्या प्रश्नाबद्दल मी अगदी बेफिकीर आहे. आज जे मी कार्य करीत आहे ते सर्व तुमच्याच हितासाठी करीत आहे. मला तुम्ही ईश्वर मानता. परंतु मी ईश्वर नाही. मी तुमच्यासारखाच एक माणूस आहे. माझ्यापासून तुम्हाला जी काही मदत पाहिजे आहे, ती मी द्यायला तयार आहे. तुम्हाला तुमच्या आजच्या वाईट स्थितीतून मुक्त करण्याचे मी ठरविले आहे. माझ्यासाठी मी काही करीत नाही, तुम्हाला कर्तबगार बनता येईल इतके कसोशीचे प्रयत्न मात्र मी करीत राहणार. तुम्ही आपल्या परिस्थितीची जाणीव करून घ्या व मी जो मार्ग दाखवीन तो अनुसरा. म्हणजे तुमचे हित, तुमची कर्तबगारी फळास आल्याशिवाय राहाणार नाही.



## ८९

# मुक्ती कोन पथे ?

(दिनांक १३ ऑक्टोबर १९३५ रोजी येवले मुक्कामी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यानी, ' मी अस्पृश्य हिंदू असा डाग घेऊन जन्माला आलो पण ती गोष्ट माझ्या स्वाधिन नव्हती. तथापि, हिंदू म्हणवून घेत मी मरणार नाही. ' अशी क्रांतिकारी ऐतिहासिक घोषणा केली. या घोषणेमुळे संपूर्ण हिंदू तसेच इतर धर्मातील लोक खडबडून जागे झाले. त्यावर अनुकूल तशाच प्रतिकूल प्रतिक्रिया उमटू लागल्या होत्या. सर्व बाजूंनी विचारविनिमय करून पुढील कार्याची रुपरेषा आखण्याकरिता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी अखिल मुंबई इलाखा महार परिषदेच्या तर्फे मुंबई येथे दिनांक ३०-३१ मे, १ जून १९३६ ला परिषदेचे आयोजन केले होते. याच प्रसंगी मुंबई इलाखा संत समाजाची परिषद, मुंबई इलाखा मातंग परिषद तसेच राजकीय परिषद यांचे आयोजन केले होते. त्याप्रसंगी निघालेली पत्रके, कार्यक्रमाचे वृत्त, दिलेली डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे अंतर्भूत करीत आहोत. या सर्व परिषदांचे बाबासाहेब आंबेडकरांच्या आमूलाग्र समाज परिवर्तनाच्या क्रांतीत अन्यन्यसाधारण ऐतिहासिक स्थान आहे.

' मुक्ती कोन पथे ? ' या मुख्य भाषणानंतर मुंबई इलाखा अस्पृश्य संत समाजाची परिषद; राजकीय परिषद आणि मुंबई इलाखा मातंग परिषद यात झालेली डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे क्रमशः स्वतंत्रपणे देत आहोत.

–संपादक)

**अखिल मुंबई इलाखा महार परिषद आयोजित करण्याविषयक भूमिका दर्शविणारे जाहीर विनंतीपत्रक येणेप्रमाणे–**

" अखिल अस्पृश्यांचे एकमेव पुढारी दीनबंधू **डॉ. बाबासाहेब आंबेडकर** यांनी तारीख १३ ऑक्टोबर १९३५ रोजी येवले (जिल्हा नाशिक) येथे भरलेल्या परिषदेत सांगितले की, हिंदू धर्माची समाजरचना विषमतेच्या पायावर उभारलेली असल्यामुळे आपण हिंदू या नात्याने माणुसकीचे हक्क मिळविण्याकरिता कसेही आणि कितीही प्रयत्न केले तरी आपणास यश मिळणे शक्य नाही. आपण महाड, नाशिक व इतर ठिकाणी सत्याग्रह करून समानतेचे हक्क प्रस्थापित करण्यासाठी निकराचा व जोराचा प्रयत्न करून पाहिला, परंतु त्या लढ्यामध्ये आपले द्रव्यबळ व मनुष्यबळ खर्च झाले आणि त्यात आपणास यश मिळण्याऐवजी आपल्या

बांधवांना खेड्यापाड्यातून अनेक प्रकारचे हाल सोसावे लागले आणि हल्ली लागत आहेत. तरी आपणास जर मनुष्य म्हणून जगावयाचे असेल व आपली सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक व राजकीय परिस्थिती सुधारून आपले माणुसकीचे हक्क प्रस्थापित करावयाचे असतील **तर आपण या हिंदू धर्मापासून अलग झाले पाहिजे.** म्हणजे धर्मांतर केले पाहिजे आणि त्यातच आपणा सर्व अस्पृश्यांचे कल्याण आहे.

अस्पृश्यांच्या धर्मांतराचा प्रश्न हा अत्यंत महत्त्वाचा आहे. या प्रश्नाच्या बाबतीत अस्पृश्य जनतेचे धोरण निश्चित करणे हे अस्पृश्य जनतेचे कर्तव्य आहे, नव्हे जबाबदारी आहे. अस्पृश्यातील निरनिराळया जातींच्या निरनिराळया परिषदा भरवून त्यात या प्रश्नाचा खल करणे हा अस्पृश्य जनतेचे धोरण अजमावण्याचा मार्ग आहे, असे डॉ. बाबासाहेबांचे मत आहे.

वरील सूचनेनुसार, मुंबई इलाख्यातील सर्व महार बंधुभगिनीस विनंतीपूर्वक कळविण्यात येते की, मुंबई इलाख्यातील सर्व महारांची प्रातिनिधीक स्वरूपाची परिषद मुंबई शहरामध्ये येत्या **मे महिन्यात** भरविण्याचे मुक्रर केले आहे. परिषदेमध्ये आपले परमपूज्य पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी धर्मांतराची जी घोषणा केली आहे त्याबाबतीत आपल्या समाजाचे पुढील धोरण निश्चित ठरविले जाईल. तरी या महत्त्वाच्या परिषदेमध्ये प्रत्येक जिल्ह्याजिल्ह्यातून, तालुक्यातालुक्यातून, व प्रत्येक गावागावातून आपापले प्रतिनिधी पाठवून परिषद यशस्वी कराल अशी आशा आहे.

आपले कार्य अतिशय मोठे व महत्त्वाचे असल्यामुळे, या कार्यास पैशाची व मनुष्यांची फार जरूरी आहे तरी मुंबई शहरवासीयास व इलाख्यातील अखिल महार बंधुभगिनीस आग्रहाची व अगत्याची विनंती करण्यात येते की, त्यांनी आपआपसातील वैयक्तिक मतभेद बाजूस ठेवून व एकदिलाने या परिषदेमध्ये भाग घेऊन ही परिषद यशस्वी करावी.

**विशेष सूचना.**---परिषदेकरिता वर्गणी किंवा देणगी देणे असल्यास अगर काही सूचना किंवा इतर पत्रव्यवहार खालील पत्त्यावर करणे.

जॉईंट सेक्रेटरीज :---**अखिल मुंबई इलाखा महार परिषद, दामोदर हॉल, परळ, मुंबई नं. १२.**

ता. क. छापील पावती घेतल्याशिवाय आपली वर्गणी देऊ नये.

आपले नम्र,

अध्यक्ष :--**रेवजी दगडूजी डोळस.** उपाध्यक्ष :--**संभाजी तुकाराम गायकवाड.**

जॉ. सेक्रेटरीज :--**दिवाकर नेवजी पगारे, मारुती विठ्ठल घमरे, चांगदेव नारायण मोहिते.**

खजिनदार :--**सुभेदार विश्राम गंगाराम सवादकर.** "[1]

---

[1] जनता : २९ फेब्रुवारी १९३६.

वरील भूमिकेला अनुसरुन महार परिषद, संत समाज परिषद व मातंग परिषद आयोजित करण्यात आल्या होत्या. आयोजकांनी आपापल्या कार्यक्रमांची वेगवेगळी पत्रके काढली होती. ती खालीलप्रमाणे आहेत.

'' अखिल मुंबई इलाखा महार परिषद, मुंबई

**अध्यक्ष** : – मे. बी. एस. व्यंकटराव उर्फ हैद्राबादी आंबेडकर.

शनिवार, रविवार व सोमवार ता. ३०-३१ मे, १ जून १९३६.

**जागा** : – कामगार मैदान, परेल, मुंबई नं. १२.

पूर्वी जाहीर केल्याप्रमाणे अखिल मुंबई इलाखा महार परिषदेचा एकंदर कार्यक्रम पुढील अंकी देण्यात येईल. या परिषदेमध्ये धर्मांतरासंबंधी आपल्या मुंबई इलाख्यातील महार समाजाचे पुढील धोरण निश्चित केले जाणार आहे. तद्वत महार समाजाचे हिताच्या सर्व बाबींचा पूर्णपणे विचारविनिमय होणार असून पुढील कार्याची रूपरेषा आखण्यात येणार आहे.

सदर परिषद भावी इतिहासात सुवर्ण अक्षरांनी लिहिली जाणार आहे. करिता प्रत्येक महार बंधुभगिनींनी या परिषदेस अवश्य हजर राहून आपली सक्रीय सहानुभूती दाखवावी. ही परिषद प्रातिनिधीक स्वरूपाची व्हावी अशी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची इच्छा आहे. तरी ठिकठिकाणच्या महार समाजाने आपापले प्रतिनिधी त्वरित निश्चित करून त्यांची नावे, पत्ते, तसेच बाहेरगावच्या मंडळीने आपली वर्गणी, परिषदेसंबंधी काही सूचना, ठराव वगैरे खालील पत्त्यावर पत्रव्यवहार करणे अगर समक्ष भेटणे.

**वि. सू.**–बाहेरगावाहून येणाऱ्या प्रतिनिधीकरिता राहाण्याची व जेवणाची व्यवस्था स्वागत मंडळाने केली आहे. भोजनाची व राहाण्याची परिषदेच्या तिन्ही दिवसांची मिळून १ रु. फी ठेवलेली आहे. ज्यांना या सोयीचा फायदा घ्यावयाचा असेल त्यांनी खालील पत्त्यावर ता. २८-५-१९३६ पर्यंत आपआपली नावे नोंदविण्याची व्यवस्था करावी.

परिषदेसाठी पुढीलप्रमाणे वर्गणी ठेविली आहे

(१) स्वागत मंडळाचे सभासद रु. ५, (२) सहकारी सभासद रु. ३, (३) बाहेरगावच्या मंडळीला स्वागत मंडळाच्या सभासदत्वाची रु. ३, (४) साधारण सहकारी सभासद रु. २, (५) सर्वसाधारण सभासद रु. १, (६) फक्त स्त्रियांकरिता ८ आणे.

## मुंबई इलाखा महार परिषदेच्या मंडपातील कार्यक्रम

**शनिवार ता. ३० मे**–सायंकाळी ४ ते ५-३०–अध्यक्षांची मिरवणूक, राजगृहापासून सभा मंडपापर्यंत. ५-३० ते ६ वाजेपर्यंत–स्वयंसेवकांतर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि अध्यक्ष यांना सलामी. ६ ते ९ वाजेपर्यंत–(१) स्वागतापर पदे, (२) स्वागताध्यक्ष यांचे भाषण, (३) अध्यक्षांचे भाषण. रात्रौ ९-१५ ते १०-३०–भोजनाकरिता सुटी. १०-३० ते ११-३०–विषय नियामक कमिटीची सभा, ११-४५–पासून करमणुकीचे निरनिराळे कार्यक्रम.

**रविवार ता. ३१ मे**–सकाळी ८ ते ११–(१) स्वागतापर पदे (२) डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण. ११ ते २–भोजन व विश्रांती. दुपारी २ ते ४–विषय नियामक कमिटीची सभा. सायंकाळी ५ ते ८-३०–ठराव वगैरे. रात्रौ ९ वाजल्यापासून मनोरंजक कार्यक्रम, अध्यक्षांचे आभार आणि परिषद विसर्जन.

**सोमवार ता. १-६-३६ रोजी**–डॉ. बाबासाहेबांचे अध्यक्षतेखाली सकाळी ८ ते ११-३० संत समाजाची परिषद. सायंकाळी ५ ते ८-३० राजकीय परिषद. रात्रौ ९ वाजता श्री. रेवजी दगडूजी डोळस यांना मुंबई शहरवासीय अस्पृश्य समाजातर्फे मानपत्र व महार परिषदेस उत्तम तऱ्हेने मदत केलेल्या मंडळीस पारितोषिके आणि आभार मानणे व अध्यक्षांचे भाषण आणि परिषद विसर्जन.

आपले नम्र

स्वागताध्यक्षः–रेवजी दगडूजी डोळस

उपाध्यक्षः–संभाजी तुकाराम गायकवाड

जॉ. सेक्रेटरीज :–दिवाकर नेवजी पगारे,

मारुती विठ्ठल घमरे, चांगदेव ना. मोहिते

खजिनदार :–सु. विश्राम गंगाराम सवादकर

पैसे व पत्रे वगैरे पाठविण्याचा पत्ता

जॉ. से. श्री. दिवाकर नेवजी पगारे,

अखिल मुंबई इलाखा महार परिषद, दामोदर हॉल,

परळ, मुंबई नं. १२.''[१]

---

[१] जनता : १६ मे १९३६.

'' मुंबई इलाखा संत समाजाची परिषद

अध्यक्ष–डॉ. बाबासाहेब आंबेडकर

सोमवार, ता. १ जून १९३६ रोजी

ठिकाण–महार परिषदेचा मंडप

धर्मांतराच्या प्रश्नाबाबत संत समाजातर्फे विचारविनिमय करण्यात येईल.

परिषदेविषयी सविस्तर माहिती देणारी जाहीर पत्रके रवाना होत आहेत, तरी सर्व संत, साधु, नाथ, . बैरागी वगैरे मंडळींनी या परिषदेत भाग घ्यावा. पत्रव्यवहार पुढील पत्त्यावर करणे.––

पत्ता :– उपाध्यक्ष, तारकनाथ विठ्ठलनाथ.

फोरास रोड, सिमिंट चाळ नं. ६, मुंबई नं. ८.

स्वागताध्यक्ष :–महंत शंकरदास नारायणदास बर्वे.

ज. सेक्रेटरी :–काशिनाथ तुळशीनाथ महंत.

---

मुंबई इलाखा मातंग परिषद

अध्यक्ष–मे. लक्ष्मणराव बाबाजी भिंगारदेवे बी. ए. (ऑनर्स)

मंगळवार, ता. २ जून १९३६ रोजी

ठिकाण –महार परिषदेचा मंडप, नायगाव, मुंबई

या परिषदेत 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर' यांनी केलेल्या 'धर्मांतरा' च्या प्रश्नाबाबत निर्णयात्मक चर्चा होईल.

परिषदेविषयी सविस्तर माहिती जाहीर पत्रकाच्याद्वारे आमच्या मातंग बांधवांना करून देण्यात येईल. विशेष चौकशीकरिता खालील पत्त्यावर पत्रव्यवहार करावा.––

स्वागताध्यक्ष :–विष्णू केशव वेताळजे.

पत्ता – जनरल सेक्रेटरी डी. सी. वायदंडे

मुंबई इलाखा मातंग परिषद, नायगाव,

बी. डी. चाळ नं. ४, बी. प्लॉट, १ मजला,

खो. नं. २६, दादर-मुंबई.'' [१]

[१] जनता : ३० मे १९३६.

## '' अखिल मुंबई इलाखा महार परिषद, मुंबई

### अपूर्व व यशस्वी अधिवेशन

### सामुदायिक धर्मांतरास पाठिंबा

मुंबई इलाखा महार परिषदेचे अधिवेशन ता. ३० मे १९३६ रोजी हैद्राबाद संस्थानातील प्रख्यात पुढारी श्री. बी. एस. व्यंकटराव यांचे अध्यक्षतेखाली मोठ्या थाटाने सुरू झाले. या परिषदेसाठी ५० हजारावर लोक प्रशस्तपणे बसू शकतील असा प्रचंड शोभिवंत मंडप दादर-नायगाव नाक्यावरील विस्तीर्ण मैदानावर उभारण्यात आला होता. या विस्तीर्ण मंडपास महाड दरवाजा, नाशिक दरवाजा व रमाबाई आंबेडकर दरवाजा असे तीन विशाल दरवाजे करण्यात आले होते व मंडपास ' रमाबाई नगर ' असे नाव देण्यात आले होते. मंडपाचे आत खालीलप्रमाणे उद्‌बोधक वाक्ये असलेल्या पाट्या लटकावलेल्या होत्या :--

* '' माणुसकी प्राप्त करून घ्यावयाची असेल तर धर्मांतर करा. संघटना करावयाची असेल तर धर्मांतर करा.
* सामर्थ्य संपादन करावयाचे असेल तर धर्मांतर करा.
* समता प्राप्त करून घ्यावयाची असेल तर धर्मांतर करा.
* स्वातंत्र्य प्राप्त करून घ्यावयाचे असेल तर धर्मांतर करा.
* संसार सुखाचा करावयाचा असेल तर धर्मांतर करा.
* जो धर्म तुमच्या माणुसकीला काही किंमत देत नाही त्या धर्मात तुम्ही का राहता ?
* जो धर्म तुम्हाला देवळात जाऊ देत नाही त्या धर्मात तुम्ही का राहता ?
* जो धर्म तुम्हाला पाणी मिळू देत नाही त्या धर्मात तुम्ही का राहता?
* जो धर्म तुम्हाला शिक्षण घेऊ देत नाही त्या धर्मात तुम्ही का राहता ?
* जो धर्म तुमची पदोपदी मानहानी करतो त्या धर्मात तुम्ही का राहता ?
* जो धर्म तुमच्या नोकरीच्या आड येतो त्या धर्मात तुम्ही का राहता ?
* ज्या धर्मात माणसाशी माणुसकीने वागण्याची मनाई आहे तो धर्म नसून शिरजोरीची सजावट आहे.
* ज्या धर्मात माणसाची माणुसकी ओळखणे अधर्म मानला जातो तो धर्म नसून रोग आहे.
* ज्या धर्मात अमंगल पशूचा स्पर्श झाला असताना चालतो पण माणसाचा स्पर्श चालत नाही तो धर्म नसून वेडगळपणा आहे.
* जो धर्म एका वर्गाने विद्या शिकू नये, धनसंचय करू नये, शस्त्रधारण करू नये, असे सांगतो तो धर्म नसून माणसाच्या जीवनाचे विडंबन आहे.

* जो धर्म अशिक्षितांना अशिक्षित रहा, निर्धनांना निर्धन रहा अशी शिकवण देतो तो धर्म नसून ती शिक्षा आहे.
* वाचेने सर्वांभूती एक ईश्वर म्हणणारे आणि कृतीने माणसाला पशूतुल्य लेखणारे लोक दांभिक आहेत. त्यांचा संग करू नका.
* मुंग्यांना साखर घालणारे आणि माणसांना पाण्यावाचून मारणारे लोक दांभिक आहेत, त्यांचा संग करू नका.''

आजवरी होतो तुझे सत्तेखाली !!
तोवरी केली विटंबना !!

व्यासपीठावर पाचशेवर मंडळी सहज बसू शकतील इतके ते विस्तृत होते. मंडपावर समतेचे झेंडे फडकत होते. सर्व श्रोतृसमुदायास भाषणे ऐकण्यास सापडावीत म्हणून मायक्रोफोन लावण्यात आले होते.

सुभेदार विश्राम सवादकर हे आपल्या समता सैनिक दलाच्या ५०० सैनिकांसह मंडपात व्यवस्था ठेवण्यास सज्ज होते. या दलाचा बँड व पुण्याच्या मिलीटरी पेन्शनरांचा बँड श्री. बाबुराव पवारांनी पुण्याहून परिषदेसाठी मुद्दाम आणला होता.

अधिवेशनाची वेळ सायंकाळी ७ ची होती. परंतु चार वाजल्यापासूनच प्रतिनिधींच्या व प्रेक्षकांच्या सुमारे ३०/३५ हजार लोकांच्या प्रचंड समुहाने मंडप गच्च भरून गेला होता. या परिषदेसाठी प्रत्येक जिल्ह्यातील महार पुढारी आपआपल्या जिल्ह्यातील लोकांसह हजर होते. सातारा जिल्ह्यातून मे. बळवंत सखाराम सावंत, पिराजी संभाजी खरात, आर. एन. नलावडे, गणेश हरी खरात, नाशिक जिल्ह्यातून श्री. भाऊराव गायकवाड, अमृतराव रणखांबे, श्री. दाणी, टी. एस काळे, पुंजाजी जाधव, कुलाबा जिल्ह्यातून बाबूराव भातणकर, गणपतबुवा जाधव, कुडवलकर, गोविंदराव वरघरकर, पुण्याहून मधाळे, सुभेदार घाटगे, भोसले, बाबूराव पवार, नानासाहेब वाघमारे, नाथामहाराज (भंगी), शांताराम उपशाम, कर्नाटकातून बळवंतराव वराळे, ए. के. माळगे, मारुतीराव जोतीराव रावण, सोलापुराहून एन. टी. बंदसोडे, जिवाप्पा ऐदाळे, उद्धव धोंडो शिवशरण, बापुजी सर्वगौड, केरू रामचंद्र जाधव, माघाडे, हैद्राबाद संस्थानचे ग. नी. गायकवाड, कांबळे, पवार, अहमदनगरचे पी. जी. रोहम, सूर्यवंशी, शंकरराव साळवी, ठाणे जिल्ह्याचे शिवराम गोपाळ जाधव, बी. व्ही. दोंदे, भाऊ हरी पंडीत, दामोदर हरी वसईकर, बी. डी खंडे, पूर्वखानदेशातील पुढारी दौलतरावजी जाधव, त्रिंबक सेनू भालेराव, काळू विठू तायडे, लक्ष्मण पा. मेढे, नथुरावजी लोखंडे, जगन्नाथ खंडोजी बडगे, काळोजी तायडे, मोतीराम रावजी लोखंडे, भिकन गणूजी भैरूगे, शिवा रघुनाथ भास्कर, धर्माजी आबाजी वारभुवन,

पश्चिम खानदेशातून पुंडलीक तुकाराम बोराळे, व्ही. टी. जाधव, महादेव गणेश ऐदाळे, सदाशीव लक्ष्मण गायकवाड, तुळजाराम भिकाजी तळभंडारे, लक्ष्मणराव गायकवाड, लक्ष्मणराव गजभिव, किसनराव वाघमारे, पाटोळे, मुंबईचे शिवतरकर मास्तर, साळवी बोरवरकर, वनमाळी, सोळंकी, वाळिंजकर, शंकरराव वडवलकर, जनाबाई मोरे, सोनुबाई सयाजी डावरे, भागिरथीबाई तांबे, अनुसयाबाई व्हावळ, राजुबाई लक्ष्मणराव गायकवाड, मिसेस सवादकर, बी. एस. सावंत, पी. एल.लोखंडे, पोलादपूर सुभ्याचे बी. टी. तांबे, रत्नागिरीचे मुसाडकरबुवा, मोहिते मास्तर, राजाराम भोळे, अर्जूनराव साळवी, जी. ओ. सी. जंजीरा संस्थानचे महादेव खैरे, भोर संस्थानचे गायकवाड, भालेराव, सांगली संस्थानचे कांबळे, मोरे, जत संस्थानचे ऐदाळे, अकलकोटचे जाधव, जव्हार संस्थानचे पवार, गायकवाड, जमखिंडीचे वाघचौरे, खैरमोडे, औंध संस्थानचे घाटगे, इंदूरहून नगिना नाईक, महूहून श्री. लोखंडे, करडक, निळे, प्रसिद्ध कीर्तनकार दिगंबर नागनाथ कांबळे, राघू सया डुबल, वसंतराव भातणकर, आर. एच. अडांगळे, जी. एस. दारोळे, दादा पगारे मास्तर, रोकडे, संभाजी तुकाराम गायकवाड, चांगदेव नारायण मोहिते, बाबाजी शिंदे, रामचंद्र वाघचौरे, सोनु सजनाजी संदीरकर वगैरे. मुंबई इलाख्यातील सर्व जिल्ह्यातून व संस्थानातून पुढारी मंडळी आपआपल्या जिल्ह्यातील लोकांसह परिषदेस हजर होती. शिवाय, परिषदेस देवदत्त नारायण टिळक, देवराव नाईक, डी. व्ही. प्रधान, डॉ. मिसेस चंपुताई प्रधान, दत्तोपंत देशपांडे, बाबूजी कवळी, असयीकर वकील, वेदक वकील, बी. कद्रेकर, एम. के. कर्णिक, ॲडव्होकेट पाध्ये, पी. जी. काणेकर, बापूसाहेब सहस्त्रबुद्धे, अनंत हरी गद्रे, बॅ. समर्थ, भास्करराव जाधव, कमलाकान्त चित्रे, अनंतराव चित्रे, गोपीनाथ प्रधान, शांताराम पोतनीस, सुरेंद्रनाथ टिपणीस वगैरे मंडळी व शिख समाजातील सरदार, सरदार ईश्वरसिंग, दरबार सिंग, केहरसिंग, अमरसिंग वगैरे शिख पुढारी मंडळी आपल्या शिखबांधवासह हजर होती.

परिषदेस सायंकाळी ६-३० ला अध्यक्ष व्यंकटराव व डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे समता सैनिक दलाची गार्ड ऑफ ऑनरची सलामी घेत परिषदेच्या मंडपात आले. ते येत असताना त्यांच्या नावाचा प्रचंड जयघोष ते स्थानापन्न होईपर्यंत होत होता. सुरवातीस स्वागत पद्यगायन झाले व पुढे स्वागताध्यक्ष रेवजीबुवा उर्फ दादासाहेब डोळस यांचे भाषण झाले.

स्वागताध्यक्ष दादासाहेब डोळस यांचे भाषण झाल्यावर पुण्याचे पुढारी श्री. राजाराम भोळे यांनी अध्यक्षांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती केली. त्यास नाशिकचे पुढारी श्री. भाऊराव गायकवाड यांनी व श्री. चांगदेव मोहिते आणि सुभेदार घाटगे यांनी अनुमोदन दिल्यावर अध्यक्ष स्थानापन्न झाले.

नंतर श्री. संभाजीराव गायकवाड यांनी त्यांना पुष्पहार अर्पण केले. नंतर ठिकठिकाणचे शुभसंदेश परिषदेचे चिटणीस श्री. दिवाकर पगारे यांनी वाचले. त्यात श्री. रावजी ठेंगे, रावसाहेब पापण्णा व सरदार केरसिंग यांचेकडून आलेले संदेश प्रमुख असून त्या सर्वात धर्मांतराचे घोषणेस पाठिंबा व प्रोत्साहन देण्यात आले होते.

नियोजित अध्यक्ष श्री. व्यंकटराव हे भाषण करण्यास उठताच टाळयांचा प्रचंड कडकडाट व डॉ. बाबासाहेब आंबेडकर व व्यंकटराव यांच्या नावाचा वातावरण दुमदुमून टाकणाऱ्या गगनभेदी गर्जनेत जयजयकार झाला. हा जयजयकार थांबल्यावर अध्यक्ष व्यंकटराव यांनी हिंदीत भाषण केले.

## परिषदेमध्ये पास झालेले ठराव

ठराव १ ला–(अ) मुंबई इलाख्यातील महार जातीची ही परिषद पूर्ण विचारांती असे जाहीर करते की महार जातीला समाजात समता, स्वातंत्र्य मिळविण्यासाठी धर्मांतर करणे हा एकच उपाय आहे. ही परिषद आमचे एकमेव परमपूज्य पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना निश्चयपूर्वक असे जाहीर आश्वासन देते की महार समाज सामुदायिकरित्या धर्मांतर करण्यास तयार आहे.

(ब) पूर्वतयारी म्हणून महार जातीने यापुढे हिंदू देवतांची पूजा अर्चा करू नये. हिंदूंचे सण, व्रत वैकल्ये, उपोषणे, वगैरे पाळू नयेत व हिंदुंच्या कोणत्याही उत्सवात भाग घेऊ नये, तीर्थाटणे, वाऱ्या वगैरे करू नयेत, अशी या परिषदेची महार जातीला सूचना आहे.

हा ठराव नाशिकचे सुप्रसिद्ध पुढारी श्री. भाऊराव कृष्णराव गायकवाड यांनी मांडला तर या ठरावाला धारवाडचे श्री. एस. एस. वराळे यांनी अनुमोदन दिले आणि त्यांनी त्यानुसार आपले विचार प्रकट केले. या ठरावाला पाठिंबा दर्शवितांना अहमदनगरचे श्री. पी. जे. रोहम, जनाबाई मोरे, कु. राजुबाई गायकवाड, सौ. सोनुबाई डावरे, कु भागिरथीबाई तांबे, कुलाब्याचे प्रमुख पुढारी श्री. विश्राम गंगाराम सवादकर, यांची भाषणे झाली.

## पहिल्या आठवड्यातील परिषदा

ता. ३० मे ते ता. २ जून १९३६ पर्यंत मुंबई येथील दादर-नायगाव भागात अस्पृश्य बांधवांच्या झालेल्या परिषदांनी बरीच मोठी खळबळ उडून गेली. मुंबई इलाखा महार परिषदेसाठी दादर येथे टोलेजंगी मंडप उभारला होता. या मंडपास कै. रमाबाई ऊर्फ आईसाहेब भीमराव आंबेडकर यांच्या स्मरणार्थ ' रमाबाई नगर ' असे नाव देण्यात आले होते. शिवाय ज्या प्रमुख शहरी अस्पृश्यांनी आपल्या स्वाभिमानाच्या, स्वावलंबनाच्या व समानतेच्या हक्कासाठी, गेली कित्येक वर्षे निकराचे लढे लढविले त्या ' महाड ' व ' नाशिक ' येथील

सत्याग्रहाच्या स्मरणाप्रित्यर्थ मंडपाच्या दोन्ही दरवाज्यांना ' महाड दरवाजा ' व ' नाशिक दरवाजा ' अशी नावे ठेविण्यात आली होती.

अशा या नयनमनोहर आणि भव्य मंडपात मुंबई इलाखा महार परिषदेचे अधिवेशन अपूर्व उत्साहाने आणि यशस्वी रीतीने पार पडले. या परिषदेच्या अध्यक्षस्थानी हैद्राबादचे सुप्रसिद्ध अस्पृश्य पुढारी मि. बी. एस. व्यंकटराव ऊर्फ हैद्राबादी आंबेडकर यांची योजना झाल्यामुळे परिषदेच्या नावलौकिकात विशेष भर पडली होती.

ही परिषद मुंबई इलाख्यासाठी असताही मध्यप्रांत, वऱ्हाड, इंदूर, महू, हैद्राबाद वगैरे परप्रांतातील प्रमुख पुढारी मंडळी या परिषदेला हजर राहिली होती. मुंबईला ही अस्पृश्य समाजातील महार बांधवांची प्रचंड परिषद पाहून स्पृश्य जनतेच्या दृष्टिकोनात फरक झाल्याशिवाय राहणार नाही. महार समाजातील प्रत्येक व्यक्तीने या परिषदेत आपुकलीने भाग घेऊन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांवरील आपले अढळ असलेले प्रेम व्यक्त केले. परिषदेसाठी आलेल्या हजारो महार बांधवांची शिस्त वाखाणण्यासारखी होती. या परिषदेची व्यवस्था ठेवण्यात समता सैनिक दलाने केलेली कामगिरी वाखाणण्यासारखी अशीच झाली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी परिषदेसाठी रात्रंदिवस जातीने मेहनत घेतली होती. कोणाही प्रतिनिधीची, निमंत्रित पाहुण्याची वगैरे गैरसोय होऊ नये, या विषयी राखीव व्यवस्थापक मंडळींनी विशेष खबरदारी घेतली होती. परिषदेस अस्पृश्य वर्गाचे पुढारी डॉ. पी. जी. सोळंकी यांचीही डॉ. आंबेडकर साहेबांना विशेष मदत झाली. परिषदेस आलेल्या मंडळीत मे. भास्करराव जाधव, शेठ शंकरराव परशा, पी. आर. लेले, पी. जी. अभ्यंकर, डॉ. सोळंकी, अमृतराव रणखांबे, भाऊराव गायकवाड, ॲडव्होकेट पाध्ये, बॅ. समर्थ, सौ. वत्सलाबाई शेगावकर, सौ. वेदक, सौ. डॉ. चंपूताई प्रधान, देवराव नाईक, अनंतराव चित्रे, बापूसाहेब सहस्त्रबुद्धे, सुरेंद्रनाथ टिपणीस, नागपूरचे मेश्राम, एम्. के. कर्णिक, एल. एन. हरदास, शेठ मनियार वगैरे प्रमुख मंडळी हजर होती.

सोमवार ता. १ जून १९३६ रोजी सकाळी डॉ. आंबेडकर साहेब यांच्या अध्यक्षतेखाली मुंबई संत समाजाची परिषद झाली. यावेळी स्वागताध्यक्ष श्री. शंकरदास नारायणदास बर्वे यांचे परिणामकारक असे भाषण झाले. अध्यक्ष या नात्याने डॉ. आंबेडकर यांनी केलेले भाषण संत जनतेच्या अंतःकरणात खळबळ उडवून देण्यास कारणीभूत झाले. पूर्वी निर्धार केल्याप्रमाणे शेकडो संतानी आपल्या दाढ्यामिशा, जटा, माळा अग्नीकुंडात अर्पण केल्या. रात्री डॉ. आंबेडकर यांच्याच अध्यक्षतेखाली राजकीय परिषद भरली होती. यावेळी त्यांनी नवीन सुधारणा व नवीन कायदे कौन्सिलच्या निवडणुकी कशा लढवाव्यात याविषयी परिणामकारक विवेचन केले.

## परिषदेतील गायनाचा कार्यक्रम

परिषदेच्या कार्यक्रमात ईशस्तवन, स्वागत व आभारप्रदर्शनाची गाणी ज्या मुलींनी सुस्वर आवाजात म्हटली व लोकरंजन केले त्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत :–

कु. कमळाबाई अमृतराव रणखांबे.
" पार्वतीबाई बळीराम पंडीत.
" शांताबाई बळीराम नेवाळकर.
" गोदावरी महादेव रोकडे.
" मनोरमा बळीराम भातनकर.
" कुसूम लक्ष्मण जाधव.
" चांगुणाबाई भागोजी कांबळे.
" प्रेमाबाई चरणदास गायकवाड.

मे. नामदेव महादेव सुर्वे (पेटीवादन), शंकर अर्जुन सोनवणे (तबला), हिराजी रामचंद्र औंधकर (दिलरुबा), महादेव पाचरडकर (सतार) इत्यादि मंडळींनी निरनिराळया वाद्यात दाखविलेले प्राविण्य वाखाणण्यासारखे होते. "[१]

## डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण

" अखिल मुंबई इलाखा महार परिषदेत दि. ३१ मे १९३६ रोजी डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी भाषण केले ; ते परिषदेला संबोधित करताना म्हणाले,

सद्गृहस्थ, बांधवांनो आणि भगिनींनो,

ही परिषद मी केलेल्या धर्मांतराच्या घोषणेचा विचार करण्याकरिता मुद्दाम बोलावण्यात आलेली आहे, हे तुम्हास कळून चुकले आहेच. धर्मांतराचा विषय हा माझ्या दृष्टीने अत्यंत जिव्हाळयाचा आहे. इतकेच नव्हे तर तुमचे पुढील सर्व भवितव्य माझ्या दृष्टीने त्याच्यावर अवलंबून असल्याकारणाने तो विषय मला अत्यंत महत्त्वाचाही वाटतो. हे महत्त्व तुम्हा सर्वांना पटले आहे असे म्हणण्यास काही हरकत वाटत नाही. तसे नसते तर आज एवढ्या मोठ्या समुदायाने तुम्ही येथे जमला नसता आणि म्हणून तुम्ही सर्वजण जे या ठिकाणी जमला आहात ते पाहून मला अतिशय आनंद वाटतो.

### परिषदेची आवश्यकता

धर्मांतराची घोषणा केल्यापासून अनेक ठिकाणी लहान-मोठ्या प्रमाणावरती सभा भरवून आपल्या लोकांनी या विषयावरील आपले मत व्यक्त केलेले सर्वांच्या कानी आलेले आहे. परंतु सर्वांनी एके ठिकाणी जमून विचारविनिमय करून धर्मांतराच्या प्रश्नाची निर्णयात्मक चर्चा करण्याची संधी आजपावेतो आपल्याला प्राप्त झालेली नव्हती. तशा संधीची तुमच्यापेक्षा मला अत्यंत जरूरी होती.

[१] जनता : २० जून १९३६.

धर्मांतराची मोहीम सफल होण्याकरिता पुर्वतयारीची फारच आवश्यकता आहे, ही गोष्ट तुम्हा सर्वांना कबूल करावी लागेल. धर्मांतर हा काही पोरखेळ नव्हे. धर्मांतर हा मौजेचा विषय नव्हे. हा प्रश्न माणसाच्या जीविताच्या साफल्याचा प्रश्न आहे. जहाजातून एका बंदराकडून दुसऱ्या बंदराला नेण्याकरिता नावाड्याला जेवढी पूर्वतयारी करावी लागते तेवढीच पूर्वतयारी धर्मांतराकरिता करावी लागणार आहे. त्याशिवाय हा तीर सोडून पैलतीर गाठणे शक्य होणार नाही. परंतु नावेत किती उतारु येतात याचा अंदाज समजल्याखेरीज नावाडी सामानसुमान जमविण्याच्या प्रयत्नास लागत नाही. त्याचप्रमाणे माझीही स्थिती आहे. किती लोक धर्मांतर करण्यास तयार आहेत, याचा कयास लागल्याशिवाय मला धर्मांतराची पूर्वतयारी करण्याच्या उद्योगास लागणे शक्य नाही. परंतु आपल्या लोकांची कोठेतरी एकत्रित अशी परिषद झाल्याशिवाय लोकमताचा ठाव मिळणे शक्य नव्हते. अशाप्रकारे लोकमताचा ठाव घेण्याची संधी मला प्राप्त झाली पाहिजे, असे जेव्हा मी मुंबईच्या कार्यकर्त्या लोकास सांगितले तेव्हा त्यांनी खर्चाची अगर परिश्रमाची सबब पुढे न करता परिषद भरविण्याची जबाबदारी आपल्या अंगावर मोठ्या खुषीने घेतली. ती जबाबदारी पार पाडण्याकरिता त्यांना किती कष्ट सोसावे लागले याची हकीगत आपले परमपूज्य पुढारी व स्वागत मंडळाचे अध्यक्ष राजमान्य राजश्री रेवजी दगडूजी डोळस यांनी आपल्या भाषणात सविस्तरपणे सांगितली आहे. इतक्या खस्ता खाऊन त्यांनी माझ्याकरिता हा जो सभेचा घाट घडवून आणला त्याकरिता मी परिषदेच्या स्वागत मंडळाचा अत्यंत ऋणी आहे.

## नुसत्या महारांचीच परिषद का ?

माझी धर्मांतराची घोषणा जर सर्व अस्पृश्यांकरिता आहे तर मग सर्व अस्पृशांची सभा का बोलविली नाही, नुसत्या महारांचीच सभा का बोलावण्यात आली, असा आक्षेप काही लोक घेण्याचा संभव आहे. ज्या प्रश्नाची चर्चा करण्याकरिता ही सभा बोलावण्यात आली आहे त्या प्रश्नाचा खल करण्यापूर्वी या आक्षेपाला उत्तर देणे मला आवश्यक वाटते. महारांचीच सभा का बोलाविली व सर्व अस्पृश्यांची सभा का बोलाविली नाही, याला अनेक कारणे आहेत. पहिले कारण असे की, या परिषदेत कसल्याही प्रकारच्या मागण्या मागावयाच्या नाहीत. सरकारपासून काही राजकीय हक्क मागावयाचे नाहीत किंवा हिंदू लोकांपासून काही सामाजिक हक्क मागावयाचे नाहीत. आपल्या जीविताचे काय करावयाचे, आपल्या आयुष्यक्रमाची रूपरेखा कशी ठरवावयाची, एवढाच प्रश्न या परिषदेपुढे आहे. तो प्रश्न ज्या त्या जातीला सोडवता येण्यासारखा आहे व तो ज्या त्या जातीने स्वतंत्र विचार करून सोडवणे बरे. ज्या कारणांकरिता सर्व अस्पृश्य लोकांची सभा एकत्रित करण्याची मला आवश्यकता वाटली नाही, त्यापैकी हे एक कारण आहे. नुसती महारांचीच परिषद भरविण्याचे दुसरेही एक कारण आहे. धर्मांतराची घोषणा केल्यापासून आज जवळ जवळ दहा महिन्यांचा अवधी

लोटलेला आहे. या अवधीत लोकजागृतीचे काम पुष्कळसे झाले आहे. आता लोकमत अजमाविण्याची वेळ आली आहे, असे मला वाटते. हे लोकमत अजमाविण्याला निरनिराळया जातीची सभा करणे हे एक साधे आणि सोपे साधन आहे, अशी माझी समजूत आहे. धर्मांतराचा प्रश्न कृतीत उतरविण्याकरिता जो प्रयत्न करणे आवश्यक आहे तो प्रयत्न करण्यापूर्वी खरे लोकमत काय आहे याची खात्री करून घेणे अत्यंत आवश्यक आहे. आणि माझी अशी समजूत आहे की, जाती जातीची सभा करून अजमाविलेल्या लोकमताबद्दल जशी खात्री देता येईल, तशी सर्वसाधारण अस्पृश्यांची सभा भरवून अजमाविलेल्या लोकमताबद्दल देता येणार नाही. कारण सर्व अस्पृश्यांची परिषद असे नाव देऊन जरी सभा बोलविली तरी ती सर्व अस्पृश्यांची प्रातिनिधीक स्वरुपाची सभा होऊ शकणार नाही. तसे होऊ नये व लोकमताची खात्री करून घेता यावी म्हणूनच नुसत्या महार लोकांची सभा भरविण्यात आलेली आहे. या सभेत इतर जातींचा समावेश न केल्यामुळे त्यांचे काही नुकसान होऊ शकत नाही. त्यांना धर्मांतर करावयाचे नसेल तर त्यांचा या सभेत समावेश न केल्यामुळे त्यांना वाईट वाटण्याचे काही कारण नाही. त्यांना धर्मांतर करावयाचे असेल तर या सभेत त्यांचा समावेश करण्यात आला नव्हता म्हणून त्यांच्या धर्मांतरात कसलीही आडकाठी येऊ शकणार नाही. जशी महार लोकांची सभा भरविण्यात आलेली आहे तशीच अस्पृश्यांतील इतर जातींना आपापल्या जातीच्या सभा भरवून या विषयासंबंधाने आपले लोकमत व्यक्त करण्याची संधी मोकळी आहे व तशा सभा त्यांनी कराव्या, अशी मी त्यांना सूचना करतो आणि त्या कामी त्यांना माझ्याकडून जी मदत होण्यासारखी असेल ती मी अवश्य करीन. येथवर झाली ती केवळ प्रस्तावना झाली. आता मी आजच्या सभेच्या मुख्य विषयाकडे वळतो.

धर्मांतराचा विषय जितका महत्त्वाचा आहे तितकाच तो गहनही आहे. साध्या माणसाच्या बुद्धीला त्याचे आकलन होणे कठीण आहे. तसेच साध्या माणसाला धर्मांतरासारख्या विषयाची समजूत करून देणे हे काम काही सोपे दिसत नाही. तथापि, तुम्हा सर्वांची समजूत पटल्याशिवाय धर्मांतर कृतीत उतरविणे कठीण आहे, याची जाणीव मला पूर्णपणे आहे आणि म्हणून जितक्या सुलभरितीने या विषयीची मांडणी मला करता येईल तितक्या सुलभरितीने मी ती करणार आहे.

## धर्मांतराची ऐहिक कारणे

धर्मांतराच्या विषयावर दोन दृष्टीने विचार केला पाहिजे. सामाजिक दृष्टीने विचार केला पाहिजे, तसाच धार्मिक दृष्टीनेही विचार केला पाहिजे, ऐहिक दृष्टीने विचार केला पाहिजे, तसेच तात्त्विक दृष्ट्याही विचार केला पाहिजे. परंतु कोणत्याही दृष्टीने धर्मांतराचा विचार करू लागलो तरी प्रथमतः अस्पृश्यता ही काय बाब आहे, तिचे खरे स्वरूप काय, याचा पुरता समज करून घेणे अत्यंत आवश्यक आहे. त्याशिवाय माझ्या धर्मांतराच्या घोषणेचा अर्थ तुम्हाला कळणे शक्य होणार नाही. अस्पृश्यता ही काय बाब आहे व तिचे खरे स्वरूप काय आहे,

याचा तुम्हास समज व्हावा म्हणून प्रथमतः तुमच्यावर होत असलेल्या जुलूमाच्या कहाणीची तुम्हाला आठवण करून देणे आवश्यक वाटते. सरकारी शाळेत मुले घालण्याचा हक्क सांगितल्यामुळे, विहीरीवर पाणी भरण्याचा हक्क सांगितल्यामुळे, वरात घोड्यावरून नेण्याचा हक्क सांगितल्यामुळे स्पृश्य हिंदुनी मारहाण केल्याची उदाहरणे नेहमीच घडत असल्याकारणाने ती सर्वांच्या डोळ्यापुढे नेहमी असतात. परंतु मारहाण करण्याची दुसरी अशी अनेक कारणे आहेत की ज्यांचा उल्लेख केला असता हिंदुस्थानच्या बाहेरील लोकांना तरी त्याचा विस्मय वाटेल. उंची पोषाख घातल्यामुळे मारहाण केल्याचे उदाहरण देता येईल. दागदागिना घातल्यामुळे मारहाण केल्याचे उदाहरण देता येईल. पाणी आणण्याकरिता तांब्या-पितळेची भांडी वापरल्यामुळे मारहाण केल्याचे उदाहरण देता येईल. जमीन खरेदी केल्यामुळे जाळपोळ केल्याचे उदाहरण देता येईल. जानवे घातल्यामुळे मारहाण केल्याचे उदाहरण देता येईल. मेलेली गुरे न ओढल्यामुळे व मेलेल्या गुरांचे मांस न खाल्ल्यामुळे मारहाण केल्याचे उदाहरण देता येईल. पायात बूट व मोजे घालून गावातून गेल्यामुळे, भेटलेल्या स्पृश्य हिंदुस जोहार न घातल्यामुळे, शौचास जाताना तांब्यात पाणी नेल्यामुळे छळ झाल्याची उदाहरणे देता येतील व पंचाच्या पंक्तीत चपाती वाढल्यामुळे मारहाण केल्याचे उदाहरण नुकतेच घडले आहे. वरील प्रकारचे जोरजुलूम झाल्याचे व तुम्हाला अमानुष तऱ्हेने वागविल्याची अनेक प्रकरणे तुमच्या ऐकिवात असतील व तुमच्यापैकी काहींना तर त्याचा प्रत्यक्ष अनुभवही असेल. जेथे मारहाण करता येण्यासारखे नसेल तेथे बहिष्काराच्या शस्त्राचा तुमच्याविरूध्द कसा उपयोग करण्यात येतो हेही तुम्हास अवगत आहेच. मोलमजुरी मिळू द्यावयाची नाही, रानातून गुरांना जाऊ द्यावयाचे नाही, माणसांना गावात येऊ द्यावयाचे नाही वगैरे सर्व प्रकारची बंदी करून स्पृश्य हिंदू लोकांनी तुमच्या लोकास जेरीस आणल्याची आठवण तुम्हांपैकी पुष्कळांना असेल. परंतु हे असे का घडते, याच्या मुळाशी काय आहे, ही गोष्ट माझ्या मते तुमच्यापैकी फारच थोड्या लोकांना कळत असेल. ती समजून घेणे माझ्यामते अत्यंत आवश्यक आहे.

## ही वर्गकलहाची बाब आहे

वर जी कलहाची उदाहरणे दिली आहेत तिच्याशी व्यक्तीच्या गुणावगुणांचा काही संबंध नाही. दोघा खटनटातील तो कलह नव्हे. अस्पृश्यतेचा प्रश्न हा वर्गकलहाचा प्रश्न आहे. स्पृश्य आणि अस्पृश्य या दोन समाजातील तो कलह आहे. एका माणसावर होत असलेल्या आगळिकीचा हा प्रश्न नव्हे. एका माणसावर होत असलेल्या अन्यायाचा हा प्रश्न नव्हे. एका वर्गाने दुसऱ्या वर्गावर चालविलेल्या आगळिकीचा हा प्रश्न आहे. हा एका वर्गाने दुसऱ्या वर्गावर चालविलेल्या अन्यायाचा प्रश्न आहे. हा वर्गकलह सामाजिक दर्जासंबंधीचा कलह आहे. एका वर्गाने दुसऱ्या वर्गाशी वागताना आपले वर्तन कसे ठेवावे या संबंधाचा हा कलह आहे. या कलहाची जी वर उदाहरणे दिली आहेत त्यावरून जी एक बाब उघडपणे सिध्द होत आहे ती ही की तुम्ही वरच्या वर्गाशी वागताना

बरोबरीच्या नात्याने वागण्याचा आग्रह धरता म्हणूनच हा कलह उपस्थित होतो. तसे जर नसते तर चपातीचे जेवण घातल्यामुळे, उंची पोशाख घातल्यामुळे, जानवी घातल्यामुळे, तांब्या-पितळेच्या भांड्यात पाणी आणल्यामुळे, घोड्यावरून वरात नेल्यामुळे ही भांडणे झाली नसती. जो अस्पृश्य चपाती खातो, उंची पोशाख करतो, तांब्यांची भांडी वापरतो, घोड्यावरून वरात नेतो तो वरच्या वर्गाचे कोणाचे नुकसान करीत नाही. आपल्याच पदराला खार लावतो. असे असता वरच्या वर्गाला त्याच्या करणीचा रोष का वाटावा ? या रोषाचे कारण एकच आहे व ते हेच की अशी समतेची वागणूक त्यांच्या मानहानीला कारणीभूत होते. तुम्ही खालचे आहात, अपवित्र आहात, खालच्या पायरीनेच तुम्ही राहिलेत तर ते तुम्हाला सुखाने राहू देतील. पायरी सोडली तर कलहाला सुरूवात होते, ही गोष्ट निर्विवाद आहे. वरील उदाहरणावरून आणखी एक गोष्ट सिध्द होते ती ही की अस्पृश्यता ही नैमित्तिक नसून नित्याची आहे. हीच गोष्ट स्पष्ट भाषेत सांगावयाची म्हणजे हा स्पृश्य आणि अस्पृश्य यामधील कलह नित्याचा आहे व तो त्रिकालाबाधित असा राहणार आहे. कारण ज्या धर्मामुळे तुम्हाला खालची पायरी देण्यात आलेली आहे तो धर्म वरच्या वर्गाच्या म्हणण्याप्रमाणे सनातन आहे. त्याच्यात कोणत्याही प्रकारचा कालमानानुसार फेरबदल होऊ शकत नाही. तुम्ही आज जसे खालचे आहात तसेच तुम्ही नेहमी खालचे राहिले पाहिजे. याचाच अर्थ असा की, स्पृश्य व अस्पृश्य यांचेमधील हा कलह कायमचा राहणार आहे. या कलहातून तुमचा निभाव कसा लागणार हा मुख्य प्रश्न आहे व त्या प्रश्नाचा विचार केल्याशिवाय तुम्हाला गत्यंतर नाही, असे माझे मत आहे. तुमच्यापैकी ज्यांना हिंदू लोक वागवतील त्याप्रमाणे वागावयाचे असेल, त्यांचा सेवाधर्म पत्करून जगावयाचे असेल, त्या लोकांना या प्रश्नांचा विचार करण्याचे काही प्रयोजन नाही. परंतु ज्यांना स्वाभिमानाचे जिणे आवश्यक वाटते, ज्यांना समतेचे जिणे आवश्यक वाटते त्यांना या प्रश्नांचा विचार केल्याखेरीज गत्यंतर नाही. कोणत्या तऱ्हेने या कलहात आपला बचाव करता येईल, याचा विचार करणे त्यांना आवश्यक आहे. या कलहातून आपला बचाव कसा होईल ? या प्रश्नाचा निर्णय करणे मला तरी मोठेसे कठीण वाटत नाही. येथे जमलेल्या तुम्हा सर्व लोकांना एक गोष्ट कबूल करावी लागेल व ती ही की, कोणत्याही कलहात ज्याच्या हाती सामर्थ्य असते त्याच्याच हाती जय असतो. ज्याला सामर्थ्य नाही त्याने यशाची आशा बाळगावयास नको. ही गोष्ट सर्वांच्या अनुभवाने सिध्द झालेली आहे. तिच्या समर्थनार्थ पुरावा देण्याचे कारण नाही.

## प्रथम सामर्थ्य मिळवा

याच्या पुढील प्रश्न जो तुम्ही विचारात घेणे आवश्यक आहे तो हा की, या कलहातून सुटका करून घेण्यास तुमच्या पदरी पुरेसे सामर्थ्य आहे काय ? मनुष्यमात्राला तीन प्रकारचे सामर्थ्य अवगत असते. एक मनुष्यबल, दुसरे द्रव्यबल आणि तिसरे मानसिक बल. या तीन बलांपैकी कोणते बल तुम्हाला उपलब्ध आहे, असे तुम्हाला वाटते ? मनुष्यबलाच्या दृष्टीने तुम्ही अल्पसंख्यांक आहात ही गोष्ट तर उघडच आहे. मुंबई इलाख्यात अस्पृश्य वर्गाची लोकसंख्या एक अष्टमांश एवढीच आहे. तीही संघटित नाही. आपसातील जातीभेदामुळे तिच्यात संघशक्तीचा पूर्ण अभाव आहे. संघटित नाही ती नाहीच पण एकत्रितही नाही. ती खेडोपाडी विखुरली गेलेली आहे. अशा कारणामुळे असलेल्या अल्पस्वल्प संख्येचा देखील संकटग्रस्त झालेल्या अस्पृश्य वर्गाच्या वस्तीस कोणत्याही प्रकारचा उपयोग होऊ शकत नाही. द्रव्यबलाच्या दृष्टीने पाहिले तर तुमची तीच गत आहे. तुमच्या जवळ थोडेबहुत मनुष्यबल आहे असे म्हटले असता चालेल पण तुमच्याजवळ द्रव्यबल मुळीच नाही, ही गोष्ट निर्विवाद आहे. तुम्हाला व्यापार नाही, उदीम नाही, नोकरी नाही आणि शेतीही नाही. वरच्या वर्गाचे लोक जो घासकुटका देतील त्याच्यावर आज तुमची उपजीविका आहे. तुम्हाला अन्न नाही, तुम्हाला वस्त्र नाही. तुमच्याजवळ द्रव्यबल ते काय असणार ? अन्याय झाला तर कोर्टातून दाद मागण्याइतकी अवकाद आज तुमच्यात नाही. तुमच्यातील आज हजारो लोक कोर्टाचा खर्च सोसण्याची ऐपत नसल्यामुळे हिंदुंकडून होणारा त्रास, विटंबना व जोर जुलूम अगदी मुकाट्याने सोशीत आहेत. मानसिक बलाची तर याहीपेक्षा अधिक उणिव आहे. शेकडो वर्षे वरिष्ठ वर्गाच्या सेवेत घालविली असल्यामुळे शेकडो वर्षे त्यांनी केलेली विटंबना, छी ; थू निमूटपणे सोसल्यामुळे उलट बोलण्याची सवय, प्रतिकाराची हिंमत नाहीशी झाली आहे. तुमच्यातील आत्मविश्वास, उत्साह व महत्वाकांक्षा यांचा बिमोड झाला आहे. तुमच्यात सर्व लोक हताश, दीनवाणे व निस्तेज झालेले आहेत, निराशेचे व नामर्दुमकीचे वातावरण सर्वत्र पसरले आहे. आपण काही करू शकू अशा प्रकारचा विचार देखील कोणाच्या ध्यानी मनी येऊ शकत नाही.

## तुमचाच छळ का होतो ?

वस्तुस्थितीचे मी हे केलेले वर्णन जर खरे असेल तर त्यापासून निघणारा सिध्दांत तुम्हा सर्वांना कबूल करावा लागेल व तो हा की तुम्ही तुमच्या सामर्थ्यावर अवलंबून राहाल तर तुम्हाला या जुलूमाचा प्रतिकार करता यावयाचा नाही. तुमच्यात सामर्थ्य नसल्यामुळेच तुमच्यावर जोर जुलूम होतो याबद्दल मला काडीचाही संशय नाही. या इलाख्यात तुम्हीच अल्पसंख्यांक आहात अशातला

काही भाग नव्हे. तुमच्याप्रमाणे मुसलमान देखील अल्पसंख्यांक आहेत. ज्याप्रमाणे महारमांगांची दोन चार घरे गावात असतात, त्याचप्रमाणे मुसलमानांचीही एकदोनच घरे गावात असतात. त्या मुसलमानांच्या वाटेस कोणीही जात नाही. परंतु तुमच्यावर मात्र सारखा जुलूम चाललेला असतो. याचे कारण काय ? दोन मुसलमानांची घरे असून त्यांच्या वाटेला गाव जात नाही. तुमची दहा घरे असूनही गाव तुमचा छळ करतो असे का होते ? हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे. त्याची खोज तुम्ही चांगल्या रीतीने केली पाहिजे. माझ्या मते या प्रश्नाचे एकच उत्तर देता येईल व ते हे की, त्या दोन मुसलमानांच्या घराच्या पाठी साऱ्या हिंदुस्थानातील मुसलमान समाजाची शक्ती व सामर्थ्य उभे आहे, याची जाणीव हिंदू लोकांना असल्यामुळे त्या दोन मुसलमान घरांच्या वाटेस जाण्याची कोणाही हिंदुची सहसा छाती होत नाही. त्या दोन घराच्या वाटेस गेले असताना पंजाबपासून ते थेट मद्रासपर्यंत मुसलमान समाज आपली शक्ती वेचून त्यांचे संरक्षण करील, अशी खात्री असल्यामुळे ती दोन मुसलमानांची घरे निर्भयपणे आपला व्यवहार करीत असतात. तुमच्या बाबतीत हिंदू लोकांची खात्री असते की, तुम्हाला कोणीही मदत करणार नाही, तुमच्याकरिता कोणी धाऊन येणार नाही, तुम्हाला पैशाची मदत होणार नाही व अधिकाऱ्यांचीही मदत होणार नाही. मामलेदार व पोलीस हे त्यांचेच असल्यामुळे स्पृश्य अस्पृश्यांच्या वादात ते जातीला जागतात , कर्तव्याला जागत नाहीत, याची त्यांना खात्री असते. या तुमच्या असहाय स्थितीमुळेच तुमच्याशी हिंदू लोक जुलूमाची व अन्यायाची वागणूक करतात. येथवर मी जे विवेचन केले आहे त्यावरून दोन गोष्टी सिद्ध होत आहेत, त्यापैकी पहिली गोष्ट ही की सामर्थ्य असल्याशिवाय तुम्हाला या जुलूमाचा प्रतिकार करता येणे शक्य होणार नाही. दुसरी, प्रतिकाराला आवश्यक असलेले सामर्थ्य आज तुमच्या पदरी नाही. या दोन गोष्टी सिद्ध झाल्याबरोबर तिसरी एक आपोआपच सिध्द होते आणि ती ही की, हे आवश्यक असलेले सामर्थ्य तुम्हाला कोठून तरी बाहेरून मिळविले पाहिजे. हे सामर्थ्य तुम्हाला कसे मिळविता येईल, हाच खरोखरी महत्त्वाचा प्रश्न आहे आणि त्याचा तुम्ही निर्विकल्प मनाने विचार केला पाहिजे.

## बाहेरुन सामर्थ्य आणले पाहिजे

या देशातील जातीभेद व धर्मभेद याचा लोकांच्या मनावर व नीतिमत्तेवर एक विलक्षण परिणाम घडून आलेला मला तरी दिसून येतो. या देशात दुःख, दारिद्र्य आणि क्लेश यांच्याकरिता कोणालाही खेद वाटत नाही व वाटलाच तर त्याच्या निवारणाकरिता कोणी प्रयत्न करीत नाही. आपल्या धर्मबांधवावर किंवा

जातिबांधवावर जर दुःखाचा, दारिद्र्याचा अथवा जुलूमाचा प्रसंग ओढवला तर त्याच्या निवारणाकरिता मात्र लोक सहाय्य करतात. ही नीतिमत्तेची दृष्टी कितीही विकृत असली तरी ती जारी आहे, हे कोणीही विसरुन चालता कामा नये. ज्या गावामध्ये अस्पृश्य लोकांवर हिंदुंकडून जुलूम होतो त्या गावात इतर धर्माचे लोक नसतात अशातला काही भाग नाही. अस्पृश्यांवर होत असलेला जुलूम अन्यायकारक आहे, ही गोष्ट त्यांना पटत नाही असेही नव्हे. होतो हा अन्याय आहे, असे वाटत असूनही ते त्यांच्या सहाय्यास धावून जात नाहीत. याचे कारण काय ? तुम्ही आम्हाला का मदत करीत नाही असा जर प्रश्न तुम्ही त्यांना केलात तर ' तुमच्या वादात आम्हास पडण्याचे कारण काय ? तुम्ही आमच्या धर्माचे असता तर आम्ही तुम्हाला सहाय्य केले असते, ' असे उत्तर ते तुम्हाला देतील. यावरून एक गोष्ट तुमच्या ध्यानात येऊ शकेल की कोणत्याही अन्य समाजाचा ऋणानुबंध तुम्ही जोडल्याशिवाय, कोणत्याही अन्य धर्मात सामील झाल्याशिवाय तुम्हाला बाहेरचे सामर्थ्य मिळू शकत नाही. याचाच स्पष्ट अर्थ असा आहे की, तुम्ही धर्मांतर करून कोणत्या तरी अन्य समाजात अंतर्भूत झाले पाहिजे. त्याशिवाय तुम्हाला त्या समाजाचे सामर्थ्य प्राप्त होऊ शकणार नाही आणि जोपर्यंत तुमच्या पदरी सामर्थ्य नाही तोपर्यंत तुम्हाला व तुमच्या भावी पिढीला आजच्या दीनवाण्या स्थितीमध्ये दिवस काढावे लागणार आहेत.

## धर्मांतराची आध्यात्मिक कारणे

येथपर्यंत ऐहिक कल्याणाकरिता धर्मांतराची आवश्यकता काय आहे याचे दिग्दर्शन केले आहे. आता आध्यात्मिक कारणाकरिता धर्मांतराची कशी आवश्यकता आहे याविषयीचे माझे विचार तुमच्यासमोर मी मांडीत आहे. प्रथमतः धर्म कशाकरिता असतो, त्याची आवश्यकता काय, हे जाणून घेतले पाहिजे. धर्माच्या अनेक व्याख्या अनेक लोकांनी केलेल्या तुम्हाला सापडतील. पण त्या सर्वांमध्ये अर्थपूर्ण व सर्वांना पटण्यासारखी अशी एकच व्याख्या आहे. ' ज्याने सर्व प्रजेचे धारण होते तोच धर्म ' हीच ती खरी धर्माची व्याख्या होय. ही धर्माची व्याख्या मी केलेली नाही. ही व्याख्या सनातनी हिंदुंचे अग्रगण्य लो. टिळक यांनीच दिलेली ती व्याख्या आहे. तेव्हा धर्माच्या व्याख्येबद्दल मखलाशी केल्याचा आरोप माझ्यावर कोणी करू शकणार नाही. ही व्याख्या जरी मी केलेली नसली तरी मी वादाकरिता ती मान्य केलेली आहे अशातला भाग नाही. मला ती कबूल आहे. समाजाच्या धारणेकरीता घातलेली बंधने म्हणजेच धर्म. हीच माझी

देखील धर्माची कल्पना आहे. ही व्याख्या वास्तविकदृष्ट्या अथवा तार्किकदृष्ट्या योग्य अशी दिसली तरी समाजाच्या धारणेकरिता समाजाची बंधने कशा प्रकारची असावीत या प्रश्नाचा व्याख्येवरून काहीच बोध होऊ शकत नाही, अथवा उलगडाही होऊ शकत नाही. समाजाच्या योग्य धारणेकरिता समाजाची बंधने कशी असावीत हा प्रश्न शिल्लक राहतोच व हा प्रश्न धर्माच्या व्याख्येपेक्षा फार महत्त्वाचा आहे. कारण धर्म कोणता व अधर्म कोणता हे व्याख्येवर अवलंबून नसून बंधनांच्या हेतूवर व स्वरूपावर अवलंबून आहे. ज्या बंधनांनी समाजातील सर्व प्रजेची धारणा होऊ शकते ती बंधने कशी असावीत, म्हणजे खऱ्या धर्माचे स्वरुप कसे असावे याचा विचार करताना समाज आणि व्यक्ती यांचा तात्विकदृष्ट्या संबंध काय व कसा असावा हा प्रश्न साहजिकपणेच उद्भवतो. या प्रश्नासंबंधाने आधुनिक समाजशास्त्रवेत्त्यांनी तीन प्रकारची मते प्रतिपादन केलेली आहेत. काहींच्या मते व्यक्तीमात्राला सुख प्राप्ती व्हावी हाच समाज घटनेचा अंतीम हेतू आहे. काहींच्या मते व्यक्तीमात्राला त्यांच्या अंगभूत गुणांचा व शक्तीचा विकास करता येऊन त्याला पूर्णावस्थेस पोहोचविण्यास मदत व्हावी हाच समाज संघटनेचा अंतीम हेतू असला पाहिजे व काहींच्या मते समाज संघटनेचा मुख्य हेतू व्यक्तीची उन्नती किंवा व्यक्तीचे सौख्य हा नसून आदर्शभूत समाज तयार करणे हाच होय. हिंदू धर्माची कल्पना या तीनही कल्पनाहून अगदी निराळी आहे. हिंदू धर्मात व्यक्तीला काही स्थान नाही. हिंदू धर्माची रचना वर्गाच्या कल्पनेवर केलेली आहे. एकाने दुसऱ्याशी कसे वागावे याची शिकवण हिंदू धर्मात नाही. एका वर्गाने दुसऱ्या वर्गाशी कसे वागावे याची बंधने हिंदू धर्मात आहेत. ज्या धर्मात व्यक्तीला प्राधान्य नाही तो धर्म मला स्वतःला मान्य नाही. व्यक्तीच्या जीवनाला समाजाची जरी आवश्यकता असली तरी समाजाची धारणा हे धर्माचे अंतीम ध्येय होऊ शकत नाही. व्यक्तीचा विकास हेच धर्माचे खरे ध्येय आहे असे मी समजतो. व्यक्ती ही जरी समाजांतर्गत असली, मनुष्यमात्र हा जरी समाजाचा एक घटक असला तरी त्याचा आणि समाजाचा संबंध शरीर आणि अवयव, गाडा आणि त्याचे चाक यांचा जसा संबंध आहे तसा हा संबंध नव्हे, असे मी समजतो.

## समाज आणि व्यक्ती

ज्याप्रमाणे पाण्याचा थेंब समुद्राच्या पाण्यात टाकला असताना त्याचा लोप होतो तसा माणसाचा तो केवळ समाजात राहिला म्हणून त्याचा लोप होऊ शकत नाही. त्याचे जीवन स्वतंत्र असते. त्याचा जन्म समाजांच्या सेवेकरिता नसून आत्मोन्नतीकरिता आहे. ह्या एकाच कारणामुळे सुधारलेल्या राष्ट्रात एका

माणसाला दुसऱ्या माणसास आपला गुलाम करून ठेवता येत नाही. ज्या धर्मात व्यक्तीला प्राधान्य नाही तो धर्म मला मान्य नाही आणि हिंदू धर्मात व्यक्तीला प्राधान्य नसल्या कारणाने तो धर्म मला मान्य होवू शकत नाही. तसेच ज्या धर्मात एका वर्गाने विद्या शिकावी, दुसऱ्या वर्गाने शस्त्र धरावे, तिसऱ्याने व्यापार करावा व चौथ्याने नुसती सेवा करावी, असे आहे, तो धर्म मला मान्य नाही. विद्या दरेकाला हवी. शस्त्राची दरेकाला जरूरी आहे. पैसा सर्वांना पाहिजे. ही गोष्ट जो धर्म विसरतो व जो एकाला सज्ञान करण्याकरिता बाकिच्यांना अज्ञानात ठेवतो तो धर्म नसून लोकांना बौद्धिक गुलामगिरीत ठेवण्याचा कावा आहे. जो धर्म एकाच्या हाती शस्त्र देतो व दुसऱ्याला निःशस्त्र करतो तो धर्म नसून एकाला दुसऱ्याने पारतंत्र्यात ठेवण्याची शक्कल आहे. जो धर्म काहींना धनसंपादनाचा मार्ग मोकळा ठेवतो व बाकीच्यांना आपल्या जीविताकरिता दुसऱ्यावर अवलंबून राहण्याची अनुज्ञा देतो तो धर्म नसून स्वार्थपरायण आहे. हिंदू धर्मातील चातुर्वर्ण्य हे असे आहे. त्याविषयी माझे मत काय हे मी स्पष्टपणे मांडले आहे. हा हिंदू धर्म तुम्हाला हिताचा आहे की काय याचा तुम्ही विचार करा. व्यक्तीच्या आत्मोन्नतीला पोषक असे वातावरण उत्पन्न करणे ही धर्माची मूलभूत कल्पना आहे हे जर मान्य केले तर हिंदू धर्मात तुमची आत्मोन्नती कधीही होऊ शकणार नाही. व्यक्तीच्या विकासाला तीन गोष्टींची आवश्यकता आहे. सहानुभूती, समता आणि स्वातंत्र्य. हिंदू धर्मात या तिन्हीपैकी एकतरी बाब तुमच्याकरिता उपलब्ध आहे असे तुम्हाला म्हणता येईल काय ?

## हिंदू धर्मात तुम्हाला सहानुभूती आहे काय ?

सहानुभूतीच्या दृष्टीने पाहिले तर सर्वत्र शून्यच आहे, असे म्हणावे लागेल. कोठेही तुम्ही गेलात तरी तुमच्याकडे आपुलकीच्या भावनेने कोणीही पाहणार नाही. याचा अनुभव तुम्हाला चांगलाच आहे. आपुलकीची भावना नाहीच नाही परंतु हिंदू लोकांकडून तुम्हाला परक्यापेक्षा परके लेखण्यात येते. एकाच गावात राहणारे स्पृश्य आणि अस्पृश्य यांचा परस्पर संबंध कसा असतो, हे जर पाहू गेले तर शेजारी शेजारी राहणारे दोघे भाऊ असे कोणालाही म्हणता येणार नाही. छावणी दिलेले हे दोन परस्परविरोधी सैन्याचे तळ आहेत, असेच म्हणावे लागेल. जितके मुसलमान लोक हिंदुंना जवळचे वाटतात, त्यांच्याशी जेवढा त्यांचा स्नेहभाव असतो त्याच्या शतांशाने देखील तुमच्याशी हिंदुंचा नसतो. हिंदू मुसलमान हे लोकल बोर्डात, कायदे कौन्सिलात, व्यापारात एकमेकांना सहाय्यभूत होऊन वागतात. पण तुमच्याशी तसे सहानुभूतीने हिंदू लोकांनी वागल्याचे एखादे तरी उदाहरण दाखवून देता

येईल काय ? उलटपक्षी त्यांचा तुमच्या विरुद्ध नेहमीचा कटाक्ष असतो, ही गोष्ट मात्र खरी आहे. हिंदुच्या मनात तुमच्याविरुद्ध असलेल्या कटाक्षाचा परिणाम किती विघातक झाला आहे, हे तुमच्यापैकी ज्या कोणाला दाद मागण्याकरिता कोर्टात जाण्याचा प्रसंग आलेला आहे किंवा सहाय्य मागण्याकरिता पोलिसाकडे जाण्याचा प्रसंग आला आहे तो आपल्या अनुभवाने सांगू शकेल. कोर्ट आपल्याला न्याय देईल, पोलीस आपल्याला मदत करील, असा तुम्हापैकी कोणा एकाला तरी विंश्वास वाटतो का ? व तो जर वाटत नाही तर तशी वृत्ती होण्यास काय कारण आहे ? माझ्या मते अशा अविश्वासाचे कारण एकच आहे व ते हेच की हिंदू लोकांमध्ये तुमच्याबद्दल कोणत्याही प्रकारची सहानुभूती नसल्याकारणाने ते आपल्या अधिकाराचा सदुपयोग करतील अशी आशा तुम्हाला वाटत नाही. हे जर खरे आहे तर शत्रुत्वाने भरलेल्या या वातावरणात राहून तुम्हाला काय उपयोग होणार आहे ?

## हिंदू समाजात तुमच्याकरिता समता आहे काय ?

हा प्रश्न खरोखरीच विचारावयास नको. अस्पृश्यता ही मूर्तिमंत असमानताच आहे. एवढी मोठी असमानतेची जागती ज्योत कोठेच दिसावयाची नाही. अस्पृश्यतेपेक्षा जास्त उग्र स्वरुपाची असमानता जगाच्या इतिहासात अन्यत्र कोठेच सापडणार नाही. कमी अधिक भावामुळे एकाने आपली मुलगी दुसऱ्याच्या मुलाला न देणे, कमी अधिक भावामुळे एकाने दुसऱ्याच्या बरोबर सहभोजन न करणे, अशा प्रकारचे असमानतेचे निदर्शक वर्तन आपणास पाहावयास सापडते. परंतु एका माणसाला दुसऱ्या माणसाने न शिवण्याइतकी पतित लेखण्याची प्रथा हिंदू धर्माखेरीज आणि हिंदू समाजाखेरीज अन्यत्र कोठेही सापडेल काय ? ज्याच्या स्पर्शाने माणूस बाटतो,ज्याच्या स्पर्शाने पाणी बाटते, ज्याच्या स्पर्शाने देव बाटतो तो प्राणी मानवाच्या कोटीत गणला गेला आहे, असे कोणी तरी म्हणेल काय ? अस्पृश्य माणसाकडे पाहण्याची दृष्टी आणि रक्तपितीने भरलेल्या माणसाकडे पाहण्याची दृष्टी यात काय फरक आहे ? रक्तपिती भरलेल्या माणसाबद्दल लोकांच्या मनात किळस ज़री असली तरी त्याच्याबद्दल लोकांच्या मनात सहानुभूती तरी असते. परंतु तुमच्याबद्दल सहानुभूती तर नसतेच पण किळस मात्र असते. रक्तपिती भरलेल्या माणसापेक्षादेखील तुमची स्थिती हीन आहे. अजूनही खेडेगावात एखादा स्पृश्य माणूस उपास सोडीत असताना जर महाराचा शब्द त्याच्या कानावर पडला तर तो अन्न ग्रहण करीत नाही. एवढा कलंक तुमच्या शरीराला, एवढा कलंक तुमच्या शब्दाला आहे. अस्पृश्यता हिंदू धर्मावरील कलंक आहे, असे काही लोक म्हणत आहेत.

पण त्या बतावणीत खरे म्हटले असता काही अर्थ नाही. हिंदू धर्म कलंकित आहे असे एकही हिंदू मानीत नाही. तुम्ही कलंकित आहात, दूषित आहात, अपवित्र आहात असे मात्र बहुजन हिंदू समाज मानतो. ही दशा तुम्हाला का प्राप्त झाली ? तुम्ही हिंदू धर्मात राहिल्यामुळे ही दशा तुम्हाला प्राप्त झाली आहे, असे मला वाटते. तुमच्यातील जे मुसलमान झाले त्यांना हिंदू अस्पृश्य मानीत नाहीत व असमान लेखीत नाहीत. तुमच्च्यातील जे ख्रिस्ती झाले त्यांना हिंदू लोक अस्पृश्य मानीत नाहीत व असमान लेखीत नाहीत. नुकताच त्रावणकोर येथे घडलेला प्रकार विचारात घेण्यासारखा आहे. तेथील थिया जातीतील अस्पृश्य लोकास रस्त्यावरुन चालण्याची मनाई आहे. परवाच त्यांच्यापैकी काही जणांनी शीख धर्म स्वीकारला हे तुम्हास माहीत असेलच. अस्पृश्य असताना ज्या लोकांना त्या रस्त्यावरून चालता येत नव्हते त्याच लोकांनी शीख धर्म स्वीकारल्याबरोबर त्यांच्यावरची बंदी उठवली गेली. या सर्व गोष्टीवरुन एक गोष्ट सिद्ध आहे की तुमच्या अस्पृश्यतेला व तुमच्या असमानतेला जर काही कारण असेल तर ते तुमचा आणि हिंदू धर्माचा असलेला लागाबांधा हे होय.

या असमानतेच्या अन्यायात सांत्वन करण्याच्या हेतूने काही स्पृश्य लोक अस्पृश्यांना सांगतात की तुम्ही शिक्षण घ्या, म्हणजे तुम्हाला शिवू ! तुम्ही स्वच्छ रहा म्हणजे तुम्हाला शिवू ! आणि समानतेने वागवू ! खरे म्हटले असता, अडाणी महाराची, दरिद्री महाराची आणि अस्वच्छ महाराची जी गत होते तीच गत शिकलेल्या महाराची, पैसेवाल्या महाराची आणि स्वच्छ राहणाऱ्या महाराची होते. हे तुम्हा आम्हा सर्वांना अनुभवाने माहीत आहे, पण तो प्रश्न जरी बाजूला ठेवला तरी जर शिक्षण घेतल्याशिवाय, हाती पैसा असल्याशिवाय, अंगावर पोषाख असल्याशिवाय मानमान्यता मिळणार नाही तर साध्या महाराने काय करावे ? ज्याला शिक्षण प्राप्त होऊ शकत नाही, ज्याला पैसा मिळू शकत नाही आणि ज्याला नीटनेटका पोषाख करता येत नाही त्या महाराला समानता कशी मिळणार ? ख्रिस्ती धर्मात, मुसलमानी धर्मात जी समानतेची शिकवण देण्यात आली आहे तिचा संबंध विद्या, धन, पोषाख, पराक्रम अशा बाह्य वस्तूंशी मुळीच नाही. माणसाचे मनुष्यत्व हीच महत्त्वाची गोष्ट आहे, असे दोन्ही धर्म मानतात आणि ते मनुष्यत्व सर्वांना आदरणीय असले पाहिजे. कोणी कोणाचा अवमान करू नये व कोणी कोणाला असमान मानू नये, असे ते धर्म शिकवतात. हिंदू धर्मात या शिकवणीचा पूर्ण अभाव आहे. ज्या धर्मात मनुष्याच्या मनुष्यत्त्वाला व त्याच्या माणुसकीला काही किंमत नाही तो धर्म काय कामाचा ? आणि त्याला कवटाळून धरून राहण्यात काय हशील आहे ? याला उत्तर म्हणून काही हिंदू लोक उपनिषदांची साक्ष देतात व त्यात ईश्वर सर्वत्र भरला आहे, असे तत्त्व आहे,

म्हणून बढाई मिरवतात. विज्ञान आणि धर्म या दोन गोष्टी अगदी निरनिराळ्या आहेत. एखादी गोष्ट विज्ञानाचे तत्त्व आहे की धर्माची शिकवण आहे याचा विचार केला पाहिजे. समाजाच्या गळी सर्वांभूती एक ईश्वर हा विज्ञानाचा सिद्धांत आहे. धर्माच्या तत्त्वाचा वागणुकीशी संबंध असतो, विज्ञानाशी नसतो. सर्वांभूती एक ईश्वर ही धर्माची शिकवण नाही. हे विज्ञानाचे तत्त्व आहे, धर्माची शिकवण नव्हे. ही गोष्ट हिंदू लोक त्याप्रमाणे वागत नाहीत, हा माझ्या म्हणण्याचा पुरावाच आहे. उलटपक्षी हिंदू लोकांचा असा आग्रहच असेल की सर्वांभूती एक परमेश्वर हा विज्ञानाचा सिद्धांत नसून त्यांच्या धर्माचा पाया आहे आणि म्हणून आमचा धर्म श्रेष्ठ आहे. तर त्यांना एवढेच उत्तर पुरे आहे की, त्यांच्याइतके नीच लोक जगामध्ये दुसरे कोणीच नसतील ! मुखाने सर्वांभूती ईश्वर, असा जप करणाऱ्या आणि कृतीने भूतमात्राची विटंबना करणाऱ्या लोकांचा ' मुखमे राम बगल मे छुरी ' ' बोलणी महानुभावाची पण करणी कसाबाची ' अशा दुष्ट लोकातच समावेश करावा लागेल. सर्वांभूती एक ईश्वर मानणारे आणि कृतीने माणसाला पशूतुल्य लेखणारे लोक दांभिक आहेत, त्यांचा संग करू नका ! मुंग्यांना साखर घालणारे व माणसांना पाण्यावाचून मारणारे लोक दांभिक आहेत त्यांचा संग करू नका ! त्यांच्या संगामुळे तुमच्यावर काय परिणाम झाला आहे याची तुम्हाला कल्पना देखिल नाही. तुमची इज्जत नाहीशी झाली, तुमचा मानसन्मान नाहीसा झाला ! खरे म्हटले असता हिंदू समाजातच तुम्हाला मानसन्मान नाही, हे म्हणणे वस्तुस्थितीच्या मानाने अपुरे पडते. तुम्हाला हिंदू लोकच हलके मानतात असे नव्हे, तर मुसलमान व खिस्ती लोक देखील तुम्हाला हलके लेखतात. खरे म्हटले असता मुसलमानी धर्मात, खिस्ती धर्मात श्रेष्ठ-कनिष्ठ, उच्च-नीच असा भेदभाव जागृत करणारी शिकवण नाही. असे असताना देखिल हे लोक तुम्हाला कमी लेखतात. त्याचे कारण काय ? ह्याचे कारण एकच. हिंदू लोक तुम्हाला नीच लेखतात म्हणूनच तुम्हाला मुसलमान व खिस्ती लोक नीच लेखतात. अस्पृश्यांना जर आम्ही समान लेखले तर हिंदू लोक आपल्याला अस्पृश्यांच्या इतकेच खाली लेखतील या भीतीमुळे मुसलमान व खिस्ती लोक तुमच्याशी हिंदू प्रमाणेच अस्पृश्यता पाळतात. आम्ही हिंदू समाजात हीन गणलो गेलो आहोत, इतकेच नव्हे तर हिंदुंच्या असमानतेच्या वर्तणुकीमुळे आम्ही सर्व हिंदुस्थानदेशामध्ये सर्वांपेक्षा हीन गणलो गेलो आहोत. ही अपमानकारक परिस्थिती टाळण्याकरिता, हा कलंक धुवून टाकण्याकरिता, नरदेहाचे चीज करण्याकरिता, जर कोणता एखादा उपाय असेल तर तो एकच आहे व तो म्हणजे हिंदू धर्माचा व हिंदू समाजाचा त्याग करणे हाच होय.

## हिंदू धर्मात तुम्हाला स्वातंत्र्य आहे काय ?

दरेक नागरिकाला जेवढे कायद्याने व्यवसाय स्वातंत्र्य आहे तेवढे व्यवसाय स्वातंत्र्य तुम्हालाही आहे, दरेक नागरिकाला कायद्याने जितके व्यक्तीस्वातंत्र्य आहे तेवढे व्यक्तीस्वातंत्र्य तुम्हालाही आहे, असे काही लोक म्हणतील. परंतु या म्हणण्यात खरोखरी काही अर्थ आहे काय, याचा खोल विचार तुम्ही करावयास पाहिजे. ज्याला जन्मजात धंद्याशिवाय दुसरा कोणताही धंदा समाज करू देत नाही त्या माणसाला तुला व्यवसाय स्वातंत्र्य आहे, असे सांगण्यात काय हशील आहे ? ज्याला संपत्ती मिळविण्याचे कोणत्याही प्रकारचे द्वार खुले नाही त्याला तुझ्या संपत्तीला कोणीही हात लावू शकणार नाही, तुझी संपत्ती उपभोगण्यास तू स्वतंत्र आहेस असे सांगण्यात काय तथ्य आहे ? जन्मजात अपवित्रतेमुळे ज्याचा नोकरीत प्रवेश होऊ शकत नाही, ज्याच्या हाताखाली नोकरी करण्याचा इतर लोकांना अपमान वाटतो अशा माणसास कोणत्याही नोकरीवर अधिकार सांगण्याचे, तुला स्वातंत्र्य आहे, असे सांगणे म्हणजे त्याची थट्टा करणे आहे. कायद्याने पुष्कळ हक्क दिले असतील, पण समाज त्यांचा उपयोग करू देईल तरच ते खरे हक्क आहेत, असे म्हणता येईल. अस्पृश्यांनी चांगला पोषाख घालून हिंडावे असा हक्क कायद्याने दिला आहे, पण हिंदू समाज तसे कपडे वापरू देत नाही तर त्या हक्काचा काय उपयोग ? अस्पृश्यांनी तांब्या-पितळेच्या भांड्यात पाणी आणावे असा हक्क कायद्याने दिला आहे, पण हिंदू समाज अस्पृश्यांना धातूची भांडी वापरू देत नाही, तर त्या हक्काचा काय उपयोग ? अस्पृश्यांनी आपल्या घरावर कौले घालावी असा हक्क कायद्याने दिला आहे, पण हिंदू समाज त्यास कौले घालू देत नाही, तर त्या हक्काचा काय उपयोग ? अशी पुष्कळ उदाहरणे देता येतील. परंतु सारांश हा की समाज उपभोगू देईल तोच हक्क आपला असे म्हणता येईल. ज्या हक्काला समाजाची आडकाठी आहे, हरकत आहे तो हक्क कायद्याने जरी दिला असला तरी त्याचा काही उपयोग नाही. अस्पृश्य लोकांना कायदेशीर स्वातंत्र्यापेक्षा सामाजिक स्वातंत्र्याची जास्त जरूरी आहे. सामाजिक स्वातंत्र्य जोपर्यंत तुम्हाला प्राप्त झाले नाही तोपर्यंत तुम्हाला कायद्याने कितीही स्वातंत्र्य दिले तरी त्याचा काहीही उपयोग होणार नाही. तुम्हाला शारीरिक स्वातंत्र्य आहे, असे काही लोक सांगतील. तुम्हाला कायद्याची मनाई नसेल तिकडे जाता येते, कायद्याची मनाई नसेल त्या प्रकारे बोलता येते हे खरे, परंतु या स्वातंत्र्याचा काय उपयोग आहे ? मनुष्यमात्राला जसे शरीर आहे तसेच मनही आहे. जितकी शारीरिक स्वातंत्र्याची आवश्यकता आहे तितकीच मानसिक स्वातंत्र्याचीही आवश्यकता आहे. नुसत्या शारीरिक स्वातंत्र्याचा काही उपयोग नाही. महत्त्व आहे ते

मानसिक स्वातंत्र्याला. खरे म्हटले असता शरीराचे स्वातंत्र्य कशासाठी असते ? ज्याला त्याला मनसोक्त व्यवहार करता यावा एवढ्याच करता आहे. कैद्याच्या पायातील बेड्या काढून त्याला मोकळे करण्याचा मतलब काय ? हेतू एवढाच की त्याने बाह्य जगात मोकळया मनाने वावरून आपल्या अंगी असलेल्या कर्तबगारीचा पूर्ण फायदा घ्यावा म्हणून. परंतु ज्या माणसाचे मन स्वतंत्र नाही त्याला असल्या बाह्यात्कारी स्वातंत्र्याचा काय उपयोग ? मानसिक स्वातंत्र्य हेच खरे स्वातंत्र्य आहे. ज्याचे मन स्वतंत्र नाही तो मोकळा असून गुलाम आहे. ज्याचे मन स्वतंत्र नाही तो जरी कैदी नसला तरी तो तुरूंगात आहे. ज्याचे मन स्वतंत्र नाही तो जिवंत असून मेला आहे. मनाचे स्वातंत्र्य ही जिवंतपणाची साक्ष आहे. परंतु मानसिक स्वातंत्र्य वसत आहे, त्याचा लोप झाला नाही, याचा पुरावा काय ? मानसिक स्वातंत्र्य कोणाला आहे असे म्हणता येईल ? जो आपली बुद्धी जागृत ठेऊन आपले हक्क काय, आपले अधिकार काय व आपले कर्तव्य काय याची जाणीव करून घेतो त्याला मी स्वतंत्र म्हणतो. जो परिस्थितीचा दास झाला नाही, जो परिस्थितीला आपल्या कह्यात आणण्यास सिद्ध असतो, तो माणूस स्वतंत्र आहे, असे मी म्हणतो. जो रूढीच्या स्वाधीन झाला नाही, जो गतानुगतिक बनला नाही, ज्याच्या विचाराची ज्योत विझली नाही तो स्वतंत्र आहे, असे मी म्हणतो. जो पराधीन झाला नाही, जो दुसऱ्याच्या शिकवणीने वागत नाही, जो कार्यकारणभाव ध्यानात घेतल्याशिवाय कशावर विश्वास ठेवित नाही, जो आपल्या हक्कांचा अपहार केला असता, त्याच्या रक्षणार्थ दक्ष असतो, जो प्रतिकूल लोकमताला घाबरून जात नाही, दुसऱ्याच्या हातचे बाहुले न होण्याइतकी बुद्धी, स्वाभिमान ज्याला आहे तोच माणूस स्वतंत्र आहे, असे मी समजतो. जो आपल्या आयुष्याचे ध्येय व आपल्या आयुष्याचा व्यय दुसऱ्याने घालून दिलेल्या आज्ञेप्रमाणे ठरवित नाही, जो आपल्या बुद्धीनुसार आपल्या आयुष्याचे ध्येय काय असावे व आपले आयुष्य कोणत्या कार्यात व कशा रीतीने व्यतीत करावे हे आपले आपण ठरवितो, सारांश जो सर्वस्वी स्वाधीन आहे, तोच माणूस स्वतंत्र आहे, असे मी समजतो.

या दृष्टीने पाहिले असता तुम्ही स्वतंत्र आहात काय ? तुमचे आयुष्य व तुमच्या आयुष्याचे ध्येय तुमच्या स्वाधीन आहे काय ? माझ्यामते तुम्हाला स्वातंत्र्य तर नाहीच पण तुम्ही दास आहात, सेवक आहात, इतकेच नव्हे तर तुमच्या दास्यत्वाला सीमा उरली नाही. हिंदू धर्मात कोणालाही विचारस्वातंत्र्य असू शकत नाही. जो जो मनुष्य हिंदू धर्मात राहील त्या त्या माणसाला आपल्या विचारस्वातंत्र्याला तिलांजली दिल्याशिवाय गत्यंतर नाही. वागताना त्याने वेदाप्रमाणे वागले पाहिजे. वेदात तशी आज्ञा नसेल तर स्मृतीतील

आज्ञेप्रमाणे वागले पाहिजे. स्मृतीत तशी आज्ञा नसेल तर महाजनांच्या पाऊलावर पाऊल ठेवून वागले पाहिजे. हिंदू धर्मात बुद्धीला, विचाराला प्राधान्य तर नाहीच नाही, पण वाव देखील नाही. हिंदुने कोणाची तरी गुलामगिरी केलीच पाहिजे ! वेदांची गुलामगिरी केली पाहिजे, स्मृतीची कास धरली पाहिजे, अगर महाजनांचे अनुकरण केले पाहिजे, विचारशक्तीचा त्याने मुळीच उपयोग करता कामा नये. जोपर्यंत तुम्ही हिंदू धर्मात आहात तोपर्यंत तुम्हाला विचारस्वातंत्र्य प्राप्त होऊ शकत नाही. यावर कोणी असे म्हणतील की हिंदू धर्माने तुमचेच मानसिक स्वातंत्र्य हिरावून घेतले असेच नव्हे तर हिंदू धर्माला प्रमाण मानणाऱ्या सर्व जातीचे मानसिकस्वातंत्र्य हिरावून घेतलेले आहे. हिंदू धर्मामुळे सर्वच बौद्धिक गुलामगिरीत सापडले आहेत हे खरे, पण त्यामुळे ते समदुःखी आहेत असे कोणी समजू नये. कारण या बौद्धिक गुलामगिरीचे दुष्परिणाम सर्वांना भोगावे लागत नाहीत. स्पृश्य वर्गाच्या ऐहिक सुखावर या बौद्धिक गुलामगिरीचा कोणत्याही प्रकारचा अनिष्ट परिणाम होऊ शकत नाही. ते जरी वेदांचे गुलाम झाले, स्मृतीचे दास असले, महाजनांचे गतानुगतिक बनले तरी हिंदू समाजाच्या व्यवहारात त्यांना वेदांनी, स्मृतींनी व महाजनांनी उच्चपद दिलेले आहे. दुसऱ्यावर हुकूमत गाजविण्याकरिता त्यांना अधिकार दिलेले आहेत. सारा हिंदू धर्म वरिष्ठ वर्गाच्या हिंदुंनी वरिष्ठ वर्गाच्या हिंदुंच्या संवर्धनाकरिता रचलेला आहे, ही गोष्ट अगदी निर्विवाद आहे. ज्याला ते धर्म म्हणतात त्या धर्मात तुम्हाला गुलामाची भूमिका दिलेली आहे. इतकेंच नव्हे तर या गुलामगिरीतून तुमची सुटका होऊ नये, अशा प्रकारची व्यवस्थाही त्या धर्मात केलेली आहे. म्हणून हिंदू धर्माच्या ह्या बौद्धिक गुलामगिरीतून सुटका करून घेण्याची तुम्हाला जितकी जरूरी आहे तितकी हिंदुंना नाही. अशा रीतीने विचार केला असता, हा हिंदू धर्म तुम्हाला दोन्ही तऱ्हेने मारक झाला आहे. या धर्माने तुमचे मानसिक स्वातंत्र्य हिरावून घेऊन तुम्हास गुलाम केले आहे व याच धर्माने तुम्हाला व्यवहारात गुलामगिरीच्या दशेत आणून टाकले आहे. तुम्हाला जर स्वातंत्र्य हवे असेल तर तुम्हाला धर्मांतरच केले पाहिजे.

## अस्पृश्यातील संघटना आणि धर्मांतर

अस्पृश्यता निवारण्याची जी आज चळवळ चालू आहे त्या चळवळीवर अशी टीका करण्यात येते की, अस्पृश्य वर्गात ज्या निरनिराळया जातींचा समावेश झालेला आहे त्या जातीतही परस्परातील व्यवहारामध्ये जातीभेद पाळण्यात येतो, नव्हे अस्पृश्यता पाळण्यात येते. महार, मांग एकमेकांच्या हातचे खात नाहीत. दोघेही भंग्यासारख्या जातीला शिवत नाहीत व त्यांच्याशी

अस्पृश्यता पाळतात. परस्परात जातीभेद व अस्पृश्यता पाळणाऱ्या लोकांना वरच्या जातीकडून तुम्ही जातीभेद मोडा, अस्पृश्यता मानू नका, असे म्हणण्याचा काय अधिकार आहे ? असा प्रश्न नेहमी विचारण्यात येतो. तुम्ही आपसातील जातीभेद व अस्पृश्यता नाहीशी करा मग आमच्याकडे दाद मागण्यास या, असा साळसूदपणाचा सल्ला त्यांना देण्यात येत असतो. या टीकेच्या मुळाशी असलेल्या कथेत सत्य आहे, हे आपल्यापैकी सर्वांना कबूल करावे लागेल. पण त्या टीकेत केलेला आरोप मात्र खोटा आहे. अस्पृश्य वर्गात समाविष्ट झालेले लोक जातीभेद पाळतात व काही अस्पृश्यता पाळतात, या गोष्टीचा इन्कार करता येणे शक्य नसते. या गोष्टी मान्य करणे प्राप्त असले तरी या अपराधाला ते कारणीभूत आहेत असे म्हणणे निखालस खोटे आहे. जातीभेदाचा व अस्पृश्यतेचा उगम अस्पृश्य लोकांपासून झालेला नाही. जातीभेदाचा व अस्पृश्यतेचा उगम वरिष्ठ वर्गाच्या हिंदुच्या हातून झालेला आहे. जातीभेदाचा व अस्पृश्यतेचा पायंडा त्यांनी घातला आहे. जातीभेद व अस्पृश्यता पाळण्याचा धडा वरिष्ठ वर्गाच्या हिंदुंनी घालून दिलेला आहे. ही गोष्ट जर सत्य असेल तर जातीभेदाच्या व अस्पृश्यतेच्या रूढीची जबाबदारी स्पृश्य वर्गावरच पडते, अस्पृश्य वर्गावर ती पडू शकत नाही. अस्पृश्य वर्गाचे लोक जातीभेद व अस्पृश्यता पाळताना वरच्या वर्गाच्या लोकांनी दिलेला धडा गिरवीत आहेत. तो धडा जर खोटा आहे तर त्याचे पाप ज्यांनी तो धडा दिला त्यांच्यावरच येऊन पडते. ज्यांनी गिरविला त्यांच्यावर येऊन पडू शकत नाही. हे उत्तर जरी समर्पक असले तरी या उत्तराने माझे स्वतःचे समाधान होऊ शकत नाही. ज्या कारणामुळे जातीभेद व अस्पृश्यता ही आपल्यामध्ये शिरली त्या कारणाला आपण जरी जबाबदार नसलो, तथापि, आपल्यामध्ये जो जातीभेद व जी अस्पृश्यता नांदत आहे तिचा धिक्कार न करणे, ती आहे तशीच चालू देणे आपल्याला इष्ट नाही. अस्पृश्यतेचा व जातीभेदाचा शिरकाव करण्यास जरी आपण जबाबदार नसलो तरी ती घालविण्याची जबाबदारी आपल्यावर आहे. ही जबाबदारी आपण सर्वांनी ओळखली आहे, याबद्दल मला समाधान वाटते. माझी खात्री आहे की महार जातीत असा कोणीही पुढारी नाही की जो जातीभेद पाळावा, असे म्हणतो, तुलनाच करावयाची झाली तर ती पुढाऱ्यांमध्येच केली पाहिजे. महारातील शिकलासवरलेला वर्ग घेतला आणि ब्राह्मणातील शिकलासवरलेला वर्ग जर घेतला व दोहोंची तुलना केली तर अस्पृश्य वर्गातील सुशिक्षित वर्ग जातीभेद मोडण्याला जास्त अनुकूल आहे, ही गोष्ट कोणासही कबूल करावी लागेल. इतकेच नव्हे तर ती गोष्ट कृतिनेही सिद्ध करून देता येईल. महारातील सुशिक्षित वर्ग या सुधारणेला अनुकूल आहे इतकेच नव्हे तर, महारातील अडाणी जनता देखील या

गोष्टीला अनुकूल आहे, हे सिद्ध करून देता येईल. आज महारांमध्ये असा एकही मनुष्य सापडणार नाही की जो महारमांगात रोटीव्यवहार व बेटीव्यवहार व्हावा, याच्या विरूद्ध असेल. आपल्यातील जातीभेद मोडण्याची आवश्यकता तुम्ही ओळखता या गोष्टीबद्दल मला मोठे समाधान वाटते व मी तुमचे अभिनंदन करू इच्छितो. परंतु अस्पृश्यातील जातीभेद मोडण्याचा प्रयत्न कसा यशस्वी करता येईल याचा तुम्ही विचार केला आहे काय ? सहभोजने केल्याने किंवा क्वचित प्रसंगी सहविवाह केल्याने जातीभेद मोडू शकत नाहीत. जातीभेद ही एक मानसिक स्थिती आहे, एक मानसिक व्यथा आहे. ही मानसिक व्यथा जडण्याचे कारण हिंदू धर्माची शिकवण ही आहे. आपण जातीभेद पाळतो, अस्पृश्यता पाळतो याचे मुख्य कारण ज्या हिंदू धर्मात आपण आहोत तो धर्म तसे करावयास सांगतो म्हणून. वस्तू कडू असेल तर ती गोड करता येईल. खारट असेल, तुरट असेल तर तिची रूची बदलता येईल पण विषाचे अमृत करता येणार नाही. हिंदू धर्मात राहून जातीभेद नष्ट करू असे म्हणणे म्हणजे विषाचे अमृत करू असेच म्हणण्यासारखे आहे.

अर्थात ज्या धर्मात माणसाची घाण माणसाने मानली पाहिजे, अशी शिकवण देण्यात येते आहे त्या धर्मात आपण जोपर्यंत आहोत तोपर्यंत आपल्या मनातील जातीभेदांची भावना कदापि नष्ट होणार नाही. अस्पृश्यातील जातीभेद व अस्पृश्यता नाहीशी करावयाची असल्यास त्यांनी धर्मांतर करणे हा एकच रामबाण उपाय आहे.

## नामांतर आणि धर्मांतर

येथपर्यंत धर्मांतराची कारणमीमांसा तुमच्यापुढे मी मांडली आहे. ही कारणमीमांसा तुम्हाला विचारप्रवर्तक होईल, अशी मला आशा आहे. ही कारणमीमांसा ज्यांना खोल आणि गहन अशी वाटत असेल त्यांना या विषयाचा सहज समज पडावा म्हणून मी काही साधे बालबोध विचार तुमच्यापुढे मांडणार आहे. या धर्मांतराच्या प्रश्नात नवे असे काय आहे ? खरे म्हटले असता हिंदुंचा आणि तुमचा सामाजिक संबंध काय आहे ? जितके मुसलमान लोक हिंदुपासून भिन्न आहेत तितकेच तुम्हीही हिंदुपासून भिन्न आहात. ख्रिस्ती समाज हिंदू समाजापासून जितका भिन्न आहे तितकेच तुम्हीही हिंदुपासून भिन्न आहात. ख्रिस्ती व मुसलमान यांच्याशी जसा हिंदुचा रोटीबेटी व्यवहार होत नाही, तसा तुमच्याशीही होत नाही. तुमचा आणि हिंदुंचा समाज हे आतासुद्धा निरनिराळे, वेगवेगळाले दोन समाज आहेत. धर्मांतर केल्याने एका समाजाचे दोन तुकडे करण्यात आले, असे कोणालाही म्हणता यावयाचे नाही व

कोणालाही वाटावयाचे नाही. आज जसे तुम्ही निराळे आहात तसेच धर्मांतर केल्यामुळे निराळे होणार आहात. धर्मांतराने नवे असे काही होणार नाही, हे जर खरे आहे तर धर्मांतराचा बाऊ कोणाला का वाटावा हे मला समजत नाही. दुसरे असे की धर्मांतराचे महत्त्व तुम्हाला जरी पटले नसले तरी नामांतराचे महत्त्व तुम्हा सर्वांना पटले आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. तुमच्यापैकी कोणालाही तुझी जात काय म्हणून विचारले तर तो चोखामेळा, हरिजन वगैरे नावे सांगतो. पण महार हे नाव सांगत नाही. नामांतर करण्याची जरूरी पडल्याशिवाय कोणीही नामांतर करणार नाही, अशा प्रकारचे नामांतर करण्याचे कारण अगदी सोपे आहे. अपरिचित अशा माणसाला अस्पृश्य कोण व स्पृश्य कोण हे सांगता येणार नाही आणि म्हणून जोपर्यंत जात कळली नाही, तोपर्यंत स्पृश्य हिंदुच्या मनात कोणत्याही प्रकारची दूषित भावना उत्पन्न होत नाही. प्रवासात अपरिचित स्पृश्य व अस्पृश्य बंधुभावाने वागत असलेले दिसतात. एकमेकांपासून विडीपान घेतात, फळफळावळ घेतात. परंतु त्याच माणसास, ज्याच्याशी आपण व्यवहार करतो त्याची जात कळली व ती अस्पृश्य जात आहे असे समजले की, त्याच्या मनात तिरस्कार उत्पन्न होतो, त्याला तिडीक येते व आपल्याला फसवले म्हणून त्याला क्रोध येऊन प्रवासात जडलेल्या मैत्रीचे पर्यवसान शिवीगाळीत व मारामारीत होते. हा अनुभव पुष्कळांना असेल, अशी माझी खात्री आहे. हा असा प्रकार का होतो, हे तुम्हा सर्वांस अवगत आहे. तुम्हाला जी जातीवाचक नावे प्राप्त झालेली आहेत त्या नावांना इतकी दुर्गंधी लागलेली आहे की त्याचा उच्चार केला असताना देखील स्पृश्य लोकांना मळमळून येते आणि म्हणूनच तुम्ही स्वतःला महार न म्हणता, चोखामेळा म्हणून लोकांची फसवणूक करण्याचा प्रयत्न करता ! परंतु त्याने लोक फसत नाहीत, याचाही तुम्हाला अनुभव आहेच. कारण चोखामेळा म्हटले काय किंवा हरिजन म्हटले काय, लोक जे समजावयाचे ते समजतातच ! तुम्हाला नामांतराची आवश्यकता भासते हे तुमच्या वर्तणुकीनेच तुम्ही सिद्ध केले आहे. मला तुम्हाला एवढेच विचारावयाचे आहे की नामांतर करणे हे जर तुम्हाला अवश्य वाटते तर मग तुम्हाला धर्मांतर करण्यास काय हरकत असावी ? धर्मांतर हे एका दृष्टीने नामांतरच आहे. धर्मांतराने होणारे नामांतर हे तुम्हाला जास्त फायदेशीर पडेल. मुसलमान म्हणवून घेणे, ख्रिस्ती म्हणवून घेणे, बुद्ध म्हणवून घेणे, शीख म्हणवून घेणे हे धर्मांतर आहेच पण नामांतरही आहे. ते खरे नामांतर आहे. या नामांतराला दुर्गंधी नाही. हे नामांतर आमूलाग्र आहे. त्याचा शोध कोणी करू शकणार नाही. परंतु चोखामेळा, हरिजन या असल्या नामांतरापासून काही अर्थ नाही. जुन्या नावाची घाण नव्या नावाला लागल्याशिवाय राहणार नाही. जोपर्यंत तुम्ही हिंदू धर्मात राहाल तोपर्यंत

तुम्हाला नामांतर करावेच लागेल. कारण नुसते हिंदू म्हणवून चालणार नाही. हिंदू हा कोणी मनुष्यप्राणी आहे असे कोणीच ओळखीत नाही. महार असे सांगून भागणार नाही, कारण त्या नावाचा उच्चार केल्याबरोबर कोणी जवळ येणार नाही. असल्या मधल्या स्थितीत घोटाळत राहण्यापेक्षा, आज हे नाव, उद्या ते नाव, असे नामांतर करीत बसण्यापेक्षा धर्मांतर करून कायमचे नामांतर तुम्ही का करू नये, असा तुम्हाला माझा प्रश्न आहे.

## विरोधकांची भूमिका

धर्मांतराची चळवळ सुरू झाल्यापासून अनेक लोकांनी त्या चळवळीच्या विरूद्ध अनेक आक्षेप घेतलेले आहेत. त्या आक्षेपात किती सत्य आहे याचा विचार करणे आवश्यक आहे. काही हिंदू लोक धार्मिकपणाचा मोठा आव आणून तुम्हाला असे सांगत आहेत की, ' धर्म ही काही उपभोगाची वस्तू नव्हे ! ज्याप्रमाणे आपण आज एक कोट घालतो, दुसऱ्या दिवशी दुसरा घालतो त्याचप्रमाणे धर्मात फेरबदल करता येणार नाही ! हिंदू धर्माला झुगारून देऊन तुम्ही परधर्मात जाता तर जे तुमचे पूर्वज इतके दिवस या हिंदू धर्मात राहिले ते मूर्ख होते की काय ? ' असा प्रश्न काही शहाण्यांनी उपस्थित केला आहे. माझ्या दृष्टीने या आक्षेपात कोणत्याही प्रकारचे तथ्य नाही. केवळ पूर्वजांचा धर्म म्हणूनच त्याला चिकटून राहावे हे म्हणणे एखाद्या मूर्खाला शोभू शकेल. कोणीही शहाणा माणूस अशा प्रकारची भूमिका घेऊ शकणार नाही. केवळ पूर्वजांचा धर्म म्हणून धर्मांतर करू नये असे म्हणणाऱ्या लोकांनी इतिहास वाचला नसेल असेच म्हणणे प्राप्त आहे. पूर्वीचा आर्यांचा धर्म, ज्याला वैदिक धर्म म्हणतात, त्यात गोमांस भक्षण करणे, दारू पिणे, स्वैर वर्तन करणे या तीन गोष्टीत मुख्यतः धर्म साठविला होता. तो धर्म हजारो वर्षे हिंदुस्थानातील लोकांनी पाळला व अजूनही काही ब्राह्मण लोकांना त्या धर्माकडे जाण्याची हुक्की येते. केवळ पूर्वजांचाच धर्म पाळावयाचा तर वैदिक धर्म सोडून हिंदुस्थानातील लोकांनी बौद्ध धर्म का स्वीकारला ? वैदिक धर्म सोडून जैन धर्म त्यांनी का स्वीकारला ? या धर्मात आपले पूर्वज राहिले ही गोष्ट खरी आहे, परंतु ते लोक स्वसंतोषाने, स्वखुशीने राहिले असे मात्र माझ्याने म्हणवत नाही. या देशात प्रदीर्घ कालपावेतो चातुर्वर्ण्याची संस्था अव्याहत चालू होती. या चातुर्वर्ण्यात ब्राह्मणांनी विद्या शिकावी, क्षत्रियांनी लढाई करावी, वैश्यांनी पैसा मिळवावा व शुद्रांनी सेवा करावी असा नियमबध्द आयुष्यक्रम बांधलेला होता. या आयुष्यक्रमात शूद्र लोकांजवळ विद्या नव्हती, धन नव्हते आणि शस्त्रअस्त्रही नव्हते. अशा विपन्न व निःशस्त्र स्थितीत ज्या तुमच्या पूर्वजांना राहावे लागले, त्यांनी हा धर्म स्वसंतोषाने स्वीकारला

असे कोणाही शहाण्या माणसास म्हणता येणार नाही. या तुमच्या पूर्वजांना या धर्माविरूध्द बंड करणे शक्य झाले असते काय ? याचा विचार अवश्य करणे प्राप्त आहे. त्यांना बंड करता आले असते व ते त्यांनी केले नसते तर हा धर्म त्यांनी स्वसंतोषाने पत्करला, असे म्हणता आले असते. परंतु खरी वस्तुस्थिती पाहिली असताना त्यांचा निरूपाय झाल्यामुळेच या धर्मात त्यांना राहावे लागले ही गोष्ट निर्विवाद आहे. या दृष्टीने पाहिले असताना हा हिंदू धर्म आमच्या पूर्वजांचा धर्म नसून, तो त्यांच्यावर जबरदस्तीने लादलेली एक गुलामगिरी आहे. त्या गुलामगिरीतून आपली सुटका करून घेण्याची साधने त्यांना उपलब्ध नव्हती. म्हणून त्यांना त्या गुलामगिरीविरूध्द बंड करता आले नाही व त्यांना गुलामगिरीतच राहावे लागले याबद्दल त्यांना कोणी दूषण देणार नाही. कोणी झाले तरी त्यांची कीवच करील. परंतु हल्लीच्या पिढीवर तशा प्रकारची जबरदस्ती कोणालाही करता येणार नाही. त्यांना सर्व बाबतीत स्वांतत्र्य आहे. या स्वातंत्र्याचा उपयोग करून जर त्यांनी आपली स्वतःची सुटका करून घेतली नाही तर त्यांच्यासारखे नीच, त्यांच्यासारखे अधम व त्यांच्यासारखे परोपजीवी दुसरे कोणीच नाहीत, असे मोठ्या कष्टाने म्हणावे लागेल.

## माणूस आणि पशुतील फरक

केवळ पूर्वजांचा धर्म म्हणूनच त्याला चिकटून राहावे, हे म्हणणे मूर्खाला शोभू शकते. कोणीही शहाणा मनुष्य अशा प्रकारची भूमिका घेऊ शकणार नाही. ज्या परिस्थितीत मनुष्य सापडला त्याच परिस्थितीत त्याने आजन्म राहावे, हे सांगणे पशूंना शोभेल माणसांना शोभू शकणार नाही. माणसात व पशूत कोणत्या प्रकारची तफावत असेल तर ती हीच की पशू आपली प्रगती करून घेऊ शकत नाही. माणूस आपली प्रगती करून घेऊ शकतो. स्थित्यंतर केल्याशिवाय आपली प्रगती होऊ शकत नाही. धर्मांतर हे एक प्रकारचे स्थित्यंतर आहे आणि जर धर्मांतर केल्याशिवाय प्रगती होत नसेल तर धर्मांतर करणे आवश्यक आहे. केवळ वडिलांचा धर्म ही बाब प्रगतीप्रिय माणसाच्या आड येऊ शकत नाही.

धर्मांतराच्या विरूद्ध आणखीही एक मुद्दा सांगण्यात येतो. तो असा की, '' धर्मांतर हा एक प्रकारचा पळपुटेपणा आहे. आज हिंदुतील अनेक लोक हिंदू धर्माची सुधारणा करण्याकरिता सिद्ध आहेत. त्यांच्या सहाय्याने जातीभेद व अस्पृश्यता नाहीशी करता येण्यासारखी आहे. अशा समयी धर्मांतर करणे सर्वस्वी अयोग्य आहे, '' असे काहींचे म्हणणे आहे. हिंदुतील समाजसुधारकांबद्दल कोणाचे काय मत असेल ते असो, माझ्या मनात

त्यांच्याबद्दल अत्यंत तिटकारा आहे. मला त्यांचा चांगला अनुभव आहे आणि या अर्धवट लोकांचा मला अगदी वीट आला आहे. ज्या लोकांना आपल्या जातीत राहावयाचे आहे, आपल्या जातीत मरावयाचे आहे, आपल्या जातीत लग्न करावयाचे आहे, त्या लोकांनी ' आपण जातीभेद मोडणार आहोत ' अशी खोटी वल्गना करावी व त्या वल्गनेवर अस्पृश्य लोकांनी विश्वास ठेवला नाही, म्हणून संतप्त व्हावे, ही गोष्ट मोठीच आश्चर्याची आहे. या लोकांच्या वल्गना ऐकल्या म्हणजे अमेरिकेतील निग्रो लोकांच्या सुटकेकरिता ज्या गोऱ्या अमेरिकन लोकांनी प्रयत्न केला, त्याची मला आठवण होते ! एकेकाळी अमेरिकेतील निग्रो लोकांची स्थिती हिंदुस्थानातील अस्पृश्य वर्गाप्रमाणेच होती. त्यांची गुलामगिरी कायद्याने प्रस्थापित केलेली होती, तुमची गुलामगिरी धर्माने प्रस्थापित केलेली आहे, एवढाच काय तो फरक आहे. या गुलामगिरीतून त्यांची सुटका करण्याकरिता अमेरिकेतील काही सुधारक प्रयत्न करीत होते. पण हिंदू समाजसुधारकांची आणि निग्रोंची सुटका करणाऱ्या अमेरिकेतील गोऱ्या सुधारकांची तुलना करता येईल काय ? काळया शिद्दी लोकांची गुलामगिरीतून सुटका व्हावी म्हणून आपल्याच रक्तमांसाच्या गोऱ्यांशी अमेरिकन सुधारणावाद्यांनी तुंबळ युध्द केले. त्यांना गुलामगिरीत ठेवावे असे म्हणणाऱ्या असंख्य गोऱ्या लोकांचे प्राण घेतले व आपल्यापैकी असंख्य लोकांच्या प्राणांची आहुती दिली. त्या प्रसंगाचे वर्णन इतिहासातून वाचले आणि आमच्या समाजसुधारकांचे चित्र डोळयापुढे ठेवले म्हणजे ' कहां राजा कहां पोतराजा ' असेच म्हणणे भाग पडते. सुधारक म्हणून म्हणविणाऱ्या हिंदुस्थानातील अस्पृश्यांच्या कैवाऱ्यास असे विचारणे प्राप्त आहे की, अमेरिकेतील गोऱ्या लोकांनी निग्रोंच्या सुटकेकरता जी आपआपसात यादवी केली तशी यादवी करण्यास तुम्ही सिध्द आहात का ? व सिध्द नसाल तर सुधारणेच्या व्यर्थ वल्गना करण्यात काय हशील आहे ? हिंदुंमधले फार मोठ्यातले मोठे अस्पृश्यांच्या उन्नतीकरता झटणारे म्हटले म्हणजे महात्मा गांधी ! त्यांची मजल किती लांब जाऊ शकते ? इंग्रज सरकार विरूध्द निःशस्त्र प्रतिकाराचा लढा लढविणारे महात्मा गांधी अस्पृश्य वर्गावर जुलूम करणाऱ्या हिंदुंचे मन देखील दुखवायला तयार नाहीत ! त्यांच्याविरूद्ध सत्याग्रह करावयाला तयार नाहीत ! इतकेच नव्हे तर त्यांच्याविरूध्द कायदेशीर इलाज करावयाला देखील तयार नाहीत ! या सुधारकांचा काय उपयोग आहे, मला कळत नाही.

## खरे चुकते स्पृश्यांचेच

काही जण अस्पृश्यांच्या सभेत येवून मोठ्या तावातावाने स्पृश्यांना शिव्या देतील, काही जण अस्पृश्यांच्या सभेत येऊन मोठ्या आढ्यतेने अस्पृश्यांना सांगतील की, बाबांनो, तुम्ही स्वच्छ राहा, शिक्षण घ्या, तुमच्या पायावर

उभे रहा वगैरे. खरे म्हटले असता जर कोणी आरोपी असेल तर तो स्पृश्य वर्ग. कोणाचे चुकत असेल तर ते स्पृश्य वर्गाचे. पण त्या स्पृश्य वर्गाची सभा करून त्यांची कानउघाडणी करतील तर हराम आहे. हिंदू धर्मातच राहून तुम्ही आपला लढा चालू ठेवा, तुम्ही आम्ही मिळून तो यशस्वी करू असे सांगणाऱ्या सुधारकांना दोन गोष्टींची आठवण करून देणे आवश्यक वाटते. गेल्या महायुध्दात एका अमेरिकन व इंग्लिश माणसामध्ये लढाई संबंधाने झालेला संवाद माझ्या वाचनात आलेला आहे. तो उद्‌बोधक असल्याकारणाने त्याचा याप्रसंगी उल्लेख करणे उचित वाटते. संवादाचा विषय लढाई कोठपर्यंत चालू ठेवावयाची या संबंधाने होता. त्या अमेरिकन गृहस्थाच्या प्रश्नाला उत्तर देताना इंग्रज माणसाने मोठ्या तोऱ्याने सांगितले की, ' शेवटचा फ्रेंच माणूस ठार होईपर्यंत आम्ही ही लढाई लढू.' हिंदू समाजातील सुधारक जेव्हा असे म्हणतात की, अस्पृश्यतेचा हा लढा आम्ही अखेरपर्यंत लढू , ' तेव्हा शेवटचा अस्पृश्य ठार होईपर्यंत ही लढाई लढू , ' असाच त्याचा अर्थ मी तरी निदान करतो. दुसऱ्याचे शीर तळहातावर घेऊन युध्दाला निघणाऱ्या योद्ध्यापासून विजयश्रीची आशा धरणे कितपत रास्त आहे, हे ठरविणे तुम्हाला काही अवघड जाऊ नये. आमच्या लढ्यात जर आम्हीच मरणार आहोत तर मग भलत्याच ठिकाणी लढा करण्यात काय हशील आहे ! हिंदू समाजाची सुधारणा करणे हे आमचे ध्येय नाही, हे आमचे कार्य नाही. आमचे स्वातंत्र्य मिळविणे हे आमचे ध्येय आहे. या पलिकडे आम्हाला कोणत्याही प्रकारचे कर्तव्य नाही. धर्मांतर करून जर आम्हाला आमचे स्वातंत्र्य मिळू शकते तर आम्ही हिंदू समाजाच्या सुधारणेचा लढा काय म्हणून आमच्या अंगावर घ्यावा ? व त्या लढ्यात आमच्या सामर्थ्याची, शक्तीची व द्रव्याची आहुती काय म्हणून द्यावी ? हिंदू समाजाची सुधारणा करणे हा अस्पृश्यता निवारणाच्या चळवळीचा मुख्य हेतू आहे असा कोणीही आपला गैरसमज करून घेऊ नये. अस्पृश्यता निवारणाच्या चळवळीचा मुख्य हेतू अस्पृश्यांना सामाजिक स्वातंत्र्य मिळवून देणे हाच आहे आणि ते स्वातंत्र्य धर्मांतराशिवाय प्राप्त होणार नाही, हेही तितकेच खरे आहे. अस्पृश्यांना समतेचे स्थान प्राप्त करून घ्यावयाचे आहे, ही गोष्ट मला मान्य आहे व समतेची प्राप्ती हा खरोखरीच त्यांच्या चळवळीचा एक हेतू आहे परंतु ही समता प्राप्त करून घेण्याकरिता त्यांनी हिंदू धर्मातच राहिले पाहिजे, नाहीतर समता प्राप्त व्हावयाची नाही, असे कोणालाही म्हणता येणार नाही. समता प्राप्त करून घेण्याचे दोन मार्ग मला दिसतात. हिंदू धर्मात राहून समता मिळवावयाची किंवा धर्मांतर करून समता मिळवावयाची. हिंदू धर्मात राहून समता प्राप्त करावयाची झाल्यास आपल्यातील नुसती शिवाशीव जाऊन

कार्यभाग होणार नाही. रोटीव्यवहार व बेटीव्यवहार घडला तरच समानता प्राप्त होऊ शकेल. याचाच अर्थ असा की, चातुर्वर्ण्याचा बिमोड झाला पाहिजे व ब्राह्मणी धर्माचा विध्वंस झाला पाहिजे. ही गोष्ट शक्य आहे काय ? व ही जर शक्य नसेल तर हिंदू धर्मात राहून समतेच्या वागणुकीची अपेक्षा करणे शहाणपणाचे होईल काय ? व या प्रयत्नात तुम्हाला यश येईल काय ? त्या मानाने धर्मांतराचा मार्ग किती तरी सोपा आहे. हिंदू समाज मुसलमान समाजाला समतेने वागवितो. हिंदू समाज खिस्ती समाजाला समतेने वागवितो. अर्थात धर्मांतराने सहजगत्या सामाजिक समता प्राप्त होऊ शकते. हे जरी खरे आहे तर मग धर्मांतरासारख्या साध्या सोप्या मार्गाचा तुम्ही अवलंब का करू नये ? माझ्या मते धर्मांतरांचा मार्ग जसा अस्पृश्य लोकांना तसाच हिंदुंनाही सुखाचा होणार आहे. हिंदू धर्मात राहाल तोपर्यंत तुम्हाला त्यांच्याशी शिवाशिवीकरिता, पाण्याकरिता, रोटीकरिता, बेटीकरिता भांडण करावे लागेल व जोपर्यंत हे भांडण चालू राहिल तोपर्यंत तुमच्यात आणि त्यांच्यात बखेडा माजेल व तुम्ही एकमेकांचे वैरी होऊन राहाल. धर्मांतर केले तर भांडणाचे सर्व मूळच नाहीसे होईल. तुम्हाला त्यांच्या देवळावर हक्क सांगण्याचा काही अधिकार राहाणार नाही व जरूरीही राहणार नाही. सहभोजन करा, सहविवाह करा वगैरे सामाजिक हक्काकरिता भांडण्याचे काही कारण उरणार नाही आणि हे भांडण मिटले तर उभयतांमध्ये प्रेम वाढून सलोखा उत्पन्न होईल. आज मुसलमान व खिस्ती समाजांची व हिंदू समाजाची परस्पर स्थिती काय आहे, हे पाहा. तुमच्याप्रमाणे हिंदू लोक मुसलमानांना अगर खिस्ती लोकांना आपल्या देवळात घेत नाहीत. तुमच्या प्रमाणे त्यांच्याशी रोटीव्यवहार करीत नाहीत, बेटीव्यवहार करीत नाहीत. असे असताना त्यांच्यात आणि हिंदुमध्ये जो आज सलोखा आहे तो तुमच्यात आणि हिंदुत नाही. हा जो फरक आहे त्याचे मुख्य कारण हेच की तुम्ही हिंदू धर्मात राहिल्यामुळे हिंदू समाजाशी सामाजिक व धार्मिक हक्कांकरिता तुम्हाला भांडावे लागते. परंतु ते हिंदू धर्मातून बाहेर गेल्यामुळे त्यांना हिंदू लोकांशी धार्मिक व सामाजिक हक्कांकरिता लढा चालविण्याचे कारण पडत नाही. दुसरे असे की हिंदू समाजात त्यांना कोणत्याही प्रकारचे सामाजिक हक्क नसले, म्हणजे त्यांच्याशी रोटीव्यवहार होत नसला व बेटीव्यवहार होत नसला तरी हिंदू समाज त्यांना असमानतेने वागवित नाही. धर्मांतराने जर समता प्राप्त होऊ शकते, धर्मांतराने जर हिंदू आणि अस्पृश्य यांच्यामध्ये सलोखा उत्पन्न होऊ शकतो, तर तो समतेचा साधा आणि सुखकर मार्ग अस्पृश्य लोकांनी का स्वीकारू नये ? अशारीतीने पाहिले असताना हा धर्मांतराचा मार्ग खऱ्या स्वातंत्र्यात नेणारा आहे व त्यापासून खरी समता प्राप्त होणार आहे. धर्मांतराचा मार्ग हा पळपुटेपणाचा मार्ग नाही. तो भेकडपणाचा मार्ग नाही, तो एक शहाणपणाचा मार्ग आहे. धर्मांतराच्या आड आणखी एक बाब उपस्थित करण्यात येते.

जातीभेदाला त्रासून धर्मांतर करण्यात काही अर्थ नाही, असा युक्तिवाद काही हिंदू लोक करतात. कोठेही गेलात तर तेथे जातीभेद आहेच, मुसलमानात गेलात तरी त्यांच्यात जातीभेद आहेच, ख्रिस्त्यात गेलात तरी त्यांच्यातही जातीभेद आहेच असे हिंदू लोक सांगतात. दुर्दैवाने ही गोष्ट कबूल करणे प्राप्त आहे की, हिंदुस्थानातील अन्यधर्मीय समाजामध्ये सुध्दा जातीभेदाचा शिरकाव झाला आहे. पण या पापाचे धनी हिंदू लोकच आहेत. मुळात हा रोग त्यांच्यातून उद्‌भवलेला आहे. त्यांचा संसर्ग मग इतर लोकांना झाला आहे. ही त्यांच्या दृष्टीने नाईलाजाची गोष्ट आहे. ख्रिस्ती व मुसलमान यांच्यामध्ये जरी जातीभेद असला तरी तो जातीभेद हिंदुतील जातीभेदासारखाच आहे, असे म्हणणे कोत्यापणाचे लक्षण आहे असे म्हणावे लागेल. हिंदुतील जातीभेद व मुसलमान व ख्रिस्ती यांच्यातील जातीभेद या दोहोंमध्ये मोठे अंतर आहे. पहिल्याप्रथम ही गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे की मुसलमान व ख्रिस्ती यांच्यामध्ये जरी जातीभेद असला तरी तो जातीभेद समाजाचे प्रमुख अंग आहे, असे कोणालाही म्हणता येणार नाही. ' तू कोण ? ' याला ' मी मुसलमान आहे, ' ' मी ख्रिस्ती आहे ' एवढे उत्तर दिले असताना त्या उत्तरावरून सर्वांचे समाधान होते. ' तुझी जात काय ? ' असे विचारण्याची कोणासही आवश्यकता भासत नाही. परंतु कोणाही हिंदुला ' तू कोण ? ' असा प्रश्न विचारला असताना ' मी हिंदू , ' असे उत्तर त्याने दिले तर तेवढ्याने कोणाचेही समाधान होऊ शकत नाही. ' तुझी जात काय ? ' असा प्रश्न विचारण्यात येतो व त्याचे उत्तर दिल्याशिवाय कोणालाही त्याच्या स्थितीचा उमज पडत नाही. यावरून हिंदू समाजात जातीला कसे प्राधान्य देण्यात आले आहे व मुसलमान व ख्रिस्तीसमाजात तिला कसे गौणपद प्राप्त झाले आहे, हा मुद्दा वरील विवेचनावरून आपोआपच सिद्ध होऊ शकतो. याशिवाय हिंदुतील जातीभेद व मुसलमान व ख्रिस्ती यांच्यामधील जातीभेद यामध्ये आणखीही एक महत्त्वाचा फरक आहे. हिंदुतील जातीभेदाच्या मुळाशी हिंदुंचा धर्म आहे. मुसलमान व ख्रिस्ती यांच्यातील जातीभेदाच्या मुळाशी त्यांच्या धर्माचे अधिष्ठान नाही. हिंदुंनी ' जातीभेद मोडू ' असे म्हटले असता त्यांचा धर्म त्यांच्या आड येईल. परंतु ख्रिस्ती व मुसलमान लोकांनी आपल्यातील जातीभेद मोडण्याचा उपक्रम आरंभिला तर त्यांचा धर्म त्यांच्याविरूद्ध येऊ शकणार नाही. हिंदुंना धर्मनाश केल्याशिवाय जातीविध्वंसन करता येणार नाही. मुसलमान व ख्रिस्ती लोकांना जातीनाश करण्याकरिता धर्मनाश करण्याचे काही कारण नाही. जातीनाशाच्या कामात त्यांचा धर्म त्यांच्या आड येणार नाही. इतकेच नव्हे तर त्यांच्या धर्माचा अशा कार्याला फार मोठा पाठिंबा मिळू शकेल. जातीभेद सर्वत्रच आहे, असे जरी कबूल

केले तरी हिंदूधर्मातच राहा, असा निष्कर्ष त्यापासून निघू शकत नाही. जातीभेद ही गोष्ट जर अनिष्ट असेल तर ज्या समाजात गेले असताना जातीभेदाची तिव्रता विशेष नाही किंवा ज्या समाजात गेले असताना जातीभेद लवकर, सहज व सुलभपणे मोडता येईल, त्या समाजात जा, हाच खरा तर्कशुद्ध सिद्धांत आहे, असे मानावे लागेल.

' नुसत्या धर्मांतराने काय होणार ? तुम्ही आपली आर्थिक स्थिती व शैक्षणिक स्थिती सुधारण्याचा प्रयत्न करा, ' असे काही हिंदू लोक सांगत आहेत. या प्रश्नाने आपल्यापैकी काही लोक संभ्रमून जाण्याचा संभव आहे आणि म्हणून त्या प्रश्नांचा विचार करणे मला आवश्यक वाटते. प्रथमतः प्रश्न असा की, तुमची आर्थिक व शैक्षणिक स्थिती सुधारण्याचा प्रयत्न कोण करणार आहे ? तुम्ही किंवा तुम्हाला जे असा उपदेश करतात ते ? जे हिंदू लोक तुम्हाला असा उपदेश करतात, ते बोलण्यापलिकडे तुमच्याकरिता काही करतील, असे मला वाटत नाही व करण्याची त्यांची तयारीही मला दिसत नाही. उलट जो तो हिंदू आपापल्या जातीपुरती दृष्टी ठेऊन आपापल्या जातीची आर्थिक स्थिती सुधारण्याकरिता झटत आहे. ब्राह्मण लोक ब्राह्मण बायकांकरिता सुतिकागृहे, ब्राह्मण मुलांकरिता स्कॉलरशिप, ब्राह्मण बेकारांना नोकऱ्या मिळवून देण्याची सोय यामध्ये गुंतले आहेत. सारस्वत तसेच करीत आहेत. कायस्थ करीत आहेत, मराठे तसेच करीत आहेत. जो तो आपापल्याकरिता व ज्याला कोणी नाही त्याचा परमेश्वर, अशी स्थिती आहे. तुमची उन्नती तुम्हीच करावयाची, दुसरा कोणी तुम्हाला मदत करणार नाही, अशी जरी खरी स्थिती आहे तर या लोकांच्या म्हणण्याकडे लक्ष देण्यात काय हशील आहे ? नुसती दिशाभूल करून कालक्षेप करण्यापलिकडे याचा दुसरा काही हेतू दिसत नाही. तुमची स्थिती तुम्ही सुधारावयाची असेच जर असेल तर या हिंदू लोकांच्या तर्कटाकडे लक्ष देण्याचे कोणाला काही कारण नाही व त्यांना उपदेश करण्याचा काही अधिकारही नाही. तथापि, एवढेच सांगून हा प्रश्न सोडून देण्याचा माझा विचार नाही, त्याचे खंडन करणे मला आवश्यक आहे.

नुसत्या धर्मांतराने काय होणार ? असे जे हिंदू लोक विचारतात त्यांच्या विचारशून्यतेचे मला मोठे आश्चर्य वाटते. हिंदुस्थानातील शीख, मुसलमान व ख्रिस्ती हे पूर्वाश्रमीचे हिंदूच होते व तेही बरेचसे शूद्र व अस्पृश्य होते. ज्या हिंदू लोकांनी हिंदू धर्म सोडून शीख धर्म स्वीकारला, ज्या लोकांनी हिंदू धर्म सोडून मुसलमानी धर्म स्वीकारला, ज्या हिंदू लोकांनी हिंदू धर्म सोडून ख्रिस्ती धर्म स्वीकारला, त्यांचा काहीच अभ्युदय झाला नाही, असे या टीकाकारांना म्हणावयाचे

आहे काय ? व हे म्हणणे जर सत्य नसेल, धर्मांतराने त्यांचा उत्कर्ष झाला आहे हे जर कबूल करणे प्राप्त असेल तर मग धर्मांतराने अस्पृश्यांचे काहीच कल्याण होणार नाही, असे म्हणणे किती यथार्थ होईल याचा त्यांनी अवश्य विचार करावा. धर्मांतराने काही होणार नाही, या म्हणण्याचा गर्भित अर्थ धर्म ही अगदी कुचकामाची वस्तू आहे, असाच निघू शकतो. धर्म ही कुचकामाची वस्तू आहे, तिच्यापासून काही लाभ नाही, हानी नाही, असे ज्यांचे म्हणणे आहे त्यांनी अस्पृश्यांनी हिंदू धर्मातच राहिले पाहिजे, असा आग्रह का धरावा हे मला समजत नाही. त्यांना धर्मात काही अर्थ नाही असे वाटते तर कोणता धर्म सोडला आणि कोणता घेतला याबद्दल अशा लोकांनी वितंडवाद का करावा ? नुसत्या धर्मांतराने काय होणार असे जे हिंदू लोक विचारतात त्यांना नुसत्या स्वराज्यापासून काय होणार असा प्रश्न करणे गैर नाही. हिंदुस्थानामधील लोकांना देखील अस्पृश्य लोकांप्रमाणेच आर्थिक व शैक्षणिक प्रगती होणे आवश्यक आहे हे जर खरे आहे तर नुसत्या स्वराज्याचा काय उपयोग ? आणि नुसत्या स्वराज्यापासून जर देशाचा काही फायदा होत असेल तर धर्मांतरापासूनही अस्पृश्यांचा फायदा झालाच पाहिजे. खोल विचारांती सर्वांस मान्य करावे लागेल की जितकी स्वराज्याची आवश्यकता हिंदुस्थानला आहे तितकीच धर्मांतराची आवश्यकता अस्पृश्यांना आहे. स्वराज्याचे महत्त्व जितके देशाला आहे तितकेच धर्मांतराचे महत्त्व अस्पृश्यांना आहे. धर्मांतर आणि स्वराज्य या दोहोंचा अंतिम हेतू एकच आहे. त्यांच्या अंतीम हेतूत कोणत्याही प्रकारचा भेद नाही. तो अंतीम हेतू म्हणजे स्वातंत्र्य प्राप्ती आणि स्वातंत्र्य हे जर मनुष्यमात्राच्या जीवनाला आवश्यक अशी वस्तू आहे तर ज्या धर्मांतरापासून अस्पृश्यांना स्वतंत्र जीवन प्राप्त होऊ शकते ते धर्मांतर निरर्थक आहे, असे कोणालाही म्हणता येणार नाही.

## आधी उन्नती की आधी धर्मांतर ?

या ठिकाणी आधी आर्थिक उन्नती की आधी धर्मांतर या प्रश्नाचाही विचार करणे मला आवश्यक वाटते. आर्थिक उन्नती आधी झाली पाहिजे असे म्हणणाऱ्या लोकांचे मत मला ग्राह्य होऊ शकत नाही. आधी धर्मांतर मग आर्थिक उन्नती किंवा आधी आर्थिक उन्नती मग धर्मांतर हा वाद आधी राजकीय उन्नती की आधी सामाजिक उन्नती या वादासारखा शुष्क आहे. समाजाच्या उन्नतीला अनेक साधनांची आवश्यकता असते व ती सर्वच साधने आपापल्या परी आवश्यक असतात. त्यात अमुक एकाचा उपयोग प्रथम करावयाचा व दुसऱ्याचा उपयोग नंतर करावयाचा असा अनुक्रम नेहमीच ठेवता येणार नाही. परंतु असा अनुक्रम

ठेवावा असाच जर आग्रह असेल तर आधी धर्मांतर किंवा आधी आर्थिक उन्नती या प्रश्नाचे उत्तर आधी धर्मांतर असेच मी म्हणेन. जोपर्यंत अस्पृश्यतेचा कलंक तुमच्यावर बसला आहे तोपर्यंत तुमची आर्थिक उन्नती कशी होऊ शकणार, हे मला समजत नाही. दुकानदारी करण्याच्या हेतूने तुम्हापैकी कोणी जर एखादे दुकान घातले व दुकानदार अस्पृश्य आहे असे कळले तर त्याच्यापासून कोणीही माल घेणार नाही. नोकरी मिळविण्याच्या उद्देशाने जर तुम्हापैकी कोणी एकाने नोकरीकरीता अर्ज केला व अर्जदार अस्पृश्य आहे असे समजले तर त्याला नोकरी मिळणार नाही. कोणाची शेती विकायची झाली व तुम्हापैकी कोणी ती खरेदी करण्याचा विचार केला व मागणी करणारा अस्पृश्य आहे म्हणून समजले तर तुम्हाला ती जमीन कोणी विकणार नाही. आर्थिक उन्नतीचा कोणताही मार्ग तुम्ही स्वीकारला तरी अस्पृश्यतेमुळे कोणत्याही मार्गात तुम्हाला यशप्राप्ती होणार नाही. अस्पृश्यता ही एक तुमच्या उन्नतीच्या मार्गात कायमची धोंड आहे. ती सरकविल्याशिवाय तुमचा मार्ग सुकर होऊ शकत नाही व धर्मांतर केल्याशिवाय ही धोंड नाहीशी व्हायची नाही. तुमच्यातील काही तरूण लोक आज शिक्षणाच्या मागे लागले आहेत आणि या शिक्षणाकरिता जिकडून पैसा मिळेल तिकडून पैसा मिळविण्याचा ते प्रयत्न करीत आहेत. या पैशाच्या लालचीमुळे कित्येकांच्या मनात आहोत तेथेच, अस्पृश्यच राहून उन्नती करून घेण्याकडे प्रवृत्ती दिसून येते. परंतु अशा तरूणांना मी असा एक प्रश्न विचारू इच्छितो की शिक्षण घेतल्यानंतर तुम्हाला तुमच्या शिक्षणानुरूप नोकरी मिळविण्याचा मार्ग जर खुला नाही तर तुम्ही शिक्षण घेऊन काय करणार आहात ? आपल्यातील शिकलेल्यांपैकी पुष्कळसे लोक बेकार आहेत. त्याचे कारण काय ? माझ्या मते या बेकारीचे कारण पुष्कळ अंशानी अस्पृश्यता हेच आहे. अस्पृश्यतेमुळेच तुमच्या गुणांची चहा होऊ शकत नाही. अस्पृश्यतेमुळेच तुमच्या लायकीचे चीज होऊ शकत नाही. अस्पृश्यतेमुळेच तुम्हाला लष्करातून काढून टाकण्यात आले. अस्पृश्यतेमुळे तुम्हाला पोलिसात घेत नाहीत. अस्पृश्यतेमुळे तुम्ही पट्टेवाल्याची जागा मिळवू शकत नाही. अस्पृश्यतेमुळेच तुम्ही कोणी वरच्या जागेला चढू शकत नाही. अस्पृश्यता हा एक प्रकारचा शाप आहे. त्यापासून तुम्ही दग्ध झाला आहात व तुमच्या गुणांची राखरांगोळी झाली आहे. अशा स्थितीत तुम्ही गुण संपादन ते काय करणार ? व केले तरी त्याचा काय उपयोग होणार ? तुमच्या गुणाचे काही चीज व्हावे, तुमच्या शिक्षणाचा काही उपयोग व्हावा, तुमच्या आर्थिक उन्नतीची द्वारे खुली व्हावीत, अशी जर तुमची इच्छा असेल तर तुम्ही आधी अस्पृश्यता घालविली पाहिजे.

## धर्मांतराविरूद्ध काही शंका

येथवर धर्मांतर विरोधकांनी जी कारणे पुढे केलेली आहेत त्या कारणांचा विचार केला आहे. आता धर्मांतराविषयी सहानुभूती असणाऱ्या काही लोकांनी ज्या शंका प्रदर्शित केलेल्या आहेत त्या शंकांचे निरसन करण्याचा प्रयत्न मी करीत आहे. पहिल्या प्रथम आमच्या महारकी वतनाचे काय होईल, असा बऱ्याचशा महार लोकांना बाऊ वाटत आहे, असे माझ्या कानी आले आहे. वरिष्ठ जातीतील धर्मांतर विरोधी लोकांनी तुम्ही धर्मांतर केले तर तुमच्या महारक्या जातील, अशी भीती गावोगावी महार लोकांना घातल्याचे माझ्या कानी आले आहे. महारकी गेली तर मला स्वतःला कोणत्याही प्रकारचा खेद वाटणार नाही, ही गोष्ट तुम्हा सर्वांना माहीत आहे. महारांना अधोगतीस नेणारी जर कोणती एखादी बाब असेल तर ती महारकी होय. हे माझे मत गेल्या दहा वर्षांपासून लोकांपुढे मी मांडीत आलो आहे आणि ज्या दिवशी या महारकीच्या बेडीतून तुमची सुटका होईल त्या दिवशी तुमच्या उद्धाराचा मार्ग मोकळा झाला, असे मी समजेन. परंतु ज्या कोणाला महारकी हवी असेल त्या लोकांना मी एवढे आश्वासन देऊ शकतो की धर्मांतरामुळे महारकी वतनाला कोणत्याही प्रकारचा धोका पोहचू शकत नाही. या बाबतीत सन १८५० सालच्या कायद्याचा उल्लेख करणे आवश्यक आहे. त्या कायद्याच्या कलमाप्रमाणे कोणाही माणसाच्या, केवळ त्याने धर्मांतर केले एवढ्याच कारणामुळे, वारसाच्या अगर मालमत्तेच्या कोणत्याही अधिकारास बाधा येऊ शकत नाही. ज्यांना कायद्याचा आधार पुरेसा वाटत नसेल त्यांनी नगर जिल्ह्यातील परिस्थिती विचारात घ्यावी. नगर जिल्ह्यातील पुष्कळ महार खिस्ती झाले आहेत व काही ठिकाणी तर एकाच घरात काही माणसे खिस्ती आहेत व काही महारच राहिले आहेत. तथापि, जे ख़िस्ती झाले आहेत त्यांचा वतनावरचा हक्क नाहीसा झाला नाही. याचा दाखला नगरचे महार तुम्हा सर्वांना देऊ शकतील. तेव्हा धर्मांतरापासून महारकी वतनाला धोका येणार आहे, अशी भीती कोणीही बाळगू नये.

दुसरी शंका राजकीय हक्कांसंबंधी आहे. धर्मांतर केले तर आमच्या हक्कांचे काय होईल, अशीही शंका पुष्कळ लोकांकडून प्रदर्शित करण्यात येते. अस्पृश्य वर्गाला मिळालेल्या राजकीय हक्काचे महत्त्व मी ओळखीत नाही, असे कोणालाही म्हणता येणार नाही. हे राजकीय हक्क मिळविण्याकरिता जेवढी दगदग व जेवढी पराकाष्ठा मी केली, तेवढी दगदग व तेवढी पराकाष्ठा इतर कोणीही केलेली नाही. तथापि, राजकीय हक्कांवरतीच सर्वस्वी भर देणे योग्य होणार नाही असे मला वाटते. जे राजकीय हक्क दिलेले आहेत ते काही यावच्चंद्रदिवाकरौ अशा

अटीवर दिलेले नाहीत, ते कधी ना कधी संपुष्टात येतील. इंग्रज सरकारने जो निवाडा दिला होता त्या निवाड्यात आपणाला दिलेल्या राजकीय हक्कांची कालमर्यादा वीस वर्षांची ठरविलेली होती. पुणे करारात तशा प्रकारची कालमर्यादा निश्चित केलेली नसली तरी त्यातील मुदत अमर्याद आहे, असे कोणालाही म्हणता येणार नाही. ज्यांचा राजकीय हक्कांवर भर आहे त्यांनी हे राजकीय हक्क गेल्यावर मग काय होईल, याचा विचार अवश्य करावा. ज्या दिवशीं हे राजकीय हक्क जातील त्या दिवशी आपल्याला आपल्या सामाजिक सामर्थ्यावरच अवलंबून राहावे लागेल. ते सामर्थ्य आपल्या अंगी नाही, हे मी वर सांगितलेच आहे. ते सामर्थ्य धर्मांतर केल्याशिवाय आपल्याला प्राप्त होऊ शकणार नाही, हेही मी वर सिद्ध करून दिले आहे. कोणाही माणसाने जवळचा विचार करून भागणार नाही. तात्पुरत्या लाभाला भाळून जाऊन शाश्वत हित कोणत्या गोष्टीत आहे याचा विचार न करणे हे अतीदु:खदायक होणार आहे. अशा परिस्थितीत कायमचा लाभ कोणत्या गोष्टीत साठविलेला आहे याचा विचार सर्वांनी अवश्य करावयास पाहिजे. माझ्या मते शाश्वत हिताच्या दृष्टीने पाहिले असताना धर्मांतराचा उपाय हाच खरा उपाय आहे. त्याकरिता राजकीय हक्कांची जरी आहुती देण्याचा प्रसंग आला तरी त्याला कोणीही भीक घालू नये. धर्मांतराने राजकीय हक्कांस धोका नाही. परंतु धर्मांतर केले असता आपल्या राजकीय हक्काला का धोका बसावा, हेच मला समजत नाही. तुमचे जे राजकीय हक्क आहेत ते तुम्ही कोठेही गेले असता तुमच्या बरोबर येतील, याविषयी मला कोणत्याही प्रकारची शंका वाटत नाही. तुम्ही मुसलमान झालात तर तुमचे हक्क मुसलमान म्हणून तुम्हाला मिळतील, तुम्ही ख्रिस्ती झालात तर तुमचे हक्क ख्रिस्ती म्हणून तुम्हाला मिळतील, शीख झालात तर तुमचे हक्क शीख म्हणून तुम्हाला मिळतील. राजकीय हक्क हे लोकसंख्येवर अवलंबून आहेत. ज्या समाजाची लोकसंख्या वाढेल त्या समाजाचे राजकीय हक्कही वाढतील. आम्ही हिंदू समाजातून निघून गेलो तर आमच्या पंधरा जागा राहिलेल्या हिंदुच्या वाट्यास जातील असा कोणीही आपला भ्रम करून घेऊ नये. आम्ही मुसलमान झालो तर आमच्या पंधरा जागा, मुसलमान लोकांना ज्या हल्ली जागा प्राप्त झाल्या आहेत त्यांच्या भरीला पडतील. आम्ही ख्रिस्ती झालो तर आमच्या जागा ख्रिस्ती समाजाला ज्या जागा मिळाल्या आहेत त्यांच्या भरीला त्या जातील. एकूण आमचे राजकीय हक्क आम्ही जिकडे जाऊ तिकडे जातील. तेव्हा या बाबतीत भिण्याचे काहीच कारण नाही. उलटपक्षी आपण जर धर्मांतर केले नाही व हिंदू धर्मातच राहिलो तर आपले हक्क राहतील काय, याचा विचार तुम्ही अवश्य केला पाहिजे. समजा

हिंदू लोकांनी अस्पृश्यता मानू नये व मानल्यास तो गुन्हा आहे, असा एक कायदा पास केला व तसा कायदा पास केल्यानंतर तुम्हाला असा प्रश्न विचारला की तुमची अस्पृश्यता आम्ही कायद्याने काढून टाकली आहे आता तुम्ही अस्पृश्य राहिला नाहीत, फार तर तुम्ही गरीब व दरिद्री आहात, तुमच्याप्रमाणे इतर जातीही दरिद्री आहेत, परंतु अशा दरिद्री जातींना आम्ही स्वतंत्र राजकीय हक्क दिलेले नाहीत. मग तुम्हाला का द्यावेत ? या प्रश्नाला तुम्ही काय उत्तर द्याल याचा तुम्ही पूर्णपणे विचार करावयास पाहिजे. मुसलमान लोकांना, ख्रिस्ती लोकांना याचे उत्तर सहज देता येण्यासारखे आहे. आमचा समाज दरिद्री आहे, अज्ञानी आहे, मागासलेला आहे, म्हणून आम्हास स्वतंत्र राजकीय हक्क देण्यात आले आहेत असे नसून, आमचा धर्म निराळा आहे, आमचा समाज निराळा आहे आणि जोपर्यंत आमचा धर्म निराळा आहे, तोपर्यंत राजकीय हक्काचा वाटा आम्हास मिळाला पाहिजे, असे समर्पक उत्तर ते देऊ शकतील. तुमचा समाज निराळा, म्हणून तुम्हाला राजकीय हक्क मिळाले पाहिजेत अशा प्रकारची भूमिका जोपर्यंत तुम्ही हिंदू धर्मात आहात व हिंदू समाजात आहात तोपर्यंत तुम्हाला घेता येणार नाही. ज्या दिवशी तुम्ही धर्मांतर करून हिंदू समाजापासून स्वतंत्र व्हाल त्या दिवशी ही भूमिका तुम्हाला घेता येईल तोपर्यंत ती घेता येणार नाही आणि जोपर्यंत अशा स्वतंत्र भूमिकेवर उभे राहून राजकीय हक्काची मागणी तुम्ही करू शकत नाही तोपर्यंत तुमचे राजकीय हक्क शाश्वत आहेत, त्यास धोका नाही, असे समजून चालणे अत्यंत अज्ञानीपणाचे लक्षण आहे, असे मला वाटते. या दृष्टीने पाहिले असताना धर्मांतर हे राजकीय हक्कांना विरोधक नसून राजकीय हक्कांचे संवर्धन करण्याचा तो एक मार्ग आहे, असेच म्हटले पाहिजे.

तुम्ही हिंदू धर्मात राहिलेत तर तुमचे राजकीय हक्क जातील. तुम्हाला राजकीय हक्क बुडू द्यावयाचे नसतील तर धर्मांतर करा, धर्मांतरानेच ते कायम राहणार आहेत.

## समारोप

मी माझा निश्चय करून टाकलेला आहे. मी धर्मांतर करणार हे निश्चित आहे. माझे धर्मांतर कोणत्याही प्रकारच्या ऐहिक लाभाकरिता नाही. अशी कोणतीही गोष्ट नाही की अस्पृश्य राहून मला ती प्राप्त करून घेता येणार नाही. माझ्या धर्मांतराच्या मुळाशी आध्यात्मिक भावनेशिवाय दुसरी कसलीही भावना नाही. हिंदू धर्म माझ्या बुद्धीला पटू शकत नाही. हिंदू धर्म माझ्या स्वाभिमानाला रूचू शकत नाही. तुम्हाला मात्र आध्यात्मिक तसेच ऐहिक लाभाकरिता देखील धर्मांतर करणे आवश्यक आहे. काही लोक ऐहिक

लाभाकरिता धर्मांतर करण्याच्या कल्पनेस हसतात व तिचा उपहास करतात. अशा लोकांना मूर्ख म्हणण्यात कोणत्याही प्रकारचा संकोच मला वाटत नाही. मेल्यावरती आत्म्याचे काय होईल व काय न होईल, हे सांगणारा धर्म श्रीमंतांच्या उपयोगाचा असेल. फावल्या वेळी अशा धर्माचा विचार करून मनोरंजन करता येईल. जिवंतपणी ज्यांनी सौख्य भोगले त्यांना आपण मेल्यानंतर आपणास सुख कसे मिळेल याचा विचार ज्यात प्रामुख्याने केला असेल तोच धर्म असे वाटणे अगदी साहजिकच आहे. पण ज्यांची अमुक एका धर्मात राहिल्यामुळे राखरांगोळी झाली आहे, जे अन्नवस्त्राला मोताद झाले आहेत, ज्यांची माणुसकी नाहीशी झाली आहे, त्या लोकांनी धर्माचा ऐहिकदृष्ट्या विचार करू नये तर काय डोळे मिटून आकाशाकडे पाहात राहावे ? या गर्भश्रीमंत रिकामटेकड्यांच्या वेदांताचा गोरगरीबाला काय उपयोग ?

## धर्म माणसाकरता आहे

मी तर तुम्हाला असे स्पष्ट सांगू इच्छितो की माणूस धर्माकरिता नाही, धर्म माणसाकरिता आहे. माणुसकी प्राप्त करून घ्यावयाची असेल तर धर्मांतर करा. संघटना करावयाची असेल तर धर्मांतर करा. सामर्थ्य संपादन करावयाचे असेल तर धर्मांतर करा. समता प्राप्त करून घ्यावयाची असेल तर धर्मांतर करा. स्वातंत्र्य प्राप्त करून घ्यावयाचे असेल तर धर्मांतर करा. संसार सुखाचा करावयाचा असेल तर धर्मांतर करा. जो धर्म तुमच्या माणुसकीला काही किंमत देत नाही त्या धर्मात तुम्ही का राहाता ? जो धर्म तुम्हाला शिक्षण घेवू देत नाही त्या धर्मात तुम्ही का राहाता ? जो धर्म तुम्हाला देवळात जाऊ देत नाही त्या धर्मात तुम्ही का राहाता ? जो धर्म तुम्हाला पाणी मिळू देत नाही त्या धर्मात तुम्ही का राहाता ? जो धर्म तुमच्या नोकरीच्या आड येतो त्या धर्मात तुम्ही का राहाता ? जो धर्म तुमची पदोपदी मानहानी करतो त्या धर्मात तुम्ही का राहाता ? ज्या धर्मात माणसाशी माणुसकीने वागण्याची मनाई आहे तो धर्म नसून शिरजोरीची सजावट आहे. ज्या धर्मात माणसाची माणुसकी ओळखणे अधर्म मानला जातो तो धर्म नसून रोग आहे ! ज्या धर्मात अमंगल पशूचा स्पर्श झाला असताना चालतो पण माणसांचा स्पर्श चालत नाही तो धर्म नसून वेडगळपणा आहे. जो धर्म एका वर्गाने विद्या शिकू नये, धनसंचय करू नये, शस्त्र धारण करू नये, असे सांगतो तो धर्म नसून माणसाच्या जीवनाचे विडंबन आहे. जो धर्म अशिक्षितांना अशिक्षित राहा, निर्धनांना निर्धन राहा अशी शिकवण देतो तो धर्म नसून ती शिक्षा आहे.

धर्मांतराच्या बाबतीत जे जे काही प्रश्न उद्‌भवतात त्या त्या प्रश्नांचा मी यथामती उहापोह करण्याचा प्रयत्न केला आहे. या प्रश्नावरील माझे विवेचन कदाचित पाल्हाळिक झाले असेल, परंतु या विषयाचा सांगोपांग विचार करण्याचे मी पूर्वीपासून ठरविले होते. धर्मांतराच्या बाबतीत विरोधकांनी जे मुद्दे उपस्थित केले आहेत त्यांना उत्तर देणे आवश्यक होते. धर्मांतराच्या घोषणेची सार्थकता पटल्याशिवाय धर्मांतर करू नये, असे माझे मत आहे आणि त्यामुळे कोणाचीही वृत्ती साशंक राहू नये व कोणाच्याही मनात किंतू राहू नये एवढ्याकरिता इतक्या सविस्तरपणे या प्रश्नाचा विचार मला करावा लागला आहे. माझे विचार तुम्हाला कितपत पटतील हे मी काही सांगू शकत नाही, परंतु तुम्ही ते पूर्णपणे ध्यानात घ्याल अशी मला आशा आहे. रूचेल ते बोलावे अशा रीतीने लोकप्रियता मिळविणे हे व्यावहारिक माणसाला शोभते, पण ते पुढाऱ्याला शोभणार नाही, असे माझे मत आहे. लोकांचे भले कशात आहे व वाईट कशात आहे हे जो निर्भयपणे व निर्भिडपणे लोकोपवादाची पर्वा न करता मांडतो त्यालाच मी पुढारी मानतो. तुमचे हित कशात आहे हे सांगणे माझे कर्तव्यकर्म आहे. ते तुम्हाला रूचले नाही तरी ते सांगणे मला भाग आहे. माझे कर्तव्यकर्म मी केले आहे. आता माझ्या प्रश्नाचा निर्णय करणे हे कर्तव्यकर्म तुमचे. धर्मांतराच्या प्रश्नाचे मी मुद्दाम दोन विभाग केले आहेत. हिंदू धर्माचा त्याग करावयाचा की हिंदू धर्मातच राहावयाचे हा त्याचा एक भाग आहे. त्याग करावयाचा झाल्यास कोणत्या धर्माचा स्वीकार करावयाचा किंवा नवीन धर्माची उभारणी करावयाची हा त्या प्रश्नाचा दुसरा विभाग आहे. मला फक्त आज पहिल्या प्रश्नाचा निर्णय करावयाचा आहे, तो झाल्याशिवाय दुसऱ्या प्रश्नाचा विचार करण्यात अगर त्या बाबतीत तयारी करण्यात काही अर्थ नाही. तेव्हा पहिल्या प्रश्नावर जे काही ठरवायचे आहे ते ठरवा. तुम्हाला ते ठरविण्याकरिता दुसरी संधी मला देता येणार नाही. आज या सभेत जे तुम्ही ठरवाल त्याप्रमाणे मग पुढचा कार्यक्रम मी ठरवीन. तुम्ही जर धर्मांतराच्या विरूद्ध निर्णय केला तर प्रश्नच मिटला. माझ्या स्वतःकरिता जे मला करावयाचे असेल ते मग मी करीन. तुम्ही धर्मांतराच्या तर्फेचा निर्णय जर केलात तर त्याबरोबरच तुम्ही सर्वांनी संघटित रूपाने धर्मांतर करण्याचे आश्वासन दिले पाहिजे. धर्मांतराचा निश्चय झाला तेव्हा वाटेल त्याने वाटेल त्या धर्मात जावे अशा प्रकारची फाटाफूट तुम्ही जर करणार असाल तर मी तुमच्या धर्मांतराच्या कार्यात पडणार नाही. तुम्ही माझ्याबरोबर यावे अशी माझी इच्छा आहे. ज्या धर्मात आपण जाऊ त्या धर्मात आपल्या उन्नतीप्रित्यर्थ जे काही कष्ट व परिश्रम करावे लागतील ते कष्ट व ते परिश्रम करण्यास माझी तयारी आहे. परंतु मी सांगतो म्हणून धर्मांतर केले

पाहिजे, या भावनेला वश होऊन काही करू नका. तुमच्या बुद्धीला जर पटेल तर त्याला होकार द्या. माझ्याबरोबर न येण्याचा निश्चय तुम्ही केलात तरी त्याबद्दलही मला काही दुःख होणार नाही. उलट माझ्यावरची जबाबदारी गेली म्हणून मला आनंद वाटेल. हा निर्वाणीचा प्रसंग आहे, हे तुम्ही ध्यानात ठेवालच. तुमच्या भावी पिढीची भवितव्यता तुम्ही ठरवाल त्याप्रमाणे ठरणार आहे. तुम्ही आज स्वतंत्र होण्याचा निश्चय जर केला तर भावी पिढी स्वतंत्र होईल. तुम्ही आज पराधिन राहण्याचा निश्चय केला तर भावी पिढीसुद्धा पराधिन राहील, म्हणून तुमची जबाबदारी अत्यंत कठीण आहे.

## स्वयंप्रकाशित व्हा

याप्रसंगी तुम्हास काय सांगावे, याचा विचार करीत असताना भगवान बुद्धाने आपल्या भिक्षु संघास परिनिर्वाणाच्या पूर्वी जो उपदेश केला व ज्याचा 'महापरिनिर्वाण सुत्ता'त उल्लेख केलेला आहे त्याची मला आठवण होते. एकदा भगवान नुकतेच दुखण्यातून उठल्यामुळे विहाराच्या छायेत पसरलेल्या आसनावर बसले असताना त्यांचा शिष्य आयुष्मान आनंद भगवंताकडे येऊन त्यांना अभिवादन करून एके बाजूस बसला आणि म्हणाला, '' भगवंतास मी सुखात असताना पाहिले आहे व आजारी असताना पाहिले आहे. भगवंताच्या आजाराने माझे शरीर शिशासारखे जड झाले आहे. मला दिशाभ्रम झाला आहे, मला धर्मही सुचत नाही, परंतु त्यातल्या त्यात मला एवढे समाधान वाटते की, भिक्षु संघाविषयी काही तरी सांगितल्याशिवाय भगवंताचे परिनिर्वाण व्हायचे नाही.'' भगवान बुद्धानी उत्तर दिले, '' आनंदा ! भिक्षू संघास मजपासून काय हवे आहे ? आनंदा मी आत बाहेर काही न ठेवता धर्मोपदेश केला आहे. त्यात तथागताने आचार्यसूप्ति मुळीच ठेवली नाही. तर मग आनंदा, तथागत भिक्षूविषयी काय सांगणार ? तेव्हा आनंदा, तुम्ही सूर्याप्रमाणे स्वयंप्रकाशित व्हा ! पृथ्वीप्रमाणे परप्रकाशित राहू नका ! स्वतःवरच विश्वास ठेवा, दुसऱ्या कोणाच्या अंकीत होऊ नका ! सत्याला धरून राहा ! सत्याचाच आश्रय करा ! व दुसऱ्या कोणाला शरण जावू नका !'' मी देखील बुद्धाच्याच शब्दांचा आश्रय करून तुम्हाला असा निरोप देतो की तुम्ही आपले आधार व्हा ! तुम्हीच स्वतःच्या बुद्धीला शरण जा ! दुसऱ्या कोणाचाही उपदेश ऐकू नका ! दुसऱ्या कोणालाही वश होऊ नका ! '' सत्याचा आधार घ्या ! सत्यास शरण जा ! दुसऱ्या कशासही शरण जाऊ नका !'' हा भगवान बुद्धाचा उपदेश तुम्ही या प्रसंगी ध्यानात ठेवाल तर माझी खात्री आहे की तुमचा निर्णय चुकीचा होणार नाही.'[१]



[१] जनता : २७ जून १९३६.

# ९०

# आज साधुत्त्वाचा केवळ सांगाडा राहिला आहे

'' मुंबई इलाखा अस्पृश्य संत समाजाच्या परिषदेचे अधिवेशन ता. १ जून १९३६ रोजी, मुंबई इलाखा महार परिषदेकरिता खास उभारलेल्या भव्य मंडपात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. डॉ. बाबासाहेबांनी धर्मांतराची घोषणा केल्यापासून अखिल अस्पृश्य वर्गातच नव्हे तर अखिल हिंदू समाजात मोठी खळबळ उडून गेली आहे. स्पृश्य हिंदू समाजाच्या जुलूमाखाली वर्षानुवर्षे खितपत पडलेल्या अस्पृश्य बांधवांना डॉ. आंबेडकरांनी धर्मांतराची केलेली घोषणा देववाणी वाटली असल्यास नवल नाही. या धर्मांतराच्या घोषणेनंतर सर्व हिंदुस्थानभर अस्पृश्यांच्या सभा, परिषदा भरून त्यांनी डॉ. आंबेडकरांच्या घोषणेला पाठिंबा देणारे ठराव पास करून, आपली धर्मांतराची जय्यत तयारी दाखविली. धर्मांतराला विरोधी वृत्ती दाखविणारे व दुसऱ्यांच्या ओंजळीने पाणी पिऊन स्वार्थ साधणारे काही ' हरिजन ' वगळल्यास अस्पृश्य जनतेला धर्मांतराचे महत्त्व पटले आहे आणि त्यांनी आपल्या सक्रीय तयारीसाठी मुंबईस जशी अखिल मुंबई इलाख्यातील महार बांधवांनी परिषद भरवून डॉ. बाबासाहेबांच्या धर्मांतराच्या ठरावास सामुदायिकरीत्या पाठिंबा दिला, तसाच, मातंग बांधवांनीही दिला आणि त्याच धोरणानुसार मुंबई इलाख्यातील संत-महंत, साधु, वैरागी वगैरे लोकांनीही आपली परिषद वरील तारखेस भरविली होती.

या परिषदेच्या पूर्व तयारीसाठी साधु-संत मंडळींनी एक स्वागत मंडळ व कार्यकारी मंडळ स्थापून पुढीलप्रमाणे विनंतीपत्र प्रसिद्ध केले होते. '' या परिषदेत आपल्या सर्व संत समाजातील, सर्व संत मंडळींनी धर्मांतराच्या ठरावाला पाठिंबा देऊन सदर ठरावाची अंमलबजावणी करण्याकरिता, आपले परमपूज्य व सन्मान्य पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे ज्या दिवशी धर्मांतर करावयास लावतील, त्याच दिवशी नक्की आपण सर्व लहान थोर संत मंडळींनीही त्यांचे बरोबर धर्मांतर करण्यास सिद्ध झाले पाहिजे. अशा प्रकारचा ठाम विचारविनिमय ठरवून आपल्या संत समाजाचे पुढील धोरण निश्चित केले जाणार आहे. त्याचप्रमाणे संत समाजाच्या हिताच्या सर्व बाबतींचा पूर्णपणे विचार होऊन पुढील कार्याची रूपरेषा आखण्यात येईल, वगैरे. '' ही परिषद यशस्वी करण्याकरिता स्वागताध्यक्ष महंत शंकरराव नारायणदास बर्वे, कर्पुरनाथ

गोकुळनाथ, तारकानाथ विठ्ठलनाथ, वैद्य शंकरनाथ लक्ष्मणनाथ, हरिदास योगानंद, दशरथनाथ विठ्ठलनाथ, किसनदास शंकरदास महंत, रामनाथ कडकनाथ, योगिनाथ रघुनाथ, जगन्नाथ भडकनाथ, काशिनाथ तुळशीनाथ महंत, सोमनाथ दशरथनाथ, भक्तिदास वगैरे मंडळींनी बरीच जीवापाड मेहनत घेतली होती. कोणत्याही समाजावर बहुधा संत महंतांचाच अधिक पगडा बसलेला असतो. अशा परिस्थितीत ह्या हिंदू धर्मानुसार आजपर्यंत अस्पृश्य वर्गात वावरणाऱ्या संत महंतांनीच धर्मांतराला प्रवृत्त व्हावे ही गोष्ट विशेष अभिनंदनीय आहे. असो.

परिषदेपूर्वी स्वागतपर पदे झाली. अध्यक्षस्थानी डॉ. बाबासाहेबांची निवड झाल्यावर चहुबाजुनी टाळयांचा कडकडाट झाला आणि त्यांच्या जयजयकाराने परिषदेमधील वातावरण दुमदुमून गेले. प्रथम स्वागताध्यक्ष महंत शंकरदास नारायणदास बर्वे यांनी सर्वांचे प्रेमाने स्वागत केले. त्यांनी नियोजित अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा ब्रह्मवेत्ते व तत्त्वज्ञानी असा उल्लेख करून धर्मांतर व संताचे कर्तव्य या मुद्यावर स्वागतपर भाषण केले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अध्यक्षतेखाली भरलेल्या संत परिषदेमध्ये खालील ठराव सर्वानुमते पास करण्यात आले.——

**ठराव १ ला .**—— अखिल मुंबई इलाखा संत परिषद, मुंबई ही पूर्ण विचाराअंती असे जाहीर करते की, अखिल भारतीय अस्पृश्यांचे सर्वमान्य पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी केलेल्या धर्मांतराच्या घोषणेला व मुंबई इलाखा महार परिषदेने पास केलेल्या धर्मांतराच्या ठरावाला पाठिंबा देत आहे.

**सूचक :**—— १. भक्तिदास विठ्ठलदास, २. गंगाराम रघुनाथ.

**मांडणार :**—— साळुंकेबुवा. **अनुमोदन**—हरिश्चंद्र ज्ञानदेव गायकवाड, कमालदास सेवादास.

**ठराव २ रा .**—— धार्मिक, शैक्षणिक, राजकीय वगैरे बाबतीत डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे जे विचार व संदेश तोच संत समाजाचा धर्म व प्रचार-आचार यापुढे राहणार असून संत समाज त्या व्यतिरिक्त आपले कोणतेही धोरण ठेवणार नाही. अशी ही संत परिषद जाहीर करते.

**मांडणार :**—— हरिदास तोरणे मास्तर. **अनुमोदन**—शिवराम गोपाळ जाधव, विठ्ठलनाथ तुळशीनाथ महंत.

**ठराव ३ रा .**—— डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी धर्मांतराची घोषणा केल्याप्रमाणे व सर्व अस्पृश्य समाजास धर्मांतर करण्याचे जाहीर केलेले असून हिंदू धर्माव्यतिरिक्त दुसरा धर्म स्वीकारण्याचे निश्चित केले आहे. आपणास या नव्या धर्माची शिकवण अस्पृश्य समाजाला देणे जरूर असल्यामुळे ही संत परिषद

या नव्या धर्माच्या शिक्षणार्थ आपले प्रचारक त्या नव्या धर्माचे शिक्षण घेऊन अस्पृश्य समाजाला नव्या धर्माची ओळख व शिकवण देण्यासाठी आपले प्रचारक देण्यास तयार आहेत.

**मांडणार** :––पतितपावन बुवा. **अनुमोदन**–दिगंबरनाथ नागनाथ कांबळे.''[१]

वरील ठरावावर प्रमुख मंडळींची भाषणे झाल्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना भाषण करण्यास विनंती करण्यात आली. ते आपल्या भाषणात म्हणाले,

'' संत मंडळी आणि बंधु भगिनींनो,

मी जरी स्वतः साधु नसलो, तरी माझे घराणे साधुचे आहे. माझ्या घराण्यामध्ये जवळजवळ तीन पिढ्यापर्यंत मोठी माणसे साधु होऊन गेली. माझ्या आयुष्यातील बराचसा भाग संत समागमात गेलेला आहे. साधुंच्या हातून आपल्याला पुष्कळशी कामगिरी करून घेता येईल असे मला वाटते व त्या सर्वांचा विचार करण्यासाठी आज ही संत परिषद बोलाविण्यात आली आहे.

आपल्यातील संत लोकांनी एक मोठी कामगिरी केली आहे. हिंदू धर्मात शूद्र लोकांना विद्या मिळण्याचा अधिकार नव्हता. एवढेच नव्हे तर तुम्ही मनुस्मृती चाळली, तर तीत तुम्हाला एक गोष्ट आढळून येईल की, त्या मनुस्मृतीत जो कोणी शूद्र वेदाध्ययन करील, त्याची जीभ कापून टाकावी, त्याच्या कानात गरम शिशाचा रस ओतावा, असे उल्लेख आढळतात. या संत समाजाने अस्पृश्य वर्गाला ज्ञान देण्याचे महत्त्कार्य केले. त्यांनी केलेले श्रम व सोसलेला छळ अवर्णनीय आहे. शूद्रांनी ज्ञान संपादन करू नये, यासाठी हिंदू धर्माने केलेल्या कडेकोट बंदोबस्तातून व कोंडमाऱ्यातून या लोकांनी ज्ञान प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न केला. त्यांची ज्ञानलालसा फारच मोठी होती. याच समाजाने काही धार्मिक ग्रंथ असे लिहिले आहेत की, तसे ग्रंथ मिळणे आज कठीण जाईल. आज अनेक अस्पृश्य संतांजवळ कित्येक हस्तलिखित पुरातन ग्रंथ आहेत, तसे हिंदू धर्माच्या अभिमान्यांजवळही नसतील. या संत समाजाने अस्पृश्यांना जे ज्ञान दिले, त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी राहिले पाहिजे.

आज संत समाजाची परिस्थिती काय आहे ? ज्या लोकांनी हा जो संतपणा स्वीकारला त्याचा त्यांना काय फायदा झाला आहे ? त्यांनी आजवर काय कमावले ? त्यांच्या ईश्वरभक्तीने व ज्ञानप्राप्तीने त्यांची अस्पृश्यता नष्ट झाली काय ? त्यांच्यावर लादलेलां अस्पृश्यतेचा कलंक कधीच धुतला गेला नाही. संत महार तो महारच राहिला. महार संत कितीही विद्वान असला, तो मोठा धर्मवेत्ता असला, तरी तो ब्राह्मणाचा गुरु होऊ शकत नाही. अशा तऱ्हेची वचने हिंदू धर्माच्या शिलेदारांनी लिहून ठेवलेली आहेत.

---

[१] जनता : ४ जुलै १९३६.

संत समाजाची आज आपल्याला काय जरुरी आहे, याचा आपण विचार केला पाहिजे. संत समाजाची स्थापना प्रथम भगवान बुद्धाने केली. त्यांच्या काळी त्या समाजाला भिक्षु समाज असे म्हणत असत. भगवान बुद्धाने भिक्षु समाज का स्थापन केला ? त्याचे कारण असे की, समाजातील सर्व लोक प्रपंचात सापडल्यामुळे त्यांची बौद्धिक वाढ होत नाही. तो समाज सत्याला तसाच समाजाला पारखा होतो. याकरिता स्वार्थरहित असा आदर्श समाज असावा, या विचाराने बुद्धाने भिक्षु समाज स्थापन केला. त्याने भिक्षुंवर अनेक निर्बंध घातले. त्याचे कारण असे की, त्यांचे मन संसारात परत गुरफटू नये. भिक्षंचे मुख्य कार्य स्वधर्माचा प्रचार व प्रसार करणे हे होते. आजचा हा संत समाज बुद्धाच्या वेळी असलेल्या भिक्षु समाजाचेच परंतु दुर्धारलेले स्थित्यंतर आहे. मुळची भिक्षुत्वाची कल्पना नष्ट झाली असून, तो एक उदर भरण्याचा धंदा होऊन बसला आहे.

संतावर समाजाची जबाबदारी असली पाहिजे. परंतु आजचे साधु लोक काय करतात ? अंगाला राख फासून समाजापासून दूर राहतात. निव्वळ जटा, दाढी, माळा, रंगीत फडकी ह्या बाह्य लक्षणांनी खरा साधु होत नाही. समाजात जिकडे तिकडे अधोगती झालेली दिसून येते. समाजात ठिकठिकाणी जुलूम-जबरदस्ती केली जाते. समाजात होत असलेला अन्याय, जोर-जुलूम यांचा प्रतिकार करणे साधुंचे कर्तव्य आहे. तेच लोककल्याण आहे, तीच खरी लोकसेवा आहे.

या संत लोकांची धर्मांतराच्या कार्याकरिता फारच मदत होईल. आपण जो नवा धर्म स्थापन करणार आहोत, त्या धर्माचे महत्त्व गावोगावी, कानाकोपऱ्यातून पोहचविण्याकरिता या साधु लोकांचा फार मोठा उपयोग होण्यासारखा आहे. हे लोक धर्मोपदेशाचे कार्य उत्तम रीतीने करू शकतील. या विद्वान लोकांच्या हातून नवीन धर्माची शिकवण देण्याची कामगिरी उत्तम तऱ्हेने पार पाडली जाईल.

आज केवळ साधुत्वाचा सांगाडा राहिला आहे. तेव्हा ह्या साधु लोकांनी या नव्या कार्यक्रमाचा आपल्या अंगात संचार करून घेऊन नवे जीवन प्राप्त करून घ्यावे. आज स्वार्थत्यागाला महत्त्व आहे. नुसत्या माळांना नाही. तेव्हा संत समाजाने नवा धर्म स्थापन करण्याचे महान कार्य शिरावर घ्यावे, एवढे सांगून मी माझे भाषण संपवितो. '' [१]

'' या परिषदेला संत महंताप्रमाणे इतरही आमंत्रित मंडळी हजर होती. त्यामध्ये मुंबई इलाखा महार परिषदेचे अध्यक्ष मि. बी. एस. व्यंकटराव, भाई अनंतराव चित्रे, मे. शिवतरकर, सुभेदार सवादकर, डी. व्ही. प्रधान, एम. के. कर्णिक,

---

[१] अस्मितादर्श : संपादक गंगाधर पानतावणे, दिवाळी अंक १९७८.

दिवाकर पगारे, रेवजीबुवा डोळस, संभाजी तुकाराम गायकवाड, अण्णासाहेब पोतनीस, चांगदेव मोहिते, शांताराम अनाजी उपशाम, ॲ. कवळी, देवराव नाईक, अमृतराव रणखांबे, भाऊराव गायकवाड वगैरे प्रमुख मंडळी हजर होती. तसेच संत महंत मंडळीपैकी, पतितपावनदास बुवा, गणपतबुवा ऊर्फ मडकेबुवा, शिवराम गोपाळ जाधव, सेवकनाथ शृंगीनाथ, जगन्नाथ तारकनाथ, गणेशनाथ सिद्धनाथ, बुद्धिनाथ विठ्ठलनाथ, भाविकनाथ भडकनाथ, चंचळनाथ भडकनाथ, भडकनाथ आलखनाथ, सेवकनाथ केशवनाथ, माधवदास देवकादास, मेनीनाथ तारकनाथ, किसनदास गोविंददास, गोपिनाथ गंगानाथ, अंकुशबुवा राघोजी फणसे, किसनदास शंकरदास, संभुनाथ गोविश्वनाथ, मंत्रीनाथ गरीबनाथ, चतुरनाथ चितगंगानाथ, आदिनाथ मेनीनाथ, दशरथनाथ विठ्ठलनाथ, रामनाथ कडकनाथ, बालकनाथ सेवकनाथ, श्रीपतीदास मुक्तिदास, यमाजीदास पांडवदास, अंबरदास लक्ष्मणदास, रमाजीनाथ आत्मारामनाथ, कमालदास सेवादास व गरीबनाथ तारकनाथ वगैरे मंडळी हजर होती.

संत परिषदेमधील वरील ठरावावर झालेली भाषणे फारच परिणामकारक व विचारविनिमय करण्यासारखी झाली. इतर समाज बांधवांप्रमाणे अस्पृश्य संत मंडळीचा डॉ. बाबासाहेबांच्या कार्याला किती आपुलकीचा पाठिंबा आहे याची प्रत्यक्ष खात्री पटल्याशिवाय राहाणार नाही. हिंदू धर्माच्या रूढीप्रमाणे आजपर्यंत या संत मंडळीनी जे आचार-विचार व्यवहारात रूढ केले होते त्यांना या परिषदेत शपथपूर्वक मूठमाती देण्यात आलीच. शिवाय ज्या हिंदू धर्मातील धर्मग्रंथांनी आजपर्यंत अस्पृश्य जनतेची दिशाभूल केली, ज्यांना विषमतेच्या व गुलामगिरीच्या वातावरणात खितपत ठेविले आणि स्वाभिमानाला पारखे केले त्या धर्मग्रंथांचे जाहीररीत्या या परिषदेमध्ये दहन करण्यात आले.

या परिषदेमध्ये याशिवाय आणखी एक मोठी महत्त्वाची गोष्ट घडून आली. आज हजारो वर्षे हे साधुसंत हिंदू धर्माच्या रूढीच्या शिकवणीने वागत होते. त्यांनी दाढ्यामिशा वाढवून ते जटाधारीही बनले होते. यांच्या गळयात माळांची पेटी लोंबकळत होती. अनेक सांप्रदायिपंथाचे संत हातात, कानात व गळयात गंडे, दोरे, माळा यांनी सुशोभित झालेले होते. परंतु डॉ. बाबासाहेबांनी हिंदू धर्माच्या विषमतेचे व अस्पृश्यांवरील अन्यायी वागणुकीची जेव्हा त्यांना धर्मांतराच्या घोषणेने जाणीव करून दिली तेव्हा यांचे डोळे खाडकन उघडले गेले. त्यांनी डॉ. बाबासाहेबांच्या घोषणेनुसार वागण्याचा मनाच्या निश्चयाने निर्धार केला आणि या परिषदेमध्ये हजारो वर्षे मनावरील घडलेल्या संस्काराने स्वीकारलेल्या साधुसंतांच्या अलंकाराचा त्याग केला. परिषदेच्या भव्य मंडपात तयार केलेल्या अग्निकुंडात शेकडो साधुसंतांनी आपल्या दाढ्या, मिशा, जटा व उपकरणे आणि संतमहंतगिरीची सर्व निशाणी अग्निनारायणाला अर्पण करून

आपल्या धर्मांतराच्या निश्चयाचा निर्णय डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या देखत प्रत्यक्ष कृतीने जाहीर केला. या साधुसंतांच्या निश्चयी बाण्याचे आणि त्यांनी आपले दाखविलेले मनोधैर्य स्पृश्यवर्गीय साधुसंतांनाच काय पण इतर जनांनाही उदाहरणीय झाले आहे.

संत समाजाच्या या अधिवेशनाचा इतर अस्पृश्य समाजावर बराच परिणाम झाला आहे. दाढी, मिशा व जटा अग्निला अर्पण करून मुक्त झालेल्या संतांना, अस्पृश्य समाजात धर्मांतरासंबंधी प्रचार कार्य करण्यासाठी किंवा ज्या ज्या कार्यामुळे समाजहित साधले जाईल असे कार्य दिले जाईल आणि अशा प्रकारची समाजसेवा करण्याचे कित्येक साधुसंतांनी कबूल केले आहे. देवदेवतांच्या भजन पूजनात व्यर्थ कालाचा व्यय करण्यापेक्षा जनसेवा निःस्वार्थ बुद्धीने करणे हीच खरीखुरी ईश्वरसेवा ठरणार आहे. एकंदरीत हे संत परिषदेचे कार्य विशेष यशस्वी तर झालेच, परंतु हजारो वर्षे ज्या रूढीयुक्त धर्माच्या नावाखाली हे संत नांदत होते त्यांचा दांभिकपणा त्यांना कळून येताच ते त्या ढोंगी धर्माचा त्याग केवळ डॉ. बाबासाहेबांच्या धर्मांतराच्या घोषणेने करण्यास तयार झाले आणि त्याप्रमाणे त्यांनी प्रत्यक्ष कृती केली हे सर्व अस्पृश्य संत समाजाला भूषणावह आहे. हा सर्व दाढी, जटा अग्निला अर्पण करण्याचा समारंभ संपल्यावर संत परिषदेचे अधिवेशन डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जयजयकारात संपविण्यात आले. ''[१]



[१] जनता : ४ जुलै १९३६.

## ९१

# कायदे मंडळावर पक्षाचा लायक उमेदवारच निवडून आणा

दि. १ जून १९३६ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे राजकीय परिषदेपुढे भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

मी कालच धर्मांतरासंबंधी भाषण करताना सामाजिक सुधारणा आधी की राजकीय सुधारणा आधी या विषयाचा बराच ऊहापोह केलेला आहे. मनुष्यमात्राच्या आणि समाजाच्या प्रगतीला अनेक साधनांचा उपयोग करावा लागतो. अमुक एक गोष्ट आधी की अमुक एक मागाहून हा वाद शुष्क आहे. अस्पृश्यांना धर्मांतराची जितकी आवश्यकता आहे तितकीच राजकारणाची आवश्यकता आहे, असे मी म्हणू शकेन. ज्याप्रमाणे धर्मांतरासंबंधी आपले मत काय आहे, हे जसे काल आपण अजमावून पाहिले तसे राजकारणासंबंधी आपले मत अजमावून पाहणे अत्यंत अवश्य आहे. आपण एके ठिकाणी बसून राजकीय विषयावर चर्चा करावी असे मला बरेच दिवसांपासून वाटत होते. परंतु तशाप्रकारची संधी आजपर्यंत प्राप्त झाली नव्हती. ती आज प्राप्त झाली याबद्दल मला मोठे समाधान वाटते. राजकारणाचा विषय हा काही सोपा विषय नाही. तरी तुम्हा सर्वांना हा विषय समजावा म्हणून मी आपणाला माझे विचार सोप्या भाषेत सांगण्याचा प्रयत्न करणार आहे.

आपल्यापैकी जे कोणी जनता पत्र किंवा इतर वृत्तपत्रे वाचीत असतील त्यांना माहीत असेलच की पुढच्या सालच्या एप्रिल महिन्याच्या पहिल्या तारखेस हिंदुस्थान देशात नवीन सुधारणा येणार आहेत. या सुधारणासंबंधाने आपले धोरण कोणत्या प्रकारचे असावे व त्या सुधारणांचा उपयोग करून घेण्याकरिता आपणास कोणत्या प्रकारची संघटना केली पाहिजे, हे ठरविणे आवश्यक आहे.

या राजकीय सुधारणासंबंधी हिंदुस्थानातील लोकांचे काय मत असेल ते असो. या राज्यघटनेने हिंदुस्थान देशाची स्थिती बरी किंवा वाईट होणार हे पाहण्याचे आपणास प्रयोजन नाही. या राजकीय सुधारणा ज्या अंमलात यावयाच्या आहेत त्या केवळ अपुऱ्या असल्यामुळे त्या फेटाळून लावल्या पाहिजेत, अशाप्रकारची घोषणा काँग्रेस व इतर पक्ष करीत आहेत. ज्या लोकांकडून या सुधारणा राबवून घेऊ नयेत असे सांगण्यात येते त्यांच्याशी मला कर्तव्य नाही. प्रचलित राज्यव्यवस्थेपेक्षा या नवीन राजकीय सुधारणा देशाला वाईट आहेत, असे काही लोकांचे म्हणणे आहे. या मतासंबंधी मला इतकेच सांगावयाचे आहे की या नवीन

---

जनता : ४ जुलै १९३६.

राजकीय सुधारणान्वये देशाचे अपरिमित कल्याण घडून येणार नाही, हे जरी खरे असले तरी त्या राबविल्या असता मुळीच प्रगती होणार नाही, असे माझ्याने म्हणवत नाही. त्या राजकीय सुधारणा अपुऱ्या आहेत, असे म्हणणारांचा मुद्दा मला मान्य आहे , पण त्या राजकीय परिस्थितीशी ताडून पाहता नव्या सुधारणांमुळे पिछेहाट झाली आहे, हे मला मान्य नाही. जे लोक असे म्हणतात त्यांनी राजकारणाचा अभ्यास केला नाही, असे नाही. पण त्यांच्यासारखाच मीही राजकारणाचा थोडासा अभ्यास केला आहे.

या नवीन राज्यघटनेने देशाची पिछेहाट झाली आहे, असे काही लोक म्हणतात, त्यांचेही म्हणणे मला मान्य नाही. इतकेच नव्हे तर उलटपक्षी त्या राजकीय सुधारणा जरी अपुऱ्या असल्या, तथापि, त्यामुळे हल्लीच्यापेक्षा पुष्कळच चांगले होणार आहे, असे माझे प्रामाणिक मत आहे.

या राजकीय सुधारणा स्वीकारू नयेत, त्याचा उपयोग करू नये, असे जे लोक म्हणतात त्या लोकांना असा प्रश्न विचारणे प्राप्त आहे की जर तुम्हाला सुधारणा नको आणि तुम्हाला पूर्ण स्वातंत्र्यच पाहिजे तर स्वातंत्र्य प्राप्त करून घ्यायला तुमच्याजवळ काय साधन आहे ? पूर्ण स्वातंत्र्य मिळवावयाचे असेल तर इंग्रज सरकारबरोबर सैन्य व सामग्री जमवून, ज्याप्रमाणे आयरिश लोकांनी बंड केले तसे बंड केले पाहिजे. पण ही गोष्ट हिंदुस्थानच्या लोकांना शक्य आहे काय ? ब्रिटिश साम्राज्य किती अफाट व मोठे आहे, त्याची युद्ध सामग्री किती प्रचंड आहे, हे मी इंग्लंडमध्ये राऊंड टेबल कॉन्फरन्सला गेलो असताना पाहिले आहे.

ज्या लोकांना सुधारणा नकोत, स्वातंत्र्य पाहिजे त्यांना पक्के माहीत आहे की इंग्रज सरकारबरोबर लढाई करण्याकरिता अवश्य अशी साधन सामग्री मिळविणे अशक्य आहे. या कारणाने म्हणा किंवा विश्वास आहे म्हणून म्हणा या स्वातंत्र्यासाठी लोकांचा मार्ग अनत्याचाराचा मार्ग आहे. तो मार्ग म्हणजे असहकार व कायदेभंग. हा मार्ग किती परिणामकारी आहे, याचा अनुभव नुकताच सर्वांना येऊन चुकला आहे. वाऱ्याने जसे झाड हलते तसे इंग्रज सरकार हलले, पण ते काही उलथून पडले नाही. हा असहकाराचा एकच एक काँग्रेसने शोधून काढलेला मार्ग स्वातंत्र्यासाठी अपुरा पडला, आता पुन्हा त्याच मार्गाचा अवलंब करण्यात काय हशील आहे ते मला समजत नाही. माझ्या मते तर हा असहकाराचा मार्ग फार विघातक आहे. तो साधला नाही तर त्यामुळे नुकसान झाल्याशिवाय राहणार नाही.

याप्रसंगी मला इंग्लंडच्या इतिहासातील एका गोष्टीची आठवण होते. फ्रान्स देशामध्ये राज्यक्रांती सुरू असता इकडे इंग्लंड देशात लोकांना राजकीय हक्क प्राप्त व्हावेत म्हणून जोराची चळवळ सुरू झाली होती. हे राजकीय हक्क

मिळविण्याच्या बाबतीत जे लोक इंग्लंडच्या पार्लमेंटबरोबर लढत होते त्यात चार्लस् जेम्स फॉक्स हा जहाल गणल्या गेलेल्या राजकीय पक्षाचा पुढारी होता. या पक्षाने नागरिकांना माणसागणिक मतदानाचा हक्क मिळवून देण्यासाठी जोराचा प्रयत्न केला. त्यावेळी पार्लमेंटमध्ये धनिक लोकांचे प्राबल्य होते. त्या धनिक लोकांच्या पार्लमेंटबरोबर चार्लस् जेम्स फॉक्स हा व त्याचे अनुयायी निकराने भांडत असत. परंतु त्यांना त्यात अपयश आले. शेवटी अखेरचा उपाय म्हणून त्याने व त्याच्या पक्षाने पार्लमेंटबरोबर असहकार केला. हिंदुस्थानात ज्याप्रमाणे महात्मा गांधींची नॉनकोऑपरेशनची चळवळ चालली होती त्याप्रमाणे इंग्लंडमध्ये ही असहकारतेची चळवळ त्यावेळी जोरात होती. या जहाल पक्षाची अधिष्ठात्री एक लेडी पार्टलँड या नावाची एक बाई होती. या बाईला जेव्हा चार्लस् जेम्स फॉक्स याने पार्लमेंटमधून वॉकआऊट केले असे समजले तेव्हा तिने आपल्या घरी त्यास चहापार्टीस बोलाविले. जेव्हा फॉक्स व त्याची सहकारी मंडळी या बाईच्या घरी आली तेव्हा ते आपआपसात आपल्या असहकारीतेची प्रौढी मिरवू लागले. त्या बाईने त्यांना सवाल केला तो फार महत्त्वाचा असल्यामुळे तो मी आपणाला सांगत आहे. ती बाई म्हणाली : '' मि. फॉक्स, जर तुमच्या असहकारितेमुळे तुमचा शत्रू चीत होत असेल तर तुमचा असहकारितेचा मार्ग ठीक आहे. पण तसे जर नसेल तर या असहकारात काही अर्थ नाही. तुम्ही प्रतिपक्षाशी दोन हात करण्याचे सोडून अपयश आले म्हणून रडतरावाप्रमाणे रडत बसला आणि भागूबाईप्रमाणे रणमैदान सोडून पळून गेलात तर आपला शत्रू आपल्यावर विजय मिळविल्याशिवाय खचित राहणार नाही आणि म्हणून रणांगणामधून निघून जाणे हे शुद्ध मूर्खपणाचे आहे.'' ही टीका काँग्रेसच्या लोकांना लागू पडते, असे मला वाटते.

आपल्याला मिळालेल्या राजकीय सुधारणा जरी अपुऱ्या असल्या तरी त्या राबवून घेऊन झिडकारून न देता त्यांच्याच जोरावर आणखी आपल्याला पुष्कळ प्राप्त करून घेता येईल. या मिळालेल्या राजकीय सुधारणांन्वये आपल्याला पुष्कळशा गोष्टी करून घेता येतील. कोणतीही गोष्ट कायदा झाल्याशिवाय घडून येत नाही. म्हणून त्याच्याकरिता कायदाच झाला पाहिजे. निदान अस्पृश्य समाजाचे भवितव्य मुख्यतः कायद्यावर अवलंबून राहणार आहे आणि म्हणून तुम्हाला या राजकीय सुधारणा स्वीकारणे आवश्यकच आहे.

आपली सामाजिक सुधारणा कायदे करून होणार नाही. परंतु आपली आर्थिक, शैक्षणिक व औद्योगिक उन्नती कायद्याने करून घेता येईल. त्यांच्यावरच तुम्हाला अवलंबून राहिले पाहिजे. आपल्या उन्नतीचे कायदे कसे घडून येतील हे आपण कायदेमंडळात ज्या लायकीचे सभासद निवडून देणार आहोत त्यांच्यावर अवलंबून राहणार आहे. आपण जे प्रतिनिधी निवडून देऊ ते आपल्या समाजहिताला जागणारे आहेत किंवा नाहीत, हे पाहिले पाहिजे. जे आपल्या समाजहिताच्या दृष्टीने कायदेमंडळात कायदे घडवून आणतील अशाच लोकांना

तुम्ही निवडून द्या. आतापर्यंत आपल्याला इंग्रज सरकारकडे दाद मागावी लागत असे, पण या नव्या राज्यघटनेनुरूप इंग्रज सरकारचे हातात काही राहिले नाही.

तुम्ही जे प्रतिनिधी कायदे कौन्सिलात पाठवाल त्यांच्यावरच तुम्हाला अवलंबून राहिले पाहिजे. तुम्हाला ज्या काही अडचणी भासतील त्या नाहीशा करण्याकरता त्यांना तुम्ही भाग पाडले पाहिजे. नुसते प्रतिनिधी कायदे कौन्सिलात पाठवून तुमचे भागणार नाही. निवडून गेल्यानंतर ते काय करतात यावर देखील तुम्ही नजर ठेवली पाहिजे. मी तुम्हाला पुन्हा पुन्हा सांगतो की तुम्ही जो मनुष्य कायदे-मंडळात निवडून द्याल तो लायक असला पाहिजे. तुम्ही भोळे लोक आहात. एक म्हणेल : हा माझ्या गावचा यशा महार, दुसरा म्हणेल : हा माझ्या गावचा रामा महार, तिसरा म्हणेल माझा शंकर महार निवडून आला पाहिजे. असा अभिमान तुम्हाला का असावा ? कायदे मंडळात तुमचे हित कोण करू शकेल हेच तुम्ही मुख्यतः पाहिले पाहिजे. विनाकारण गावचा, तालुक्याचा, जिल्ह्याचा अभिमान धरून बसू नका.

जर तुम्ही उमेदवार निवडून देतेवेळी दक्षता बाळगली नाही तर तुमच्या सर्व कार्याचाच नाश होणार आहे. दुसरी गोष्ट मला आपणास सांगितली पाहिजे ती ही की एकटा मनुष्य कायदेमंडळात काही करू शकत नाही. मी १९२६ सालापासून मुंबई कायदेमंडळात आहे. मला थोडे बहुत ज्ञानही आहे. पण समाजहिताच्या दृष्टीने मला कोणतेच कार्य करता आले नाही. याचे कारण आम्ही दोन माणसे-मी व डॉ. सोळंकी असे-कायदेमंडळात आहोत. एकटा-दुकटा मनुष्य कायदेमंडळात काही करू शकत नाही. एकजुटीने, संघटितपणाने तुम्ही निवडून दिलेले प्रतिनिधी वागतात किंवा नाही हे पाहणे तुमचे कर्तव्य आहे. पक्षाला न धरून वागणाऱ्या माणसाला निवडून दिल्यास काही हित होणार नाही. नुसता हुशार आहे एवढे बघून चालणार नाही. त्याला पक्ष आहे किंवा नाही हेही तुम्ही पाहिले पाहिजे.

आपल्या सुदैवाने आपणाला पंधरा जागा प्राप्त झाल्या आहेत. परंतु ज्या पंधरा जागा आपणाला मिळाल्या आहेत ते पंधरा प्रतिनिधी एकजुटीने राहिले नाहीत तर त्या जागांचा दुरुपयोग झाल्यासारखेच होईल. म्हणून आपण निवडून दिलेले सभासद कायदेमंडळात एकजुटीने कसे राहतील याबद्दल आपल्याला योजना तयार करावयास पाहिजे आणि ती योजना अशा प्रकारची असली पाहिजे की जेणेकरून हे पंधरा सभासद पाच वर्षे एकदिलाने कायदेकौन्सिलात राहून आपल्या समाजहिताकडे दुर्लक्ष करणार नाहीत. ज्या ज्या जिल्ह्यात आपल्याकरिता जागा राखल्या आहेत त्या त्या जिल्ह्यात दहा लोकांची एक कमिटी स्थापण्यात यावी. अशा निरनिराळया जिल्ह्यात कमिट्या स्थापून झाल्या म्हणजे या सर्व लोकांमधून जे जे लोक लायक असतील त्या सर्वांचे एक मध्यवर्ती मंडळ

स्थापण्यात यावे व या मध्यवर्ती मंडळातर्फे सर्व जिल्ह्यातील प्रतिनिधींची निवड करण्यात येईल. ज्या कोणा उमेदवारास निवडणुकीला उभे राहावयाचे असेल त्याने आपल्या उमेदवारीचा अर्ज स्थानिक कमिट्यांकडे करावा व तो अर्ज त्यांनी शिफारसीसह मध्यवर्ती मंडळाकडे (सेंट्रल बोर्ड) आल्यावर त्या अर्जाचा विचार करून कोणीतरी एक उमेदवार मुक्रर केला जाईल. ही योजना सफलित व्हावयाची असेल तर तुमच्या संघटनेशिवाय आणि सहकार्याशिवाय काहीच होणे शक्य नाही. तुम्ही जर असा निश्चय केला की आमच्या बोर्डाने जो उमेदवार नेमून दिला आहे त्यालाच आम्ही मते देऊ तर आपल्याला ज्या पंधरा जागा मिळाल्या आहेत त्यापेक्षाही जास्त उमेदवार आपण निवडू शकू. मध्यवर्ती मंडळ ज्या उमेदवाराला निवडून देईल त्या उमेदवाराने आपल्या पक्षाच्या सर्व अटी पाळल्या पाहिजेत. या अटी कोणत्या असाव्यात त्या मी ठरविल्या आहेत. त्या मी मागाहून जाहीर करीन.

आपल्याला राजकारणामध्ये अत्यंत महत्त्वाचा डाव खेळता येईल. दिसायला जागा पंधरा असल्या तरीपण जर आपण एकसूत्राने वागलो तर माझी खात्री आहे की निवडणुकीच्यावेळी आपल्याला पंधराऐवजी पंचेचाळीस सभासद सहज निवडून आणता येतील. इतकी संधी तुम्हाला सध्या प्राप्त झाली आहे.

जी राजकीय सत्ता तुम्हाला प्राप्त झालेली आहे त्याची कल्पना जरी तुम्हाला नसली तरी वरिष्ठ वर्ग ती जाणून आहे आणि म्हणून ते तुमच्या दाढीला हात लावण्यास कमी करणार नाहीत. त्यात आपले हित पाहणारे कोण व आपले हितशत्रू कोण याचा विचार करून जर आपण आपली मते दिली तर वरिष्ठ वर्गाचे काही लोक जे आपल्याकरिता झटतात त्यांना निवडणुकीत आपल्याला मदत करता येईल. अशा रीतीने आपला गट मोठा होऊ शकेल. अस्पृश्यात अनेक जातींचा समावेश होतो. अस्पृश्य समाजात महार जात ही वडील बंधुप्रमाणे आहे. म्हणून सर्व जातींशी त्यांनी बंधुभावाने, आपुलकीने, समतेने वागले पाहिजे. त्यांच्याशी सहकार्य करण्याचे आपण औदार्य दाखविले पाहिजे. सर्वच जागा तुम्हीच बळकावून बसू नका. तुमच्या स्वार्थाकरिता तरी तुम्ही इतरांना या पंधरा जागात भागीदार केले पाहिजे. ही शिस्त पाळण्यास तुम्ही तयार आहात का ? तुम्ही जर तयार असाल तरच मी राजकारणात पडणार आहे. तुम्ही शिस्त पाळणार नसाल तर मला राजकारणाची काही हौस नाही, हे मला आपणास स्पष्टपणे सांगणे भाग आहे.

● ● ●

# ९२

# धर्मांतराने अस्पृश्यांना समानतेचा हक्क प्राप्त होणार आहे

अखिल मुंबई इलाखा मातंग परिषदेचे अधिवेशन दादर-नायगाव येथे मुंबई इलाखा महार परिषदेच्या भव्य मंडपात मंगळवार तारीख २ जून १९३६ रोजी रात्रौ ९ वाजता भरले होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी येवले येथे केलेल्या धर्मांतराच्या घोषणेस पाठिंबा देण्याकरिता ही मातंग बांधवांची मुंबई इलाख्यातर्फे परिषद भरविण्यात आली होती. या परिषदेस सात-आठ हजार मातंग स्त्री-पुरूषांचा समुदाय व मुंबई इलाख्यातील प्रत्येक जिल्ह्यातील प्रतिनिधी हजर होते. परिषदेच्या आंरभी नाशिकचे श्री. डी. जी. रोकडे, श्री माने, श्री फालके यांचे स्वागतपर पद्य गायन झाले. त्यानंतर स्वागताध्यक्ष रामचंद्र नाथोबा काळोखे यांचे स्वागतपर भाषण झाले. यानंतर श्री दौलतराव चिलोबा वायदंडे यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावे अशी सूचना मांडली. या सूचनेस श्री. मारुतराव तूपसौंदर, बाबूराव रामजी कांबळे, श्री.के. एस. सकाटे यांनी अनुमोदन दिले. त्यानंतर अध्यक्षांना व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना मोठ्या जयघोषात पुष्पहार अर्पण करण्यात आल्यावर अध्यक्ष श्री. बोताळने यांचे भाषण झाले.

परिषदेच्या यश चिंतनाप्रित्यर्थ निरनिराळ्या ठिकाणच्या पुढाऱ्यांकडून संदेश आले होते. त्यात श्री.शंकरराव शिवरामजी साठे (नगर), गणपत जयवंत पवार, अनंतराव दौलत लोखंडे (कोल्हापूर) वगैरे मंडळीचे होते. या परिषदेस मे. रामचंद्र केरू जाधव (सोलापूर), दौलतराव गायकवाड (सोलापूर), पांडुरंग नाना वडेकर (कऱ्हाड), रामचंद्र पुनाजी सकट (दौंड), किसन भाऊराव वाघमारे (नगर), सीमाराम बाबाजी लांडगे (पुणे), दादोबा शेंडगे (पुणे), रामचंद्र काळोखे (जुन्नर), शांताबाई श्रावण सकाटे (खडकी), भागवत पवार (जुन्नर), शंकर शिवराम शिंदे (जुन्नर), आर. एस. फाळके (पुणे), आबा गेणू खंडाळे (जेजुरी), मोहना मल्हारी साठे (नगर) वगैरे प्रमुख प्रतिनिधी मंडळी आली होती.

मुंबई इलाखा मातंग परिषदेमध्ये पास झालेले ठराव.

**ठराव १.**—(अ) ही अखिल मुंबई इलाखा मातंग परिषद पूर्ण विचारांती असे ठरविते की, समता आणि स्वातंत्र्य मिळविण्यासाठी मातंग समाजाला धर्मांतर केल्याशिवाय उपाय नाही.

(ब) ही परिषद असे जाहीर करते की, अखिल अस्पृश्यांचे एकमेव पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचेवर मातंग समाजाचा पूर्ण विश्वास असून त्यांचे बरोबर मातंग समाज सामुदायिकरित्या धर्मांतर करण्यास तयार आहे.

---

जनता : १३ जून १९३६.

ठराव मांडणार.––केरू रामचंद्र जाधव (सोलापूर).

अनुमोदन देणार.––सीमाराम बाबाजी लांडगे (पुणे), आर. एस. फाळके (मुंबई), कु. शांताबाई श्रावण सकाटे (मुंबई), रामचंद्र पुनाजी सकट (दौंड), बाळकृष्ण बडेकर (सातारा), किसन भाऊराव वाघमारे (अहमदनगर).

**ठराव २.**––मुंबई इलाख्यातील शहरोशहरी असणाऱ्या पोलीस खात्यात पोलीसांकडून जी दवंडी थाळी पिटविण्यात येते त्या कामाकरिता मातंग जातीचा गृहस्थ ठेवण्यात यावा. तसेच खेडोपाडी दवंडी पिटविण्याच्या कामी काही एक वेतन मिळत नसल्यामुळे दवंडी देणारास भरपूर वेतन द्यावे अशी ही परिषद सरकारास विनंती करते.

**ठराव मांडणार.**––के. एस. सकाटे.

**अनुमोदन देणार.**––के. एम. काळोखे.

**ठराव ३.**––मुंबई इलाख्यातील लागवडीस उपयोगी पडणाऱ्या फॉरेस्ट जमीनी आम्हा मातंग समाजास काही ठराविक मुदतीने सारा न घेता लागवडीस द्याव्या व मुदतीनंतर उत्पन्नाच्या मानाने एक चतुर्थांश सारा घ्यावा.

**ठराव मांडणार.**––के. एम. काळोखे.

**अनुमोदन देणार.**––शंकरबुवा सकाटे, बाबुराव रामा कांबळे, डी सी. वायदंडे, के जी. कुचेकर, मारूती ज्ञानू तुपसौंदर.

**ठराव ४.**––मातंग समाजातील ज्या ज्या इसमास दाखले असतील ते दाखले व भिकार हजेरी बंद करून सदरहू जात गुन्हेगार सदरातून वगळून टाकण्यात यावी अशी ही परिषद सरकारास विनंती करते.

**ठराव मांडणार.**––सीमाराम बाबाजी लांडगे (पुणे).

**अनुमोदन देणार.**––के. एम. काळोखे, एस के देशमुख, बाबूराव दौलतराव गायकवाड.

**ठराव ५.**––मुंबई इलाख्यातील सरकारी खात्यांमध्ये मातंग जातीच्या लोकास पट्टेवाल्यापासून तो वरच्या अधिकाऱ्यांपर्यंतच्या नोकऱ्या देण्याबद्दल या परिषदेची सरकारला विनंती आहे.

**ठराव मांडणार.**––एस. के. देशमुख.

**अनुमोदन देणार.**––केरू रामचंद्र जाधव.

**ठराव ६.**––ग्रहण अमावस्याचे वेळी भिक्षा मागण्यासारख्या व इतर अनेक जुन्या अनिष्ट रूढ्या ताबडतोब बंद कराव्यात अशी ही परिषद मातंग समाजातील रूढीप्रिय बंधुभगिनींना ताकीद देत असून, ह्या अनिष्ट समाजाला काळीमा लावणाऱ्या रूढींचा त्याग त्यांनी न केल्यास त्या व्यक्तीचे गर्हणीय वागणुकीबद्दल मातंग समाजाला विचार करावा लागेल.

**ठराव मांडणार.**—अध्यक्ष.

**ठराव ७.**—नगर जिल्ह्यातील लोकल बोर्डात मातंग समाजाचा नॉमिनेटेड मेंबर असावा अशी ही परिषद सरकारास विनंती करते.

**ठराव मांडणार.**—अध्यक्ष.

**ठराव ८.**—मातंग समाजात शिक्षणाचा प्रसार होण्याकरिता वसतीगृहांची अत्यंत जरूरी आहे. तरी या कामी एक मध्यवर्ती मंडळ स्थापून त्यास वसतिगृह उघडण्याच्या कामी समाजाने सहाय्य करावे. तसेच मातंग विद्यार्थी हितचिंतक मंडळ, मुंबई यासमुध्दा आर्थिक मदत करावी.

**ठराव मांडणार.**—डी.सी वायदंडे.

**अनुमोदन देणार.**—के. जी. कुचेकर, पांडुरंग नाना बडेकर.

यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

बंधुंनो,

नुकताच तुम्ही जो धर्मांतराचा ठराव पास केला त्याबद्दल मी तुमचे अभिनंदन करू इच्छितो. तुम्ही जो ठराव पास केला त्याबद्दल मला आनंद वाटणे अगदी साहाजिक आहे. धर्मांतराची घोषणा ही काही एकाच जातीकरता नसून सर्व अस्पृश्यांकरिता आहे. जेवढ्या अस्पृश्यातील जाती धर्मांतराला अनुकूल होतील, तेवढ्या मला हव्या आहेत. असे जरी आहे तरी धर्मांतराविषयी मी आपणापुढे काही बोलू इच्छित नाही. धर्मांतराची साधक बाधक चर्चा जी करावयाची ती मी महार सभेत केलेली आहे. तिची पुनरावृत्ती करणे आवश्यक आहे असे मला वाटत नाही. दुसरे असे की, धर्मांतराचा ठराव तुम्ही आताच पास केला आहे. तेव्हा पास झालेल्या ठरावावर बोलणे निरर्थक आहे. खरे म्हटले असता धर्मांतराच्या ठरावावर तुमच्या सभेत भाषण करावयाची माझी मुळापासून इच्छा नव्हती. मातंग सभेत येऊन मी भाषण करावे अशाप्रकारची सूचना जेव्हा तुमच्या स्वागत कमेटीकडून मला करण्यात आली तेव्हा मी त्यांना स्पष्टपणे सांगितले की, मला भाषण करण्यास काही हरकत नाही, परंतु मी धर्मांतराविषयी सभेत काही बोलणार नाही. त्याचे कारण असे की, सभेत मी धर्मांतराविषयी भाषण केले असते व तद्नंतर धर्मांतराचा ठराव करण्यात येऊन तो पास करण्यात आला असता तर क्षुद्र बुद्धीच्या लोकांनी असा गैरसमज पसरविला असता की, माझ्या भिडेमुळे किंवा दडपणामुळे मातंग लोकांनी धर्मांतराचा ठराव पास केला. असे जर झाले असते तर तुम्ही केलेल्या धर्मांतराच्या ठरावाला जेवढी किंमत देणे योग्य आहे तेवढी किंमत देण्यात आली नसती व तुमच्या परिषदेचे महत्त्व निष्कारण कमी झाले असते. धर्मांतर हे जबरदस्तीने किंवा सक्तीने करता येणे शक्य नाही. त्या बाबतीत भीड घालणे योग्य नव्हे व तिचा उपयोगही होणे शक्य

नाही. ज्याच्या मनाला पटेल तोच धर्मांतर करील. तेव्हा धर्मांतरावर न बोलण्याचे जे मी ठरविले आहे त्याबद्दल तुम्हा कोणाला वाईट वाटणार नाही व तुम्हा कोणाचा त्यासंबंधी गैरसमज होणार नाही अशी मला आशा आहे.

मी आज या सभेत बोलण्याकरिता जो उभा आहे तो फक्त महार-मांग समाजात एकोपा कसा व्हावा हे सांगण्याकरताच उभा आहे. महार-मांग समाजामध्ये खेडोपाडी वितुष्ट आहे, त्यांच्यात सूत नाही, सलोखा नाही ही गोष्ट लपवून ठेवण्यात काही अर्थ नाही. त्यांच्यामध्ये वितुष्ट आहे. हे वितुष्ट नाहीसे कसे होईल याचा विचार करणे हे तुम्हा-आम्हाला कर्तव्य आहे. ही तेढ बरेच दिवसांपासून उत्पन्न झालेली आहे व जेव्हापासून ती माझे कानावरती आली आहे तेव्हापासून मांग लोकांचे काय म्हणणे आहे हे ऐकून घेण्याची संधी मिळावी व महार लोकांतर्फे जे मला सांगावयाचे ते सांगण्याची संधी मिळावी म्हणून माझ्याजवळ ज्या मांग लोकांची जा-ये आहे अशा मांग लोकांना ५/६ वर्षापासून तुम्ही मांग लोकांची कोठेतरी सभा भरवा व मला बोलवा असे मी सांगत आलो आहे. परंतु तशाप्रकारची सभा त्यांना आजवर भरविता आली नाही, म्हणून मी दिलगीर होतो. ज्या संधीची मी वाट पाहून राहिलो होतो ती संधी आज मला मिळाली याबद्दल मला धन्यता वाटते व ज्या मंडळींनी ही सभा भरवून ही संधी प्राप्त करून दिली त्यांचा मी आभारी आहे. मांग समाजात जी सुधारणेची चळवळ चाललेली आहे त्या चळवळीचे बारकाईने निरीक्षण केले असता असे दिसून येईल की, त्या चळवळीचा सारा कटाक्ष महार लोकांच्याविरूद्ध आहे. महाराशी व्यवहार ठेवू नका, महाराचे अन्न खाऊ नका, त्यांना केरसुणी विकू नका, त्यांचा विटाळ माना असे मांग पुढारी मांगांना सांगत आहेत असे मी ऐकले आहे. या त्यांच्या शिकवणीचा मला काही खेद वाटत नाही. तुमच्या स्वाभिमानाला वाटत असेल की महार आपल्या हातचे खात नाहीत तर मांगांनी तरी त्यांच्या हातचे का खावे, तर तुम्ही त्यांचे हातचे खाऊ नका. परंतु मला जो प्रश्न विचारावयाचा आहे तो हा की, महारच तुमचे हातचे खात नाहीत अशातला काही भाग नाही. ब्राह्मण लोक तुमचे हातचे खात नाहीत, नव्हे कोणत्याच जातीचे लोक तुमच्या हातचे खात नाहीत, ही जर गोष्ट खरी आहे तर मग तुमचे पुढारी ब्राह्मणांचे हातचे खाऊ नका असा उपदेश का करीत नाहीत. जे जे लोक मांगांच्या हातचे खात नाहीत, त्या त्या जातीच्या हातचे मांगांनी खाऊ नये असा उपदेश जर मांगांचे पुढारी करतील तर त्यांच्यावर कोणीही दोषारोप करणार नाही. उलट त्यांचा उपदेश मी तरी शिरसावंद्य मानीन कारण स्वाभिमान हा सर्वांना आहेच. नव्हे, सर्वांना असलाच पाहिजे. परंतु ब्राह्मणांचे हातचे खाऊ नका, मराठ्यांचे हातचे खाऊ नका, असा उपदेश कोणीही मांग पुढाऱ्यांनी केल्याचे माझ्या ऐकिवात नाही. उलट महारांचे हातचे खाऊ नये एवढीच शिकवण त्यांच्याकडून मांग लोकांना देण्यात येते. ही शिकवण द्वेषमूलक आहे ही गोष्ट तुम्हा मांग पुढाऱ्यांना

नाकबूल करता येणार नाही. मी स्वतः उच्चनीच असा कोणत्याही प्रकारचा भेदभाव मानीत नाही व महार जातीनीही उच्चनीच भेद पाळावयाचे सोडून दिले आहे. चांभार स्वतःला उच्च मानतात व महारामांगांचे हातचे आपण खाणार नाही असे म्हणतात. तुम्हीही त्यांच्याप्रमाणे महारांचे हातचे आपण खाणार नाही असे म्हणू लागला आहात. खरे म्हटले असता अमुक एक जात अमक्यापेक्षा उच्च आहे असे म्हणावयाला काही आधार किंवा पुरावा नाही. कोणा जातीला श्रेष्ठत्त्वाचा काही ताम्रपट दिलेला नाही. कोण कोणाच्या हातचे खातो व कोण कोणाच्या हातचे खात नाही या एका गोष्टीवर हिंदू समाजात जातिश्रेष्ठत्व अवलंबून असलेले आपल्याला दिसून येते. अमुक एक जात अमुक एका जातीपेक्षा श्रेष्ठ का ? तर ती त्या जातीच्या माणसाच्या हातचे अन्न खात नाही एवढे कारण लोकांना पुरेसे होते आणि म्हणून पुष्कळशा जाती इतर जातींपेक्षा आपण श्रेष्ठ आहोत हे दर्शविण्यासाठी इतर जातींशी अन्नोदक व्यवहार करण्याचे सोडून देतात. तुम्ही देखील याच मार्गाचा अवलंब केलेला दिसून येतो. महारापेक्षा मोठे म्हणवून घ्यावयाचे याशिवाय महाराच्या हातचे अन्न खाऊ नका अशा शिकवणीचा दुसरा कोणता तरी हेतू असेल असे मला तरी वाटत नाही. परंतु अशी शिकवण देणाऱ्या मांग पुढाऱ्यांनी एक-दोन गोष्टींचा विचार केला असल्याचे मला दिसत नाही. महारापेक्षा श्रेष्ठ म्हणवून घेण्यात मांगांचे काय हित साधणार आहे हे मला समजत नाही. महारांपेक्षा मोठे म्हणवून घेतल्याने ब्राह्मण लोक, मराठे लोक इत्यादि वरच्या वर्गाचे लोक जर मांगांचे मोठेपण कबूल करून त्यांना आपल्यात आत्मसात करण्यास तयार असतील तर गोष्ट निराळी. महारांपेक्षा मोठे म्हणवून घेण्याने जर ब्राह्मण लोक मांगांना आपल्या मुली देण्यास व मांगांच्या मुली करण्यास तयार असतील तर महारापेक्षा मांग श्रेष्ठ आहेत असे सिद्ध करण्याकरता महारांच्या हातचे न खाण्याचा निर्धार जर मांगांनी केला तर त्यात काही हशील आहे, असे म्हणता येईल. तेव्हा ब्राह्मण लोक व इतर स्पृश्यवर्गीय हिंदू लोक तुम्हाला आत्मसात करून घ्यावयास तयार आहेत किंवा नाहीत याचा विचार तुम्ही पूर्णपणे करावयास पाहिजे. ते जर तयार नसतील तर विनाकारण महार लोकांशी अहमहमिकेची भूमिका घेऊन खोटा दंभ वाढवून तुम्ही मांग लोक आपले नुकसान करून घ्याल अशी मला भीती वाटते. दुसरे असे की, मांग व चांभार लोक महारांच्या हातचे आपण खाणार नाही असे जर म्हणू लागले तर चांभारांच्या व मांगांच्या हातचे आपण खाणार नाही असे महार लोकांना देखील म्हणता येईल. असे काही महार लोक आहेत, जे म्हणतात की, चांभार व मांग यांच्यामध्ये जो दुराभिमानाचा पारा चढलेला आहे तो साफ उतरवून टाकावा. ते जर आपल्याशी खात पीत नाहीत तर महारांनीही त्यांच्याशी कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवू नये व मी तुम्हास असे सांगू इच्छितो की, महार लोकांनी जाती अभिमान धरला व मांगा-चांभाराशी कोणत्याही

प्रकारचा संबंध ठेवावयाचा नाही असे जर त्यांनी मनात धरले तर ते मांगांचे व चांभारांचे पुष्कळ नुकसान करू शकतील. अस्पृश्यांमध्ये महार ही बहुसंख्यांक जात आहे. त्यांच्याशिवाय अस्पृश्यांची कोणत्याही प्रकारची चळवळ तसेच अस्पृश्यांचे राजकारण त्यांच्या मदतीशिवाय शक्य होणार नाही. महारांच्या सहाय्याशिवाय मांग व चांभार काही करू असे म्हणत असतील तर ती त्यांची गैरसमजूत आहे हे त्यांना कळून येण्यास उशीर लागणार नाही. परंतु कोणी वासरू मारले म्हणून आपण गाय मारावी ही गोष्ट जशी न्याय्य होऊ शकत नाही, तसेच मांग व चांभार हे दुराभिमानाने पीडित होऊन महाराशी संबंध ठेवणार नाहीत असे म्हणू लागले म्हणून महारांनी त्यांच्याशी संबंध ठेवू नये हे म्हणणे मला स्वतःला पसंत नाही आणि तशाप्रकारची शिकवण मी महार समाजाला दिलेली आहे. महार लोकांना जाती अभिमान धरावयाचा नाही किंवा मांगापेक्षा किंवा चांभारापेक्षा श्रेष्ठ म्हणवून घ्यावयाचे नाही. त्यांना आपली तशीच सर्व अस्पृश्यांची संघटना करावयाची आहे आणि म्हणूनच महार लोक खोट्या अभिमानाला वळी न पडता सर्व अस्पृश्य लोकांना कवटाळून चळवळ करू इच्छित आहेत. महार लोक जातीभेद पाळीत नाहीत असे ते नुसते तोंडाने म्हणत आहेत असा आरोप कोणालाही करता येणार नाही. ते ही गोष्ट कृतीत उतरवीत आहेत, हे मी पुराव्यानिशी सिद्ध करून देईन. पुण्याला एक अस्पृश्य वसतिगृह आहे ही गोष्ट तुम्हापैकी काही जणांना माहीत असेल. हे वसतिगृह सरकारमार्फत चाललेले आहे. त्यात महार, मांग, चांभार वगैरे अस्पृश्य जातींची मुले आहेत. तेथे पूर्वी एकच स्वयंपाकी सर्व मुलांचे जेवण करण्याकरिता ठेवण्यात आला होता व सर्व मुले एकाच पंगतीस बसून जेवत असत. काही काळाने चांभार पुढाऱ्यांनी चांभार मुलांना फूस दिली की, तुम्ही महार-मांगाच्या बरोबर जेवू नये व त्यांच्या हातचे अन्न खाऊ नये. त्याचा परिणाम असा झाला की, या विद्यार्थी वसतिगृहात महार, मांग, चांभार वगैरे जातींच्या विद्यार्थ्यांमध्ये मोठे वितुष्ट माजले व महार मुलेही आपणही कोणाच्याच हातचे खाणार नाही म्हणून आम्हालाही आमच्या जातीचा स्वतंत्र स्वयंपाकी पाहिजे, असा आग्रह धरू लागली.

हे वितुष्ट इतके वाढले की, मला स्वतः मुंबईहून पुण्यास जावे लागले व तेथे जाऊन मी महार मुलांची समजूत करून चांभार मूर्ख झाले तर महारांनी मूर्ख का व्हावे ? असा प्रश्न केला. चांभार जरी मांगाशी जेवत नसले तरी तुम्ही व मांग एकत्र जेवावे असा सल्ला दिला. मला जर जाती अभिमान असता तर महारांच्या मुलांना, चांभार व मांग तुमच्याशी जेवत नाहीत तर तुम्हीदेखील त्यांच्याशी जेवू नका असा सल्ला मला देता आला असता, पण मी तसा सल्ला दिला नाही. मी स्वतः सोलापूरला एक बोर्डिंग काढलेले होते. त्याला महार जातीशिवाय दुसऱ्या जातीची मदत नव्हती. तथापि, त्यात सर्व अस्पृश्य जातीतील मुले घेण्यात

येत होती. मांग होते, चांभार, महार, ढोर व भंगीही होते. बरेच दिवसपर्यंत सर्व मुले एकाच पंगतीला बसून एकाच स्वयंपाक्याने केलेले अन्न खात असत. परंतु काही दिवसांनी चांभार-ढोरांच्या मुलांनी वाद उपस्थित केला व आपणाला चांभार स्वयंपाकीच पाहिजे असे ते म्हणू लागले. तेव्हा मी सांगितले की, सर्वात कनिष्ठ अशी जात जी भंगी जात त्या जातीतला स्वयंपाकी आपण ठेवू म्हणजे कोणालाच तक्रारीला जागा राहणार नाही. त्याला महारांची मुले कबूल झाली, पण बाकीची मुले तयार होईनात. अखेर ते बोर्डिंग मोडले. परंतु आम्ही तत्त्वापासून ढळलो नाही. ज्या ब्राह्मण लोकांच्या किंवा मराठे लोकांच्या नादाने तुम्ही वागता ते लोक हे करू शकतील काय ? अशाप्रकारचे आश्वासन ते जर तुम्हाला देत असतील तर तुम्ही खुशाल त्यांचेकडे जा. आम्हाला कर्तव्य नाही. मला तुम्हाला एवढेच सांगावयाचे आहे की, महार ही ब्राह्मण व मराठे यांच्यापेक्षा हजारोपटीने सुधारलेली जात आहे. जातीभेद मानावयास ते तयार नाहीत, सर्वसमदु:खी लोकांशी सहकार्य करावयास ते तयार आहेत. तुम्हाला जर त्यांच्याशी सहकार्य करावयाचे असेल तर त्यांनी तो मार्ग खुला करून ठेवलेला आहे. तुम्ही आमच्यात या. महारांच्या सामर्थ्याचा व संघटनेचा फायदा तुम्हाला मिळू शकेल. जे काही राजकीय हक्क अस्पृश्यांना मिळालेले आहेत ते मिळविण्याकरता खटपट कोणी केली ? त्याच्याकरता तुम्ही मांग लोकांनी किंवा चांभार लोकांनी कोणता प्रयत्न केला ? मी निर्भयपणे असे सांगू इच्छितो की, या राजकीय हक्कांकरिता जर कोणी स्वार्थत्याग केला असेल तर तो एका महार जातीनेच केला आहे. परंतु त्याचा फायदा तुम्हा सर्वांना मिळालेला आहे. नाशिक पोलीस ट्रेनिंग स्कूलमध्ये आज जो अस्पृश्यांचा शिरकाव झालेला आहे, तो कोणाच्या खटपटीमुळे झालेला आहे ? हे ट्रेनिंग स्कूल स्थापन झाल्यापासून त्यात अस्पृश्य जातीचा केव्हाही प्रवेश झाला नव्हता. इतकेच नव्हे तर ज्या जातीचा सामाजिक दर्जा हलका आहे अशा जातींना त्या शाळेत घेऊ नये, असा निर्बंध सरकारने घातला होता. तो निर्बंध काढून टाकण्याकरता कोणत्याही मांग पुढाऱ्याने अगर चांभार पुढाऱ्याने खटपट केलेली नाही. त्यांच्याकरिता मी खटपट केलेली आहे व त्या शाळेचे द्वार अस्पृश्यांना खुले करून दिले आहे, पण या सवलतीचा फायदा कोणाला मिळाला ? या सवलतीचा फायदा महारांना तर मिळाला नाहीच तो फक्त मांगांना व चांभारांना मिळालेला आहे. जे दोन पोलीस इन्स्पेक्टर आज अस्पृश्यांपैकी म्हणून पोलीस खात्यात नोकरी करीत आहेत त्यांपैकी एक मांग आहे, एक चांभार आहे. महारांचे जे उमेदवार होते ते, या दोघांपेक्षाही अनेकपटीने हुशार होते व लायक होते, परंतु त्यांपैकी, एकालाही घेण्यात आले नाही. उलट

जे जे म्हणून महारांचे उमेदवार कमिटीपुढे परीक्षेकरिता गेले, त्या त्या उमेदवारांना त्यांच्या लायकीसंबंधाने प्रश्न विचारण्याचे सोडून देऊन तुम्ही किती विहिरी बाटविल्या ? तुम्ही अस्पृश्यांच्या चळवळीत भाग घेता का ? वगैरे वगैरे नादानपणाचे प्रश्न विचारून त्यांना घालवून देण्यात आले. तथापि, महारांनी कोणत्याही प्रकारची तक्रार केलेली नाही. आम्ही झगडलो व दुसऱ्यांनी लूट केली, अशाप्रकारची तक्रार महारांनी कधीही केली नाही.

मुंबईत पोलीस खात्यात अस्पृश्यांची भरती सरकार जातीभेदाच्या अडचणीमुळे करावयास तयार नव्हते. आज त्याच पोलीस खात्यात अस्पृश्यांचे कितीतरी पोलीस नोकरीत आहेत. ही गोष्ट करण्यास सरकारास कोणी भाग पाडले ? चांभार किंवा मांग लोकांनी याच्याकरिता कधीतरी खटपट केली होती काय ? या खटपटीचा फायदा मांग-चांभार यांनी घेतला किंवा नाही ? महार लोकांनी चळवळ करावी व इतर जातींनी त्याचा फायदा घ्यावा याचे हे दुसरे उदाहरण आहे. आज डिस्ट्रिक्ट लोकल बोर्डात, म्युनिसीपालिटीत, तालुका लोकल बोर्डात अस्पृश्यांचे कितीतरी प्रतिनिधी असल्याचे दिसून येते. त्यांपैकी त्यात कितीतरी मांग व चांभार असतील. या जागा मिळविण्याकरता चांभार व मांग या जातींनी काय खटाटोप केला ? या जागा मिळविण्याचे सर्व श्रेय महार लोकांना आहे. तथापि, त्याचा फायदा मांगांनीही घेतला आहे व चांभारांनीही घेतला आहे. जेव्हा जेव्हा म्हणून लोकल बोर्डाच्या किंवा म्युनिसीपालिटीच्या जागेकरिता माझी शिफारस मागण्याकरिता लोक आलेले आहेत तेव्हा तेव्हा मी त्यांना असे सांगितले आहे की, मांगाचा १२ आण्याचा माणूस पुढे आला तर महाराच्या १६ आणे किंमतीच्या माणसास मी मागे बसावयास लावीन. याच्यापेक्षा जास्त व्यापकदृष्टी कोणता समाज ठेवू शकेल असे मला वाटत नाही. नवीन राज्यघटनेत वतनदारी ही मताधिकाराच्या लायकीकरिता ज्या अनेक बाबी ठरविण्यात आल्या आहेत त्यांपैकी एक बाब आहे. महार लोक वतनदार असल्याकारणामुळे अर्थात त्यांना या बाबीचा फायदा मिळाला आहे व इतर जातींना मिळू शकत नाही, या गोष्टीचा विपर्यास करून काही लोक असे भासवीत आहेत की, मी मुद्दाम पक्षपात बुद्धीने प्रेरित होऊन निव्वळ महारांचा फायदा करण्याच्या हेतूने मताधिकाराच्या लायकीच्या कोष्टकात वतनदारी ही बाब घालून घेतली. या आरोपात काही सत्य नाही. केवळ महार-मांगांमध्ये वितुष्ट वाढविण्याच्या हेतूने हा आरोप करण्यात आला आहे. वतनदारी ही बाब मताधिकाराकरिता जमेस धरण्यात यावी ही सूचना माझी नव्हे. ही सूचना मुळात प्रांतिक सरकारने केलेली सूचना आहे. तिच्या बऱ्यावाईटाची जबाबदारी माझ्यावर नाही. दुसरे असे की, केवळ मुंबई इलाख्यातील अस्पृश्य वतनदारांना मताधिकार दिला आहे असे

नसून साऱ्या हिंदुस्थानातील अस्पृश्य वतनदारांना देण्यात आलेला आहे. मद्रास, यु. पी. वगैरे सर्व प्रांतातून ज्या अस्पृश्य जातींना वतनदारी आहे त्या त्या जातींना हा लाभ मिळाला आहे. असे असताना फक्त मुंबई इलाख्यात तो लागू करण्यात आला आहे, असे म्हणणे धादांत खोटे आहे. मी याच्याही पुढे जाऊन असा प्रश्न विचारतो की, मुंबई इलाख्यात तरी हा हक्क महारांनाच मिळाला आहे काय ? हा हक्क महारांना मिळालेला नसून वतनदारांना मिळालेला आहे. कानडी भागात महार वतनदार नसून मांग लोक वतनदार आहेत. अर्थात वतनदारीमुळे त्या भागात जो फायदा होणार आहे तो कोणाचा ? मांगांचा का महारांचा ? अशा-रितीने तुम्ही विचार केलात तर तुम्हाला स्पष्ट दिसून येईल की, ज्या लोकांनी हा गिल्ला चालविला आहे ते लोक एकतर अज्ञानी असले पाहिजेत किंवा पाजी असले पाहिजेत. अशा लोकांच्या उपद्व्यापापासून तुम्ही सावध असले पाहिजे असा इशारा तुम्हाला देणे मला आवश्यक वाटते. महारांचे राजकीय वैभव वाढवावे व बाकीच्यांचे कमी करावे अशी जर माझी वृत्ती असती तर काल महारांच्या राजकीय परिषदेत मी जे भाषण केले ते केले नसते. कालच महारांच्या सभेत मी स्पष्टपणे सांगितले की, येत्या नव्या कायदे कौन्सिलमध्ये ज्या १५ जागा अस्पृश्यांकरिता दिलेल्या आहेत त्यापैकी काही जागा मांग लोकांना दिल्या पाहिजेत. ब्राह्मणेतरात अस्पृश्यांप्रमाणे लहान लहान गट आहेत. अस्पृश्यांप्रमाणेच ब्राह्मणेतरांना देखील सात राखीव जागा दिलेल्या आहेत, परंतु त्यापैकी एकही जागा ब्राह्मणेतरात ज्या लहानसहान अल्पसंख्यांक जाती आहेत त्यांना आपण देऊ, अशाप्रकारचे आश्वासन एकही मराठा जातीचा पुढारी देऊ शकत नाही. परंतु मी ते आश्वासन तुम्हाला देऊ शकतो इतकेच नव्हे तर त्याप्रमाणे ते आश्वासन कृतीत उतरवण्याचा मी प्रयत्न करीन असेही आश्वासन मी तुम्हास देऊ इच्छितो. जे औदार्य मराठा समाज दाखवू शकत नाही ते औदार्य महार समाज दाखवू शकतो. ही गोष्ट साधी आहे किंवा सोपी आहे असे कोणी म्हणू शकणार नाही.

हे मोठे अवघड व कठीण असे काम आहे. कोणतीही जात झाली तरी तिला स्वार्थ आहे आणि तो स्वार्थ बाजूला ठेवून आपल्या प्राप्तीचा काही वाटा दुसऱ्यास देणे हे व्यावहारिकदृष्ट्या लहानसहान काम नव्हे. नुसता प्राप्तीचा वाटा देण्याकरिता महार लोकांची तयारी आहे इतकेच नव्हे तर महार-मांग हा जातीभेद मोडून त्यांची एक जात करण्याकरिता देखील महार जातीची तयारी आहे. ही गोष्ट महार जात धर्मांतर करावयास तयार आहे व तुम्हीसुद्धा त्यांच्याबरोबर धर्मांतर करावे असे आग्रहाने ते जे सांगत आहेत यावरून सिद्ध होत आहे. धर्मांतराचे जे काही अनेक हेतू असतील त्यांपैकी अस्पृश्यातील जातीभेद काढून टाकणे हा एक प्रमुख हेतू आहे. सर्व अस्पृश्यांनी धर्मांतर केल्याशिवाय

अस्पृश्यातील जातिभेद मोडू शकणार नाही. जातीभेद मोडल्याखेरीज जातीमत्सर निघून जाणार नाही. धर्मांतर हे केवळ महारांचे विशेष कल्याणाकरिता काढलेले आहे अशातला काही भाग नव्हे. सर्व अस्पृश्यांना एका सूत्रात गोवून त्यांच्यातला भेदभाव नाहीसा करून त्यांना सामर्थ्यवान व संघटित करणे हाच धर्मांतराचा मुख्य हेतू आहे. धर्मांतर हे एक प्रकारचे अमृत आहे. त्या अमृताने आम्ही शुद्ध होऊ अशी आमची खात्री आहे. परंतु, आम्हीच शुद्ध व्हावे, एवढाच आमचा हेतू नसून मांगांनी व चांभारांनीदेखील धर्मांतराचे अमृत पिऊन शुद्ध व्हावे अशी आमची इच्छा आहे. हे अमृत सर्वांकरिता आहे. तुकाराम महाराजांनी एका अभंगात सांगितल्याप्रमाणे, ' सेवोनिया रस वाटितो अनेका । घ्यारे होऊ नका रानोरान ॥' असा सल्ला ते तुम्हाला देत आहेत. धर्मांतराने तुम्हाला महारांशी रोटीबेटी व्यवहाराचा, समानतेचा हक्क प्राप्त होणार आहे व तो समानतेचा हक्क देण्यास महार लोक तयार आहेत. एवढे औदार्य दुसरा कोणता समाज दाखवू शकेल ? कौन्सिलातील जागा देण्यापेक्षा ही देणगी मोठी नव्हे का ? एवढे औदार्य महार जात दाखविण्यास तयार आहे. त्या औदार्याची तुम्हाला जर किंमत नसेल तर तुमचा मार्ग तुम्हास मोकळा आहे. ज्या वाटेने तुम्हास जावयाचे असेल त्या वाटेने तुम्ही खुशाल जा. आमचा उद्धार आम्ही करून घेऊ. त्याकरिता आम्हाला आमची शिरे द्यावी लागली तरी आम्ही देऊ. चांभार-मांगांच्या सामर्थ्याची आम्हाला काही जरूरी नाही. परंतु आम्हाला तसे म्हणावयाचे नाही. महारांना जातीचा अभिमान बाळगावयाचा नाही किंवा आपल्या जातीचे महत्त्व त्यांना वाढवावयाचे नाही. त्यांना जातीभेद मोडून टाकावयाचा आहे आणि सर्व अस्पृश्य जातीचा एक समाज करावयाचा आहे. नुसते मांग म्हणून राहाणे यात काही हशील आहे असे मला वाटत नाही. तुम्ही जर जातीचा खोटा अभिमान बाळगाल तर तुमचा सर्वस्वी नाश होईल, असा इशारा याप्रसंगी देणे मला अगत्याचे वाटते.

वरीलप्रमाणे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाल्यानंतर आभार प्रदर्शनाचा कार्यक्रम झाला.

मुंबई इलाखा मातंग परिषद यशस्वीरितीने पार पाडण्यास व कार्याचा प्रसार करण्याच्या कामी मे. कृष्णा गुंडाजी कुचेकर, रामचंद्र गुंडाजी कुचेकर, यशवंत लक्ष्मण वायदंडे, शंकरबुवा सकटे, बाबू रामा कांबळे, ज्ञानू दाजी इवळे, मारुति ज्ञानू तुपसौंदरे, धोंडीबा तानू कांबळे, केशव धोंडी देवकुळे, गंगाराम सखाराम यादव, लाला पिरा यादव, भागाराम जाधव, लहू लक्ष्मण अल्हाट, केशव धोंडी देवकुळे, हन्या केशव बोताळजे, तुकाराम यशवंत चव्हाण, रत्नाकर खंडूजी आवळे, शंकर नाथा आवळे, निवृत्ती डी. शिंगोणकर, दाजी संतू कांबळे, चिंगाजी वायदंडे, के. डी. वायदंडे, आबा गेणू खंडाळे, लहू अंकूष मोहिते, के. एम. काळोखे,

शंकर शिंदे, बाळू सखाराम यादव, एस. के. देशमुख, मार्तंड तयापा माने, राऊ मलू माने वगैरे सद्गृहस्थांनी जिवापाड मेहनत करून परिषदेचे कार्य निर्विघ्नपणे पार पाडल्याबद्दल, नायगाव बी. डी. चाळ नं. ४ आणि १३ येथील मुलामुलींनी स्वागतपर गायन सुस्वरात गाईल्याबद्दल त्यांना व त्यांचे शिक्षक रामचंद्र गुंडाजी कुचेकर व पेटी वाजविण्यात प्रविण असलेले मास्टर लक्ष्मण कुचेकर यांना त्यांच्या परिश्रमाबद्दल, मे. कांबळे बॅंड मास्तर यांनी कुलाब्यातील मुलांना तालीम देऊन त्यांना थोड्याच मुदतीत प्रविण केल्याबद्दल, कुलाबा बॅंड, कुलाबा स्काऊटस, सैतानचौकी स्काऊटस, वडाळा स्काऊटस, नायगाव स्काऊटस, डिलाईलरोड स्काऊटस यांनी येऊन परिषदेस शोभा आणून उत्तमतऱ्हेची व्यवस्था राखल्याबद्दल, तसेच मुंबई शहरवासीयांनी हे एवढे अवाढव्य कार्य पार पाडण्यासाठी जी शक्तिनुसार आर्थिक मदत केली त्याबद्दल त्यांचेही आभार मानण्यात आले, तसेच पुणे, अहमदनगर, दौंड, सोलापूर, कऱ्हाड, नाशिक वगैरे ठिकाणाहून प्रतिनिधी येऊन त्यांनी कार्यास शोभा आणली त्याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यात आले.



# ९३
# भगिनींनो, समाजाला बट्टा लावणाऱ्या धंद्यापासून मुक्त व्हा

ता. ३० मे ते १ जून १९३६ ला आयोजित मुंबई इलाखा महार परिषदेत पास झालेल्या धर्मांतराच्या ठरावाचा पहिला आघात कामाठीपुऱ्यात वस्ती करून राहिलेल्या मुरळया, जोगतीणी, देवदासी इत्यादी समाजाने त्याग केलेल्या वर्गांवर बसला. साधारणतः या वर्गातील सर्व स्त्रिया सदाचरणाने उदरनिर्वाह करण्यास असमर्थ झाल्यामुळे, अनितीकारक व्यवसायात पडल्या आहेत. महार परिषदेनंतर या स्त्रिया आपल्या परिस्थितीचा विचार करू लागल्या व त्यांनी स्वयंस्फूर्तीने एक खाजगी बैठक बोलाविली व त्यात असे ठरविण्यात आले की, आपल्या व्यवसायातील बायांची व पुरूषांची एक सभा बोलवावी व त्यावेळी डॉ. बाबासाहेबांना आमंत्रण देऊन त्यांच्या मुखातून आपल्या मुक्ततेच्या चार उपदेशपर गोष्टी ऐकाव्या. त्याप्रमाणे देवतांना वाहिलेल्या सर्व वर्गांची, पुरूष (वाघे, पोतराज, भूते वगैरे) व स्त्रिया यांची एक सभा, ता. १६ जून १९३६ रोजी रात्री पोयबावडीवरील दामोदर हॉलमध्ये भरली होती. सभेस स्त्रिया व पुरूष मिळून मोठा लोकसमुदाय जमला होता व त्यामुळे दामोदर हॉल माणसांनी अगदी फुलून गेला होता. आरंभी काही देवदासी, मुरळया, पोतराज व वाघे यांची भाषणे होऊन त्यांनी या व्यवसायापासून परावृत्त होण्याची आपल्या बंधुभगिनींना विनंती केली. काही वक्त्यांनी जाहीररितीने असे सांगितले की, आपण या व्यवसायातून पूर्वीच बाहेर पडलो असून आपण प्रामाणिकपणे निढळाच्या घामाचा पैसा मिळवून आपला उदरनिर्वाह करीत असतो व त्यामुळे आपले जिणे स्वाभिमानाचे झाले आहे.

नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर टाळयांच्या कडकडाटात भाषण करण्यास उठले. त्यांच्या चेहेऱ्यावर त्या रात्री उद्विग्नतेची छाया पसरली होती. त्यांनी भाषणास सुरूवात करताच सभागृहात एकदम शांततेचे व गंभीर वातावरण पसरले. डॉ. आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

आजच्या सभेचे महत्त्व नुकत्याच भरलेल्या महार परिषदेपेक्षा मला शतपटीने अधिक वाटते. समाजाचा जो भाग अत्यंत हीन किंवा टाकावू गणला जातो, असा तुमचा समाज आहे. धर्माच्या नावाखाली अनैतिकरितीने आपला निर्वाह करणाऱ्या अशा तुम्ही स्त्रिया आहात. ज्यांचा स्वाभिमान लुप्त झालेला आहे, देह-विक्रय करून पोट भरणे हेच ज्यांचे जीवितसर्वस्व आहे, अशा वर्गाने जगात काय चाललेले आहे हे समजून घेण्याची जिज्ञासा दाखवावी व आपला चरित्रक्रम

---

जनता : ४ जुलै १९३६.

सुधारण्याची तयारी करावी ही गोष्ट खरोखर तुम्हास भूषणावह आहे आणि म्हणूनच महार परिषदेत २५,००० लोक समुदाय जमला याचे मला महत्त्व वाटत नाही, पण आज तुम्ही जरी ४००-५०० येथे जमला असला तरी त्याचे मला अधिक महत्त्व वाटत आहे. आजच्या तुमच्या या सभेबद्दल मी तुम्हाला धन्यवाद देतो.

एवढ्या प्रस्तावानंतर मी मुख्य विषयाकडे वळतो. आज मुंबई शहरात महार समाजाला कोठे लज्जेने मान खाली घालावी लागत असेल तर तुमच्या कामाठीपुऱ्यातून जाताना. आपल्या भगिनी त्या ठिकाणी इतर समाजाकडून आपली कशी विटंबना करून घेत आहेत हे चित्र डोळ्यासमोर उभे राहिल्याबरोबर प्रत्येक महाराला खेद वाटल्याशिवाय राहणार नाही. तुम्ही आज महार समाजाबरोबर धर्मांतर करण्याची तयारी दाखविलेली आहे, परंतु या तुमच्या निश्चयाने माझ्या अनुयायांची संख्या वाढली म्हणून मला आनंद वाटत नाही किंवा माझ्या धर्मांतराच्या घोषणेस अधिकाधिक पाठिंबा मिळत आहे म्हणूनही मला समाधान वाटत नाही. आमच्या धर्मांतराचा अर्थ नीट लक्षात घ्या. आम्ही धर्मांतर करीत आहोत ते या दुर्गंधीच्या वातावरणातून बाहेर पडण्याकरिता करीत आहोत. सर्वांना समतेचे, बंधुत्वाचे व स्वाभिमानाचे आदर्श जीवित लाभून त्यांचा आयुष्यक्रम उज्ज्वल व्हावा या दृष्टीने आम्ही धर्मांतरास तयार झालो आहोत. तुम्हाला जर आमच्याबरोबर यावयाचे असेल, तुमच्या जाती बांधवांबरोबर यावयाचे असेल तर तुम्ही प्रथम हा आपला दुर्गंधित आयुष्यक्रम अजिबात सोडून दिला पाहिजे. तुमच्या मलीन वृत्तीचा तुम्हास त्याग केला पाहिजे. हे करण्यास तुम्ही तयार असाल तर तुम्ही आमचेबरोबर या. नाहीतर तुम्ही आमचेबरोबर येऊ नका. वाटल्यास तुम्ही आहात त्याच ठिकाणी रहा. तुम्ही मुसलमान व्हा किंवा ख्रिश्चन व्हा. आमची त्यास हरकत नाही, परंतु जर आमचेबरोबर तुम्हास यावयाचे असेल तर तुम्ही काया, वाचा व मन याची शुद्धी करून व या त्रिशुद्धीने शुचिर्भूत होऊनच तुम्हाला आमचेबरोबर येता येईल. नाहीतर मी तुम्हाला स्पष्टपणे सांगतो तुम्हाला आमचेबरोबर येता येणार नाही.

आणि जर तुम्ही आपला आयुष्यक्रम पूर्ववत चालू ठेवून महार जातीस बट्टा लावण्याचे कार्य सोडणार नाही तर मी तुम्हास बजावून सांगतो की, हजारो तरूण स्वयंसेवक तयार करून मी तुमचे कामाठीपुऱ्यातून उच्चाटन करीन.

तुम्हाला समजले पाहिजे की स्त्रीजात समाजाचा अलंकार आहे. प्रत्येक समाज स्त्रियांच्या चारित्र्याला अधिक मान देतो. आपली गृहिणी होणारी स्त्री उत्तम कुलातील असावी अशी प्रत्येकजण अपेक्षा करतो व तशी भार्या मिळावी म्हणून खटपट करतो. कारण त्याला माहीत असते की, आपला, आपल्या मुलाबाळांचा, आपल्या कुटुंबाचा व कुळाचा नावलौकिक स्त्रियांच्या शीलावर

अवलंबून आहे. इतकी थोरवी स्त्रीवर्गाला प्राप्त झाली आहे. परंतु तुमच्या कामाठीपुऱ्यातील चरित्रक्रम पाहिला तर समाजाला व स्त्रीजातीला काळिमा फासण्यासारखा आहे. म्हणून तुम्हा स्त्रियांचे समाजात काय स्थान आहे, हे जाणून आपल्या मलीन आयुष्यक्रमाचा त्याग केला पाहिजे व आपला स्वतःचा आणि जातीचा दर्जा व नावलौकिक वाढविला पाहिजे. तुम्ही कदाचित असा प्रश्न कराल की, हा धंदा आमच्या उपजीविकेचे साधन आहे. इतकेच नव्हे तर या धंद्यामुळेच आज आम्हाला कशाची ददात नाही, आमचे आयुष्य सुखाने चालू आहे. आम्हाला यात नोकर-चाकर वगैरे सुखसोयी आहेत. असा ऐषआरामाचा व थाटाचा चरित्रक्रम सोडून आम्ही काय करावे ? ज्यावेळेस मी तुम्हास हे लाजिरवाणे जिणे सोडण्यास सांगतो त्यावेळेस असेही निक्षून सांगतो की, तुम्हास उपजीविकेची साधने उपलब्ध करून देण्याची जबाबदारी मी घेणार नाही. आज हजारो स्त्रिया गरीब नवऱ्याशी लग्न लावून त्यांच्या सहवासात अठराविश्वे दारिद्र्यात दिवस कंठीत आहेत. त्यांना पोट भरण्याकरता हरएक तऱ्हेचे कष्ट करावे लागतात. हजारो स्त्रिया गिरण्या, कारखाने यात नोकऱ्या करून संसारातील इतर हालअपेष्टा सोसून आपल्या मुलाबाळात गरिबीने अर्धपोटीही राहतात परंतु त्या तुमच्या धंद्यात सुख लाभते म्हणून त्यात शिरत नाहीत. त्या तसे का करीत नाहीत ? दुःखे का सहन करतात, याचा तुम्ही विचार करा. महाभारतातील कथा तुम्ही ऐकल्या आहेत. ज्यावेळेस पांडव द्युतात हरले त्यावेळी ते वल्कले व मृगचर्म धारण करून वनवासात जाण्यास निघाले. त्यांच्याबरोबर हीच वस्त्रे परिधान करून द्रौपदीदेखील होती. वाटेत, कौरवांपैकी दुर्योधनाने तीस म्हटले; '' द्रौपदी, ह्या मूर्ख नवऱ्यांबरोबर सहवास करून तू आपले हाल का करून घेतेस ? तुझ्या सुकुमार देहाला का कष्ट देतेस ? तू मजबरोबर रहा. मी तुला पूर्ण ऐश्वर्यात ठेवीन व तुला काडीचेही दुःख होणार नाही. '' पण त्या वेळेस मानी साध्वी द्रौपदीने दुर्योधनास जे उत्तर दिले ते तुम्ही लक्षात ठेवले पाहिजे. ती म्हणाली, '' जर मला नीतीने आयुष्यक्रम कंठिता येत नसेल तर मला ऐश्वर्य नको. राजवाड्यापेक्षा कष्टमय वनवास मला अधिक प्रिय आहे.'' तुम्हीदेखील हाच बाणा बाळगला पाहिजे. तुम्ही कष्ट करण्यास का भ्यावे ? तुमच्या इतर हजारो भगिनींप्रमाणे आपापल्या गावी जाऊन किंवा नोकऱ्या करून काबाडकष्टाने उपजीविका करण्यास तुम्हास का जड वाटावे ? तुम्हाला आपल्या जातीचा अभिमान का नसावा ? हे स्वतःचे विटंबना करणारे व जातीला काळिमा फासणारे जीवित तुम्ही का सोडू नये ? तुमच्या या लांच्छनास्पद धंद्याने सबंध महार जातीला किती लाज आणली आहे याची कदाचित तुम्हाला कल्पना नसेल. पण आम्हाला हरघडी तुमच्यामुळे मान खाली घालावी लागते. काही वर्षांपूर्वी कामाठीपुऱ्यात

मी एका सभेला गेलो होतो. त्यावेळेस माझे मित्र डॉ. सोळंकीही हजर होते. शिक्षणाविषयी भाषण करताना मी म्हणालो होतो की, सरकार शिक्षणाच्या बाबतीत मुसलमानांना ज्या सवलती देते त्या अस्पृश्य समाजास देत नाही, ही गोष्ट अगदी खरी आहे. त्या ठिकाणी काही मुसलमान गृहस्थ हजर होते त्यापैकी एकाने सांगितले की, ''महारास मुसलमानांविषयी का वैषम्य वाटावे ? आम्ही दोन-दोन, चार-चार महारणी ठेवतो.'' या बोचक वाक्याचे प्रत्युत्तर मी दिले नाही, पण या वाक्याने मला किती वाईट वाटले असेल, याची तुम्हीच कल्पना करा. मला कोणत्या गोष्टीची अतिशय चीड येत असेल, ज्या गोष्टीचा अतिशय संताप येऊन तळपायाची आग मस्तकात जात असेल तर या तुमच्या आयुष्यक्रमाची व तुमच्या कामाठीपुऱ्यातील राहणीची ! म्हणून मी तुम्हास परत एकवेळ बजावून सांगतो की, तुम्हास महार म्हणवून घ्यायचे असेल तर हा गलिच्छ धंदा तुम्हाला एकदम सोडलाच पाहिजे. या धंद्यात राहून मी तुम्हास आमचेबरोबर येऊ देणार नाही आणि इतकेही करून तुम्ही ऐकणार नाही तर मी तुमचा या ठिकाणाहून उठाव केल्याशिवाय राहणार नाही. तरी तुम्ही ताबडतोब जाग्या व्हा व ह्या हीन चरित्रक्रमाचा त्याग करा.

मला आशा वाटते ती ही की, आजची सभा तुम्ही स्वयंस्फूर्तीने बोलाविली आहे, आपली सुधारणा करून घेण्यास तुम्ही उद्युक्त झाला आहा. तरी ही माझी आशा लवकर सफल होईल अशी इच्छा प्रदर्शित करून मी माझे भाषण संपवितो.

भाषण चालू असता जमलेल्या स्त्रियांची अंतःकरणे सद्गदीत झाली होती. कारण डॉ. बाबासाहेबांचे भाषण अत्यंत स्फूर्तिदायक असे झाले. नंतर सभेतील इतर कार्यभाग आटोपल्यावर सभा बरखास्त झाली.



# ९४

# आपणाला यावेळी मोठा समुद्र ओलांडून जायचे आहे

तारीख ७ सप्टेंबर १९३६ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर काही कामानिमित्त पुण्यास सकाळच्या एक्सप्रेसने गेले होते. ही एक्स्प्रेस गाडी दुपारी बारा वाजता पुण्यास आली त्यावेळी स्टेशनवर त्यांचे अस्पृश्य पुढारी मंडळीकडून स्वागत करण्यात आले. यावेळी त्यांच्या स्वागतार्थ मे. सुभेदार आर. एस. घाटगे, राजाराम भोळे, डी. जी. जाधव, आर. के. कदम, सुभेदार, दुबे, सावंत, मातंग समाजाचे श्री. लांडगे वगैरे मंडळी हजर होती. मातंग समाजातर्फे फोटो व पुष्पहार अर्पण समारंभ झाल्यावर डॉ. बाबासाहेब आपल्या खाजगी कामाकरिता गेले. नंतर त्यांना दीड वाजण्याच्या सुमारास डी. सी. मिशनमध्ये आणण्यात आले. त्यांच्याबरोबर डॉ. सोळंकीसाहेब हेही होते. डी. सी. मिशनमध्ये आगामी असेंब्लीच्या निवडणुकीसाठी विचारविनिमय करण्यासाठी पुण्यातील शंभर दिडशे पुढारी व इतर मंडळी जमली होती. सर्वांशी यासंबंधी चर्चा झाल्यानंतर डॉ. आंबेडकर साहेबांनी अस्पृश्यांकरिता ज्या राखीव जागातील उमेदवारांची जी नावे स्वतंत्र मजूर पक्षातर्फे जाहीर केली आहेत त्याविषयी आगामी निवडणुकीचे पहिले भाषण केले. ते म्हणाले,

प्रिय बांधवहो,

मी निवडलेल्या उमेदवारांबद्दल जी काही थोडीशी टीका केली जात असेल त्याबद्दल मला मुळीच खंत वाटत नाही किंवा आश्चर्य वाटत नाही. कारण त्या मानाने प्रतिकूल असे मत फारसे दृष्टोत्पत्तीस येत नाही. यावरून माझी उमेदवारासंबंधीची निवड समाजास पसंत पडली आहे, असे म्हणावयास मुळीच हरकत नाही. मी ज्या माणसांची निवड केली त्यात कोणी माझे नातेवाईक, चुलते, मुलगे, जावई किंवा व्याही वगैरे कोणी नाहीत. मी त्यांचा सर्वप्रकारचा विचार करून, तीन गोष्टींची कसोटी लावून त्यात जे कसोटीस उतरले त्यांचीच निवड केली आहे. पहिली कसोटी म्हणजे इंग्रजी भाषेचे उत्तम ज्ञान. कारण तेथे सर्व कामकाज इंग्रजीतूनच चालणार आहे. आपापल्या जिल्ह्यातर्फे, तालुक्यातले जाच-त्रासादी गाऱ्हाण्यांचे प्रश्न असेंब्लीमध्ये इंग्रजीतून विचारता आले पाहिजेत. म्हणून उमेदवार इंग्रजी जाणणारा पाहिजे. दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे उमेदवार वयाने तरूण असला पाहिजे. म्हाताऱ्या मंडळींना काही तेथे पालखीतून बसवून न्यावयाचे नाही. एखाद्या असेंब्लीच्या सभासदाला

---

जनता : १२ सप्टेंबर, १९३६.

असेंब्लीचे कामकाज चालू असताना एखाद्या खेड्यातून निकडीची तार आली तर त्याला तेथे वेळ पडल्यास पायी चालत जाता आले पाहिजे. रात्री-बेरात्री आपल्या जिल्ह्यातील लोकांसाठी फिरता आले पाहिजे. ते कार्य एखाद्या म्हाताऱ्या, संधीवाताने जखडलेल्या कौन्सिलरच्या हातून कदापिही होणार नाही. तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे, आपल्या पक्षाचा उमेदवार पक्षाच्या शिस्तीखाली राहिला पाहिजे. पक्षाच्या नियमानुसार वागून त्याच्या अंगात कार्य करण्याची धमक पाहिजे आणि तो पक्षाकरिता निस्वार्थबुद्धीने काम करणारा पाहिजे. स्वार्थी माणसाला मी कवडीचीही किंमत द्यायला तयार नाही.

तुमच्या जिल्ह्यातर्फे निवडलेले श्री. राजाराम भोळे यांचे उदाहरण घ्या. त्यांच्यापेक्षा कोणताही जास्त शिकलेला व तितका लायक मनुष्य पुण्यात नाही, मला भाऊबंदकीकडे किंवा जिल्ह्याच्या दुराभिमानाकडे अथवा वतनदारीकडे लक्ष द्यावयाचे नाही. नुसत्या नावावर लायकी किंवा महत्त्व अवलंबून नाही. तर ते कामावर अवलंबून आहे. श्री. भोळे जर बिनविरोध निवडून आले तर आपल्या पदरात एकंदर तीन जागा पडतील. त्यांना जर विरोध नसला तर ते सहज निवडून येतील व त्यांना न दिल्या गेलेल्या मतांनी आपल्या पक्षाचा दुसरा उमेदवार निवडून येईल आणि दुसऱ्या भागात देखील आपल्या पक्षाचा उमेदवार आपल्या दुसऱ्या भागातील मतांनी सर्वसाधारण निवडणुकीत निवडून येईल. अशा-तऱ्हेने आपण शिस्तीने वागलो तर आपणास एकट्या पुण्यात तीन जागा मिळविता येतील. तेव्हा आपण तालुक्याचा, गावचा किंवा जिल्ह्याचा दुराभिमान सोडून तुम्ही आपल्या पक्षाच्या हिताकरिता लायक माणसालाच निवडून दिले पाहिजे. कौन्सिले म्हणजे म्हारकी नव्हे की, बाप मेला म्हणजे ती मुलाला मिळेल !

सध्या माझी प्रकृती ठीक नाही. ब्लडप्रेशर झाले असल्यामुळे, थोडे अंतर देखील चालून जाता येत नाही. तेव्हा प्रत्येक ठिकाणी जाऊन मला शंकाकुशंका सोडवावयास वेळ सापडणार नाही. माझ्या कसोटीस उतरलेल्या उमेदवारांच्या विरूद्ध जर कोणास काही करावयाचे असल्यास ते त्यांनी नीट विचार करून आणि जबाबदारी ओळखून करण्याचे धाडस करावे. मी त्यांच्या स्वार्थी कृतीची चूक सिद्ध करून दाखवीन. दिवसेंदिवस माझ्या शिरावर अनेकप्रकारच्या जबाबदाऱ्या येऊन पडत आहेत. आपल्या समाजाच्या स्वातंत्र्याच्या कार्यात मला हितशत्रू उत्पन्न झालेले आहेत. या आजच्या लढ्यात माझ्यावर कोणते प्राणांतिक प्रसंग उत्पन्न होतील ते मलाच सांगता येत नाहीत. अशाही बिकट परिस्थितीत मी तुम्हाबद्दलची सर्वप्रकारची जबाबदारी घ्यावयास तयार आहे. माझ्यावर विश्वास असेल तर तुम्ही मी निवडलेल्या लायक माणसालाच आपली मते देऊन निवडून आणून समाजाचे हित साधावे. सगळयाच ठिकाणी

म्हाताऱ्यांना जर हक्क आहे तर सगळी म्हाताऱ्यांचीच भरती होईल. मला स्वतःलाही कोठेच जागा राहणार नाही. माझ्यापेक्षा सुभेदार घाटग्यांनी ५० वर्षे जास्त काम केले आहे. श्री. शिवराम जानबा कांबळ्यांनी ६० वर्षे जास्त काम केले आहे. त्यांच्या वयाच्या मानाने मला देखील काम करता येणार नाही. तेव्हा या असल्या वादविवादात मला पडण्याचे काहीच कारण नाही. जोपर्यंत तुमचा माझ्यावर विश्वास आहे तोपर्यंत मी तुमचे पुढारीपण स्वीकारीन. आपणाला यावेळी मोठा समुद्र ओलांडून जावयाचे आहे. तेव्हा मी म्हणेन तेच नावाडी व चांगली नाव मला मिळाली पाहिजे. तरच मी नावेत पाय टाकीन. मोडकी नाव व कुचकामाचे नावाडी दिलेत तर मी नावेत मुळीच पाय ठेवणार नाही. मलाही तुमचा पुढारीपणा नको आहे. यासाठी तुम्ही सर्वांनी पूर्णपणे ध्यानात ठेवा की प्रत्येकाला लायकी पाहिजे. ' नामसे नही कामसे है ' ही गोष्ट लक्षात ठेवा.



# ९५

# अंध व स्वार्थी दृष्टी ठेवली तर सर्व समाजाचाच घात होईल

गुरूवार, तारीख ८ ऑक्टोबर १९३६ रोजी परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे सकाळच्या गाडीने ६.३० ला जळगाव स्टेशनवर आले. त्यावेळी त्यांच्या स्वागतार्थ पूर्व खानदेशातील प्रमुख मंडळींनी हजर राहून स्वागत केले. स्वागतप्रसंगी अस्पृश्य पुढारी मे. सेनू नारायण मेढे, शामराव कामाजी जाधव, रायला झगा निकम, लक्ष्मण पाहुणा मेढे, धनाजी रामचंद्र बिऱ्हाडे, मोतीराम रामजी बिऱ्हाडे, देविदास सोनावणे, नामदेव सोनावणे, ओंकार सोनावणे, दिवाण सीताराम चव्हाण, माछाडे, मि. प्रधान वकील, वानखेडे, बारसे, बहिरूपे, के. एल. तायडे, बडगे, नामदेव भागाजी भालेराव, शिवा रघुनाथ, भास्कर गरबड, वाघ इत्यादि खानदेशातील प्रमुख मंडळी हजर होती. डॉ. बाबासाहेब गाडीतून उतरल्याबरोबर त्यांचे गगनभेदी जयजयकारात स्वागत करण्यात आले व रा. मेढे यांनी त्यांना पुष्पहार घातला. नंतर आलेल्या मंडळीची विचारपूस करीत मे. कलेक्टरसाहेब (पूर्व खानेदश) यांच्या मोटारीतून मि. बाळासाहेब प्रधान वकील यांच्या घरी गेले. डॉ. बाबासाहेबांना कोर्टाचे काम असल्याने ते ११ वाजता कोर्टात गेले. बाबासाहेब जाऊन पोहचत नाहीत तोच लोकांचे थवेच्याथवे कोर्टाकडे धाव घेऊ लागले. १५-२० मिनिटात सर्व कोर्ट अलोट गर्दीने फुलून जाऊन त्या ठिकाणी एक भली मोठी यात्राच आहे की काय असे भासू लागले. यावेळी कोर्टाच्या कामात बराच व्यत्यय येऊ लागला व शेवटी जज् साहेबांना कोर्टाचे दरवाजे बंद करावे लागले. तरीपण लोकसमुदाय कोर्टासमोरील भव्य पटांगणात सारखा बाबासाहेबांच्या आगमनाची वाट पाहात होता. कोर्टाचे काम बरोबर ५-२० ला संपताच ते बाहेर आले व थोड्याच वेळाने हस्तपत्रिकेत जाहीर केल्याप्रमाणे जळगाव येथील म्युनिसीपल टाऊन हॉलमध्ये डॉ. बाबासाहेबांची मोटार आली. त्यावेळी चार हजारावर लोकसमुदाय जमला होता. रणगर्जनेने व जयजयकाराने बाबासाहेबांचे स्वागत करण्यात आले व सभेच्या कामास सुरूवात झाली. सदर प्रसंगी नाशिक येथील प्रमुख पुढारी श्री. भाऊराव गायकवाड, अहमदनगरचे तरुण पुढारी श्री. प्रभाकर जनार्दन रोहम व बलराम दादा टेलर इत्यादि मंडळी हजर होती. पहिल्या प्रथम श्री. भाऊराव गायकवाड यांचे येत्या असेंब्लीच्या निवडणुकीविषयी जोरदार व अत्यंत कळकळीचे भाषण झाले.

---

जनता : १७ ऑक्टोबर, १९३६.

नंतर डॉ. बाबासाहेब बोलावयास उठले. त्यावेळी टाळ्यांचा एकच कडकडाट उठला. सर्वत्र त्यांच्या जयजयकाराचा ध्वनी उठू लागला. मग डॉ. बाबासाहेबांनी सर्वांस शांत होण्याचा इषारा करताच क्षणात सर्व वातावरण शांत झाले. अशातऱ्हेने आमच्या सेनानायकाचा प्रत्यक्ष हुकूम अंमलात आणण्याची साक्ष त्यांनी पटवून दिली. शांतता होताच डॉ. बाबासाहेब म्हणाले,

आजची ही सभा श्री. दौलतराव गुलाजी जाधव यांच्या उमेदवारीस पाठिंबा देण्यासाठी भरविण्यात आली आहे. तुमच्या पूर्व खानदेश जिल्ह्यातील पूर्व भागाचे राखीव जागेकरिता ते उभे आहेत. या जागेकरिता आणखीही उमेदवार उभे आहेत, असे मी ऐकतो. त्यापैकी मी मेंढे, बिऱ्हाडे यांची नावे ऐकतो. या दोघांना मी चांगले ओळखतो. त्यांचा माझा संबंध आज १५-२० वर्षापासून आहे. त्यातल्यात्यात श्री. मेंढेंशी माझा जास्त संबंध आहे. श्री. मेंढेंनी येथे काही काम केले आहे, हे मी जाणून आहे. असे असता मी श्री. जाधवांनाच का उभे केले, असे पुष्कळांना वाटत असेल, पण त्याला कारण एकच आहे ते म्हणजे कायदे मंडळात हुशार, चाणाक्ष व समाजदक्ष लोकांची जरूरी आहे. आपणाला त्या कामास योग्य असाच इसम हवा आहे. भलत्या कामावर भलत्याच इसमाची निवड केली तर त्यास ते काम झेपणार नाही व त्याला ते काम येणार नाही. तुम्हाला जर एखादे घर बांधावयाचे असेल तर तुम्ही योग्य माणसांनाच जी ती कामे सांगता. सुताराला लोहाराचे काम सांगितले तर त्याला ती कामे करता येणार नाहीत. तुम्ही गवंड्याला गवंड्याचेच काम सांगणार आणि असे जर तुम्ही केले नाही तर घराऐवजी बेडौल डोलारा मात्र तुम्हाला दिसेल. पण योग्य ते काम योग्य त्या इसमाला दिले तर तुमच्या डोळ्यांचे पारणे फिटणारी सुंदर इमारत तुम्ही पाहू शकाल. हीच गोष्ट व्यवहाराची आहे व ती तुम्ही प्रत्येकाने थोडा विचार केला तर कळून येणार आहे. मे. मेढे-बिऱ्हाडे हे म्युनिसीपालिटी, लोकल बोर्ड व स्कूल बोर्ड यांच्या कामालाच योग्य आहेत, पण त्यांनी जे काम आपणास पाहता येणे अशक्य आहे, अशा कामाची इच्छा करू नये. जर त्यांना खरेच समाजाचे हित व्हावे अशी कळकळ असेल तर त्यांनी थोडा वेळ मनाशी विचार करावा व अंत:करणापासून त्या कामाला कोण लायक आहे, हे ठरवावे व जर त्यांनी प्रामाणिकपणे विचार केला तर श्री. जाधवच त्या कामास योग्य आहेत, असेच त्यांचे मन त्यांना उत्तर देईल. ते काम त्यांच्याने होणार नाही. ते नालायक आहेत, असे मी म्हणत नाही, तर ज्या त्या कामाला जो तो इसम लायक असतो आणि या कामास श्री. जाधव जास्त लायक आहेत. कौन्सिलचे सर्व काम इंग्रजीतून चालते आणि म्हणूनच उमेदवाराला उत्तम तऱ्हेचे इंग्रजीचे ज्ञान पाहिजे. त्याला वाटेल ते प्रश्न विचारण्याची ताकद पाहिजे. या सर्व गोष्टी उत्तम इंग्रजी जाणणाऱ्यालाच शक्य आहेत.

इंग्रजी न जाणणाऱ्यांचा येथे उपयोग नाही. आम्हाला आमच्या मोजक्या खुर्च्या शोभवावयाच्या नाहीत. आम्हाला कार्य करावयाचे आहे. आज त्यांच्याइतका शिकलेला इसम तुमच्या जिल्ह्यात दुसरा नाही. तो बी. ए. झाला आहे. तो काही माझा नातेवाईक नाही किंवा तो त्याचा भत्ता मला देणार नाही. मी तुमच्याच फायद्याकरिता त्याची निवड केलेली आहे. मी काही पक्षपात केला नाही. मी सर्व सारासार विचार करून व पूर्वखानदेशचा नकाशा माझ्या नजरेसमोर ठेवून श्री. जाधवांची निवड केली आहे आणि मी पुन्हा सांगतो की तो लायक आहे.

तुम्ही म्हणाल की अडाणी मराठे व कुणबी कौन्सिलमध्ये जातात. त्यांना कुठे इंग्रजी येते ? जर त्यांचा इसम चालतो मग आमचा का नको ? पण मी तुम्हास असे सांगतो की मराठे, कुणबी आणि तुमच्यात जमीन अस्मानचे अंतर आहे. त्यांना सर्वकाही अनुकूल आहे. त्यांना कोठलीही उणीव नाही. पण तुम्ही कंगाल आहात . तुम्हास सर्व काही कष्टाने प्राप्त करावे लागते आणि ते सुलभरितीने प्राप्त करावयाचे असेल तर फक्त कायद्याने मिळविता येणे शक्य आहे. एवढ्याकरिता तुमचे मूर्ख उमेदवार चालणार नाहीत, तज्ञ हवे आहेत कारण तुमची ग्रहदशा काढून टाकावयाची आहे आणि म्हणूनच श्री. जाधवरावासारख्या लायक उमेदवारास तुम्ही निवडून देणे तुमचे कर्तव्य आहे. जर तुम्ही तसे न कराल तर तुम्ही स्वतःचा नाश करून घ्याल, ही मी तुम्हाला आजच धोक्याची सूचना देतो. जर एखाद्याने मूर्खपणा केला तर तुम्ही तो करू नका. एकाने चोरी केल्यास दोरी बांधून फुकट मरू नका. आज दोन हजार वर्षापासून तुमचे पूर्वज या हिंदुस्थानात आहेत. पण कोणकोण ब्राह्मणाच्या मांडीला मांडी लावून बसले होते ? तो भाग्योदय आज तुम्हाला प्राप्त झाला आहे आणि अशावेळी जर तुम्ही अंध व स्वार्थी दृष्टी ठेवली तर सर्व समाजाचाच नव्हे तर स्वतःच्या बायका-मुलांचा घात कराल. म्हणून मी या सर्व मंडळीतर्फे मे. मेढे-बिऱ्हाडे यांना विनंती करतो की तुम्ही समाजाच्या आड येऊ नका व विनाकारण गोंधळ करू नका. पण इतकेही सांगून त्यांनी ऐकले नाही तर तुम्ही काय कराल ? तुम्ही मला विरोध कराल काय ? (सर्वत्र आवाज नाही ! नाही !! नाही !!!) समाजाचा घात कराल ? (फिरून नाही-नाही) मग काय कराल ? तुमच्या भागात ५,००० मतदार आहेत, प्रत्येकाला मतदानाचा हक्क प्राप्त झाला आहे आणि त्याचा तुम्ही योग्य तोच उपयोग केला पाहिजे. म्हणून प्रत्येकाने विचार केला पाहिजे व सर्व समाजाचे कार्य उत्तम व्हावे असे जर तुम्हाला वाटत असेल तर तुमचे कर्तव्य करा आणि सर्वांनी वाटेल ती खटपट करून श्री. जाधवाला निवडून आणा. फुटकी नाव व कुचकामाचे नावाडी देऊन ती नाव पैलतीरावर न्या, असे जर तुम्ही म्हणत असाल तर

त्या नावेला मी केव्हाही पैलतीराला नेणार नाही. इतकेच नव्हे तर त्या नावेत पायदेखील ठेवणार नाही. म्हणून मी सांगेन तेच नावाडी मला दिले पाहिजेत. तरच मी त्या जहाजाला सहजरीत्या पार नेईन. शेवटी तुम्ही श्री. जाधवालाच निवडून आणावे अशी मी तुम्हास विनंती करतो.

यानंतर श्री. बारभूवन यांनी डॉ. साहेबांनी जो अमूल्य उपदेश केला तो सर्वांनी लक्षात ठेवून व श्री. जाधव यांना निवडून देणेबद्दल एक जलसा खेडोपाडी नेण्याचे जाहीर केले.



# ९६
# ज्या वृक्षाच्या छायेखाली गुण्यागोविंदाने बसावयाचे आहे, त्या छायेच्या फांद्या तोडण्याचा दुष्टपणा करू नका

डॉ. बाबासाहेब आंबेडकर नोव्हेंबर १९३६ मध्ये विलायतेला गेले. त्यापूर्वी त्यांनी जनता, दिनांक ७ नोव्हेंबर १९३६ मध्ये जाहीर केल्यानुसार रविवार, दिनांक ८ नोव्हेंबर १९३६ रोजी सकाळी ९ वाजता दामोदर हॉल, परेल, मुंबई येथे समता सैनिक दलाची एक जाहीर सभा बोलाविली होती. या सभेचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर होते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर भाषण करावयास उभे राहिले तेव्हा टाळयांचा प्रचंड कडकडाट झाला. ते आपल्या भाषणात म्हणाले,

मी उद्या काही जरूरीच्या कामकाजाकरिता विलायतेला जात आहे. माझ्या गैरहजेरीत आपणास फार मोठी जबाबदारीची कामगिरी बजावायची आहे. आपणास ठाऊक आहेच की नवीन राज्यघटनेनुसार आपल्या अस्पृश्य समाजाला कायदे मंडळात १५ राखीव जागा मिळाल्या आहेत. त्या कायदे मंडळाची निवडणूक येत्या फेब्रुवारी महिन्यात होईल. आपणास मिळालेल्या या पंधरा जागा या इलाख्याच्या निरनिराळया जिल्ह्यात विभागल्या गेल्या आहेत. या जागांकरिता मी आपल्या स्वतंत्र मजूर पक्षातर्फे निरनिराळया ठिकाणी उमेदवार उभे केले आहेत. या निवडणुकी लढविण्यासाठी मी व माझ्या सहकारी मित्रमंडळींनी मिळून हा स्वतंत्र मजूर पक्ष का स्थापन केला याचा खुलासा प्रथम करतो. काँग्रेससारखी बलाढ्य व सुसंघटित संस्था या देशात असताना ही नवीन संस्था काढण्याची आवश्यकता का भासली याचे उत्तर अगदी सरळ आहे. काँग्रेसचे मुख्य ध्येय म्हटले म्हणजे स्वातंत्र्य. मला व माझ्या सहकाऱ्यांना हे ध्येय मान्य आहे, परंतु ते साध्य करणे म्हणजे साधीसुधी गोष्ट नव्हे. त्याला सत्याग्रहासारखे गांधीजींचे शस्त्र बोथट पडणारे आहे. कायदे भंगानेही सरकारकडून स्वातंत्र्य मिळविता येणे अशक्य कोटीतली-विशेषत: शक्तिबाहेरची– गोष्ट आहे, असे प्रत्येकाला वाटत आहे. असे असूनही आपण निष्फळ स्वातंत्र्याची वल्गना करण्यात काय अर्थ आहे ? जोपर्यंत खरेखुरे स्वातंत्र्य मिळविण्याची अंगी धमक नाही तोपर्यंत सनदशीर मार्गाने आपल्या ध्येयाचा मार्ग गाठणे अधिक हिताचे आहे, असे आमचे प्रामाणिक

---

जनता : ५ डिसेंबर, १९३६.

मत आहे. तशात हिंदुस्थान हे एक राष्ट्र नाही. या देशात निरनिराळ्या ४,००० जाती आहेत. या निरनिराळया जातींच्या बंडामुळे जातिभेद, प्रांतभेद, तंटे, बखेडे आणि धर्मभेदाचे गंभीर प्रसंग, यामुळे एकी होणे अशक्य आहे. हिंदू, मुसलमान व खिस्ती यांचे एकच ध्येय नाही. समजा आजच्या परिस्थितीत इंग्रज सरकारचे छत्र नाहीसे झाले तर ज्यांना एकराष्ट्रीयत्वाचे ध्येय मान्य नाही, असे जात्याभिमानी आणि धर्माभिमानी लोक आपापसात झगडून स्वतःच्या हाती राजकीय सत्ता घेण्याचा प्रयत्न करतील.

दुसऱ्या बाजूनी विचार करता कॉंग्रेस व आमचा पक्ष यात पुढीलप्रमाणे भेद आहे. कॉंग्रेसला आजच्या नवीन सुधारणा अपुऱ्या वाटतात आणि यासाठी कायदे मंडळात जाऊन या सुधारणांच्या निषेधार्थ ती मंडळे मोडून टाकणे आवडते. परंतु आम्हाला या सुधारणा अपुऱ्या वाटत असूनही कायदे मंडळात जाऊन या सुधारणान्वये कार्य करून अधिकाराच्या बळावर अधिक हक्क मिळविण्याचा सतत प्रयत्न करणे आम्हाला आवडते. कायदे मंडळे मोडून पोरखेळ खेळत राहण्याचे आजचे दिवस राहिले नाहीत. खरे स्वातंत्र्य मिळविण्याची जी खरी शक्ती ती आपल्या हाती नसताना-तितकी अंगी धमक नसताना– स्वातंत्र्याचे हवेत मनोरे बांधणे शेवटी अपायकारक ठरतील. तशात कॉंग्रेस हे एक कडबोळे आहे. तिच्यात बेकार, मजूर, भांडवलवाले, सावकार, शेतकरी, कुळे, जमीनदार, लहानमोठे व्यापारी, मध्यमवर्ग वगैरे परस्परविरोधी हितसंबंधांच्या लोकांची एक मोट आहे. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे ही एक विळया आवळयांची मोट आहे. रक्त शोषण करणाऱ्यांची व रक्त शोषण केले जाणाऱ्यांची मित्र म्हणून कशी सांगड घातली जाणार ? आज कॉंग्रेस धनिकांच्या मगरमिठीत बसली आहे. ती गोरगरीब, कामकरी व शेतकरी जनतेचे कोणते हित करणार ? कॉंग्रेस ही संस्था शेतकरी-कामकरी वर्गाची संस्था नाही. ती भांडवलदारांची पाठीराखी आहे. तिच्या हातून बहुजन अशा श्रमजिवी लोकांचे हित होणे कठीण आहे. त्याच्या उलट आमचा स्वतंत्र मजूर पक्ष हा निर्भेळ वर्ग तत्त्वाच्या पायावर उभारलेला आहे. आम्हाला जितके कामकरी व शेतकरी वर्गाचे हितरक्षण जिव्हाळयाने करता येईल तितके कॉंग्रेसला करता येणे अगदीच अशक्य आहे. पददलित, गोरगरीब अशा श्रमजिवी वर्गाचे हितरक्षण व संवर्धन करणे हेच आमच्या पक्षाचे मुख्य कार्य आहे. तत्त्वांच्या बाबतीत तडजोड न करता कायदे मंडळातील कोणत्याही पक्षाशी तपशीलाच्या बाबतीत योग्य प्रसंगी सहकार्य करू. तसेच मी अस्पृश्य समाजाला सोडून इतर जातींच्या लोकांशी सहकार्य करून संगनमत का केले, अशाप्रकारचा प्रश्न मला विचारण्यात येतो. त्यासंबंधी सांगायचे म्हणजे असे की, नवीन राज्यघटनेनुसार स्थापन होणाऱ्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्ये एकंदर १७५ सभासद निवडून

जाणार आहेत. या १७५ सभासदांमध्ये आपले अस्पृश्य समाजाचे १५ सभासद असणार. या पंधरा जणांच्या मदतीने कुणाला काहीच काम करता येणे शक्य नाही. यासाठी आपल्या मदतीला जास्त लोकांची आवश्यकता आहे आणि हे लोकसुद्धा आपल्याच विचारसरणीचे व आपले मित्र असेच पाहिजेत. यासाठी ज्या ज्या स्पृश्य माणसांनी आजपर्यंत आपुलकीने सहाय्य केले, ज्यांनी आपल्या समाजकार्यासाठी स्वार्थत्याग केला अशा मनुष्यांना आपण निवडून देऊन आपल्या पक्षात सामील करून घेणे आवश्यक आहे. यासाठी यापुढे आता निष्कारण तर्ककुतर्क काढून वेळ गमावू नका. आमच्या पक्षातर्फे ज्या कार्यक्रमाची आखणी केली आहे ती पार पाडण्यासाठी आपापसातील भांडणे, तंटे, मारामाऱ्या वगैरे अनिष्ट प्रकार बाजूला ठेवा. शिस्तीला व तत्त्वाला जागून वागलात तर आज माझ्या हातून आपल्या समाजाकरिता जे अल्प प्रमाणात काम करता आले आहे ते अधिक प्रमाणात करून घेण्याची मला प्रबल अशी शक्ती प्राप्त होईल. तत्त्वाकरिता व शिस्तीकरता लढता लढता मी कायदे मंडळाच्या निवडणुकीत पडलो तरी हरकत नाही. परंतु मुंबई जी वार्ड व उपनगर विभागातर्फे उभे राहिलेले आपले उमेदवार मि. काळोखे यांना तुम्ही निवडून आणले पाहिजे. त्यातच तुमचे कल्याण आहे. त्यातच तुमची सारी अब्रू आहे. यावेळी महार-मांग हा जातीभेद मानू नका. आपण यापुढे सर्व एकच आहोत, ही उज्ज्वल भावना हृदयात निरंतर जागृत ठेवा.

आता मी दुसऱ्या एका महत्त्वाच्या मुद्याकडे वळतो. तो म्हणजे : मी सर्वच उमेदवार महार जातीचे निवडून इतर समाजाच्या लोकांना उभे केले नाही, हा होय ! खरे पाहिले म्हणजे या बाबतीत आम्ही अधिक खोलात जाऊ नये, हे बरे ! तरी पण आज ज्यांनी राष्ट्रीय हरिजन पक्ष काढून या आरोपाला तोंड फोडले आहे त्यांना उत्तर हे दिलेच पाहिजे. या राष्ट्रीय हरिजन पक्षवाल्यांना मी एकाच नावाने संबोधू इच्छितो. हे लोक ' लेभागू ' लोक आहेत. यांना चांभार म्हणून मी माझ्या पक्षातून वगळले नाही. त्यांनी त्याप्रमाणे वाटेल ती ओरड करावी , त्याची मला बिलकूल कदर नाही. त्यांची निवड न करण्यात त्यांचा ' लेभागूपणाच ' कारणीभूत झाला आहे. जिथे मिळेल तिथे जायचे. तत्त्वाची-शिस्तीची यांना कधीच जाणीव नसावयाची. मिळेल ते ओटीत टाकून स्वतःकरिताच घेऊन जायचे, हाच त्यांचा धर्म ! आम्ही महाड सत्याग्रह केला, स्वावलंबनाच्या निरनिराळया चळवळी केल्या, नाशिक सत्याग्रह केला, फार कशाला पुणे-करार प्रसंगाचे उदाहरण घ्या. आम्ही तत्त्वाकरिता प्राणावर बेतेपर्यंत कॉंग्रेसशी व तिचे पंचप्राण गांधीशी झगडत असता हे राष्ट्रीय हरिजनवाले अगदी अचूक आमच्या शत्रूच्या कॅंपात बसलेले ! अशा लेभागू

लोकांना प्राप्तीच्या वाट्याच्या वेळी हात पसरला असता त्यांना काहीतरी देण्यात आम्हीतरी का उदारपणा दाखवावा ! वटवाघुळाच्या वृत्तीने ज्यांना आपले जिणे जगावयाचे आहे त्यांच्या आरोपाची आणि कांगावखोरपणाची पर्वा मला वाटत नाही. इतकेच नव्हे तर पुणे कराराच्या पूर्वी गांधीजींनी प्राण पणास लाविला तेव्हा ह्या लोकांना गांधीजींना वाचविण्यासाठी कायदे कौन्सिलात मुळीच जागा नको होत्या. मग आता माझ्या प्रयत्नामुळे मिळालेल्या ह्या जागा हे का मागतात ? खरे पाहिले तर या राष्ट्रीय हरिजन पक्षातले प्रमुख पुढारी म्हणविणारे श्री. नारायणराव काजरोळकर वेळ पडल्यास डॉ. सावरकरांच्या ओटीत बसतील, श्री. पी. बाळू देशभक्त वल्लभभाईच्या ओटीत धडपडत असताना दिसतील. अशा परिस्थितीत या पक्षाची शेवटी काय अवस्था होईल हे आजच सांगून उपयोगी नाही. अशा या खऱ्या परिस्थितीवर कधी कोणी प्रकाश पाडला आहे काय ? आमच्या पक्षाशी ज्याने आजपर्यंत सहकार्य केले व आमच्या कार्याच्या यशासाठी जे झटले ते श्री. शिवतरकर मास्तर हे चांभार समाजातले एक प्रमुख आहेत. त्यांना दुर्दैवाने म्युनिसीपल कमिटीकडून कायदे मंडळांच्या निवडणुकीसाठी उभे राहाण्याची परवानगी मिळाली नाही. त्यामुळे त्यांना आमच्या पक्षातर्फे उमेदवार म्हणून उभे करता आले नाही. असो.

खरे पाहिले असता मला या कायदे मंडळात जाण्यापेक्षा कायदे मंडळाच्या बाहेर राहूनच कार्य करण्यात अधिक बरे, असे वाटते. माझ्यापुढे आज धर्मांतराचा प्रश्न आहे. नवीन कॉलेजची काळजी आहे व इतर बरीच सार्वजनिक कामे आहेत. तरीसुद्धा आपणा सर्वांच्या इच्छेसाठी मी या नवीन पक्षाच्या संगनमताने कायदे मंडळात शिरण्याचा संकल्प केला आहे. माझी पूर्ण खात्री आहे की, माझ्या या संकल्पात कॉंग्रेस काटे पेरल्याशिवाय राहणार नाही. पैशाच्या बळावर कॉंग्रेस मला विरोध करण्याचे अनेक प्रकारचे प्रयत्न करील व आज त्यांनी त्याप्रमाणे प्रयत्न चालविले आहेत. यासाठी आपण सर्वांनी शिस्तीने संघटित झाले पाहिजे आणि आपली प्रत्येकाची सर्व मते यावेळी मला मिळाली पाहिजेत. मी निवडून येण्यासाठी तत्त्वापासून ढळणार नाही, ही गोष्ट तुम्ही लक्षात ठेविली पाहिजे. आपणास कुणी मदत करणार नाही आणि अशावेळी फंदफितुरीच्या मोहाला तुम्ही बळी पडता कामा नये. ज्यांना उमेदवार म्हणून घेता आले नाही असे असंतुष्ट लोक फंदफितुरीच्या मार्गाला लागलेले आहेत. त्यांच्या फंदफितुरीला केवळ स्वाभिमानासाठी तरी बळी पडू नका. तुम्ही विचार करा की, ज्या वृक्षाच्या छायेखाली आपणास गुण्यागोविंदाने बसावयाचे आहे, ज्या वृक्षाच्या छायेने आपणास पूर्ण समाधान मिळणार आहे ती छाया तुम्ही नष्ट करण्याचा, ह्या छायेच्या फांद्या कुऱ्हाडीने तोडून टाकण्याचा दुष्टपणा करणार नाही अशी मला खात्री आहे. स्वार्थाला, लोकांच्या चिथावणीला

बळी पडून जे आज अविचाराचे आणि दुष्टपणाचे कृत्य करावयास प्रवृत्त झाले आहेत त्यांच्यापदरी यश कितपत मिळेल याबद्दल शंका आहे, परंतु ते आज आपलीच कुऱ्हाड आपल्याच पायावर मारून घेत आहेत. या सर्वप्रकारच्या कारवायापासून अलिप्त राहून मी माझ्या सहकाऱ्यांच्या मदतीने जो कार्यक्रम तुमच्यापुढे ठेवीत आहे तो तुम्ही, समता सैनिक दलातील प्रत्येक सैनिकानी शिस्तीने पार पाडला पाहिजे.

आपल्याला बऱ्याच बलाढ्य शत्रूंशी टक्कर द्यावयाची आहे. यासाठी कमीत कमी दोन हजार समता सैनिकांची उभारणी या मुंबई शहरात झाली पाहिजे. आपल्याजवळ मुबलक मनुष्यबळ असल्यावर, शिस्तीच्या व संघटनेच्या बळावर वाटेल त्या बिकट परिस्थितीत मार्ग काढणे कधीही कठीण झाले नाही. माझ्या निवडणुकीबाबत काँग्रेस व इतर हितशत्रू पुष्कळ प्रकारची कारस्थाने रचून, माझा त्यांच्या मार्गातील काटा काढून टाकण्याचा प्रयत्न करीत आहेत. माझी खात्री आहे की, माझ्या निवडणुकीच्या वार्डातील प्रत्येक अस्पृश्य मतदार मला मत दिल्याशिवाय राहणार नाही आणि हे कार्य समता सैनिक दलाने प्रत्यक्ष हाती घेऊनच करावयास पाहिजे आणि माझी खात्री आहे की, माझ्या गैरहजेरीत ही मोठी जबाबदारी समता सैनिक दलाचा प्रत्येक शिस्तीचा शिपाई इमानेइतबारे पार पाडील. मी या कार्यासाठी एक कमिटी नेमली आहे. तिच्या मदतीने तुम्हास तुमचे कर्तव्यकर्म पार पाडता येईल.



# सूची

## विषय सूची

### अ ते अं

## विषय सूची—चालू



### क

## विषय सूची–चालू

### ख



### ग



### च



### ज

## विषय सूची–चालू

### ड



### त



### द



### ध

## विषय सूची–चालू

### न



### प



### फ

## विषय सूची–चालू

### ब



### भ

## विषय सूची—चालू

### म

## विषय सूची–चालू

### य



### र



### ल



### व

## विषय सूची–चालू

## विषय सूची—चालू



### ह



### ज्ञ

## व्यक्तिनाम सूची

### अ ते अं



### क

## व्यक्तिनाम सूची—चालू

## व्यक्तिनाम सूची–चालू

## व्यक्तिनाम सूची—चालू



### ट



### ठ



### ड



### त



### थ

## व्यक्तिनाम सूची–चालू

### द



### ध



### न



### प

## व्यक्तिनाम सूची–चालू

## व्यक्तिनाम सूची–चालू

### भ



### म



### य

## व्यक्तिनाम सूची–चालू

### र



### ल

## व्यक्तिनाम सूची–चालू

### व



### श



### स

## व्यक्तिनाम सूची—चालू



### ह



### ज्ञ

## स्थळसूची

### अ



### आ



### इ



### क



### ख

## स्थळसूची–चालू

### ग



### च



### ज



### झ



### ट



### ठ



### त



### द

## स्थळसूची–चालू



### ध



### न



### प



### फ

## स्थळसूची–चालू

### ब



### भ



### म

# स्थळसूची—चालू

## य



## र



## ल



## व



## श

## स्थळसूची—चालू

### स



### ह

## जाती/जमाती/समाज सूची

## जाती/जमाती/समाज सूची–चालू



शामुना—डब्ल्यूएन-६९–उउवतंशिसंगमुं-९-२००२-३०.१३५-पीआर ८*

**Vol. 12**
Unpublished Writings.
Ancient Indian Commerce.
Notes on Laws.
Waiting for a Visa.
Miscellaneous Notes etc.
*Pages 794, Rs. 95*

**Vol. 13**
Dr. Ambedkar as the Principal
Architect of the Constitution of India.
*Pages 1240, Rs. 190*

**Vol. 14 in two parts**
Dr. Ambedkar and the Hindu Code Bill.
*Pages 1385, Rs. 200 (Overseas $ 20)*

**Vol. 15**
Dr. Ambedkar as Free India's First Law
Minister and Member of Opposition in
Indian Parliament (1947 to 1956).
*Pages 1110, Rs. 110 (Overseas $ 10)*

**Vol. 16**
Dr. Ambedkar's (*i*) The Pali Grammar
(*ii*) The Pali Dictionary –
(*a*) Pali into English
(*b*) Pali into English, Marathi, Hindi and Gujarathi.
(*iii*) Bouddha Pooja Path.
*Pages 752, Rs. 75 (Overseas $10)*

**Vol. 17**
Dr. Babasaheb Ambedkar
Miscellaneous Writings.
*Pages 844, Rs. 120 (Overseas $ 20)*

**Vol. 18 : (मराठी)**
खंड १८ : डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे (भाग १ ते ३)
भाग १, पृष्ठे ६३८, मूल्य रु. १००

---

**Other Published Volumes**
Source Material on
Dr. Babasaheb Ambedkar
and the Movement of the Untouchables.
**Vol. 1 :** *Pages 468, Rs. 10.00*
(Out of Print)
**Vol. 2 : (मराठी)**
डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे
बहिष्कृत भारत आणि मूकनायक.
पृष्ठे ५००, मूल्य रु. ७५.००

---

**Forthcoming Volumes**
खंड १९ : डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे मूळ मराठी लेख,
मुलाखती इत्यादी (भाग १ ते ३)
**Vol. 20**
Dr. Ambedkar's Correspondence.
**Vol. 21**
Dr. Ambedkar in Photographs.

मानसिक स्वातंत्र्य कोणाला आहे असे म्हणता येईल ? जो आपली बुद्धी जागृत ठेऊन आपले हक्क काय, आपले अधिकार काय व आपले कर्तव्य काय याची जाणीव करून घेतो त्याला मी स्वतंत्र म्हणतो. जो परिस्थितीचा दास झाला नाही, जो परिस्थितीला आपल्या कह्यात आणण्यास सिद्ध असतो, तो माणूस स्वतंत्र आहे, असे मी म्हणतो. जो रुढीच्या स्वाधीन झाला नाही, जो गतानुगतिक बनला नाही, ज्याच्या विचाराची ज्योत विझली नाही तो स्वतंत्र आहे, असे मी म्हणतो. जो पराधीन झाला नाही, जो दुसऱ्याच्या शिकवणीने वागत नाही, जो कार्यकारणभाव ध्यानात घेतल्याशिवाय कशावर विश्वास ठेवित नाही, जो आपल्या हक्कांचा अपहार केला असता, त्याच्या रक्षणार्थ दक्ष असतो, जो प्रतिकूल लोकमताला घाबरून जात नाही, दुसऱ्याच्या हातचे बाहुले न होण्याइतकी बुद्धी, स्वाभिमान ज्याला आहे तोच माणूस स्वतंत्र आहे, असे मी समजतो. जो आपल्या आयुष्याचे ध्येय व आपल्या आयुष्याचा व्यय दुसऱ्याने घालुन दिलेल्या आज्ञेप्रमाणे ठरवित नाही, जो आपल्या बुद्धीनुसार आपल्या आयुष्याचे ध्येय काय असावे व आपले आयुष्य कोणत्या कार्यात व कशा रीतीने व्यतीत करावे हे आपले आपण ठरवितो, सारांश जो सर्वस्वी स्वाधीन आहे, तोच माणूस स्वतंत्र आहे, असे मी समजतो. -- (पृ. क्र. ५०६)

-- डॉ. बाबासाहेब आंबेडकर